# पद्मपुराण

## ( जैन रामायण )

भाग १ ला

★

मूळ कवि : आचार्य रविषेण

मराठी काव्य रूपांतर :

जिनवाणीभूषण पं. जिनदास पार्श्वनाथ फडकुले, न्यायतीर्थ,
सोलापुर.

वीर संवत् २४९१

जानेवारी १९६५ ★ किंमत दहा रुपये

## * रामायण प्रकाशन समिति *



---



---

* चित्रकार :– प्रा. भय्यासाहेब ओंकार, पुणें *

---

प्रकाशक :
श्री रामायण प्रकाशन समिति
४३७, प. मंगळवार, चाटी गल्ली,
सोलापुर.

मुद्रक :
श्री. प्रकाशचंद्र फुलचंद शहा
मेसर्स वर्धमान छापखाना,
५१९, शुक्रवार, सोलापुर.

श्री-वीरनाथ मङ्गल पहिलें, गौतमगणी असे दुसरें।
श्री-कुन्दकुन्द आदिक मङ्गल सूरीश हें जगीं तिसरें ॥
चौथें मङ्गल आहे, जिनोक्तजिनधर्म मुक्तिसुखदाता।
कृति 'रामायण' यांना अर्पी जिनदास नमवुनी माथा ॥

# श्री जैन रामायण प्रकाशन समिति, सोलापूर १९६२

बसलेले ( डावीकडून ) श्री. राजूबाई दोशी, शेठ गोविंदजी रावजी दोशी (अध्यक्ष व कोषाध्यक्ष), रामायणकार पं. जिनदास पार्श्वनाथ फडकुले शास्त्री, श्री. रतनचंद सखाराम शाह ( कार्याध्यक्ष ) व श्री. श्रीपाल नेमिनाथ वैद्य ( मंत्री ).

उभे ( डावीकडून ) श्री. नानचंद हिराचंद शाह ( मंत्री ), श्री. जंबुकुमार माणिकचंद शाह, श्री. रामचंद रावजी कोठाडिया, पं. बालचंद्रजी शास्त्री, प्रा. निर्मलकुमार फडकुले, श्री. फुलचंद हिराचंद शाह व श्री. हिराचंद नेमचंद गांधी.

## रामायण प्रकाशनाचे आधारस्तंभ

स्व. श्री. सखाराम देवचंद शाह

श्रीमती राजुबाई रावजी दोशी

# प्रकाशन समितीचे निवेदन

श्री पूज्य रविषेणाचार्य यांच्या 'पद्मपुराण' या श्रेष्ठ संस्कृत काव्याचे रूपांतर रसिक वाचकांच्या हाती देताना आम्हाला अतिशय आनंद वाटत आहे. संस्कृत ललित साहित्यात 'पद्मपुराणाला' उच्च स्थान असून आचार्यांच्या तत्त्वदृष्टीचे व प्रतिभेचे मनोहर वैभव त्यातून स्पष्ट होते. तथापि या अनुपम काव्यग्रंथाचा आस्वाद संस्कृतातून बहुसंख्य रसिकांना घेता येणे अशक्य असल्यामुळे त्याचे मराठी रूपांतर आम्ही रसिकांपुढे ठेवीत आहोत. जैन साहित्य व जैन समाज यांची सुमारे पन्नास वर्षे अविरतपणे, निरलस सेवा करणारे पं. जिनदास पार्श्वनाथ फडकुले यानी पद्मपुराणाचे मराठी काव्यात रूपांतर केले आहे. मूळ ग्रंथाच्या सौंदर्याला व सामर्थ्याला कुठेही धक्का न लावता ते सौंदर्य व सामर्थ्य मराठी काव्यात अवतीर्ण करण्याचे अत्यंत दुष्कर कार्य पं. जिनदासजी यानी सहजतेने केले आहे. संस्कृत व व प्राकृत भाषांचा आणि त्यांतील विविधरंगी साहित्याचा त्यांनी अखंड व्यासंग केला असल्यामुळे व त्यांच्या ठायी काव्यरचनेची क्षमता असल्यामुळे 'पद्मपुराणा' सारख्या भव्य काव्यग्रंथाला रसमय मराठी आकार देता येणे त्यांना शक्य झाले. लालित्य आणि पांडित्य यांच्या स्वाभाविक समन्वयातून प्रस्तुत रचना त्यांनी केली आहे.

जैन समाजाच्या सांस्कृतिक व धार्मिक उन्नतीचा हेतु प्रधान मानून या ग्रंथाच्या प्रकाशनाचे कार्य रामायण प्रकाशन समितीने आपल्या शिरावर घेतले. एका तात्कालिक घटनेचा हा येथे उल्लेख करणे अप्रस्तुत होणार नाही. सुमारे चार वर्षांपूर्वी पं. जिनदासजी शास्त्री एका दुःसाध्य रोगाने आजारी झाले. त्यांच्या जीवनाची बहुधा या आजारातच अखेर होणार अशी दुःखद शंका सर्व जैन समाजाला येत होती. 'रामायणा' चे प्रकाशन व्हावे अशी अत्यंत उत्कट

इच्छा त्यानी व्यक्त केली. या एका इच्छेशिवाय दुसरी कसलीही अपेक्षा त्यानी ठेवली नव्हती. आपल्या ग्रंथाचे प्रकाशन आपल्या उपस्थितीत व्हावे या एकमेव अदम्य प्रेरणेने अशक्यप्राय वाटणाऱ्या आजारातूनही ते पूर्णपणे बरे झाले. कदाचित् त्यांच्या हातून साहित्याची अधिक सेवा व्हावी व जैन समाजाच्या सांस्कृतिक अभिवृद्धीसाठी त्यांचा उपयोग आणखी अनेक वर्षे होत रहावा अशीच नियतीची इच्छा दिसते. रामायण प्रकाशन निधीला साहाय्य करण्याचे आवाहन जैन समाजाला समितीने करताच समितीवर द्रव्याचा वर्षाव होऊ लागला हे सांगताना आम्हाला आनंद व अभिमान वाटतो. अनेक ठिकाणांहून मनिऑर्डर्स येऊ लागल्या. धनिकापासून गरिबापर्यंत सर्वांनीच या परमधार्मिक कार्याला स्वयंस्फूर्त औदार्याने शक्य ते साहाय्य केले. ज्याना द्रव्यसाहाय्य करणे शक्य नव्हते त्यानी या कार्याला अन्य प्रकारे मदत केली. पं. जिनदासशास्त्री यांच्याविषयी अखिल जैन समाजाच्या मनात केवढा आत्मीयभाव आहे याचे जसे यावेळी दर्शन घडले तसेच श्रेष्ठ साहित्याबद्दल समाजमनाला किती आकर्षण वाटते याचीही साक्ष यावेळी आम्हाला पटली. या अत्यंत हृदयस्पर्शी अनुभवावरून शक्य तर आणखी साहित्याचे प्रकाशन करण्याचे उत्तरदायित्व आपण घ्यावे असा उत्साह समितीला आला. समाजाने समितीच्या विनंतीला इतक्या प्रचंड प्रमाणात प्रतिसाद दिला आहे की त्याचे आभार मानून त्याच्या ऋणातून औपचारिकपणे मोकळे व्हावे असे आम्हाला वाटत नाही. हा ऋणभार असाच मस्तकावर वहाताना आम्हाला धन्यता वाटेल.

प्रस्तुत ' रामायण ' ग्रंथाच्या मुद्रणाची व त्या अनुषंगाने उद्भवणाऱ्या सर्व कार्यांची जबाबदारी येथील वर्धमान मुद्रणालयाचे धर्मप्रेमी संचालक श्री. फुलचंद हिराचंद शाह व श्री. प्रकाशचंद फुलचंद शाह यानी घेऊन उत्तमरीतीने पार पाडली याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत. सुमारे सोळाशे पृष्ठांचा हा महाग्रंथ सुंदर, कलापूर्णरीतीने त्यानी मुद्रित केला आहे.

' रामायणातील ' विविध नाट्यपूर्ण घटनांवर आधारित अशी चित्रे महाराष्ट्रातील एक नामवंत चित्रकार प्रा. भय्यासाहेब ओंकार यांनी काढून दिली आहेत. चित्रांच्या उत्कृष्टपणाविषयी शंकाच नको. त्यानी काढलेल्या या कलासुंदर चित्राबद्दल मनःपूर्वक आभार.

आणखी एकच उल्लेख— अत्यंत महत्त्वपूर्ण उल्लेख अखेर करीत आहे. ' रामायणा ' सारखे प्रचंड काव्य आमूलाग्र वाचून अन्य रामायण ग्रंथांशी त्याची

तुलना करून प्रदीर्घ रसग्रहण लिहिण्याचे कार्य महाराष्ट्रातले एक ज्येष्ठ कवि गिरीश (प्रा. शं. के. कानेटकर) यानी केले आहे. अनेकविध व्याप असूनही कविवर्यांनी आमची विनंती मान्य केली. त्यानी केलेले मर्मग्राही 'रसग्रहण' रसिकांपुढे आहेच. पं. जिनदासशास्त्री यांच्या काव्यप्रतिभेचे व त्यांच्या परिश्रमशीलतेचे महाराष्ट्राच्या या व्यासंगी कवीने जे 'रसग्रहण' केले आहे ते मनोज्ञ आहे. कवि गिरीशांचे आम्ही हार्दिक आभार मानतो.

साहित्यरसिकांना एक नम्र विनंती अशी की 'रामायणा' च्या विविध अंगाचा– साहित्य, धर्म, तत्त्वज्ञान इ.– अनेकविध दृष्टिकोनातून त्यानी विचार करावा. श्री. रामचंद्र व सीता या पुण्यश्लोक व्यक्तींच्या भव्योदात्त व्यक्तित्वाचे व कर्तृत्वाचे यशोगान करणाऱ्या या धर्मकथेचा रसिकतेने आस्वाद घ्यावा. क्षणिक-रंजनासाठी या साहित्याची निर्मिति झाली नसून मानवी मनाला चिरंतन आशा व प्रेरणा प्रदान करण्याच्या सात्त्विक ऊर्मीतून आचार्य रविषेण यांच्या प्रतिभेचे वैभव येथे प्रकट झाले आहे. कवि पं. जिनदास शास्त्री यानी आपल्या प्रतिभेने रवि-षेणाचार्यांची दिव्य प्रतिभा मराठी शब्दातून साकार केली आहे. मानवी मन व जीवन उदात्त व्हावे, ते मुक्तीच्या मार्गाने वाटचाल करीत रहावे, धर्मभावनेच्या महन्मंगल प्रकाशाने ते उजळून जावे हीच मध्यवर्ती प्रेरणा या काव्याच्या मागे बलिष्ठपणे उभी आहे. म्हणूनच रसिकांनी या ग्रंथाचा अभ्यास मनःपूर्वक करावा. त्यांच्या काव्यरसिकतेला उच्च आनंद देणाऱ्या असंख्य कल्पना जशा त्याना यात आढळतील त्याचप्रमाणे त्यांच्या तत्त्वदृष्टीला, धर्मभावनेला नवा उजाळा मिळेल. त्यांच्या जीवनविषयक जाणिवा निश्चितच विस्तारतील. भारतीय संस्कृतीला शतकानुशतके उद्दीपित करणारा 'रामायण' हा एक महाप्रभावशाली दीपस्तंभ आहे. रामचंद्राच्या दिव्य जीवनाभोवती आजपर्यंत अनेक प्रतिभावंतांच्या प्रतिभा-शक्तीने पिंगा घातला आहे. प्रस्तुत 'रामायण' ही रामजीवनाचा– पर्यायाने मुक्तजीवनाचा वेध घेण्याचा प्रामाणिक प्रयत्न करीत आहे. वाचकांच्या बुद्धीला, रसिकतेला, तत्त्वशोधनवृत्तीला व धर्मभावनेला सदैव आवाहन करण्याचे सामर्थ्य प्रस्तुत ग्रंथात आहे अशी आमची दृढ श्रद्धा असल्यामुळे आम्ही या ग्रंथाचे प्रकाशन केले आहे. आपण आमच्या या प्रयत्नाचे निखळ मनाने 'रसग्रहण' करावे हीच नम्र विनंती.

**– रामायण प्रकाशन समिति.**

रविषेणाचार्यांचें

# पद्मपुराण तथा रामायण

( रसग्रहण )

रामायण हा विषय साडेतीन हजार वर्षापूर्वीचा जुना आहे. तेव्हांपासून तो सर्व लोकांच्या स्मरणांत, संस्कृतींत, आदर्श वाङ्मयांत, नाट्यकथादि - वाङ्मयांत नव्हे माणसांच्या रोजच्या वृत्तींत रुळला आहे. सूर्यवंशांतील रामाचें कुटुंब, हें एक आदर्श कुटुंब मानलें जातें. रामासारखा एकपत्नी, एकबाणी शूर नेकजात पुरुष, लक्ष्मणासारखा सेवाधर्म पाळणारा शूर, भरतासारखा पादुकांचें पूजन करून राज्य चालविणारा सेवकबंधु, मारुतीसारखा वज्रांगदेही सेवक, सीतेसारखी आदर्श पत्नी, रावणासारखा बलाढ्य शत्रु व रामाचा वानरांच्या साहाय्यानें मिळविलेला प्रचंड विजय. या गोष्टी कांहीं इतिहासाच्या आधारानें, कांही कल्पनेनें भर घालून रचलेल्या आहेत.

कांहीं लोकांचें म्हणणें, रामायण हें राज्य कोणी करावें, रामानें कीं भरतानें याबद्दलहि विवेचनें आहेत. कोणी म्हणतात राम या आर्य राजाला पडीक जमीन कशी कसावी, तीमधून पीक कसें काढावें ही कला अवगत होती. त्याने उत्तरेकडून दक्षिणेकडे प्रवास केला व लोकांना शेतीचें शास्त्र शिकविलें. ‘ अहल्या ’ म्हणजे जमीन नांगरणें, ‘ सीता ’ हें जमीनींतून वर आलेलें फळ, अशीहि एक कल्पना आहे. कांहीहि मूळ असलें, तरी त्यावर रामायणाची कथा उभारलीं गेली वाल्मीकीने मधली पांच कांडें लिहली व ‘ बालकांड ’ व शेवटचें युद्धकांड हें नंतर रचलें गेलें, अशीहि एक कल्पना आहे. कांहीहि असलें तरी रामायण हें एक आदर्श काव्य आहे, तें अतिशय लोकप्रिय आहे व सीतेला पळवून नेणाऱ्याला देहांताची शिक्षा देऊन, स्त्रीला, मनुष्यजातीला व राजघराण्याला त्यानें जय मिळवून दिला आहे, यावर सर्व समाज संतुष्ट आहे. ही कथा लोकांच्या हाडीमासीं खिळली आहे. आदर्श कुटुंब म्हटलें, कीं अयोध्येच्या रामाकडे बोट दाखविलें जातें. आदर्श पिता, आदर्श माता, आदर्श पुत्र, आदर्श सेवक आणि सर्व वानरांचें साहाय्य यांतून जनतेनें संस्कृति व सिद्धि मिळविली आहे.

हें चाललें असतांना आर्य, लोक ' यज्ञवादी ' असत. फार जुन्या काळांत नरमेध व पुढल्या काळांत 'पशुमेध' होत असत. यज्ञकालांत पशुमेधाचा अतिरेक झाला. पशुहत्येनें कांही लोकांचे संस्कार व मतें विभिन्न झाली! ज्यांना सर्वस्वी अहिंसाच पाहिजे होती, त्यांचे नेते, अध्यात्मधुरीण म्हणजेच ' तीर्थंकर ' निराळे झाले. बुद्धांनीं अहिंसा पत्करली व तीर्थंकरांनी अहिंसा पराकाष्ठेला नेली. यांतून बुद्ध व जैन हे दोन धर्म नवीन झाले. जैनांनी ' शेती व अहिंसा ' यांचा पुरस्कार केला. त्यांचे निरनिराळे तीर्थंकर झाले. त्यांनीं जैनधर्माला वळण लावलें. त्यामुळें बुद्धाप्रमाणेंच जैनांमध्येहि पूर्वीच्या आदर्श व लोकप्रिय काव्याला हात घालून ती समाजाला मार्गदर्शक, अहिंसावृत्तीची व मुक्तावस्था प्राप्त करून देणारी झाली. बुद्धानें सुमारें ५०० ते ७०० ' जातककथा ' लिहिल्या. जैन लोकांनी ' पउमचरियं ' [ प्राकृत ] विमल सूरींनी व स्वयंभूदेव यांनीहि ' पउमचरिउ ' लिहिलें. यांना मूळ रामायण कथेचा आधार आहे. ' विंटरनित्झचें ' म्हणणें असें आहे कीं विमल-सूरीनें ' पउमचरित्र ' आधी लिहिलें. पण रविषेणाचार्यांनीं आपलें ' पद्मपुराण ' रामायणाच्या आधारानें—म्हणजे कथा ती घेऊन त्याची स्वतंत्र रचना संस्कृतमधें इ. स. ६७८ मध्यें केली. त्याला १२८६ वर्षें लोटली.

रविषेणाचार्यांनी आपली कथा अहिंसेला धरून व राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न, रावण, मारुती हे सर्वच अहिंसेचे व जैनधर्माचे पुरस्कर्ते होते असें असून त्यांनीं आपली कथा स्वतंत्रपणें मांडली आहे. इतर कांहींहि झालें नाहीं, तरी या जैनधर्मानें यज्ञांतील ' पशुहत्या ' संपुष्टांत आली व यज्ञवादहि संपला, ही गोष्ट सत्य आहे. हें काम जैनधर्मानें निश्चित केलें.

रविषेणाचार्यांची प्रतिभा फार दांडगी होती. त्यांनीं मूळ रामायणाचा आधार घेतला असला तरी त्यांना फार मोठी घडामोड करावी लागली. त्यांनीं सुकीर्ति यांच्या आधारानें हें सर्व सात अधिकारांत लिहिलें १] स्थित्यधिकार, २] वंशोत्पत्त्यधिकार, ३] प्रस्थानाधिकार, ४] संयुगाधिकार, ५] लवणांकुशसंभूति, ६] भवाधिकार ७] व मोक्षाधिकार, हे ते अधिकार होत.

पहिल्या पर्वांतील ' जिनपतिस्तुती ' पासून विसाव्या ' बलभद्रांना स्वर्ग व मोक्षप्राप्ति, येथपर्यंत सर्व प्रकारचे थोर पुरुष, त्यांची दैनंदिन गति, रावणाचे चरित्र, त्याचा मंदोदरीशीं विवाह, " परस्त्रीचें सेवन करणार नाही " ही प्रतिज्ञा, हनुमान जन्म, हनुमान - अनंगपुष्पा विवाह व अनेक चक्रवर्तींच्या कथा व

अध्यात्मांतील अनेक चिकित्सा, विवेचनें आलीं आहेत. या सर्वांवरून रावण, सुग्रीव, हनुमान् यांचें जैनकुलीन घराणें सिद्ध झालें आहे. हनुमान म्हणजे मारुती, हा स्वतंत्र राजा झाला आहे व त्याचे अनेक विवाह झाले आहेत.

सबंध रामायणाची रचनाच मुळीं जैनधर्माच्या अनुषंगाने केली आहे. त्यांत अहिंसा व अध्यात्मानुसार मोक्षप्राप्ति यांना विशेष प्राधान्य आहे. परिव्राजक, श्रमण, क्षपक, साधु किंवा सुभिक्षु यांच्या व्याख्या देऊन सर्व विवेचनांचा भार जैन साधुत्वावर आहे. यामुळें सर्व रामायण वाचणाराच्या मनावर जैन तत्वांचा परिणाम अपाप होतो.

रावणाला 'अमोघविजया शक्ति', व 'त्रिशूल' यांची प्राप्ति झाली आहे. त्याला अनेक विद्यादेवता वश झाल्या होत्या.तो इंद्राला कैदेंत घालण्याइतका बलाढ्य होता. अनंतवीर्य केवलींनी त्याला कर्मांचें स्वरूप, धर्माची व्याख्या,मुनिधर्म आदि-कांचाच उपदेश केला त्यावर रावणानें प्रतिज्ञा केली— "भगवन् जी मला इच्छित नाहीं अशा परस्त्रीचें मी सेवन करणार नाही" हें व्रत मी घेतों—

"अथवा मी या नियमा ग्रहण करूं काय सुंदरी नारी,
अन्याची जी नेच्छी मज तिजवरि मी बलादि, नैव करी"

( पर्व १४–पान २७६ )

'अंजना व तिची सखी 'वसंतमाला' या दोघी गुहेंत राहिल्या. तेथेंच ती प्रसूत झाली. अंजनेचा मुलगा विमानाच्या छताला लटकलेले मोत्याचे घोस घेण्यास वर उसळला व शिलेवर पडला, शिलेचे तुकडे झाले. म्हणून त्याचें नांव 'श्रीशैल' व 'हनुमान' असें ठेवलें.

"जैशी सिंहा प्रसवते सिंही त्यापरि अंजना,
सुता प्रसविली प्राची दिशा जैशी विरोचना,
सुतदेहप्रकाशानें गुहा झाली प्रकाशित,
दिला मुलामा सोन्याचा दिसे ऐशी सुशोभित.
वज्र अंकुश चक्रादि ज्याच्या पदिं सुलक्षणें,
होती प्रफुल्ल कमलासमान मुखलोचनें"

( पर्व १७–पान ३११ )

पुढें हनुमानाचें म्हणजे मारुतीचे अनेक स्त्रियाशीं विवाह झाले. मारुतीनें रावणाला मदत केली याचीहि कथा या १८ व्या पर्वांत आहे. नंतर पवनाञ्जना यांचा समागम झाला आहे.

रामायणांतील राम व लक्ष्मण यांच्या कथेला सुरवात एकवीसाव्या पर्वात झाली आहे. राम हा जैनांचा 'आठवा बलभद्र' व लक्ष्मण हा 'आठवा नारायण'. दशरथाला तीन राजकन्यांशीं म्हणजे 'अपराजिता, सुमित्रा, व सुप्रभा' यांच्याशीं लग्न करावें लागलें. अपराजिता म्हणजेच कौसल्या. दशरथ हा सम्यग्दष्टि होता.

पुढें शुभमति व पृथ्वीश्री यांची कन्या 'केकया' हिनें स्वयंवरमंडपांत दशरथाला वरलें. दशरथाला तिचें सारथ्य फार आवडलें. राजानें तिला वाटेल तो वर माग असें म्हटलें. "मी तो पुढें मागेन" असें ती म्हणाली. तें दशरथानें कबूल केलें.

> "कंठीं तिनें तयाच्या प्रेमकटाक्षें सलज्ज होऊन,
> माला अर्पण केली दृष्टि तयाच्या पदांत ठेवून"
> "सज्जन भूपति वदले कन्येनें योग्य पुरुष हा वरिला"
> ( पर्व २५–पान ४१६ )

हें पर्व केकयावरप्रदानानें पुरे झाले.

जनक–विदेहाचें आख्यान २७ वें असून त्यांत सीताजन्माची कथा आली आहे. पुढे ही मोठी झाली, तेव्हां ही दशरथपुत्र 'राम' यांस द्यावी असें आई-बापांना वाटलें.

ऐरिगुरुपासून राम व लक्ष्मण यांचें शस्त्रास्त्रादिक शिक्षण झालें. त्यांनीं जनक राजाच्या राज्यांत 'कपोत, कांबोज, शुक, मार्कंद, बर्बर' आदि म्लेच्छ शिरले असतां दोघांनी पराक्रम करून त्यांना हाकललें. मग जनकाने आपली कन्या सीता ही रामचंद्राला दिली. अर्थात् रामचंद्रांनी धनुष्य सज्ज केलेंच. जनकाच्या भावाची मुलगी 'कनकप्रभा' ही भरताला देण्यांत आली. पुढें बहीण 'सीता' व बंधु 'भामंडल' यांची गांठ पडली.

बत्तीसाव्या पर्वांत केकयेनें "आपण भरताला राज्य द्यावें" व रामानें वन-वासास जावें" असें मागणें केलें. तेव्हा सीता व लक्ष्मण म्हणाले "आम्ही तुमच्या बरोबर येणार !" राम कौसल्येला म्हणाले, "माते, मी जेथें राज्य स्थापीन तेथें तुला नेईन." आणि दशरथ विरक्त झाले ! रामचंद्र, सीता, लक्ष्मण हे तिघे श्री अरनाथ जिनमंदिरांत गेले.

> "वत्सा, केलें पूर्वी साहाय्य रणांत भरतमातेनें,
> तेणें तिज मी वदलों 'वर माग' असें बहुप्रसन्नमनें

ठेव असो वर माझा, प्रिय तुमच्या तव हृदयकोषसदनांत
मागेन तेधवा द्या वदली ती स्मित धरून वदनांत !
भरतास राज्य द्यावें आतां ती बोलली मला रामा,
देईन त्या न जरि मी जाइन दुःखद अशा अधोधामा. "

नंतर रामचंद्र म्हणाले—

" अल्पहि कष्ट जयानें होइल पितरास कार्य जो त्यागी,
सत्पुत्र तोचि समजा पितृचरणीं सुजन तोचि अनुरागी. "

यामुळें पुढील भविष्य अवतरलें !

रामचंद्र भरताला म्हणाले—

' जे तातांनीं कथिलें तसें कथाया समर्थ कोण असे ?
वत्सा, सागरमणि जे सरोवरांतून जन्मतील कसें ?

यावर कौसल्येनें दुःख करतांच रामचंद्र म्हणाले—

' दक्षिणदिशिं योग्यस्थलिं पाहुनि आश्रय अवश्य मी नेतो
' संशय मनिं नच घेई, सत्पुत्र कृतघ्न काय गे होतो !

इतकें झाल्यावर ते तिघे वनगमनास गेले. ( पर्व ३२ पा. ५०० ते ५०४ )

यानंतर केकयीनें '.तूं राजा हो ! ' असें रामाला विनविलें, पण तें व्यर्थ गेलें ! द्युतिसूरींनी धर्माचा उपदेश भरताला केला, म्हणून तो आत्म-चिंतनास विसरला नाहीं !

नंतर वज्रकर्णानें आपल्या आठ कन्यांचा लक्ष्मणाबरोबर विवाह केला. सिंहोदरानेंहि आपल्या अनेक कन्या त्याला दिल्या. पण रामचंद्राच्या अनुज्ञेप्रमाणें त्या सर्व शीलव्रत पाळीत तेथेंच राहिल्या.

नंतर ज्या प्रदेशांतून राम, सीता लक्ष्मण, जात होते, तो प्रदेश त्यांना शुष्क व निर्मनुष्य दिसला ! चौकशी केल्यावर कळलें कीं, त्या प्रांतांत ' म्लेंच्छ ' शिरले आहेत व त्यांनीं हा देश असा केला आहे ! मग रामलक्ष्मणांनी त्यांच्याशीं निकराचें युद्ध केलें व त्यांना आपल्या शौर्यानें पळवून लावलें. यावेळीं वनमाला व लक्ष्मण यांचा विवाह झाला.

तिथेंच त्यांना एक ' यक्ष ' भेटला. त्यानें रामास स्वयंप्रभ मणिहार, लक्ष्मणास कुंडलयुगल व सीतेला ' चूडामणि ' देऊन त्यांचा त्यानें गौरव केला.

पुढें ' अतिवीर्य ' राजाला नर्तकीच्या रूपानें शासन केलें. पुढें तो मुनि झाला. मग त्याने अनेकदा धर्मोपदेश केला.

यानंतर रामाने ' दंडकारण्यांत ' लक्ष्मण व सीता आणि जटायू यांच्यासह निवास केला. या मुक्कामांत खरदूषण व शम्बूक यांना रामानें मारण्याचें ठरविलें. त्यानें लक्ष्मणाला पाठविलें. रावणाला अवलोकिनीविद्येनें असें म्हटलें तूं सिंहनाद कर- 'बंधो धावून ये, असें म्हण, म्हणजे राम तिकडे धावेल व सीता एकटी तुला सांपडेल. मग तूं तिला पळव.'

याप्रमाणें बेत ठरल्यावर ' सिंहनाद ' लक्ष्मणाच्या आवाजांत करून रावण ओरडला. त्याबरोबर राम हा लक्ष्मणाच्या मदतीस धावून गेला ! सीता एकटीच राहिली ! मग सीतेला पाहून रावण पुढें झाला व त्याने सीतेला पळविलें. वाटेंत जटायूशीं युद्ध करून, व त्याचे पंख कापून, रावण पुढें गेला; आणि खरदूषण व शंबूक यांना रामलक्ष्मणांनें ठार मारलें ! लक्ष्मणानें " बंधो, धांवत ये मदतीला " अशी त्यानें हाकच मारली नव्हती, हें रामाला लक्ष्मणाकडून नंतर कळलें. मग त्याला चुटपुट लागली ! सीता एकटी राहिली, हें त्यांना बरें वाटलें नाहीं ! तेवढ्यांत रावणानें दावा साधला ! रावणाला सीतेनें विरोध केला. पण ती सर्वस्वी असहाय असल्यावर करणार काय ?

खरदूषण व शंबूक हे मेले आणि खोट्या सुग्रीवास शासन झालें ! मागें खोटे जनक व दशरथ यांना बिभीषणानें असेंच मारलें होतें !

लक्ष्मणानें ' सिद्धशिला ' उचलली तेव्हां त्याला आपण रावणास मारू, असें वाटलें. रामाला सीतेची फार काळजी वाटली. तो म्हणाला, —

" परि सीता नच दिसली व्याकुलता रामहृदयिं बहु आली,<br>
' सीता ! सीता ! ' बोलुनि मूर्च्छित तो होय पडुनि भूमितलीं !<br>
सावध होउनि पाहे वृक्षसमूहांत दृष्टि वळवून,<br>
गेलिस कोठें सीते, तरुमागें तूं नको बसूं लपुन !<br>
ये शीघ्र सोड कोपा मजला तो देइ विरहसंतापा,<br>
तुजविण सौख्य न गमतें, तनु माझी पावते पहा कंपा !

( पर्व ४४ पान ६७९ )

पुढें जटायू आसन्नमरणसा भेटला. त्याला रामानें णमोकार मंत्र सांगितला. त्याने प्राण सोडला ! त्याला स्वर्ग मिळाला !

राम शोकानें वेडे झाले व म्हणाले—

‘ शोकार्तरामचंद्रा सीताविरहाग्नि जाळितो सतत,
लाभे उपाय नच त्या मूर्च्छेनें व्याप्त होय तच्चित्त !
अवसर पाहुनि कोणी दुष्टें मम मैथिली असे हरिली !
हा हा त्या कुजनानें आत्म्याची चेतनाचि मम नेली !
वृक्षांनो सीतेला चंपकपुष्पासमान कांति जिची,
जी कमलाक्षी तुम्ही अवलोकिलि काय चंद्रवदनाची,
नाजुक शिरीषपुष्पासमान आहे जिचें शरीर अशी,
गेली कोठें बोला असेल दिसली तुम्हांस कवणदिशीं,
आनंदवी मना जी श्वास जिचा पद्मगंधतुल्य असे,
स्त्रीगणिं अपूर्व सुंदर दया जिच्या अंतरीं सदैव वसे,
आहे स्वभाव भित्रा हरिणीसम जी दिशा सदा पाही,
मौन वरा न तरूंनो ! बोला, बोला तुम्ही मुखें कांही ! ’

[ पर्व ४४ पानें ६७९–८० ]

हें सीताहरणविलाप पर्व अतिशय सुंदर आहे. हें चव्वेचाळिसावें पर्वच फार बहारीचें आहे. वाचकांनीं तें मुळांतूनच वाचावें.

पुढल्या पर्वांत रावण सीतेला उद्देशून बोलत होता. त्यावर सीता म्हणाली—

“ अधमा माझ्या अंगा करूं नको स्पर्श दूर तूं बैस,
बोलूं नकोस वाणी पुण्यहरी वाढवून दुरितास !
पापेच्छा ही खोटी अकीर्तिकर निंद्य नेइ नरकास,
लोकविरुद्ध भयास्पद धरिती न कदापि सुजन नर कास,
भस्माच्छादित अनलासमशा परक्या स्त्रियेस इच्छून,
होशील महादुःखी इहपरलोकांत जाण हे सुजन !
तूं मोहाच्या चिखलीं बुडला आहेस मूढ आकंठ,
परदारासेवेचें पाप करायास दिससि सोत्कंठ ! ”

[ पर्व ४६, पानें ६९५-९६ ]

रावणानें नंतर सीतेला ‘ गीर्वाणरमण ’ उपवनांत ठेवली व तिच्यावर कडक पहारा ठेवला. “ रामाची कुशल वार्ता कळल्यावर मी अन्न घेईन ” असें सीता बोलली. आपण बलात्कार करूं शकत नाहीं, कारण अनंतवीर्य मुनीजवळ आपण तशी प्रतिज्ञा केली आहे. असें तो मंदोदरीस सांगतो.

'दक्षिणदिशेंत झालीं क्षयसूचकशीं अनेक अपशकुनें,
जीं रावणा न हितकर कथिलें ऐसें समस्त विबुधजनें,
भालू नामक पक्षी प्रयाण रोधावया नभीं फिरती,
शब्द भयानक करिती दशाननाच्या क्षयास जणु वदती,
पंक्ति गिधाडांच्या बहु पसरुनि पंखा नभांत अंधार,
करिती जिकडे तिकडे महाक्षया सुचविती रवें घोर!'

[ पर्व ५७, पान ८३ ]

पुढे नल, नील, मारुती, यांची युद्धें झालीं. सुग्रीव-भामंडल यांचें समाश्वासन घडलें. रामचंद्र–कुंभकर्ण, रावण-बिभीषण यांचीं युद्धें झालीं. रावणानें लक्ष्मणावर शक्त्यायुध फेकलें लक्ष्मण त्यानें निश्चेष्ट झाला. शक्तिभेदाने राम विलाप करूं लागला. सीतेनें शोक केला. नंतर विशल्या नामक अति अद्भुत स्त्री आली. तिनें स्नान केलें त्यामुळें त्या पाण्यांतून रोगविनाशक गुण प्रकटले. तिनें लक्ष्मणाच्या सर्वांगांना चंदनाचा लेप लावला त्यामुळें लक्ष्मण पूर्ण बरा झाला. नंतर 'लक्ष्मण-' ( विशल्या ) यांचा विवाह झाला.

पुढें 'रावणानें रामाला मोठें राज्य देतो' असें म्हटलें पण राम म्हणाले— 'माझी सीता मला दे. मला राज्य नको' यावर 'रामलक्ष्मणांना मी मारीन' ही प्रतिज्ञा रावणाने केली.

नंतर मंदोदरीने रावणास उपदेशाचे चार शब्द सांगितले.

"ज्याच्या अणुव्रताची कटींत तरवार मस्तकीं शोभे,
नियमच्छत्र जयाचें दर्शन चिलखत न रोधि जो लोभें,
शीलध्वज करिं शोभे खांद्यावरि बोधरूप धनु धरितो,
वश इंद्रियबल ज्याचें मर्यादांकुश मदास संहरितो,
मैत्र्यादिभावना ज्या उटी असे आर्द्रचंदनाची ती,
धर्मध्यान पराक्रम आरोहण निश्चयाख्यकरिवरती,
जिनभक्ति शक्तिआयुध ज्याचे गेही असा नृपाल असे,
दुर्गतिसैन्या मारी राज्य तयाचें शचीपतीस हसें,
दुर्गतिसेना आहे कुटिल हिचा पापवेग अतिकठिन,
विद्वान् जिंकिति तिजला जिंकुनि हो नाथ! सत्य सुखसदन."

[ पर्व ७३, पान २०१ ]

पण त्याचा परिणाम झाला नाही ! ' माझ्यापेक्षा अधिक बलवान् कोणीच नाही ! तुला स्त्रीत्वामुळें भय वाटत आहे! ' असें रावण मंदोदरीला म्हणाला.

मारुतीचें ' मया ' बरोबर युद्ध झालें. मय बेचैन झाला. मग रावण मदतीस आला. त्याला लक्ष्मणानें आडविलें. तेव्हां रावणानें त्यावर ' चक्ररत्न ' फेकलें. पण लक्ष्मणानें तें झेललें. तेव्हां रावण त्यास असें म्हणाला—

' नारायण स्वतांला अथवा तूं अन्य मान कांहींही,
सर्व मनोरथ दुष्टा करितों मी आज नष्ट तव पाही. '

तें ऐकून लक्ष्मणानें ' चक्ररत्न ' रावणावर आवेगांत फेकलें, तें रावणाला मर्मी लागलें ! रावण मरून पडला !

' तें चक्र जवळ आलें रावण त्या ताडि चंद्रहासानें,
आघात चंड होतां व्याप्त बने नभ तदा स्फुलिंगकणें.
रावण अभिमुख असतां उभा तदा ' चक्ररत्न ' येऊन,
फोडी छाती त्याची वज्र जसें पर्वतास करि भिन्न !
उत्पाताच्या वातें अंजनिगिरि थोर कोसळे जैसा,
होतां पुण्याचा क्षय पडला रावण महीवरी तैसा ! '

अशारीतीनें या युद्धाचा निकाल लागला !

मृत रावणाला पाहून मंदोदरी, बिभीषण, भामंडल व इतर हजारों वीर यांनी शोक केला. तो वीर होता, विद्वान् होता, बलाढ्य होता व अनेक शक्ति कमावलेला अस्त्रज्ञ होता. त्याच्या मरणानें राज्य उजाड झालें! रामानें रावण पडल्यावर म्हटलें ' वैर संपलें ! ' इंद्रजित विरक्त झाला. नंतर अनेक मुनि आले. ते केवली होते. नंतर इंद्रजित्, मेघवाहन, कुंभकर्ण व मारीच हे मुनि झाले. मंदोदरी व इतर रावणस्त्रियांनीं विरक्ति पतकरली.

रामचंद्रांनी सीतेचा शोध केला.

' श्रीरामनाथ येतां सीता हर्षे उठून राहि उभी,
उद्भवला मनिं आदर राहि न संकोच तेधवा नच भी,
भूमिरजानें धूसर केश जिचे मलिन देह होय जिचा,
लालपणा ओठाचा फिक्कटसा जाहला जिच्या साचा,
सीतेच्या नेत्रांमधि तत्समयीं अश्रु येति हर्षाचे,
आली पतिसंनिध ती फुटति मुखांतून शब्द नच साचे !

कोठें कोठें अतिशय जलवेगें तरु समूल उपडी जी,
कोठे कोठें पर्वतशिलांस वीरांस जेवि रणगाजी,
सगरसुतांनीं रचिली गेली लवणाकरास भेटाया,
जी पातालगभीरा शुभ्रतटें शोभते जिची काया.
फेसांनीं तट शोभ आवर्तें शोभतो जिचा मध्य,
उभयतटीं रव करिती बसून पक्षी स्वभक्ष्य ज्या साध्य."

( पर्व ९७, पान ४४२ )

हा सबंध विभागच अतिशय सुंदर आहे.

या नंतर 'सीतेचा रामचंद्रास संदेश,' 'हें अशुभकर्माचें फल' ही प्रकरणें अशींच सुंदर आहेत.

मग सीतेला कसेंसें वाटूं लागलें. ती रडावयास लागली. तें रडणें ऐकून हत्ती धरण्यासाठीं गेलेला 'वज्रजंघ' राजा तेथें आला. तो तें रडणें ऐकून विव्हळ झाला ! त्यानें तिची हकीकत ऐकली. त्याचें मन द्रवलें! सीता म्हणाली–

" जननिंदाभय मानुनि निर्दोष असूनही मला त्यजिलें,
घोर अरण्यामधिं या स्वकुलाचें यश अखंड राखियेलें.
निर्मल-कुलज असे जो, क्षत्रिय अतिशय उदारचित्ताचा,
जो शास्त्रांचा ज्ञाता स्वभाव त्याचा असाच हो साचा, "

( पर्व ९८, पान ४५७ )

वज्रजंघानें नंतर तिला 'पुंडरीक' नगराला नेलें. तिनें रामास कळविलें कीं " माझा जरी त्याग केला तरी सम्यग्दर्शनाची विशुद्धि केव्हांहि त्यागूं नका. तें श्रेष्ठ पद आहे.' रामाच्या मनांत तिकडे शोकाग्नि पेटला. लक्ष्मणानें त्याचें सांत्वन केलें; पण त्याच्या अंत:करणांतील आग शमली नाही.

वज्रजंघानें तिला बहिणीप्रमाणें मानलें. तिला एका स्वतंत्र प्रासादांत ठेवलें. पिंजऱ्यांतील सिंहाना पाहून तिला अभिमान वाटे. पुढें ती बाळंत झाली. तिला दोन पुत्र झाले. ते म्हणजे लवण व अंकुश.

हे पुत्र योग्य वयांत येतांच त्यांना सिद्धार्थक्षुल्लकांनीं 'शस्त्र व शास्त्र' यांचें शिक्षण दिलें. पुढें लवण व अंकुश पराक्रम गाजवूं लागले.

पुढे त्यांना रामाची समग्र कथा कळली. मग ते रागावले व " आम्ही रामलक्ष्मणाशीं युद्ध करितों!" असें वज्रजंघमामाला म्हणाले. त्यानें त्यांना परवानगी दिली.

अयोध्येच्या परिसरांत युद्धाला सुरवात झाली. राम व लवण, आणि अंकुश व लक्ष्मण लढूं लागले. पण त्यांना या लवणांकुशांनी जर्जर केलें !

शेवटी राम व लक्ष्मण यांच्याकडे 'नारद' व 'सिद्धार्थक्षुल्लक' गेले व रामाला– " हे तुझे मुलगे आहेत " हें सांगितलें. त्यानंतर दोघांनी रामलक्ष्मणांचें पदवंदन केलें. दोघांनीं त्यांना घट्ट मिठी मारली. त्यांचा अयोध्येंत जयजयकार झाला !

नंतर " सीतेनें विरहदुःख किती भोगावें व तेंहि परक्या प्रांतांत ! " असें बिभीषणाने म्हटलें. त्यावर " ती जर इथें 'अग्निदिव्य' करील व निर्मल ठरेल, तर मी तिचा निरपवाद स्वीकार करीन " असें राम म्हणाले.

लगेच दोन पुरुष खोल व तीनशें हात लांबीचा खड्डा अग्निदिव्यासाठीं तयार झाला. सीता त्याला तयार झाली. त्यावर सिद्धार्थक्षुल्लक प्रतिज्ञेनें म्हणाले–

" सीतेचें शीलव्रत देवहि सारे न वर्णु शकतील,
जीव क्षुद्र कसे मग उल्लंघुनि पार शीघ्र जातील,
प्रविशेल रसातलिं गिरिसुमेरु सागरहि शुष्क होतील,
सीताशीलव्रत हें चंचल राम न कधी हि होईल !
पुष्कळ हजार वर्षें केलें जें तप सवस्त्र मी जगतीं,
तें सर्व विफल होइल रामाचे पुत्र हे जरी नसती !

[ पर्व १०४, पान ५२९ ]

सीतेनें त्या प्रचंड अग्नींत उडी टाकली ! पण त्या अग्नीचें पाणी झालें. " महापतिव्रता ! महापतिव्रता ! " असे शब्द लोकांतून गर्जनेने बाहेर आले ! आणि लवणांकुश हें पाहून तिच्याजवळ गेले ! सीता विजयी झाली ! लगेंच रामचंद्र तिच्याजवळ गेले. ते म्हणाले– " सीते, प्रसन्न हो. आतां प्रजाजनांचा आक्षेप दूर झाला ! मी मोठा अपराधी आहे. मला क्षमा कर. "

" शारदचंद्रासममुखि हे सीते देवि हो प्रसन्ना तूं,
तव शीलाविषयीं न प्रजामनीं साध्वि, लेश ही किंतु !
अपराध देवि घडला माझ्या हातुन पुन्हा करीन न मी,
दुःख न देईन असें क्षमा करी, शील सतत तव नामी !"

[ पर्व १०५, पान ५४३ ]

यानंतर 'सीतेचें रामास वैराग्यपर उत्तर', 'सकलभूषण केवलीचा धर्मोपदेश', 'नरकदुःख वर्णन', संसारी जीवाचे भेद-प्रभेद', 'औदारिकादि

देहांचें वर्णन', 'ज्योतिर्लोक', 'स्वर्ग, ग्रैवेयक, अनुदिश, पंचानुत्तर', 'मुक्ताच्या सुखाचें वर्णन', 'भव्य व अभव्य कोण', 'मोहाने प्राप्त होणाऱ्या आपत्ति', 'केवलीना रामचंद्र मी भव्य आहे का ? हा प्रश्न विचारतात' यांची सविस्तर वर्णनें आलीं आहेत.

यानंतर राम, लक्ष्मण, लवण व अंकुश यांचा अयोध्येंत निवास झाला. हाच आनंद ! हाच विजय ! पुढें रामाला लक्ष्मण-वियोग झाला. रामानें फार फार शोक केला. राम वेडे झाले. त्यांनींच लक्ष्मणदहन केलें. विभीषणाने व सुग्रीवानें दीक्षा घेण्याचा निश्चय केला. नंतर रामचंद्र मुनींनीं तप केलें.

" पंचोपवास करुनी विधिपूर्वक राघव,
नंदस्थलीं पुरा गेले ज्याचें विपुल वैभव.
दिसे राघव तेजस्वी जणुं बालदिवाकर,
उदयाचलिं हा आला जनपद्मां सुखाकर,
करूं शके न रविही मंद चंद्र असा दिसे,
पाहून त्यास जनता-मुखिं मोद तदा वसे,
होतें हृदय रामाचें स्फटिकासम निर्मल,
कैलासशैल हा आला नगरास गमे चल !"

[ पर्व १२०, पान ७०४ ]

श्रीरामचंद्रांना केवलोत्पत्ति झाली. त्यांनी पंचवीस वर्षे धर्मोपदेश केला व मुक्त झाले.

ग्रंथकाराचें व भव्यजनांचें वंदन

" श्रेष्ठ मुनीश्वर परमयोगधर असे महावीर,
भव्यजनांनो ऐशा रामा करा नमस्कार."

[ पर्व १२३, पान ७३५ ]

मी येथपर्यंत 'रविषेणाचार्यांनी' सांगितलेली कथा सांगितली. आतां यावर चर्चा करणें श्रेयस्कर होईल.

आरंभींच सर्ग तीनमधे-

" कुमतानुग-लोकांनी अन्यथा वर्णिलें असे,
सत्यार्थता न उरली हेय तेणेंचि तें दिसे."

[ पर्व ३, पान ३५ ]

याच संदर्भात गद्य विभागांतील खालील भाग वाचावा–

" अन्यमतीयांनी रामचरित अन्यथा वर्णिले आहे. रावण राक्षस होता व तो मांसभक्षण करीत असे. त्याचा वानरांनी पराभव केला. रामचंद्रांनी वालीबरोबर संधि करून त्यास मारलें, रावणानें स्वर्गांत जाऊन इंद्राच्या बगीचाचा विध्वंस केला व त्याला कैदेंत टाकलें. कुंभकर्ण सहा महिने झोप घेत असे. वानरांनीं, पर्वतांनीं समुद्रांत पूल बांधला वगैरे विपरीत लिहिलें आहे. यास्तव हे प्रभो; मला सत्य रामकथा सांगून संशयकर्दमांतून वर काढावें. "

यावर कांही विचार लिहणें जरूर आहे. वाल्मिकि रामायणाची कथा साडेतीन हजार वर्षापूर्वीची आहे; आणि ' रविषेणांचीं ' कथा इ. स. ६७८ ची– म्हणजे २८२२ वर्षानंतरची आहे ! तेव्हां कल्पनेकल्पनेंत फरक राहणारच. दुसरें म्हणजे रविषेणांना सर्वच कथा जैनवाङ्मयीन हवी होती. म्हणून त्यांनीं रामापासून ते रावणापर्यंत कथानकांत आलेले सर्व लोकच जिनभक्त दाखविले आहेत. त्यामुळेंहि कांहीं फरक दिसत असतील. तिसरें कारण असें कीं वैदिक हिंदूमध्यें पुढे पुढे यज्ञ-यागांचें स्तोम फारच माजलें; म्हणजे ' नरमेध ' थांबला पण पशुमेध सुरू झाला. त्याला बरेच लोक कंटाळले होते ! या आपत्तींतून इ. स. पूर्वी पांचशेच्या सुमारास ' बुद्धधर्म ' व नंतर पुढें ' जैनधर्म ' निघाले तेव्हां या यज्ञयागांतील ' पशुमेधावर ' कांहीं बुद्धधर्मीय ' जातककथा ' व जैनधर्मी ' रविषेणाचें रामायण ' म्हणजे ' पद्मपुराण ' तयार झालें. तेव्हां यांत सर्वच स्नेही, सर्वच अहिंसावादी 'जिनभक्त ' झाल्यास नवल नाहीं !

वाल्मिकी रामायणाबद्दल आणखी एक कल्पना आहे. राम हा अस्सल आर्यपुत्र होता. तो शेतीची कला फार कुशलतेनें जाणत असे. राज्यामध्यें वारसा-बद्दल भांडणें नकोत, म्हणून किंवा कैकेयीच्या वरानुसार तो दक्षिणेकडे निघाला. बरोबर लक्ष्मण व सीता होती. भरतानें राज्य सांभाळलें होतें. तो दक्षिणेकडे जात होता व लोकांना शेती शिकवीत होता. ' अहल्या ' याबद्दलची कल्पना अशीच आहे कीं ज्या पडिक जमीनी होत्या त्या त्याने खंटल्या, त्यामुळें जमीन पिकें देऊं लागली. हें पीक म्हणजे ' सीता ' ती जमीनींत सांपडली, याचें विवेचन असें आहे. नंतर ' अहिल्या व सीता ' यावर कथा झाल्या व त्या पुराणांत आल्या. हा मूलार्थ लक्षांत घेणें अत्यंत जरूर आहे. आपण धर्मामुळें आपली दृष्टि अंध होऊं देतां कामा नये, हें लक्षांत ठेवलें कीं,

" पायावांचून हे राजन् घराची रचना नसे,
प्रस्तावहीन वचन निराधार तसें असे. "

( पर्व ३, पान ३५ )

' कुग्रंथ वेद नामक ' [ पर्व ४, पान १११ ] हे वचन ' पशुमेधाचें ' वर्णनच करीत आहे. मूळ ' रामायण ' सहेतुक आहे.

मूळ रामायणापेक्षां यांत ' मारुती ' हा बदललेला आहे, त्याची कथाहि निराळी आहे. वाल्मिकीमधील मारुती ' ब्रह्मचारी ' आहे. या रामायणांतील मारुती विवाहित आहे व त्याचे अनेक स्त्रियांशीं विवाह झाले आहेत. पण तो रावणाचा मित्र असलेला दाखविला असल्यानें ' सेवाधर्म ' गेला तरी त्याचें स्वरूप मदतनिसाचें, श्रद्धेचें आहे. त्याचें चित्र वेगळ्या स्वरूपांत पण चांगलें वटलें आहे.

राम, लक्ष्मण, सीता, भरत, शत्रुघ्न, मारुती, रावण, कुंभकर्ण, बिभीषण, नल, नील, जटायू वगैरे सर्व पात्रें भारतव्यापी व समावेशक आहेत. त्यामुळें मूळ कल्पने-वर उभारलेल्या व्यक्ति अभिजात व त्यांची कृत्यें आदर्श वाटतात.

इक्ष्वाकु, सोम, विद्याधर व हरि या चार वंशांची उत्पत्ति व त्यांचा विस्तार रामायणाला शोभेशा पद्धतीनें दिला आहे. पण हे सर्व ' जिनभक्त ' आहेत हें तितकेंच खरें आहे.

हें काव्य हें महाकाव्य आहे, त्यामुळें त्याची रचना जुन्या महाकाव्याला शोभणारी, विस्तृत, भव्य व अभिजात आहे. अर्थात् याला अनुसरूनच अनेक प्रकारचीं उपाख्यानें, अद्‌भुत कथा, आख्यायिका किंवा पूर्वजन्मकथा त्यांत आल्या आहेत. इतकीं व्यवधानें असूनहि लेखकाची भाषा अभिजात व उज्ज्वल राहिलेली आहे. विशेषतः म्लेंच्छ, बर्बर किंवा अनार्य यांच्याशीं केलेल्या लढायांचें वर्णन अपूर्व आहे. ' वानर ' व ' राक्षस ' हीं बेटें आहेत ही माहिती त्यांनीं दिली आहे.

मगधदेश, लंका आदि देशाचीं व दंडकारण्याचीं वर्णनें यथोचित आहेत. परंतु प्रदेशानुसार रीतीभाती; आचारविचार किंवा संस्कार हे निराळे वाटतात. मगधदेश हा ' जिनवराच्या ' स्तुतींतून उद्भवलेला वाटतो.

जुनें ' महाकाव्य ' म्हटलें कीं त्यांत शस्त्रास्त्रविद्या; अस्त्रविद्या, अद्‌भुत जादूचे प्रयोग, मंत्रविद्या, गुप्तरूपानें वावरणाऱ्याला वश असणाऱ्या विद्या, कृत्रिम दशरथजनक-सुग्रीव; मायेचे तट; अमोघविजया सारख्या शक्ति, सारांश, मंत्र आणि तंत्र यांचा वापर खूप असतो. तो अद्‌भुत असतो व रंजकहि असतो. त्यांनीं कथा

खूप रंजक केली आहे. क्वचित् ठिकाणीं राम, लक्ष्मण, सीता यांची उंची चारे ताड, तीन ताड आहे असें सांगण्यांत येते; ते बरोबर वाटत नाही. असेच अनेक पात्रांचे विवाह अनेक राज्यकन्याबरोबर झाले आहेत हें बरें वाटत नाहीं. 'पांच हजार स्त्रियांशीं एकाचा विवाह झाला' हें म्हणणें, आज 'एकच पत्नी' करण्याच्या काळांत फार विचित्र, अशक्य व अद्भुत वाटतें त्यावर अधिक संयम हवा होता.

'सीताशुद्धीच प्रकरण' फारच रंजक व मन वेधून घेणारें झालें आहे. 'पृथ्वीने आपली मुलगी पोटांत घेतली' या कल्पने इतकीच 'अग्निदिव्याची कल्पना अपूर्व वाटते. विशेषतः सीतेच्या मनाची थोर तयारी, आत्मविश्वास व जीवनानुभूति अत्यंत थोर आहेत; पण रामाच्या दुःखामुळें त्या अधिक लोकविलक्षण व लवणाकुशांनी तेथें पोहून तिला भेटण्यामुळें फार जोरकस वाटतात ही कामगिरी जिनदास फडकुले यांनीं अपूर्व साधली आहे. त्याबद्दल त्यांना मनःपूर्वक धन्यवाद !

हें काव्य आमूलाग्र अभ्यासून व जन्मभर व्यासंग करून श्रेष्ठ साहित्यिक जिनदास फडकुले यांनी स्वधर्माची व मराठी साहित्याची मोटी सेवा केली आहे. त्यांचे आभार तर मानले पाहिजेतच; पण वरती त्यांना धन्यवाद दिले पाहिजेत ! इतक्या चिकाटीनें १२८६ वर्षापूर्वीचें संस्कृत काव्य मनोभावें अभ्यासून, ते प्रामुख्यानें "आर्येत" आणि इतर सर्व वृत्तांत लिहिलें ही फार मोठी साहित्यसेवा आहे. त्यांचे गाढें अध्ययन, शुद्ध स्वधर्माचरण, मराठीचा व्यासंगी अभ्यास व रूपांतर करून शेवटपर्यंत भाषांतर करण्यांतील चिकाटी दांडगी आहे ! आणि हें नुसतें उत्तम रूपांतर नव्हे तर काव्य या दृष्टीने सरस भाषांतर आहे व कोणतेंहि पान उघडून, म्हणजे १४८० पानांतील अक्षरशः कोणतेंहि पान उघडून वाचलें, कीं आपणांस सोपें प्रसादपूर्ण; ओजस्वी उत्कृष्ट काव्य वाचावयास मिळेल !

श्री. जिनदास फडकुले यांनी आर्या; चंद्रकांत, अनुष्टुभ, इंद्रवज्रा, उपजाति, वसंततिलक, शालिनी ही वृत्तें फार सफाईनें वापरून मनांतील आशय स्पष्ट केला आहे. हें महाकाव्याच काम प्रदीर्घ म्हणजे फार मोठें, धर्म गुंतला असल्याने आशयाला गूढ आणि रामायण व भाषांतर अशी दुहेरी जोड असल्यानें प्रतिभेला पचवून लिहिण्यास कठिण, असें असतांना, त्यांच्या प्रत्ययानें निष्ठेनें व प्रतिभेच्या उत्कटतेनें तें सर्व साधून त्यांनी "सिद्धी" मिळविली आहे. त्यांच्या जन्माचें यानेंच सार्थक झालें आहे. त्यांनीं–

" जो धर्मार्थी पढतो लाभे येणें विशाल धर्म तया,
जो इच्छितो यशा तें लाभे इच्छा न जातसे वाया "

( पर्व १२३, पान १७१ )

यासारखी सफाईदार आर्या लिहून ' मराटीला ' भूषविलें आहे. श्री. जिन-दासांनीं जवळ जवळ चाळीस हजार ओळी या काव्यांत लिहिल्या आहेत. आजच्या मराटी युगाचे ते ' आधुनिक मोरोपंतच ' आहेत असें मी आज मनोभावें म्हणतो.

१९ ऑगस्ट १९६४
' कांचन ' विश्रामबाग, सांगली.

शंकर केशव कानेटकर
( गिरीश )

# पद्मपुराणाविषयीं दोन शब्द

अयोध्येच्या दशरथ राजाच्या वडिल पुत्राचें नांव पद्म व राम असें होतें. रामाच्या पवित्र चरित्राला रामायण असें म्हणतात. श्री–रविषेण आचार्य 'रामायण' शब्दाचा खुलासा याप्रमाणें करितात.

चेष्टितमनघं चरितं करणं चारित्रमित्यमी यच्छब्दाः ।
पर्याया रामायणमित्युक्तं तेन चेष्टितं रामस्य ॥ १५५ ॥ पर्व १२३

श्रीरामचन्द्राच्या पूर्वभवामध्यें व प्रस्तुत भवामध्यें जन्मापासून मुक्तिपद-प्राप्तिपर्यन्त ज्या अनेक जीवनघटना घडल्या त्यांना 'रामायण' म्हणतात.

रामचन्द्राचा देहवर्ण तरुणसूर्याप्रमाणें होता. त्याचें विशाल वक्षःस्थल लक्ष्मीनें आलिंगिल्याप्रमाणें सुंदर दिसत होतें. त्याचे डोळे कमलाप्रमाणें होते म्हणून दशरथ राजा व अपराजिता ( कौसल्या ) राणी यांनीं त्याचें नांव 'पद्म' असें ठेविलें होतें.

तरुणादित्यवर्णस्य पद्मालिङ्गितवक्षसः ।
पद्मनेत्रस्य पद्माख्या पितृभ्यां तस्य निर्मिता ॥ २२ ॥ पर्व २५

श्रीधनञ्जय कवीनें स्वकृत द्विसंधानकाव्यांत 'पद्म' हें आठव्या बलभद्राचें अर्थात् रामाचें नांव होतें असा उल्लेख केला आहे. तो याप्रमाणें–

अत्रान्तरे शरच्छन्नदिग्दशास्यः सपुष्पकः ।
चन्द्रहासकरः कालो बाणासनपरिग्रहः ॥ १ ॥
दीप्त्यारविन्दिनं लोकं विश्वं कुर्वन्निवाकुलम् ।
दुःखलब्धात्मसम्भूतिं स्वसारं मानयन्मुहुः ॥ २ ॥
पद्मस्योदर्कसन्तापं भेदं कुवलयस्य च ।
सानाथ्यं बन्धुजीवानां कर्तुकामः समागमत् ॥ ३ ॥ स. ७ वा.

येथें तिसऱ्या श्लोकांतील 'पद्मस्योदर्कसन्तापं' या पहिल्या चरणांत पद्मस्य रामस्य उदर्कसन्तापं उत्तरकालकदुःखं अर्थात् सीतेला हरून पद्माला-रामचन्द्राला भावी दुःख देण्याच्या हेतूनें दशास्यःरावण दण्डकारण्यांत समागमत्-आला. लक्ष्मणानें

खरदूषणाचा वध केल्यानंतर रावण सीतेला एकटीच पाहून तिचें हरण करून रामाला दु:खी करावें या हेतूनें वनांत आला.

रावण, बिभीषण, सुग्रीव, हनुमान्, रामचन्द्र, लक्ष्मण आदिक हे महापुरुष मुनिसुव्रत नामक २० वे तीर्थंकर व २१ वे नमितीर्थंकर यांच्या अंतरकालांत झाले आहेत. अर्थात् मुनिसुव्रत तीर्थंकर मुक्त झाल्यानंतर व नमितीर्थंकर उत्पन्न होण्याच्यापूर्वी होऊन गेले हें पद्मपुराण, उत्तरपुराण, हरिवंश आदिक पुराणांच्या आधारें सिद्ध झालें आहे.

योगवासिष्ठ ग्रंथाच्या वैराग्यप्रकरणांत अहंकारनिषेधाच्या अध्यायांत वशिष्ठ व रामाच्या संवादांत जिनाचा उल्लेख आला आहे तो असा—

नाहं रामो न मे वाञ्छा भावेषु न च मे मनः ।
शान्तिमास्थातुमिच्छामि स्वात्मन्येव जिनो यथा ॥ ८ ॥ स. १५

या श्लोकांत रामचन्द्रांनीं जिनासमान होण्याची इच्छा व्यक्त केली आहे. त्यावरून रामचन्द्रापेक्षा जिनदेवाचा उत्तमपणा व प्राचीनपणा व्यक्त होतो.

वृषभादिमहावीरपर्यन्त चोवीस तीर्थंकर, भरतसगरादि बारा चक्रवर्ती, त्रिपृष्ठादि नऊ नारायण, विजयादि नऊ बलभद्र व अश्वग्रीवादि नऊ प्रतिनारायण या ६३ महापुरुषांना शलाकापुरुष म्हणतात. त्यापैकीं श्री रामचन्द्र हे ८ वे बलभद्र व लक्ष्मण ८ वा नारायण आणि रावण ८ वा प्रतिनारायण होय. या राम, लक्ष्मण व रावणांचें चरित्र रविषेण आचार्यांनीं वाल्मीक–रामायणाच्या आधारें निरूपिलें नाहीं. पण वृषभादिमहावीरान्त तीर्थंकर, वृषभसेनादि गौतमान्त गणधर व सुधर्मा-जम्बू, प्रभवादि आचार्यपरंपरेनें जें चालत आलें तें रामायण लिहिलें आहे. यास्तव 'जैनरामायण' रविषेणाचार्यांनीं जरी वीरनिर्वाण झाल्यावर १२०३ वर्षें व सहा महिन्यानंतर रचिलें तथापि त्यांच्याही पूर्वी फार प्राचीनकालापासून त्रेसष्टशलाका पुण्य पुरुषांचीं चरित्रें तीर्थंकरांनीं भरतादिक श्रोत्यांना सांगितलीं आहेत. म्हणून वाल्मीकी रामायणाचें हें जैनीकरण आहे असें म्हणणें व मानणें युक्तियुक्त नाहीं.

रविषेणाचार्यांनीं पद्मपुराणाच्या पांचव्या पर्वांत याप्रमाणें उल्लेख केला आहे—
'सगरचक्रवर्तीनें' अजितनाथांना वन्दन करून याप्रमाणें प्रश्न विचारला—

भगवन्नवसर्पिण्यां भवद्विधजिनेश्वराः ।
स्वामिनो धर्मचक्रस्य भविष्यन्त्यपरे कति ॥ १८६ ॥

कति वा समतिक्रान्ता जगत्त्रयसुखप्रदाः
भवद्विधनरोत्पत्तिराश्चर्यं भुवनत्रये ॥ १८७ ॥
कति वा रत्नचक्राङ्का लक्ष्मीभाजः प्रकीर्तिताः।
हलिनो वासुदेवाश्च कियन्तस्तद्द्विषस्तथा ॥ १८८ ॥

हे प्रभो, या अवसर्पिणी कालांत आपल्याप्रमाणें जिनेश्वर किती होतील व किती जिनेश्वर झाले आहेत? माझ्याप्रमाणें चक्रवर्ती किती झाले व किती होतील? बलभद्र, नारायण आणि त्यांचे शत्रु प्रतिनारायण हे किती होतील? या प्रश्नाचें उत्तर अजित जिनेश्वरांनीं याप्रमाणें दिलें– हे सगरा, माझ्यापूर्वी आदिभगवान् हे पहिले जिनेश्वर झाले. नंतर मी दुसरा जिनेश्वर झालों. माझ्यानंतर संभवादि महावीरान्त बावीस तीर्थंकर होतील. हे सगरा तुझ्यापूर्वी 'भरत' हा पहिला चक्रवर्ती होऊन गेला. तूं दुसरा चक्रवर्ती आहेस व तुझ्यानंतर सनत्कुमारादि दहा चक्रवर्ती होतील. याचप्रमाणें–

वासुदेवा भविष्यन्ति नव सार्धं प्रतीश्वरैः ॥
बलदेवाश्च तावन्तो धर्मविन्यस्तचेतसः ॥ २२५ ॥
प्रोक्ता एतेऽवसर्पिण्यां जिनप्रभृतयस्तथा ॥
तथैवोत्सर्पिणीकाले भरतैरावताख्ययोः ॥ २२६ ॥

हे सगरराजा, नऊ नारायण नऊ प्रतिनारायणासह पुढें उत्पन्न होतील. व धर्मांत ज्यांनीं आपलें चित्त तत्पर केलें आहे असे नऊ बलभद्र उत्पन्न होतील. अर्थात् या अवसर्पिणीकालांत हे तीर्थंकरादिक त्रेसष्ट पुण्यपुरुष उत्पन्न होतील तसेंच पुढील उत्सर्पिणीकालांत या भरतांत व ऐरावतक्षेत्रांत तीर्थंकरादिक त्रेसष्ट शलाका पुण्यपुरुष उत्पन्न होतील.

या उल्लेखावरून वृषभादिक तीर्थंकरांच्या दिव्यज्ञानांत या त्रेसष्टशलाका पुण्यपुरुषांचें आयुष्य, बल, धर्म, आदिक अवस्थांचें जसें प्रतिबिंब पडलें होतें तसें त्यांनीं भरत, सगरादिक मुख्य श्रोत्यांना सांगितलें.

याचप्रमाणें महावीर प्रभु सर्वज्ञ झाल्यावर विहार करीत राजगृहनगराच्या बाहेर विपुलाचल पर्वतावर समवसरणासह आले असतां श्रेणिक राजा त्यांच्या वंदनार्थ गेला व त्यांच्यापासून जिनधर्माचें स्वरूप ऐकून अत्यानंदानें स्वगृहीं परत आला. प्रभूच्या दर्शनाचा राजावर विलक्षण परिणाम झाला व त्याला स्वप्नांतही प्रभूला मी पाहत आहे व प्रभूला संशय विचारीत आहे असा भास झाला.

प्रातःकालीं उठल्यावर जिनधर्माच्या आराधनेनें चक्रवर्त्यादिकांचें वैभव प्राप्त होतें असें प्रभूनें सांगितल्याचें स्मरण झालें व रामचन्द्र, रावण, बिभीषण, कुंभकर्णादिक जिनधर्माराधनेनें महापुरुष होऊन उच्चकुलीन असतांही ते मांसादिक भक्षण करीत होते वगैरे आक्षेप लौकिकग्रंथांत वाल्मीकादि (रामायणांत) कसे घेतले आहेत याचेंही स्मरण झालें व त्याविषयीं आपण महावीर प्रभूच्या मुख्य शिष्यांना-गौतमगणधरांना विचारूं असा विचार करून पुनः समवसरणांत जाऊन गौतमगणधरांना त्यानें रामरावणाविषयीं अनेक प्रश्न विचारले. व त्यांनीं राजाला रावणरामादिकांची कथा जशी यथार्थ घडली तशी सांगितली. ते श्रेणिकाला म्हणाले—

> श्रुण्वायुष्मन्महीपाल देवानां प्रिय यत्नतः ।
> मम वाक्यं जिनेन्द्रोक्ततत्त्वशंसनतत्परम् ॥ २६ ॥
> रावणो राक्षसो नैव न चापि मनुजाशनः ।
> अलीकमेव तत्सर्वं यद्वदन्ति कुवादिनः ॥ २७ ॥ सर्ग ३ रा.

देवांना प्रिय, आयुष्मान् हे श्रेणिका माझें भाषण जिनेन्द्रांनीं सांगितलेल्या तत्त्वांचें वर्णन करणारें आहे तें ऐक. रावण राक्षस नव्हता व तो मानवभक्षकही नव्हता. जे इतर कुवादींनीं त्यांचें वर्णन केलें आहे तें सर्व असत्यच आहे. असें बोलून त्यांनीं रामरावणादिकांचें यथार्थ चरित जसें वृषभादिकतीर्थंकरांनीं भरत सगरादिकांना सांगितलें होतें तसें सांगितलें.

या विवेचनानें रविषेणाचार्यांनीं रामायणाचें जैनीकरण केलें नसून जैनाचार्यपरंपरेनें जसें तें सांगितलें तसें त्यांनीं सांगितलें आहे. म्हणून वाल्मीकींनीं जेव्हां ज्याकालीं रामायण रचिलें त्याकालाच्याही फार पूर्वी ऋषभादिक तीर्थंकरांनीं व त्यांचे मुख्य शिष्य अशा वृषभसेन गौतमादिक गणधरांनीं भरत, सगर, वगैरे मुख्य श्रोत्यांना रामायणादिक प्रथमानुयोगाच्या कथा सांगितल्या आहेत म्हणून या पहिल्यापासून जैनकथाच आहेत.

पण वाल्मीकादिकांनीं जे विपरीत विवेचन केलें होतें तें अडीच हजार वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या श्रेणिकाच्या श्रवणांत आल्यामुळें त्यानें खरा प्रकार गौतम गणधराच्या मुखानें ऐकून आपलें मन संशयरहित करून घेतलें.

पण वृषभादिक तीर्थंकर जे महावीर तीर्थंकराच्या फार पूर्वी होऊन गेले त्यांच्याकालीं या कथांचें स्वरूप विपरीत झालेलें नव्हतें. रविषेणांनीं जैनांचे तीर्थंकर,

गणधर व आचार्यांनीं जें रामायणादिक कथांचें स्वरूप सांगितलें तेंच जनतेपुढें ठेविलें. त्याचें जैनीकरण त्यांनीं केलें नाहीं. अत्यन्त प्रामाणिक अशा जिनसेनाचार्यांनींही महापुराणाच्या पीठिकेंत याप्रमाणें अभिप्राय स्पष्ट केला आहे.

" आदि प्रभूला अर्थात् वृषभनाथाला सर्वज्ञता प्राप्त झाल्यावर भरतराजा त्यांना वंदन करण्यासाठीं आला व वंदन करून मला महापुरुषांचीं पुराणें सांगा असें प्रभूला त्यानें विनविलें. हे प्रभो आपणासारखे सर्वज्ञ किती होतील व माझ्यासारखे चक्रवर्ती किती होतील ? तसेंच बलरामासह केशव किती होतील व त्यांचे शत्रु-प्रतिकेशव किती होतील व त्यांचें वृत्त कसें आहे ? त्यांचें पूर्वी कसें आचरण होतें आतां कसें आहे व पुढें कसें होईल तें ऐकावें असें मला वाटतें. आपण तें सांगावें. त्यांचीं नांवें, गोत्रें, संबंधी जन, त्यांचीं लक्षणें, आकार, भूषणें, त्यांचीं शस्त्रें, त्यांचें आयुष्यमान, त्यांचे देह व एकानंतर दुसऱ्याच्या उत्पत्तीचें अन्तर, कोणत्या युगांत किती होतात ? युगान्तर म्हणजे काय ? ही सर्व माहिती आपल्या तोंडून जाणून घेण्याची मला इच्छा आहे. " याप्रमाणें भरत प्रश्न विचारून जेव्हां थांबला तेव्हां सभेंतील सर्व लोकांनीं भरताची उत्तम प्रश्न विचारला म्हणून प्रशंसा केली. याप्रमाणें विनंति केल्यावर आदिभगवंतांनीं अतिशय गंभीर वाणीनें सर्व पुराणार्थ सांगितला.

प्रथमतः भगवंतांनी पूर्वीच्या उत्सर्पिणीकालांत होऊन गेलेल्या तीर्थंकर, चक्रवर्ती, नारायण, बलभद्र व प्रतिनारायण या त्रेसष्टशलाका पुरुषांचीं चरित्रें सांगितलीं. नंतर या अवसर्पिणीकालीं झालेल्या, होणाऱ्या व असलेल्या सर्व महापुरुषांचीं चरित्रें अर्थरूपानें सांगितलीं. या नंतर आदिभगवंतांच्या मुख्य शिष्यानें-वृषभसेन गणधरानें-त्या त्रेसष्टशलाका पुण्य पुरुषांचीं चरित्रें ग्रथित केलीं. याचप्रमाणें बाकीच्या अजितादिक तीर्थंकरांनीं व त्यांच्या मुख्य शिष्यांनीं-गणधरांनीं व इतर आचार्यांनींही पूर्वपरंपरेला अनुसरून हीं पुराणें लोकहितार्थ रचिलीं.

यानंतर युगान्तीं सिद्धार्थ पुत्र भगवान् वीरनाथानें विपुलपर्वताला आपल्या आगमनानें भूषित केलें. तेव्हां श्रेणिकानें विनयानें येऊन पुराणार्थ विचारला. भगवंताचा अनुग्रह श्रेणिकराजावर आहे हें जाणून गणाधिप गौतमानें संपूर्ण पुराणसंग्रह श्रेणिकराजाला सांगितला. अशारीतीनें चालत आलेल्या पुराणाला रविषेणादिकाचार्यांनीं सांगितलें असल्यामुळें वैदिकरामायणाचें जैनानीं जैनीकरण केलें हें म्हणणें युक्तिसंगत नाहीं. जिनसेनाचार्यांचा अभिप्राय थोडक्या श्लोकांत याप्रमाणें सांगितला आहे—

इति विज्ञापितस्तेन भगवानादितीर्थकृत् ।
व्याजहार पुराणार्थमतिगम्भीरया गिरा ॥ १८३ ॥
प्रागेवोत्सर्पिणीकालमाश्रित्य प्रस्तुतां कथाम् ।
पुराणमतिगम्भीरं व्याजहार जगद्गुरुः ॥ १८४ ॥
ततोऽवसर्पिणीकालमाश्रित्य प्रस्तुतां कथाम् ।
प्रस्तोष्यन्स पुराणस्य पीठिकां प्राक्समादधे ॥ १८५ ॥
इतिवृत्तं पुराकल्पे यत्प्रोवाच गिरां पतिः ।
गणी वृषभसेनाख्यस्तत्तदाधिजगेऽर्थतः ॥ १९३ ॥
ततः स्वायंभवीं वाणीमवधार्यार्थतः कृती ॥
जगद्धिताय सोऽग्रन्थीत्तत्पुराणं गणाग्रणीः ॥ १९४ ॥
शेषैरपि तथा तीर्थकृद्भिर्गणधरैरपि ।
महर्षिभिर्यथाम्नायं तत्पुराणं प्रकाशितम् ॥ १९५ ॥
ततो युगान्ते भगवान्वीरः सिद्धार्थनन्दनः
विपुलाद्रिमलङ्कुर्वन्नेकदास्ताखिलार्थदृक् ॥ १९६ ॥
अथोपसृत्य तत्रैनं पश्चिमं तीर्थनायकम् ।
पप्रच्छामुं पुराणार्थं श्रेणिको विनयानतः ॥ १९७ ॥
तं प्रत्यनुग्रहं भर्तुरवबुद्ध्य गणाधिपः ।
पुराणसङ्ग्रहं कृत्स्नमन्ववोचत्स गौतमः ॥ १९८ ॥

तेव्हां या रामादिमहापुरुषांच्या कथा तीर्थकरादिकापासून चालत आल्या नसत्या व एकाद्या आचार्यांनें वैदिक पुराणावरून घेतल्या असत्या तर या कथांचें जैनीकरण केलें आहे असें म्हणणें योग्य झालें असतें.

रविषेणाचार्य हे फार मोठे प्रतिभासम्पन्न कवि होते व हरिवंशकार जिनसेन आचार्यांनीं त्यांचा व त्यांच्या पद्मपुराणाचा व वरांगचरिताचा उल्लेख याप्रमाणें केला आहे. हरिवंशसर्ग १ ला--

कृतपद्मोदयोद्योता प्रत्यहं परिवर्तिता ।
मूर्तिः काव्यमयी लोके रवेरिव रवेः प्रिया ॥ ३४
वराङ्गनेव सर्वाङ्गैर्वराङ्गचरितार्थवाक् ।
कस्य नोत्पादयेद्गाढमनुरागं स्वगोचरम् ॥ ३५ ॥

सूर्याची मूर्ति दररोज कमलसमूहाला प्रफुल्ल करून जगाला प्रकाशित करीत असते व जनांना प्रिय होते तशी रवीची-रविषेणाचार्यांची ही काव्यमयी मूर्ति दररोज पद्मोदयोद्योताला- रामचंद्राच्या उदयाला वाढविते व या काव्यमय मूर्तीचें दररोज परिशीलन केल्यानें सूर्याप्रमाणें ती रविषेणाचार्यांना प्रिय झाली आहे.

रविषेणाचार्यांचें 'वराङ्गचरित' हें गुण, रीति, रस इत्यादि अंगांनीं सुन्दर स्त्रियेप्रमाणें कोणाच्या मनांत गाढ प्रीति उत्पन्न करीत नाहीं बरें ? ( पण आचार्यांचें हें वराङ्गचरित्र अद्यापि कोणास उपलब्ध झालें नाहीं. )

स्वयम्भूकवीनीं ही 'पउमचरिउ' मध्यें रविषेणाचार्याविषयीं असा उल्लेख केला आहे-

वद्धमाणमुहकुहरविणिग्गय रामकहाणइ एह कमागय ।
एह रामकहसरि सोहंती । गणहरदेवहिं दिट्ठ वहंती ।
पच्छइ इंदभूइ-आयरिए । पुणु धम्मेण गुणालंकरिएं ॥
पुणु पहवें संसाराराएं । कित्तिहरेण अणुत्तरवाएं ।
पुणु रविसेणायरियपसाएं । बुद्धिएं भवगाहिय कइराएं ॥

अर्थ- ही रामकथारूपी नदी भगवान् महावीराच्या मुखपर्वतापासून निघाली व सुक्रमपणें वाहणाऱ्या या नदीला गणधरांनीं पाहिलें. यानन्तर गौतमगणधरांनीं व गुणालंकृत धर्माचार्यांनीं पाहिलें. नंतर प्रभव मुनिराजांनीं या रामकथारूपी नदीला पाहिलें. यानन्तर अनुत्तरवादी कीर्तिधर आचार्यांनीं हिला पाहिलें. यानन्तर रविषेणाचार्यांनीं हिला पाहिलें व नंतर स्वयंभूदेवकवीनें आपल्या बुद्धीनें या रामकथारूपी नदींत अवगाहन केलें.

कविधवलही वरांगचरित्र व पद्मपुराण या ग्रन्थांचे कर्ता अशा रविषेणांचें या प्रमाणें स्मरण करितात- " जेहिं कए रमणिज्जे वरंगपउमाण चरियवित्थारे कहव ण-सलाहणिज्जे ते कइणो जइ य रइसेणो ॥ ज्यांनीं सुंदर वरांगचरित्र व पद्मपुराण हे दोन ग्रन्थ विस्तृत असे रचिले ते रविषेणाचार्य कां बरें प्रशंसनीय होणार नाहींत ? अर्थात् ते प्रशंसनीय होतीलच. याप्रामाणें स्वयंभूदेव आदि कवींनी आपल्या रामायण आदि अपभ्रंशकाव्यांत प्रारंभीं रविषेणाचार्यांचे आदरानें स्मरण केलें आहे.

पद्मपुरणांत ४१ व्या पर्वांत दण्डकारण्यांत राम, लक्ष्मण व सीता यांनीं निवास केल्याचा उल्लेख आला आहे व दंडकारण्य हें नांव पडण्याचें कारण

रविषेणाचार्यांनीं हें सांगितलें आहे. "कर्णकुंडल नांवाच्या राजधानींत दण्डक नांवाचा राजा पूर्वी राहत होता. व तो जेवढ्या प्रदेशांत राज्य करीत होता त्याचेंही नांव दण्डक असेंच होतें. याप्रमाणें याचा उल्लेख रविषेणाचार्यांनीं केला आहे—

यतोऽयं दण्डको देश आसीद्दण्डकपार्थिवः ।
तनैव ध्वनिनाद्यापि दण्डकः परिकीर्त्यते ॥ १९२ ॥ पर्व ४१

हा राजा दिगंबर मुनींचा अतिशय भक्त होता. पण एका परिव्राजक साधूनें जो राजाच्या राणीवर आसक्त होता. आपल्यावर त्याची भक्ति उत्पन्न व्हावी म्हणून एक दिगंबर साधु तुमच्या राणीवर आसक्त झाला आहे असा आरोप दिगंबर साधूवर ठेवला व त्याचप्रमाणें जैन साधूंची राजाचें प्रधानमंडल नेहमी निंदा करीत असे. त्यामुळे राजानें रागावून सर्व दिगंबर मुनींना यंत्रांत पिळून मारण्याची आज्ञा आपल्या सेवकांना दिली. त्यामुळें अनेक मुनि व संघाधिपति आचार्य मारले गेले.

गांवाबाहेरून एक मुनि गांवांत प्रवेश करीत असतांना कांहीं सज्जनांनीं गांवांत आपण प्रवेश करूं नका कारण येथें अनेक मुनींना राजानें मारविलें आहे असें सांगितलें. तें ऐकून त्या मुनीला अतिशय राग आला व त्यांच्या मुखांतून तीव्र असा अग्नि बाहेर पडला. व त्यानें राजाच्या सर्व देशाला जाळून भस्म केलें. राजा, अन्तःपुर, सर्व लोक, पशुपक्षी, झाडें, वेली सर्व कांहीं जळून चोहीकडे राखेचे ढीग साचले. फार मोठा काल गेल्यानंतर तो सर्व प्रदेश अरण्यमय बनला.

कुन्दकुन्दाचार्य हे विक्रमाच्या दुसऱ्या शतकांत होऊन गेले. अर्थात् अठराशे वर्षांपूर्वी कुन्दकुन्दाचार्य झाले व त्यांनीं षट्पाहुडांतील भावपाहुडांत गाथा ४९ मध्यें बाहु[1] नामक मुनीनें दण्डक राजाचे सगळें नगर जाळलें असा उल्लेख दिला आहे.

तसेंच श्रीकुन्दकुन्दाचार्यांनीं प्राकृत भक्ति रचिल्या आहेत व श्रीपूज्यपादाचार्यांनीं[2] संस्कृत भक्ति लिहिल्या आहेत असा उल्लेख प्रभाचन्द्र आचार्यांनीं क्रियाकलाप नामक टीकेत सिद्धभक्तीच्या शेवटीं केला आहे. म्हणून निर्वाणकाण्डभक्तींत कुन्दकुन्दाचार्यांनीं रामायणांत वर्णिलेल्या अनेक व्यक्तींना कोठें कोठें मोक्ष प्राप्त झाला याचा उल्लेख याप्रमाणें केला आहे—

---

१ दंडयणयरं सयलं डहिउं अब्भंतरेण दोसेण ।
जिणलिंगेण वि बाहू पडिओ सो रउरवं नरयं ॥ ४९ ॥

२ संस्कृताः सर्वा भक्तयः । पादपूज्यस्वामिकृताः प्राकृतास्तु कुन्दकुन्दाचार्यकृताः ।

रामसुआ बिण्णिजणा लाडणरिंदाण पंचकोडीओ। पावाए गिरिसिहरे णिव्वाण गया णमो तेसिं ॥ ३ ॥ रामहणूसुग्गीवा गवय गवक्खो य णील महणीलो। णवणवदीकोडीओ तुंगीगिरिणिव्वुदे वंदे ॥ ८ ॥ दसमुहरायस्स सुआ। कोडीपंचद्धमुणिवरे सहिया। रेवोभयम्मि तीरे णिव्वाण गया णमो तेसिं ॥ १० ॥ वंसत्थलम्मि णयेर पच्छिमभायम्मि कुंथुगिरिसिहरे। कुलदेसभूसणमुणी णिव्वाण-गया णमो तेसिं ॥ ११ ॥ विंध्याचलम्मि रण्णे। मेघणादो इंदजयसहिओ। मेघवरणामतित्थं णिव्वाण गया णमो तेसिं ॥ १४ ॥ वडवाणीवरणयरे दक्खिणभायम्मि चूलगिरिसिहरे इंदजियकुंभयण्णे णिव्वाण गया णमो तेसिं ॥ १५ ॥

देशभूषण व कुलभूषण वगैरे मुनींचे समग्र चरित्र रामायणांत आलें आहे व वन्हिप्रभ नामक असुरानें त्यांना केलेला उपसर्ग राम लक्ष्मणांनीं दूर केला व त्यांना (वंशगिरि) कुंथलगिरीवर केवलज्ञान प्राप्त झालें वगैरे कथानकें यांत आलीं आहेत. कुन्दकुन्दाचार्यांनीं ज्या ज्या स्थानीं हे महापुरुष मुक्त झाले आहेत त्या त्या स्थानांचें वर्णन यांत आलें नाहीं. पण ते महापुरुष कर्मक्षय करून मुक्त झाले हें मात्र यांत रविषेणाचार्यांनीं निश्चित लिहिलें आहे.

पं. आशाधरांनीं सागारधर्मामृतांत वनमालेच्या दृष्टान्तानें रात्रिभोजनाच्या महादोषांचें वर्णन केलें आहे. व तें त्यांनीं श्रीरविषेणाच्या पद्मपुराणांतून घेतलें आहे. याविषयीं ते असें लिहितात—

त्वां यद्युपैमि न पुनः सुनिवेश्य रामं लिप्ये वधादिकृदघैस्तदिति श्रितोऽपि ॥
सौमित्रिरन्यशपथान्वनमालयैकं दोषाशिदोषशपथं किल कारितोऽस्मिन् ॥"
२६ ॥ अ. ४ था.

याचप्रमाणें अनगारधर्मामृतांतही पं. आशाधरांनीं अध्याय पहिला श्लोक ५१।५२।५३ यांत पद्मपुरणांतील कथांचा आधार घेऊन पुण्याचा प्रभाव वर्णिला आहे. व 'एषा कथा द्वे उत्तरे च पद्मचरिताज्ज्ञातव्याः' असें टीकेंत त्यांनीं लिहिलें आहे.

## गुणभद्राचार्यांचें रामायण

रविषेणाचार्यांनीं लिहिलेल्या रामायणाप्रमाणें गुणभद्राचार्यांनींही रामायण रचिलें आहे. पण तें कांहीं वेगळें वाटतें. तें याप्रमाणें— लंकानगरींत पुलस्त्य नांवाचा विद्याधर राजा आपल्या मेघश्री राणीसह राज्य करीत होता. या उभयतांचा पुत्र रावण होय. हा एके दिवशीं आपल्या पत्नीसह वनांत क्रीडा करण्यासाठीं गेला असतां तेथें विजयार्धपर्वतावरील अचलक नगराच्या अमितवेगराजाच्या

मणिमतिनामक कन्येला त्यानें पाहिलें. ती तेथें विद्या सिद्ध करण्यासाठीं आली होती तिला पाहून तो काममोहित झाला. तिला वश करण्यासाठीं त्यानें तिची विद्यासिद्धि नष्ट केली. तिनें बारा वर्षेपर्यन्त उपवास करून विद्या सिद्ध करण्याचा प्रयत्न केला होता परंतु या दुष्टानें तिच्या विद्यासिद्धींत विघ्न उत्पन्न केलें. त्यामुळें ती अतिशय रागावली. व पुढील जन्मीं याच्या पोटीं जन्माला येऊन याचा नाश करीन असा तिनें मनांत निश्चय केला व कांहीं दिवसांनीं मरण पावून मंदोदरीपासून ती जन्मली. तिच्या जन्माच्यावेळीं भूकंपादिक अनेक उत्पात झाले. व नैमित्तिकांनीं ही कन्या रावणाचा नाश करणारी होईल असें सांगितलें. रावण अतिशय घाबरला व त्यानें या पापी कन्येला कोठें तरी सोडून ये असें मारीच मंत्र्याला सांगितलें. तो मंदोदरी-कडे आला व त्यानें रावणाची आज्ञा सांगितली. आपल्या पतीचा नाश करणारी ही कन्या आहे म्हणून तिनें एका पेटींत पुष्कळ धन व एक पत्र यासह कन्येला ठेविलें व डोळ्यांतून अश्रु गळत असतां तिनें बाधारहित स्थानीं ही पेटी ठेवून ये असें मारीचाला सांगितलें. ती पेटी घेऊन तो आकाशमार्गानें निघाला व जनक राजाच्या मिथिला नगरीच्या उद्यानाजवळच्या एका स्थानीं जमिनींत ती पेटी त्यानें ठेवली.

थोड्याच वेळानें तेथें घर बांधण्याला योग्य जमीन नांगरण्यासाठीं कांहीं लोक आले. त्यांच्या नांगराला ती पेटी अडकून वर आली. त्यानें ती राजा जनका-कडे नेली. पेटींत एका सुंदर बालिकेला व एका पत्रासह राजानें पाहिलें. पत्रांतला आशय त्यानें वाचला. व त्या बालिकेला त्यानें आपल्या वसुधा राणीकडे नेलें. राजा व राणीनें रावणाला ही वार्ता कळणार नाहीं अशारीतीनें तिला वाढविलें. पुढें रामचंद्रा-बरोबर तिचा विवाह झाला. सीता जमिनींतून निघाली अशा अभिप्रायानें तिला 'भूमिसुता' असें नांव प्राप्त झालें. याचप्रमाणें जनकाच्या पत्नीचें नांव 'वसुधा' असे होतें. वसुधा शब्दाचा अर्थहि पृथ्वी असा होतो म्हणून भूसुता, वसुधासुता असेंही म्हणावयास हरकत नाहीं. अर्थात् ती जनकाची मुलगी मानली गेली. राजा दशरथ हा वाराणसी–काशीचा राजा होता. व राम, लक्ष्मण यांचा जन्म वाराणसींत झाला. रामाचा जन्म माघ कृष्ण त्रयोदशीला मघा नक्षत्रावर झाला. त्याच्या मातेचें नांव सुबाला होतें. लक्ष्मणाचा जन्म माघ शुक्लप्रतिपदा विशाखा नक्षत्रावर झाला. असा उल्लेख उत्तरपुराणकारांनीं केला आहे.

अयोध्येंत आपले वंशज राज्य करीत होते पण आतां तेथें आपले वंशज कोणी राहिले नाहींत यासाठीं आपण तेथें राज्य करावें असें दशरथाला वाटलें व

तो तेथें आपल्या दोन रामलक्ष्मण पुत्रासह येऊन राज्य करूं लागला व येथें आल्यावर त्याला वेगळ्या दोन राण्यापासून भरत व शत्रुघ्न असे दोन पुत्र झाले.

रामानें यज्ञाचें रक्षण केल्यामुळें प्रसन्न होऊन जनक राजानें त्याला आपली अत्यंत सुंदर कन्या सीता दिली. यानंतर रामलक्ष्मण अयोध्येला आल्यावर दशरथ-राजानें आणखी सात राजकन्याबरोबर रामाचें व सोळा राजकन्याबरोबर लक्ष्मणाचें लग्न केलें व रामाला काशी देशाचें राज्य दशरथानें दिलें व लक्ष्मणाला काशी देशाचा युवराज केलें.

सीतेच्या सौन्दर्याची कीर्ति रावणापर्यन्त पोचली तेव्हां तिचें हरण करावें असें रावणानें ठरविलें. त्यानें मारीच मंत्र्याला आपल्याबरोबर घेतलें व तो पुष्पक विमानानें काशी नगराच्या उद्यानाकडे आला. राम सीतेसह बगीचांत क्रीडा करण्यासाठीं आला होता. मारीचानें सुवर्णमृगाचें रूप धारण करून रामाला भुलवून दूर नेल्यावर रावणानें रामाचें रूप धारण केलें व पुष्पक विमानाला पालखीचें रूप देऊन सीतेजवळ जाऊन त्यानें प्रिये! हरिण पुढें पाठविला आहे व सूर्य अस्ताला जात आहे. आपण आतां आपल्या घरीं जाऊं. तूं या पालखींत बैस व मी घोड्यावर बसलों आहे असें त्यानें म्हटलें.

रामचन्द्रच आपल्याबरोबर बोलत आहेत असें तिला वाटलें व ती पालखींत बसून त्याच्याबरोबर गेली. पालखी जमिनीवरूनच जात आहे असा तिला भ्रम झाला. लंकेला पोहोचल्यावर रामाचें रावणांत रूपान्तर झालें. मी रावण आहे व तुला मी येथें लंकेत आणिलें आहे असें त्यानें म्हटलें.

सीतेला फार भीति वाटली. रामाच्या विरहानें तिचें मन अतिशय शोकयुक्त झालें. मूर्च्छित होऊन ती जमिनीवर पडली. शीलवतीला स्पर्श केला असतां तत्काल आकाशगामिनी विद्या नष्ट होतें असें जाणून त्यानें विद्याधरींना बोलावून त्यांच्या द्वारें तिची मूर्च्छा दूर करविली. सावध झाल्यावर सीतेनें तुम्ही कोण व हा कोणता प्रदेश आहे असें विचारिलें.

त्या म्हणाल्या, ' आम्ही विद्याधरी आहोत. ही लंकानगरी आहे व हा त्रिखंडपति रावण आहे. तूं याला पति समजून त्रिखण्डाच्या ऐश्वर्याचा याच्यासह उपभोग घे. '

सीता म्हणाली, ' हा त्रिखण्डाधीश असो किंवा षट्खण्डाधीश असो. मी प्राणापेक्षांहि अधिक किमतीचे शीलादिक गुण विकीत नाहीं. मला शीलादिक गुण प्रिय आहेत. प्राण मला प्रिय नाहीं. ' असें बोलून तिनें मौन धारण केलें व जोपर्यंत मला रामचन्द्राची क्षेमवार्ता समजणार नाहीं तोपर्यन्त मी भोजन करणार नाहीं अशी तिनें प्रतिज्ञा केली. अवैधव्यसूचक असेच स्वल्प अलंकार तिनें अंगावर धारण केले.

त्याचवेळीं लंकेमध्यें अनेक उत्पात झाले व कालचक्राप्रमाणें रावणाचा नाश करणारें चक्ररत्न प्रकट झालें पण रावणाला भ्रांतीनें तें हर्षाला कारण झालें. त्यावेळीं रावणाला मन्त्र्यांनीं हितोपदेश केला पण तो त्याला आवडला नाहीं. ' घरीं आलेल्या लक्ष्मीला मी लाथ मारून हाकलून देणारा मूर्ख नाहीं. ' असें रावणानें म्हटल्यावर मन्त्र्यांना खेद वाटला व ते स्वस्थ बसले.

इकडे रामचन्द्रांना हरिणाची प्राप्ति झाली नाहीं. ते सूर्यास्ताचे वेळीं परत आले. ते सीता कोठें आहे असें परिजनाला विचारू लागले. ' प्रभो, छायेप्रमाणें देवी सीता आपणाला सोडून कशा राहतील ? आम्ही आपणाबरोबरच त्या असतील असें समजत होतों ' असें म्हटल्यावर रामाला दुःखातिशयानें मूर्च्छा आली. शीतोपचारानें सावध केल्यावर कांहीं नोकरांनीं त्यांच्याकडे वेळूला अडकून फाटलेलें वस्त्र आणून दाखविलें व तें पाहून सीतादेवीला कोणीतरी हरण करून नेलें असें लक्ष्मण व रामचन्द्राला वाटलें व ते सचिन्त झाले.

इतक्यांत दशरथ महाराजाकडून एक दूत आला व त्यानें महाराजदशरथांनीं " राहूनें रोहिणीला घेऊन आकाशांत पलायन केलें व बिचारा चंद्र तिला हुडकित चालला आहे असें स्वप्न पाहिलें " व त्याचें फल पुरोहितानें त्यांना असें सांगितलें, " हे राजन्, रावणानें सीतादेवीला घेऊन लंकेकडे प्रयाण केलें आहे व रामचंद्र व्याकुळ होऊन वनांत तिला शोधण्यासाठीं भटकत आहेत. " तें ऐकून महाराजांनीं मला तत्काल लेखासह करण्डक घेऊन जा म्हणून पाठविलें असें म्हणून त्यानें लेखासह करण्डक त्यांच्यापुढे ठेविला. लेखांत रावणानें रामाचें रूप धारण करून सीतेला हरण करून नेलें आहे व आपण तिला आणण्याचा खूप प्रयत्न करू पण तूं आपल्या शरीराची काळजी घे " हा पत्राचा मथितार्थ ऐकून लक्ष्मण अतिशय रागावला व म्हणाला " सशासारख्या या रावणानें सिंहाबरोबर विरोध करण्याचें ठरविलें आहे. बरें आहे. " ही वार्ता ऐकल्यावर जनकराजा रामचन्द्राकडे

आला व भरत–शत्रुघ्नही आले व ते सीता परत आणण्याच्या उपायांचा विचार करूं लागले. इतक्यांत दोन विद्याधर राजद्वारांत आले आहेत असें द्वारपालानें येऊन सांगितले. त्यांना आंत पाठवून दे, असें रामानें म्हटल्यावर ते येऊन याप्रमाणें बोलले, 'हे प्रभो माझ्या पित्याचें नांव वलीन्द्र. त्यांना वाली व सुग्रीव असे आम्ही दोन पुत्र. पित्यानें वालीला राजा केलें व मला युवराज केलें. पण पिताजी मेल्यावर वालीनें मला राज्यांतून हाकून दिलें व माझें तो स्थान बळकावून बसला आहे.' एवढें सांगून नंतर त्यानें आपल्या मित्राची हकीकत अशी सांगितली– 'हा अणुमान् माझा मित्र. याच्या पित्याचें नांव प्रभञ्जन आणि मातेचें नांव अञ्जनादेवी. आम्ही दोघे सम्मेदाचलावर जिनवंदना करण्यासाठीं गेलों. तेथें नारदमुनि भेटले. आम्ही त्यांना आमचें स्थान आम्हाला केव्हां प्राप्त होईल असा प्रश्न विचारला. तेव्हां ते म्हणाले राम व लक्ष्मण लौकरच अर्धभारताचे अधिपति होतील. रामस्त्री सीता त्या रावणानें हरण करून लंकेला नेली आहे. हें वृत्त सांगितल्यावर अणुमान् म्हणाला, प्रभो, मला आपण सीतादेवी ओळखतील असें पदार्थ द्या. म्हणजे मी त्यांचा शोध अवश्य लावीन असें भाषण केल्यावर रामानें आपल्या नांवाची आंगठी दिली व सीतेचें वर्णनही सांगितलें.

यानंतर मारुती अर्थात् अणुमान लंकेच्या सर्वर्तुक नामक वनांत गेला. तेथें शिशवीच्या झाडाखालीं सीतादेवी बसलेली त्याला दिसली. वनाग्नीनें संतप्त झालेल्या वेलीप्रमाणें ती म्लान झाली होती.

मारुती त्या बगीचांत पोहोंचला. त्यावेळीं आकाशांत नुकताच चन्द्रोदय झाला होता. रावणानें त्या वनांत सीतेला आणून ठेविले होतें. तो सातवा दिवस होता.

सीतेची परिस्थिति कशी आहे हें पाहण्याकरितां रावण तेथें आपल्या अंतःपुरासह आला.

माझ्या पतीची क्षेमवार्ता केव्हां बरें ऐकायला मिळेल याच विचारांत सीतादेवी निमग्न झाली होती. तिला पाहून रावणाच्या मनांत हिच्या सारखी पतिभक्ता स्त्री आपणाला दुसरी दिसली नाहीं असा विचार आला व तो आश्चर्यचकित झाला.

तो तिला म्हणाला "रामावर तुझें प्रेम आहे हें खरें आहे पण आतां या जन्मांत त्याचा कांही उपयोग नाहीं. आतां त्याचें तोंड तुला पाहावयास मिळणार नाहीं. म्हणून आतां तूं माझ्या इच्छा पूर्ण कर. माझ्या सर्व स्त्रियांत तूं चूडामणि सारखी हो. नाहीं तर मी तुला घटदासी करीन वा मारून टाकीन." रावणाच्या विनंतीचा

व धमक्यांचाही कांहींच उपयोग झाला नाहीं. तिचा धैर्यमेरु तिळमात्रही कंपित झाला नाहीं.

मंदोदरी रावणाला म्हणाली, " स्वामिन् अशा महाशीलवतीचा अभिलाष आपण मनांत धरूं नका. यापासून आपलें तिळभरही कल्याण होणार नाहीं. आपण तिचा त्याग करा " असें म्हटल्यावर रावण कांहीं बोलला नाहीं; पण माझ्या प्राणाबरोबर तिचा त्याग करीन असें रागानें बोलून तो तेथून निघून गेला. नंतर मंदोदरी सीतादेवीजवळ येऊन म्हणाली ' तूं माझी मुलगीच पुनः परत आली आहेस असें मला वाटतें. बाळे, तुला मरण आलें तरी हरकत नाहीं पण तूं माझ्या पतीच्या इच्छेची पूर्ति करूं नकोस. तो तुला माझी सवत बनवूं पहात आहे.' असें कळकळीनें बोलत असतां तिच्या मनांत पुत्रीस्नेह उत्पन्न होऊन तिच्या स्तनांतून दूध पाझरूं लागलें. व सीतेलाही माझी आईच मला भेटण्यास आली असें वाटलें. तिचें हृदय द्रवलें. तिचे डोळे अश्रूंनीं डबडबले.

मंदोदरी म्हणाली बाळे, तुला जर पतीचें दर्शन व्हावें असें वाटत असेल तर तूं आहार घ्यावास, माझी ही हात जोडून विनंती आहे, ती तूं मान्य कर. जर तूं जेवणार नाहींस तर मी देखील जेवणार नाहीं. हें भाषण ऐकून सीतादेवीनें तिला मनानें नमस्कार केला. यानंतर मंदोदरी आपल्या परिवारासह तेथून निघून गेली.

नंतर कपीचें रूप धारण करून शिसवीच्या झाडावर बसलेला ( हनूमान् ) अणुमान् खालीं उतरला व त्यानें श्रीवत्सलांछनयुक्त आंगठी जिच्यावर रामनाम कोरलें आहे ती व मोहोरबंद पत्रही तिच्यापुढें ठेवलें व तिला आदरानें त्यानें नमस्कार केला. तिनें तें पत्र पाहून फोडलें व वाचलें. वाचीत असतां तिचा शोक नाहींसा झाला व ती अणुमानाला म्हणालीं हे महात्म्या, आज तूं मला जीवन दिलेंस, तूं माझ्या पित्यासारखा आहेस. हे शब्द ऐकून अणुमान् आपले कान झाकून म्हणाला, स्वामिनि, आपण माझ्या स्वामीच्या महादेवी आहात. मी आपणांस स्वामीकडे नेलें असतें पण तशी त्यांची मला आज्ञा नाहीं. ते स्वतः इकडे येतील व अधम रावणाला मारून आपणाला नेतील. स्वामिनि, आपण शरीर धारणेकरितां अवश्य आहार घ्यावा.

सीतेनेंही आहार घेण्याचें कबूल केलें. तेव्हां अणुमान् तिला पुनः वंदन करून शीघ्र सूर्योदयसमयीं रामचन्द्राकडे आला. स्वमुखावरील हर्षानें त्यानें प्रभूची कार्यसिद्धि व्यक्त केली. त्यानें नमस्कार केला. आनंदानें उठून राम त्यास भेटले व त्याला आसनावर बसावयास सांगून त्याचें सर्व म्हणणें ऐकून घेतलें.

यानंतर रामचन्द्रानें अणुमानाला सेनापतिपद व सुग्रीवाला अधिराजपद दिलें.

मोठ्या सैन्यासह रामचन्द्र लंकेला जाण्यासाठीं निघाले. वाटेंत वालीला आपला मित्र करून घ्यावें असें ठरविलें पण तो प्रयत्न सिद्ध झाला नाहीं. त्यामुळें लक्ष्मणानें वालीशीं युद्ध करून त्याला ठार मारलें.

नंतर सैन्यासह राम लंकेला जाऊन पोहोचले. प्रथमतः सामोपाय करून पहावा म्हणून पुनरपि अणुमानाला रामानें रावणाकडे पाठविलें. अणुमान् प्रथमतः बिभीषणाकडे गेला व न जाणतां रावणानें रामस्त्रीचें हरण केलें आहे आपण त्याला दोन उपदेशाचे शब्द सांगून सीतादेवीला रामचन्द्राकडे पाठविण्याचा प्रयत्न करावा असें सांगितलें. बिभीषणानें तें मान्य केलें व तो तत्काल रावणाकडे त्याला घेऊन गेला. हे प्रभो, रामचन्द्रांनीं आपणाकडे या दूताला पाठविलें आहे असें बोलला.

दूतानें रावणापुढें नजराणा ठेवून याप्रमाणें भाषण केलें. "हे प्रभो, सीतादेवी ही रामचन्द्राची पत्नी आहे. पण आपण ती इतराची असेल अशा समजुतीनें तिला आणिलें असेल यास्तव ती त्यांना परत करावी."

हें भाषण ऐकून रावणानें स्पष्ट सांगितलें कीं "मी इतराची जाणून तिला आणलें नाहीं. ती रामाची आहे हें जाणूनच आणिली आहे. माझ्या राज्यांतील जी जी उत्कृष्ट वस्तु आहे ती माझीच आहे व सीता हें स्त्रीरत्न आहे व तें तर माझेंच आहे व तें परत पाठवून द्या असें सर्व पृथ्वीचा पति असलेल्या मला सांगणें बिलकुल अयोग्य आहे."

अणुमान् म्हणाला, 'प्रभो तिचें हरण करण्यापूर्वी ती कोणाची होती हें सांगा व असें परोक्ष तिचें हरण करण्यानें आपण शूर आहात हें सिद्ध होईल काय? आपण मधुरशब्दांनीं ती रामचंद्रांना अर्पण करावी; हें अणुमानाचें वचन ऐकून रावण म्हणाला, दूत अवध्य असतात म्हणून मी तुला क्षमा केली आहे. तूं येथून चालता हो.

त्यावेळीं बिभीषणानें अणुमानाला म्हटलें कीं, रावणाच्या मस्तकावर यम स्वार झाला आहे. त्याला हें भाषण मान्य होत नाहीं. तूं आता येथून निघून रामाकडे जा.

मी याला चार शब्द सांगून सीता परत करावयाला लावीन असें बोलून तो रावणाला याप्रमाणें बोलू लागला. 'हे प्रभो, जी स्त्री मला इच्छिणार नाहीं तिचा मी स्वीकार करणार नाहीं असें आपण व्रत घेतलें आहे तें ध्यानांत घ्या. हें व्रत तुम्हाला

संसारांतून तारून नेईल त्याचा नाश करूं नका. हें केलेलें पाप कल्पान्तापर्यन्त राहील याचा तुम्ही विचार करा. ही सीता कोणाची मुलगी आहे हें तुम्हाला माहीत नाहीं काय? नैमित्तिकांनी भावी आदेश आपणास कळविला आहे यास्तव आपण या अकार्यापासून परावृत्त व्हावें. हें विभीषणाचें भाषण ऐकून रावण फार रागावला व तूं भरसभेंत असें भाषण करून माझा मोठा अपमान केला आहेस. तूं येथून चालता हो नाहींतर मी तुला ठार मारीन.

हें रावणभाषण ऐकून विभीषणानें याच्याबरोबर राहण्यानें माझीही अकीर्ति जगांत पसरेल असा विचार करून आपलें मोठें सैन्य घेऊन व समुद्र तरून तो रामाला जाऊन मिळाला.

एके दिवशीं पुष्कळ सैन्य घेऊन अणुमान् लंका नगरांत जाऊन तेथें नगरीदाह व उद्यानध्वंस आदिक कार्यें करून आला. पण त्याचा प्रतीकार करण्यासाठीं रावण आला नाहीं व लढाईचेंही कांहीं चिन्ह दिसेना. तेव्हां विभीषणानें सांगितलें कीं, आदित्यपाद नामक पर्वतावर रावण विद्यासिद्धि करण्याकरितां गेला आहे. इन्द्रजिताला आपल्या रक्षणासाठीं नियुक्त करून आठ उपवासाच्या प्रतिज्ञेनें राक्षसादिक महाविद्या तो सिद्ध करीत आहे.

हें ऐकून अणुमान्, सुग्रीव यांनीं स्वसाधित गरुडवाहिनी, सिंहवाहिनी आदिक विद्या लक्ष्मण व रामाला दिल्या व पुष्कळ सैन्य घेऊन ते दोघे इन्द्रजिताबरोबर लढण्यास गेले.

इंद्रजितानें आपल्या अनेक विद्या वानरसैन्याबरोबर लढण्यास पाठविल्या. पण त्या विद्यांनीं त्यांना सांगितलें कीं "तुम्हाला आम्ही पूर्वी तुमच्या पुण्योदयामुळें पुष्कळ साहाय्य केलें पण आतां तुमचें पुण्य क्षीण झाल्यामुळें तुमच्या शत्रुबरोबर लढण्यास आम्ही समर्थ नाहीं" असें उत्तर दिलें. तें ऐकून दशानन स्वतःच्या सामर्थ्यानें लढण्यास उद्युक्त झाला. त्यानें आपल्या सेनापतीला युद्धाची दौंडी आपल्या सेनेंत द्यावयाला लावली.

अनेक दिवस युद्ध झालें. इन्द्रजित्, कुंभकर्ण, खरदूषण, कुंभ, निकुंभ वगैरे असंख्य योद्धे रामसैन्याबरोबर लढूं लागले. एकेदिवशीं युद्धाचा अन्त करण्यासाठीं रावणानें लक्ष्मणावर चक्ररत्न फेकलें पण तें निष्प्रभ होऊन त्याच्या हातांत आलें. लक्ष्मणानें तें फिरवून रावणावर सोडलें. त्यानें रावणाचा गळा धडापासून वेगळा केला व रावण मरण पावला. दुराचारानें त्याला अधोगति प्राप्त झाली.

लक्ष्मणानें विजयशंख फुंकला. सर्वांना अभय दिलें गेलें. मंदोदरी आदिक राण्यांना रावणमरणामुळें जें दुःख झालें होतें त्यांना चार शांतीच्या गोष्टी सांगून तें नाहींसें केलें व बिभीषणाला लंकेचें राज्य दिलें. यानंतर बिभीषण, सुग्रीव, अणुमान् आदिकांनीं राम व सीता यांचा संगम करून दिला व मोठा जयोत्सव लंकेंत केला गेला. रामचंद्र व सीता यांचें वियोगदुःख संपून ते अत्यन्त आनंदित झाले. यानंतर राम-लक्ष्मणांचा पीठनामक पर्वतावर सर्व देव व विद्याधर राजांनीं तीर्थ-जलांनीं भरलेल्या एक हजार आठ कलशांनीं अभिषेक केला. नंतर लक्ष्मणानें कोटि-शिला उचलली. त्यावेळीं रामचंद्रांनीं आनंदानें सिंहनाद केला.

यानंतर बेचाळिस वर्षेंपर्यंत दिग्विजय करून त्रिखंड भरत त्यांनीं स्ववश केलें व नंतर अयोध्येंत येऊन राम लक्ष्मण आपल्या परिवारासह सुखानें प्रजापालन करू लागले.

लक्ष्मणाला पृथ्वीसुन्दरी आदिक सोळा हजार राण्या होत्या व रामचन्द्राला सीतादेवी आदिक आठ हजार राण्या होत्या. हे दोघे सोळा हजार देशांचे अधिपति होते.

एकेवेळीं मनोहरनामक उद्यानांत शिवगुप्तनामक केवली आले होते. त्यांच्यापासून धर्माचें स्वरूप ऐकून रामचंद्रादिकांनीं श्रावकांचीं व्रतें धारण केलीं. पण निदानशल्यदोषानें लक्ष्मण भोगासक्त व नरकायुर्बंधक झाला आणि त्यानें सम्यग्दर्शनादिक धारण केलें नाहीं.

कांहीं वर्षें अयोध्येंत रामलक्ष्मण राहिले व नंतर अयोध्येच्या सिंहासनावर भरत व शत्रुघ्नाला बसवून ते पुनः आपल्या परिवारासह वाराणसी नगरीला जाऊन तेथें इन्द्राप्रमाणें राज्यसुख भोगू लागले.

रामचंद्राला विजयनामक पुत्र झाला व लक्ष्मणाला पृथ्वीचन्द्रनामक. याच-प्रमाणें आणखी अनेक पुत्रपौत्रासह ते सुखानें राहू लागले.

एकेकाळीं लक्ष्मण नागशय्येवर झोपला असतां त्याला तीन स्वप्नें दिसलीं. "पहिल्या स्वप्नांत त्यानें एका प्रचण्ड हत्तीनें वडाचें झाड उन्मळून पाडलें हें पाहिलें. दुसऱ्या स्वप्नांत राहूनें गिळलेला सूर्य पातळांत जात आहे असें त्याला दिसलें व शुभ्र राजवाड्याचा एक भाग ढासळून पडला असें तिसरें स्वप्न त्यानें पाहिलें."

सकाळीं उठल्यानंतर सभेंत रामचंद्रासह बसून सर्वांना तीं स्वप्नें त्यानें सांगितलीं. पुरोहितानें त्या स्वप्नांचा असा अभिप्राय सांगितला— वडाचें झाड हत्तीनें मोडून टाकिलें याचें फल लक्ष्मण असाध्य रोगानें त्रस्त होईल, राहुग्रस्त सूर्य पाताळांत गेला याचें फल भोग्यपदार्थांचा नाश होईल व लक्ष्मणाला मृत्यु प्राप्त होईल. राजवाड्याचा एक भाग ढासळला याचें फळ रामचंद्र दीक्षा घेऊन वनांत निघून जातील. हीं फलें ऐकून रामाचें मन खिन्न झालें नाहीं पण त्यानें इहपरलोकीं हित व्हावें म्हणून दयार्द्र होऊन प्रजाजनांनीं हिंसा करू नये अशी राज्यांत घोषणा केली. शांतिपूजा करून मोठा जिनाभिषेक केला. जो जी मागेल ती वस्तु त्यानें दीनजनांना दिली.

लक्ष्मणाला असाध्य रोग होऊन तो फाल्गुन अमावस्येच्या दिवशीं मरण पावला व चौथ्या नरकांत उत्पन्न झाला.

लक्ष्मणमरणानें रामचंद्र फार दुःखी झाले पण ज्ञानानें शोक बाजूला करून त्यांनीं त्याचा शरीरसंस्कार केला व सर्व अन्तःपुरांतील स्त्रियांचा आपल्या प्रसन्नवाणीनें शोक नाहींसा केल्यानंतर लक्ष्मणाच्या पृथ्वीसुंदर या पुत्राला त्यांनीं राज्य दिलें.

सीतेला विजयराम वगैरे आठ पुत्र होते. त्यापैकीं ज्येष्ठ सात पुत्रांनीं राज्यलक्ष्मी आम्हाला नको असें सांगितलें. तेव्हां आठव्या अजितंजय पुत्राला रामचंद्रानीं युवराजपद व मिथिलेचें राज्य दिलें.

शिवगुप्तकेवलीजवळ जाऊन रामचंद्रांनीं दीक्षा घेतली व त्यांच्याबरोबरच सुग्रीव, अणुमान्, बिभीषण आदि पांचशे राजांनीं व १८० रामपुत्रांनीही दीक्षा घेतली. त्याचवेळीं सीतादेवी, पृथ्वीसुन्दरी आदिक राण्यांनींही श्रुतवतीनामक आर्यिकेजवळ दीक्षा घेतली. व त्या तपश्चरणानें अच्युतादिस्वर्गांत देव झाल्या.

पृथ्वीसुन्दर राजा व अजितंजय युवराजांनीं शिवगुप्तकेवलींना वन्दून श्रावक व्रतें घेतलीं व ते आपल्या नगरांत आले.

रामचन्द्र व अणुमान् हे मुनिवर्य तपश्चरणानें श्रुतकेवली झाले. बाकीचे मुनीही बुद्धिऋद्धि आदिक ऋद्धींनीं शोभू लागले.

तीनशें पंचाण्णव वर्षें रामचंद्रांनीं तपश्चरण केलें व त्यांना घातिकर्मनाशानें केवलज्ञान झालें. नंतर त्यांनीं सहाशे वर्षें विहार करून धर्मोपदेश केला. व सम्मेद

शिखरावर फाल्गुन शुक्ल चतुर्दशीच्या दिवशीं प्रातःकालीं अणुमान् आदि मुनिजनासह मुक्त झाले.

बिभीषणादिक मुनिराज अनुदिश विमानांत अहमिंद्र झाले. लक्ष्मण नरकांतील आयुष्य संपल्यावर क्रमानें संयम धारण करून मुक्त होईल.

याप्रमाणें गुणभद्राचार्यांनीं रामचन्द्रादिकांचें चरित्र लिहिलें आहे, तें वीरसेन, जिनसेन आदिक आचार्यपरंपरेंत जसें चालत आलें होतें तसें त्यांनीं वर्णिलें आहे.

श्रीपुष्पदंत महाकवीनें अपभ्रंशभाषेंत महापुराण रचिलें आहे. तें जिनसेन व गुणभद्र यांच्या महापुराणाच्या आश्रयानें लिहिलें असल्यामुळें वरील रामायणाच्या कथेचाच अवलंब त्यानें केला आहे.

श्री. पं. आशाधरकवींनीं 'त्रिषष्टिस्मृतिशास्त्र' हा ग्रंथ विक्रमसंवत् १२९२ मध्यें नलकच्छ (नालछा) नगरांतील नेमिनाथ जिनमंदिरांत रचून पूर्ण केला आहे. या ग्रंथांत वृषभादि २४ तीर्थंकर, भरतादि बारा चक्रवर्ती, नऊ नारायण, नऊ प्रतिनारायण व नऊ बलभद्र, अशा त्रेसष्ट महापुरुषांचीं चरित्रें सुमारें पांचशें–सहाशें श्लोकांत रचिलीं आहेत.

पं. आशाधरांनीं या दोन्ही रामकथांना प्रमाण मानिलें आहे. दोनही आचार्यपरम्परा प्रामाणिक आहेत म्हणून दोनही कथांचा संग्रह करणें योग्य आहे.

चारित्रसाराचे कर्ते श्री चामुण्डराय यांनीं कानडी भाषेंत चामुण्डराय पुराण लिहिलें आहे. त्यांतील रामकथा गुणभद्राचार्यांनीं सांगितलेल्या रामायणाचें अनुसरण करिते. या प्रमाणें गुणभद्राचार्य कृत रामायणांचा सारांशही आम्ही येथें थोडक्यात सांगितला आहे.

हें रामायण वीरसंवत् २४८६ मध्यें पूर्ण झालें व नंतर हें येथील श्रीमान् दानवीर रावजी सखाराम दोशी निर्मित श्रीमहावीर जिनालयांत कांहीं अल्पश्रोत्यांच्या आग्रहानें मीं फक्त रविवारीं दोनप्रहरीं एक तास पर्यन्त वाचित होतों. ही वार्ता स्व. दानवीर रावजी सखाराम दोशी यांच्या धर्मपत्नी श्रीराजुबाई यांच्या कानीं गेल्यावर त्यांनीं आपल्या वाड्यांत चातुर्मासांत दररोज दोनप्रहरीं वाचलें जावें अशी व्यवस्था केली. त्यामुळें स्थानीय श्रावक-श्राविका बहुसंख्येनें भक्तीनें श्रवणास येत असत.

लोकांना रामकथा आवडू लागली. व रावण, बिभीषण, सुग्रीव हनुमान, वगैरे महापुरुष हे राक्षस-वानर वगैरे नसून महान् पुण्यशाली जिनधार्मिक सर्व होते. उज्ज्वल–चारित्री होते इत्यादिक तत्सम्बन्धी पुण्यकथांचें श्रवण होऊन सर्व

श्रावक-श्राविकांच्या मनांत हा ग्रंथ मुद्रित होऊन प्रसिद्ध झाला तर मराठी जैन साहित्यांत मोठी भर तर पडेलच पण सर्व बृहन्महाराष्ट्र जैनजनतेमध्यें त्याचा स्वाध्याय होऊन प्रचारही होईल. असा कांहीं प्रसिद्ध श्रोत्यामध्यें विचार उत्पन्न झाला. त्या श्रोतृगणांत दानवीर धर्ममूर्ति श्री. राजुबाई सखाराम दोशी, श्री. रतनचंद सखाराम शहा, श्री. नानचंद हिराचंद शहा, श्री. फुलचंद हिराचंद शहा, श्री. श्रीपाल नेमिनाथ वैद्य आदि मुख्य श्रोते आहेत. त्यांनीं आपलें दान कथावाचन झाल्यानंतर उद्घोषित केलें व तद्विषयक प्रेरणा स्थानीय सर्व श्रावक-श्राविकामध्येंही उत्पन्न झाली व प्रथम दिनींच अडीच-तीन हजाराचें दान सांगितले गेलें.

रामायणसमितीचे सेक्रेटरी श्री. ना. हि. शाह व श्री. फुलचंद हिराचंद शाह यांनीं मोहोळ, कुर्डुवाडी, पंढरपूर, बार्शी, दुधनी, गुलबर्गा, निमगांव केतकी, अकलूज, नातेपुते, फलटण आदि अनेक स्थानीं जाऊन अनेक दात्याकडून दान मिळविलें व याविषयीं त्यांनीं मनःपूर्वक अपार परिश्रम केले म्हणून मी त्यांचें मनःपूर्वक आभार मानतो.

याचप्रमाणें श्री. फुलचंद हिराचंद शाह यांचे सुपुत्र श्री. प्रकाशचंद्र शाह मे. वर्धमान छापखान्याचे मालक यांनीं या रामायणाचे विशाल दोन भाग अतिशय सुबकरीतीनें व आत्मीयतेनें छापून दिले याबद्दल रामायण-समिति व ग्रंथकार अतिशय आभारी आहोत.

स्थानीय व अनेक गावांच्या दातृवर्गानें या ग्रंथाबद्दल आदर व्यक्त करून उचित-दान दिलें म्हणून हा ग्रंथ आज त्यांच्या करकमलांत देण्यास रामायण-समितीला अत्यानन्द होत आहे.

हा समग्र ग्रंथ ' श्री गिरीश ' कविवर्यांनी वाचला व त्यावर रसग्रहण विस्तृतसें त्यांनीं लिहिलें. तेंही या ग्रंथाच्या प्रारंभीं जोडलें आहे. पुष्पांतील मकरन्द जसा भुंगा ग्रहण करितो तसेंच हें रामायणांतील रसग्रहण कविवर्यांनीं अतिशय उत्तम-रीतीनें केलें आहे. यामुळें ग्रंथकाराला व रामायण समितीला आनंद होत आहे व हे उभयता त्यांचे अतिशय आभारी आहेत.

शेवटीं सुज्ञ पाठकवर्गाला नम्रतेनें विनंती आहे कीं त्यांनीं हा ग्रंथ वाचून त्यांत अनवधानतेनें व अज्ञानपणानें कांहीं दोष, प्रमाद राहिले असतील ते दाखविण्याची कृपा करावी.

आपले नम्र

**ग्रंथकार व रामायण समिति**

# पं. जिनदासशास्त्री फडकुले :
# व्यक्ति आणि साहित्य

पं. जिनदासशास्त्री फडकुले यांनी गेली चार तपे जैन साहित्य व जैन समाज यांची आत्यंतिक निष्ठेने सेवा केली. जैन तत्त्वज्ञान व धर्म यावरील अविचल भक्ति, साहित्याच्या व्यासंगात सदैव रममाण होणारी मनोवृत्ति, संसारातल्या सुखदुःखांकडे, लाभहानीकडे समानतेने व सहिष्णुतेने पहाण्याची दृष्टि इत्यादि अनेकविध स्वभाववैशिष्ट्यांचे आश्चर्य वाटते. पण ज्या परिस्थितीत व ज्या कुलपरंपरेत त्यांच्या मनावर, बुद्धीवर संस्कार झाले त्यांचा विचार केल्यास आश्चर्य वाटत नाही. पं. फडकुले यांचे पिताजी पं. पार्श्वनाथ गोपाळ फडकुले व आजोबा पं. गोपाळ गोविंद फडकुले यांच्यापासून किंबहुना पणजोबा श्री. गोविंद फडकुले यांच्यापासून धर्म व साहित्य यांच्या सेवेची परंपरा या घराण्यांत चालू असलेली दिसते. प्रत्येक पिढीने या पवित्र परंपरेची कास धरून ती अधिक जोमदार व सकस करण्याचा प्रयत्न केला. पं. जिनदासशास्त्री यांच्या व्यक्तित्त्वाचा व कर्तृत्त्वाचा विचार करताना ते ज्या परंपरेचे प्रतिनिधि आहेत व ज्यांच्या शुद्ध धार्मिक संस्कारांतून त्यांच्या मनाची विशिष्ट घडण झाली त्यांचा विचार करणे आवश्यक आहे.

## श्री. गोपाळशास्त्री

श्री. गोपाळराव शास्त्री फडकुले वयाच्या अठराव्या वर्षी हुमनाबाद हे आपले मूळ गांव सोडून सोलापूरला आले. सोलापुरांत आपल्या कर्तृत्वाला संधि मिळेल असे त्यांना वाटले असावे. जैन ग्रंथ त्यावेळी मुद्रित स्वरूपात उपलब्ध नव्हते. मूळ ग्रंथावरून हस्तलिखित प्रत तयार करण्याचे काम ते करीत असत. गोपाळराव शास्त्री हे संस्कृतज्ञ असून, मूळ ग्रंथातील आशय उत्तम समजून घेऊन शुद्ध भाषेत त्याच्या प्रति तयार करीत. त्यानी तयार केलेल्या ग्रंथात त्यांच्या ठायी असलेल्या विद्वत्तेमुळे व संशोधनवृत्तीमुळे चुका नसत. सोलापुरातील थोरल्या आदिनाथ मंदिरांत आज जो हस्तलिखित ग्रंथांचा संग्रह आहे त्यांतील पुष्कळ ग्रंथांचे लेखन श्री. गोपाळशास्त्री यांनी केलेले आहे. मंदिरांत ग्रंथांवर रसाळ प्रवचनें करण्याचेही कार्य अनेक वर्षे त्यानी केले. 'द्रव्यसंग्रह' हा गाथार्टीकाग्रंथ त्यानी लिहिला असून तो विद्वन्मान्य आहे.

## पं. पार्श्वनाथशास्त्री फडकुले

श्री. गोपाळशास्त्री यांचे सुपुत्र पं. पार्श्वनाथशास्त्री यांचे संस्कृत व धार्मिक अध्ययन श्री. गोपाळशास्त्री यांच्या नेतृत्वाखाली झाले. सोलापुरच्या ऐ. प. जैन पाठशाळेंत त्यानी आपले शिक्षण पूर्ण केले व त्याच शाळेंत संस्कृत व धर्म या विषयांच्या अध्यापनांत त्यानी चाळीस वर्षे वेचली. संस्कृतावरील प्रभुत्व, जैन-शास्त्रांचे सूक्ष्म अध्ययन, कुशाग्र बुद्धिमत्ता, सज्जनता व धर्मपरायणवृत्ति यामुळे त्यांचा लौकिक समाजात सर्वत्र पसरला. पं. पासोबाशास्त्री या नांवाने ते सर्वत्र परिचित झाले. काव्यरचना हा त्यांचा एक आवडता छंद. त्यांनी कित्येक कविता अशा केल्या की त्यांत काव्याबरोबरच गेयताही आहे. त्यांच्या काव्याचा एक संग्रह त्या काळांत विशेष प्रसिद्धि पावला होता.

पं. पार्श्वनाथ फडकुले शास्त्री यांनी जैन पाठशाळेंत चाळीस वर्षे अध्यापन केले हा उल्लेख वर आलाच आहे. या कालावधींत त्यानी शेकडों विद्यार्थ्यांवर ज्ञानाचे, धर्मभावनेचे, शुद्ध आचरणाचे उच्च संस्कार केले. त्यांच्यापासून प्रेरणा व संस्कार घेतलेल्या विद्यार्थ्यांनी महाराष्ट्रांत धर्मशास्त्राच्या अध्ययनाची परंपरा निर्माण केली. पाठशाळांच्या स्थापना झाल्या. जैन तत्वज्ञानाचा सर्वांगीण अभ्यास करून भारतीय संस्कृतीचा तो कसा महान् आधारस्तंभ आहे हे मत प्रस्थापित करण्याची जबरदस्त उर्मी ज्यांच्या प्रतिभेने व उत्तेजनाने जैन समाजांत उचंबळली त्यांत पं. पार्श्वनाथ फडकुले शास्त्री यांची गणना अवश्य करावी लागेल. स्व. शेठ हिराचंद नेमचंद दोशी यांनी याच हेतूने जैन पाठशाळेची सोलापुरांत प्रतिष्ठापना केली होती. त्यांनीही जैन समाज जागृत करण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. पं. पार्श्वनाथशास्त्री यांची रहाणी अत्यंत साधी पण वृत्ति ध्येयवादी होती. जीवनांत त्यांनी व्यावहारिकतेला, स्वार्थाला कधीच अवसर दिला नाही. अध्ययन आणि अध्यापन यातच आपले समग्र आयुष्य ब्रसवणाऱ्या या ध्येयरत पंडिताच्या प्रत्यक्ष मार्गदर्शनातून व त्यांच्या संस्कारातून पं. जिनदासशास्त्री यांच्या मनाचा पिंड घडत गेला. गेल्या दोन पिढ्यांचे उन्नत गुण व धार्मिक संस्कार यांचा वारसा घेऊनच पं. जिनदासजी इ. स. १८९४ मध्ये जन्माला आले. घरांतल्या व आजु-बाजूच्या वातावरणातून त्यांच्या व्यक्तित्वाचा विकास होत गेला.

## पं. जिनदासशास्त्री

पं. जिनदासजी हे पं. पार्श्वनाथशास्त्री यांचे पहिले चिरंजीव. जयकुमार नावाच्या त्यांच्या धाकट्या भावाचा वयाच्या पंधराव्या वर्षीच दुर्दैवाने अंत झाला.

त्यांची धाकटी बहीण गजराबाई यांच्या वाट्यालाही संसारसौख्य फारसे आले नाहीं. तथापि घरांतील धार्मिक वातावरणांत व वडिलांच्या आणि बंधूच्या शिकवणीने त्यांचा काळ धर्माचरणांत जात आहे. पंडितजीना कुटुंबसुख विशेष लाभले नाहीं. सांपत्तिक परिस्थिति समाधानकारक आहे अशी अवस्था कधीच आली नाही पण त्यांच्या मनःशांतीला केव्हांही तडा गेला आहे, ते असंतुष्ट आहेत असले दृश्य कुणालाही आजपर्यंत दिसले नाही. शान्त, संयमी व सुजन स्वभावामुळे परिस्थिती-विरुद्ध किंवा कोणत्याही व्यक्तिप्रवृत्तीविरुद्ध असमाधानाने, कषायीवृत्तीने त्यांनी कधीही झगडा केला नाही. त्यांच्या संयमी व अतिशांत स्वभावाचे आश्चर्य वाटावे इतका हा स्वभाव त्यांच्या व्यक्तित्वाशी निगडित आहे. ‘ अजातशत्रु ’ ही उपाधि त्यांना यथार्थपणे साजून दिसेल.

## शिक्षण

श्री ऐलक पन्नालाल जैन पाठशाळेत त्यांचे प्राथमिक व इंग्रजी पाच इयत्ता पर्यंतचे शिक्षण झाले. संस्कृत भाषेचा व साहित्याचा अभ्यास वडिलाजवळ सुरूच होता. जैन साहित्यांतील काही श्रेष्ठ ग्रंथांचा अभ्यास त्यांनी वडिलांच्या नेतृत्वा-खालीच केला. लहानपणापासूनच संस्कृत अध्ययनाविषयी त्यांच्या मनांत जी अभि-रुचि निर्माण झाली त्यामुळेच पंडितजींच्या लेखणीला व वाणीला संस्कृतापासून मिळालेले अभिजात माधुर्य व सामर्थ्य प्राप्त झालेले दिसते. न्याय, व्याकरण व साहित्य या विषयांचें शिक्षण पं. वंशीधरजी यांच्याजवळ त्यांनी केले. पं. वंशीधरजीनी कांही कारणानी जैन पाठशाळेतील अध्यापन कार्य सोडून दिल्यावर पं. जिनदासशास्त्री हे मध्यप्रदेशातील मोरेना या गांवी असलेल्या जैन सिद्धांत विद्यालयांत त्यावेळचे प्रसिद्ध प्रकांडपंडित गोपालदासजी बरैया यांच्याजवळ अध्ययनासाठी गेले. आप्त-परीक्षा, गोम्मटसार, अष्टसहस्री, प्रमेयकमलमार्तंड इत्यादि जैन तत्त्वज्ञान व न्यायग्रंथांचा तेथे त्यांनी सर्वांगीण अभ्यास केला. या अध्ययनामुळे न्यायविषयांत त्यानी विशेष प्रगति केली. सन १९१९ मध्ये बंगाल संस्कृत असोसिएशनच्या ‘ न्यायतीर्थ ’ या उच्च परीक्षेत त्यानी उत्तम यश मिळवले.

इ. स. १९१९ ला लौकिक अर्थाने शिक्षण संपले खरे, पण साहित्याचा व तदनुषंगी विषयांचा जन्मभर व्यासंग चालूच राहिला. विद्येचे त्याना लागलेले व्यसन इतके जबरदस्त आहे की कोणत्याही व्यावहारिक, सांसारिक आपत्तीमुळे त्यांच्या दैनंदिन अध्ययनांत व अध्यापनांत खंड पडलेला नाही. ऐ. प. जैन

पाठशाळेत १९३९ पर्यंत संस्कृत व धर्मविषयाचे शिक्षण त्यानी निष्ठेने व सातत्याने दिले. वीस वर्षांच्या या अवधीत किती विद्यार्थ्यांवर त्यांनी आपल्या विद्येचे व ध्येयवादित्वाचे संस्कार करण्याचा निरलस प्रयत्न केला याची गणति करणे केवळ अशक्य होय. सोलापुरांत राजुल्बाई श्राविकाश्रमाची स्थापना होईपर्यंत व नंतरही पंडितजीनी स्त्रियांना धर्मशिक्षण दिले. बरोबर जाऊन त्यांना शिक्षण देणारा पंडित अभावानेच आढळतो. आजच्या जैन समाजात आढळणारी धर्माभिरुचि, तत्त्व-ज्ञानाच्या अभ्यासाकडे कल असणारी जी माणसे दिसतात यांचे श्रेय पंडितजींच्या अखंड ज्ञानसाधनेला व ज्ञानप्रसरणाच्या वृत्तीला दिल्यास त्यात अतिशयोक्ति होणार नाही. कित्येक क्षुल्लक, ऐलक, आर्यिका, ब्रह्मचारी, त्यागी व्यक्ति यांना धर्माचे शिक्षण निरपेक्ष बुद्धीने देण्यात व त्यापासून मिळणाऱ्या सात्त्विक समा-धानाचा आस्वाद घेण्यांत त्यांच्या आयुष्याचा फार मोठा काळ व्यतीत झाला आहे, होत आहे.

पंडितजींच्या ज्ञानसंपन्न क्रियाशील, सात्विक व्यक्तित्वाची कीर्ति महाराष्ट्रांत व इतरत्र पसरली. त्यांच्या रसपूर्ण व विचारप्रवर्तक प्रवचनांचा लाभ घेण्यासाठी अनेक ठिकाणाहून त्याना आग्रह होऊ लागला. पंडितजींच्या प्रवचनांचा सर्वत्र पाऊस पडू लागला. महाराष्ट्रांत केवळ आपल्या वक्तृत्वाने फड जिंकणारे पंडित झाले असतील पण वक्तृत्वापेक्षाही शास्त्रनिष्ठा व आशयानुगामी शब्द आणि धर्मावरील अत्युत्कट भक्ति, जिनवाणीसंबंधीची प्रगाढ निष्ठा, यामुळे पंडितीजींच्या प्रवचनांचा, व्याख्यानांचा परिणाम समाजमनावर अधिक खोल व अधिक दृढ झाला यात संशय नाही. अनेकविध शास्त्रे मुखोद्गत असल्यामुळे कधीही कोणताही संदर्भ वा उल्लेख त्यांना अडला नाही. आज तरी जैनधर्म, साहित्य व शास्त्र यांच्या-संबंधीचा चालता बोलता 'जिवंत ज्ञानकोश' अशी संज्ञा त्यांना दिल्यास ती सर्वमान्य होऊ शकेल. संस्कृत वाङ्मयाच्या अहर्निश व्यासंगाने त्यांची भाषा मधुर व प्रौढ झाली. पल्लेदार स्मरणशक्ति, विस्तृत पाठांतर व सतत लेखनाचा निदिध्यास यामुळे त्यांच्या लेखनशैलीलाही एक प्रकारचा कसदारपणा लाभलेला दिसतो. न्याय व व्याकरण यासारख्या रूक्ष विषयांचा अभ्यास करूनही त्यांच्या मनाला असलेले अभिजात रसिकतेचे, काव्यात्मकतेचे अधिष्ठान यत्किंचितही ढळलेले नाही. संस्कृत काव्यनाटकांचे अध्ययन करण्यासाठी त्यांच्यापाशी जे विद्यार्थी येतात त्यांना पंडित-जींच्या काव्यप्रिय मनोवृत्तीचे नेहमीच रुचिर दर्शन होते. 'धर्मशर्माभ्युदयासारखा' श्लेषांनी ओतप्रोत भरलेला ग्रंथ त्यांच्या मुखातून ऐकत असताना त्यांच्याठायी

विद्वत्व, कवित्व आणि रसिकत्व कसे एकत्रित आले आहे व त्यांच्या त्रिवेणीसंगमातून पंडितजींच्या व्यक्तिमत्त्वाला कसा बहारीचा रंग आला आहे याची जाणीव होते. संस्कृतातून अस्खलित व अचूक वक्तृत्व करणाऱ्या महाराष्ट्रातल्या थोडक्या विद्वानांत त्यांना मानाचे स्थान आहे. तथापि प्रसिद्धीपासून सदैव चार पावले दूर रहाण्याच्या व स्वतःशीच धर्म, साहित्य यांच्या चिंतनात गर्क राहण्याच्या वृत्तीमुळे महाराष्ट्रांत त्यांचा बोलबाला झाला नाही. तो व्हावा म्हणून ज्या खटपटी कराव्या लागतात, भोवताली भगतगणांचा मेळावा ज्या मुत्सद्दीपणाने जमवावा लागतो, प्रसिद्धीला आवश्यक अशी जी 'साधने' गोळा करावी लागतात. त्यासंबंधी संपूर्ण अज्ञान त्यांच्याठायी असल्यामुळे त्यांची माहिती थोड्यांना आहे; व जी आहे ती फार थोडी आहे. पण म्हणून त्यांची मानसिक शांति कधी ढळल्याचे दृश्य दिसले नाही. मुखावरील सत्त्वगंभीर भाव कधीच बदलला नाही.

## संपादक

स्व. हिराचंद नेमचंद दोशी यांनी सुमारें पाउणशे वर्षांपूर्वी स्थापन केलेल्या 'जैनबोधक'. या नियतकालिकाचे संपादन पं. जिनदासजीनी सुमारें पस्तीस वर्षांपेक्षा अधिक काळपर्यंत केलें. इ. स. १९१९ नंतर स्व. धर्मवीर रावजी सखाराम दोशी यांनी संपादनाची प्रमुख जबाबदारी स्वीकारली. त्यांना संपादक या नात्याने सहाय्य करतांना पंडितजीनी जैनबोधकाची व जैन समाजाची जी सेवा केली आहे तिला खरोखर तुलना नाही. 'जैनबोधक' एकेकाळी समाजाचे मुखपत्र होते. जनतेच्या धार्मिक व सामाजिक जीवनाशी या पत्राचा अत्यंत जिव्हाळ्याचा संबंध असायचा. पंडितजीनी गेल्या चाळीस वर्षांत 'जैनबोधकांतून' जे विपुल व विविध मौलिक लेखन केले ते पुस्तकरूपाने प्रसिद्ध केले तर ते कित्येक सहस्रपृष्ठांचे भरेल. त्यांची लेखणी चाळीस वर्षे सदैव जोमाने अनेक धर्मविषयक प्रश्नांचा सूक्ष्मग्राही बुद्धीने वेध घेत राहिली. 'जैनबोधकाच्या' इतिहासांत जे थोर संपादक झाले त्यांत पंडितजींना महत्त्वाचे स्थान द्यावे लागेल याविषयी दुमत होण्याचे कारण नाही. जैनबोधकांत असंख्य अग्रलेख, स्फुट लेख व कविता आणि इतर प्रासंगिक लेखन त्यांनी केले आहे. हा सारा कार्याचा भार पूर्णपणे सेवाबुद्धीने, धर्मदृष्टीने उचललेला पाहून आश्चर्य वाटते. एका पैचीही त्यानी संपादक व लेखक या नात्याने अपेक्षा केली नाही. स्व. धर्मवीर रावजी सखाराम दोशी यांच्या प्रोत्साहनामुळे व त्यांच्याविषयी वाटत असलेल्या आत्मीयतेने 'जैनबोधकाला' चाळीस वर्षे सतत नवनवीन विविध रंगरूप त्यांनी आणून दिले. स्व. धर्मवीर रावजी सखाराम दोशी व त्यांच्या धर्मपत्नी

श्रीमती राजुबाई दोशी या उभयतांच्या धर्मप्रेमामुळे, सत्त्वसंपन्न वृत्तीमुळे पंडितजीना त्यांच्यासंबंधीच नेहमीच निरतिशय आदर वाटत आलेला आहे. 'जैनबोधक' हे स्व. रा. स. दोशी यांचे स्मारक पत्र असल्यामुळे या पत्राच्या अभिवृद्धिसाठीं आपली प्रतिभा व तपस्या पंडितजीनी निष्ठेने वेचली. जैनेतर समाजांत पंडितजीच्या उंचीइतके संपादक हाताच्या बोटावर मोजण्याइतके आढळू शकतात पण जैन समाजांत मात्र जी दोन तीन नावें लक्षांत येतात त्यांत पंडितजीना अवश्यमेव स्थान आहे.

## सहिष्णु टीकाकार

संपादक व धर्मशास्त्रवेत्ता या नात्याने कित्येकवेळा समाजातल्या अनिष्ट व धर्मबाह्य रूढीवर त्याना प्रहार करावे लागले. पण प्रहार करतानाही तो सर्वथैव सहिष्णुतेने व सुजनतेनेच केला. ज्या व्यक्तीवर प्रसंगविशेषी टीका टिप्पणी करावी लागली त्या व्यक्तींच्या संबंधी कसलाही आकस किंवा मत्सरभाव न ठेवता प्रांजलपणे केवळ धर्मकर्तव्य म्हणूनच त्यांनी टीका केली. त्यांनी लिहिलेल्या अनेक टीका-लेखांतून वैयक्तिक निंदानालस्तीचे अथवा असहिष्णुतेचे एकही अक्षर काढून दाख-विणें अशक्य आहे. टीका इतक्या सुजनपणे करता येणें हा आजच्या युगातला एक अलौकिक चमत्कार म्हटला पाहिजे. त्यांच्या टीकालेखांचे स्वरूप सौम्य व सहिष्णु असूनही तात्त्विकदृष्ट्या मात्र त्यांत कडवेपणा दिसून येतो. आगमाच्या विरुद्ध लेखन करणारी किंवा बोलणारी व्यक्ति कोणत्याही पदवीची वा प्रतिष्ठेची असली तरीही तिचा मुलाहिजा त्यांनी कधीच ठेवलेला नाही. जिनवाणीवरील अदम्य निष्ठा व त्या निष्ठेच्या मुळाशी असणारी तर्कबुद्धि यांमुळे त्यांच्या टीका लेखांनाही एक प्रकारचे सात्त्विक तेज आलेले दिसते. कांही काळ त्यांच्या मतांशी विरोध असणाऱ्या व्यक्तींनी त्यांचा उपहास केला असला तरी त्यांच्याविषयी खाजगी बैठकींत अथवा लेखनातून व्याख्यानांतून एकही अनुचित उद्गार त्यांनी काढू नये हे काहीसे मनुष्यस्वभावाच्या विरुद्ध वाटते. पण ते एक निरपवाद सत्य आहे.

पंडितजींच्या मनःपिंडावर कोणत्या प्रकारचे संस्कार झाले व जीवनाकडे ते कशा तत्त्वप्रधान दृष्टिकोनातून पाहू लागले याची कल्पना आतापर्यंत जे विवरण केले त्यावरून आली असेल. आयुष्य हे क्रीडांगण आहे. नानाविध उपभोगांचा रसिकतेने आस्वाद घेत रहाण्यापलीकडे कार्य नाही असला उथळ, एकांगी विचार पंडितजीना कधीच मानवला नाही. जीवनाकडे भोगवादी वृत्तीने त्यानी कधीच

पाहिले नाही. किंवा खरे सांगायचे तर भौतिकसुखांची साधने त्यांना फारशी आकृष्ट करू शकली नाहीत. आसक्त अंतःकरणाने ते संसारात वावरत नाहीत. एक प्रकारचा विरक्तीचा भाव त्यांच्यात आढळून येतो. साहित्यातील विविध रसांचा खेळ पहातांना शान्त, करुण या रसाकडे ते अधिकांशाने ओढले जातात. जेथे तात्त्विक भाग येतो त्यांत ते विशेषत्वाने रममाण होतात. तत्त्वचिंतनात त्यांना विलक्षण गोडी वाटत असल्यामुळे जीवनाच्या, साहित्याच्या बाह्यस्वरूपाकडे कांटेकोरपणे लक्ष दिले पाहिजे असे त्यांना कधीच वाटत नाही. सुमारे चार वर्षांपूर्वी दुःसाध्य आजाराने रुग्णालयांत ते पडले होते. एक मोठी शस्त्रक्रिया शरीरावर झाली होती. असंख्य इंजेक्शने डॉक्टर देत होते. पण केवळ तत्त्वचिंतनात गढलेल्या त्यांच्या मनाने दुःखाचा, वेदनेचा एकही सुस्कारा सोडला नाही. तीन महिन्यांच्या असाध्य आजारात धर्मविचाराशिवाय कसलाही इतर व्यवहारी, संसारी विचार त्यांच्या मनांत येऊ नये याचे सर्वांनाच फार आश्चर्य वाटले. पण लहानपणापासून त्यांच्या मनाची घडण, विचारांची वाढ कशी झाली हे लक्षांत घेता आश्चर्य वाटू नये.

## पंडितजींची साहित्यनिर्मिती

करूनिया काव्य जनांत आणणे ।
न मुख्य हा हेतु तदीय मी म्हणे ।।
करूनि तें दंग मनांत गुंगणें ।
तदीय हा सुंदर हेतु मी म्हणे ।।

— केशवसुत.

पंडितजींच्या साहित्यनिर्मितीमागील प्रेरणा केशवसुतांनीं वर्णिल्याप्रमाणे 'सौंदर्यवादी' नसली तरी 'करूनि तें दंग मनांत गुंगणें' ही निश्चितच आहे. आपल्या साहित्याचें प्रसरण व प्रकाशन होते आहे की नाही याची कदर न करता साहित्याच्या निर्मितीत व निर्मित साहित्याच्या चिंतनांत, मननांत ते सदैव गुंगलेले आहेत असेच दृश्य कुणालाही दिसेल. 'कुणी प्रकाशक भेटला तर पाहू' हे आपल्या लेखनासंबंधीचे त्यांचे उद्गार त्यांच्या प्रसिद्धिविन्मुखतेला साजेलसेच आहेत. पण धर्मवीर रावजी सखाराम दोशी यांनी पंडितजींच्या लेखनसामर्थ्याची जाणीव ठेवून त्यांना सतत उत्तेजन दिले व त्यांच्या प्रोत्साहनाने पंडितजी लेखन करीत राहिले. लोकजागृतीसाठी, जैन साहित्याची महती जैनांनाही कळावी, धर्माचे रहस्य समजावे हे सर्व हेतु त्यांच्या वाङ्मयाच्या मुळाशी असूनही वाङ्मय

निर्मिती या निःस्वार्थ शुद्ध आनंदाचा आस्वाद घ्यावा व श्रेष्ठ वाङ्मयाच्या सहवासात अखंड रहावे हा माझ्या मते त्यांच्या लेखनाचा मूळ हेतु असला पाहिजे. पण ते कसेही असो गेली चाळीस पंचेचाळीस वर्षे सातत्याने लेखन करीत आहेत हे निर्विवाद.

गुणसंपन्न व विपुल लेखन करूनही पं. फडकुलेशास्त्री हे नाव महाराष्ट्राला-बुद्धीवादी महाराष्ट्राला अपरिचित राहिले. जैन धर्माच्या व परंपरेच्या कक्षेबाहेर जाऊन त्यानी लेखन केले नाही हेच याचे कारण. पण कोणत्याही धर्माच्या वा संप्रदायाच्या पठडीतले हे साहित्य असले तरी त्यांतील उज्ज्वल कलागुण व श्रेष्ठ जीवनविषयक विचार यांचे मोल, महत्त्व जाणून घेण्याच्या दृष्टीने जैनेतर विद्वानांनी, साहित्यरसिकांनी फारसे प्रयत्न केले नाहीत. वारकरी, महानुभाव या संप्रदायातील वाङ्मयाचा अभ्यास जसा साक्षेपपूर्वक केला जातो तसाच जैन वाङ्मयातील तत्त्वदृष्टि व सौंदर्यसृष्टि यांचेही रसग्रहण निकोपमनाने. पूर्वग्रहरहितदृष्टीने केले जावे ही अपेक्षा आहे. मराठी साहित्याच्या अभिवृद्धीसाठी महाराष्ट्रांतल्या सर्वच संप्रदायानी प्रयत्न केले आहेत या सत्याचे विस्मरण अभिनिवेशाच्या भरांत होऊ नये. जैन धर्म व त्याची विशिष्ट विचारसरणी याचे संस्कार महाराष्ट्रातल्या भागवत, महानुभाव, नाथ इ. पंथाच्या तत्त्वज्ञानावर व आचारधर्मावर झाले आहेत. जैन मराठी वाङ्मयाचे रसग्रहण करतांना, त्यांतील सौंदर्यस्थळांचा शोध घेताना त्याचे 'जैनत्व' आड येऊ नये.

पं. फडकुले यांच्या विपुल व विविध साहित्याची ओळख करून देताना जे विचार मनांत उद्भवले त्यांचा हा संक्षेपाने प्रपंच केला. आधुनिक काळात इतकी प्रचंड ग्रंथरचना करणारे लेखक आढळत नाहीत. त्यांची स्वतंत्र रचना फार नसली तरी त्यानी संस्कृत व प्राकृत ग्रंथांच्या आधाराने अनुवादित अशी रूपांतरित पुष्कळ रचना केली आहे. अनुवादात व रूपांतरातही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची प्रतीति येऊ शकते. कित्येकवेळा स्वतंत्र रचना करणे लेखकाला सुलभ जाते. पण मूळ ग्रंथाचा संक्षेप करून किंवा त्याचा आधार घेऊन त्यांतील विशेषांचा आपल्या लेखणीतून सुयोग्य आविष्कार करणे हे अत्यंत त्रासदायक काम असते. तथापि अनुवाद व रूपांतर यांच्या कुशलतेची परिसीमा पंडितजींच्या लेखनांत झालेली आढळते. कित्येकस्थळी तर त्यांच्या रूपांतराला मूळ वाङ्मयापेक्षाही स्वतंत्र व सरस दर्जा प्राप्त झालेला दिसतो.

## आजचा अग्रगण्य पंडित कवि

मूळ काव्यातील अर्थवत्ता अनुवादातून प्रकट झाली तरच अनुवाद यशस्वी होऊ शकतो. केवळ शब्दाला प्रतिशब्द देणे हे पंडिताचे काम. पण मूळ कृतीशी व कवीशी रसिकांच्या भूमिकेवरून समरसता साधून त्या कृतीतील गुणवैशिष्ट्यें टिपून व कवीच्या व्यक्तिमत्त्वाशी मैत्री करून, किंबहुना एकजीव होऊनच अनुवाद करावा लागतो. उच्च कोटीचे कवित्व अनुवादकाजवळ असल्याशिवाय अनुवाद रसमय होणार नाही. एक अपसमज असा आहे की स्वतंत्र निर्मितीपेक्षा भाषांतर वा रूपांतर गौण महत्वाचे असते. मुक्तेश्वर, मोरोपंत, वामन, श्रीधर या श्रेष्ठ पंडितकवींनीं स्वतंत्र रचना किती प्रमाणात केली आहे? भारत रामायण व पुराणे यांवरच त्यांच्या कवित्वाची शोभिवंत इमारत उभी आहे ना? ज्ञानेश्वरांना मराठी काव्याच्या क्षेत्रांत 'कवीश्वर' अशी सार्थ उपाधि ज्या ग्रंथामुळे लाभली तो ग्रंथ स्वतंत्र नाही हे एक सत्य आहे. तथापि या सर्वच कवींच्या स्वतंत्र प्रज्ञेचा व प्रतिभेचा प्रकाश त्यांच्या रूपांतरित वा अनुवादित काव्यांत स्पष्टपणे जाणवतो. पं. फडकुलेशास्त्री यांच्या ग्रंथकर्तृत्वाचा व त्यांच्या ठायी असलेल्या कवित्वशक्तीचा सामर्थ्यशाली प्रत्यय रसिकांना येतो यात संदेह नाही. केवळ जैन कवींतच नव्हे मराठी पंडितकवींत जिनदासशास्त्री फडकुले या नावाची गणना अवश्यमेव व्हावी इतकी त्यांची योग्यता आहे हे एक निर्भ्रान्त सत्य. पंडितकवींची परंपरा पूर्वीच खंडित झाली पण मुक्तेश्वर, वामन व मोरोपंत या प्रथमश्रेणीच्या पंडितकवींच्या मालिकेंत उद्यांच्या वाङ्मयेतिहासकाराला फडकुले शास्त्रींचा उल्लेख अपरिहार्यपणें करावा लागेल असाच त्यांच्या काव्यग्रंथांचा साज आहे. पंडिती कवितेच्या दालनांत प्रस्तुत रामायणाने तर अत्यंत मौलिक भर घातली आहे याविषयी मतभेद होण्याचे कारण नाही. आजपर्यंत पंडितजींनी लिहिलेली कविता जवळजवळ पन्नास हजारांच्या घरांत जाते. केवळ संख्येचा हा विचार नव्हे. पण संख्याबलही लक्षांत घेतल्यास या वाङ्मयीन तपस्ये-कडे पाहून कुणीही आदराने मान लववावी. आर्या, (चंद्रकांत राजाची कन्या) इ. वृत्तप्रकार त्यानीं इतक्या निर्दोषपणें हाताळले आहेत कीं आजच्या काळांत विस्मृत होऊ पहाणाऱ्या वृत्तांना त्यांच्या लेखणीने संजीवन दिले आहे असेच म्हटले पाहिजे.

## ग्रंथरचना

सुभाषितावली, सावक्यधम्म दोहा व सारसमुच्चय, आर्या छहढाला, आर्या कथाकोष, आर्या दशभक्ति, गोम्मटसार जीवकांड, भगवती आराधना, महाबळ राजाचे

समाधिमरण, इंद्रांनी केलेली स्तुति, नेमिचरित, धर्मरसायन, श्री शांतिसागरांचा अन्तिम उपदेश, तत्त्वसार, महावीरचरित्र, सल्लेखना, वैराग्यमणिमाला, श्रावकाची दिनचर्या मधुबिन्दुकथा, इन्द्रियपराजयशतक इ. अनेक काव्ये उल्लेखिता येतील. प्रस्तुत रामायण हा त्यांनी रूपांतरित केलेला प्रमुख काव्यग्रंथ जैन साहित्य मराठीत व तोही सरस सुंदर काव्यांत आणण्याचा एक अत्यंत यशस्वी प्रयत्न म्हणून या वर उल्लेखिलेल्या काव्याकडे पहाता येईल. पंडितजींच्या कविता पंडिती वळणाच्या असूनही त्या प्रसाद, माधुर्य व सौकुमार्य इत्यादि गुणांनी युक्त आहेत. त्यांच्या ठायी असलेल्या काव्यगुणांवर त्यांच्या पांडित्याने मात केली असून अर्थक्लिष्टता, अतिरेकी अलंकारिकता कोठे आली आहे असे मुळीच आढळत नाही. बहुधा पंडितीकाव्याचा थाट कृत्रिम भासतो. पण कृत्रिमतेच्या आहारी जाऊन काव्य सजवण्याचा प्रयत्न त्यांच्या काव्यात कोठेच जाणवत नाही. तथापि केवळ प्रतिभाविलास म्हणून या काव्याची निर्मिती कवीने केली असेल असे वाटत नाही. आत्मसमाधान आणि जीवनाचे तात्त्विक भूमिकेवरून केलेले चिंतन हीच पंडितजीच्या ग्रंथलेखनाची भूमिका.

## गद्य-ग्रंथ

संस्कृतातील जैन कथा वाङ्मय प्राधान्याने त्यानी मराठीत आणले आहे. नेमिनिर्वाण, स्वयंभूस्तोत्र, सुदर्शन चरित्र, दशभक्ति, सुकुमारचरित्र, वरांगचरित्र, प्रीतिंकरचरित्र, नागकुमारचरित्र, वर्धमानचरित्र, शांतिनाथ पुराण, भावसंग्रह, सप्तव्यसनकथा, कोटिभट श्रीपाल, द्वादशानुप्रेक्षा, सप्तपरमस्थानकथा, अभिषेकपाठ, प्रतिष्ठातिलक इत्यादि ग्रंथ मराठीत आणले.

भगवती आराधना, तत्वार्थसंग्रह, मूलाचार, पांडवपुराण, धर्मरत्नाकर इत्यादि ग्रंथांचा सुगम हिंदी अनुवादही त्यानी केला आहे. सोमदेव विरचित 'उपासकाध्ययन' या संस्कृत ग्रंथाला संस्कृतांतूनच त्यानी उत्कृष्ट टीकाही लिहिली आहे.

सारांश, गेल्या पंचेचाळीस वर्षांत त्यानी जी साहित्याची यथामति यथाशक्ति सेवा केली तिचा हा त्रोटक वृत्तांत आहे. अप्रकाशित लेखनही त्यांच्या संग्रहात पुष्कळ असून आजही त्यांच्या लेखणीच्या गतीत मंदता आलेली नाही. रात्री दोनपर्यंत त्यांच्या अभ्यासिकेतील दिवा जळत असतो. पुस्तकांची पानामागून पाने उलटली जातात. लेखणी कागदावरून धावत असते. साहित्याची अहर्निश सेवा चालू आहे. कोणी प्रशंसेचे उद्गार काढले काय किंवा कोणी टीकेचा, मत्सराचा शब्द उच्चारला काय दोन्हीही व्यर्थ. त्यांच्या दैनंदिन लेखनांत, वाचनांत व चिंतनांत

कधीही खंड पडणार नाही. आज त्यांना एक्काहत्तरावें वर्ष चालू आहे. संसाराची वाटचाल करतांना पत्नीवियोग, पितृवियोग, बंधुवियोग, अपत्यवियोग, द्रव्यहानि इत्यादि अनेकविध आपत्तीची वादळे येऊन गेली. पण पंडितजींच्या तत्त्वप्रधान दृष्टीमुळे त्यांची प्रतिभा तेवतच राहिली. आसन्नमरण अवस्थेतही साहित्याचा व व धर्मसेवेचा ध्यास घेणाऱ्या या पंडितवर्यांच्या व्यक्तिमत्वाचे व प्रवृत्तींचे आकलन सामान्य व्यवहारी माणसाला होणे कठिण आहे. सहज एक अप्रिय विचार मनाला दंश करून जातो. दुसऱ्या एखाद्या समाजात असले शान्तप्रसन्न, साहित्यप्रेमी, धर्मपरायण, निरलस, अव्यवहारी साधेभोळे, मधुर व्यक्तिमत्व जन्माला आले असते तर कदाचित् त्या विचक्षण व रसिक समाजाने त्याची कधीच उपेक्षा केली नसती. जैन समाजाने पं. जिनदास शास्त्रींची उपेक्षा केली असे मी म्हणणार नसलो तरी त्यांना मिळणारे मानसन्मान आयुष्याच्या अखेरच्या पर्वात-वार्धक्यात मिळत आहेत याचा नाही म्हटले तरी खेद झाल्याशिवाय रहात नाही. पंडितजीना ओळखायला आम्हाला उशीर तर होत नाही ना ? असेल बहुधा. पण रामायण-प्रकाशनाचा समारंभ केला, एखादे मानपत्र पंडितजींच्या उपरण्यात टाकले म्हणजे जैन समाजाचे त्यांच्या विषयीचे कर्तव्य आता संपले असे मात्र आम्ही म्हणू शकणार नाही. त्यांनी आयुष्यभर खपून केलेल्या ग्रंथरचनेचे चिकित्सक रसिकतेने अवलोकन करू, त्यांचे विचार पारखून, समजून घेऊन व ज्या तत्त्वज्ञानाचे, धर्माचे ते उपासक आहेत त्याच्या सेवेसाठी शक्य ते सर्व करू. या प्रवृत्तीतच पंडितजींचा खराखुरा गौरव आहे. व्यक्तीची पूजा त्यांनाही अमान्य आहे. प्रसिद्धीच्या प्रकाशापासून सदैव दोन पावले दूर रहाण्याची त्यानी कटाक्षाने दक्षता घेतली आहे. मला जैन समाजाने काही दिले नाही असली कुरकुर गेल्या पन्नास वर्षात स्वतःशीसुद्धा त्यांनी केली नाही. स्वतः निर्माण केलेल्या एका विश्वात ते वावरत आहेत. आयुष्याच्या प्रत्येक क्षणाचा विनियोग आपल्या कल्पनेप्रमाणे त्याना करायचा आहे. मानअपमान, स्तुतिनिंदा यांची व्यवहारी कक्षा केव्हाच ओलांडून ते पलीकडे गेले आहेत. पण असल्या धर्मसाहित्यरत व्यक्तिमत्वाचे आकलन नीटसपणे करून घेणे व त्याचे महत्व यथार्थाने जाणणे हे आमचे कर्तव्य आहे. जैन समाजाचे हे परमभाग्य आहे की पंडित जिनदासजीसारखा एक श्रेष्ठ साहित्यसेवक व प्रकांडपंडित मार्गदर्शन करण्यासाठी अखंड उभा आहे. 'पिकते तेथे विकत नाही' हा विदारक अनुभव त्यांच्या बाबतीत पुढे व इतर विद्वानांच्या, सेवकांच्या अग्रणींच्या संदर्भात पुन्हा येऊ नये. समाजाच्या संस्कृतीचा व प्रगतीचा विचार करताना पंडितांचा, धर्मज्ञांचा, प्रतिभावंतांचा सेवारत कार्यकर्त्यांचा विचार प्रथम करावा लागतो.

श्री. ऐ. प. दि. जैन पाठशाला व जैन संस्कृति संरक्षक संघ या दोन संस्थात पंडितजीनी नोकरी केली. स्व. धर्मवीर रावजी सखाराम दोशी व स्व. पू. ब्र. जीवराज गौतमचंद दोशी या दोन थोर धर्मसेवकांनी पंडितजीना सदैव उत्तेजन दिले. श्रीमती राजुबाई दोशी पंडितजींच्या धर्मज्ञानाचा, प्रवचनाचा समाजाला लाभ करून देण्याच्या दृष्टीने नेहमीच प्रयत्नशील असतात. स्व. श्री. सखाराम देवचंद-निंबर्गीकर श्री. श्रीपाल नेमिनाथ वैद्य, श्री. फुलचंद हिराचंद शाह, श्री. स. से. ना. हि. शहा बागदरीकर इत्यादि धर्मशील व्यक्ति त्यांच्या मित्रमंडळात आहेत. पुष्कळांचा नामनिर्देश करता येईल. या व्यक्तींनी पंडितजींच्या स्वभावावर प्रत्यक्षा-प्रत्यक्ष काहीतरी परिणाम केला आहे. त्यांच्या मित्रांनी व हितचिंतकांनी त्यांच्या आयुष्यात सात्विक आनंदाचे कित्येक क्षण उत्पन्न केले आहेत. आपल्या मित्र परिवारा संबंधी ते नेहमीच आदराचे व आत्मीयतेचे उद्गार काढतात.

दहा वर्षापूर्वी पं. जिनदासजी यांचा सत्कार झाला त्याप्रसंगी सुविख्यात कवि व नाटककार प्रा. द. रा. बेंद्रे यांनी अध्यक्षपदावरून पंडितजींच्या जीवन तपस्येचा मुक्तकंठाने गौरव केला होता. द. रा. बेंद्रे यांनी पंडितजींच्या संदर्भात जे दोन शब्द लिहिले आहेत त्याचा उल्लेख करतो. ते म्हणतात—

"पंडितजींचे जीवन निरांतक आणि संतत वाहणाऱ्या एका प्रसन्न झऱ्या-प्रमाणे आहे. या सहजक्रियेतही किती वाङ्मयीन तप संचित झाले आहे हे पाहिले म्हणजे त्यांच्या धर्म भावनेच्या स्थैर्याचा पाया किती खोल आहे हे लक्षात येते. त्यांचे जीवन आणि कार्य एखाद्या टुमदार मंदिराप्रमाणे आहे. त्याची वीट न् वीट कार्यतत्परतने जमविली आणि जुळविली आहे. इतके कार्य हातून होणे पुण्यांशाचे लक्षण आहे. त्याचप्रमाणे त्यांतील पुष्कळसे प्रकाशित होणे हे त्यांच्या सद्गुणांशाचे लक्षण आहे असे म्हणावे लागेल. महाराष्ट्रीय आणि त्यात सोलापुर येथील जैन समाजास जो नीटस आणि रूपसपणा येत आहे आणि आला आहे त्याला ज्या अनेक व्यक्ति कारण आहेत त्यात पंडित जिनदास फडकुले यांचे नांव ठळकपणे लक्षात बागवावे लागेल." कवि बेंद्रे यांच्या अभिप्रायातले अक्षरन् अक्षर सयुक्तिक आहे. त्यांत अतिशयो क्तीचा अंशही नाही.

आज पंडितजींच्या 'रामायणाचे' प्रकाशन होत आहे. अलीकडील काळात चौदा हजार आर्यांचा प्रचंड ग्रंथ लिहिण्याची साहसी कल्पनाही कुणाला सुचणे शक्य नाही. सध्या आचार्य जिनसेन यांच्या 'हरिवंशपुराण'. या ग्रंथाचे काव्यात

रूपांतर करण्याचे कार्य त्यांनी चालू केले आहे. या ग्रंथाच्या दहा हजार आर्या त्यानी लिहिल्या आहेत.

पंडित जिनदासजी शास्त्री शतायू होवोत. मराठी साहित्याची सेवा अवि-रतपणे करण्यासाठी त्यांना उत्तम आरोग्याची प्राप्ति होवो हीच सर्व जैन समाजाची एकमेव इच्छा आहे.

— जंबूकुमार माणिकचंद शाह

० ० ०

# संक्षिप्त परिचय.

## ■ दानशीला धर्मपरायण श्रीमती राजुबाई दोशी

सोलापुरपासून चळीस–पंचेचाळीस मैलावर दुधणी नामक व्यापारांत प्रसिद्ध असलेल्या गावांत हिराचंद शिवचंद शहा हे शान्तस्वभावी जिनधर्मतत्पर व्यापारी राहत आहेत. त्यांची या सुशील कन्या. यांच्या मातोश्रीचें नांव जीवुबाई. मातापिता धर्माचरणतत्पर असल्यामुळें कुमारी राजुबाईचीही जिनधर्मावर दृढश्रद्धा आहे. तेथील मुलींच्या शाळेंत यांचें शिक्षण चौथ्या ईयत्तेपर्यंत झालें. वि. सं. १९७८ मध्यें ( सोळाव्या वर्षी ) कुमारी राजुबाईचा शुभविवाह धर्मवीर दानवीर रावजी सखाराम दोशी यांच्याशीं झाला. हे दोघे पतिपत्नी एकमेकांना अतिशय शोभणारे व अनुकूल होते.

श्री रावसाहेबांनीं धर्मपत्नी राजुबाईंना धर्मशिक्षण देऊन धर्माचरणांत अधिक तत्पर केलें. श्री शान्तप्पा ब्रह्मय्या हे येथील ऐ. प. दि. जैन पाठशाळेंत धर्मशिक्षक होते. त्यांनीं यांना बालबोध जैनधर्म भाग १ ते ४, रत्नकरंड श्रावकाचार, द्रव्यसंग्रह, तत्त्वार्थसूत्र या धर्मग्रंथांचें चांगलें ज्ञान करून दिलें.

दुधणी येथील लोकांची भाषा कानडी आहे. येथेंच बाईंचा जन्म झाल्यामुळें व बालपणापासून कौमारदशेच्या कालांत कानडी भाषाही त्यांना चांगली अवगत झाली आहे व श्री शांतप्पा ब्रह्मय्या यांनीं कानडी लिपीचेंही चांगलें ज्ञान करून दिल्यामुळें त्या भाषेंतले जैनधर्मग्रंथ उत्तम रीतीनें त्यांना वाचतां येतात व त्यांचा अभिप्राय त्यांना चांगला समजतो.

' व्युत्पादयेत्तरां धर्मे पत्नीं प्रेम परं नयन् ' ' गृहस्थानें आपल्या पत्नीच्या ठिकाणीं धर्मप्रेम अधिक उत्पन्न व्हावें म्हणून आपल्या परिवारापेक्षा पत्नीला धर्मांत अधिक निपुण करावें ' ही पं. आशाधरांची उक्ति ध्यानांत घेऊन श्री रावसाहेबांनीं धर्मपत्नी राजुबाईंना इतर व्यावहारिक विषयापेक्षा धर्मविषयांत अधिक व्युत्पन्न केलें. सौ. राजुबाई श्री रावसाहेबांच्या प्रत्येक गुणांचें अनुकरण करीत होत्या. रावसाहेब जसे उदार, भद्रपरिणामी व धार्मिक होते तसेच राजुबाईही सुशील, उदार व धार्मिक आहेत. अतिथिसत्कार करण्यांत दोघांनाही फार आनंद वाटत असे.

प्रत्येक दिवशीं रावसाहेबाबरोबर प्रातःकालीं त्या जिनाभिषेक व जिनपूजन या नित्यक्रिया करीत असत. अन्य कार्यांना या कार्याच्या अपेक्षेनें त्या गौण मानीत असतात व हा कार्यक्रम त्यांचा नित्याचा आहे. त्यांचा प्रातःकाल जिनपूजनांत, मध्यान्हकाल त्यागिजनांना आहार देण्यांत व सायंकाल सामायिक, देववन्दना व शास्त्रश्रवणांत व्यतीत होत असतो. अशा रीतीची आदर्श जिनधर्माराधकता त्यांच्या ठिकाणीं आहे.

संघसेवा करण्यांत त्यांना आनंद वाटतो. त्यांच्या हृदयांत पात्रदानाची भावना अखण्ड दीपाप्रमाणें तेवत असते व त्यामुळें सत्पात्रदान नेहमीं त्यांच्या हातून घडत असतें. महर्षि शान्तिसागराविषयीं अपूर्व भक्ति होती त्यामुळें जेथें जेथें त्यांचा चातुर्मास होत असे तेथें तेथें हे पतिपत्नी अवश्य जात असत व साधुवर्यांना आहार-दान देऊन जन्म सफल करीत असत. शके १८४९ मध्यें महर्षि शान्तिसागर महाराज बाहुबलि पर्वताहून आपल्या संघासह सम्मेदशिखरजीच्या यात्रेस जात असतां या उभयतांनीं एक मोटर व एक बैलगाडी स्वतःबरोबर घेऊन पात्रदान करीत सम्मेदशिखरजीस प्रयाण केलें होतें.

श्री. राजुबाईची श्री शान्तिसागर महाराजांवर फक्त श्रद्धाच होती असें नाहीं. तर त्यांनीं नांदणी येथें महाराजांचा चातुर्मास होता त्यावेळीं दसऱ्याचे दिवशीं आपल्या पतिसह आचार्य महाराजांपासून दुसरी व्रतप्रतिमा धारण केली व त्याच दिवशीं महाराजांचा आहारही झाला आणि त्याच दिवशीं नांदणी येथील मानस्तंभाचा वार्षिक महाभिषेक झाला. दसऱ्याच्या सात दिवस आधी रावसाहेब व राजूबाईनीं शूद्रजल त्याग केला व त्या आपल्या अणुव्रतें, गुणव्रतें व शिक्षाव्रताचें निर्दोष पालन करीत आहेत. या प्रतिमेचें पालन करण्यांत त्यांचा ३० वर्षापेक्षाही अधिक काल व्यतीत झाला आहे. स्वाध्याय, सामायिक, सत्पात्रदान, जिनपूजा, गुरुसेवा आदिक कार्येंही त्यांची सतत चालू आहेत. त्यांत कधीही खंड पडला नाहीं.

श्री. राजुबाईना हार्मोनियम-वाजाची पेटी उत्तम वाजवितां येतें व त्या विषयाच्या परीक्षेंत पास झाल्यानें त्यांना प्रमाणपत्रही प्राप्त झालें आहे. पेटी वाजवीत त्या भक्तीनें जिनपूजा, स्तुति आदिक करीत असत.

श्री. रावसाहेब कीर्तन करीत असतां या उत्तम रीतीनें पेटी वाजवीत असत. लोकांच्या मनांत या धार्मिक पतिपत्नीचा हा योग्य संबंध पाहून फार आनंद होत असे.

श्री. राजुबाईनीं एकेवेळीं आष्टान्हिक व्रतानें आठ उपवास केले होते. त्यावेळींही त्यांच्या मुखावर अशांतीचा भाव दिसला नाही. तसेंच यांनी रत्नत्रय [illegible]

तीन वर्षें करून त्याचें उद्यापन केलें. रोहिणीव्रत घेऊन तें पूर्ण झाल्यावर सिद्धचक्राचें विधानाचेंवेळीं त्याचेंही उद्यापन करून श्रावकश्राविकांना रोहिणी-व्रतोद्यापनाचीं पुस्तकें शास्त्रदान म्हणून दिलीं आहेत. रविवारव्रतही धारण करून पूर्ण केलें आहे.

यांचें मन धर्म व सदाचार–संस्कृत आहे. त्यामुळें रेल्वे वगैरेनें प्रवास करते-वेळीं अशुद्ध अवस्थेंत यांनीं कधींही अन्न-पान घेतलें नाहीं. आचार्य शांतिसागर महाराजांचे चातुर्मास समडोळी, कुंभोज, नांदणी, बारामती, कटनी, ललितपुर, मथुरा, जयपुर, व्यावर आदि ठिकाणीं झाले व तेथें हे दंपती जाऊन संघसेवा आहारदान, कीर्तन आदिक धर्मप्रभावनेचीं कार्यें करीत असत.

व्यावर येथें छाणीचे आचार्य शांतिसागर महाराजांचा संघासहित चातुर्मास होता व चारित्रचक्रवर्ती शांतिसागर महाराजांचाही नेमिसागरादि–मुनिवृंदासह तेथेंच चातुर्मास चालू होता. श्री दानवीर धर्मवीर रावसाहेब व त्यांच्या धर्मपत्नी राजुबाई या उभयतांना दोनही संघांतील मुनिवर्यांना दररोज आहारदान देण्याचे प्रसंग प्राप्त होत असत व त्यामुळें उभयतांना फार हर्ष वाटे. तेथें त्यावेळीं शास्त्री-सभेचे अधिवेशन झालें व रावसाहेबांनी त्या अधिवेशनाचें अध्यक्षपद अलंकृत केलें होतें. त्यांचें भाषण सुन्दर व आगममर्यादारक्षक असें झालें.

मूडबिद्री येथें रावसाहेबांना स्थानीय सर्व जैनबंधूंनीं मानपत्र दिलें व राजूबाईना जैन महिलांनीं मानपत्र अर्पण केलें. तसेंच ता. २२।५।१९३५ रोजीं भोजगांवनिवासी सर्व जैन समाजानें या दंपतीना मानपत्र दिलें.

वीर संवत् २४६५ मध्यें उखळद येथील दि. जैन महिला समाजातर्फें राजू-बाईना मानपत्र मिळालें. सन १९३७ मध्यें कन्नड जैन महिला समाजाकडून मानपत्र मिळालें आहे.

कोपरगांव येथें ता. ८।११।१९४६ मध्यें मिळालेल्या मानपत्रांत राजूबाईच्या धार्मिक कार्याचा उल्लेख करून चि. अरविंदकुमारांचे दीर्घायुरारोग्यादिक अभीष्ट चिंतिलें आहे. अशीं अनेक ठिकाणाहून त्यांना मानपत्रें जैनसमाजाकडून मिळालीं आहेत.

श्रीमती राजूबाईनीं आतांपर्यंत वैयक्तिक दान सोळा हजार रुपये केलें आहे. त्यांनीं फडकुले यांच्या जैन रामायणप्रकाशनास १००१ रुपये बृहत् देणगी दिली आहे.

श्रीमती राजूबाई रावजी दोशी व श्री. रतनचंद सखाराम शहा यांच्या प्रारंभीच्या बृहद्देणगीमुळें रामायणप्रकाशनास सर्व स्थानीय व परगांवच्या धर्मप्रेमी व वाङ्मयप्रेमी धर्मबांधवाकडून मोठें साहाय्य मिळालें.

## श्री. अरविंद रावजी दोशी

धर्मवीर स्व. रावजी सखाराम दोशी यांचे द्वितीय सुपुत्र श्री. अरविंद रावजी दोशी हे आपल्या वडिलाप्रमाणें शांत व सरल परिणामी असून वंशपरंपरागत सौजन्य, निरभिमानता, स्वाभाविक औदार्य आदि गुण त्यांच्या ठिकाणीं दिसून येतात. या लहान वयांतही त्यांच्यामध्यें जी गंभीरता व दूरदर्शिता आहे ती अन्यत्र क्वचितच पाहण्यांत येईल.

श्री. अरविंदकुमार जन्मापासूनच पितृसुखवंचित आहेत. तथापि मातोश्री राजुबाई रावजी दोशी यांच्या संस्कारपूर्ण पालनपोषणामुळें वडिल बंधु आणि काका यांच्या देखरेखीमुळें यांच्या ठिकाणीं दोशी घराण्याला अनुरूप सर्वगुण समाविष्ट झाले आहेत. अवघे २५ वर्षांच्या या अननुभूत वयांतही गंभीरता, विनयशीलता, लोकप्रियता आणि लोकसंग्रहवृत्ति आदि गुण तरुणांना ईर्षा उत्पन्न करणारे प्रकट झाले आहेत.

शालान्त उच्च शिक्षण पूर्ण झाल्यावर त्यांनीं मुंबई येथें राहून आपले काका प्रसिद्ध उद्योगपति श्री शेठ लालचंद हिराचंद दोशी यांच्या देखरेखी खालीं पॉलिटेक्निक डिप्लोमा इंजिनियरिंग कोर्सचें शिक्षण घेतलें. गेल्यावर्षी डिप्लोमाच्या शेवटच्या परीक्षेंत उत्तमरीत्या उत्तीर्ण होऊन सध्या ते मुंबई येथील प्रसिद्ध कॉंट्रॅक्टर कंपनीमध्यें क्रियात्मक अनुभव घेऊ लागले आहेत. त्यांचें भविष्य अत्युज्वल आहे.

श्रीमती राजुबाईंनीं व त्यांचे ज्येष्ठ सुपुत्र शेठ श्री. गोविंद रावजी दोशी यांनीं एका वर्षापूर्वी तीन वेळां सिद्धचक्राचें पूजन उत्साहानें केलें होतें. त्यावेळीं अरविंदकुमारांनीं आगत जनांचें सुस्वागत करून व स्वतः पूजनादिकार्यात तत्परता दाखविली.

ना. रं. दि. जैन बोर्डिंगच्या श्री महावीर मंदिराच्यापुढें जो विशाल मानस्तंभ बांधला आहे त्याचा वार्षिकोत्सव ते आपल्या मातेसह प्रतिवर्षी भक्तीनें करीत असतात.

या सर्व दोशी कुटुंबाचा उत्तरोत्तर उत्कर्ष होवो असें इच्छून हा अल्पसा परिचय पूर्ण करीत आहे.

○ ● ●

## स्व. श्री. सखाराम देवचंद शहा

श्री. देवचंद रामचंद शाह यांचें प्रतिष्ठित घराणें सुमारें पाउणशे वर्षापासून सोलापुर येथें आहे. श्री. देवचंद शेठजी व त्यांची धर्मपत्नी उमाबाई यांना श्री. सखाराम, नेमिचंद, रावजी व वालचंद असे चार पुत्र झाले. श्री. सखारामभाई हे देवचंद शेठजींचे ज्येष्ठ पुत्र. यांचा जन्म शके १८०७ आश्विन वद्य ९ मी सन १८८५ सालीं निवर्गी येथें झाला.

सोलापुर येथें त्यांचें शिक्षण इंग्रजी ३ इयत्तापर्यन्त झालें. धर्मग्रंथांचा स्वाध्याय करीत असल्यामुळें संस्कृत भाषेचेंही त्यांना साधारण ज्ञान झालें. वयाच्या १५ व्या वर्षी त्यांनीं कापडाच्या व्यापारांत पदार्पण केलें. उत्तरोत्तर या व्यापारांत त्यांचा उत्कर्ष होत गेला.

थोडक्या नफ्यावर ते माथाविक्री करीत असत त्यामुळें त्यांचा व्यापार बराच वाढला. नित्याच्या व्यवहारांत बारकाई असे त्यामुळें त्यांचा जमाखर्च दरमहाचा नेहमी तयार असे. व्यापारी माणसानें जमाखर्च नेहमी चोख तयार ठेवला पाहिजे असें त्यांचें म्हणणें असे. त्यांचा स्वभाव मनमोकळा होता उद्योग करून आपल्या राष्ट्राचा उत्कर्ष साधा असा ते उपदेशच करीत नसून स्वदेश सेवकांना त्यांच्यापासून बरेंच साहाय्यही मिळत असे.

श्री. सखारामभाईनीं आपल्या आयुष्यांत अनेक धार्मिक कार्यें केलीं आहेत. तीं याप्रमाणें—

१ बाहुबलि अतिशय क्षेत्र येथें समवसरणमंदिर बांधून त्याची प्रतिष्ठा त्यांनीं केली. या कार्यात साठ हजार रुपये खर्च झाला.

२ सोलापुर येथील राजुलमतिश्राविकाश्रमाला २५ हजार रुपयांचें दान त्यांनीं केलें.

३ जैन चतुर्विध दानशाळेला एक हजार रुपयांचें दान दिलें.

४ श्रीगोपाल सिद्धान्त विद्यालय, मोरेना या संस्थेला दोन हजार रुपये दान दिलें.

५ सोलापुर येथील ऐ. प. दि. जैन पाठशाळेच्या गुरुकुलाला दहा हजार रुपये दान दिलें.

६ शेठजींनीं चारित्रचक्रवर्ति शांतिसागर महाराजांच्या आज्ञेनें वट्टकेराचार्य-विरचित मूलाचारावरील वसुनन्द्याचार्यकृत टीकेचा पं. जि. पा. फडकुलेकृत हिन्दी भाषानुवाद प्रसिद्ध करून तो मुनिवर्य, त्यागी, आदिकांना दान दिला आहे.

७ शेठजींनीं विद्यार्थ्यांना अनेकवेळां स्कालरशिप व प्रसंगविशेषीं धनदानही केलें आहे.

शेठजींना व्यायाम करणें व पोहणे हें विशेष आवडत असल्यामुळें त्यांचें देहारोग्य फार चांगलें होतें. आहारविहारांत नियमितपणा होता. आळस त्यांना विलकुल नव्हता. अनेक वेळा ते आजारी पडले पण पथ्य पाळून, प्राणायाम, आसनें व व्यायामानें त्यांनीं आजार नाहींसे केलें.

शेठजींना आध्यात्मिक ग्रंथांचा स्वाध्याय करण्यांत फार आनंद वाटत असे. त्याचप्रमाणें पहांटे उठून सामायिकादिकृत्यें करून प्रातःकाळीं स्नानोत्तर, देवपूजन स्वाध्यायादिक षट्कर्मे ते करीत असत. त्यांनीं आचार्य शान्तिसागर महाराजाजवळ पंधरा सोळा वर्षापूर्वी ब्रह्मचर्य प्रतिमा धारण केली होती. व तिचें आमरण त्यांनीं निरतिचार पालन केलें. श्रीक्षेत्र कुंथलगिरि वगैरे एक दोन ठिकाणीं महाराजांचा चातुर्मास असतां तेथें चातुर्मासांत राहून त्यांनीं संघ सेवा व आहारदान आदिक धर्मप्रभावक कार्यें केलीं आहेत.

त्यांनीं सर्व जैन तीर्थक्षेत्रांच्या व अतिशयक्षेत्रांच्या वंदना केल्या आहेत.

शेठजींच्या पत्नीचें नांव फुलुबाई आहे. त्या सुविद्य आहेत. त्यांचे धर्मशिक्षण सर्वार्थसिद्धिपर्यन्त झालें आहे व स्वभाव शांत आहे. सर्व धर्मकार्यांत शेठजींना त्यांचें साहाय्य होत असे.

या पतिपत्नींना श्री. रतनचंद, विद्याधर व हिरालाल असे तीन पुत्र व कन्या सौ. आशालता अशीं चार अपत्यें आहेत. सर्व पुत्र उद्योगदक्ष व धर्मप्रिय असून त्यांचा उत्तरोत्तर उद्योगादिकांत उत्कर्ष होत आहे. सर्वांचें धर्मकार्यांत फार प्रेम आहे. शेठजी मरणापूर्वी दोन महिने आजारी होते. त्यांचा मृत्यु ता. १५।१।१९६० रोजीं पहांटे झाला. णमोकारमंत्राचें स्मरण करीत त्यांनीं प्राणविसर्जन केलें.

शेठजींना श्री. नेमचंद, रावजी व वालचंद हे तीन बंधु. त्यापैकीं नेमचंद यांचें वास्तव्य गुंजोटी येथें असे. त्यांचा सर्व काल प्रायः आप्तपरीक्षा, प्रमेयकमलमार्तंड, श्लोकार्तिकादिक महाग्रंथांचा स्वाध्याय करण्यांत जात असे हे शेठजींच्यापूर्वी मरण पावले. त्यांना शांतिलालनामक सुपुत्र आहे व त्याचें सपत्नीक वास्तव्य मुंबईमध्यें आहे. श्रीयुत रावजी देवचंद व वालचंद देवचंद हे उभयता उद्योगरत आहेत, विद्वान आहेत आणि अनेक धार्मिक संस्थांचा योगक्षेम ते चालवीत आहेत.

श्री. सखारामभाईंचे ज्येष्ठ पुत्र श्री. रतनचंद यांनीं आपल्या वडिलांच्या स्मरणार्थ रामायणाच्या प्रकाशनासाठीं एक हजार रुपयांची मोठी देणगी दिली व

त्यामुळें सोलापूर येथील व अन्यस्थानीय अनेक धर्मप्रेमी बंधु-भगिनींनीं वरील प्रकाशनास मन:पूर्वक द्रव्यदानाचें साहाय्य केलें म्हणून हें 'रामायण' पूर्ण प्रकाशित होऊन आज त्यांच्या करकमलांत विराजमान होत आहे.

श्री. रतनचंदही आपल्या पित्याप्रमाणें उद्योगप्रिय, निरलस, धर्मप्रेमी व उत्साही आहेत. श्री. रतनचंद हे अनेक धार्मिक संस्थांचे विश्वस्त व सेक्रेटरी आहेत व ते सर्व संस्थांचीं आस्थेनें कामें पहातात. नुकतेच निघालेल्या सोलापुर कॉलेजला सुरवातीस त्यानीं मोठी देणगी दिली असून वरचेवर अनेक संस्थाना देणग्या व मुलांना स्कॉलरशिप रूपानें मदत करतात. त्यांचा उद्योगापेक्षा धर्माकडेच जास्त ओढा दिसून येतो. त्यांच्या हातून पित्याप्रमाणें धर्मसेवा व सरस्वतीसेवा अधिकाधिक होवो असें आम्हीं इच्छितों.

• • •

## श्री रामायण प्रकाशन निधि

# ◀ दातारांची शुभनामावली ▷

**प्रत्येकी रुपये १००१ (२००२)**

श्रीमती राजुबाई रावजी दोशी, सोलापूर
श्री. रतनचंद सखाराम शाह, सोलापूर

**प्रत्येकी रुपये २५१ (१००४)**

सर्वश्री केशवलाल वीरचंद शाह, सोलापूर
श्रीपाल नेमिनाथ वैद्य, सोलापूर
दत्तात्रय मारुती मोहीकर, पुणें
प्रा. निर्मलकुमार फडकुले, सोलापूर

**रुपये २०१ (२०१)**

स्व. माणिकचंद मोतीचंद शाह, वेळगांव यांच्या स्मरणार्थ हस्ते साकळचंद वंधु

**रुपये १५३ (१५३)**

वालचंद लालचंद शाह, वार्शी ( स्व. लालचंद रावजी शाह यांचे स्मरणार्थ ५१, मातोश्री श्रीमती चतुरवाई ५१ व वंधु पोपटलाल ५१ मिळून )

**रुपये १५२ (१५२)**

सर्वश्री रतनचंद प्रेमचंद शाह, वार्शी (स्वतःचे ५१ व वडिलांचे स्मरणार्थ १०१ मिळून)

**प्रत्येकी रुपये १५१ (४५३)**

सर्वश्री चंद्रनाथ विष्टपा वनकुद्रे, सोलापूर
जंबुकुमार माणिकचंद शाह, सोलापूर
जिवराज हिराचंद शाह, आळंदकर

**प्रत्येकी रुपये १०१ (७१७१)**

सर्वश्री प्रभात गोविंदजी दोशी, सोलापूर
माणिकचंद गुलाबचंद शाह, पिपळेकर
हिराचंद नेमचंद गांधी, सोलापूर
गौतमचंद पानाचंद चंकेश्वरा, सोलापूर
श्रीमती माणिकवाई रामचंद गांधी, नातेपुते
शंकरराव किसनराव आहेरकर, सोलापूर
जिवराज ताराचंद शाह, सोलापूर
ना. हि. शाह वागदरीकर, ( सत्कार निधींतील )
कलगोंडा अण्णा पाटील, सोलापूर
फुलचंद लीलाचंद मेहता, गुलबर्गा ७१ व्या वाढदिवसाप्रीत्यर्थ
हिराचंद जेठीराम शाह, दुधनी. स्व. पत्नी सौ. चंचलावाई यांच्या स्मरणार्थ
माणिकचंद सखाराम गांधी, तडवळ
वालचंद प्रेमचंद शाह, वार्शी
फुलचंद ज्योतीचंद दोशी, दुधनी
चतुरवाई मोतीचंद शाह, अक्कलकोट
रावजीभाई हरीचंद शाह, गोडनिंब
फुलचंद हिराचंद शाह, सोलापूर
श्री. सखूवाई वालचंद रोपळेकर, सोलापूर
प्रेमचंद रेवचंद मोदी, सोलापूर
हिराचंद मलूकचंद जगत्‌काका, सोलापूर
वालचंद नानचंद शाह, सोलापूर
रामचंद रावजी संडाळकर, सोलापूर
जिवराज रावजी संडाळकर, सोलापूर
नानचंद कस्तुरचंद संडाळकर, सोलापूर
जिवराज रामभाऊ मेहता, अक्कलकोट
हिराचंद शिवचंद गांधी, दुधनी
हिराचंद गुलाबचंद शाह, गुलबर्गा धर्मपत्नी सौ. मैनाबाई यांच्या दशलक्षण १० उद्यापनाप्रीत्यर्थ

रामचंद्र शांतिनाथ वीर, सोलापूर
गुलाबचंद खेमचंद शाह, सांगली
मोतीचंद हिराचंद गांधी, आळंद
सुंदरलाल मोतीचंद शाह, मैंदर्गी
सौ. चंचलाबाई रावसाहेब शाह, अंधेरी
फुलचंद वीरचंद शाह, मोहोळ
हिराचंद सखाराम शाह, निंवरगीकर
रामचंद फुलचंद दोशी, सोलापूर
नानचंद हरीचंद दोशी, गुणवरेकर
हिराचंद रतनचंद व्होरा वोरीकर
निमगांव-केतकी
पमुलाल जिवराज शाह, फलटणकडून
स्व. पिताश्री जिवराज फूलचंद
यांच्या स्मरणार्थ
विठ्ठल सीतारामपंत धोंगडे, मंगळवेढा
हे सोलापुरीं हॉस्पिटलमध्ये असताना
आश्वासन दिल्याप्रमाणे त्यांच्या
चिरंजीवाकडून मिळाले.
श्रीमती नवलबाई मोतीचंद गांधी दुरुगकर,
सोलापूर
जयवंतराव भगवंतराव, आळंद
प्रकाशचंद रावजी मेहता, सोलापूर
सुशीलाबाई कस्तुरचंद वळसंगकर,
सोलापूरकडून पतीच्या स्मरणार्थ
बाहुबली हिराचंद कोठाडिया, मोहोळकडून
मातोश्री चतुरबाई यांच्या कवल-
चंद्रायण व्रताच्या उद्यापनानिमित्त
फुलचंद गंगाराम शाह, सोलापूर स्व.
मातोश्री माणेकबाई यांच्या स्मरणार्थ
गुलाबचंद सुरचंद शाह, आळंद
भाऊराव शंकर कवठे, मोहोळ
सौ. मातोश्री हिरूबाई यांच्यासाठी
मोतीलाल रावजी शाह फलटणकर-
कडून, सातारा-रोड.

कस्तुरबाई प्रेमचंद शाह भंडारकवठेकर,
सोलापूर
हिराचंद गौतमचंद गांधी, केतकी-निमगांव
अमीचंद मोतीचंद मेहता हिरोळीकर,
मुंबई
मोतीचंद रेवचंद गांधी, सोलापूर
बळवंतराव एकनाथ सिरसोडे, सोलापूर
गौतमचंद मोतीचंद शाह, टेंभूर्णी
स्व. माणिकचंद मोतीचंद शाह, टेंभूर्णीकर
कुर्डूवाडी यांच्या स्मरणार्थ त्यांचे
सुपुत्र जयकुमार यांजकडून
बालचंद माणिकचंद तंबोळी, कुर्डूवाडी
स्व. हिराचंद सखाराम कोठाडिया
यांच्या स्मरणार्थ त्यांचे सुपुत्र
डॉ. शांतिलाल कुर्डूवाडी यांजकडून
श्रीमती आवलबाई माणिकचंद मेहता
निमगांव-केतकी
प्रेमचंद हरीचंद शाह, मोडनिंब
नवलबाई बालचंद गुंजोटीकर, सोलापूर
पतिश्री शेठ बालचंद गुलाबचंद
यांच्या स्मरणार्थ
श्रीमती राजूबाई मोतीचंद शाह, शेंद्री
हिराचंद नथुराम दोशी, निमगांव केतकी
श्री दिगंबर जैनपंच, नातेपुतें
स्व. रायचंद पानाचंद गांधी अकलूज
यांच्या स्मरणार्थ त्यांचे सुपुत्रद्वय
श्री. मोहनलाल व रतनचंद यांजकडून
स्व. नानचंद रावजी शाह मैंदर्गीकर, वाल्हे
यांच्या स्मरणार्थ त्यांचे सुपुत्र
गुलाबचंद बंधूकडून
जिवराज नेमचंद शाह, अगरखेड
रतनचंद शिवलाल शाह, मंगळवेढा
शिवलालचंद पदमशी गांधी, पंढरपूर
शांतिलाल नेमचंद शाह, मुंबई

श्रीमती चंपाबाई जिवराज मेहता, पुणें
यांच्यातर्फे त्यांचे सुपुत्र श्री. गुलाबचंद
यांजकडून

मे. माणिकचंद मलूकचंद कोठाडिया,
पंढरपूर

माणिकचंद अमीचंद शाह, आळंदकर

**प्रत्येकी रुपये ५१ (१२२४)**

सर्वश्री मोहनलाल गुलाबचंद दोशी,
सोलापूर

डॉ. नरसिंगसा मोतीसा लाड, बार्शी

आनंद लीलाचंद कोठारी, सोलापूर

माणिकचंद मोतीचंद तोळनूरकर,
अक्कलकोट

चंदुलाल जेठीराम शाह, अक्कलकोट

श्री. कस्तुरबाई फुलचंद शाह, लच्चाण

वीरचंद कोदरजी गांधी, फलटण

खुशालचंद कोदरजी गांधी, फलटण

प्रवीणचंद प्रकाशचंद गांधी, केतकी-निम.

धनराज फुलचंद दोशी, केतकी-निमगांव

चतुरबाई रावजी शाह भंडारकवठेकर,
सोलापूरकडून पिताश्री स्व. हिराचंद
उगरचंद यांच्या स्मरणार्थ

रुकुबदास दाजीबा गुमते, मोहोळ

हिराचंद कस्तुरचंद शाह, मोडनिंब

माणिकचंद नानचंद मेहता, अक्कलकोट

जिवराज माणिकचंद मेहता माडीवाले,
निमगांव-केतकी

डॉ. बाहुबली फुलचंद शाह, आळंद

चंदुलाल अमीचंद शाह, आळंद

गौतमचंद नानचंद शाह, आळंद

वालचंद रावजी शाह, कुर्डूवाडी
धर्मपत्नी सौ. उषाबाईंच्या
दशलक्षणिच्या १० उपवासाप्रीत्यर्थ

डॉ. विजयकुमार नेमिचंद दोशी, कुर्डूवाडी

शिवलाल नथुराम शाह, कुर्डूवाडी

ब्र. रावजी मोतीचंद शाह, कुर्डूवाडी

प्रेमचंद हिराचंद पालिया, कुर्डूवाडी
यांची पत्नी स्व. सौ. फुलूबाई यांच्या
स्मरणार्थ छगनलाल, मोहनलाल,
पवनकुमार, धन्यकुमार या चौघां
पुत्रांनी दिले

रावजी माणिकचंद शाह, इंडीकर

**प्रत्येकी रुपये ४१ (१२३)**

डॉ. डी. जे. सास्तुरे, सोलापूर स्वतःच्या
४१ व्या वाढदिवसानिमित्त

नेमचंद मोतीचंद शाह, अक्कलकोट

नवजीवन हिराचंद गांधी, सोलापूर

**प्रत्येकी रुपये ३१ (३१)**

जिवराज फुलचंद मेहता, अक्कलकोट
चि. सुभाषचंद्र यांच्या विवाहाप्रीत्यर्थ

**प्रत्येकी रुपये २५ (५५०)**

सर्वश्री गजकुमार त्रिभुवनचंद [illegible]

श्रीमती मैनाबाई हिराचंद शाह, आळंद

नवलचंद जिवराज शाह, लातूर

रतनचंद वालचंद शाह, [illegible]

[illegible] दोशी, सोलापूर

गुरुनाथ सखाराम रणदिवे, सोलापूर

फुलचंद चंदुलाल कासलीवाल, सोलापूर

गुलाबचंद हिराचंद शाह—शाह आणि कं.,
सोलापूर

अनसूयाबाई [illegible], सोलापूर

डॉ. गुलाबचंद अमीचंद शाह, [illegible]

अप्पाजी श्रीकृष्ण [illegible], [illegible]

श्रीमती [illegible], सोलापूर

शीतल हिरालाल [illegible], सोलापूर

हिराचंद फुलचंद दोशी, केतकी-निमगांव

श्रीमती सोनूबाई रावजी शाह, जवळगी
जिवंधर अनंतराव ढोले, आळंद
मार्तंडराव केशवराव जैन, जालना
सौ. मनोरमा मोतीलाल शाह, सोलापूर
वालचंद नेमचंद शाह घोटीकर, मोहोळ
शिवलाल वेणीचंद शाह, वळसंग
रावजी अमीचंद मेहता, परिते
शिवलाल मोतीचंद गांधी, दुधनी

**प्रत्येकी रुपये २१ (६३)**

जिवराज हिराचंद शाह, मंद्रूप
लक्ष्मीबाई जयगोंडा पाटील, जयसिंगपूर
काळबाबाई हुल्ले, सोलापूर

**प्रत्येकी रुपये ११ (२९७)**

रंगनाथ दत्तात्रय आहेरकर, सोलापूर
श्रीमती रतनबाई जिवराज शाह, मैंदर्गीकर
चंद्राबाई विमलचंद लेंगडे, शाहपूर
ना. हि. शाह, बागदरीकर
सरस्वतीबाई भाऊराव पाटील, महातपूर
हुकूमचंद हिराचंद मेहेता, दुधनी
बम्मण्णा काळप्पा आंबे, आळंद
कु. कमल नानचंद शाह, बागदरीकर
रत्नपाल जयवंत कळसकर, सोलापूर
माणिकचंद मोतीचंद शाह, अगरखेडकर
कस्तुरचंद मोतीचंद शाह, अगरखेडकर
शांतिलाल गुलाबचंद शाह, सांगली
बाळगोंडा देवगोंडा पाटील, जयसिंगपूर
सोनूबाई बाबुराव, जयसिंगपूर
माणिकचंद हरीचंद शाह, कवेकर, बार्शी
श्रीमती फुलूबाई खंडाळकर, सोलापूर
नरसप्पा सिद्रामप्पा धोंगडे, नगर
सुभापचंद हिराचंद शाह, सोलापूर
बाबुराव रामचंद विभूते, अक्कलकोट
श्रीमती चतुरबाई सांगवीकर, सोलापूर
श्रीमती माणिकबाई गुलाबचंद गांधी, सोलापूर
जिजाबाई अण्णासाहेब जैन, कपिलापुरी
जमनाबाई कृष्णाजी जैन, कपिलापुरी
सुंदराबाई श्रीपतराव जैन, कपिलापुरी
ताईबाई पंढरीनाथ जैन, कपिलापुरी
टी. एन्. उपाध्ये, सोलापूर
कांतिलाल नरसिंह मंगुडकर, मोहोळ

**प्रत्येकी रुपये १० (२०)**

भालचंद्र श्रीधर क्षीरसागर, करकंब
सुभद्राबाई बारसकर, दिल्ली

**प्रत्येकी रुपये ७ (१४)**

विद्याचंद्र मोतीचंद पटवा, सोलापूर
राजूबाई फुलचंद मेहता, अक्कलकोट

**प्रत्येकी रुपये ५ (२६५)**

श्री. जमनाबाई फुलचंद शाह, सावळेश्वर
मोतीचंद माणिकचंद दोशी, मैंदर्गीकर
हिराचंद माणिकचंद मीठवाले, सोलापूर
गोपाळ बाळाजी बीडकर, कुंथलगिरी
हिरूबाई हिराचंद शाह, जवळगीकर
आण्णा धोंडीबा एखंडे, सोलापूर
श्रीमती जलदेवी बन्सीधर पंडित, सोलापूर
कस्तुरबाई जनार्दन कोरे, महातपूर
इंदिराबाई जगन्नाथ बारे, महातपूर
कोंडाबाई प्रल्हाद बारे, महातपूर
यशोदाबाई भगवान सावळे, महातपूर
अनसुयाबाई रामभाऊ सावळे, महातपूर
सोनूबाई गोपाजी सावळे, महातपूर
गीताबाई गणपत कवठे, महातपूर
मथुराबाई सुबराव सुतार, महातपूर

पद्मराज अनंतराज म्हेत्रे, सोलापूर
मोतीलाल नेमीनाथ, मोहोळकर
श्रीमति फुलवाई रावसाहेब वडगावकर
सुंदरावाई आण्णपा देसाई, सोलापूर
रावजी माणिकचंद संघवी गणेगांवकर
महावीर अण्णा कंदले, सोलापूर
गंगूवाई भगवान नरखडे, महातपूर
गोदावाई दादासाहेब शिराढोणे, महातपूर
गांधारीवाई गणपत सावळे, महातपूर
तुलसादेवी सावळाराम जैन, महातपूर
भागीरथीवाई रामचंद्र, महातपूर
तारामति निवृत्ति शिराढोणे, महातपूर
गंगूवाई भानुदास सलगरकर, महातपूर
कस्तुरवाई भाऊ वारे, महातपूर
चेलनावाई शांतिनाथ उपाध्ये, महातपूर
जनावाई जयराम कवठे, महातपूर
यमुनावाई लक्ष्मण मसलकर, महातपूर
रुक्मिणीवाई शेटीवा नरखडे, गुळपोळी
सुगंधावाई दादासाहेव जैन, गुळपोळी
राजा माणिकचंद मोतीचंद, अक्कलकोट
कस्तुरचंद गुलावचंद गांधी, वकील, अक्कलकोट
भीमाबाई पांडुरंग मोहळे जैन, उपळाई
कडूबाई काशिनाथ सुर्डे, महातपूर
इंदिरावाई निवृत्ति जैन, गुळपोळी
अनसुयावाई काशिनाथ जैन, गुळपोळी
जीवन मोतीचंद शाह, वकील, सोलापूर
मोतीलाल आण्णा मुरडे, सोलापूर
रामचंद्र मारुती रणदिवे, रहिमतपूरकर
माणिकचंद रावजी शाह, दहिटणेकर सोलापूर
इंदिरावाई दिगंवर जैन, कपिलापुरी
वासंतिवाई रघुनाथ जैन, कपिलापुरी
कृष्णावाई दादासाहेव जैन, कपिलापुरी
वालावाई कृष्णा जैन, कपिलापुरी
पद्मावति कृष्णा जैन, कपिलापुरी
गयावाई मनोहर जैन, कपिलापुरी
जगदीश दिगंवर पळसे, सोलापूर
फुलचंद उगरचंद शाह, वळसंग
केशरवाई शिवलाल कोठारी मंगरुळकर

**प्रत्येकी रुपये १ (४)**

केशरवाई थळवे, सोलापूर
कु. लतावाई लक्ष्मण नरखडे, महातपूर
(खाऊसाठीं दिलेल्या पैशांतून स्वंयप्रेरणेनें)
शरद हिरालाल पुरवत, सोलापूर
कस्तुरचंद फत्तेचंद, कुर्डूवाडी

एकूण रक्कम १३७२७
एकूण दातार २२४

# पद्मपुराण ( जैन रामायण ) भाग १ ला

# ❀ विषयानुक्रम ❀

४५८, धनुष्याजवळ जाऊन राजे घाबरले ४५९-४६०, रामाला सीतेनें व लक्ष्मणाला विद्याधरकन्यांनीं वरलें ४६१, भरताचा सुप्रभा राजकन्येबरोबर विवाह ४६१-४६३.

## पर्व ३० वें– ( पृ. ४६७–४७३ )

आष्टाह्निकपर्वांत पुत्रादिकासह दशरथ राजानें जिनेश्वराचें महापूजन केलें ४६७, गंधोदक न मिळाल्यामुळें सुप्रभा राणीनें विष खाण्यासाठीं मागविलें ४६८-४६९, तारुण्य व वृद्धदशेचें कथन ४६९-४७१, मुनिवंदनार्थ दशरथ राजाचें गमन ४७१-४७३.

## पर्व ३१ वें– ( पृ. ४७८–४८८ )

सीतेचा रामाबरोबर विवाह झाला हें ऐकून भामंडल त्याच्याशीं युद्ध करण्यास निघाला ४७८-४७९, भामंडल स्वपूर्वजन्म सांगतो ४७९, चन्द्रगति राजा भूतहित-गुरुजवळ दीक्षा घेतो ४८०, चंद्रगतीच्या दीक्षेला कोण कारण झालें या प्रश्नाचें उत्तर भूतहित आचार्यांनीं दिलें ४८२-४८४, चंद्रगति आदिकांचें पूर्वभववर्णन ४८४-४८५, बहिण व भावाची भेट ४८५, दशरथ राजाचें पत्र वाचून जनक व विदेहा राणी अयोध्येस जातात ४८६-४८८.

## पर्व ३२ वें– ( पृ. ४९४–५०८ )

सर्वभूतहित आचार्य दशरथाचें पूर्वभव सांगतात ४९४-४९५, दशरथ राजा दीक्षा घेण्याचा निश्चय मंत्रिजनाला कळवितो ४९७-४९८, भरताचें वैराग्यचिंतन ४९८-४९९, केकया भरताला राज्य द्यावें असा वर मागते ४९९-५००, मी भरताला राज्य दिलें असें दशरथ रामचंद्राला कळवितात ५००, रामचंद्राचें राज्यापेक्षानिरपेक्ष भाषण ५००-५०१, भरत व दशरथाचें संभाषण ५०१-५०२, भरताला दशरथ राजा राज्यपालन कर असें सांगतो व रामचंद्रही त्याला आग्रह करितो ५०२-५०४, मी जेथें राज्य स्थापीन तेथें मी तुला नेईन असें राम मातेला वचन देतो ५०४-५०५, सीता व लक्ष्मण या उभयासह रामाचें वनगमन ५०५-५०७, अरनाथ मंदिरांत रात्रीं निवास ५०७-५०८.

## पर्व ३३ वें– ( पृ. ५१२–५२२ )

अर्ध्यारात्रीं अरनाथ मंदिरांतून त्रिकांचें दक्षिणेकडे प्रयाण ५१२, राम-वनगमनानें भरत खिन्न होतो ५१३, दशरथराजानें दीक्षा घेतली तथापि रामवियोगाचे विचार त्याच्या मनांत येत असत ५१४, स्नेहविचार न यावेत म्हणून अनित्यादि

बारा अनुप्रेक्षांचा ते विचार करूं लागले ५१४-५१५, भरतानें भेटून आपणच राज्य पालन करावें अशी रामाला प्रार्थना केली ५१६, कैकेयीनेंही प्रार्थना केली तेव्हां त्यांना रामचंद्रांनीं प्रत्युत्तर दिलें व भरताला त्यांनीं राज्याभिषेक केला ५१७-५१८, द्युतिसूरीचा राजा भरताला 'ज्याला मुनि व्हावयाचें आहे त्यानें गृहस्थधर्माचें निरतिचार पालन केलें पाहिजे' असा उपदेश ५१८, भरत व्रत, दान, शील, जिनपूजा या गृहस्थधर्माचें पालन करूं लागला ५१९-५२१, राज्यपालन करीत असतांही भरत आत्मचिंतन विसरला नाहीं ५२१-५२२.

## पर्व ३४ वें– ( पृ. ५२९–५४४ )

अवंति देशांत रामादित्रिक आले असतां तो देश त्यांना उद्ध्वस्त झालेला दिसला तेव्हां सीरगुप्तानें त्याचें कारण सांगितलें व वज्रकर्णाचें वृत्त सांगितलें ५२९-५३२, वज्रकर्णाला अहिंसेचा उपदेश मुनीनें केला ५३२, वज्रकर्णानें अणुव्रतें घेतलीं व जिनेश्वर आणि निर्ग्रंथमुनीश्वर याशिवाय इतरांना नमस्कार करणार नाहीं असा नियम घेतला ५३३, हातांतील आंगठींत मुनिसुव्रतनाथाची आकृति कोरून तिला तो नमस्कार करीत असे याप्रमाणें सिंहोदराविषयीं विनय दाखवी ५३४, सिंहोदराला खरा प्रकार समजल्यामुळें त्यानें वज्रकर्णाच्या नाशाचा विचार केला ५३४, विद्युदङ्गानें हा विचार वज्रकर्णाला कळविला ५३४-५३६, सिंहोदरदूताचें भाषण व त्यास वज्रकर्णाचें उत्तर ५३६-५३७, वज्रकर्णानें दिलेलें अन्न रामादिकांनीं सेविलें ५३७, वज्रकर्णाला संकटमुक्त कर अशी लक्ष्मणाला रामाची आज्ञा ५३८, सिंहोदर व लक्ष्मणाचीं उत्तरप्रत्युत्तरें ५३८-५३९, लक्ष्मणाचें सिंहोदराच्या वीराबरोबर युद्ध ५३९-५४०, सिंहोदराला मी मारणार नाहीं असें लक्ष्मण त्याच्या स्त्रियांना म्हणाला ५४०, रामचंद्राला नमस्कार करून सिंहोदरस्त्रिया त्याला पतिभिक्षा मागतात ५४०-५४१, रामचंद्रांनीं वज्रकर्णाच्या सम्यक्त्वाची स्तुति करून त्याचें अभिनंदन केलें ५४१-५४२, माझ्या मालकाला मुक्त करा असें वज्रकर्णानें लक्ष्मणाला म्हटलें त्यामुळें उभयांत मित्रता झाली ५४२-५४४.

## पर्व ३५ वें– ( पृ. ५४८–५५४ )

कल्याणराजपुत्र व लक्ष्मण यांची भेट ५४८, कल्याणमालेनें सत्यकथा सांगितली ५४९-५५०, रामादिक विंध्याटवींत येतात तेथें म्लेच्छराजा शरण येऊन स्ववृत्त सांगतो ५५०-५५२, रौद्रभूति वालखिल्याचा प्रधान झाला व वालखिल्याचा सिंहोदरादिकांनीं सन्मान केला ५५३-५५४.

पर्व ३६ वें– ( पृ. ५५५-५७१ )

कपिलब्राह्मण रामादिकांचा अपमान करितो ५५९-५६०, रामांनीं कपिलाची लक्ष्मणापासून सुटका केली ५६०-५६१, दुर्जनापासून दूर राहणें हिताचें आहे ५६१, विनायकसुरानें रामादिकासाठीं नगर रचिलें ५६१-५६३, देवाङ्गनेनें कपिलाला नगराची माहिती दिली ५६३-५६४, कपिल जिनधर्मस्वरूप स्वपत्नीला सांगतो ५६४-५६५, कपिल पत्नीसह जिनमंदिरांत जिनस्तुति करितो ५६६-५६७, लक्ष्मणाच्या आश्वासनानें कपिल परत येतो. जग धनाची पूजा करते सदाचाराची नाहीं. यास सनत्कुमारचक्रीचें उदाहरण ५६८-५६९, रामचंद्रानें सत्कार करून कपिलाला धनराशि दिल्या ५६९-५७०, कपिल विरक्त होऊन मुनि होतो ५७०-५७१.

पर्व ३७ वें– ( पृ. ५७५–५८० )

रामादिकांचा यक्षानें सन्मान केला ५७५, वनमाला गलपाशानें जीव देण्यासाठीं वनांत जाते ५७५-५७७, लक्ष्मण गलपाश काढून घेतो ५७७-५७८, राजा व राणी रामचंद्रादिकांना विजयपुरांत आणतात ५७९-५८०.

पर्व ३८ वें– ( पृ. ५८६–५९५ )

अतिवीर्यराजाचा दूत महीधर राजाकडे येतो ५८६, अतिवीर्यराजा भरताचा द्वेष कां करितो या लक्ष्मणप्रश्नास दूताचें उत्तर ५८६-५८८, अतिवीर्यावर आक्रमण करण्याविषयीं पृथ्वीधर राजाच्या पुत्रासह राम, लक्ष्मण, सीता यांचा विचारविनिमय ५८८-५९०, अतिवीर्य नृपसभेंत नर्तकीवेषानें रामादिकांचें नृत्य ५९१, अतिवीर्याच्या निंदेनें तो मुख्यनर्तकीस मारण्याचा विचार करितो ५९१-५९२, नर्तकी उडी मारून तरवार हिसकून घेते व त्याची शेंडी हातीं धरून अन्य राजांना ती असें म्हणाली ५९२-५९३, जिनमंदिरांत रामानें अतिवीर्याला लक्ष्मणाच्या स्वाधीन केलें ५९३, श्रीराम व अतिवीर्य यांचें भाषण ५९३-५९४, अतिवीर्य दीक्षा घेऊन मुनि होतो ५९४-५९५.

पर्व ३९ वें– ( पृ. ५९९–६०७ )

रामचंद्रादिकांचें पुनः विजयपुरास आगमन ५९९, भरत अतिवीर्याची स्तुति करतो ५९९-६०१, मी तुला कांहीं दिवसांनीं घेऊन न जाईन तर रात्रीं भोजन करणाऱ्याच्या पातकानें मी लिप्त होईन अशी शपथ लक्ष्मणानें घेतल्यावर वनमालेनें त्याला देशांतरीं जाऊं दिलें ६०१, रामादिकाविषयीं लोकांचे धन्योद्गार

६०२, क्षेमाञ्जलि नगरांत शत्रुंदमराजानें फेकलेल्या पांच शक्तींना जिंकून लक्ष्मण जितपद्मेला वरतो ६०३-६०७, जितपद्मेला समजाऊन लक्ष्मण रामाबरोबर देशांतरीं गेला ६०७.

## पर्व ४० वें– ( पृ. ६१५–६३१ )

रामचंद्रांना पळणाऱ्यांपैकीं एकाने पळण्याचें कारण सांगितलें ६१५-६१७, रामादिक मुनियुगाला वंदून स्तुति करितात ६१७-६१८, राम-लक्ष्मणांनीं मुनि-युगोपसर्ग दूर केला ६१८-६२०, देश-कुलभूषण रामाला स्वचरित्र सांगतात ६२०, अमृतस्वराला वसुभूतीनें मारलें व मुदितानें वसुभूतीला मारलें. मरणोत्तर तो म्लेच्छ झाला ६२०-६२१ उदित व मुदित दीक्षा घेऊन विहार करितात व सेनापति या मुनिद्वयाचें म्लेच्छापासून रक्षण करितो ६२१-६२४ सेनापतीनें मुनींचें कां रक्षण केलें त्याचें कारण ६२४-६२५, अग्निकेतु देव मरून कोठें जन्मला याचें वर्णन ६२५-६२६, रत्नरथ व चित्ररथ स्वर्गातील आयुष्य संपल्यावर देश-कुलभूषण झाले असें कथन ६२६-६२७ क्षेमंकर राजा 'महालोचन' देव होतो ६२७, अनुंधर तपस्वी वह्निप्रभ देव झाला व त्यानें आम्हाला उपसर्ग केला.' व तो तुम्ही– राम-लक्ष्मणांनीं दूर केला ६२७-६३१, गरुडेशाला संकटप्रसंगीं आम्हाला साहाय्य करावें असें रामचंद्र म्हणाले ६३१.

## पर्व ४१ वें– ( पृ. ६३७–६४९ )

कर्णरवा नदीच्या तटीं रामादिकांनीं निवास केला तेथें एकेदिवशीं राम व सीता यांनीं चारणमुनियुगलाला आहार दिला ६३८-६४०, तेथें झाडावर बसलेल्या गिधाडाला पूर्वभवस्मरण झालें ६४०, चारणमुनि त्याचे पूर्वभव व दण्डकवनाच्या उत्पत्तीचें वर्णन करितात ६४१-६४२, दण्डकराजानें मुनिकण्ठांत मृतसर्प घातला ६४२, त्यानें जैनमुनिविषयीं द्वेष उत्पन्न होऊन त्यांना घाण्यांत पिळून मारिलें ६४३, मुनीच्या मुखांतून निघालेल्या अग्नीनें दण्डक राजा व त्याचा सर्व देश जळून खाक झाला ६४३-६४४, चारणमुनि गिधाडाचें सांत्वन करितात ६४४-६४५, चारणमुनि स्वभवाचें वर्णन करितात ६४५, अग्निकेतु जैनमुनि कसा होईल त्याचा उपाय सुकेतूला त्याचे गुरु सांगतात ६४६-६४७, गिधाड अणुव्रतें ग्रहण करितो ६४७-६४९.

## पर्व ४२ वें– ( पृ. ६५२–६५७ )

दण्डकारण्यांतील वृक्षलतादिकांचें वर्णन ६५२-६५७.

पर्व ४३ वें– ( पृ. ६६१–६६६ )

वनांत फिरणारा लक्ष्मण शम्बूकाकडे येतो ६६१-६६२, शम्बूकाला सूर्यहास-खड्ग लौकरच प्राप्त होईल असें चंद्रनखेनें खरदूषणास सांगितलें ६६२, लक्ष्मणाला खड्गप्राप्ति व शम्बूकाचा खड्गानें वध ६६२-६६३, चंद्रनखेचा पुत्रशोक ६६३-६६५, कन्येचें रूप धारण करून चंद्रनखेनें राम-लक्ष्मणास वरण्याची इच्छा व्यक्त केली. पण त्यांनीं मौन धारण केलें ६६५-६६६.

पर्व ४४ वें– ( पृ. ६७२–६८२ )

पुत्रवध व स्वशीलनाशाचा प्रयत्न कोणी दुष्टानें केला हें वृत्त खरदूषणास चन्द्रनखा सांगते ६७२, खरदूषणाची मंत्र्याबरोबर युद्धाविषयीं सल्लामसलत ६७३-६७५, युद्धांत संकट आल्यास मी सिंहनाद करीन तेव्हां सहाय्यार्थ यावें असें बोलून लक्ष्मण युद्ध करावयास गेला ६७५, रावण सीतेस हरण करून नेतो ६७५-६७९, आसन्नमरण जटायूच्या कानीं रामचंद्र पंचनमस्कार मंत्र देतात ६७९, विरहदुःखी रामचंद्र वृक्षादिकांना सीतावार्ता विचारतात ६७९-६८२.

पर्व ४५ वें– ( पृ. ६८३–६८९ )

विराधित लक्ष्मणाच्या आज्ञेनें खरदूषणाच्या सैन्याशीं लढू लागला ६८३, लक्ष्मणानें खरदूषणाला ठार मारलें ६८४, लक्ष्मण रामाचें सांत्वन करितो ६८५, विराधिताचे नोकर सीतेचा शोध न लागल्यामुळें खिन्न होऊन आले ६८५-६८७, राम-लक्ष्मणाचें अलंकारपत्तनाला गमन ६८८-६८९.

पर्व ४६ वें– ( पृ. ६९५–७०९ )

कामीरावणानें सीतेला स्वानुकूल करण्याचा प्रयत्न केला परंतु तिनें त्याला झिडकारणारें भाषण केलें ६९५, रामचंद्राची कुशलवार्ता समजल्यावरच मी अन्नपाणी घेईन अशी सीतेनें प्रतिज्ञा केली ६९६, चंद्रनखेचा शोक शांत करून रावण शयनगृहीं गेला. मंदोदरीला झोप न येण्याचें कारण सांगतो ६९७-६९८, रावण बलात्कार न करण्याचें कारण सांगतो ६९८-७००, 'रावणाला वश हो' या मंदोदरीच्या वचनाला सीता उत्तर देते ७००, माझी स्वामिनी हो या रावणप्रश्नाला सीतेचें उत्तर ७००-७०१, मायेच्या हत्ती, सिंह वगैरेंनीं भिवविण्याचा प्रयत्न त्यानें केला तथापि सीता भ्याली नाहीं व वश झाली नाहीं ७०१-७०२, सीताहरणाबद्दल रावणाची बिभीषणानें कानउघाडणी केली ७०२-७०४, रावणाच्या भाषणाला मारीचाचें उत्तर ७०४-७०५, सीता वश होत नाहीं असें दूतीनें सांगितलें त्यामुळें

रावण खिन्न होऊन वेड्यासारखा वागतो ७०६, बिभीषणाच्या आज्ञेनें सचिवांनीं लंका यंत्रांनीं दुष्प्रवेश्य केली ७०७-७०८, सीतेचा शोध लागणार नाहीं त्यामुळें राम-लक्ष्मण मरण पावतील अशी व्यवस्था करा अशी सचिवांना बिभीषणाची आज्ञा ७०८-७०९.

## पर्व ४७ वें– ( पृ. ७१३–७२१ )

युद्ध कां घडलें याचें कारण कोणी मनुष्यानें सुग्रीवाला सांगितलें ७१३, सुग्रीवानें विराधिताकडे दूत पाठविला. विराधितानें लक्ष्मणाला सुग्रीवाचा वृत्तांत सांगितला ७१४-७१५, वृद्धांनीं खऱ्या व खोट्या सुग्रीवाची हकीकत सांगितली ७१५-७१८, एकमेकाचें कार्य करूं अशी शपथ जिनमंदिरांत राम व सुग्रीव घेतात ७१८-७१९, राम व लक्ष्मणाचे किष्किंधा नगरीला प्रयाण, दूत पाठविणें व दोन सुग्रीवांचें युद्ध ७१९-७२०, तोतया सुग्रीवाला रामानें मारलें ७२०-७२१.

## पर्व ४८ वें– ( पृ. ७२८–७४४ )

चंद्राभादि कन्यांच्या सौंदर्यादिकांनीं राम प्रसन्न झाले नाहींत ७२८-७२९, लक्ष्मण रागावतो व सुग्रीवाला प्रतिज्ञेची आठवण करून देतो ७२९-७३०, मुनींनीं यक्षदत्ताला ही तुझी माता आहे अशी आठवण करून दिली तशी सुग्रीवाला लक्ष्मणानें प्रतिज्ञास्मृति करून दिली ७३०, यक्षदत्ताची कथा मुनीश्वर सांगतात ७३१-७३३, रावणानें सीतेला हरून लंकेला नेलें असें रत्नजटीनें सुग्रीवाला सांगितलें ७३३, रावणानें सीतेला हरिलें ही वार्ता रामाला रत्नजटीनें सांगितली तेव्हां स्वदेहावरील अलंकार देऊन रत्नजटीला रामानें देवोपगीत नगराचें स्वामित्वही दिलें ७३४, विद्याधरांनीं रामचंद्राला लंकानगरी, रावण व त्याच्या परिवाराची माहिती सांगितली ७३५-७३६, रामचंद्रांनीं लक्ष्मणाच्या भाषणाला पुष्टि दिली. रामचंद्राच्या भाषणानंतर एका वृद्धाचें दृष्टांतपूर्वक भाषण ७३६-७३७, दृष्टांतपूर्वक जाम्बूनदाचें भाषण ७३७-७३८, लक्ष्मणाचें प्रतिदृष्टांतयुक्त भाषण ७३८-७४०, जो सिद्धशिला उचलील तो तुला मारील असें अनंतवीर्य केवलींनीं रावणाला सांगितलें ७४०, राम-लक्ष्मण व विद्याधर सिद्धपरमेष्ठीची स्तुति करितात ७४१, सिद्धशिला उचलल्यावर विद्याधरांचे राम-लक्ष्मणांना राज्य प्राप्ति होईल असें आपसांत विचार ७४२-७४३, दूत पाठवून सीताप्राप्तीचा प्रयत्न करावा असें मंत्री बोलले ७४३-७४४.

# शुद्धिपत्रक.

## ( भाग पहिला )

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ७ | १८ | सधर्मनाथें | सुधर्मनाथें |
| ७ | २६ | त्याच्या | त्याचा |
| ८ | ८ | चरितें | पुराणे |
| १४ | ४ | तो | जो |
| १९ | २८ | श्रणिक | श्रेणिक |
| २९ | २५ | पद्मचरितें | पद्मपुराणे |
| ७३ | १३ | ह्ग्युगेंन | ह्ग्युगानें |
| ७४ | १० | हे | हीं |
| ८७ | १५ | तेंये | तयें |
| ११५ | १२ | नसेचि मुक्ति | मुक्ति नसेचि |
| १३० | ११ | बोलाविल | बोलाविले. |

१३२ मध्यें १५७ श्लोकाचा तिसरा व चौथा चरण पुढीलप्रमाणें—

वदे प्रियेला येथुनि जावें असें न मज वाटे.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १३५ | ७ | सुखी | सुखिं |
| १५८ | ८ | शुभ | शुभा |
| १७१ | १५ | यमपति | यम पति |
| १७२ | १२ | त्याजिले | त्यजिले |
| १७६ | १८ | उनलेला | उचलेला |
| १८१ | २१ | हृदयामधे | हृदयामधें |
| १९० | १९ | अभिलाषित | अभिलषित |
| १९१ | ४ | तो | मग |
| २१० | १३ | मीमो | भीमो— |
| २११ | २५ | अधखाण | अघरवाण |
| २१२ | ३० | दारु | दार— |
| २५४ | २८ | मिळतात ज्या नसे रोध | मिळविती न ज्या असे रोध, |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २७४ | ५ | अमर उभे | देव उभे |
| २७७ | ७ | मुखें भोगिती | सौख्यें भोगिति |
| ३११ | १४ | त्यापिली | स्थापिलीं |
| ३११ | १६ | या परि | यापरी |
| ३२३ | १९ | संतोष वा | संतोषवा |
| ३२९ | १६ | समगम | समागम |
| ३३५ | १९ | झालें श्रीशैलाचें तसें | श्रीशैलाचें तसें झालें |
| ३३६ | १३ | विश्रान्ति घ्यावी | घ्यावि विश्रान्ति |
| ३५१ | २५ | नृप | नृपते |
| ३५५ | ३० | आहे व | आहेत. |
| ३५७ | २२ | त्र्यांयशि | त्र्यांयशी |
| ३६५ | २० | तो | तूं |
| ३६८ | २२ | भरतचक्रें | भरत चक्रें |
| ३७८ | २५ | आणि | आणी |
| ३८२ | २५ | अघातिककर्मा | अघातिकर्मा |
| ३८६ | ५ | हास्य | हास्यें |
| ३८९ | २ | किर्तिधर | कीर्तिधर |
| ३९७ | १९ | दायीपासून | दायीपासुन |
| ३९९ | २८ | घनागमा | घनागमा |
| ४१४ | ५ | स्थापुनि | स्थापून |
| ४१४ | १७ | विलसिति | विलसित |
| ४१८ | १२ | तो भीतिरहित दशरथ | दशरथ भीतिरहित तो |
| ४२४ | २ | एशीं | ऐशीं |
| ४३१ | २३ | येई | येइ |
| ४४४ | ५ | इक्ष्याकु | इक्ष्वाकु |
| ४५१ | ९ | लिहीतसे | लिहूनसे |
| ४६७ | ४ | ते | जे |
| ४६९ | १७ | झालों | झालों |
| ४७९ | ११ | चंदनशीतजलानें त्याचा | चन्दनशीतजलानें |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४८० | १५ | बोल | बोले |
| ४८० | २३ | जत | जन |
| ४८३ | ११ | जनक विदेहागर्भी आली म्हणुनि प्रमोद बहु झाला या दोन चरणाऐवजी अन्यप्राणी राशीगर्भी आला असें कळे त्याला असें वाचावें. | |
| ५२९ | ३ | तयाचें | तयांचे |
| ५४१ | ४ | ह | हें |
| ५४४ | १३ | विहरति ते | विहरें तें |
| ५४९ | ३ | यांन | यांत |
| ६२५ | १७ | साधुनि | साधी |
| ६२५ | १८ | प्रियव्रता प्राप्त होय | झाला संप्राप्त त्यास |
| ६२६ | ३० | वातयनिं | वातायनिं |
| ६५७ | ३ | जणु | जणू |
| ६५७ | ८ | गंधजलाचा | गंध जलाचा |
| ६६५ | ३ | गात्र | वक्र |
| ६८५ | २ | असे | तुम्ही |
| ६९५ | १७ | पादपद्माघातें | पादपद्मघातें |
| ६९६ | ५ | उत्कण्ठ | सोत्कण्ठ |

# पद्मपुराण
## ( जैन रामायण )

---

## पहिल्या पर्वाचा सारांश

### जिनपतिस्तुति

महावीर प्रभूंना सर्वज्ञता प्राप्त झाल्यावर या युगांत आर्यखंडांतील अनेक देशांत विहार करून त्यांनीं जिनधर्माचा उपदेश केला. रविषेणाचार्यांनीं त्यांना वंदन करून नंतर वृषभादि पार्श्वनाथ जिनेश्वरापर्यंत बावीस तीर्थंकरांच्या गुणांची स्तुति केली.

### रामायण-रचनेची प्रतिज्ञा

यानंतर विसाव्या श्रीमुनिसुव्रतनाथांना वंदन करून त्यांच्या तीर्थांत उत्पन्न झालेल्या रामचंद्राचें चरित्र सांगण्याची प्रतिज्ञा त्यांनी केली. महापुरुषांच्या चरित्र-कथनानें सम्यग्ज्ञान वाढतें, यश पसरतें व पुण्यसंचय होतो. म्हणून रामचंद्राचें चरित्र ऐकावें अशी विनंती केली आहे. महापुरुषांची जीवन-कथा सांगण्याकडे व ऐकण्याकडे आपलें मुख, कान व मन यांना प्रवृत्त करावें म्हणजे वक्ता व श्रोता यांना पुण्यप्राप्ति होते.

### वक्त्यांची परंपरा

श्रीरामचंद्रांची कथा महावीर भगवंतांनीं गौतम गणधरांना सांगितली. ती परंपरेनें चालत आली. मुनिवर्य सुकीर्ति यांच्या लिखित कथेच्या आधारानें रविषेणाचार्यांनीं हें रामचरित सात अधिकारांत लिहिलें.

१ स्थित्यधिकार : यांत जीवादि द्रव्यांचें संक्षेपानें वर्णन केलें आहे.

२ वंशोत्पत्त्यधिकार : इक्ष्वाकु, सोम, विद्याधर व हरि या चार वंशांच्या उत्पत्तीचें वर्णन.

३ प्रस्थानाधिकार : दशरथानें भरताला राज्य दिलें. रामचंद्र सीता व लक्ष्मणाबरोबर वनवासाला गेले हें वर्णन.

४ संयुगाधिकार : रामलक्ष्मणांचें रावणाबरोबर युद्ध होऊन त्यांचें अयोध्येस आगमन.

५ लवणांकुश-संभूति : गर्भवती अवस्थेंत सीतेचा त्याग. वज्रजंघ राजाचें आगमन व त्यानें सीतेचें बहिणीप्रमाणें केलेलें संरक्षण. रामलक्ष्मणा-बरोबर लवणअंकुश यांचें युद्ध. सीतेचें अग्निदिव्य.

६ भवाधिकार : राम, लक्ष्मण, बिभीषण, रावण इत्यादींच्या अनेक भवांचें वर्णन.

७ मोक्षाधिकार : हनुमान्, बिभीषण, रामचंद्र इत्यादींना मोक्षप्राप्ति.

# पद्मपुराण

## ( जैन रामायण )

## पहिलें पर्व – जिनपतिस्तुति

### आर्या

जो सिद्ध[१] नि भव्यांच्या आहे इष्टार्थ-सिद्धिचा हेतु ।
संसार-सागराला तरावयाला असेचि जो सेतु[२] ॥ १ ॥
उत्तमदर्शन उत्तमबोध नि चारित्र वर्णिले ज्यानें ।
मुक्तिसुखाचें कारण त्या वीरा नमन काय[३]वचनमनें ॥ २ ॥
ज्याच्या पदपद्माचे केसर देवेन्द्रमुकुटकान्तीस ।
चिकटे त्रिलोकमङ्गल नमन असो त्या जिनेशवीरास ॥ ३ ॥
अवसर्पिणींत[४] पहिल्या वृषभा जिनपुङ्गवा[५] विधात्यास[६] ।
विद्या समस्त दे जो योगिवरा नमन त्या स्वयम्भूस[७] ॥ ४ ॥
अजितास नमन माझें बाह्यान्तरशत्रु[८] जिंकिले ज्यानें ।
त्या शम्भवास वन्दन शं सुख भक्तास होय नियमानें ॥ ५ ॥
अभिनन्दिलें त्रिलोकें ज्याला अभिनन्दना अशा देवा ।
वन्दन माझें सन्तत ज्याची सुरनिकर[९] करिति पदसेवा ॥ ६ ॥

---

१ निर्मल शुद्ध आत्मस्वरूप ज्याला प्राप्त झालें तो. २ पूल. ३ शरीर. ४ उपभोग, आयुष्य, अनुभव, शरीराची उंची ज्या कालांत कमी होत जातात असा काळ. ५ श्रेष्ठ. ६ असि, मषि, कृषि, वाणिज्य, शिल्प आदिक जीवनाचे उपाय सांगून ज्यानें धर्मसृष्टि उत्पन्न केली त्या वृषभजिनेश्वराला विधाता म्हणतात. ७ परोपदेशावांचून मोक्षमार्ग स्वतः जाणून व त्याचें आचरण करून ज्यानें अनन्त ज्ञान, दर्शन, सुख व शक्ति प्राप्त करून घेतली तो स्वयंभू होय. ८ क्रोध, मान, माया, लोभ हे अन्तरंग शत्रु होत. ९ समूह.

सुमति-जिना मी नमितों सुमति जयाची मतान्तरां[1] निरसी ।
भक्तास सुमति देऊनि तल्लीन करी तया निजात्मरसीं ॥ ७ ॥
विकसित-पद्मसमूहासम शोभा ज्याचिया शरीराची ।
त्या पद्मप्रभदेवा वन्दन जो सर्वदा भवा[2] जाची ॥ ८ ॥
मी वन्दितों सुपार्श्वा सुन्दर दिसतात पार्श्व देहाचे ।
ज्याचे तो सप्तम जिन पाशा नाशो समस्त मोहाचे ॥ ९ ॥
शारदपूर्णनिशाकर[3]-तुल्य धरी कान्ति जो स्वदेहांत ।
तो चन्द्रप्रभ जिनवर आम्हां देवो भवार्णवीं हात ॥ १० ॥
कुन्दसुमासम[4] ज्याच्या दन्तांची कान्ति दशदिशा उजळी ।
त्या पुष्पदन्तदेवा नमितों ज्याच्या रमा सदा जवळी ॥ ११ ॥
शीतल शुक्लध्याना[5] देई शीतलजिनास मी नमितों ।
नमितों मी श्रेयांसा जो श्रेयोधर्म[6]देशना देतो ॥ १२ ॥
वसुपूज्य वासुपूज्या[7] सुजनेशा नमन सर्वदा माझें ।
ज्याच्या चरणयुगाला वन्दन करिती त्रिलोकसुरराजे ॥ १३ ॥
रागद्वेषादिक मल जन्माचें मूळ[8] दूर त्याहून ।
जो त्या विमलजिना मी नमितों करकमलयुगल जोडून ॥ १४ ॥
सुन्दर दर्शन[9] ज्याचें ज्ञान जयाचें अनन्त, मी त्यास ।
नमितों अनन्तनाथा अन्त जयाच्या नसेचि सत्यास ॥ १५ ॥
नमितों बहु-भावें मी ध्रुवधर्माधार[10] धर्मनाथास ।
ज्याचा धर्म अहिंसा दावी सुजनास मुक्तिपन्थास ॥ १६ ॥
निजशान्तीनें ज्यानें मोहादिक शत्रु जिंकिले असती ।
त्या शान्त शान्तिनाथा करितों मनिं भाव ठेवुनि प्रणति[11] ॥ १७ ॥

---

१ बौद्धादिकमतें. २ संसार. ३ शरद् ऋतूंतील पौर्णिमेचा चन्द्र. ४ कुन्दपुष्पाप्रमाणें. ५ कषायरूपी धूळ नाहींशी झाली किंवा ती उपशम पावली असतां जें आत्मध्यान निर्मल होतें त्यास शुक्लध्यान म्हणतात. ६ मोक्षास श्रेय म्हणतात. त्याची प्राप्ति ज्यानें होते त्या सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्रास श्रेयोधर्म म्हणतात. त्याची देशना म्हणजे उपदेश. ७ देवपूज्य. ८ संसारभ्रमणाचें मुख्य कारण. ९ निर्दोषमत. १० अविनाशी अहिंसा-धर्माला आधार असलेला. ११ नमस्कार.

कुन्थ्वादि[1] प्राण्यावरि ज्यांचा राही सदा दयाभाव ।
त्या कुन्थुजिनवरांना नमितों भवसागरांत जे नाव ॥ १८ ॥
अरनाथा मी नमितों वैराग्यें स्मर[2] निरासिला ज्यांनीं ।
मोहाद्यरि घाताया ज्यांना बुध ठेविती नित स्मरणीं ॥ १९ ॥
घेउनि तपःकुठारा[3] मल्लिजिनांनीं कुकर्मवल्लीस ।
तोडून टाकिलें झणि त्यांच्या नमितों हितार्थ चरणास ॥ २० ॥
सर्व सुरासुर नमिती मुक्तिसुखाची धरून ज्या आस ।
मी नमिनाथा नमितों माझें अज्ञान दूर व्हायास ॥ २१ ॥
नाम असे क्षम[4] ज्याचें नानारिष्टां[5] विनष्ट करण्यास ।
चक्राच्या धावेसम मजला तो वन्द्य सतत नेमीश ॥ २२ ॥
नागेन्द्रानें रचिला फणमण्डप भक्तिनम्र होऊन ।
मस्तकिं ज्याच्या नमितों त्या पार्श्व जिनास हात जोडून ॥ २३ ॥
मुनिसुव्रतनाथांना वन्दन माझें सुनम्र होऊन ।
ज्यांच्या तीर्थी[6] झाले दशरथसुत रामचन्द्र गुणपूर्ण ॥ २४ ॥

( ग्रन्थकाराचें कथन )

सुगुणगणांचें घर जे ज्यांचें होतें सदा उदार मन ।
सांगेल चरित त्यांचें श्रुतकेवलिहून[7] अन्य कोण जन ॥ २५ ॥
माझ्या समान देखिल झाला उद्युक्त तें वदायास ।
कारण परम्परेनें[8] आलें तत्कथनिं नैव आयास ॥ २६ ॥
जो मार्ग गर्ज-वरांचा[9] तेणें जातात हरिण विस्मय न ।
मोठ्या योद्धयांमागुनि जाती छोटे रणीं उदाहरण ॥ २७ ॥
सूर्यप्रकाशितार्थां बघती जन वाटतो न आयास ।
सूचीकृतरन्ध्राच्या[10] मण्यांत दोरा करी प्रवेशास ॥ २८ ॥
बुधपङ्क्तीनें[11] चालत आलेलें चरित कथिन रामाचें ।
भक्तिप्रेरित मम मति होउनि उद्युक्त बोलते वाचें ॥ २९ ॥

---

१ सूक्ष्म व स्थूल प्राणिमात्रावर. २ कामविकार. ३ तपरूपी कुऱ्हाड. ४ समर्थ. ५ अनेक विघ्नें. ६ मुनिसुव्रतनाथाच्या धर्मप्रवर्तनकालीं. ७ आचार, सूत्रकृत, स्थानाङ्ग, समवायाङ्ग आदि बारा अङ्गांचें पूर्ण श्रुतज्ञान ज्यांना असतें अशा महामुनींना श्रुतकेवली म्हणतात. ८ गुरुपरम्परेनें. ९ श्रेष्ठ हत्तींचा. १० वज्राच्या सुईनें भोक पाडलेल्या. ११ विद्वान् आचार्यपरम्परेनें.

चिन्तन विशिष्ट ज्याचें श्रेयस्कर[1] तें सुकार्य बहु मोठें ।
पुण्याश्रित मम मति ही कथील हें रामचरित मज वाटे ॥ ३० ॥

( पुण्य-पुरुषांच्या चरितकथनानें सद्गुणांची अभिवृद्धि होते. )

बुध हो अपुली वाणी सुजनकथावर्णनांत लावावी ।
जे नच करिती ऐसें वाणी त्यांची अघास[2] विपुला वी[3] ॥ ३१ ॥
कीर्तन महानराचें करि त्याचें वाढतें चि सुज्ञान ।
निर्मल यश बहु पसरें पापाचा नाश होतसे तूर्ण[4] ॥ ३२ ॥
रोगें पीडित मानव-शरीर अत्यल्पकाल हें टिकतें ।
सांगे सुकथा त्याचें यश आरविचन्द्रतारका[5] उरतें ॥ ३३ ॥
यास्तव आत्मज्ञ नरें पुण्यनराचें चरित्र सांगावें ।
तेणें यशःशरीरा स्थिरता येते असें मनीं ध्यावें ॥ ३४ ॥
रमणीय सज्जनांना प्रमोददायी[6] वदेल जो सुकथा ।
इहपरलोकीं त्याला मिळेल सुख दाखवील तो सुपथाँ[7] ॥ ३५ ॥

( चांगले व वाईट अवयव )

सुकथाचि ऐकती जे कान जगीं तेचि धन्य होतात ।
कर्णाकारचि[8] दुसरे पूर्ण मलें पापयुक्त वदतात ॥ ३६ ॥
सुजना वर्णिति ऐसे ज्याच्या शीर्षांतें[9] शब्द घुमतात ।
मस्तक तेंच खरोखर नारळ इतरास सुज्ञ वदतात ॥ ३७ ॥
सत्कीर्तनामृताचा घेई जी स्वाद जीभ तीच गणा ।
दुर्वाक्याची धारा जिला तिला सुजनहो सुरीच म्हणा ॥ ३८ ॥
ते श्रेष्ठ ओष्ठ समजा जे सज्जन-कीर्तनांत रमतात ।
अन्य जळूच्या माना पाठीच्या आकृतीस धरितात ॥ ३९ ॥
सज्जन-पुरुषकथांच्या सङ्गिं रमतात तेचि शुभ दांत ।
जे इतर ते मुखांतिल कफरोधकपाटतुल्य[10] गणतात ॥ ४० ॥
सज्जनकथेंत रमलें बोले त्यालाचि सुज्ञजन वदन[11] ।
दन्तकृमींनीं भरलें मलिन दुजें चर्मकुण्ड जणु जाण ॥ ४१ ॥

---

१ कल्याण करणारें. २ पापास. ३ प्रसवते. ४ शीघ्र. ५ सूर्य, चन्द्र व नक्षत्रें राहतील तोपर्यन्त. ६ आनन्द देणारी. ७ चांगल्या मार्गाला. ८ कानाच्या आकाराचे. ९ मस्तकांत. १० कफ-थुंका अडविणाऱ्या कवाडाप्रमाणें. ११ तोंड.

श्रेयस्कर वचनांना जो वदतो ऐकतो चि वा मनुज ।
त्यासचि पुरुष वदावें इतर नरा सुज्ञ समजतात अज[1] ॥ ४२ ॥

( सज्जन-दुर्जन स्वभाव वर्णन )

गुणदोष-मिश्रणांतुनि सज्जन गुणवृन्द फक्त घेतात ।
दुग्धास हंस घेती केवल जल राहतें सुपात्रांत ॥ ४३ ॥
गुणदोषांतुनि घेती खल मानव फक्त दोषराशीस ।
गजगण्डस्थलमौक्तिक[2] टाकुनि घेतात काक मांसास ॥ ४४ ॥
निर्दूषण काव्यांतहि खल मानव पाहतात दोषास ।
घूकास[3] सूर्य दिसतो तमालदलकाळें[4] वदति विद्वांस ॥ ४५ ॥
सज्जन दुर्जन यांचा स्वभाव ऐसा मनांत चिन्तून ।
कविवर कथा रचाया होती उद्यत न सोडिती यत्न ॥ ४६ ॥
सुकथा रचणें आणि श्रवण तियेचें मनीं प्रमोदून ।
करणें पुण्या कारण आहे वदतात वर्धमान जिन ॥ ४७ ॥

( पद्मचरित्राची कर्तृपरम्परा )

हें पद्मचरित कथिलें गणेश्वरा गौतमास वीरजिनें ।
तेणें हि धारिणीसुतें[5] सुधर्मनाथा[6] प्रमोदयुक्तमनें ॥ ४८
कथिलें प्रभवा नन्तर सधर्मनाथें तयें सुकीर्तीसँ[7] ।
यापरि चालत आलें रविनें[8] रचिलें धरून मनिं हर्ष ॥ ४९ ॥

( सात अधिकारांचें पद्मचरित्र )

'स्थिति' नांवाचा पहिला 'वंशसमुत्पत्ति' हा असे दुसरा ।
'प्रस्थान'[9] तिजा आहे चौथा अधिकार 'युद्ध' न च विसरा ॥ ५० ॥
'लवणाङ्कुश जन्म' असा पञ्चम अधिकार यांत जाणावा ।
'पूर्वभववर्णनाभिध'[10] असे सहावा मनांत तो ध्यावा ॥ ५१ ॥
मोक्षाधिकार सप्तम कथिला अधिकार पद्मचरितांत ।
पठण श्रवण करी जो त्याच्या होईल सकलदुरितान्त[11] ॥ ५२ ॥

---

१ बकरा. २ हत्तीच्या गण्डस्थलांतील मोतीं. ३ घुबडास. ४ तमालवृक्षाच्या पानाप्रमाणें काळा. ५ धारिणीचा पुत्र. ६ महावीरप्रभूचे चौथे गणधर. ७ सुकीर्ति आचार्यांना. ८ रविषेण आचार्यांनीं. ९ वनाकडे प्रयाण. १० मागच्या जन्मांचें वर्णन. ११ पापांचा नाश.

रामादिक मुनिवर्या आणिति जे स्मृतिपथांत नर त्यांचें ।
पाप लयाला जातें सुपुण्य पदरांत तैं पडे साचें ॥ ५३ ॥
जे ऐकती तयांचें चरित्र एकाग्रचित्त ठेवून ।
स्वर्गादि-वैभवासह मिळे तयांना विमुक्तिचें सदन ॥ ५४ ॥
होउनि जिनदास सदा रामाचें हें चरित्र ऐकावें ।
रविच्या महाप्रकाशीं स्खलन नराचें कसें बरें व्हावें ॥ ५५ ॥

इति रविषेणाचार्यकृते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे पद्मचरिते प्रथमं पर्व ॥ १ ॥

---

## दुसऱ्या पर्वाचा सारांश

( महावीरप्रभूचा धर्मोपदेश )

श्रेणिक मगध देशाचा राजा होता. राजगृहनगरी त्याची राजधानी होती. राजा न्यायी असल्यामुळें प्रजा धनधान्यसंपन्न व सुखी होती. या राजगृह-नगरांत कलावन्त, विद्वान् व धनिक लोक राहत असत. हें विद्येचें माहेरघर असल्यामुळें विद्यार्थी विद्यार्जनासाठीं येऊन येथें राहत असत. राजा श्रेणिक पराक्रमी व राजनीतीचा जाणता असल्यामुळें शत्रु या नगरीकडे डोळा उघडून पाहत नसत. राजा व प्रजा धार्मिक असल्यामुळें या नगरांत नेहमीं तपोधनांचें आगमन होत असे. त्यामुळें राजा व प्रजा यांचें अहिंसा धर्मावर दृढ श्रद्धान होतें.

राजा श्रेणिकाच्या दृढश्रद्धेचें वर्णन इन्द्र देखील स्वर्गसभेंत करीत असे. राजा श्रेणिकाच्या पट्टराणीचें नांव चेलना असें होतें. ती सतीशिरोमणि व दृढसम्यक्त्वी होती. तिच्यामुळें राजा जिनधर्मी झाला.

एकेवेळीं ज्यांना देव, दानव व मनुष्य वन्दन करितात असे वीरजिन राजगृह नगरीच्या जवळ विपुलाचल पर्वतावर आले. या वीर प्रभूचें पूर्वचरित्र थोडक्यांत याप्रमाणें आहे:— जन्मदिनीं वीर बालकाला इन्द्रांनीं मेरुपर्वतावर नेऊन पाण्डुक-शिलेवर त्याचा क्षीरसमुद्रजलानें अभिषेक केला. वीर बालकानें आपल्या पायाच्या आंगठ्यानें मेरुपर्वत कंपित केला म्हणून देवांनीं त्याचें 'महावीर' हें नांव ठेविलें. भगवंताचा जन्म झाला तेव्हांपासून त्यांच्या पित्याचा प्रभाव वाढत गेला. त्याला अनेक नजराणे देऊन राजे वश झाले म्हणून त्याचें 'सिद्धार्थ' हें नांव अन्वर्थक झालें.

भगवन्तांना गर्भापासूनच मति, श्रुत व अवधि हीं तीन ज्ञानें होतीं. तरुणावस्थेंतही ते विषयविरक्तच होते. सर्व संपत्ति नश्वर जाणून जेव्हां त्यांना वैराग्य झालें तेव्हां लौकान्तिक देवांनीं त्यांची प्रशंसा केली. त्यांनीं दीक्षा घेऊन मोहादि चार घातिकर्मांचा नाश करून सर्वज्ञता प्राप्त करून घेतली. त्यांच्या मुखांतून कल्याण करणारा अहिंसा धर्माचा उपदेश प्रगट झाला. विहार करीत करीत ते विपुलाचलावर आले. त्यांचें आगमन झालेलें पाहून श्रेणिकाला फार हर्ष झाला. तो आपली धर्मपत्नी चेल्ना, अक्रूर, वारिषेण, अभय व विजयवाह हे चार पुत्र व अनेक राजे यांच्यासह प्रभूच्या समवसरणसभेंत आला. प्रभूंची स्तुति करून व वन्दन करून मनुष्यसभेंत बसला.

श्रीगौतमगणधरानें 'प्रभो, या भव्यजनांना धर्माचें स्वरूप सांगा अशी विनंति केली. तेव्हां गंभीर, हितकर व सुन्दर अशा वाणीनें त्यांनीं जीवादिक सात तत्त्वांचें स्वरूप सांगून धर्म व अधर्म आणि त्यांचें पाप-पुण्यात्मक फल सांगितलें. देव, मनुष्य, नारक व पशु या गतींमध्यें जन्म घेणाऱ्या जीवांना संसारी म्हणतात व या चार गतींनीं रहित झालेले जीव ते मुक्त होत. मुक्तांचें सुख अनन्त व अनुपम आणि दुःखरहित असतें. त्यांना पुनः संसारदशा प्राप्त होत नाहीं.

जे जीव अहिंसा धर्माची कास धरतात, पांच पापांचा त्याग करितात. क्रोधादिकांचे अधीन होत नाहींत, सर्व परिग्रहांना त्यागून संयम धारण करितात, त्यांना देवपद मिळतें व तेथून मनुष्यगतींत येऊन ते नारायण, बलभद्र व चक्रवर्ति होतात. अत्यंत निष्परिग्रह होऊन दर्शनविशुद्ध्यादि सोळा भावनांचें चिन्तन करून याच धर्मानें ते त्रिलोकवन्द्य तीर्थंकर होतात. याप्रमाणें वीरप्रभूंनीं धर्माच्या फलांचें वर्णन केलें.

पांच पातकांत जे आपलें आयुष्य घालवितात; क्रोधादिक कषाय ज्यांचे शान्त होत नाहींत; लोभ प्रतिदिवशीं ज्यांचा वाढतच असतो; प्राण्यांना दुःख देण्यांत ज्यांना हर्ष वाटतो असे जीव दुःख भोगीत कुगतींत भ्रमण करितात. हें अधर्माचें फल होय.

याप्रमाणें धर्माधर्माचें वर्णन ऐकून सर्व देवांना व माणसांना आनंद वाटला. कांहीं लोकांनीं विरक्त होऊन मुनिदीक्षा घेतली. कांहींनीं अणुव्रतें व कांहींनीं सम्यग्दर्शन धारण केलें.

श्रेणिकानें धर्मश्रवणानें आनंदित होऊन आपल्या नगरांत प्रवेश केला. रात्रीं तो झोपला असतां त्यानें स्वप्नांत महावीर प्रभूंना पाहिलें व त्यानें स्वप्नांत प्रभूंना अनेक प्रश्न विचारले. प्रभूंनीं उत्तर देऊन त्याच्या मनांतील संशय दूर केला असें त्यास वाटू लागलें.

पहाटेच्या वेळीं मंगलवाद्यांच्या ध्वनीनें तो जागा झाला. त्याचें मन फार प्रसन्न झालें. पण सकाळीं त्याच्या मनांत राम, रावण, कुंभकर्ण इत्यादिकाविषयीं जे लोकापवाद ऐकिले आहेत व त्याविषयीं जो संशय उत्पन्न झाला तो आपण वीर-भगवंतांना विचारून नाहींसा करून घ्यावा असा विचार आला व त्याचवेळीं एका वृद्ध विद्वानानें एक सुंदरसा श्लोक म्हटलेला राजानें ऐकला– 'एखाद्या विषयाचा अभिप्राय माहित असला तरीही तो विषय गुरुपुढें मांडावा व त्याचा निर्णय गुरूंनीं केला म्हणजे त्यांत आनन्द मानावा.' हा श्लोकाभिप्राय ऐकून राजानें शय्या-त्याग केला व स्नानापूजनादिक करून तो सभेंत आला असतां सामन्तादिक राजांनीं प्रसन्न अन्तःकरणानें त्याचें स्वागत केलें.

# दुसरें पर्व—मगधदेश वर्णन

## जाति—चंद्रकांत

जम्बूद्वीपीं भरतक्षेत्रीं देश असे मगध ।
पुण्यवन्त जन राहति तेथें परि न धनें अन्ध ॥ १ ॥
शेतें तेथिल नानाधान्यें पूर्ण सदा असतीं ।
धान्यांच्या बहुराशि गिरीच्या शिखरां बहु हसती ॥ २ ॥
मळे उसांचे मन्द मन्दशा पवनें[1] डुलतात ।
निजरस प्याया जणु पथिकांना बोलाविति सतत ॥ ३ ॥
पिकल्या साळी सुगन्ध सुटला सगळ्या शेतांत ।
भुङ्गे त्यांच्या सभोंवती नित गुञ्जन[2] करितात ॥ ४ ॥
गोधूमादिक[3] धान्यें तेथें वाढुनि निर्विघ्न ।
दारिद्र्याला शेतकऱ्यांच्या करितीं तीं भग्न ॥ ५ ॥
मधुर-रसानें भरले जेथें कोमल तृण खाती ।
गाई बैल नि म्हशी पुष्टशा यथेच्छ वनिं चरती ॥ ६ ॥
जेथें चरती हरिणांचे गण टपोर डोळ्यांचे ।
जनां भासती सहस्रलोचन[4] जणु हे शचिपतिचे[5] ॥ ७ ॥
पसरे जेथें धवल केतकीपराग[6] चोंहिकडे ।
जनास भासे गङ्गासिकता-प्रदेश[7] हा इकडे ॥ ८ ॥
शुकचोंचींचें अग्र नि वानर-वदनें बहु लाल ।
ववतां वाटे दाडिमसुमगण[8] पसरे बहु लोल[9] ॥ ९ ॥
द्राक्षामण्डप जेथें दिसती जणु वनदेवींची ।
पाणपोइ ही पथिकां मार्गश्रमहारक[10] साची ॥ १० ॥
सरोवरें बहु दिसतीं जेथें कमलें फुललेलीं ।
असङ्ख्य देवीनयनें जणु हीं येथें अवतरलीं ॥ ११ ॥

---

१ वाऱ्यानें. २ गूं गूं शब्द. ३ गहूं, साळी आदिक. ४ हजार डोळे. ५ इन्द्राचे. ६ पांढरी केवड्याची धूळ. ७ गंगानदीचा बारीक रेतीचा प्रदेश. ८ डाळिंबाच्या फुलांचा समूह. ९ चंचल. १० रस्ता चालून झालेला श्रम दूर करणारी.

तुङ्गतरङ्गें नर्तन करितीं गातीं मधुगाणीं ।
हंसरवांनीं सरोवरें हीं सुधा[1] गमे पाणी ॥ १२ ॥
हंसांचा गण सरोवरामधिं मधुररवें रमतो ।
तेणें यांचा धवलदेश हा जननयनां हरितो ॥ १३ ॥
ग्रामीं ग्रामीं संगीताची आवड बहुत दिसे ।
मृदङ्गमधुरध्वनि नित कानीं प्रमोद देत असे ॥ १४॥
जिनप्रवचनाञ्जनें[2] जनांची निर्मल दृष्टि बने ।
मुनिवर्यांच्या तपोऽनलांनीं[3] जळतीं पापवनें ॥ १५ ॥

( राजधानी राजगृहाचें वर्णन )

या देशामधिं राजगृहाभिध सुन्दर पुर आहे ।
जणु जगताचें पुष्पामोदें[4] यौवन हें पाहे ॥ १६ ॥
उटी केशरी अङ्गीं ज्यांच्या ऐशा नृपमहिषी[5] ।
विहरत असतां आकर्षिति त्या जनलोचनपक्षी ॥ १७ ॥
श्रेष्ठ मानिती मुनि नगरा या तपोवनस्थान ।
वेश्यागण या सुन्दर वदती रतिलीलासदन ॥ १८ ॥
कलावन्तगण याला म्हणती जणु नर्तनगृह हें ।
शत्रुवृन्द परि भयें मानिती यममन्दिर आहे ॥ १९ ॥
नानाशास्त्राभ्यासी मानिति सरस्वतीसदन ।
गुरुकुल वाटे विद्यार्थ्यांना यासम दुसरें न ॥ २० ॥
सुजनसंगमस्थान असे हें पुर मानुनि येती ।
सज्जन संतोषाची ज्यांच्या मनांत नित वसती ॥ २१ ॥
जे शरणागत वज्रपञ्जरासम[6] हें पुर भासे ।
न्यायान्यांना जणु लक्ष्मीचें कोषागार दिसे ॥ २२ ॥
या नगराच्या सभोंवती तट शैलासम थोर ।
खंदक ज्याचा विशालसागर वाटे गम्भीर ॥ २३ ॥

( मगधदेशाधिपति श्रेणिक )

या नगराचा स्वामी श्रेणिक नृप प्रसिद्ध असे ।
सुरपतिधनुसम[7] धनुष्य ज्याचें सुन्दर बहुत दिसें ॥ २४ ॥

---

१ अमृतासारखें. २ जिनेश्वराच्या शास्त्ररूप अंजनानें. ३ तपरूपी अग्नींनीं. ४ फुलांच्या सुगंधानें. ५ राजाच्या राण्या. ६ वज्रांच्या पिंजऱ्यासारखें. ७ इन्द्रधनुष्यासारखें.

मेरुतुल्य जो कल्याणांची[1] प्रकृति[2] धरी सतत ।
समुद्रसम जो सीमोल्लंघन[3] न करी गुणवन्त ॥ २५ ॥
करी कलांचें[4] ग्रहण म्हणुनि जो चन्द्रासम होता ।
लोकां धारण करी धरेसम हितकर तो प्रणता ॥ २६ ॥
प्रतापशाली[5] अशा तयाला बुध रवि वदतात ।
धनदा[6] लज्जित निजविभवानें तो करि नृप सतत ॥ २७ ॥
शौर्यें लोकां रक्षुनि ही तो दयार्द्र हृदय धरी ।
लक्ष्मीपति तो असूनही नृप गर्वा दूर करी ॥ २८ ॥
सर्व शत्रु जरि तयें जिंकिले शस्त्र-व्यायामा ।
प्रतिदिनिं करि तो नृपाल ठेवुनि निजपरहितकामा[7] ॥ २९ ॥
न सङ्कटीं ही हृदय तयाचें चिन्ताकुल होतें ।
प्रणतजनीं ही चित्त तयाचें आदरयुत असतें ॥ ३० ॥
लवमात्रहि मल[8] चरितिं न ज्याच्या ऐशा साधुगणा ।
मणिवैभव तो मानी[9] मानी कुलदीपक राणा ॥ ३१ ॥
परि रत्नांना पृथ्वीवरचे समजुनि पाषाण ।
धराधिपति तो यतिरत्नांचे नित पूजी चरण ॥ ३२ ॥
प्रीति तयाची यशांत सन्तत मानि तया प्राण ।
जीवन नश्वर जरत्तृणासम[10] समजे नृप निपुण ॥ ३३ ॥
नरपति रक्षण करीत असतां विशाल भूमीचें ।
वायु हि हरण न करी कुणाचें नृपभय धरि साचें ॥ ३४ ॥
प्रजाजनांना रक्षित असतां हिंस्रप्राणी[11] ही ।
प्रवृत्त होति न हिंसेमध्ये रमे दयेंत मही[12] ॥ ३५ ॥
त्यागगुणाचा अन्त न लागे याचकवृन्दास ।
शास्त्रें जाणु न शकलीं त्याच्या प्रज्ञापुंजास[13] ॥ ३६ ॥

---

१ सोन्याची, नृपपक्षीं लोकहिताची. २ स्वभाव. ३ तटाचें उल्लंघन, नृपपक्षीं लोकमर्यादांचें उल्लंघन. ४ चन्द्र सोळा कला धारण करितो. नृपपक्षीं चित्र, वादनादि ६४ कला. ५ कडक उन्हानें शोभणारा, नृपपक्षीं पराक्रमानें शोभणारा. ६ कुबेराला. ७ स्वकीय व प्रजाजनांचे हिताची इच्छा. ८ दोष. ९ अभिमानी. १० जुन्या गवताप्रमाणें. ११ क्रूर वाघ वगैरे. १२ भूतलावरील लोक. १३ बुद्धिसमूह.

सरस्वतीला त्याच्या लागे न गुणांचा अन्त ।
महिमा त्याची अगाध होती पराक्रमी शान्त ॥ ३७ ॥
सुगुणसंपदा आकळणें हें मनुजा शक्य नसे ।
सम्यक्त्वाचें[1] वर्णन केलें इन्द्रें बहु सुरसें ॥ ३८ ॥
संरक्षी तो स्वबाहुदण्डें सगळ्या पृथ्वीस ।
खंदक तट नि स्वसैन्य केवल कारण शोभेस ॥ ३९ ॥
असे चेलना त्याची पत्नी सतीशिरोमणि जी ।
तिच्यांत सम्यक्त्वादिक असती असङ्ख्य गुणराजी[2] ॥ ४० ॥

( महावीर-जिनाचा विहार व त्यांचें चरित्र-कथन )

एके वेळीं राजगृहाच्या समीप वीरजिन ।
आले ज्यांना वन्दिति भावें समस्त नृसुरगण ॥ ४१ ॥
त्रिज्ञानासह[3] सौख्य जयाला गर्भातचि होतें ।
त्या वीराच्या वर्णूं शकतो कोण सुचरितातें ॥ ४२ ॥
जन्माभिषवीं उत्सव असतां होत सुमेरुशिरीं ।
देवेन्द्रासह सर्व सुरांना विस्मित वीर करी ॥ ४३ ॥
पादाङ्गुष्ठें[4] मेरु कम्पवी हो नच आयास ।
महावीर हें नाम सुरेशें दिलें तदा त्यास ॥ ४४ ॥
जन्मानन्तर त्या पूर्वींही कुबेर वृष्टि करी ।
मणिकनकांनीं जिनजनकाचा सन्तत सौधें[5] भरी ॥ ४५ ॥
स्थापी ज्याच्या अंगुष्ठामधिं वासवें[6] अमृतास ।
शरीर वाढे इच्छी वीर न जननीदुग्धास ॥ ४६ ॥
बालपणीं सुरकुमार येती सौधीं खेळाया ।
रमवुनि जिनमन मोद पावती तुलना नैव जया ॥ ४७ ॥
पाहुनि लीला बालपणीच्या जननीजनकास ।
मानी मोदें नसे तयांची जो न धरी कास ॥ ४८ ॥
नृपाल आले नानाविधसे घेउनि नजराणे ।
रथगजवाजी[7] अमूल्य रत्नें पूजिति वहु यत्नें ॥ ४९ ॥

१ खरे देव, गुरु व शास्त्र यांवरील श्रद्धेचें. २ गुणपंक्ति. ३ मतिज्ञान, श्रुतज्ञान व अवधिज्ञानासह. ४ पायाच्या आंगठ्यांनें. ५ राजवाडा. ६ इन्द्र. ७ घोडा.

प्रभाव वाढे वीरपित्याचा झाला सिद्धार्थ[1] ।
नसे राहिला असिद्ध ऐसा कोणीही अर्थ[2] ॥ ५० ॥
वीर-जिनाचें भोगीं झालें मन न च अनुरक्त ।
जसें जलानें कमल न होई केव्हांही लिप्त ॥ ५१ ॥
सर्व सम्पदा विजेप्रमाणें नश्वर जाणून ।
दीक्षा घेई लौकान्तिक[3]सुर-वचना ऐकून ॥ ५२ ॥
सम्यग्दर्शन सम्यग्ज्ञान नि सम्यक्चारित्र ।
रत्नत्रय हें जेणें होतो आत्मा सुपवित्र ॥ ५३ ॥
करून यांचें पूर्णाराधन घातकर्मगणा[4] ।
नाशुनि झाला वीर जगत्पति जिन केवलिराणा ॥ ५४ ॥
लोकालोकां जाणी ऐशा केवलबोधास ।
मिळवुनि केलें स्थापन वीरें सुधर्म-तीर्थास[5] ॥ ५५ ॥
मिळवायाचें जें जें होतें तें तें मिळवून ।
कृतार्थ होउनि करि लोकांचें सन्मति[6] कल्याण ॥ ५६ ॥
सूर्योदय हा परार्थ होतो तैशी वीरकृति[7] ।
कारण झाली जगद्धिताला घडे न मनिं विकृति[8] ॥ ५७ ॥

( वीर जिनाच्या अलौकिक गुणांचें वर्णन )

मलमूत्रानें रहित जयाच्या देहिं न ये घाम ।
शुभ्र दुधासम रक्त जयाचें असेचि जो अमम[9] ॥ ५८ ॥
ज्याचा देहप्रमाण आत्मा अनन्तगुणपूर्ण ।
सुलक्षणांनीं उत्तम हितमित सदा वदे वचन ॥ ५९ ॥
विहार असतां करित वीरजिन परपीडा न घडे ।
[10]ईति भीति न च दुष्काळ हि नच सुभिक्ष चोहिकडे ॥ ६० ॥

---

१ ज्याचीं सगळीं कार्यें सिद्ध झालीं आहेत म्हणून ज्याचें सिद्धार्थ हें नांव सार्थक आहे. २ कार्य. ३ ब्रह्मस्वर्गांतील शेवटच्या पटलांत राहणारे, विषयविरक्त, देवपूजनीय देवर्षिनामक, चौदा पूर्वांचें ज्ञान असलेले जे देव ते लौकान्तिक देव होत. ४ ज्ञानावरण, दर्शनावरण, मोहनीय व अन्तराय या चार कर्मांना घातिकर्म म्हणतात. ५ जिनधर्म हाच संसारसमुद्र तरून जाण्याचा घाट. ६ महावीर जिन, ७ वीरप्रभूचा उपदेश. ८ विकार, इच्छा. ९ ममता-रहित. १० टोळ, उंदीर, पोपट आदिकांनीं धान्य नाश होणें.

समस्तविद्यापरमेश्वर जो झाला वीर जिन ।
शुद्धस्फटिकासमान निर्मल छाया देहीं न ॥ ६१ ॥
डोळे ज्याचे निश्चल असती समनख समकेश ।
शान्ति मुखावरि सदा विराजे अनन्तगुणकोश ॥ ६२ ॥
विहरण ज्याचें सर्व जीवगणिं मैत्रीभाव करी ।
वैभव ज्याचें सर्वजनांना आनन्दचि वितरी ॥ ६३ ॥
सर्व ऋतूंच्या फलपुष्पांना वृक्षगणें वरिलें ।
वीरागमनें भूतल दर्पणसम निर्मल झालें ॥ ६४ ॥
सुगन्धि वारे वाहुनि योजनपरिमित भू-भाग ।
कण्टक-धूली-विरहित झाला झाला नीरोग ॥ ६५ ॥
विद्युन्माला[1] शोभे ज्यामधिं ऐशा जलदांनीं[2] ।
सुगन्धि-सलिलें सिञ्चित करितां शोभे बहु अवनी[3] ॥ ६६ ॥
भूमीवरती सुवर्णकमळें निर्मिति देवगण ।
आकाशांतुनि विहार करिती निरिच्छ वीरजिन ॥ ६७ ॥
शरत्सरासम[4] निर्मल झालें सगळें आकाश ।
दहा दिशाही प्रसन्न झाल्या देती सुखकोश ॥ ६८ ॥
वीर-जिनागमिं[5] भूमि जाहली धान्यें सम्पन्न ।
समस्त मानव पशुपक्ष्यादिक दिसती न च खिन्न ॥ ६९ ॥
सहस्र आरे ज्याचे स्फुरती कान्ति दिशा व्यापी ।
धर्मचक्र तें चालुं लागलें शान्ति मनीं स्थापी ॥ ७० ॥
विहार यापरि करीत आले विपुलाचलिं[6] वीर ।
भवान्तकारी[7] भव्यां दाविति मुक्तिश्रीनगर ॥ ७१ ॥
निर्झर[8]-शब्दें वीर-जिनाचा जयजयकार करी ।
पुष्पें वर्षुनि पाय धुवाया जणु गिरि जल वितरी ॥ ७२ ॥
वैरा त्यागुनि विहार करिती शान्ति मनीं वरिती ।
ऐसे प्राणी या विपुलाचलिं सौख्या अनुभवती ॥ ७३ ॥

---

१ विजांची पंक्ति. २ मेघांनीं. ३ पृथ्वी. ४ शरदृतूच्या स्वच्छ सरोवराप्रमाणें. ५ वीर जिनेश्वर आले असतां. ६ विपुलाचल नामक पर्वतावर. ७ संसारनाश करणारा. ८ झरे.

लता द्रुमांना पुष्पालङ्कृत आलिङ्गन देती ।
वीर-जिनाचा झाला आगम सुखकर यावरती ॥ ७४ ॥
वायुविकम्पित होउनि तरुवर वीरा जणु नमती ।
उदकतुषारें[1] हर्षित होउनि निर्झर जणु हसती ॥ ७५ ॥
पक्षिगणांच्या शब्दमिषानें[2] जणु गिरिवर बोले ।
अलिगुञ्जारवमिषें तयानें जणु गायन केलें ॥ ७६ ॥
वायु-प्रेरित-पुष्पसुगन्धें दिशास आलिंगी ।
नानाधातुप्रभा जयाच्या चमके नित शृङ्गीं ॥ ७७ ॥
ऐशा विपुलाचलीं जिनेश श्रीसन्मति आले ।
जसे नाभिसुत वृषभजिनेश्वर कैलासीं दिसले ॥ ७८ ॥
तेथें धनदें इन्द्राज्ञेनें रचिली रत्नसभा ।
समवसरण ज्या सुनाम[3] दुसरें अपूर्व धरि शोभा ॥ ७९ ॥
वीर-जिनेश्वर रत्नजडितशा सिंहासनिं वसले ।
केवलपूजन[4] करावयाला इन्द्रादिक आले ॥ ८० ॥

( सौधर्मेन्द्र प्रभूची स्तुति करतो )

सौधर्माधिप भालावरती करयुग जोडून ।
गुणस्तवन तो करूं लागला भक्तिरसीं लीन ॥ ८१ ॥
महामोहमय अंधाराच्या रात्रीं जग निजलें ।
ज्ञानसूर्यकर तुवां पसरुनी जागृत त्या केलें ॥ ८२ ॥
हस्ततलस्थ-स्फटिक[5] मण्यासम जगत्रया वीरा ! ।
भूतभविष्यद्भवत्त्रिकाला[6] जाणिसि गुणधीरा ! ॥ ८३ ॥
म्हणून तुजला हे गतरागा ! वदती सर्वज्ञ ।
निर्दोषा ! तुजविण जन सगळे असती जगिं अज्ञ ॥ ८४ ॥
भवार्णवाचा[7] तट बहु दुर्गम दुसरा बुध वदती ।
सार्थवाह[8] तूं मिळतां भव्यां तरून ते जाती ॥ ८५ ॥
दोष चोर जे लुटिति न त्यांना महिमा तव सगळा ।
मोक्षस्थाना जाती इतरीं अशी नसेचि कला ॥ ८६ ॥

---

१ पाण्याच्या थेंबांनीं. २ शब्दांच्या निमित्तानें. ३ नांव. ४ केवलज्ञानाचें पूजन. ५ हाताच्या तळव्यांत असलेल्या स्फटिकमण्याप्रमाणें ६ भूतकाल, भविष्यकाल व वर्तमानकालला. ७ संसारसागराचा. ८ तांड्यांतील मुख्य व्यापारी.

मुमुक्षु[1]लोकां विमल मार्ग तूं प्रशस्त कथिलास ।
शुक्लध्यानानलें कर्मगण सुदग्ध केलास ॥ ८७ ॥
अनाथ बान्धवरहित नि दुःखें दग्ध असे जीव ।
बन्धु तयांचा नाथ ! नाथ तूं तूंच महादेव ॥ ८८ ॥
उपमा-विरहित अनन्त असती सुगुण तुझ्या ठायीं ।
कशी करूं मी स्तुति तव देवा ! अन्त न ज्या येई ॥ ८९ ॥
करुनि गुणस्तुति पञ्चाङ्[2]गांनीं वन्दन इन्द्र करी ।
प्रमुदित झाला सभेंत बैसे सुभक्ति धरुनि उरीं ॥ ९० ॥

( समवसरण-सभेचें वर्णन )

वीर-जिनाची रत्नमयी ती सभा बघून नर ।
अतिशय विस्मित होती ऐका तद्वर्णन चतुर ॥ ९१ ॥
धनदें रचिले सभोंवती तट नानावर्णांचे ।
त्यांची संख्या वदती सज्जन तीन अशी वाचें ॥ ९२ ॥
प्रत्येकामधिं पूर्वादिकदिशिं गोपुर[3] जे चार ।
वापी[4]-संख्या चारचि मङ्गल-वस्त्वष्टक[5] चतुर ॥ ९३ ॥
बारा असती विभाग त्यामधिं भिंती स्फटिकाच्या ।
प्रदक्षिणेनें रचना ऐशा जाणा बुध साच्या ॥ ९४ ॥
विभाग पहिला असे तयामधिं मुनि गणधर असती ।
दुसऱ्यामध्यें सुरेन्द्र-देवी सुर-महिला वसती ॥ ९५ ॥
तिसऱ्यामध्यें आर्या असती मुख्यार्या-सहित ।
ज्योतिषनारी व्यन्तरनारी क्रमें गणा त्यांत ॥ ९६ ॥
भावननारी एकामध्यें ज्योतिःसुर हृष्ट ।
व्यन्तर एके ठायीं इतरीं भावनगण तात ॥ ९७ ॥
स्वर्ग-देव-गण एकामध्यें मनुष्य अन्यांत ।
वैरा सोडुनि पशुगण बारा विभाग असतात ॥ ९८ ॥

( प्रभुसभेंत श्रेणिकाचें सपरिवार आगमन )

श्रेणिकभूपति ससैन्य आला परिवारासहित ।
वैभव पाहुनि त्याचें झाले सुरहि मनीं चकित[6] ॥ ९९ ॥

---

१ मोक्षेच्छु लोकांना. २ दोन हात, दोन गुडघे व एक मस्तक यांनीं नमस्कार करणें. ३ वेशी. ४ विहिरी ५ दर्पण, झारी घंटा, ध्वज, चामर, छत्र, पंखा व सुप्रतिष्ठ हीं आठ मंगल द्रव्यें. ६ आश्चर्ययुक्त.

दूरचि सोडुनि वाहन आदिक सैन्यविभागास ।
नमून वीरा स्तुतिसह वसला मनिं ज्या बहु हर्ष ॥ १०० ॥
क्रूर न ज्याचा भाव[1] असा सुत नामें अक्रूर ।
वारिपेण हा दुसरा तिसरा अभय महाचतुर ॥ १०१ ॥
विजयवाह हा चौथा ऐसे श्रेणिक सुत वसले ।
अन्य नृपाल नि पुत्र तयांचे सभेंत मन रमलें ॥ १०२ ॥
भालीं ठेवुनि करयुगलाला वदनें स्तुति करिती ।
विनयें वसले हर्ष जयांच्या अपार मनिं न मिति[2] ॥ १०३ ॥

( प्रभूचीं अशोकादि अष्टमहाप्रातिहार्ये )

जो जनशोका हरितो ऐसा अशोक तरुखालीं ।
मणिसिंहासनिं वीर जिनाला नमिती विबुधाली[3] ॥ १०४ ॥
त्रैलोक्याचें पतित्वसूचक तीन मणिच्छत्रें ।
वीरजिनावरि सुन्दर दिसती सुबद्ध मणिसूत्रें ॥ १०५ ॥
पुष्पवृष्टि सुर करिती चामर सित[4] वारिति यक्ष ।
करांत घेउनि जिनधर्माचा धरिती शुभ पक्ष ॥ १०६ ॥
नभांत[5] दुंदुभि मधुर वाजती रुचि ऐकायाची ।
भक्तगणांच्या हृदयामध्यें उपजे नित साची ॥ १०७ ॥
गतित्रयांतिल[6] जीवां समजे ऐशी मधुवाणी ।
निघे मुखांतुनि वीर जिनाच्या बुधगण वाखाणी ॥ १०८ ॥
भामण्डल जें रविप्रभेला सदा तिरस्कारी ।
प्रातिहार्य[7] हें वीर विभूचें जनदुरिता[8] वारी ॥ १०९ ॥

( वीरजिनाचा भव्यांना धर्मोपदेश )

प्रभो ! जनांना स्वरूप सांगा हितकर धर्माचें ।
गौतम गणधर वीरजिनांना वदले जें साचें ॥ ११० ॥
प्रभु गंभीर नि हितकर सुरुचिर वाणी तैं वदले ।
जिनें जनांना यथार्थ तत्त्वस्वरूप होय खुलें ॥ १११ ॥

---

१ स्वभाव. २ माप. ३ देव व विद्वानांचा समूह. ४ पांढरें ५ आकाशांत. ६ देवगति, मनुष्यगति व पशुगतींतील जीव, ७ प्रभूचें माहात्म्यसूचक ऐश्वर्य, ८ लोकांच्या पातकाला.

सत्ता[1] आहे प्रथम तत्त्व जें द्रव्या आधार ।
पुनरपि जीवें[2] नि अजीव[3] ऐसे भेदद्वय थोर ॥ ११२ ॥
जीव जगीं या चतुर्गतीमधिं फिरती संसारी ।
कर्मरहित जे बनले झाले मुक्त नि अविकारी ॥ ११३ ॥
जे संसारी असती भव्यें[4] नि अभव्य ते द्विविध ।
जसें शिजाळू उडीद इतरहि त्यासम वदति बुध ॥ ११४ ॥
धर्माधर्म नि आकाशाभिध पुद्गल काल असे ।
भेद पांच हे असति अजीवीं चेतनता न वसे ॥ ११५ ॥
जिनेश्वरांनीं सांगितलीं जीं तत्त्वें श्रद्धान ।
असे ठेवणें सम्यग्दर्शन म्हणती विबुधगण ॥ ११६ ॥
अश्रद्धा जो ठेवी यावरि जाणा मिथ्यात्वी ।
भ्रमण तयाचें या संसारीं होइल वदति कवि ॥ ११७ ॥
जो एकेन्द्रिय जीव द्वीन्द्रिय आणि त्रीन्द्रिय हे ।
चतुरिन्द्रिय जगिं पंचेन्द्रिय हे भववासी[5] पाहे ॥ ११८ ॥
गतिकायेन्द्रियोगें वेदें कषाय बोधांनीं ।
संयम दर्शन लेश्या भव्यें सम्यक्त्वें जाणी ॥ ११९ ॥
संज्ञी आणिक आहारांनीं चौदा भेद गणा ।
हे भववासी जीव मार्गणें वदती बुध नाना ॥ १२० ॥
क्षपक नि उपशम ऐशा श्रेणीवरि चढती जीव ।
उपशम नि क्षय मोहाचा ते करिती जिनदेव ॥ १२१ ॥
वदती त्यांचा संनिध आला भवसागर पार ।
मुक्तिपुरीचे पथिक तयांना वदती जन चतुर ॥ १२२ ॥
सम्यक्त्वाचे द्विभेद असती निर्सर्ग[6] अधिगमज[7] ।
तेणें जीवीं भेद मानिती आगमि जिनराज ॥ १२३ ॥

---

१ अस्तित्व, हा स्वभाव सर्व चेतन व अचेतन पदार्थांत असतोच. याच्या अभावीं पदार्थाचें तत्त्व नष्ट होईल. २ ज्यांत चेतना-ज्ञान व दर्शन आहे असा पदार्थ. ३ जड पदार्थ ज्यांत चेतना नसते. ४ रत्नत्रय प्राप्त होण्याची ज्यांना योग्यता असते ते भव्य व ती ज्यांना नाहीं ते अभव्य. शिजाळु उडदाप्रमाणें भव्य मुक्तियोग्य आहेत. अभव्य न शिजणाऱ्या उडदाप्रमाणें सदा संसारी असतात. ५ संसारांत फिरणारे. ६ परोपदेशावांचून जातिस्मरण, जिनबिंब-दर्शन आदि कारणांनीं होणारें तत्वश्रद्धान तें निसर्गज. ७ उपदेशानें होणारें तत्त्वश्रद्धान तें अधिगमज.

नामादिक जे आगमिं कथिले न्यास चतुर्भेद ।
तेणें जीवीं भेद होति बहु ऐसें कथि विबुध ॥ १२४ ॥
सत्सङ्ख्यादिक आठ बोलती जे अनुयोग[1] बुध ।
तेणें जीवीं अनेक होती भेद वदे वेद[2] ॥ १२५ ॥

( संसारी जीव चतुर्गतींचें दुःख भोगतात )

जे संसारी जीव तयांना केवल दुःख असे ।
परि विषयामधिं त्या मूढांना सौख्याभास दिसे ॥ १२६ ॥
नेत्रपुटाच्या सङ्कोचाला जितका काल गमे ।
नरकप्राणी तितुक्या समयिंहि सौख्यामधिं न रमे ॥ १२७ ॥
छेदन भेदन दोहन[3] वाहन[4] आदि उपद्रव हे ।
पशूस होती शीतोष्णादिक दुःखें नित पाहे ॥ १२८ ॥
इष्ट-वियोगें अनिष्टयोगें दुःख नरां होतें ।
इच्छित-लाभ न होतां नरसुख त्यापासुनि पळतें ॥ १२९ ॥
देवांनाही दुःख न सोडी उत्तम देवांना ।
सुखांत बघतां लघु देवांना दुःख गमे नाना ॥ १३० ॥
उत्तम देवहि आयुष्यान्तीं दुःखित होतात ।
म्हणुनि देवगति ही ही दुःखें युक्त असे खचित ॥ १३१ ॥
मनुष्यभविं जे जन्मुनि धर्मोपार्जन नच करिती ।
अघोदयें[5] ते दुर्गतिमध्यें दुःखा अनुभवति ॥ १३२ ॥
मनुष्यजन्मीं सुकृतसञ्चया[6] जे नच करितात ।
हातीं आलें अमृत तयांचें विनष्ट हो त्वरित ॥ १३३ ॥
जन्मुनि नाना योनिंत दुःखें बहुविध भोगून ।
पावे मानव-जन्म जीव हा होतो अकुलीन[7] ॥ १३४ ॥
धीवर कोळी भिल्ल पारधी मानव होतो तो ।
आर्यावर्ती जन्मुनि देखिल अधर्मरत होतो ॥ १३५ ॥

---

१ सामान्यानें म्हणजे गुणस्थानापेक्षेनें व विशेषानें म्हणजे गत्यादिक चौदा मार्गणांनीं जीवाचें अस्तित्व, संख्या, क्षेत्र वगैरे सांगणें यास अनुयोग म्हणतात.
२ प्रथमानुयोग, करणानुयोग, चरणानुयोग व द्रव्यानुयोग यांना वेद म्हणतात.
३ धार काढणें. ४ ओझें लादणें. ५ पापाच्या उदयानें. ६ पुण्याचा संचय.
७ हीनकुलांत जन्मलेला.

सुकुलहि मिळतां काणा, कुबडा, मुका, लुळा होतो।
पूर्णावयवी होउनि रोगें पीडित होतो तो ॥ १३६ ॥
सर्व साधनें उत्तम मिळुनि हि विषयास्वादांत।
जन्म घालवी तत्पर होय न धर्माचरणांत ॥ १३७ ॥
होती कोणी पोटासाठीं मानव धनिकाचे।
नोकर परि ते उदर भराया असमर्थचि साचे ॥ १३८ ॥
रक्त सांडलें झाला जेथें मांसाचा चिखल।
समरीं[1] शिरती पोटासाठीं मानव धीविकले[2] ॥ १३९ ॥
जिह्वालम्पट कामी होउनि करिती समरांत।
प्रवेश त्यांना तथापि न मिळे सुख होतें अहित ॥ १४० ॥
जीव जियेमधिं अनन्त जन्मति ऐशी शेताची।
नांगरती भू[3] पोटासाठीं राजा ज्या जाँची[4] ॥ १४१ ॥
सौख्येच्छेनें जें जें करिती त्यांत न सौख्य मिळे।
अशुभोदय हा दुःखचि देई तेणें सौख्य पळे ॥ १४२ ॥
मिळतें कांहीं धन कितिकांना परन्तु तें हरिती।
चोर नि राजा अग्नि जाळितो कष्टी वहु होती ॥ १४३ ॥
आकुलता वहु उपजे तेव्हां डोकें बिघडून।
वेडे होती धन धन वदती होती वहु दीन ॥ १४४ ॥
प्राप्त जाहलें धन वहु रक्षुनि उपभोग हि घेती।
परन्तु न मिळे सौख्य तयांना लोभें वहु जळती ॥ १४५ ॥
पूर्व कर्म जें उपशम पावे तेव्हां धर्मांत।
प्रवृत्ति होते परि त्या इच्छा निदानें-शर्मांत[5] ॥ १४६ ॥

आर्या ( धर्माधर्म-विवेचन )

सामान्य शब्द ऐकुनि ' धर्म ' असा सेविती अधर्मास।
धर्म तयासचि समजुनि त्यांतचि करितात निरत अन्यास ॥ १४७ ॥
सेवुनि अधर्म कांहीं तत्पर राहति विनाश-मार्गांत।
इतरासहि नाशिति ते यापरि वसतात कृष्णवर्गांत[6] ॥ १४८ ॥

१ युद्धांत. २ बुद्धिरहित. ३ जमीन. ४ त्रास देतो. ५ पुढें मला सुख मिळावें अशा हेतूनें केलेल्या धर्मापासून मिळालेल्या सुखांत कोणी गुंग होतात. ६ पाप करणाऱ्यांच्या पंक्तींत.

असतां परिग्रही जें विशुद्ध त्यांचें कदापि चित्त नसे ।
अविशुद्ध अशा चित्तीं त्यांच्या केव्हांहि धर्म नच विलसे ॥ १४९ ॥
जोवरि परिग्रहामधिं आसक्ति असे तिथें वसे हिंसा ।
ती भवमूलचि[1] जाणा भव हा दुःखैकपात्र नच शंसा[2] ॥ १५० ॥
संगासक्ति मनामधिं रागद्वेषास सतत जन्मा दे ।
रागद्वेषचि संसृति--दुःखोत्पत्तीस हेतु विबुध वदे ॥ १५१ ॥
दर्शनमोहें[3]-प्रशमें सम्यग्दर्शन नरांत जन्मा ये ।
परि चारित्र न लाभे चारित्रावरणकर्म-समुदायें[4] ॥ १५२ ॥
चारित्र--लाभ होतां करिती अतितीव्र यति तपश्चरण ।
परि दुर्लङ्घ्य परीषह येतां चारित्र पावतें मरण ॥ १५३ ॥
चारित्र नष्ट होतां अणुव्रता सेविती किती जीव ।
कांहीं दर्शनमात्रें[5] धरिती हृदयांत तोपसद्भाव ॥ १५४ ॥
जें भवकूपामध्यें सम्यग्दर्शन करावलम्ब असे ।
तेंही त्यागुनि देती तयांत मिथ्यात्व तेधवा विलसे ॥ १५५ ॥
मिथ्यादर्शनयुत ते पडती भविं दुर्गतींत फिरतात ।
दुःखाग्नि हृदय जाळी परस्वरूपांत[6] सतत रमतात ॥१५६ ॥
कांहीं सुपुण्यकर्मी[7] करून धारण चरित्रं[8] बहु मोदें ।
तें सोडिती न सुन्दर आयुष्यान्तीं हि विपुल त्या सुख दे ॥ १५७ ॥
कांहीं समाधि[9] साधुनि देह-विसर्जन करून होतात ।
नारायणपद धारक निदानदोषेंचि[10] जाति निरयांत ॥ १५८ ॥
ते क्रूरचित्त असती परपीडा देति पाप आचरती ।
ऐशा अशुभें त्यांना लाभे नरकांत सतत दुःखततति[11] ॥ १५९ ॥

---

१ संसाराचें कारण. २ प्रशंसा. ३ सम्यग्दर्शन न उत्पन्न होऊ देणाऱ्या कर्मांचा उपशम झाल्यानें. ४ चारित्र-महाव्रतें उत्पन्न न होऊ देणाऱ्या कर्मसमूहाच्या उदयानें. ५ फक्त सम्यग्दर्शनानें. ६ स्त्री-पुत्रधनादिकांत. ७ उत्तम पुण्यकर्में करणारा. ८ महाव्रतें ५, समिति ५ व गुप्ति ३ असें तेरा प्रकारचें चारित्र. ९ क्रोधादिक कषाय व आहारांचा क्रमानें त्याग करून पंचपरमेष्ठींचें चिन्तन करीत प्राण त्यागणें. १० मला इन्द्रादि-पद लाभावें असा हेतु धरून तप करणें तें निदान होय. ११ दुःखांचा समुदाय.

कांहीं करून सुतपा स्वर्गीं सुरनाथ-सौख्य अनुभवती ।
तेथुनि बलदेवाचें पद सेवुनि मुक्तिनाथ ते होती ॥ १६० ॥
कांहीं तीव्र तपानें अहमिन्द्राच्या पदास जातात ।
तेथुनि अवतरती ते मुक्तिश्रीशीं विलास करितात ॥ १६१ ॥
कांहीं सत्त्वगुणाला धरिती हृदयांत तीर्थकृत्पदवी ।
षोडशकारण[1]-चिन्तन-योगें लाभेल वदति सुज्ञ कवि ॥ १६२ ॥
कांहीं निर्विघ्नपणें पाळुनि रत्नत्रयास मुनिवर्य ।
द्वित्रिभवांनीं[2] कर्मक्षय करिती वन्द्य होति ते आर्य ॥ १६३ ॥
जे मुक्त जीव होती त्यांना अनुपम अनन्तसुख मिळतें ।
तें प्रतिपक्षें[3] विरहित संसृतिसुख नच बरोबरी करितें ॥ १६४ ॥
या परि वीर-मुखांतुनि ऐकुनि उपदेश मोद बहु झाला ।
नर-सुर-पशु-पक्ष्यांना न वर्णवे तो यथार्थसा कथिला ॥ १६५ ॥
तेणें कोणी झाले अणुव्रती नर विरक्त होऊन ।
झाले महाव्रती कुणि सुतपी होउनि भवांत उद्विग्न ॥ १६६ ॥
कोणी जन सम्यक्त्वी कोणी झाले स्वशक्ति अनुसरून ।
पापोपार्जनकर्मापासुनि सुविरक्त करिति बहुयत्न ॥ १६७ ॥
या परि धर्मश्रवणानन्तर गुणसंस्तुतीस भक्तीनें ।
वीरा करून वन्दन गेले जन निजगृहास शान्तीनें ॥ १६८ ॥
श्रेणिक नृपाल धर्मश्रवणें होऊन हृष्ट चित्तांत ।
नृप-लक्ष्मीनें सुन्दर गेला निजपत्तनांत जनतात[4] ॥ १६९ ॥

सूर्यास्तवर्णन

वीर-जिनाच्या पाहुनि सतेज भामण्डलास[5] रवि खिन्न ।
होऊन मनीं गेला जणु अस्ता मानिती असें सुजन ॥ १७० ॥
अस्तगिरीच्या शिखरीं होते जे पद्मरागमणिवृन्द ।
त्यांच्या कान्तींनीं जणु रवि झाला लाल गोलसा कन्द[6] ॥ १७१ ॥
अतिमन्द किरण झाले अनुयायी[7] जे सदैव सूर्याचे ।
प्रभु संकटांत पडतां कैसें वाढेल तेज कोणाचें ॥ १७२ ॥

---

१ दर्शन-विशुद्ध्यादि सोळा भावनांचें चिन्तन. २ दोन तीन जन्मांनीं. ३ प्रतिपक्षानें – दुःखानें रहित. ४ लोकांचा जणु पिता. ५ सभोंवती पसरलेली शरीरकान्ति. ६ गड्डा. ७ अनुसरणारें.

नयनांत अश्रु आणुनि चक्रवींनी सूर्यबिम्ब पाहियलें ।
मन्दगतीचें होउनि करुणेनें त्या बघून जणु लपलें ॥ १७३ ॥
धर्मश्रवणें त्यजिला प्राण्यांनीं रागभाव जो त्यानें ।
सन्ध्यामिषें पसरुनी केली अतिरक्तशीं दिशांवदनें ॥ १७४ ॥
न प्रार्थिलें तरी ही करि रवि उपकार आमुच्या वरती ।
जाणुनि जणु जनलोचन गेले मित्रासमान सांगाती ॥ १७५ ॥
अस्तास सूर्य गेला सन्ध्येचा लाल रंग मावळला ।
सूर्यविकासी कमलें मिटलीं रात्र्यन्धकार अवतरला ॥ १७६ ॥
अन्धार दुर्जनासम पसरुनि नीचोर्च्च-भाव तैं मिटवी ।
स्थापी अभेद केवल नेत्रांतिल शक्ति जाय परगांवीं ॥ १७७ ॥
सन्ध्या-प्रकाश संपुनि चोहिंकडे दाट तिमिर जैं पसरे ।
अग्नि प्रशान्त होतां धूमांचा नभिं समूह जेवि उरे ॥ १७८ ॥
चम्पक-कलिका जैशी तैसे दीपक घरोघरीं उगले ।
कम्पित-मन्द समीरें रजनीचे कर्णपूर जणु गमले ॥ १७९ ॥
कमलरसाला भक्षुनि हलवुनि निजपक्ष कमलदण्डास ।
घासून अंग अपुलें निशि पावे हंसवृन्द निद्रेस ॥ १८० ॥
वाहे सायंकालीं घेऊन समीर मल्लिकागन्धा ।
जणु तो निशावधूच्या निश्वासासम गमेचि कामान्धां ॥ १८१ ॥
भृङ्गसमूह हि झोपे कमलांच्या झोपडींत बहु मोदें ।
हुंगून पद्मगन्धा अतिगाढ-भ्रमणखेद नच बाधे ॥ १८२ ॥
अतिनिर्मल तारांनीं झाला बहु विमलसा नभोदेशें ।
अर्हत्सुभाषितांचा त्रैलोक्या विमल जेवि करि कोश ॥ १८३ ॥

चन्द्रोदयाचें वर्णन

निर्मल चन्द्रकराङ्कुरनिकरें अंधार जाय विलयास ।
श्रीजिनकथित-नयांनीं एकान्तींचा घडे जसा नाश ॥ १८४ ॥

---

१ अनुसरणारे २ प्रीति, कवि हिचा लाल रंग मानतात. ३ दिशांचीं तोंडें. ४ उंच व खोल भूप्रदेश अंधारांत दिसत नाहीं. ५ प्रगटले. ६ रात्रीचे. ७ स्वतःचे पंख. ८ अतिशय फिरण्यापासून आलेला थकवा. ९ आकाशप्रदेश. १० वस्तु सर्वथा एक स्वभावाचीच आहे असें समजणें.

जननयनां आनन्दित करणारा चन्द्र येइ उदयास ।
अन्धारावरि कोपुनि धारण करि अरुण जो निजाङ्गास ॥ १८५ ॥
चन्द्राच्या किरणांचा झाला संस्पर्श कुमुदवृन्दास[1] ।
तेव्हां प्रफुल्ल होउनि पसरी सर्वत्र तो स्वगन्धास ॥ १८६ ॥
रात्र प्रसन्न झाली पसरे चन्द्रप्रकाश नभिं धवल ।
भूवरि ही अवतरला प्रसन्न वाटे जनास जग सकल ॥ १८७ ॥
क्षीरसमुद्र-तरङ्गासम अतिशय धवल भूप शयनांत ।
झोपे कुशाग्रनगरीस्वामी[2] श्रेणिक सुखें स्वसदनांत ॥ १८८ ॥
स्वप्नीं पुनः पुनः त्या भूपाला वर्धमान जिन दिसले ।
वचन तयांचें श्रवुनि स्वमनःसन्देह[3] त्या तयें पुसिलें ॥ १८९ ॥
गम्भीर जलदनादा[4]समान वाद्यध्वनीस ऐकून ।
प्रातःकालीं झाला जागृत नृप जाहलें प्रसन्न मन ॥ १९० ॥

(श्रीराम-चरितविषयक लोकप्रवादानें श्रेणिकाच्या मनांत चिन्ता उत्पन्न झाली.)

चिन्ता मनांत उपजे चरितें मीं धर्महेतु[5] जीं श्रविलीं ।
एकाग्र चित्त ठेवुनि मजला तीं फार फार आवडलीं ॥ १९१ ॥
परि रामाच्या चरितीं ज़े मी लोकप्रवाद[6] ऐकियले ।
मन संशयांत पडलें हितकारक होय हें कसें असलें ॥ १९२ ॥
राक्षस वानर यांचा आला सम्बन्ध केवि रामास ।
कपिवर्गानें[7] केलें कैसें साहाय्य विस्मयावास[8] ॥ १९३ ॥
दशमुख विभीषणादिक राक्षस हे भक्षिती नृमांसास ।
मदिरा प्राशिति न मिळे आश्रय त्यांच्या मनीं विवेकास ॥ १९४ ॥
घटकर्ण रावणाचा भाऊ ज्या कुम्भकर्ण वदतात ।
षण्मासावधि[9] संतत झोपे जागृत नसेचि तो होत ॥ १९५ ॥
मर्दन केलें त्याचें मत्तगजांनीं न जाग त्या येई ।
अतितप्त तेल कानीं ओतियलें सकल विफल तें होई ॥ १९६ ॥

---

१ रात्रि-विकासी कमल-समूहास. २ राजगृहपुर. ३ स्वतःच्या मनांतील संशय ४ मेघाचा ध्वनि. ५ धर्मप्राप्तीस कारण असलेलीं. ६ लोककल्पना. ७ वानरसमूहानें. ८ आश्चर्याचें घर. ९ सहा महिने पर्यंत.

भेरी शंख नगारे यांचा केला प्रचण्ड रव कानीं ।
उपयोग हो न त्यांचा असफल होती अकालजागरणीं[1] ॥ १९७ ॥
जागृत झाल्यानन्तर भूक तहान प्रचण्ड त्या लागे ।
हत्ती घोडे खाई तथापि त्याची न भूक ती भागे ॥ १९८ ॥
यापरि बहु पशु मानव भक्षुनि तो तृप्त जेधवा होतो ।
कृत्यें सगळीं सोडुनि पण्मासावधिक झोप घेई तो ॥ १९९ ॥
ऐसा कुकविजनांनीं घटकर्णाचार[2] निन्द्यसा लिहिला ।
तो श्रेष्ठ खेचराधिप[3] अपवादें मलिन सर्वथा केला ॥ २०० ॥
यापरि रामायण हें रचिलें विपरीत वर्णनें सकल ।
जें ऐकतां नराचा पापक्षय केवि होय मति विकल[4] ॥ २०१ ॥
जनचित्त तापलेलें अग्नि-समागम तयास हा लाभे ।
शीत निवारायास्तव तुपार[5] वारे कसें वरें शोभे ॥ २०२ ॥
लोणी मिळण्यासाठीं जलमन्थन[6] कोण सुज्ञ आचरिल ।
तेलासाठीं वाळू पिळण्याचा यत्न केवि हो सफल ॥ २०३ ॥
पूज्य महापुरुषांच्या माथीं नसतेच दोप दाखवितें ।
तें धर्मशास्त्र कैसें जाणा तें शास्त्र नरक-पथ कथितें ॥ २०४ ॥
अमरांचा पति देखिल आकर्णाकृष्ट[7] बाण सोडून ।
दशकण्ठें जिंकियला अविचारें सांगतात कुकविजन ॥ २०५ ॥
इन्द्र कुठें देवाधिप कोठें रावण मनुष्य अतिदीन ।
चिन्तामात्रें त्याच्या होइल हा भस्म यांत विस्मय न ॥ २०६ ॥
ऐरावत गज ज्याचा वज्र महायुध[8] असे करीं ज्याचें ।
मेरु-समुद्रासह जो पृथ्वी उचलील बल असे साचें ॥ २०७ ॥
तो अल्प-शक्ति-विद्याधरमात्रें भंग पावणें समरीं ।
स्वर्गनिवासि-सुरप्रभु[9] अशक्य गमतें मला सदैव उरीं ॥ २०८ ॥
परि दशकण्ठ तयाला कैदी बनवून नेइ लङ्केंत ।
सर्व असम्भव आहे समजावा फक्त कुकविसङ्केत[10] ॥ २०९ ॥

---

१ अवेळीं जागें करणें. २ कुंभकर्णाची वागणूक. ३ विद्याधरांचा राजा. ४ विचारहीन. ५ बर्फावरून वाहणारे, ६ पाणी घुसळणें. ७ कानापर्यन्त ओढलेला. ८ मोठें शस्त्र. ९ स्वर्गांत राहणाऱ्या देवांचा स्वामी. १० कल्पना.

सिंह वधावा हरिणें तिळही पाषाण चूर्ण करितात ।
सर्पास गेचवेही वाधिती त्यासम असें चि हें खचित ॥ २१० ॥

चन्द्रकान्त जाति—

व्रतिक राघवें मृग सोन्याचा बाणानें वधिला ।
श्रद्धा यावर करिल कोण जन अयुक्त जें बोला ॥ २११ ॥
सुग्रीवाचा वाली अग्रज[1] जनकासम[2] होता ।
वधिलें त्याला युक्तियुक्त हें गमतें नच चित्ता ॥ २१२ ॥
या गोष्टींचा निर्णय गौतम गणिस विचारीन ।
विचार यापरि करीत असतां प्रातःकालीन[3] ॥ २१३ ॥
वाजु लागलीं वाद्यें नंतर वंदी[4] स्तुति गाती ।
नृप-जयकारा करून हर्षित होती वहु चित्तीं ॥ २१४ ॥
श्रेणिक-भूपा समीप राही कुलीन[5] बुध एक ।
वृद्ध तयानें सहजचि म्हटला सुन्दरसा श्लोक ॥ २१५ ॥
"अर्थ तयाचा ज्ञात[6]हि असला गुरुस विचारावा ।
निर्णय त्याचा कथितां गुरुंनीं प्रमोद मानावा ॥ २१६ ॥
निमित्त ऐसें सुन्दर मिळतां शयना त्यागून ।
स्नान-पूजन प्रातर्विधि हें सद्भावें करुन ॥ २१७ ॥
सुन्दर वाद्यध्वनि नित होतो अशा गृहांतून ।
श्रेणिक भूपति निघे जयाचें प्रसन्न सतत मन ॥ २१८ ॥
श्रीजिनदास श्रेणिक भूपति हर्षित होऊन ।
सभागृहामाधें आला ज्याचें आतुर होय मन ॥ २१९ ॥
सामन्तादिक नृप प्रतीक्षा करित तिथें होते ।
येतां स्वागत केलें त्याचें प्रसन्नतर-चित्तें ॥ २२० ॥

इति श्रीरविषेणाचार्यकृते पद्मचरिते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुले कृत-पद्यानुवादे "श्रेणिकचिन्ता" भिधानं नाम द्वितीयं पर्व ॥ २ ॥

---

१ वडील भाऊ. २ बापासारखा. ३ सकाळचीं. ४ भाट. ५ उत्तम कुलांत जन्मलेला. ६ माहित.

# तिसऱ्या पर्वाचा सारांश

( पद्मचरितासंबंधीचा प्रश्न व त्याला अनुसरून क्षेत्र व काल आणि वृषभनाथाचें चरित्रवर्णन )

राजा श्रेणिकानें सिंहासनावर बसून आज्ञांकित राजांचे मुजरे स्वीकारले. यानंतर महावीर प्रभु विपुलाचलावर आले आहेत. आपण त्यांच्या दर्शनाला जाऊन पवित्र होऊं असें सर्व राजांना त्यानें म्हटलें. सर्वांना मोठा हर्ष झाला व ते आपली आज्ञा मान्य आहे असें म्हणाले. नंतर राजा हत्तीवर बसून आपल्या परिवारराजासह निघाला.

समवसरणांत जाऊन त्यानें वीरप्रभु व गौतम गणधरांना भक्तीनें वन्दन केल्यानंतर " अन्यमतीयांनीं रामचरित अन्यथा वर्णिलें आहे. रावण राक्षस होता व तो मांसभक्षण करीत असे. त्याचा वानरांनीं पराभव केला. रामचन्द्रांनीं वालीबरोबर सन्धि करून त्यास मारलें, रावणानें स्वर्गांत जाऊन इंद्राच्या बगीचाचा विध्वंस केला व त्याला कैदेंत टाकलें. कुंभकर्ण सहा महिने झोप घेत असे. वानरांनीं पर्वतांनीं समुद्रांत पूल बांधिला वगैरे विपरीत लिहिलें आहे. यास्तव हे प्रभो, मला सत्य रामकथा सांगून संशयकर्दमांतून वर काढावें " अशी श्री गौतमांना विनंति केली. यानंतर गौतम गणधर राजाला म्हणाले " राजन्, रावण राक्षस नव्हता व तो मानवभक्षक आणि मांसभक्षकही नव्हता. कुम्भकर्णादिकही राक्षस नव्हते. सुग्रीवादिक वानर नव्हते, त्यांची खरी कथा तुला मी सांगेन. पण ती सांगण्यापूर्वी क्षेत्रकालाचें वर्णन करणें आवश्यक आहे. जसें बीजाला अंकुर यावयास विशिष्ट क्षेत्राची व कालाची आवश्यकता असते तसें महापुरुषांचें चरितवर्णनापूर्वी क्षेत्रकालाचेंहि वर्णन करणें आवश्यक आहे. "

या मध्यलोकाच्या मध्यभागीं असंख्य द्वीप समुद्रांनीं वेष्टिलेला जंबूद्वीप आहे. मेरुपर्वताच्या उत्तरेला उत्तरकुरु भोगभूमीमध्यें जांभळाच्या झाडाच्या आकाराचा 'सुदर्शन' नामक पर्वत आहे. त्यामुळें या द्वीपाला जम्बूद्वीप हें नांव आहे.

मेरुपर्वताच्या दक्षिणेकडे भरतक्षेत्र आहे व त्याच्या दक्षिणेकडे 'राक्षस' द्वीप आहे. (याचें वर्णन पुढें विस्तृत येईल) या भरत-क्षेत्राला अत्यंत प्राचीनकालीं भोगभूमीचें स्वरूप प्राप्त झालें होतें. त्याकालीं मानव अत्यंत सुखी होते. त्यांचें जीवन दहा प्रकारच्या कल्पवृक्षापासून मिळणाऱ्या भोगोपभोगांच्या सेवनानें सुखमय होतें. पशूंचें जीवनही कल्पवृक्षापासून मिळाणाऱ्या अन्नानेंच सुखयुक्त झालेलें होतें.

सत्पात्राला दान देण्यानें भोगभूमींत जन्म होतो व तेथें मनोवाञ्छित सुख कल्पवृक्षापासून प्राप्त होत असतें.

तें भोगभूमीचें स्वरूपही समाप्त होऊन कर्मभूमीची दशा या भारत वर्षाला प्राप्त होण्याचा काल आला. त्यावेळीं येथें 'कुलकर' पदाला धारण करणारे चौदा ज्ञानी पुरुष झाले. व प्रत्येकानें कर्मभूमींत होणाऱ्या निरनिराळ्या अवस्थांचें ज्ञान करून देऊन प्रजांना निर्भय व सुखी केलें. अशा रीतीनें मानव-कुलांची त्यांनीं जोपासना व उन्नति केल्यामुळें त्यांना 'कुलकर' हें सार्थक नांव प्राप्त झालें. त्यांचीं नांवें याप्रमाणें:— १ प्रतिश्रुति, २ सन्मति, ३ क्षेमंकर, ४ क्षेमन्धर, ५ सीमङ्कर, ६ सीमन्धर, ७ चक्षुष्मान्, ८ यशस्वी, ९ विपुल, १० अभिचन्द्र, ११ चन्द्राभ, १२ मरुदेव, १३ प्रसेनजित्, १४ नाभिराज.

नाभिराज व मरुदेवी या उभयतांचा विवाह झाला. हे उभय आनन्दानें कालक्रमण करीत होते. इन्द्रानें श्री – ऱ्ही – धृति आदिक सहा देवी व ५६ छप्पन्न दिक्कुमारींना भावी जिनमाता मरुदेवीची सेवा करण्यासाठीं पाठविलें. व सांगितलें कीं, 'वृषभनाथ' प्रथम तीर्थंकर मरुदेवीच्या पोटीं जन्म घेणार आहेत. त्याप्रमाणें जिनमातेची त्या अनेक प्रकारें सेवा करूं लागल्या.

एके रात्रीं पहाटेच्या वेळीं जिनमातेला १६ स्वप्नें पडलीं. प्रभु तिच्या गर्भांत आले. सोळा स्वप्नांचीं फलें जिनमातेनें नाभिराजाला विचारिलीं. तेव्हां त्रैलोक्यनाथ वृषभ तीर्थंकर तुझ्यापोटीं येणार आहेत असें राजानें सांगितलें. जिनेश्वर गर्भांत नऊ महिने राहिले. मातेला गर्भापासून तिळमात्रही त्रास झाला नाहीं.

शुभ दिवशीं प्रभु जन्मले. इन्द्रादिकांचीं आसनें कंपित झालीं. त्यांनीं अयोध्येंत येऊन जिनबालकाला मेरु पर्वतावर नेऊन त्याचा क्षीरसागरजलानें अभिषेक केला व वस्त्रभूषणांनीं भूषित करून व परत आणून जिनमातेच्या मांडीवर त्याला बसविलें. नंतर आनंद-नृत्य करून इन्द्र स्वर्गाला गेला.

नाभिराजानें मोठा जन्मोत्सव करून त्याचें 'ऋषभनाथ' असें नांव ठेविलें. कालक्रमानें प्रभूला बाल्यावस्था संपून तारुण्य प्राप्त झालें. प्रभु आधीच सुंदर होते. तारुण्यानें त्यांचें सौंदर्य अत्यंत मोहक झालें.

एकेवेळीं प्रजाजन क्षुधादिपीडित होऊन नाभिराजाकडे आले. तेव्हां त्यानें त्यांना जीवनोपाय माझा पुत्र सांगेल असें सांगितलें व त्यांना त्यानें ऋषभनाथाकडे आणलें. प्रभूंनीं असि, मषि, कृषि, वाणिज्य, पशुपालन व शिल्प अशा सहा उपायांनीं जीवन सुखकर होतें असें सांगितलें. त्यामुळें प्रजा या उपायांनीं सुखी झाली. प्रभूंनीं क्षत्रिय, वैश्य व शूद्र या तीन वर्णांना प्रगट केलें. तरवारीच्या द्वारें प्रजेचें रक्षण करणारा, दुष्टांचा निग्रह करणारा, शिष्टांचें पालन करणारा क्षत्रियवर्ण; व्यापार, पशु-संरक्षण, शेतकी करणारा वैश्यवर्ण; शिल्पानें उपजीविका करणारा शूद्रवर्ण असे तीन वर्ण त्यांनीं प्रगट केले. याप्रमाणें उपाय सांगून भगवंतांनीं कृतयुग उत्पन्न केलें.

प्रभूचा विवाह नंदा व सुनन्दा या दोन राजकन्यांबरोबर झाला व यांच्या-पासून त्यांना भरतादिक शंभर पुत्र झाले. प्रभूचा फार मोठा काल सुखांत गेला.

एकेवेळीं प्रभूच्या सभेंत इन्द्रानें नीलाञ्जनेचें नृत्य करविलें. ती नाचत असतां तिची जीवनलीला समाप्त झाली. त्यामुळें प्रभूच्या मनांत वैराग्य उत्पन्न झालें. लौकान्तिक देवांनीं येऊन त्यांच्या वैराग्याची प्रशंसा केली. "या भारतवर्षांत मोक्षमार्ग नष्ट होऊन फार मोठा काल लोटला आहे. आतां आपण पुनः मोक्षमार्ग जनतेला दाखवून तिला आत्मसुखाची प्राप्ति करून द्याल यांत आम्हाला संशय वाटत नाहीं." असें बोलून ते निघून गेल्यानंतर इन्द्रादिक देवांनीं 'सुदर्शना' नांवाची रत्नखचित शिबिका (पालकी) आणिली. तींत प्रभूला वस्त्रभूषणांनीं भूषित करून बसविलें व तिलकोद्यानांत त्यांना नेलें. प्रजाजनाला ज्या स्थानीं प्रभूंनीं त्यागिलें त्या स्थानाला प्रयाग असें म्हणतात. किंवा सर्व सांसारिक सुंदर भोगांचा फार मोठा त्याग जिथें केला त्याला प्रयाग म्हणतात.

प्रथमतः माता-पिता बंधुजनांची संमति घेऊन व 'नमः सिद्धेभ्यः' असें बोलून प्रभु श्रमण झाले. सगळीं वस्त्राभूषणें प्रभूनीं त्यागिलीं, केशलोच केला. अठ्ठावीस मूलगूण धारण केले. प्रभु श्रमणश्रेष्ठ झाले. सहा महिने ते ध्यानस्थ बसले.

स्वामि-भक्तिवश होऊन चार हजार राजांनीं दीक्षा घेतली पण त्यांना संयमाचें पालन करतां येईना. ते भ्रष्ट झाले व स्वच्छंदानें अनेक वेष धारण करून फिरूं लागले.

मरीचि हा भरताचा पुत्र अर्थात् प्रभूचा नातू होता. त्यानेंही आपल्या आजावरील प्रेमानें दीक्षा घेतली पण जैनदीक्षा अतिशय कठिण समजून तो पारिव्राजक साधु झाला. भगवीं वस्त्रें त्यानें धारण केली. जटा वाढविल्या. त्यानें आपले अनेक अनुयायी वाढविले.

प्रभु ध्यानस्थ असतां नमि व विनमि नांवाचे दोन राजपुत्र त्यांना वंदन करून आम्हाला धनराज्यादिक भोग्य पदार्थ द्या व आमची ही इच्छा पुरवा असें म्हणूं लागले. त्यावेळीं धरणेन्द्र आसन कंपित झाल्यामुळें तेथें आला व त्यानें त्या दोघांना विजयार्ध पर्वतावर नेऊन तेथील दक्षिण-श्रेणी व उत्तर-श्रेणीचें राज्य व अनेक विद्या दिल्यानंतर तेथून तो परत स्वस्थानीं गेला. "जे जिनधर्मात तत्पर असतात त्यांना निरन्तराय विविध राज्यादिक भोगांची प्राप्ति होते. यास्तव भव्य-जनांनों, नेहमीं जिनाचे दास होऊन धर्माचरणांत तत्पर राहा म्हणजे तुम्ही सूर्याप्रमाणें तेजस्वी होऊन सर्व कर्मांचा नाश करून अक्षयसुखी अर्थात् मुक्त व्हाल."

# तिसरें पर्व-पद्मचरित-श्रवण-प्रश्न.

---

अनुष्टुप्

सभेंत श्रेणिक वसे, भद्रसिंहासनावरि[1] ।
सर्वालंकार-संपन्न, शोभतो रवि अम्बरीं[2] ॥ १ ॥
सामन्तगण हर्षानें, उठून स्वागता करी ।
नमस्कार करी त्यास, शीर्ष[3] टेकून भूवरी ॥ २ ॥
सवें त्यांच्या निघे भूप श्रीवीर-शुभदर्शना ।
गजावरि वसे ज्याच्या प्रश्नांची मनिं योजना ॥ ३ ॥
चोपदार पुढें धावे छडी घेऊन तो जनां ।
हटवी दाखवी मार्ग करी चाले शुभा वना ॥ ४ ॥
श्रुतज्ञानजलें[4] ज्याची धुतली ज्ञान-चेतना ।
त्या गौतमास पाहून नृपाच्या मोद हो मना ॥ ५ ॥
कान्तीनें चन्द्र गमला तेजें जो रवि वाटला ।
अशा गणीस[5] पाहून हर्ष तन्मनिं दाटला ॥ ६ ॥
प्रसन्नशा शरीरानें जनाला शान्त जो करी ।
गणनायक साधूंचा वघतां पापसंहरी ॥ ७ ॥
गजावरून उतरे राजा विनयशील तो ।
प्रफुल्ल-नेत्र हृदयीं नम्र होऊन चालतो ॥ ८ ॥
प्रदक्षिणा तयें तीन घालून गुरु वंदिला ।
आशीर्वादास ऐकून शुद्धभूवरि वैसला ॥ ९ ॥
धरेस[6] दन्तकान्तीनें करून धवला नृप ।
विचारी कुशलप्रश्नें प्रश्न पापांत निष्कृप[7] ॥ १० ॥
ऐकावें पद्मचरित इच्छा प्रवल मानसीं ।
धरून आलों सांगावें आहा पूर्ण दयार्रसी[8] ॥ ११ ॥

---

१ उत्तम सिंहासनावर. २ आकाशांत. ३ मस्तक. ४ आचारांगादि बारा-श्रुतज्ञानरूपी पाण्यानें ज्याची आत्मज्ञानरूपी चेतना निर्मल झाली आहे. ५ गणधरास. ६ पृथ्वीला. ७ निर्दय. ८ दयारसानें भरलेले.

कुमतानुग लोकांनीं अन्यथा वर्णिलें असे ।
सत्यार्थता न उरली हेयं[1] तणोंचि तें दिसे ॥ १२ ॥
असे राक्षस लङ्केश विद्यावान्[2] नर वा असे ।
तो क्षुद्रवानरें झाला पराभूत वदा कसें ? ॥ १३ ॥
अतिदुर्गन्ध तो कैसें नरमांसास भक्षितो ।
राम वालीस साधून सन्धि बा केंवि मारतो ? ॥ १४ ॥
जाऊन रावण स्वर्गीं तयें उद्यान मोडिलें ।
इन्द्रा धरून बांधून कैसें कैदेंत टाकिलें ? ॥ १५ ॥
सर्वशास्त्रार्थनिपुण रोगें पीडित जो नसे ।
तो सहा महिने झोप घेई युक्त न हें दिसे ॥ १६ ॥
देवही न समुद्रांत सेतु[3] बांधावया क्षम ।
वानरें पर्वतें कैसा रचिला वद निर्मम[4] ॥ १७ ॥
प्रसन्न नाथ ! होऊन सांगावें सगळें [illegible] ।
सन्देहकर्दमांतून[5] भव्यां उद्धारि निर्मल वडे ॥ १८ ॥
या परि श्रेणिकें भूपें प्रार्थिला यति[illegible]रम ।
सांगतों ऐक हे राजन् ! जें होय सुखद[illegible] ॥ १९ ॥
दन्तकान्ति गणेशाची निर्मला मलिना जगा ।
जणु धूत असे वाटे भासे सर्वा सुरापगा[6] ॥ २० ॥
मेघारवासम निघे वाणी [illegible] वीर दिसे सदा ।
लतागृहिं मयूरांना नाचव पापहृत्[5] वदा ॥ [illegible] ॥
आयुष्मन्ता महीपाला ! दे[illegible] सदा वसे ।
ऐक वाक्यें जिनेशाचीं अस[illegible]दापि न जनां दि[illegible] २२ ॥
दशास्य राक्षस नसे न तो [illegible]
कुबुद्धि खोटें वदती ते सदा [illegible] सुर । [illegible]३ ॥
पायावांचून हे राजन् घराची रच[illegible]
प्रस्तावहीन वचन निराधार तसें [illegible] किंकर ॥ २४ ॥

---

१ टाकण्यास योग्य. २ आकाशगमनादिक विद्या जाणणारा. ३ पूल. ४ ममतारहित हे गौतमगणनायका. ५ संशयरूपी चिखलांतून. ६ गंगानदी. ७ लोकांना फसविणारा.

( मध्यलोकाचें वर्णन )

म्हणून क्षेत्र-कालाचें शास्त्रीं वर्णन पाहिजे ।
महानराचें चरित बीजासम तिथें रुजे ॥ २५ ॥
अलोकाकाश हें आहे अनन्तचि सभोंवती ।
त्रिलोकमध्यभागांत त्याची राहे सदा स्थिति ॥ २६ ॥
तालवृक्षासम तथा उखळासम आकृति ।
त्रिलोकाची तया नित्य समीरत्रय[1] वेष्टिती ॥ २७ ॥
तिर्यग्लोकांत हा आहे जम्बूद्वीप मधोमध ।
असङ्ख्यसागरद्वीप वेष्टिती त्या वदे बुध ॥ २८ ॥
कुंभाराचें जसें चाक त्याची आकृति हा धरी ।
लवणार्णव[2] त्या वेष्टी जाण श्रेणिक अन्तरीं ॥ २९ ॥
सर्वत्र द्वीप हा आहे लक्षयोजन विस्तृत ।
मेरुपर्वत त्यामध्यें वज्रमूल नि अक्षत[3] ॥ ३० ॥
मध्यें सुवर्णमय ज्याची मणिरत्नें सदा युत ।
संध्याभ्ररङ्[4]स पाहून तुङ्गशृङ्गें सुशोभित ॥ ३१ ॥
केशाग्रमात्र रे गगनांस्वर्गाचें यांत अन्तर ।
नव्याण्णवसहस्रोच्च योजनें बहु सुन्दर ॥ ३२ ॥
सहस्रयोजनें पाया जो वज्रमय भूतलीं ।
जो रुंद भूमित[5] दश एक रुंद नभस्तलीं ॥ ३३ ॥
हा असे महत्तर राजा विनयशील जना गमे ।
हा नेत्रें हृदयीं नम्र होऊन त्याचें तिथें रमे ॥ ३४ ॥
या द्वीपीं त्रयें तीन घालून उत्तर दक्षिण ।
सप्त क्षेत्रांस ऐकून शुद्धभूय त्या विचक्षण[6] ! ॥ ३५ ॥
शाखाफलांकान्तीनें करून सारचि पर्वत ।
महावृक्षहि जम्बू[7] शाल्मली जाण शाश्वत ॥ ३६ ॥
विजयार्द्धी पुरीं इच्छ आणि दहा वसे ।
भरतीं एक हा शैल तथा ऐरावतीं दिसे ॥ ३७ ॥

---

१ तीन वात अर्थात् घनवात, अंबुवात व तनुवात यांनीं वेढलेला. २ लवणसमुद्र ३ अखण्ड–तुटक नसलेला. ४ सन्ध्याकाळच्या मेघाप्रमाणें तांबडा. ५ पृथ्वी मोजण्याची कांठी. ६ हे चतुर श्रेणिक राजा. ७ नित्य अकृत्रिम.

विदेहीं देश वत्तीस विजयार्द्धहि तेवढे ।
राजधानीहि वत्तीस तट गोल तया कडे ॥ ३८ ॥
जंबूद्वीपीं सहा भोगभूमि मानी मनीं नृप ।
अकृत्रिमगृहें आठ जिनांचीं जाण सत्कृप ॥ ३९ ॥
अडुसष्ट गुहा येथें विजयार्द्धी प्रतिद्वय ॥
जाणाव्यात नद्या चौदा यांत कांहीं न संशय ॥ ४० ॥
वक्षार आदि गिरि जे सर्व त्यांच्यावरी गृहें ।
शोभती श्रीजिनेन्द्रांचीं जाणावीं सर्वदा महें[1] ॥ ४१ ॥

( राक्षसादि-द्वीपांचें वर्णन )

जम्बूभरत नांवाच्या प्रदेशीं दक्षिणेकडे ।
राक्षसद्वीप हा आहे पापाचें जेथ वाकडें ॥ ४२ ॥
जिनबिम्वें सहितसें जिनमन्दिर सुन्दर ।
असे जेथें यति ध्याती जे श्रीमन्दरवत्[2] स्थिर ॥ ४३ ॥
महाविदेहक्षेत्राच्या भूवरी पश्चिमेकडे ।
विशाल किन्नरद्वीप पुण्य जेथें सदा खडे ॥ ४४ ॥
जिनबिम्बासहित हा द्वीप आहे मनोरम ।
वन्दना करण्या येती यति जेथें सुनिर्ममें[3] ॥ ४५ ॥
तथैरावत-वर्षाच्या उत्तरीं द्वीप उत्तम ।
गन्धर्व नाम हें त्याचें जिनबिम्बें हरी तम[4] ॥ ४६ ॥
मेरुपूर्वविदेहाच्या वेदी वरि दिसे सदा ।
धरणद्वीप जो जैनमन्दिरें पापहृत्[5] वदा ॥ ४७ ॥
भरतैरावत-क्षेत्रीं वृद्धिहानि सदा वसे ।
बाकीच्या भूमिमध्यें[6] ही कदापि न जनां दिसे ॥ ४८ ॥

( भोगभूमीचें वर्णन )

जम्बूद्रुमस्थ[7]-गेहांत अनावृत वसे सुर ।
शेकडो किल्विष[8] सुर त्याचे सतत किंकर ॥ ४९ ॥

---

१ पूजनानें युक्त. २ मेरुपर्वताप्रमाणें. ३ अत्यंत ममतारहित. ४ अज्ञान. ५ पापनाशक. ६ हैमवत, हरि, विदेह, रम्यक, हैरण्यवत या पांच क्षेत्रांत हानिवृद्धि होत नाहीं. ७ जम्बूवृक्षावरील घरांत. ८ अस्पृश्यातारखे देव.

सुखमा पहिल्या काळीं भरतक्षेत्र उत्तम ।
भोगभूमि असे जेथें दशधा कल्पित-द्रुम ॥ ५० ॥
त्यावेळीं सूर्यसदृश त्रिक्रोशोच्छ्रित[1] मानव ।
सर्वलक्षण सम्पूर्ण वसे यौवन तें नव ॥ ५१ ॥
उत्पन्न होतें युगल तीन पल्यायुषी असे ।
त्या प्रेमबन्धनें बद्धा युगपत्सृष्टि ही दिसे ॥ ५२ ॥
त्यावेळीं भू सुवर्णाची मण्यांनीं भरली असे ।
सर्वेष्टपूर्ण युगला लाभे सौख्यें तिथें वसे ॥ ५३ ॥
चतुरङ्गुलमानाचें[2] नाना तृण सुगन्धित ।
वाटे त्याचा मृदुस्पर्श जीवा करी सुखान्वित ॥ ५४ ॥
सर्वर्तुफलपुष्पांनीं वृक्ष सुन्दर शोभती ।
सुखानें गाय महिषी बकरे आदि राहती ॥ ५५ ॥
कल्पवृक्षज अन्नास सिंहादि पशु भक्षिती ।
ते सर्व सौम्य असती हिंसेला नच साधिती ॥ ५६ ॥
वापी पद्मादिपुष्पांनीं भरल्या बहु सुन्दर ।
पाणी मध्वादिसदृश[3] त्यांचें स्वादमनोहर ॥ ५७ ॥
उत्तुङ्ग पञ्च रंगांचे शैल रत्नें प्रकाशती ।
सर्वप्राणिगणा तेथें ते सौख्यासचि अर्पिती ॥ ५८ ॥
पाणी नद्यांचें तेथील दूधतूपमधासम ।
अति गोड असे त्यांचे तटीं रत्नादि-विद्रुमें[4] ॥ ५९ ॥
शीत उष्ण असे तेथें कोणासहि न बाधक ।
नसे भय हि कोणास सर्वदा वाढतें सुख ॥ ६० ॥
ज्योतिरङ्गद्रुम तिथें रविचन्द्रास झांकिती ।
सर्वेन्द्रियसुखास्वादप्रद[5] कल्पतरुस्थिति ॥ ६१ ॥
प्रासाद-वृक्षावरतीं[6] उद्यानें शयनासनें ।
स्वादु पानाशनें तेथें तेथें वस्त्रानुलेपनें[7] ॥ ६२ ॥

---

१ तीन कोस उंचीचे. २ चार बोटें उंचीचे. ३ मध, दूध वगैरे सारखें गोड. ४ पोवळे. ५ सर्व इन्द्रियांना सुख देणाऱ्या स्वादानें युक्त अशा कल्पवृक्षांचें अस्तित्व. ६ गृहाङ्गकल्पवृक्ष. ७ सुगंधित उटी.

कर्णेन्द्रिया रमविती वाद्यांचे शब्द कोमल ।
गन्ध आनन्दवी चित्ता सर्व सौख्यद निश्चल ॥ ६३ ॥
दशप्रकारचे[1] कल्पवृक्ष सौख्यास अर्पिती ।
रमतीं जोडपीं तेथें वर्णावें सौख्य तें किती ॥ ६४ ॥

दानफल

यापरि वर्णन ऐकुनि भूपश्रेणिक विचारिता झाला ।
उत्पत्ति केवि होते वदा प्रभो, भोगभूंत हें मजला ॥ ६५ ॥
गणधर वदले भूपा, जे सत्पात्रास[2] दान देतात ।
ते सरळवृत्ति मानव मिळविति शुभजन्म भोगभूमींत ॥ ६६ ॥
जे कुत्सित-पात्राला भोगेच्छेनेंच दान देतात ।
ते भोगभूत हय-गज-वृषभादिक पशुगतींत जातात ॥ ६७ ॥
अतिशय मृदु शेतामधिं खोल जमिनींत पेरिलें बीज ।
तें विपुल सुफल देतें सत्पात्रीं दान तेंवि सुखकाज ॥ ६८ ॥
जें पाजिलें उसाला पाणी तें मधुर रस जसें बनतें ।
गोपीत[3] उदक किंवा मधुर असें दुग्धरूप परिणमतें ॥ ६९ ॥
या परि तपोव्रतांनीं भूषित निर्ग्रन्थ साधुवर्यास ।
जो दान देइ मिळतें फळ त्याचें विपुल त्या महार्थास[4] ॥ ७० ॥
जरि बीज माळरानीं पेरियलें त्यांत अल्प फल लाभे ।
निम्बा सिंचित पाणी कटुकपणाला धरून राहि उभें ॥ ७१ ॥
सर्पास पाजिलेलें दूध बने विष तसें कुपात्रास ।
दान दिलें तें असतां देतें जीवास दुर्गतित्रास ॥ ७२ ॥
यापरि दानाचें फल भूपा, जीवा भलें वुरें मिळतें ।
वस्तु पुढें जी जैशी तैशी ती दर्पणामधें दिसतें ॥ ७३ ॥

---

१ ज्योतिरंग, गृहांग, प्रदीपाङ्ग, तूर्यांग, भोजनांग, भाजनांग, वस्त्रांग, माल्यांग, भूषांग व मद्याङ्ग असे दहा प्रकारचे कल्पवृक्ष भोगभूमींत असतात व त्यापासून पंचेन्द्रियांना सुखदायक सर्व वस्तु भोगभूमिजांना मिळतात. २ नाव जशी तारून नेते तसें संसारांतून तारून नेणाऱ्या निर्ग्रन्थ मुनींस, प्रतिमाधारक श्रावकांस व सम्यग्दृष्टीला क्रमें उत्तम, मध्यम व जघन्य सत्पात्र म्हणतात. ३ गायीनें प्यालेलें पाणी. ४ महार्थ-मोक्ष हें ज्याचें साध्य आहे.

( कर्मभूमीला प्रारंभ होण्यापूर्वी चौदा मनु झाले त्यांचें वर्णन )

जैसें शुक्लानंतर मेचकं[1] मासांत पक्ष ये नियमें ।
उत्सर्पिणि अवसर्पिणि कालाचें चक्र हें फिरे नि रमे ॥ ७४ ॥
कल्पद्रुमनाशाचा प्रसंग सम्प्राप्त होय ज्या समयीं ।
कुलकर होती येथें नांवें त्यांचीं क्रमें अशीं पाही ॥ ७५ ॥
पहिल्या प्रतिश्रुतीच्या वचन-श्रवणें प्रजेस आनन्द ।
झाला स्थिरता आली सगळा गळला मनांतला खेद ॥ ७६ ॥
जन्मत्रय[2] जो जाणत होता अपुलें असा प्रजापाल ।
हरुनि क्षोभ तियेचा करी व्यवस्थित असे महाप्रबल ॥ ७७ ॥
झालीं व्यतीत नंतर वर्षं जेव्हां अनेक कोटि अशीं ।
सन्मति नामक झाला मनु दुसरा शोभतो उडूंतं[3] शशी ॥ ७८ ॥
नन्तर तिसरा झाला क्षेमंकर ज्या सुनाम जो ज्ञानी ।
क्षेमन्धर या नंतर झाला ज्याला प्रजा सदा वानी ॥ ७९ ॥
सीमङ्कर हा पञ्चम[4] सीमन्धर षष्ठ[5] जाहला प्राज्ञ ।
सप्तम[6] चक्षुष्मान्मनु सांभाळी आपली प्रजा अज्ञ ॥ ८० ॥
जाउनि याला वदली असे प्रजा काय हें नभीं दोन ।
दिसतात गोल आम्हां सांगा यांचें स्वरूपविज्ञान ॥ ८१ ॥
नन्तर वदला त्यांना चक्षुष्मान् पूर्वजन्म आठवुन ।
ऐका प्रजाजनांनो मजला जें जाहलें असें ज्ञान ॥ ८२ ॥
पूर्वभवांत विदेहीं कालक्षय जेधवा घडे घडतें ।
परिवर्तन मज त्याचें ज्ञान जिनें कथियलें असें होतें ॥ ८३ ॥
ज्या ज्योतिरङ्ग[7] वदती कल्पद्रुम कान्तिमन्दता त्यांची ।
कालक्षयेंचि होते, स्थिति ऐशी होय ती असे साची ॥ ८४ ॥
तेव्हां दिसती हे नभिं गोल असे दोन कान्तिमन्त तया ।
सूर्य नि चन्द्र वदावें सांगुनि ऐसें प्रजा करी अभया[8] ॥ ८५ ॥
ज्योतिष्क देव असती हे दोघे भ्रमति सतत आकाशीं ।
तीव्रास सूर्य वदती शीतद्युति[9] बोलतात त्यास शशी[10] ॥ ८६ ॥

---

१ कृष्णपक्ष. २ मागचा जन्म, वर्तमानकालीन जन्म व पुढील जन्म. ३ नक्षत्रांत. ४ पांचवा. ५ सहावा. ६ सातवा. ७ प्रकाश हेंच ज्यांचे अंग आहे असे कल्पवृक्ष. ८ निर्भय. ९ थंड कान्ति ज्याची आहे. १० चन्द्र.

ज्योतिष्क, भवनवासी, स्वर्गी, व्यन्तर असे चतुर्भेद।
देवांचे हे असती यांच्या हृदयीं कदापि न च खेद ॥ ८७ ॥
शुभ कर्मोदय ऐसा योग्य जया लाभतो असे देव।
होती हें जाणावें कारण कथिलें तुम्हां असें सर्व ॥ ८८ ॥
सूर्यास्त जाहल्यावर वाढे चन्द्रांत कान्ति आकाशीं।
नक्षत्रवृन्द दिसतो ज्ञान असें साठवा मनोदेशीं[1] ॥ ८९ ॥
कालस्वभाव ऐसा जाणुनि सोडा मनांतली भीति।
ऐसें वदतां सगळी प्रजा तया आदरें तदा स्तविती ॥ ९० ॥
चक्षुष्मानानन्तर कुलकर झाला यशस्वि नांवाचा।
त्यानन्तर विपुलाभिध असत्य ज्याची कदापि न च वाचा ॥ ९१ ॥
अभिचन्द्र नाम कुलकर नन्तर चन्द्राभ आणि मरुदेव।
झाला प्रसेनजित् या नामें त्यावरि धरी प्रजा भावें[2] ॥ ९२ ॥
त्या नन्तर चौदावा मनु झाला नाभिराज ज्या नांव।
संकटसमुद्र तरण्या मध्यें होतें प्रजाजनां नाव ॥ ९३ ॥
सगळे जनकासम[3] हे प्रजाजनांच्या कुलास करणारे।
शुभ जन्माचे झाले भय प्रजांचें सदैव हरणारे ॥ ९४ ॥
कल्पद्रुम नाभीच्या क्षेत्रीं[4] प्रासादरूप घेऊन।
राही अतिशय उन्नत उद्यानावृत[5] करी मनोहरण ॥ ९५ ॥

( आदितीर्थंकराचे माता-पिता मरुदेवी व नाभिराज यांचें वर्णन. )

मरुदेवी या पत्नी चन्द्राला रोहिणी जशी भार्या
पातिव्रत्यादि-गुणें हरण करी पतिमनास जी आर्या[6] ॥ ९६ ॥
गंगा जैशी हिमगिरिपासुनि[7] जन्मून जाय जलधीस[8]।
मरुदेवी नृपकन्या वरि ती राजाधिराज नाभीस ॥ ९७ ॥
मानस-सरांत हंसी अनुसरते जेवि राजहंसास।
मरुदेवी नृपतनया अनुसरली तेवि नाभिराजास ॥ ९८ ॥
जैशी अरुन्धती[9] निजपतिसान्निध्या कदापि नच सोडी।
नृप नाभि नि मरुदेवी यांची शोभे मनोहरा जोडी ॥ ९९ ॥

---

१ मनाचे ठिकाणीं. २ प्रेम. ३ बापाप्रमाणें. ४ जागेंत. ५ ज्याच्या सभोंवती बगीचा आहे असा. ६ साध्वी. ७ हिमालयापासून. ८ समुद्रास. ९ अरुन्धती आपल्या वशिष्ठ पतीपासून जशी कधींही वेगळी राहिली नाही तशी नाभिराजापासून मरुदेवी केव्हांही वेगळी राहिली नाहीं.

हंसी-सम गमन करी बोले ती कोकिलेसमा वाणी ।
प्रीति करी चक्रीसम नाभीची जाहली प्रिया राणी ॥ १०० ॥
आदरणीया झाली सर्वजनां शारदेसमान जगीं ।
निजपतिसह मरुदेवी पञ्चेन्द्रियसौख्य सर्वदा भोगी ॥ १०१ ॥
अनुपम सौन्दर्यवती चन्द्रकलांनींच निर्मिली वाटे ।
सौन्दर्याची पुतळी जनां अशी आढळेल नच कोठें ॥ १०२ ॥
निजपति-कथाचि तिजला कर्णालङ्कार-तुल्य नित वाटे ।
मणिकर्ण-भूषणाचें प्रेम तिच्या मानसांत नच दाटे ॥ १०३ ॥
पसरे तिची कपोलप्रभा[1] सदा म्हणुनि रत्नदीपांची ।
आवश्यकता उरली निजवैभव दाखवावया साची ॥ १०४ ॥
पुण्याचरणीं जैनश्रुति[2] जणु ही सुजनमानसा गमते ।
हिजला बघतां अमृत-प्राशनसम मुदित मनुजमन होतें ॥ १०५ ॥
वाणी मधुरा वीणा वाजत आहे हिची मना वाटे ।
स्मितहास्यश्वासासह सुगन्ध सगळ्या दिशांत बहु दाटे ॥ १०६ ॥
स्वाभाविक ओठाची लाली अन्य स्त्रियांत नैव दिसे ।
बिम्बीफलें[3], कोमलदल, तैसें ती पोवळ्यास सतत हसे ॥ १०७ ॥
चरण हिचें जणु मानुनि कमल इथें भृंग शब्द करितात ।
तेणें वैडूर्याचे पैंजण विफलचि मनास गमतात ॥ १०८ ॥
नाभिनृपासह भोगी कल्पतरूद्भव[4] अनेक भोगां ही ।
वर्णन हिचें न होइल कोटिग्रन्थें हि पूर्णसें पाही ॥ १०९ ॥

[ श्री ऱ्ही आदि देवता व छप्पन्न दिक्कुमारिका मातेची सेवा करितात )

सेवा हिची कराया इन्द्राज्ञावश कुमारिका[5] आल्या ।
पाहुनि हिजला जननी मानुनि मनिं त्या प्रसन्न बहु झाल्या ॥ ११० ॥
होवो उत्कर्ष तुझा जननी तूं दीर्घकाल जगतिं जग ।
आज्ञा दे आम्हाला अमुचा राहील सतत अनुराग[6] ॥ १११ ॥
कांहीं तिच्या गुणांची करिती स्तुति जे मनास मोदविती ।
कांहीं करांत घेउनि वीणा त्या चतुर मधुर वाजविती ॥ ११२ ॥

---

१ गालाची कान्ति. २ जिनवाणी. ३ पिकलेलें तोंडलें. ४ कल्पवृक्षापासून उत्पन्न झालेले. ५ श्री, ऱ्ही, धृति, कीर्ति, बुद्धि व लक्ष्मी या व विजयादिक ५६ देवता यांना कुमारिका म्हणतात. ६ प्रेम.

श्री ऱ्ही धृति लक्ष्मी मति शान्ति नि रति कान्ति कीर्ति पुष्टि अशा ।
छप्पन दिशा-कुमारी जिनमातेच्या सदैव असति वशां[1] ॥ ११३ ॥
चरणां करून वन्दन नाजुक हस्तें तयास त्या चुरती ।
कोणी तांबुल देती आसन कोणी तिच्यापुढें करिती ॥ ११४ ॥
कोणी करांत घेउनि खड्गे[2] तिच्या दक्ष रक्षणीं होती ।
कोणी बाह्यद्वारीं सतत पहारा सहर्ष आचरती ॥ ११५ ॥
कांहीं करांत भाला कांहीं हातीं सुवर्णयष्टीसें[3] ।
कांहीं घेऊन सुरी शोभविती कन्यका स्वमुष्टीस ॥ ११६ ॥
कांहीं चामर वारिति धरिती जननीशिरीं सितच्छत्र[4] ।
कोणी अनेक भूषा[5] देती कोणी अनेकविध वस्त्र ॥ ११७ ॥
कोणी अंगण झाडुनि शिंपिति कोणी सुगन्धि उदकास ।
कोणी रंगावलिनें रचिती स्वस्तिक नि सूर्य-चन्द्रास ॥ ११८ ॥
नानाविध पक्वान्नें चटण्या भाज्या सुवर्णपात्रांत ।
वाढुनि जिनमातेला देती सेविति तियेस दिनरात ॥ ११९ ॥
मधुर नि रुचिकर पानक[6] शीतल जल जें सुगन्धि पानास ।
देती हर्षें सुखविति तिच्या मना आदरून मानासँ[7] ॥ १२० ॥
यापरि नाना सेवा-कार्यें त्या देवता सदा करिती ।
जेणें चिन्ता-लव ही जननीच्या मानसीं न करि वसति ॥ १२१ ॥

[ मरुदेवी मातेला सोळा स्वप्नें पडतात ]

कोणे एके वेळीं माता अत्यन्त मृदुलशा शयनीं ।
निद्रासुखांत असतां पाहे मङ्गल पदार्थ ती स्वप्नीं ॥ १२२ ॥

( जाति—चन्द्रकान्त )

शरद्घनासम[8] वर्ण जयाचा शुभ जो रव करितो ।
वशिण्ड खांदे पुष्ट जयाचे नृमना जो हरितो ॥ १२३ ॥
पाही ऐशा जिनजननी ती वृषभा[9] स्वप्नांत ।
मोद तिच्या बहु झाला तेणें मावे न मनांत ॥ १२४ ॥

---

१ आज्ञा मानणाऱ्या. २ तरवार. ३ सोन्याची छडी. ४ पांढरें. ५ दागिने. ६ सरबत. ७ तिला मान देऊन. ८ शरदृतूच्या पांढऱ्या ढगाप्रमाणें. ९ बैलास.

स्रवे जयाच्या गण्डयुगांतुनि सुगन्धि मदधारा ।
कर्णयुगाचा पळवी ज्याच्या भृङ्गगणा वारा ॥ १२५ ॥
करी गर्जना चन्द्रशुभ्र जो ऐसा गजराजा ।
पाही राणी नाभिनृपाची सुररमणी-पूज्या ॥ १२६ ॥
चन्द्रशुभ्रशा केशरवृन्दा मानेवरि विपुल ।
धरी केसरी मुखीं जयाच्या दाढा विकराल ॥ १२७ ॥
प्रफुल्ल कमलावरी उभी जी निश्चल चित्र जसें ।
सुवर्ण-कुम्भें स्नान घालिती जलें करी सुरसें ॥ १२८ ॥
जिला अशी श्री जिन-जननीनें स्वप्नीं पाहियली ।
आनन्दाचे तरङ्ग हृदयीं करिति जिच्या केली ॥ १२९ ॥
गुलाब चम्पक कमल मालती पुष्पें रचिलेलें ।
दीर्घहारयुग मंरदं ज्यांतुनि संतत मधुर गळे ॥ १३० ॥
भृङ्गे ज्यावरि सुगन्ध लोभें गुञ्जारव करिती ।
पाही राणी मरुदेवी ती अखण्ड-शीलवती ॥ १३१ ॥
स्थिर-नेत्रांनीं ज्याचें दर्शन होतें सूर्य असा ।
नाशुनि तिमिरा ज्यानें केल्या उज्ज्वल सर्व दिशा ॥ १३२ ॥
जो मेघादिक उपद्रवांनीं रहित असे झाला ।
उदयाद्रीच्या शिखरावरती स्वप्नीं तिज दिसला ॥ १३३ ॥
जो कुमुदांनीं विकसित करितो रजनीचा ईश ।
दिशा करी जो धवल करांनीं शोभे सविशेष ॥ १३४ ॥
असा चन्द्र ती पाही राणी स्वप्नीं मोदून ।
चन्द्रासम मज शान्त कान्ति सुत व्हावा समजून ॥ १३५ ॥
प्रेम जयांचें अन्योन्यावरि निर्मल पाण्यांत ।
विहरे पाहे मत्स्ययुगाला चञ्चल जणु चित्त ॥ १३६ ॥
हारें शोभे कण्ठ जयांचा ऐसें कुम्भयुग ।
पाही माता रत्नें भरले कण्ठीं फलयोग ॥ १३७ ॥

---

१ दोन गालवरून. २ देवाङ्गनाकडून आदरणीय झालेली. ३ सिंह. ४ भयङ्कर. ५ हत्ती. ६ लक्ष्मी. ७ मकरन्द. ८ रात्रीं विकसणाऱ्या कमलांना. ९ चन्द्र. १० सुन्दर.

सोपानांनीं[1] मण्डित निर्मल भरलें जल ज्यांत ।
कमलाच्छादित पाहि सरोवर माता रुचिसहित[2] ॥ १३८ ॥
चञ्चल मासे मगरी यांनीं तरङ्ग उठतात ।
मेघपङ्क्ति वहु ज्यावर फिरती असा नभःप्रान्त ॥ १३९ ॥
जयांत झाला प्रतिविम्बितसा सागर[3] मातेला ।
विशाल दिसला स्वप्नीं धरिं जी अपार शुचितेलों[4] ॥ १४० ॥
जणु हरिणावरि आक्रम करिती ऐशा सिंहांनीं ।
धरिलें निजमस्तकीं सदा जें आसन वघुनि मनीं ॥ १४१ ॥
माता झाली अति आह्लादित जणु पुत्रें सजलें ।
रत्नजडितसे कान्तिजलांनीं जणु ओलें झालें ॥ १४२ ॥
मेरुशृङ्गसम आकृति ज्याची नानामणि-जडित ।
सुमान[5] पाही विमान माता होउनि हर्षयुत ॥ १४३ ॥
पातालांतुनि कल्पतरूद्भव वहुभूमिक[6] आलें ।
गृह नागांचें पाहुनि जननीमन हर्षित झालें ॥ १४४ ॥
अमूल्यरत्नें पञ्चवर्णमय अनेकराशींत ।
प्रभा जयांची पसरे माता पाही अति हृष्ट ॥ १४५ ॥
अन्योन्यांच्या कान्तींनीं नभिं इन्द्रधनुष्यास ।
निर्मिति मणिगण पाही त्यांना माता सविशेष ॥ १४६ ॥
जटेसारख्या पिंगट ज्याच्या ज्वाला गगनांत ।
प्रदक्षिणेनें फिरती धूम न न इन्धनें ज्यांत ॥ १४७ ॥
पाही अग्निस माता ऐशा जाग तिला आली ।
जयमङ्गलरव ऐके कानीं प्रसन्न वहु झाली ॥ १४८ ॥

( प्रातःकालाचें वर्णन )

माते ! हा तव मुखप्रभेनें जित झाला चन्द्र ।
म्हणून गेली कान्ति जयाची ज्यांत दिसे रन्ध्रें[7] ॥ १४९ ॥
इकडे पाही सूर्य उदेला उदयाचलिं आला ।
मङ्गल-कलशासमान दिसतो लाली वहु ज्याला ॥ १५० ॥

---

१ पायन्यांनीं. २ उत्सुकतेनें. ३ समुद्र. ४ पवित्रपणाला. ५ प्रमाणवद्ध रचनेचें. ६ अनेक मजल्यांचें. ७ छिद्र.

देवि ! आपली मुखप्रभाही तिमिरा नष्ट करी ।
जाणुनि जणु ही दीपपङ्क्ति गे निस्तेजास वरी ॥ १५१ ॥
हा पक्ष्यांचा समूह अपुल्या घरट्यामधिं वसुन ।
चिवचिव-शब्दें करूं लागला तव मङ्गलगान ॥ १५२ ॥
हे गृहपादप[1] मन्द वायुनें सङ्कत होऊन ।
घुरूं लागले निद्राशेषें दिसति असें जाण ॥ १५३ ॥
ही चकवी रविबिम्बा पाहुनि हर्षित होऊन ।
निज-प्रियाला बोलावी जणु मधुर रवा करुन ॥ १५४ ॥
तव गति पाहुनि हंस चालती देवि ! कसें बघ गे ।
मधुर शब्दही करिती किति हे अनुकृतिच्या[2] रागें ॥ १५५ ॥
सकाळ झाली सूर्य-कान्ति ही निर्मल बहु झाली ।
करि निद्रेचा त्याग स्वामिनि ! सखी असें वदली ॥ १५६ ॥
ही पुष्पांची शय्या आतां कोमेजुनि गेली ।
सुखकुतली ही देवि ! त्यागी वदण्या तिज आली[3] ॥ १५७ ॥
त्यागुनि शय्या स्नानादिक विधि करून मरुदेवी ।
नाभिनृपाच्या समीप गेली स्वप्ना मनिं भावी ॥ १५८ ॥
भद्रासनिं नृप नाभि बैसला मरुदेवी त्याला ।
लहान आसनिं वसून वंदी जोडुनि करकमला ॥ १५९ ॥
क्रमें क्रमें ती सांगु लागलीं पडलेलीं स्वप्नें ।
नाभिभूमिपति वदला त्यांच्या फलास हृष्टमनें ॥ १६० ॥
त्रैलोक्याचा गुरु तव ठायीं जन्मा येईल ।
असें सुचवितीं स्वप्नें सगळीं प्रिये ! विशालफल ॥ १६१ ॥
यापरि वदतां ती कमलाक्षी[4] हर्षित बहु झाली ।
चन्द्राची द्युति पूर्ण तिच्या जणु वदनीं अवतरली ॥ १६२ ॥
जिनेन्द्र गर्भी येण्यापूर्वी वृष्टि करी धनद ।
षण्मासावधि मणिकनकांची[5] सकलजनां सुखद ॥ १६३ ॥
तदनन्तरही नवमासावधि हिरण्मयी झाली ।
हिरण्यगर्भाभिधा जिनाला बहु सुखदा आली ॥ १६४ ॥

---

१ घरांतलीं झाडें. २ अनुकरणाच्या आवडीनें. ३ मैत्रिणी. ४ कमलाप्रमाणें डोळे असलेली. ५ रत्नांची व सोन्यांची.

झाला गर्भी त्रिज्ञानाचा जिनपति चञ्चल न ।
पीडा तेणें मातुःश्रीला तिळमात्रहि हो न ॥ १६५ ॥
जसें दर्पणीं छायामात्रें अग्निशिखा दिसती ।
विकार त्यामधिं परि तिलमात्रहि कदापि नोद्भवती ॥ १६६ ॥

( आदिजिनाच्या जन्माचें वर्णन )

पूर्ण दिनावधि होतां स्फटिक[1] जणु सदनांतून ।
गर्भापासुनि निर्मल आले उदया प्रथमजिनें[2] ॥ १६७ ॥
नाभिनृपानें सुतजन्मोत्सव विशाल जो केला ।
तेणें सगळ्या जगज्जनांना प्रमोद वहु झाला ॥ १६८ ॥
क्षोभ जाहला तदा त्रिलोकीं इन्द्रासन हालें ।
विस्मित होउनि काय घडे हें समस्त सुर वदले ॥ १६९ ॥
भवन-सुराङ्गणिं न फुंकतां ही शंखध्वनि चाले ।
स्वयं नगारे व्यन्तरपतिगृहिं अतिशय दुमदुमले ॥ १७० ॥
ज्योतिर्लोकीं सिंहगर्जना प्रचण्डशी झाली ।
आकस्मिक ती प्रमोद सिश्रित भयांत परिणमली ॥१७१ ॥
कल्पाधिपगृहिं[3] घण्टामाला विशाल घणघणली ।
शुभ उत्पातें नम्रकिरीटें जिनजनि[4] जाणवली ॥ १७२ ॥
अवधिज्ञानें जन्म जिनाचा निश्चित जाणून ।
इन्द्र पातले पितृसदनाला हर्षित होऊन ॥ १७३ ॥
कन्दर्पामरें[5] नाचु लागले जय जय रव वदले ।
उंच उड्याही मारुनि हृदयीं आनन्दित झाले ॥ १७४ ॥
जगत्त्रयाला व्यापुनि सुर ते सिंहध्वनि करिति ।
नानावेषें हास्य जनामधिं वहुविध दाखविति ॥ १७५ ॥

( इन्द्रादिक अयोध्येला येऊन ते जिनबालकाला मेरुपर्वतावर अभिषेक करण्यासाठीं नेतात )

पुरी अयोध्या रचिली धनदें[6] वैभवसन्नन्न ।
रत्नविनिर्मित-सौधें तिमिरा जी करि विच्छिन्न ॥ १७६ ॥

---

१ स्फटिकमण्याच्या घरांतून. २ वृषभनाथ. ३ स्वर्गांतील इन्द्राच्या घरांत. ४ जिनेश्वराचा जन्म. ५ नृत्य करणारे देव. ६ कुबेरानें.

शैलाकार-प्राकारानें घेरियलें जीस ।
गभीर परिखा[1] वेष्टि जियेला अलङ्घ्य जी अरिस ॥ १७७ ॥
नानारत्नप्रकाशवस्त्रें आच्छादिलि जणु जी ।
अशा पुरीला आले वासव[3] विभवें जी ताजी ॥ १७८ ॥
प्रदक्षिणात्रय इन्द्र सुरासह घालुनि नगरीस ।
आणायाला इन्द्राणीला प्रेपी जिनपतिस ॥ १७९ ॥
प्रसवागारीं[4] जिनबालासह पाहुनि जननीस ।
हर्षित झाली शची नमस्कृति करून उभयास ॥ १८० ॥
जिनमातेच्या पुढती स्थापुनि माया-बालाला ।
घेउनि जिनशिशु करीं आपुल्या इन्द्रकरांत दिला ॥ १८१ ॥
रूप जिनाचें सहस्रनयनें बघुनिहि तृप्ति न ये ।
शचीपतीला विस्मयसागरिं बुडला तदतिशयें ॥ १८२ ॥
चढुनि गजावरि अंकीं[5] स्थापी वासव जिनदेवा ।
छत्र चामरें भावें घेउनि करी स्वयं सेवा ॥ १८३ ॥
सर्वसुरासह सुमेरु-शिखरीं नेउनि जिनबाला ।
पाण्डु-कंबला शिला ज्या स्थलीं लाजवि चन्द्राला ॥ १८४ ॥
तिच्या मृगेन्द्रासनावरी[6] तो स्थापी बहुभावें ।
मृदङ्ग-भेरी-शंखादिक-रव दहा दिशीं धावे ॥ १८५ ॥
तुम्बरु नारद यक्ष नि किन्नर विश्वावसु देव ।
गाउ लागले जिनचरिताला धरून मनिं भाव ॥ १८६ ॥
निजपत्नीसह कांहीं अमरें वीणा घेऊन ।
मनःश्रोत्रहर[7] गान गायिलें तन्मय होऊन ॥ १८७ ॥
मधुर-रवाचीं पदीं घुंगुरें बांधुनि तालांत ।
नाचु लागल्या तदा अप्सरा हसती गालांत ॥ १८८ ॥
संगीतोत्सव असा चालला असतां कलश करीं ।
जिनबालाच्या अभिषेकास्तव हर्षे घेइ हरि[8] ॥ १८९ ॥

---

१ तटानें. २ खन्दक. ३ इन्द्र. ४ प्रसूतीचें घर. ५ मांडीवर. ६ सिंहासनावर. ७ मनाला व कानांना आवडणारें. ८ इन्द्र.

( इन्द्रानें जिनबालाला अभिषेकून वस्त्राभरणांनीं भूषित केलें )

स्वविक्रियेच्या सामर्थ्यानें बनवी बहु रूपें ।
क्षीरार्णवजलकुम्भ वाटती सुरां महाकूपें ॥ १९० ॥
मुखीं जयांच्या कमलें सुन्दर मणिमय कुम्भ असे ।
सहस्र अपुल्या भुजा-सहस्रें[1] उचलुनि हरि विलसे ॥ १९१ ॥
वरुण सोम यम धनद असे सुर करिती अभिषेक ।
धरुनि भक्ति मनिं पुण्य उपार्जिति लाभे विपुलसुख ॥ १९२ ॥
शचिप्रमुख[2] ज्या देवी श्रीमज्जिनविभुगात्रांस[3] ।
सुगन्धिलेपन लाविति हस्तें होउनि भक्तिवश ॥ १९३ ॥
कुम्भें मेघें शैलासम त्या अभिषेकिति बाला ।
नन्तर पुसती कोमल वस्त्रें अंगास नि गाला ॥ १९४ ॥
वज्रसूचिनें[4] विभिन्न घाली जिनबालक-कानीं ।
चन्द्रसूर्यसम रत्नकुण्डलें हरि हर्षून मनीं ॥ १९५ ॥
जिनेशशीर्षीं पद्मरागमणि-चूडामणि शोभे ।
जणु तत्किरणें जटालें[5] भासे अपूर्वशा आभें ॥ १९६ ॥
प्रभुभालावरि अर्धचन्द्रसम तिलक तयें केला ।
केयूराचा जोड भुजद्वयिं हरिनें बांधियला ॥ १९७ ॥
नक्षत्रासम मोठीं मोत्यें ज्यामधिं रचिलेलीं ।
हार प्रभूच्या हरि भक्तीनें घाली मुग्धगळीं[6] ॥ १९८ ॥
सुलक्षणी करयुगांत सुन्दर सुवर्णमणि-कटक[7] ।
जिनबालाच्या पाहु लागले हर्षें सुरलोक ॥ १९९ ॥
सुन्दर वस्त्रें शोभे प्रभुकटि[8] त्यावरि कडदोरा ।
शैलतटांवरि सन्ध्यारेखा खुलतें हृदयहरा ॥ २०० ॥
सर्वकराङ्गुलि शोभु लागल्या मणिमय-मुद्रांनीं ।
त्रैलोक्याचें भूषण भूषित केलें इन्द्रांनीं ॥ २०१ ॥
चन्दन चर्चुनि जिनदेहावरि गोरोचन ठिपके ।
स्फटिकावरि जणु हेमजलाचे बुद्बुदवृन्द सुके ॥ २०२ ॥

---

१ हजार बाहूंनीं. २ इन्द्राणी ज्यांच्यांत मुख्य आहे अशा देवाङ्गना. ३ शरीराला. ४ हिऱ्याच्या सुईनें. ५ प्रभुमस्तक जटांनीं युक्त असल्यासारखें शोभत होतें. ६ सुन्दर गळ्यांत. ७ सोन्याचें रत्नजडित कडे. ८ कंबर.

पारिजातसन्तानक यांच्या पुष्पें रचिलेला ।
मुकुट शोभतो जिनबालक शिरिं अपूर्व धरि लीला ॥ २०३ ॥
पांघरलेलें वरचें शोभे सुवस्त्र जरतारी ।
अतिशय निर्मल[1] तारायुत हें जणु नभ अविकारी ॥ २०४ ॥
भुवयामध्यें सद्गन्धाचा तिलक खुलून दिसे ।
जगत्रयीं प्रभुतिलकपणाला जणु तो दावितसे ॥ २०५ ॥
त्रिलोकभूषण जिनबालाला यापरि भूषवुन ।
इन्द्रपुरःसर सुर ते स्तविती हर्षित होऊन ॥ २०६ ॥

( इन्द्र जिनबालाच्या गुणांची स्तुति करतो )

अज्ञानावृत धर्मरहित या जगीं जिना ! तूंच ।
भव्यप्राण्यां भविं फिरणाऱ्या दीप गमे साच ॥ २०७ ॥
निर्मल वाङ्मयगण[2] जिनचन्द्रा ! किरण तुझे असती ।
भव्यप्राणी कुमुदवृन्द[3] हे विकसित बहु दिसती ॥ २०८ ॥
जगद्गृहीं या तत्त्व बघाया केवल-अनलाचा[4] ।
स्वयंप्रकाशी प्रदीप असशी भव्यगणां साचा ॥ २०९ ॥
पापशत्रुगण वधावयाला अससी तरवार ।
भववनदाही[5] ध्यान तुझें हें अनल असे घोर ॥ २१० ॥
दुष्टेन्द्रियगण महासर्प हे प्रशान्त करण्यास ।
गरुड जिना तूं महाप्रभञ्जन[6] संशयमेघास ॥ २११ ॥
तृषित जाहल्या भव्यचातका सुधर्मजल-थेंब ।
देण्यासाठीं जिनेश दिसशी पयोद[7] तूं लांब ॥ २१२ ॥
त्रैलोक्यामधिं निर्मल यश तव सन्तत सुर गाती ।
गुणपुष्पा तूं जिना ! कल्पतरु तुज शतनमनतति[8] ॥ २१३ ॥
कर्म-लांकडा परशु[9] जिना तूं सुतीक्ष्णधारेचा ।
मोहगिरींचा भंग कराया वज्रचि तूं साचा ॥ २१४ ॥

---

१ धुळीनें व ढगांनीं रहित. २ काव्य, न्याय, धर्म व्याकरण वगैरे साहित्य. ३ रात्रिविकासी कमलांचा समूह. ४ केवलज्ञानरूपी अग्नीचा. ५ संसार-वनाला जाळणारा. ६ मोठा वारा. ७ मेघ. ८ शेकडों नमस्कारांचे समूह. ९ कुऱ्हाड.

दुःखाग्नीला शमवायास्तव सलिलीं[1] नमन तुला ।
सङ्गधूलि नच गगन असे तूं नमन तुला अमला ॥ २१५ ॥
( इन्द्र बालकाला मातेच्या मांडीवर बसवून स्वर्गास जातो )
स्तवुनि नि वन्दन करून पुनरपि जिनवरबालांस ।
वसवुनि करिवरि इन्द्र सुरासह येइ अयोध्येस ॥ २१६ ॥
जननी-अंकावरि शचि ठेवी मोदें जिनबाला ।
प्रमोदनर्तन[2] करून सुरपति जाई स्वर्गाला ॥ २१७ ॥
दिव्यभूषणें वस्त्रें भूषित सुगन्धि लेपानें ।
लिप्तबालका बघून मोदें रूपामृतपानें ॥ २१८ ॥
जननी वक्षःस्थलास लाउनि सौख्यसमुद्रास ।
प्राप्त जाहली वर्णन त्याचें शक्यहि नेन्द्रास ॥ २१९ ॥
मांडीवरल्या जिनबालानें मरुदेवी जननी ।
शोभे विम्वें रविच्या पूर्वा दिशा जशी गगनीं ॥ २२० ॥
दिव्यभूषणें भूषित पाहुनि सुतास नाभिनृप ।
स्वतःस समजे लोकविभवयुत[3] परमद्युतिकूप[4] ॥ २२१ ॥
पुत्रगात्रसुख होतां नेत्र-त्रिभाग मिटवून ।
हर्षित झाला नाभिभूमिपति तयास उपमा न ॥ २२२ ॥
सुरेन्द्रयजनें[5] प्राप्त जाहलें जिना प्रधानपद ।
नाम ठेविलें मातापितरें 'वृषभ' महासुखद ॥ २२३ ॥
पतिपत्नीचें प्रेम वाढलें पूर्वीपासून ।
जिनबालामधिं विभागून ही तें नच हो ऊनें[6] ॥ २२४ ॥
जिनबालाच्या हस्ताङ्गुष्ठीं अमृत स्थापियलें ।
सौधर्मेन्द्रें शरीर तेणें सुपुष्टियुत झालें ॥ २२५ ॥
कुमार होउनि इन्द्राज्ञेनें क्रीडा सुर करिती ।
जिनबालासह जननी-जनका ते बहु सुख देती ॥ २२६ ॥
आसन-शयन नि भोजन-वसनें यानादिक[7] सगळे ।
इन्द्रापासुनि हे भोगादिक जिनबालास मिळे ॥ २२७ ॥

---

१ पाणी. २ आनन्दनृत्य. ३ जगाचें ऐश्वर्य मला मिळालें असें नाभिराज समजत असत. ४ उत्तम कान्तीचा आड. ५ इन्द्राच्या पूजनानें. ६ कमी. ७ रथादिक.

प्रभूच्या शरीरसौंदर्याचें वर्णन

अल्पहि कालें वृषभजिनेश्वर-शरीर दृढ झालें ।
मेरुतटासम उन्नत विस्तृत वक्षःस्थल[1] बनलें ॥ २२८ ॥
बाहु तयाचें दिग्गजबंधस्तम्भाकृति[2] होते ।
समस्त जगतां इच्छित-दानीं कल्पद्रुम-सम ते ॥ २२९ ॥
मांड्या दोन्ही कान्ति जयांची चोहिकडे पसरे ।
त्रिलोकगेहाधारस्तम्भद्वय दिसतात खरे ॥ २३० ॥
वदन जिनाचें विरुद्ध उभयस्वभावयुत होतें ।
कान्ति-दीप्तिनें चन्द्रा सूर्या जिंकित होतें तें ॥ २३१ ॥
प्रभुकर दोन्ही लाल कान्तिचे कमलाहुनि मृदुल ।
परि भूपांची धूळ कराया समर्थ नि स्थूल ॥ २३२ ॥
काळे कुरळे स्निग्ध दाटसे मस्तकिं जे केश ।
सुमेरुगिरिवरि नील-शिलेसम हो ज्यांचा भास ॥ २३३ ॥
धार्मिक असुनिहि वृषभजिनानें लोचन सर्वांचें ।
निजरूपानें हरिले होते हें न गमे साचें ॥ २३४ ॥
कल्पतरूंचा विनाश झाला होता त्या कालीं ।
नांगरतां नच पिकल्या धान्यें शोभित भू झाली ॥ २३५ ॥
शिल्प न होतें देणें घेणें क्रयविक्रय नव्हते ।
धर्माभावीं पाखंडीजन कोठें हिं न होते ॥ २३६ ॥

( भूकेनें पीडित होऊन प्रजा नाभिराजाकडे येते )

इक्षुरसाचा स्वयं गळे जो षड्रस आहार ।
कान्तिबलप्रद तुष्टि पुष्टि दे सन्तत मधुरतर ॥ २३७ ॥
परि तो कालें स्वयं गळेना यंत्रें पिळण्याचा ।
उपदेशहि नच न जाणता ही दिसे तदा साचा ॥ २३८ ॥
धान्यें होतीं दिसत जना परि तद्विषयाज्ञान[3] ।
होतें तेणें होय भुकेनें जनता हैराण ॥ २३९ ॥
नाभिनृपाला समूहरूपें गेले जन शरण ।
नमुनि तयाला केलें नन्तर निजपीडाकथन[4] ॥ २४० ॥

---

१ छाती. २ दिग्गजांना बांधण्याच्या खांबाच्या आकृतीचे. ३ हीं धान्यें खाण्यायोग्य आहेत किंवा नाहींत या विषयीं अज्ञान. ४ स्वतःच्या दुःखाचें वर्णन.

नाथा ! झाला कल्पतरूचा विनाश चोहिकडे ।
संकट आतां वारि भुकेचें दे तूं मन इकडे ॥ २४१ ॥
भूमीपासूनि वाढुनि झाले हे फलसम्पन्न ।
संस्कारांनीं भक्ष्य होतसे आम्हां समजे न ॥ २४२ ॥
या गायींच्या स्तनांतून जे गळतांना दिसतें ।
भक्ष्य असे कां अभक्ष्य नाथा ! सांगा आम्हातें ॥ २४३ ॥
व्याघ्र सिंह या प्राण्या आम्ही पूर्वी प्रेमानें ।
भेटत होतों परन्तु आतां बघतीं क्रोधानें ॥ २४४ ॥
येती धावत अङ्गावरती गुरगुर करितात ।
ओरवडाया आतां आम्हां त्वेषें बघतात ॥ २४५ ॥
दिसतीं येथें स्थळें मनोहर पुष्पें फुललेलीं ।
यांनीं आम्हां सुख होइल कां दुःख असें भालीं[1] ॥ २४६ ॥
संस्कारांचे उपाय यावरि सांगा आम्हास ।
भवत्प्रसादें[2] रक्षित आम्ही भोगू सौख्यास ॥ २४७ ॥
यापरि वदली प्रजा जेधवा करुणाघन[3] नाभि ।
धीरपणानें वदला जन हो ! मनीं न आणा भी[4] ॥ २४८ ॥
जन्मासमयीं ज्याच्या झाली सुवृष्टि रत्नांची ।
दीर्घकाल ज्यामुळें धरा[5] ही हिरण्मयी[6] साची ॥ २४९ ॥
आले ज्याच्यामुळें धरेवर इन्द्रादिक देव ।
लोकक्षोभा कारण झाला ज्याचा नृगतिभव[7] ॥ २५० ॥
अतिशययुक्ता त्या ऋषभाच्या समीप जाऊन ।
जीवनदायक तया विचारू सज्जन हो प्रश्न ॥ २५१ ॥
नसे जगामधिं तयासारखा मानव विज्ञांनीं[8] ।
सर्व तमांच्या[9] अन्तीं आत्मा तोचि गणा स्वमनीं ॥ २५२ ॥

( प्रजा वृषभनाथाची स्तुति करत्ये व आपलें येण्याचें कारण सांगत्ये )

यापरि बोलुनि नाभिभूमिपति त्यांना घेवोनि ।
ऋषभासंनिध गेले बसले यथोचित-स्थानीं[10] ॥ २५३ ॥

१ नशीबांत. २ आपल्या कृपेनें. ३ दयेचा मेघ. ४ भीति. ५ पृथ्वी. ६ सुवर्णरत्नमय. ७ मनुष्यजन्म. ८ ज्ञाहणा. ९ अज्ञानांच्या. १० स्वतःला योग्य अशा सिंहासनावर.

प्रभूस पाहुनि आनन्दानें रोमाञ्चित होती ।
प्रणाम करुनि प्रजा यथास्थानिं बसुनि स्तुति करिती ॥ २५४ ॥
तेज तुझें जिन ! लोकां लंघी सुलक्षणी देह ।
गुण तव निर्मल सर्वा व्यापिति हरिती जनमोह ॥ २५५ ॥
आम्ही आलों तव जनकासह नाथा ! तुजपाशी ।
असती ज्ञानासह तव ठायीं असङ्ख्य गुणराशि ॥ २५६ ॥
अपूर्व आहे महासत्त्वगुण अतिशययुक्त असा ।
सर्व-संशया विनाशितो तो परि तो नैव तसा ॥ २५७ ॥
आम्हीं झालों क्षुधादि-पीडित उपाय आम्हास ।
सांग जिनेशा आलों आम्ही तुझ्या पदीं आस ॥ २५८ ॥
उपाय आम्हां सांगुनि सिंहादिकभय दूर करी ।
विनन्ति अमुची ध्यानीं घेउनि संकट शीघ्र हरी ॥ २५९ ॥

( उपजीविकेचे उपाय सांगून वृषभनाथांनीं त्रिवर्णाची स्थापना केली )

नन्तर हृदयीं कृपा उपजुनी वदला नाभिसुतें ।
शिल्पांचे शत भेद तयांना करुनि स्थिरचित्त ॥ २६० ॥
पुर-रचनेचे प्रकार सगळे ग्रामादिक-रचना ।
गृहरचनाही वदे जिनेश्वर संशयरहितमना ॥ २६१ ॥
क्षत अपराधा वदती रक्षण शासन त्या करणें ।
दुष्टा दण्डुनि शिष्टानुग्रहकार्या आचरणें ॥ २६२ ॥
करिती ऐसें कार्य सदा जे त्या क्षत्रिय बोला ।
अशा गुणानें क्षत्रिय लोकीं प्रसिद्धसा झाला ॥ २६३ ॥
क्रय-विक्रय-कृषि-पशुसंरक्षण आदिक कार्यांत ।
तत्पर झाले वैश्य तयांना बोला आर्यांत ॥ २६४ ॥
नीच कर्म जे ऐकुनि त्यामधि झाले स्थिर लोक ।
शूद्र तयांना वदती दासादिक त्या अवलोक ॥ २६५ ॥

---

१ प्रभावशाली. २ महासत्व गुण सर्व संशयाचा नाश करितो. परन्तु तो महासत्त्वगुण ' तसा नैव ' नाशवंत नाहीं. ३ नाभिराजाचा पुत्र वृषभ. ५ क्षत—अपराध—त्र रक्षण करणें अर्थात् अपराध्याला शासन करून निरपराध्याचें रक्षण करणें असा क्षत्रशब्दाचा अर्थ आहे.

यापरि केलें युग-वृषभेशें कृतयुग त्या वदती ।
प्रजा जाहली आनन्दित बहु लाभे सुखशान्ति ॥ २६६ ॥

( वृषभनाथांचा नन्दा व सुनन्दा या राजकन्या बरोबर विवाह होऊन शंभर पुत्र झाले )

पहिली नन्दा दुजी सुनन्दा पत्नीद्वय ऋषभा ।
भरतादिक शत पुत्र जाहले अपूर्व ये शोभा ॥ २६७ ॥

( वृषभनाथांना वैराग्य होऊन ते दीक्षा घेतात )

अनुपम वैभव भोगित असतां काल लया गेला ।
बहुत जिनाचा वैराग्याचा अंकुर उद्भवला ॥ २६८ ॥
आली नीलाञ्जना सभेमधिं सुन्दर सुरबाला ।
नाचत असतां समाप्त झाली तज्जीवनलीला[1] ॥ २६९ ॥
वैराग्याचें कारण ऐसें वृषभ जिना आलें ।
पारतन्त्र्य हें दुःखां कारण वदती सुज्ञ भले ॥ २७० ॥
संसारा या धिक्कृति[2] राहो दुःखा सुख वदती ।
त्याज्य सौख्य हें कृत्रिम आहे तयांत रति करिती ॥ २७१ ॥
मूढ सदोदित तयांत होउनि चारी गति फिरती ।
खरें सौख्य जें दूर राहतें सुजन तया वरती ॥ २७२ ॥
सिद्धि सुखाची प्राप्ति व्हावया सुचरितें[3] धारावें ।
वैराग्याच्या यापरि चिन्तनिं जिनेश मन धावें ॥ २७३ ॥
येऊनि तेव्हां लौकान्तिक सुर जिनदेवा वदले ।
नाथा ! आपण आत्महिताचें कारण ओळखलें ॥ २७४ ॥
मोक्षमार्ग या भारतवर्षी होउनि विच्छिन्न[4] ।
फारचि मोठा काल लोटला करवे नच गणन ॥ २७५ ॥
भवदुःखांच्या अपारसागरिं उपदेशक न मिळे ।
मति जीवांची हो विपरीत ध्येयांतून गळे ॥ २७६ ॥
आतां नाथा ! उपदेशें तव अक्षयसौख्याचा[5] ।
पथ जीवांना मिळून होइल संग शिवश्रीचा ॥ २७७ ॥

---

१ तिच्या आयुष्याचा खेळ. २ धिक्कार. ३ उत्तम महाव्रतादिकांचे आचरण. ४ नष्ट. ५ अखण्ड मोक्ष-सुखाची.

यापरि झाले स्वयंबुद्ध[1] जिन विरक्त वृषभेश ।
द्विरुक्त झाला सुरवचनांचा जणु सुन्दर कोष ॥ २७८ ॥
निष्क्रमणाचा[2] विचार होतां इन्द्रादिक देव ।
आले जेसे पूर्वी धारुनि सुभक्तियुत भाव ॥ २७९ ॥
करून वन्दन वदले नाथा ! चिन्तन मनिं केलें ।
आपण जें तें होइल हितकर जीवगणा अपुलें ॥ २८० ॥
जिच्या मण्यांचा प्रकाश पडला दशदिशिं गगनांत ।
चन्द्रकरासम शुभ्रचामरें शोभे अपरिमित ॥ २८१ ॥
जिच्या छतामधिं अर्धचन्द्रयुत तारे दिसतात ।
सुममालांचा सुगन्ध पसरे मोद मना देत ॥ २८२ ॥
विमान जणु जी वाटे ऐशी सुदर्शना शिविका ।
इन्द्रें सौधीं असे आणिली विस्मित करि लोकां ॥ २८३ ॥
दीक्षोद्यत जिन जेव्हां वसले वृषभेश्वर तींत ।
दिला सुरेन्द्रें खान्दा तिजला नेती विपिनांत[3] ॥ २८४ ॥
सुरवाद्यांच्या देवगणांच्या शब्दें दुमदुमला ।
प्रदेश सारा आकाशाचा रवमय[4] जणु झाला ॥ २८५ ॥
महावैभवें बहुभक्तीनें तिलकोद्यानांत ।
सुरेश्वरांनीं जिनास नेलें होउनि मनिं मुदित ॥ २८६ ॥
प्रजाजनांना त्यागुनि गेले जेथें वृषभजिन ।
त्या स्थानाला ‘ प्रयाग ’ वदती आगमिं जे निपुण ॥ २८७ ॥
किंवा अतिशय मोठा केला वृषभजिनें त्याग ।
‘ प्रयाग ’ त्याला वदती गणधर विनष्टभवभोग[5] ॥ २८८ ॥
जननी जनक नि वन्धुजनांची सम्मति घेऊन ।
‘ सिद्धेभ्यो नम ’ ऐसें बोलुनि जिन झाले श्रमण[6] ॥ २८९ ॥
वस्त्रभूषणें त्यागुनि सगळीं मस्तकिं कचलोचँ[7] ।
पांच मुठींनीं केला हृदयीं धरुनि दया साच ॥ २९० ॥

---

१ परोपदेशावांचून स्वतः संसाराचें स्वरूप जाणून त्यापासून विरक्त जो होतो तो स्वयम्बुद्ध होय. २ सर्व परिग्रहांचा त्याग करून घरांतून बाहेर पडणें अर्थात् जिनदीक्षा घेणें. ३ वनांत. ४ शब्दमय. ५ ज्यांचा संसार व इन्द्रियविषय नष्ट झाले आहेत असे. ६ मुनि. ७ दाढी, मिशा व मस्तकाचे केश हातानें उपटणें यास कच--केश लोच म्हणतात.

यापरि धारण करून अट्ठावीस[1] अशा सुगुणा ।
ऋषभ जिनेश्वर झाले तेव्हां श्रमणगणीं राणा ॥ २९१ ॥
मणिमयवस्त्रीं केश जिनाचें सुरपति घेऊन ।
क्षीरसागरीं पूजुनि नन्तर देई सोडून ॥ २९२ ॥
जिनदीक्षेचा उत्सव करुनि स्वर्गी सुर गेले ।
मानव सगळे दुःखी होउनि परत गृहीं आले ॥ २९३ ॥
स्वामिभक्तिवश नृपाल झाले चार सहस्र जरी ।
नग्न साधु जरि तदभिप्राया न जाणतां चि उरीं ॥ २९४ ॥
षण्मासावधि कायोत्सर्गी[2] निश्चल जिन राही ।
निजात्मरूपीं शरीर-निस्पृह वृषभेश्वर पाही ॥ २९५ ॥
भुरभुर होत्या उडत मस्तकीं जटा जिनेशाच्या ।
सद्ध्यानानलें[3]-धूमपङ्क्ति या गमती जणु साच्या ॥ २९६ ॥

( प्रभुबरोबर दीक्षा घेऊन भ्रष्ट झालेल्या चार हजार साधूंच्या स्वैराचाराचा देवतांनीं निषेध केला. )

षण्मासांतचि नग्न साधुगण परीषहें[4] भ्रष्ट ।
झाला संयम सोडुनि विहरे मानुनि त्या कष्ट ॥ २९७ ॥
अशक्त होउनि कांहीं पडले दुःखें भूमिवर ।
सशक्त कांहीं बसले झाले खिन्न मनीं फार ॥ २९८ ॥
असह्य उष्णें शीतल डोहीं स्नाना आचरती ।
कायोत्सर्गा सोडुनि कांहीं फलभक्षण करिती ॥ २९९ ॥
उद्धतनागासमान कांहीं गिरिगह्वरिं[5] शिरती ।
परतुनि येउनि कांहीं जिनवर वृषभमुखा वघती ॥ ३०० ॥

---

१ पांच महाव्रतें, ५ समिति, ५ इन्द्रियें ताब्यांत ठेवणें, १ लोच, ६ आवश्यकें, १ वस्त्रत्याग, १ अस्नान, १ जमिनीवर झोपणें, १ दांत न घासणें, १ उभे राहून आहार घेणें व तो १ दिवसाच एकदां घेणें हे साधूंचे अट्ठावीस मूलगुण आहेत. २ शरीरमोह त्यागून उभे किंवा बसून स्वात्म-चिन्तन करणें. ३ उत्तम आत्मध्यानरूपी अग्नीच्या जणु धुराचा समूह आहे. ४ भूक, तहान, शीत, उष्ण, डांस वगैरेचा त्रास. ५ पर्वताचें मोठें छिद्र.

अति अभिमानी मरीचि भगवीं वस्त्रें नेसून ।
परिव्राजक-कुमता स्थापी शिष्या जमवून ॥ ३०१ ॥
फलमूलादिक नग्नावस्थेमध्यें राहून ।
भक्षण असतां करीत वदले देव तया वचन ॥ ३०२ ॥
नग्नरूप हें करून धारण ऐसें वागु नका ।
तुम्हां होइल दुःख भयंकर यांत नसे शङ्का ॥ ३०३ ॥
कांहीं झाकूं देह लागले वल्कल नेसून ।
पर्णसमूहें कांहीं कांहीं चर्मा वेष्टून ॥ ३०४ ॥
नग्नपणाची लज्जा वाटुनि दर्भाचें वस्त्र ।
स्वच्छन्दें वनिं विहरति नेसुनि वनती अघपात्र ॥ ३०५ ॥
फळें तरूंची खाउनि सेवुनि थण्ड असें पाणी ।
स्वेच्छाचारें विहार करिती न रोकिती कोणी ॥ ३०६ ॥
समूह वनवुनि मिथ्याचारें नानाविध वेष ।
धारण करिती कुकल्पनांचे वनती ते कोष ॥ ३०७ ॥
तुम्हां भरतें समीप राहा ऐसें सांगितलें ।
ऐकुनि आम्हां न तयें कथिलें अन्या ते वदले ॥ ३०८ ॥
ऐसें बोलुनि उडवुनि देई कोणी भोगाशा ।
धारण करितो त्याच्या मार्गें मानी अघनाशा ॥ ३०९ ॥
कोणी वदती जाऊ आपण अपुल्या देशास ।
येथें राहुनि लाभ कोणता मुकू सुखाशेस ॥ ३१० ॥
जाउनि गेहीं पुत्र नि भार्या यांचें मुख पाहू ।
सौख्य दर्शनें त्यांच्या होइल मजेंत वहु राहू ॥ ३११ ॥
दुसरा वदला विह्वल आपण जाऊ गेहास ।
मिळेल सुख नच तिथें आपणां होइल वहु हास ॥ ३१२ ॥
प्रभूस सोडुनि जातां भरतहि होइल अतिकुपित ।
मारिल रोपें देशधनादिक हरील तो त्वरित ॥ ३१३ ॥
वृषभनाथ हा जेव्हां जाइल अपुल्या राज्यांत ।
तेव्हां त्यासह जाणें वाटे निजसदना उचित ॥ ३१४ ॥

---

१ मरीचि हा भरताचा मुलगा अर्थात् वृषभनाथांचा नातू. २ पानांच्या समूहांनीं. ३ पापाचें भाण्डें. ४ पापाचा नाश.

यास्तव आतां फलादिकांना भक्षुनि येथेंच ।
राहु सुखानें भ्रमून सेवा करूं तयाचीचें[1] ॥ ३१५ ॥

( नमि विनमि या राजपुत्रांना धरणेन्द्र विद्याधरांचे स्वामी करितो )

प्रतिमायोगीं तत्पर असतां नाथ तिथें आले ।
नमि विनमी हे नृपसुत दोघे नमून त्या वदले ॥ ३१६ ॥
धनराज्यादिक भोग नाथ ! हे द्यावे आम्हास ।
असे आमुच्या तीव्र मनामधिं ती पुरवा आस ॥ ३१७ ॥
अशी याचना करीत असतां आसन कंपून ।
धरण नागपति[2] तेथें आला अति-त्वरा करुन ॥ ३१८ ॥
मनुष्य होउनि उत्तम विद्याद्वय त्या उभयास ।
दिल्या तयातें गेले रजताचलीं[3] अनायास ॥ ३१९ ॥
दहा योजनें चढून गेल्यावरती त्या स्थानीं ।
दक्षिण उत्तर दोन श्रेणी असती सुखखाणी ॥ ३२० ॥

( विद्याधरदेशाचें वैभव )

नाना असती देश नि नगरें सर्वा सुखदानीं ।
भोगभूमिसम किंवा असती स्वर्गासम जाणी ॥ ३२१ ॥
पुनरपि जाउनि दहा योजनें उंच तिथें असतीं ।
गन्धर्वादिव्यंतरनगरें असे जया न मिति[4] ॥ ३२२ ॥
पुनरपि तेथुनि पांच योजनें गेल्यावरि तुङ्ग ।
अर्हन्मन्दिर विशाल भासे हरि पातकसंग ॥ ३२३ ॥
तेथें येउनि चारणमुनिवर करिती स्वाध्याय ।
ज्याच्या श्रवणें मिळे पातकां सदा अनध्याय[5] ॥ ३२४ ॥
विजयार्धाच्या दक्षिण-भागीं नगरी पन्नास ।
रथनूपूर-सन्ध्याभ्रादिक ज्या हरिति विपत्त्रासें[6] ॥ ३२५ ॥
उत्तरभागीं नभोवल्लभादिक नगरें साठ ।
सोडित नाहीं लक्ष्मी ज्यांची रात्रन्दिन पाठ ॥ ३२६ ॥

---

१ वृषभनाथाचीच. २ धरणेन्द्र. ३ विजयार्धपर्वतावर, हा चांदीचा असल्यामुळे त्याला रजताचल म्हणतात. ४ असङ्ख्य. ५ सुटी मिळणें म्हणजे पाप घडत नाहीं. ६ संकटांचें दुःख.

देश ग्राम[1] नि मटम्ब[2] कर्वट[3] खेट[4]सह शोभे ।
एक एक पुर[5] दानी जेथिल पीडित नच लोभें ॥ ३२७ ॥
उदार-गोपुर-सुवर्णसाल नि वापी उद्यान ।
यांची शोभा भासे जेथें स्वर्गाहुनि नोन[6] ॥ ३२८ ॥
न नांगरूनहि धान्यें जेथें होतीं उत्पन्न ।
सर्व पुष्पफलयुक्त तरूंनीं सदैव सम्पन्न ॥ ३२९ ॥
भोगभूमिसम जमीन जेथिल इच्छित करि पूर्ण ।
घट भरलेले दूधतुपाचे प्रतिगृहिं आकर्ण ॥ ३३० ॥
तळीं जलांनीं तुडुम्ब भरलीं कमळें खुललेलीं ।
हंस नि सारस पक्षी जेथें विहरत असलेलीं ॥ ३३१ ॥
रत्नविनिर्मित सोपानांनीं सुंदर ज्या दिसती ।
स्वच्छ मिष्ट जल पिउनि जयांचें सुतृप्त जन होती ॥ ३३२ ॥
अशा वापिका[7] प्रतिगृहिं असती जेथें हंसतति[8] ।
गमन नि मधुरव पाहुनि ऐकुनि जन हर्षित होती ॥ ३३३ ॥
सोन्याचे खुर शिंगें ज्यांचीं चन्द्रासम कान्ति ।
गोशालांमधिं कामधेनुसम[9] गाई बहु असती ॥ ३३४ ॥
सवत्स[10] त्यांना बघुनि जनांच्या हृदयीं बहु दाट ।
प्रमोद होतो वर्णन त्यांचें करिति न कवि ओठ ॥ ३३५ ॥
शेण नि मूत्रहि सुगन्धि ज्यांचें जणु कचड्या धूप ।
कान्तिदं[11] वीर्यदं[12] दुग्ध केवि वदु जें हरि सन्ताप ॥ ३३६ ॥
नीलकमलसम कान्ति जयांची सवत्स ज्या असती ।
अशा म्हशींचे समूह येथें बहु चरती दिसती ॥ ३३७ ॥
धान्यांच्या बहु कणगी येथें शैलासम असती ।
अक्षय तेणें जना कधींही दुर्भिक्ष न भीति ॥ ३३८ ॥

---

१ ज्यांच्या सभोवती काटेरी कुंपण आहे व ज्यांत समृद्ध शेतकरी राहतात त्यास ग्राम म्हणतात. २ पांचशे गांवें ज्याच्या अधिकाराखालीं आहेत तें मटंब. ३ कर्वट—ज्याच्या सभोंवती पर्वत आहेत असा गांव. ४ पर्वत व नदीनें वेष्टित तें गांव खेट. ५ पुर—ज्याच्या सभोवती चार वेशींनीं शोभणारा तट आहे तें शहर. ६ न ऊन-कमी नाहीं. ७ विहिरी. ८ हंससमूह. ९ इच्छित वस्तु देणाऱ्या गाईप्रमाणें. १० वासरा सहित. ११-१२ कान्ति व शक्ति देणारें.

राजसौध बहु विशाल असती सुन्दर उद्यानें ।
परिवृत्त[1] सन्तत नृपाल विहरति जेथें स्वेच्छेनें ।। ३३९ ।।
धूळ नि कण्टक जेथें नसती ऐसे रथमार्ग ।
महातरूंची सदा सावली वितरी सुखयोग ।। ३४० ।।
द्राक्षादिक-रस पिऊन हरिती पथिकें[2] श्रम सारे ।
अनेक असती जलप्रपाही[3] तर्पिति मधुनीरें[4] ।। ३४१ ।।
कर्णमधुर रव असे जयाचा ऐसा पाऊस ।
करि अमृताची वृष्टि नि पिकवी मळ्यांत बहु ऊस ।। ३४२ ।।
ऋतु हेमन्त न दुःखद होतो हिमकण नच वाही ।
सौख्यामध्यें पोहे जनता बारा महिने ही ।। ३४३ ।।
उन्हाळ्यांतही सूर्य न बाधे कोमल किरणांनीं ।
जनां नि कमला सदैव खुलवी मित्र जसा सुगुणी ।। ३४४ ।।
ऋतु जे अन्य हि अभिलपितांना[5] देउनि सर्व जना ।
सुखकर होती कैसा होइल दुःखद ऋतुराणा[6] ।। ३४५ ।।
प्रदेश एकहि या शैलीं नच दुःखां जो देई ।
भोगभूमि जणु आर्यगणांना सुखकारक होई ।। ३४६ ।।

( विद्याधरजन वर्णन )

नारी येथिल अतिसुकुमारी सद्गुणगण-खाणी ।
भूषणभूषित कीर्ति-श्रीसम[7] वाणी वा जैनी[8] ।। ३४७ ।।
कमलगर्भसम कांति कुणाची चंपकसम कोणी ।
शिरीषसुमसम सुन्दर कोणी कोणी मृगनयनी ।। ३४८ ।।
नन्दनवातें जणू निर्मिल्या सुगन्ध निश्वासें ।
वसन्तनिर्मित जणु दिसती त्या सुन्दर सुमभूपें[9] ।। ३४९ ।।
त्रिवर्ण नेत्रें सुन्दर दिसती गति पदिं हंसींची ।
पुष्टकुचा[10] नित देहीं धरिती सुराङ्गना सुरुचि[11] ।। ३५० ।।

---

१ बगीचांनीं वेढलेले राजवाडे. २ वाटसरु. ३ पाणपोया. ४ गोड पाण्यानें. ५ इच्छित फल पुष्पादिकांना. ६ वसन्त ऋतु. ७ कीर्ति व श्री या देवताप्रमाणें. ८ जिनेश्वराच्या मुखांतून निघालेल्या वाणी-शारदेप्रमाणें. ९ सुन्दर पुष्पालंकारांनीं. १० पुष्टस्तनयुक्त. ११ देवांगनांची कान्ति-सौन्दर्य.

पुरुषहि तेथिल चन्द्रमुखाचे शूर विशालभुज ।
विशाल वक्षःस्थलें शोभती जणु जे मृगराज[1] ॥ ३५१ ॥
नभोविहारी[2] शक्तिमन्त बहु सुलक्षणी सुगुणी ।
सदाचाररत सगळे न्यायी अधनी नच कोणी ॥ ३५२ ॥
कान्ति जयांच्या सदा शरीरीं अमरासम नान्दे ।
कीर्ति जयांची शुभकार्यांनीं लोकत्रयिं कोंदे ॥ ३५३ ॥
दोन्ही श्रेणी सुरम्य असती विद्याधर सारे ।
विद्याजायालिङ्गित[3] भोगिति भोगा पुण्य खरें ॥ ३५४ ॥
धर्मीं असती सन्तत तत्पर म्हणून भोगांत ।
अन्तराय नच होय तयांना इष्टें संयुक्त ॥ ३५५ ॥
ते विद्याधर होते पूर्वी सदैव जिनदास ।
म्हणून इच्छित लभे त्यांची असफल नच आस ॥ ३५६ ॥
धर्माचरणीं यत्न भव्यहो करा तुम्हीं सतत ।
तेजस्वी रविसमान होउनि व्हाल तुम्हीं मुक्त ॥ ३५७ ॥

इति रविषेणाचार्यकृते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे विद्याधरलोकाभिधानं नाम तृतीयं पर्व ॥ ३ ॥

---

१ सिंह. २ आकाशांतून गमन करणारे. ३ प्रज्ञप्त्यादिक विद्या व पत्नी यांनीं आलिंगित.

# चौथ्या पर्वांतील कथेचा सारांश

श्रीवृषभनाथांनीं सहा महिनेपर्यन्त आत्मध्यान करून त्याचें विसर्जन केलें व दानधर्म हा जगताला सन्मार्ग दाखविणारा असल्यामुळें त्याची प्रवृत्ति व्हावी म्हणून ते मौनानें विहार करावयास निघाले. विहार करीत करीत ते श्रेयांस राजाच्या हस्तिनापुर राजधानींत आले.

लोकांना मुनिजनांना काय द्यावें हें माहीत नसल्यामुळें कोणी कन्या, कोणी हत्ती, कोणी घोडा, कोणी रथ असे पदार्थ देऊ लागले. पण भगवंतांनीं यापैकीं कोणत्याच पदार्थाचा स्वीकार केला नाहीं म्हणून लोक खिन्न झाले.

राजमार्गानें विहार करीत प्रभु राजवाड्यांत आले. राजा श्रेयांसानें त्यांना पाहिलें. त्याला पूर्वजन्माचें स्मरण होऊन प्रभूवर अतिशय प्रीति उत्पन्न झाली. त्यानें प्रभूच्या चरणांना नमस्कार केला व आपल्या पत्नीसह त्यानें तीन प्रदक्षिणा दिल्या. त्याच्या डोळ्यांत आनन्दाश्रु उभे राहिले. प्रभूच्या चरणांजवळ त्या उभयतांनीं अर्घ्य अर्पण केला. यानन्तर त्यानें प्रभूच्या ओंजळींत भक्तीनें उसाचा रस अर्पण केला. अशा रीतीनें उपवासांचें पारणें निरन्तराय झालें.

राजानें सुपात्रसेवा भक्तीनें केल्यामुळें देवांना आनंद वाटला व त्यांनीं रत्नांची व कल्पवृक्षांच्या पुष्पांची राजाङ्गणांत वृष्टि केली. आकाशांत देवनगारे वाजू लागले. मन्द सुगंधित वारा वाहू लागला. देवांनीं राजाच्या आहार-दानाची प्रशंसा केली.

" राजा श्रेयांसा, तुझें हें दान अक्षय होवो व तुला अखण्ड पुण्य लाभो " असा आशीर्वाद देऊन प्रभु पुनः वनांत तपश्चरण करण्यासाठीं निघून गेले.

इकडे ही वार्ता भरतेश्वराला समजली. तो श्रेयांस राजाला भेटावयास आला. सर्व दानविधि ऐकून त्यानें तूं दानतीर्थाचा आद्य तीर्थंकर झालास म्हणून त्याला 'दान-तीर्थंकर' या पदवीनें भूषित केलें व तो परत अयोध्येस आला.

आदिप्रभु तपश्चरणांत लीन असतां शुक्लध्यानानें त्यांच्या घातिकर्मांचा क्षय होऊन त्यांना केवलज्ञान प्राप्त झालें.

रत्नमयसभेंत प्रभु बसले होते. तेव्हां वृषभसेन गणधरानें हात जोडून "सर्व इन्द्रादि भव्य जीवांना प्रभो आपण हितकर धर्माचें स्वरूप सांगावें" अशी विनंति केली.

प्रभूंनीं आपल्या दिव्यवाणीनें उपदेश करावयाला प्रारंभ केला—

"जसें बीजावांचून अंकुर उत्पन्न होत नाहीं, ढगावांचून पाऊस पडत नाहीं, तसें धर्मावाचून आत्म्याचें हित होत नाहीं. जे धर्माचरण करीत नाहींत त्यांना सुख मिळत नाहीं. जर पांगळाही पर्वताच्या शिखरावर चढून जाईल, जर आंधळ्यासही वस्तु दिसतील, जर मुकाही बोलेल तर धर्मावांचूनही सुख मिळेल व आत्म्याचें हित होईल." "धर्म हा उत्तम मित्र आहे व अहिंसेलाच धर्म म्हणावें. अहिंसेनेंच जीवाला ऊर्ध्वगतिचें-स्वर्गमोक्षाचें सुख प्राप्त होतें. अशा अहिंसेचा त्याग करणाऱ्याला दुःखच प्राप्त होतें. अहिंसेला सोडून कुतप करणाऱ्याला कुदेवपणा प्राप्त होतो. स्वर्गांत हीन-देवपद-सेवक-देवपद प्राप्त होतें. अहिंसापूर्वक सुतप करणाऱ्याला महर्द्धिक इन्द्रादि-देवपद मिळतें; ज्यांच्या हृदयांत सम्यक्श्रद्धान आहे; जो जिनवाणीचा अभ्यास करतो; त्याला रत्नत्रय व पुण्य प्राप्त होतें व शेवटीं कर्मक्षयानें मोक्ष मिळतो."

"या अहिंसाधर्माचे मुनिधर्म व गृहस्थधर्म असे दोन भेद आहेत— अहिंसा, सत्य, अचौर्य, ब्रह्मचर्य व परिग्रहत्याग हे स्थूलमानानें पाळणें यांना अणुव्रतें म्हणतात. पांच अणुव्रतें, तीन गुणुव्रतें व चार शिक्षाव्रतें हीं गृहस्थाचीं बारा व्रतें आहेत. यांचें पालन करणाऱ्या गृहस्थाचें हित होतें व त्यास परंपरेनें मोक्षसुख मिळतें." "सर्व आरंभांचा-हिंसाकार्यांचा त्याग करून देहावरही जो निःस्पृह असतो व आयुष्यान्तीं सल्लेखना पाळतो त्यास उच्च देवपद मिळतें; "५ महाव्रतें, ५ समिति व ३ गुप्ति असें तेरा प्रकारचें चारित्र पाळणें मुनीश्वरांचा धर्म आहे. मुनि हे नग्न-स्वरूप धारण करितात. नेहमीं धर्म्यध्यानीं तत्पर राहतात. या मुनिधर्मानें शेवटीं मोक्ष प्राप्त होतो. जीव सर्वकर्मांपासून कायमचा मुक्त होतो."

याप्रमाणें धर्माचें स्वरूप, त्याचे भेद व फल ऐकून सर्व सभा अतिशय आनंदित झाली. नंतर सर्व आपआपल्या स्थानीं निघून गेले.

आदिनाथप्रभूच्या पहिल्या पुत्रानें-भरतानें षट्खण्ड पृथ्वी जिंकून चक्रवर्तिपद भूषित केलें. या भरतामुळेंच या जगताला भरत हें नांव प्राप्त झालें.

पोदनपुरांत भरताचा भाऊ बाहुबलि राज्य करीत होता. तो प्रतिकूल झाल्यामुळें भरताला शत्रुसारखा वाटूं लागला. त्यानें त्याच्यावर चाल केली. बाहुबलीनें "सैन्याचा नाश करण्यांत काय अर्थ आहे. आपण दोघेच एकमेकांशीं लढूं" असें हंसून म्हटलें.

दृष्टियुद्ध, जलयुद्ध व मल्लयुद्ध असे युद्धाचे तीन प्रकार ठरले, तीनही युद्धांत भरताचा पराजय झाल्यामुळें भरतानें क्रुद्ध होऊन बाहुबलीवर सुदर्शन-चक्र फेकलें. परंतु तें निष्प्रभ झालें व बाहुबलीचा नाश त्याच्याद्वारेंहि चक्रवर्ती करूं शकला नाहीं. बाहुबलि तद्भव मोक्षगामी होता. तें फेकलेलें चक्र निर्विकार होऊन पुनः भरताकडे परत आलें.

भावाबरोबर विरोध करणें योग्य नाहीं असें वाटून बाहुबलि विरक्त झाला. त्यानें दीक्षा घेतली. एक वर्षपर्यन्त त्यानें प्रतिमायोग धारण केला. त्याच्या अंगावर सर्प वेटाळे घालून बसत असत तेव्हां सुंदर वेलींनीं त्याला वेष्टिलें आहे असें वाटत असे. एक वर्षानें घातिकर्मांचा नाश होऊन केवलज्ञानाची प्राप्ति त्याला झाली. बाकीच्या अघातिकर्मांचाही नाश करून तो मुक्त झाला. हा पहिला मुक्त झाला. यानें प्रथम मोक्षगृहाचीं कवाडें उघडलीं.

एकेदिवशीं भरतचक्रवर्तीनें मुनींना आहार देण्यासाठीं नानाप्रकारचें अन्न आपल्या नोकराजवळ दिलें व तो त्यांच्यासह प्रभूंना वंदन करण्यासाठीं गेला. प्रभूंना व मुनींना वन्दन केल्यानंतर त्यानें मुनींना 'मी आपणासाठीं अन्न आणलें आहे आपण त्याचा स्वीकार करावा' असें म्हटलें. तेव्हां मुनींनीं "भरता, आम्ही उद्दिष्ट आहाराचें केव्हांही सेवन करीत नसतों. आम्हांला उद्दिष्टान्नाचा त्याग असतो. आम्ही मासावधि उपवास करून पीडित झालों तरीही त्याचें सेवन करीत नाहीं." असें उत्तर दिल्यावर राजा त्यांना वंदन करून परत आला.

त्यानें सम्यग्दृष्टिश्रावकांना आहार व धनकनकादिक संपत्ति देण्याचा विचार केला व दूत सर्वत्र पाठवून दिले. राजा मोठें दान करणार आहे हें सर्वांना समजलें. सम्यग्दृष्टिबरोबर मिथ्यादृष्टीही आले. भरतानें सम्यग्दृष्टींना सुवर्ण-यज्ञोपवीत व धनकनकादिक देऊन ब्राह्मणवर्णाची स्थापना केली.

मतिसागरमंत्री राजाला म्हणाला " राजन् आपण स्थापलेला हा ब्राह्मण-वर्ण कलिकालीं प्राणिमारक हिंसाधर्माची स्थापना करून जैनधर्माची निन्दा करील. हिंसेस पुष्टि देणाऱ्या ग्रंथांची रचना करील " असें आदिभगवंतानीं आज सभेंत सांगितलें आहे असें म्हटल्यावर भरताला राग आला व ब्राह्मणांना मारण्यासाठीं तो धावला. तेव्हां सर्व ब्राह्मण आदिभगवंताकडे शरण गेले.

तेव्हां ' वत्स भरत माहन ' ' पुत्रा भरता यांना मारू नकोस ' असें आदि-भगवंतानीं सांगून भरताला थांबविलें व तेव्हांपासून ' माहन ' हें नांव ब्राह्मणांना प्राप्त झालें. बीजरूपानें स्थापन केलेल्या ब्राह्मणांचा पुढें सर्वत्र प्रसार झाला.

कांहीं वर्षे राज्योपभोगांत गेल्यावर भरताला वैराग्य झालें. त्यानें राज्य त्यागून दीक्षा घेतली व तपश्चरण करून कैलासपर्वतावर कर्मक्षयानें अक्षयसौख्याचा मोक्ष मिळविला.

याप्रमाणें या पर्वांत स्थित्यधिकाराचें वर्णन केलें आहे.

पुढील पर्वांत ' वंशाधिकाराचें ' वर्णन करूं.

---

# चौथें पर्व-श्री वृषभनाथांचें आहारग्रहण.

( श्रीवृषभनाथांना श्रेयांस राजा आहार-दान देतो व त्यामुळें
पंचाश्चर्यें प्रगट होतात. )

### इन्द्रवज्रा

ध्यानी सुवर्णासम देह ज्यांचा । उद्युक्त झाले जगता हिताचा ॥
सन्मार्ग जो दान असे सुधर्म । दावावया देइ खरें सुशर्म[1] ॥ १ ॥
दोषें सदा जे असती विमुक्त । सम्पूर्ण योगांस[2] करून पूत ॥
भूमीवरी ते विहरावयास । मौनें निघाले न गमे प्रयास ॥ २ ॥
पाऊल ते श्रीवृषभेश जेथें । कीं ठेविती पद्म सुरम्य तेथें ॥
निर्माण झालें गमतें मनाला । आनन्द वाटे बघतां प्रभूला ॥ ३ ॥

### उपजाति

सुमेरुशृङ्गासम उंच मौनी । नाभेय[3] आले हृदयीं न मानी[4] ॥
श्रीहास्तिनापत्तन मोद पावे । प्रजा बघायास न काय धावे ॥ ४ ॥

### इन्द्रवज्रा

वस्त्रें नि रत्नें पदिं अर्पिते ती । घ्या घ्या प्रभो! बोलुनि वाक्यपङ्क्ति ॥
कोणी गजा अश्वरथास देती । घ्यायास कन्या कुणि तेथ येती ॥ ५ ॥

### उपजाति

स्वीकारिती आदि-जिनेन्द्र त्यां न । तेणें प्रजा होय मनांत खिन्न ॥
कन्याहि झाल्या मनिं खिन्न फार । परि प्रभूचा करिती विचार ॥ ६ ॥
श्रेयान् महीपाल बघे जिनास । प्रमोद झाला बहु तन्मनास ॥
त्या पूर्वजन्मस्मृति ही जहाली । नेत्रीं अतिप्रीति तदा उदेली ॥ ७ ॥
उठून भूपाल समीप आला । वंदी तयांच्या पदपङ्कजाला[5] ॥
प्रदक्षिणा स्त्रीसह भूप देई । मोदाश्रु[6] नेत्रद्वयिं दाट येई ॥ ८ ॥
ठेवून अर्घ्या मणिभाजनांत । अर्पी जिनाच्या पदिं भक्तियुक्त ॥
प्याल्यांत तो इक्षुरसास घेई । जिनाञ्जलीं मोदभरेंचि देई ॥ ९ ॥

---

१ उत्तम सुख. २ आत्मध्यानास. ३ नाभिराजाचा पुत्र-वृषभनाथ.
४ अभिमानी. ५ पायरुपी कमलाला. ६ आनन्दाश्रु.

झाला प्रभूंच्या गुणिं भूप लुब्ध । दिलें तया इक्षुरसास शुद्ध ॥
आनन्द वाटे नाभिं सर्व देवा । केली नृपें योग्य सुपात्र-सेवा ॥ १० ॥
अशी प्रशंसा करिती सुरौघ । नभीं नगारे झडती हताघ ॥
गेल्या दिशा व्यापुनि सर्व तेणें । आनन्द झाला सकलास जेणें ॥११॥
कल्पद्रुमापासुनि पुष्पवृष्टि । झाली करी ती नभिं गन्धसृष्टि ।
अहो असें दान जना म्हणून । आनन्दवीतीं सुरवृन्द पूर्ण ॥ १२ ॥
वारा सुखस्पर्श करून वाहे । सुवर्णरत्नें पडतात पाहे ॥
वार्ता कळे ही भरतेश्वरास । येऊन देई परमादरास ॥ १३ ॥
तूं दान-तीर्थङ्कर[३] जाहलास । बोले असें प्रीति धरून त्यास ॥
सुपात्रदानीं विधि सर्व लोकां । कळे तदा सज्जन हो ! विलोका ॥ १४ ॥
श्रेयन् ! तुझें अक्षय दान होवो । अखण्डसा पुण्यसमूह लाहो[४] ॥
देऊन आशीर्वच भूपतीस । नाभेय गेले जिन ते वनास ॥ १५ ॥
तें पाणिपात्रव्रत आदिदेवें । प्रवृत्त केलें जगिं पूज्य देवें ॥
तपोव्रतां ते करिती वनांत । निजात्मरूपा स्मरती मनांत ॥ १६ ॥

( वृषभनाथास केवलज्ञानप्राप्ति व अष्टप्रातिहार्यलाभ )

जिनें सितध्यान[५] करून मोह । विनाशिला जो भवदुःख-गेह ॥
झाला तया केवलबोध शुद्ध । लोका अलोका करि जो प्रसिद्ध ॥ १७ ॥
भामण्डलें शोभति ते जिनेश । विनष्ट हो रात्रिदिनीं विशेष ॥
कोट्यर्कचन्द्रद्युति[६] तुच्छ होय । तथापि नेत्रा न करी अपाय ॥ १८ ॥
अशोकवृक्ष प्रकटे जिनाचा । जो रत्न-पुष्पें खुललाचि साचा ॥
पानें जयाचीं दिसतात लाल । आकर्षि जो भव्यमना विलोल[७] ॥ १९ ॥
ओढून आणी भ्रमरां सदा जी । पडे नभांतून सुपुष्पराजी[८] ॥
सुगन्ध सारा पसरे सभेंत । जना करी ती बहु हर्षयुक्त ॥ २० ॥
नभीं नगारे बहु वाजतात । शब्दें समुद्रासहि जिंकतात ॥
डोळे जयांचे कमलासमान । जे वारिती चामर यक्ष जाण ॥ २१ ॥

---

१ पापरहित पवित्र. २ सुगन्धाचा प्रसार. ३ दानरूपी धर्माचा कर्ता.
४ मिळो. ५ शुक्लध्यान. ६ कोट्यावधि चन्द्रसूर्यांची कान्ति. ७ चंचल.
८ उत्तम पुष्पांचा समूह.

जें वाटतें भ्रूमुकुटासमान । जें लाजवी सूर्यकरास जाण ॥
आला असे मेरु इथें गमे जें । सुवर्णसिंहासन फार साजें ॥ २२ ॥

अनुष्टुप्

त्रिलोकविभुतेचें जें चिह्न पाहून वाटतें ।
छत्रत्रय प्रभूचें तें यश निर्मल शोभतें ॥ २३ ॥
विराजमान वृषभ मृगेन्द्रासनिं जाह्ले ।
सभावैभव हें त्यांचें तेच वर्णिति चांगलें ॥ २४ ॥
इन्द्रांनीं अवधिज्ञानें केवलज्ञान जाणिलें ।
प्रभूचें शीघ्र येऊन पदाब्जयुग वंदिले ॥ २५ ॥
आद्य झाला जिनेशाचा गणी[१] वृषभसेन हा ।
प्रख्यात भगवन्ताचा सुत माहात्म्य हें पहा ॥ २६ ॥

( प्रभूचा भव्य जीवांना धर्मोपदेश )

वसन्ततिलक

इन्द्रादिदेव सगळे प्रभुच्या सभेंत । यत्यादि तेंवि नृप आदिक हे मनांत ।
होऊन हृष्ट वसले असतां गणेश । वोले वदा जिनपते ! हित या जनास ॥
वाद्यध्वनीस सगळ्या प्रभुदिव्यवाणी । आच्छादुनि प्रगटली श्रविली जनांनीं
तत्त्वार्थरूप कथि ती जनताहितार्थ । केलें पराजित तिनें अमृता यथार्थ ॥

उपजाति

जगत्त्रयीं जे हित इच्छितात । त्यांना असे रक्षक धर्म तात ॥
लभे तयें उत्तम सौख्य त्यांना । उपाय हा एकचि सत्य जाणा ॥ २९ ॥
सुखार्थ सारे झटतात जीव । निमित्त त्या एकचि धर्मभाव ॥
जाणून ऐसें करुनि प्रयत्न । नरें करावें वश धर्म-रत्न ॥ ३० ॥
जरी नभीं मेघ जमा न होती । होईल हो वृष्टि कशी वदा ती ॥
न पेरिलें बीज जरी धरेंत[२] । येईल कां धान्य कधीं घरांत ॥ ३१ ॥
धर्मांत जो चित्त न जीव देई । कदापि त्या प्राप्त न सौख्य होई ॥
जाणून ऐसें वचनें मनानें । कार्ये करा धर्म अहो त्वरेनें ॥ ३२ ॥
धर्माविणें सौख्य जरी मिळेल । कीं पंगुही शैलशिखां[३] चढेल ॥
जो मूक तो मानव ही वदेल । अन्धास ही भूतल हें दिसेल ॥ ३३ ॥

१ गणधर. २ जमिनींत. ३ पर्वताचे शिखर.

मोठा नभाहून जगीं न कोण । नसे अणूहून हि कोण सान ।
सुमित्र धर्माहुनि अन्य नाहीं । हें वाक्य कालत्रयिं सत्य पाही ॥ ३४ ॥
धर्में जना मानवभोग लाभे । स्वर्गातलें[1] सौख्य तयेंचि शोभे ॥
देई पुनः सिद्धिसुखास हाच । अन्यांत या सद्गुण हा नसेच ॥ ३५ ॥
सेवी अहिंसा बुध धर्म त्यास । लाभेचि ऊर्ध्वा गति जी अवश्य ॥
परन्तु सोडी नर जो तयाला । भेटे त्रिलोकीं नित दुःखमाला ॥ ३६ ॥
जे अन्यलिङ्गी कुतपा करून । जाती जरी देवगृहीं अजाण ॥
होतात ते किङ्कर-देव तेथें । महापद-प्राप्ति न हो तयातें ॥ ३७ ॥
कुदेव-दुःखें मिळती तयांना । चवून लाभे पशुताचि नाना ॥
तेथें पुनः दुःख विशाल भेटे । देई जना धर्मचि सौख्य मोठें ॥ ३८ ॥
सद्दृष्टि[2] ज्याच्या हृदयांत राहे । जिनागमाभ्यास-रतीस वाहे ॥
लाभे तया बोधि[3] नि पुण्य जीवा । कर्मक्षयें मुक्तिपुरीं विसावा ॥ ३९ ॥

वसन्ततिलक

सागारधर्म[4] नि दुजा अनगारधर्म[5] । जीवास देति वदतात जिनेश शर्म ॥
आहे तृतीयहि सुधर्म मनांत मानी । मोहाग्निदग्ध[6] नर तो स्वहिता न जाणी

उपजाति

अणुव्रतें पांच नि तीन चार । गुणाख्य-शिक्षाभिध शील थोर ॥
बारा असे भेद गृहिव्रताचे । जे पाळती हो हित सत्य त्यांचें ॥ ४१ ॥

शालिनी

सर्वारम्भ[7]-त्याग केला मनानें । देहीं राही निःस्पृही भव्य तेणें ॥
आयुष्यान्तीं शोभना त्यास लाभे । देवावस्था तो तयें फार शोभे ॥४२॥

उपजाति

महाव्रतें पांच मुनीश्वरांची । चित्तांत बाधा नच हो स्मराची ॥
त्रिगुप्ति कायें वचनें मनानें । सांभाळि पांचा समिति त्वरेनें ॥ ४३ ॥

---

१ स्वर्गांत. २ जिनेश्वर, निर्ग्रन्थ गुरु व जिनागम यावरील निर्दोष श्रद्धेला सद्दृष्टि म्हणतात. ३ रत्नत्रय-सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक् चारित्र यांची प्राप्ति. ४ गृहस्थधर्म. ५ मुनिधर्म. ६ मिथ्याश्रद्धानरूपी अग्नीनें होरपळलेला. ७ हिंसक कार्यांना आरंभ म्हणतात.

हा धर्म आहे मुनि जे तयांचा । सांगे असे सत्य जिनेशवाचा ॥
सदा शुभध्यान मनांत ठेवी । अशा मुनींना नति नित्य द्यावी ॥ ४४ ॥
दुर्गन्ध देहा त्यजिती नि जाती । स्वर्गा नि मोक्षा सुखपङ्क्ति घेती ॥
अशा मुनींना नमितो त्रिवार । आत्मा जयाचा स्मर-हीन थोर ॥ ४५ ॥

इन्द्रवज्रा

जे जातरूपा[1] धरिती स्वदेहीं । जे ब्रह्मचर्यीं[2] रमती अमोही ॥
त्यांच्या स्तुतीला करितात जीव । लाभे तयांनाच सुधर्मभाव ॥ ४६ ॥

उपजाति

धर्मप्रभावें कुगतीं न जाती । ते बोधि-लाभासहि पावताति ॥
पापें तयांचीं विलयास जातीं । अगण्य पुण्यासचि ते वरीति ॥ ४७ ॥

इन्द्रवज्रा

श्रीदेवदेवें जिन आदिनाथें । सांगीतला उत्तम धर्म सुखें ॥
देवां नरां ऐकुनि मोद वाटे । तेणें तयांचें अघकर्म[3] फाटे ॥ ४८ ॥

उपजाति

श्रद्धान झालें दृढ सज्जनांचें । गृहस्थधर्मी मति फार नाचे ॥
मुनिव्रता पाळिति भव्य कांहीं । स्वशक्तिनें होउनि ते अमोही ॥ ४९ ॥
सुरासुरें तो स्तविला जिनेश । वन्दून भावें गुणरत्न-कोष ॥
गेलें स्वकीया निलयांस[4] सारे । शिरे जयांच्या मनि धर्म-वारे ॥ ५० ॥
सर्वज्ञ देशांत करी विहार । तेथें वने भू सुरलोक-थोर[5] ॥
सभोवतीं शंभर योजनांत । भू सर्व झाली धनधान्ययुक्त ॥ ५१ ॥
अनेक देशांतुनि भव्य आले । रत्नत्रयें भूषित ते जहाले ॥
मुनिव्रता निर्मल आचरून । भवाब्धि गेले सगळ्या तरून ॥ ५२ ॥

अनुष्टुप्

गणी वृषभसेनादि ऐंशी चार महागुणी ।
चतुर्ज्ञानी श्रुताब्धीचे पारंगत महामुनि ॥ ५३ ॥

१ नग्नरूपाला. २ आत्मस्वरूपांत नित्य स्थिर असणें. ३ पापकर्म.
४ आपल्या घराला. ५ स्वर्गलोकाहून थोर.

महातपस्वी श्रमण चौऱ्याऐंशीं हजार जे।
सभेंत प्रभुच्या होते अस्पृष्टचि सदा रजें ॥ ५४ ॥

वसन्ततिलक

त्यांचें वचून अतिनिर्मल चित्तरूप। हे चन्द्रसूर्यसम तेज सदा अपापें ॥
यांना सवें ग्रहुनि आदि-जिनेश सर्व। पृथ्वी फिरे नच जयास असे चि गर्व
आदिप्रभु-प्रथम पुत्र जयास नाम। होते जगीं भरत जो धरि शान्त धामें ॥
ज्याच्या मुळें 'भरत' हें जगतास नाम। लाभे प्रसिद्ध करि कार्य सदा अकाम

आर्या

शम्भर पुत्र जिनांना तेज नि कान्तिस वपूंत ठेवून।
श्रमण-व्रतास घेउनि गेले मोक्षा पवित्र गुणखाण ॥ ५७ ॥

( भरत-वैभव-वर्णन )

आदिजिनाचा पहिला पुत्र जया चक्र लाभलें तेणें।
प्रथमचि चक्री झाला प्रजाजनांना नसेचि सौख्य उणें ॥ ५८ ॥
अक्षय निधि नव त्याचे भरल्या खाणी सदैव रत्नांनीं।
नव्वद सहस्र तदुपरि सहस्र नव लाभल्या अयत्नांनीं ॥ ५९ ॥
वैभव विशाल त्याचें कोटित्रय धेनु हलहि तितुकेच।
गज चतुरशीतिलक्ष नि अठरा कोट्यश्व वदति कवि साच ॥ ६० ॥
बत्तिस हजार राजे भरतपदीं नम्र शीर्ष निज करिती।
नखदर्पणांत त्याच्या मुख अपुलें आदरेंचि ते बघती ॥ ६१ ॥
बत्तिस हजार देशीं पुरपत्तनसम्पदा तिथें नांदे।
भरत-प्रभुत्व त्याचें यश भ्रमें भूतलीं निजच्छन्दें ॥ ६२ ॥
चौदा सुदिव्यरत्नें रक्षिति चौदासहस्र सुर ज्यांना।
अधिपति भरत तयांचा भोगी सुख आदरून धर्मगुणा ॥ ६३ ॥
शाण्णव हजार राण्या ज्यांनीं रतिरूपसम्पदा हरिली।
मतिभृङ्गी भरताची ललनोद्यानांत सर्वदा रमली ॥ ६४ ॥

---

१ पापधुळीनें. २ पापरहित. ३ तेज. ४ निःस्पृह. ५ नव्याण्णव हजार. ६ चौऱ्याऐंशीं लाख. ७ ज्याच्या आसपास रत्नांच्या खाणी असतात त्या नगरास पत्तन म्हणतात. ८ बुद्धिरूपी भ्रमरी. ९ सुन्दर स्त्रियारूपी बगीचांत.

सगळें यथार्थ वैभव-वर्णन करणें कवीस शक्य नसे ।
पसरून हात वर्णी उदधिस बालक तसेंचि हें विलसें ॥ ६५ ॥

( भरत-बाहुबलियुद्ध-वर्णन )

पोदनपुरांत भाऊ महाबली भुजबली सुराज्य करी ।
वाटे तो भरताला प्रतिकूल मनांत हा महावैरी ॥ ६६ ॥
चक्रें गर्वित त्याशीं घेउनि चतुरङ्ग सैन्य समरास ।
भरत निघाला झालें समीकं जे सत्त्व-संक्षयावास ॥ ६७ ॥

वसन्ततिलक

बोले हसून भरता नृप दोर्वली[3] तो । मारून सैन्य नच लाभ कदापि होतो ।
वा दृष्टियुद्ध उभयामधिं आज होवो । तेणें जयापजय-निर्णय सुज्ञ लावो ॥

उपजाति

हें मान्य केलें भरतेश्वरानें । अन्योन्य ते पाहति दृग्युगानें ॥
परन्तु चक्री चलदृष्टि झाला । पराजितत्वाप्रति हाय गेला ॥ ६९ ॥
झालें जलें युद्ध नि मल्लयुद्ध । परास्त चक्री वदति प्रबुद्ध ॥
तेणें तया कोप अतीव आला । इच्छी स्वबन्धूस विनाशण्याला ॥ ७० ॥

वसन्ततिलक

रागावला भरत चक्र सुदर्शनास । सोडून दोर्वलि-विनाश करावयास ॥
इच्छी त्वरें करिं धरूनहि फेकिलें तें । होऊन निष्प्रभ वधी नच दोर्वलीतें ॥

इन्द्रवज्रा

तो दोर्वली अन्त्य-शरीर-धारी । तें चक्र झालें अतिनिर्विकारी ॥
मारावयाला असमर्थ झालें । चक्रीकडे तें परतून आलें ॥ ७२ ॥

वसन्ततिलक

( बाहुबलि मोक्षप्राप्ति )

भावाबरोबर विरोध न योग्य आहे । जाणून दोर्वलि मनांत विरक्ति वाहे ॥
त्यागून भोगवसनादिक सर्व त्यानें । वर्षान्तयोग धरिला दृढरूपतेनें ॥७३॥

---

१ युद्ध. २ प्राण्याचा नाश करणारें घर. ३ बाहुबलि. ४ दोन डोळ्यांनीं. ५ चंचलदृष्टीचा. ६ पराजित. ७ विद्वान. ८ कान्तिहीन. ९ तद्भव-मोक्षप्राप्ति करून देणारें शरीर ज्याचें आहे असा. १० वस्त्रादिक. ११ एक वर्ष पर्यंत ध्यान करणें.

जे वारुळांतुनि निघून भुजंग त्यांनीं । कीं वेढिली तनु यदीय शुभा लतांनीं ॥
झाला असे भुजवली मुनिराज त्यास । कैवल्य-बोध हरि घाति-कुकर्म-पाश ॥
कर्मक्षया करुनि दोर्बलि ते यतीश । झाले अनन्तगुणपूर्ण नि निर्वृतीश ॥
हा मुक्तिमार्ग पहिला अतिशुद्ध केला । यांच्या पदद्वयिं मम प्रणिपातमाला

( भरत निष्कण्टक होऊन सुखोपभोग घेतो )

### उपजाति

होऊन निष्कण्टक चक्रवर्ती । पाळी प्रजा विक्रम-कीर्ति-मूर्ति ॥
षट्खण्ड हें सर्व तयेंचि झालें । महाधनी शान्ति सुखांत ठेलें ॥ ७६ ॥

### वसन्ततिलक

खाणी, अनेक नगरें, सुविशाल गांवें । हे स्वर्गतुल्य नच वैभव यांत मावे ॥
जे त्यांत लोक असती सुर तेचि जाणा । चक्री असे भरत इन्द्र तयांत माना

### उपजाति

जे देश ते भोगद-भूमिरूप । नृपाल दिक्पाल गणा अनूप ॥
सुराङ्गनातुल्य तयांत नारी । जे मर्त्य ते देव मनीं विचारी ॥ ७८ ॥

### वसन्ततिलक

हा भारतेश नृप इन्द्र जसा सुरांत । भोगी सुखें विविधशीं नच ज्यांत अन्त ॥
ज्या रक्षिती सतत यक्षसहस्र चक्र । शोभे वघे न नृप दृष्टि करून वक्र ॥
स्त्रीरत्न इन्द्रियसुखास सदैव देई । ज्याच्या समान नच सुन्दर अन्य कांहीं॥
ज्या पांचशे सुत सुवीर नि बुद्धिवन्त । षट्खण्ड-भूमि उपभोगिति हर्षयुक्त ॥

( ब्राह्मणवर्णाची उत्पत्ति )

श्रीगौतमें कृतयुगीं भरतेश्वराचें । केलें सुवर्णन नि ऐकुनि मॉंगधाचे ॥
चित्तास कौतुक गमे वदला तयास । भूदेवसंभव वदा मजला विशेष ॥ ८१

### उपजाति

यज्ञांत जे प्राणिविघात-कारी । गर्वास जे धारिति निर्विचारी ॥
अशा द्विजांचे जन भक्त कां हो । सांगा तया दुःख न केंवि लाहो ॥ ८२ ॥

---

१ मोहनीय ज्ञानावरण, दर्शनावरण व अन्तराय यांना घातिकर्म म्हणतात. २ मुक्तिपति. ३ नमस्कार-पङ्क्ति. ४ पराक्रम व कीर्ति यांची मूर्ति असलेला. ५ भोगांचे पदार्थ देणारी भोगभूमि. ६ अनुपम. ७ श्रेणिक राजाचे. ८ ब्राह्मणांची उत्पत्ति.

### इन्द्रवज्रा

या श्रेणिकाच्या वचना श्रवून । बोले गणी गौतम सावधान ॥
उत्पत्ति वा ऐक अशा द्विजांची । मोहाकुला[1] वृत्ति असे जयांची ॥ ८३ ॥

### उपजाति

एके दिनीं आदिजिनेश आले । श्रवून[2] हें हर्षित लोक झाले ॥
वन्दावया लोक असङ्ख्य गेले । वन्दून ते पुण्यपवित्र झाले ॥ ८४ ॥

### वसन्ततिलक

देऊन अन्न अनुजीविजना[3] समीप । ज्याच्या मनांत न वसेचि कधीहि पाप
चक्री असा भरत वैभव ज्या अमाप । गेला जिनाजवळि सद्गुण-रत्नकूप ॥

### उपजाति

( मुनि उद्दिष्टाहार-त्यागी असतात. )

जिनेश्वरां तेंवि मुनीश्वरांना । वंदून तो दूर करी अघांना ॥
भालावरी दोन करून हात । बोले मुनींना मधुशब्दयुक्त ॥ ८६ ॥

### इन्द्रवज्रा

माझ्यावरी देव कृपा करावी । ही अन्नराशि स्वकरांत घ्यावी ॥
तेव्हां तया श्रीमुनिपङ्क्ति बोले । आम्हास हें अन्न अयोग्य झालें ॥
आम्हीं न उद्दिष्ट[4] करांत घेऊ । तें अन्न आम्ही न कदापि सेवू ॥
उद्दिष्ट-त्यागा वदले जिनेश । आहेत जे सद्गुण-रत्नकोष ॥ ८८ ॥

### आर्या

तृष्णा नसेचि यांना इन्द्रियशत्रूस जिंकिलें यांनीं ॥
बहुमासीं उपवासी असूनही असति सुगुणगणखाणी ॥ ८९ ॥
निर्दोष श्रावकगृहिं घेती मौनेंचि सुमुनि भिक्षा हे ॥
स्वप्राण-धारणार्थेचि धर्माला प्राण हेतु हें पाहे ॥ ९० ॥
जीवां पीडा ज्यांत न मोक्षासाठींच धर्म तो आहे ॥
तो आचरती सन्मुनि जीवगणां सौख्य इच्छिती पाहे ॥ ९१ ॥
ऐकुनि भगवद्वचना चित्तीं तो भरत भूपति चिन्ती ॥
हें व्रत जिनेश्वराचें सुलभ नसे तें असे महाकष्टी ॥ ९२ ॥

---

१ मिथ्याश्रद्धान. २ ऐकून. ३ नोकरजवळ. ४ उद्देशून तयार केलेले अन्न.

निजदेहांत हि निःस्पृह असती मुनिराज जातरूप-धर ॥
प्रशमचि शरीर यांचें असती हे शान्त तेंवि बहु धीर ॥ ९३ ॥
सागार-व्रत ज्यांनीं आश्रयिलें मी तयास आहार ॥
देईन हेमसूत्रें करून चिह्नित सुधार्मिका थोर ॥ ९४ ॥
इतरहि मणिकनकादिक धन देइन विपुल भक्ति ठेवून ॥
गृहिधर्म बन्धु आहे मुनिधर्माचा लहान जाणून ॥ ९५ ॥
सम्यग्दृष्टि-जनांना जे सगळे भूतलांत असलेले ॥
बोलावी हर्षानें दूतादिक पाठवून भरत भले ॥ ९६ ॥
तेणें या पृथ्वीवर कोलाहल फार पसरला वेगें ॥
जाऊ चला जनांनों देई भरतेश दान अनुरागें ॥ ९७ ॥
दूत तयें पाठविले आदरभावें तयाकडे जाऊ ॥
धनकनकवस्त्र आदिक आणू त्याच्या गुणव्रजा गाऊ ॥ ९८ ॥
कांहीं लोक म्हणाले तो सम्यक्त्वी जनास आदरितो ॥
देई दान न इतरां गमनपरिश्रम वृथाचि तो होतो ॥ ९९ ॥
सम्यक्त्वी जन हर्षित पुत्रकलत्रासवेंचि ते गेले ॥
विनयें राहति तेथें धनराशि तया असंख्य तेथ मिळे ॥ १०० ॥
मिथ्यात्वी जन देखिल धनतृष्णेनें विशाल-मायेनें ॥
भरत-महासौधामधिं आले जे शोभतात जायेनें ॥ १०१ ॥
जव मूग उडिद साळी अंकुर यांचे नृपाङ्गणीं दिसले ॥
कांहीं तुडवित गेले कांहीं तेथेंचि थांबले बसले ॥ १०२ ॥
त्यांना दुसऱ्या मार्गें भरतें सौधांत शीघ्र आणविलें ॥
सुंदरसूत्रें त्यानें त्यांच्या वक्षःस्थलास भूषविलें ॥ १०३ ॥
मिथ्यात्वीजन देखिल तृष्णेनें बहुसचिन्त होऊन ॥
वाक्यें सुदीन बोलुनि पडले दुःखार्णवांत जो गहन ॥ १०४ ॥
भरतें यथेष्टदानें श्रावकवृन्दां दिलीं नि पूजियलें ॥
तेणें गर्व तयांना झाला अत्यन्त मानसीं फुलले ॥ १०५ ॥
आम्ही पवित्र अतिशय करितो जनहित नि पूज्य भरतास ॥
देतो तो श्रद्धेनें आम्हास सुदान धर्मनिरतास ॥ १०६ ॥

---

१ नग्नता धारण करणारे. २ सुवर्णाच्या यज्ञोपवीतासह. ३ गुणसमूहाला. ४ पत्नीसह. ५ महाकपटानें. ६ पत्नीनें. ७ यज्ञोपवितानें. ८ लोभानें.

ऐसा विचार येतां गर्व तयांच्या मनांत बहु साचे ॥
धनिकास याचिती ते वदती तारक भवार्णवीं साचे ॥ १०७ ॥

( कलिकालीं ब्राह्मण मिथ्यात्वी होतील )

मतिसागर सचिवानें भरता भरतेश्वरास सांगितलें ॥
भगवत्सभेंत भगवद्वदनें मी आज हें असें श्रविलें ॥ १०८ ॥
वीर-जिनाच्या समयीं उद्धत होतील आणि पाखंडी ॥
ज्यांना तूं द्विज केलें कलिकालीं जाण जैनमतखण्डी ॥ १०९ ॥
प्राण्यास मारतिल हे धर्माचा भाव हृदयिं ठेवून ॥
तीव्रकषायीं होतिल यांचें पापीं रमेल सतत मन ॥ ११० ॥
कुग्रन्थ वेद नामक जो नित सांगेल पाप-हिंसेस ॥
पशुमारणांत तत्पर रचतिल वदतील हेतु सौख्यास ॥ १११ ॥
मोहित लोकां करितिल हिंसारम्भांत सतत रमतील ॥
श्रीजिन-भाषित-शासनिं निन्दावाक्यास सतत वदतील ॥ ११२ ॥
निर्ग्रन्थसाधु पाहुनि हे पापी क्रोधयुक्त होतील ॥
गरल-द्रुमाङ्कुरासम पीडित जनतेस सतत करतील ॥ ११३ ॥
ऐकून सचिव-वचना कोपुनि भरतेश ठोकिता झाला ॥
शरण द्विजगण दुःखी होउनि वृषभेश्वरास तैं आला ॥ ११४ ॥
'मा हन' यांना पुत्रा ऐसें बोलुनि निवारिलें भरता ॥
वृषभ जिनें द्विजजनता 'माहन' नामांत जाहली निरता ॥ ११५ ॥
ती रक्षिली जिनानें आलेली शरण म्हणुनि बुध मान्य ॥
त्राता नि इन्द्र म्हणती वचन असें पूर्ण धरुनि सन्मान्य ॥ ११६ ॥
वृषभजिना अनुसरले प्रथमचि जे भग्न जाहले भूप ॥
निजमतिनें आचरलीं मतान्तरें प्रगट म्हणुनि भवकूप ॥ ११७ ॥
शिष्य-प्रशिष्य त्यांचे कुहेतुनीं करुनि क्षुब्ध जगतास ॥
कुत्सित-शास्त्रें रचितें झालें देतात जीं भवत्रास ॥ ११८ ॥
भृगु अङ्गिरा नि वह्नि त्रिविद नि कपिलादि अन्य अज्ञानी ॥
झाले वल्कल तापस परिती कुतपान्न हुतर सोडोनी ॥ ११९ ॥

१ साठला. २ ऐकिलें. ३ जिनेश्वरांनीं सांगितलेल्या [illegible]. ४ [illegible].
५ विषवृक्षाच्या अंकुरासारखें. ६ [illegible]. ७ [illegible]. ८ [illegible].

पाहून ते स्त्रियांना विकार चित्तांत पावले मूढ ॥
कौपीनांनें[1] तेव्हां निजपुल्लिङ्गास छादिती गूढ ॥ १२० ॥
भरतें भरतेशानें केले उत्पन्न विप्र बीजसम ॥
सन्तानें भूतलिं या प्रसार बहु पावले चि अविराम[2] ॥ १२१ ॥
प्रस्तावागत कथिली द्विजसृष्टि तुला नृपाल ! यापरि ही ।
आतां श्रेणिक ऐके प्रकृता[3] दासी असे तुला स्वमही ॥ १२२ ॥
विपुलभवसागरांतुनि लोकां काढून नाभिपुत्र-जिनें ॥
कैलास-शैल-शिखरीं निर्वृति-कर[4] घेतला स्वहस्तानें ॥ १२३ ॥

( भरतास मोक्षप्राप्ति )

नन्तर कांहीं वर्षे गेलीं वैराग्य जाहलें भरता ।
तृणवत्स्वराज्य समजुनि दीक्षा नारी करी स्वतःत रता ॥ १२४ ॥
गेला तो कैलासीं मोक्षाला भरत अष्टकर्मगणा ॥
नाशुनि भोगी सन्तत अव्याबाधादि अष्ट सिद्ध-गुणा ॥ १२५ ॥
श्रेणिक यापरि कथिला हा स्थित्यधिकार मी समासानें ॥
जिनदासानें तुजला तो तूं हृदयांत ठेव हर्षानें ॥ १२६ ॥
वंशाधिकार तुजला पुरुपर्वे[5] सांगतों मनीं ठेव ॥
आदर त्या विपयाचा तुजला लाभेल तीर्थकर-भाव[6] ॥ १२७ ॥

इति श्रीरविषेणाचार्यकृते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत-जिनदास फडकुलेकृत-पद्यानुवादे
'ऋषभमाहात्म्याभिधानं' नाम चतुर्थं पर्व ॥ ४ ॥

---

१ लंगोटीनें. २ अखण्डरीतीनें. ३ चालू कथा. ४ मुक्तिस्त्रीकर. ५ हे पुरुपसूर्या.
६ तीर्थंकरपणा अर्थात् हे श्रेणिका उत्सर्पिणीच्या तिसऱ्या विभागांत सुषमदुःषमा या विभागांत तूं पहिला तीर्थंकर होशील.

# पांचवें पर्वाचा सारांश

या पर्वात वंशाधिकाराचा विचार केला आहे. इक्ष्वाकुवंश, सोमवंश, विद्याधर-वंश व हरिवंश असे क्षत्रियांचे चार वंश आहेत. इक्ष्वाकुवंशाचे दोन भेद सूर्यवंश व सोमवंश. भरतचक्रवर्तीच्या ज्येष्ठ मुलाचें नांव अर्ककीर्ति होतें. अर्क-सूर्य-अर्थात् सूर्यकीर्ति असेंही त्याला नांव होतें. म्हणून या वंशांत पुढें जे अनुक्रमें राजे उत्पन्न झाले त्यांना सूर्यवंशी म्हणतात. आदिनाथ भगवन्ताच्या बाहुबली पुत्राला सोमयश नामक पुत्र होता. या सोमयशाच्या वंशांत जे राजे झाले त्यांना सोमवंशी म्हणतात.

नमि व विनमि या राजपुत्रांनीं आदिभगवान तप करीत असतां त्यांच्याजवळ त्यांनीं राज्याची याचना केली. तेव्हां धरणेन्द्राचें आसन कंपित झालें. तो आदि-भगवंताजवळ राज्ययाचना करीत असलेल्या दोन राजपुत्राजवळ आला व त्यानें त्यांना विद्या देऊन विद्याधरांचे राजे बनविलें. यांच्या वंशाला विद्याधरवंश म्हणतात.

या विद्याधर वंशांत अनेक विद्याधर राजे होऊन गेले. त्यांपैकीं विद्युद्दृढ अथवा विद्युद्दंष्ट्र नांवाचा विद्याधर राजा एकेवेळीं विदेह क्षेत्रांत गेला. आकाशांतून त्यानें आत्मध्यानांत निमग्न असलेल्या मुनींना पाहून वैरानें उचलून आणून [illegible] पर्वतावर ठेविलें व अनेक विद्याधरांना त्यानें त्यांना मारण्यासाठीं प्रेरणा केली. त्यांनीं लाकडें, दगड फेकून त्या मुनींना विद्ध केलें. परंतु त्यांनीं तो उपसर्ग सहन केला. त्यांना आत्मध्यानानें केवलज्ञान उत्पन्न झालें. त्यांचें नांव संजयन्त होतें.

धरणेन्द्रानें त्याच्या सर्व विद्यांचा छेद केला त्यामुळें तो शरण आला. धरणेन्द्रानें संजयन्त मुनींना या विद्याधरानें कां उपसर्ग केला असें विचारलें तेव्हां त्यांनीं त्याच्या, आपल्या व धरणेन्द्राच्या पूर्व-भवांचें वर्णन केलें. त्यामुळें सर्व खुलासा झाला.

या विद्युद्दृढानें आपल्या पुत्राला राज्य दिलें व तप करून स्वर्गांत देवपद प्राप्त करून घेतलें. याच्या वंशांत अनेक राजे झाले. कांहीं कर्मक्षय करून मुक्त झाले. कांहीं स्वर्गास गेले व कांहींनीं अशुभ-कार्यांनीं नरकादि-कुगतींत भ्रमण केलें.

## इक्ष्वाकु वंशांत अजितनाथ तीर्थंकर जन्म

राजा जितशत्रु व राणी विजया यांच्या पोटीं अजितनाथ तीर्थंकर झाले. आदिभगवताप्रमाणें यांचीं पांच कल्याणें झालीं. अजितनाथांच्या धाकट्या भावाचें नांव विजयसमुद्र होतें. विजयसमुद्र व सुमंगला यांच्यापासून सगर चक्रवर्ती जन्मला. श्रेणिकाला सगर चक्रवर्तीचें चरित्र गौतमगणधरांनीं याप्रमाणें सांगितलें.

एकेवेळीं सगरचक्रवर्ती घोड्यावर बसून जात असतां तो घोडा बेफाम धावू लागला व त्यानें अतिशय दूर एका वनांत चक्रवर्तीला नेलें. लगाम खेचून घोड्याला स्थिर करून तो खालीं उतरला. घोडा अतिशय थकल्यामुळें खालीं पडून मरण पावला. नंतर राजा फिरत फिरत एका सरोवराजवळ आला. तेथें अतिशय सुन्दर राजकन्या त्याच्या दृष्टीस पडली. दोघांच्या मनांत प्रेम उत्पन्न झालें. ती राजकन्या आपल्या मैत्रिणी बरोबर घरीं गेली. मैत्रिणींनीं सर्व हकीकत तिच्या भावाला कळविली तेव्हां तिचा भाऊ सरोवराकडे आला. त्यानें आपली सर्व हकीकत कळविली व मोठ्या आनंदानें घरीं नेऊन राजाचा तिच्याशीं विवाह केला. तिचें नांव उत्पलमाला होतें. व तिच्या भावाचें नांव सहस्रलोचन होतें. त्याच्या बापाच्या शत्रूनें-पूर्णधनानें राजकन्येच्या अभिलाषेनें त्याच्या बापाबरोबर-सुलोचना बरोबर युद्ध करून त्याला ठार मारलें होतें, त्यावेळीं सहस्रलोचन आपल्या बहिणीसह या वनांत येऊन राहिला होता.

सगर चक्रवर्तीनें सहस्रलोचनाला विद्याधर—चक्रवर्ती बनविलें व स्वतः अयोध्येंत परत येऊन तो आनन्दानें सुखोपभोग घेत राहिला. इकडे पूर्णघनाबरोबर सहस्रलोचनाचें युद्ध झालें तेव्हां त्याला सहस्रलोचनानें ठार मारिलें. पित्याला ठार मारल्यामुळें त्याचा मुलगा तोयदवाहन पळत सुटला. सहस्रलोचन त्यालाही ठार

मारण्याकरितां पाठीमागें लागला. पळत पळत तोयदवाहन अजितनाथ जिनेश्वरांच्या समवसरणांत आला. थोड्याच वेळानें सहस्रलोचनही तरवार उगारून तेथें येऊन पोहोंचला. परन्तु समवसरणांत आल्याबरोबर भगवन्ताच्या दिव्यातिशयानें त्याच्या हातांतील तरवार व हृदयांतलें वैर गळून पडलें. सगर चक्रवर्तीही समवसरणांत प्रभूचा उपदेश ऐकण्यासाठीं आलेला होता. त्यानें प्रभूला यांच्यांत वैर कां उत्पन्न झालें व सहस्रलोचनावर माझें प्रेम कां आहे असा प्रश्न विचारल्यावर त्यांचें व सगराचें पूर्वभवांचें कथन भगवंतांनीं केलें. तें ऐकून सहस्रलोचन व तोयदवाहनाच्या मनांतलें वैर नाहींसें होऊन ते दोघे मित्र बनले.

प्रभूच्या समवसरणांत त्याचवेळीं भीम नांवाचा राक्षसेंद्र प्रभूचा उपदेश ऐकत होता. तो तोयदवाहनाकडे येऊन व त्याला आलिंगून मी तुझा पूर्वजन्मीं पिता होतो असें म्हणाला व लवणसमुद्रांत जो माझ्या स्वामित्वाचा द्वीप-राक्षसद्वीप आहे तो व तेथें जवळच असलेल्या पाताल लंकेचा मी तुला राजा बनवित आहे असें म्हणून त्यानें त्यांच्यासह त्याला राक्षसी विद्या व तेजस्वी नवहार दिला. तोयदवाहन तेथें जाऊन राज्य करू लागला म्हणून त्याला व त्याच्या वंशांतील राजांना राक्षस हें नांव पडलें व त्या सर्वांना राक्षसवंशी असें जनता म्हणू लागली. असा राक्षस-वंशाचा इतिहास आहे.

तोयदवाहनानें आपल्या पुत्राला-महारक्षाला राज्य दिलें व तप करून तो स्वर्गाला गेला.

सगरचक्रवर्तीला अजितनाथांनीं या अवसर्पिणी कालांत स्वतः नन्तर २२ तीर्थंकर होतील व तुझ्या नंतर दहा चक्रवर्ती होतील असें सांगितलें. तसेंच नऊ नारायण, ९ बलभद्र व नऊ प्रतिनारायण होतील असें सांगितलें.

सगरचक्रवर्तीचे साठ हजार पुत्र एकदा दण्डरत्न घेऊन कैलासाकडे गेले. त्यांनीं त्याच्या सभोंवती अतिशय खोल खन्दक पातालपर्यन्त खणला तेव्हां धरणेन्द्राला फार राग आला. त्यानें डोळे लालबुन्द करून त्यांना पाहिलें. क्रोधाग्नीच्या ज्वाला-समूहानें ते सर्व भस्म झाले. फक्त दोनच पुत्र तेथून परत आले. ही वार्ता राजा सगराला कळल्यावर तो अतिशय दुःखी होईल म्हणून सभेंत सर्व मंत्र्यादिक मंडळी तोंडावर आनन्द दाखवित येऊन बसली. तेव्हां एका वृद्ध विद्वानानें अनित्यतेच्या लीलांचें वर्णन केलें. सभेंत आपले दोनच पुत्र पाहून राजानें आपले सर्व पुत्र मरण

पावले असें ओळखलें व तो आपलें दुःख कष्टानें आवरून विरक्त झाला. त्यानें आपलें राज्य आपल्या नातवाला-भगीरथाला दिलें व भीमरथ पुत्रासह अजितनाथाजवळ दीक्षा घेतली. तपश्चरण करून तो मोक्षाला गेला.

एकेवेळीं श्रुतसागर मुनीश्वरांना भगीरथानें आपल्या साठ हजार चुलत्यांचें एकदम मरण कसें झालें असा प्रश्न विचारिला तेव्हां त्यांनीं याप्रमाणें सांगितलें:— " एका गावाच्या बाहेर सम्मेदशिखराची यात्रा करण्यासाठीं निघालेला फार मोठा संघ उतरला होता. त्यावेळीं गावांतील सर्व लोकांनीं त्याची निंदा केली. पण एका कुंभारानें त्या संघाची स्तुति करून निंदा करणाऱ्या लोकांचा निषेध केला. यानंतर एकदा या गावांतील एका निर्वासितानें मोठी चोरी केली तेव्हां राजा अतिशय रागावला. त्यानें तो सगळा गांव पेटविला व ते सर्व लोक जळून मेले. पण कुंभार त्यावेळीं कांहीं कामामुळें परगांवीं गेल्यामुळें तो वाचला. कांहीं कालानें तो मरण पावून व्यापारी झाला व ते निन्दक लोक कवड्या होऊन जन्मले. तो व्यापारी मरून राजा झाला. त्यानें दीक्षा घेतली. तप करून देव झाला व तेथील सुखानुभव घेऊन तूं सगराचा नातू झालास. ते कवड्या झालेले जीव दीर्घकाळ संसारांत फिरून एका जन्मांत कांहीं पुण्य करून मरण पावले व सगर राजाचे पुत्र होऊन जन्मले. संघाची निंदा केल्यामुळें त्या गावांतील लोकांना असें मरण प्राप्त झालें व तूं त्याची स्तुति केल्यामुळें धरणेन्द्राच्या कोपापासून बचावलास. " ही सर्व हकीकत ऐकून भगीरथाला वैराग्य झालें व तो दीक्षा घेऊन तपानें स्वर्गांत देव झाला.

तोयदवाहनानन्तर महारक्षस् राज्य करू लागला. एकेवेळीं तो जलक्रीडा करण्यासाठीं आपल्या अन्तःपुरासह सरोवराकडे गेला. संध्याकाळपर्यन्त त्यानें जलक्रीडा केली. संध्याकाळीं सरोवरांतील कमळें मिटलीं, त्यावेळीं एक भुंगा कमलाच्या सुवासाला लुब्ध होऊन त्यांत अडकून मरण पावला. राजानें तें कमल हुंगण्यासाठीं हातांत घेतलें व त्याच्या पाकळ्या उकलतेवेळीं त्याला त्यांत मृतभुंगा दिसला. नाक व जीभ यांच्या वश होऊन हा भुंगा मरण पावला. आम्हीही स्त्रीमुखकमलावर लुब्ध झालों आमचीही अशीच दुर्दशा होईल असा विचार करीत असतां राजाला श्रुतसागर नामक महामुनि आपल्या संघासह उद्यानांत आले आहेत असें समजलें.

राजानें तेथें जाऊन श्रुतसागर मुनींना व इतर मुनींना वन्दन केलें व धर्माचा प्रश्न केला. " अहिंसा हा धर्म आहे व सत्य अचौर्यादिक त्याचाच परिवार आहे असें सांगून इन्द्रियलंपटता सोडावी; सदाचारांचें पालन करावें; स्वजीविताप्रमाणें इतरांचेंहि

जीवित त्यांना प्रिय असतें असें समजून क्रूरता त्यागावी; स्वेच्छाचारानें वागून मनुष्य जन्म व्यर्थ घालवू नये." इत्यादिक धर्मोपदेश ऐकल्यावर राजानें आपल्या पूर्व-जन्माविषयीं प्रश्न विचारला— मुनिराज म्हणाले, " राजन् तूं पूर्वभवांत 'प्रीत' या नांवाचा मनुष्य होतास. एकदा सुवर्णरथ राजानें जिनमंदिरांत भक्तीनें मोठी जिनपूजा केली. त्यावेळीं भक्तांचे जयजय शब्द तुझ्या कानीं पडले. तुला मोठा आनंद वाटला. तूंही सारखे जयजय असे शब्द बोलूं लागलास. त्यामुळें तुझें प्रीत हें नांव सार्थक झालें. कालान्तरानें मरण पाऊन तूं पुण्योदयानें यक्ष झालास. त्यावेळींही तूं महामुनींना होणारा उपद्रव धर्मप्रेमानें दूर केलास. आयुष्य संपल्यावर तूं उदित नामक विद्याधर झालास. एका सुरविक्रम नामक विद्याधराचें ऐश्वर्य पाहून असलें वैभव मिळावें म्हणून तूं तप केलेंस. मरण पावून ऐशानस्वर्गी तूं महर्द्धिक देव झालास. तेथून च्युत होऊन तूं महारक्षस् नामक विद्याधर राजा झाला आहेस. आतां तुझें आठ दिवसांचें आयुष्य उरलें आहे." असें सांगितल्यावर राजानें देवरक्ष नामक वडिल पुत्राला राज्य दिलें. सूर्यरक्ष नामक धाकट्या मुलाला युवराजपद दिलें व जिनमंदिरांत महाभिषेकपूर्वक पूजन करून त्यानें चार प्रकारच्या आहाराचा त्याग केला व स्वस्वरूपाचें चिन्तन करीत त्यानें प्राणत्याग केला व स्वर्गांत तो देव झाला. यानंतर याच्या वंशांत असंख्य राजे होऊन गेले. श्रेयांसतीर्थंकराच्या वेळीं याच्या वंशांत 'कीर्तिधवल' नामक राजा होऊन गेला. त्याची कथा सहाव्या पर्वांत पाहावी.

---

पावले असें ओळखलें व तो आपलें दुःख कष्टानें आवरून विरक्त झाला. त्यानें आपलें राज्य आपल्या नातवाला-भगीरथाला दिलें व भीमरथ पुत्रासह अजितनाथाजवळ दीक्षा घेतली. तपश्चरण करून तो मोक्षाला गेला.

एकेवेळीं श्रुतसागर मुनीश्वरांना भगीरथानें आपल्या साठ हजार चुलत्यांचें एकदम मरण कसें झालें असा प्रश्न विचारिला तेव्हां त्यांनीं याप्रमाणें सांगितलें:— " एका गावाच्या बाहेर सम्मेदशिखराची यात्रा करण्यासाठीं निघालेला फार मोठा संघ उतरला होता. त्यावेळीं गावांतील सर्व लोकांनीं त्याची निंदा केली. पण एका कुंभारानें त्या संघाची स्तुति करून निंदा करणाऱ्या लोकांचा निषेध केला. यानंतर एकदा या गावांतील एका निर्वाखितानें मोठी चोरी केली तेव्हां राजा अतिशय रागावला. त्यानें तो सगळा गांव पेटविला व ते सर्व लोक जळून मेले. पण कुंभार त्यावेळीं कांहीं कामामुळें परगांवीं गेल्यामुळें तो वाचला. कांहीं कालानें तो मरण पावून व्यापारी झाला व ते निन्दक लोक कवड्या होऊन जन्मले. तो व्यापारी मरून राजा झाला. त्यानें दीक्षा घेतली. तप करून देव झाला व तेथील सुखानुभव घेऊन तूं सगराचा नातू झालास. ते कवड्या झालेले जीव दीर्घकाळ संसारांत फिरून एका जन्मांत कांहीं पुण्य करून मरण पावले व सगर राजाचे पुत्र होऊन जन्मले. संघाची निंदा केल्यामुळें त्या गावांतील लोकांना असें मरण प्राप्त झालें व तूं त्याची स्तुति केल्यामुळें धरणेन्द्राच्या कोपापासून बचावलास." ही सर्व हकीकत ऐकून भगीरथाला वैराग्य झालें व तो दीक्षा घेऊन तपानें स्वर्गांत देव झाला.

तोयदवाहनानन्तर महारक्षस् राज्य करू लागला. एकेवेळीं तो जलक्रीडा करण्यासाठीं आपल्या अन्तःपुरासह सरोवराकडे गेला. संध्याकाळपर्यन्त त्यानें जलक्रीडा केली. संध्याकाळीं सरोवरांतील कमळें मिटलीं, त्यावेळीं एक भुंगा कमलाच्या सुवासाला लुब्ध होऊन त्यांत अडकून मरण पावला. राजानें तें कमल हुंगण्यासाठीं हातांत घेतलें व त्याच्या पाकळ्या उकलतेवेळीं त्याला त्यांत मृतभुंगा दिसला. नाक व जीभ यांच्या वश होऊन हा भुंगा मरण पावला. आम्हीही स्त्रीमुखकमलावर लुब्ध झालों आमचीही अशीच दुर्दशा होईल असा विचार करीत असतां राजाला श्रुतसागर नामक महामुनि आपल्या संघासह उद्यानांत आले आहेत असें समजलें.

राजानें तेथें जाऊन श्रुतसागर मुनींना व इतर मुनींना वन्दन केलें व धर्माचा प्रश्न केला. " अहिंसा हा धर्म आहे व सत्य अचौर्यादिक त्याचाच परिवार आहे असें सांगून इन्द्रियलंपटता सोडावी; सदाचारांचें पालन करावें; स्वजीविताप्रमाणें इतरांचेंहि

जीवित त्यांना प्रिय असतें असें समजून क्रूरता त्यागावी; स्वेच्छाचारानें वागून मनुष्य जन्म व्यर्थ घालवू नये." इत्यादिक धर्मोपदेश ऐकल्यावर राजानें आपल्या पूर्वजन्माविषयीं प्रश्न विचारला— मुनिराज म्हणाले, "राजन् तूं पूर्वभवांत 'प्रीत' या नांवाचा मनुष्य होतास. एकदा सुवर्णरथ राजानें जिनमंदिरांत भक्तीनें मोठी जिनपूजा केली. त्यावेळीं भक्तांचे जयजय शब्द तुझ्या कानीं पडले. तुला मोठा आनंद वाटला. तूंही सारखे जयजय असे शब्द बोलूं लागलास. त्यामुळे तुझें प्रीत हें नांव सार्थक झालें. कालान्तरानें मरण पाऊन तूं पुण्योदयानें यक्ष झालास. त्यावेळींही तूं महामुनींना होणारा उपद्रव धर्मप्रेमानें दूर केलास. आयुष्य संपल्यावर तूं उदित नामक विद्याधर झालास. एका सुरविक्रम नामक विद्याधराचें ऐश्वर्य पाहून असलें वैभव मिळावें म्हणून तूं तप केलेंस. मरण पावून ऐशानस्वर्गी तूं महर्द्धिक देव झालास. तेथून च्युत होऊन तूं महारक्षस् नामक विद्याधर राजा झाला आहेस. आतां तुझें आठ दिवसांचें आयुष्य उरलें आहे." असें सांगितल्यावर राजानें देवरक्ष नामक वडिल पुत्राला राज्य दिलें. सूर्यरक्ष नामक धाकट्या मुलाला युवराजपद दिलें व जिनमंदिरांत महाभिषेकपूर्वक पूजन करून त्यानें चार प्रकारच्या आहाराचा त्याग केला व स्वस्वरूपाचें चिन्तन करीत त्यानें प्राणत्याग केला व स्वर्गांत तो देव झाला. यानंतर याच्या वंशांत असंख्य राजे होऊन गेले. श्रेयांसतीर्थकराच्या वेळीं याच्या वंशांत 'कीर्तिधवल' नामक राजा होऊन गेला. त्याची कथा सहाव्या पर्वांत पाहावी.

# पांचवें पर्व

## आर्या

( सूर्यादिवंश–वर्णन )

आहेत भारतीं या श्रेणिक राजन् प्रसिद्धसे चार ।
विस्तार पावलेले वंश तयांचे प्रभेद अवधार[1] ॥ १ ॥
इक्ष्वाकुवंश पहिला सज्जनभूषण महोन्नति प्राप्त ।
दुसरा शशिकर-निर्मल शशिवंश तयास बोलती आप्त ॥ २ ॥
तिसरा वंश मनोहर विद्याधरवंश त्या असे नाम ।
चौथा हरिवंश असे हे सगळे कीर्तिचे महाधाम[2] ॥ ३ ॥

( सूर्यवंश–कथन )

भरतास पुत्र झाला त्याचें आदित्ययश[3] सुनाम असे ।
सितयश पुत्र तयाला बलाक सुत ज्यांत सकल सुगुण वसे ॥ ४ ॥
त्याला सुबल जहाला, सुबला झाला महाबलाख्य सुत ।
अतिबल पुत्र तयाचा त्याला अमृताख्य पुत्र विख्यात ॥ ५ ॥
नन्तर सुभद्र, सागर, भद्र नि रवितेज जाहला चन्द्र ।
त्यास प्रभूततेजा कीर्ति जयाची जगांत बहु सान्द्र[4] ॥ ६ ॥
नन्तर नृप तेजस्वी तपन नि त्याचा प्रतापवान् पुत्र ।
अतिवीर्य त्यास झाला सुवीर्य ज्याचें सदा सितच्छत्र[5] ॥ ७ ॥
झाला उदितपराक्रम नन्तर झाला महेन्द्रविक्रम तो ।
सूर्य नि इन्द्रद्युम्न नि ज्याची सुरसंघ[6] कीर्ति नित गातो ॥ ८ ॥
प्रभु विभु नि अरिध्वंस नि तयास सुत वीतभीति नांवाचा ।
झाला वृषभध्वज त्या ज्याची अमृतास जिंकिते वाचा ॥ ९ ॥
गरुडाङ्कपुत्र त्याचा त्यापासुनि जन्मला मृगाङ्क नृप ।
या परि अनेक झाले नृपाल सगळे प्रसिद्ध गुणकूप ॥ १० ॥
हे सर्व भूप पुत्रा सुराज्य देऊन विरत देहांत ।
झाले दीक्षा घेउनि कर्मा नाशून मुक्तिचे कान्त[7] ॥ ११ ॥

---

१ लक्ष्यांत घे.   २ महागृह.   ३ अर्ककीर्ति.   ४ दाट.   ५ पांढरें छत्र.
६ देवसमूह.   ७ पति.

( सोमवंश-कथन )

आदित्यवंश यापरि कथिला आतां तुला नृपा कथितों ।
मी सोमवंश इन्द्रहि ज्याची स्वर्गांत कीर्ति सितें गातो ॥ १२ ॥
ऋषभ-जिनाला झाला बाहुबली पुत्र त्यास सोमयश ।
त्याला बली महाबल ज्यानें केले अनेक शत्रु वश ॥ १३ ॥
सुबल तयाला झाला तयास भुजबलि असे अनेक नृप ।
शशिवंशांत जहाले ज्यांचीं चरितें अतीव निष्पाप ॥ १४ ॥
दीक्षा घेउनि त्यांनीं केला कर्मान्त जाहले कान्त ।
मुक्तीश्रीचे सन्तत कीर्ति जयांची फिरे अविश्रान्त ॥ १५ ॥
अवशिष्ट कर्म ज्यांचें नृप ते स्वर्गांत सौख्य भोगून ।
आसन्न-भव्य होउनि मुक्तीचे जाहले पुनः रमण ॥ १६ ॥

( विद्याधर-वंश-कथन )

हा सोमवंश कथिला आतां पृथ्वीपते ! तुला कथितों ।
खेचरवंशीं जयामधिं बहुविध विद्याविलास शुभ दिसतो ॥ १७ ॥
विद्याधरेन्द्र नमिसुत मणिमाली हास्य ज्याचिया गालीं ।
त्याला मणिवज्राभिध सुत त्या मणिरथ अरीस हाकाली ॥ १८ ॥
मणिचित्र त्यास झाला झाला त्यालाहि चन्द्ररथ तनय ।
त्यापासुनि जन्मे सुत पविहय दिसतो जयांत नय-विनय ॥ १९ ॥
श्रीवज्रसेन त्याचा सुत त्यापासून वज्रदंष्ट्र सुत ।
त्याला वज्रध्वज त्या झाला वज्रायुधाख्य शौर्यरत ॥ २० ॥
या नंतर या वंशीं वज्र सुवज्राख्य वज्रभृन्नामा ।
वज्राभ वज्रबाहु नि वज्राङ्क नि वज्रसंज्ञ गुणधामा ॥ २१ ॥
वज्रास्य, वज्रपाणि नि पविजानु नि वज्रवान् तया झाला ।
विद्युन्मुख त्या झाला सुवक्त्र सुत धरि सदैव गुणमाला ॥ २२ ॥
विद्युद्दंष्ट्र तयाचा सुत विद्युद्वान् तयासही पुत्र ।
विद्युद्दाम जहाला निजप्रजासंकटांतपीं छत्र ॥ २३ ॥
विद्युद्दामाचा सुत विद्युद्वेगाख्य त्याहि पुत्र असे ।
वैद्युत ज्याच्या ठायीं गुणराशि वसे नि तो तयें विलसे ॥ २४ ॥

---

१ पांढरी. २ कांहीं जन्मांनीं मोक्ष प्राप्त करून घेण्यास योग्य. ३ पति.

१ विद्याधरवंश २ वज्राभ नामक राजा. ३ व्रजजंघ राजा. ४ संकटरूपी उन्हांत.

या परि विद्याधरपति अनेक अतिशूर धीर नृप झाले ।
गेले ते स्वाचारें स्वर्गी मोक्षा स्वसद्गुणीं रमले ॥ २५ ॥
कित्येक कर्मपाशें होउनि दुर्बुद्धि वागुरीं हरिण ।
पडती तेसे पडले घडलें त्यांचें सदा भवीं भ्रमण ॥ २६ ॥

जाति– चन्द्रकान्त [ सञ्जयन्त-भवकथा ]

विद्यावलमद ज्याचा उन्नत विक्रम अरिमारी ।
नामें विद्युद्दृढ खल झाला खेचर अविचारी ॥ २७ ॥
एके समयीं क्षेत्र-विदेहीं गेला गगनांत ।
पाही तेथुनि महामुनीला निजयोगीं निरत ॥ २८ ॥
उचलुनि आणुनि 'पञ्चशैल' या स्थापी गिरिवरती ।
मारायाला वदुनि खेचरां प्रेरी दुष्टमति ॥ २९ ॥
दगड लांकडें घेउनि फेकिति करिती तनु विद्ध ।
समचित्तानें सोसुनि झाला योगीश्वर वुद्ध ॥ ३० ॥
सञ्जयन्त हें नाम तयाचें केवल-विज्ञानी ।
झाला विद्युद्दृढास धरणें केलें वद्ध रणीं ॥ ३१ ॥
विद्या हरिल्या संजयन्तपदिं झाला अतिशान्त ।
जोडुनि वन्दन करयुग करि तो विद्यांचा कान्त ॥ ३२ ॥
महातपानें तुझ्या खला ! कुलिं विद्यालाभ घडे ।
सिद्धि हि होउनि दुष्कार्यानें विनाश पदरिं पडे ॥ ३३ ॥
अर्हद्बिम्बें सहित चैत्य जें जातां त्यावरुन ।
महासाधुवरि जातां विद्या होतिल त्या छिन्न ॥ ३४ ॥
धरणेन्द्रानें विचारिलें भो तुम्हां पीडा जी ।
तडिद्दृढानें किमर्थ केली आहे वहु पाजी ॥ ३५ ॥
सञ्जयन्त मुनि वदले फिरलों या मी कुगतींत ।
'शकट' नामक ग्रामीं झालों 'हितंकर' सुहितिं रत ॥ ३६ ॥
व्यापारी मी मुनिवर सेवा-तत्पर-मनिं शान्त ।
मरण पावलों श्रीवर्धन नृप झालों रतिकान्त ॥ ३७ ॥

---

१ जाळ्यांत. २ शरीर. ३ सर्वज्ञ. ४ पति–स्वामी. ५ जिनमन्दिर. ६ नष्ट. ७ या नांवाचा. ८ रतिराणीचा पति.

कुमुदावतिचा तिथेंच राहत होता द्विज एक ।
कुत्सित सेवुनि तप तो झाला कुदेव गतशोक ॥ ३८ ॥
आयु संपतां तेथून च्युत होउनि वह्निशिख[1] ।
होय पुरोहित रौद्रकार्य करि जें प्रसवें दुःख ॥ ३९ ॥
नियमदत्त या वैश्याचें धन लपवुनि तो ठेवी ।
राणी जिंकीं द्यूतिं मुद्रिका[2] हरून त्या घेई ॥ ४० ॥
दिली पाठवुनि दासी दाखवि त्याच्या पत्नीस ।
खूण मुद्रिका दिलीं तियेनें रत्नें मग तीसें[3] ॥ ४१ ॥
नृपें रत्नगण देवुनि वैश्या आनन्दित केलें ।
पुरोहिताला करि निर्वासित चाखवि नृप कुफलें ॥ ४२ ॥
दीन पुरोहित कुतप आचरुनि चौथ्या स्वर्गांत ।
अमर[4] जाहला भोगी सौख्यें ऐके सङ्गीत ॥ ४३ ॥
आयुष्यान्तीं मरून विद्युद्दृढ खेचर झाला ।
घोर उपद्रव तेथें करविला गणित नसे ज्याला ॥ ४४ ॥
श्रीवर्धन तप करुन स्वर्गीं स्वर्गीं सुख भोगी ।
च्युत तो होउनि संजयन्त नृप झाला सुखयोगी[5] ॥ ४५ ॥
वैराग्यानें मुनि मीं झालों मजला पाहून ।
पूर्वभवाच्या वैरें त्याचें बनलें क्रुद्ध मन ॥ ४६ ॥
अशुभ कर्मवश होउनि केला महोपसर्ग तयें ।
वृत्त असें हें ऐक धरेन्द्रा ! विचारिलें विनयें ॥ ४७ ॥
नियमदत्त जो तप आचरणें[6] नागकुमारांचा ।
झाला स्वामी स्नेह जयाचा माझ्यावरि साचा ॥ ४८ ॥
यापरि कथिलें मुनीश्वरानें सुचरित जें अपुलें ।
ऐकुनि विद्युद्दृढें खगानें वैर तदा त्यजिलें ॥ ४९ ॥
तडिद्रथाला दृढरथ झाला सुत देउनि त्याला[7] ।
राज्य करी तो तपो-व्रतांनीं सुरलोकीं गेला ॥ ५० ॥
पुत्र जाहला दृढस्यन्दना नामें ह्यधर्म ।
त्याला झाला ह्यायु भोगिति समस्त हे शर्म[8] ॥ ५१ ॥

---

१ या नांवाचा. २ आंगठी. ३ दासीला. ४ देव. ५ सुखानें युक्त.
६ तप करून. ७ दृढरथ राजाला. ८ सुख.

अश्वायूला अश्वध्वज सुत पद्मासुनाभ तया ।
पद्ममालिसुत तया पद्मरथ धरि जो विनय-नया ॥ ५२ ॥
यापरि झाले असङ्ख्य भूपति विद्याधरवंशीं ।
निजतनयांना सुराज्य देउनि वहु झाले स्ववशी ॥ ५३ ॥
करून कांहीं कर्मप्रक्षय गेले मुक्तिपुरा ।
शुभपरिणामें कांहीं स्वर्गी सोडुनि राज्य-धुरा ॥ ५४ ॥
आदिजिनाचें कृतयुग जातां लोटे बहुकाल ।
हीन-भाव बहुलोकीं[1] प्रगटे अनीतिचें मूल ॥ ५५ ॥
कामार्थामधिं जनरति वाढे अधर्म वाढून ।
परलोकाची क्रिया जहाली शिथिल वहु न्यून ॥ ५६ ॥
होउनि गेले वृषभ-जिनाच्या वंशीं नृप बहुत ।
झाला धरणीधर नांवाचा नृपाल विख्यात ॥ ५७ ॥
साकेतापुरिं पुत्र तयाचा त्रिदशञ्जय झाला ।
चन्द्रकला ही प्राणाहुनि हि प्रिया असे त्याला ॥ ५८ ॥
या उभयांना तनय जाहला जितारि नांवाचा ।
मधुर नि आज्ञाकारी ज्याची असे सदा वाचा ॥ ५९ ॥
पोदननगरीं आनन्दाभिध भूपति राज्य करी ।
राणी त्याची नीरजमाला[2] रतिरूपास धरी ॥ ६० ॥
या उभयांना कन्या झाली विजया नाम जिचें ।
सार्थक करि जी निजसुगुणांनीं निजनामा साचें ॥ ६१ ॥
त्रिदशंजय नृप जितशत्रूला स्वराज्य देऊन ।
दीक्षा घेउनि कैलासावरि पावे निर्वाण ॥ ६२ ॥

( अजित–जिनकथा )

श्री-जितशत्रु नि विजयाराणी यांना अजितजिन ।
पुत्र जाहले अभिषेकादिक करिती गीर्वाण[3] ॥ ६३ ॥
प्रभुजन्मानें जनकें सगळे अरिगण जिंकियले ।
जिनेश्वराचें अजित नाम हें सार्थक तैं झालें ॥ ६४ ॥
नयनानन्दादिक नांवाच्या भार्या अजित जिना ।
शचिहूनि[4] सुन्दर हरिति तयाच्या सन्तत नेत्रमनां ॥ ६५ ॥

---

१ लोकांची आसक्ति. २ कमलमाला. ३ देव. ४ इन्द्राणीहून.

एके दिवशीं रम्योद्यानीं गेले अजित जिन ।
प्रफुल्ल दिवसां त्यांना दिसलें सुन्दर कमलवन ॥ ६६ ॥
मिटत चाललें परि सूर्यास्ता समयीं पाहून ।
विरक्त त्यांचें वैभव मानुनि अनित्य होय मन ॥ ६७ ॥
जननी जनकां तेवि बान्धवा नाथ विचारून ।
दीक्षित झाले बाह्याभ्यन्तर-संङ्गा[1] त्यागून ॥ ६८ ॥
राज्य नि बन्धु नि परिग्रहांना त्यागुनि नृपतिगण ।
दीक्षित झाले सहस्रदश जे इच्छिति कल्याण ॥ ६९ ॥
उपवासद्वय समाप्त होतां आहारार्थ निघे ।
अजित-तीर्थंकर दिवसां सन्तत जीवगणास बघे ॥ ७० ॥
ब्रह्मदत्त नृपसदनीं केला प्रवेश जिनदेवें ।
दिलें तयांना भोजन तेणें प्रसन्नशा भावें ॥ ७१ ॥
चौदा वर्षें छद्मस्थ[2] प्रभु अनेक देशांत ।
विहरण करिती समाप्त झाला केवल-विद्योत[3] ॥ ७२ ॥
प्राप्त जाहलें अर्हत्पद त्या विश्वें जें पूज्य ।
जयास वदती सर्वज्ञाचें अपूर्व साम्राज्य ॥ ७३ ॥
प्राप्त जाहले अतिशयें[4] चौतिस तेव्हां अजित जिना ।
अशोक-वृक्षाद्यष्टक[5] देई प्रमोद भव्यमनां ॥ ७४ ॥

---

१ क्षेत्र– शेत, घरें, सोनें, चांदी, गाई-म्हशी आदिक पशु. दास-दासी. नानाप्रकारचीं वस्त्रें व भांडीं हा दहा प्रकारचा बाह्य परिग्रह व अभ्यन्तर १४ परिग्रह– क्रोध, मान, माया, लोभ, हास्य, रति, अरति, शोक, भय, जुगुप्सा, (आपले दोष झांकणें व इतरांचे कुलशीलादिदोष उघड करणें) स्त्रीवेद, पुरुषवेद, नपुंसकवेद व मिथ्यात्व हे चौदा परिग्रह यांना संग म्हणतात. २ केवलज्ञान होण्यापूर्वींच्या अवस्थेला छद्मस्थ म्हणतात. ३ केवलज्ञान-सर्वज्ञता. ४ तीर्थंकरांचे दहा जन्मातिशय, देवकृत चौदा अतिशय व केवलज्ञानाचे दहा अतिशय असे प्रभूचे जे अलौकिक विशेष त्यांना अतिशय म्हणतात. ५ अशोकवृक्ष, कल्पतरूंच्या पुष्पांची वृष्टि, दिव्यध्वनि, चौसष्ट चामरें, रत्नजडित अत्युच्च सिंहासन, भामण्डल-सूर्यचन्द्रापेक्षाही उत्कृष्ट शरीरकान्ति, देवनगारे वाजणें व अत्यंत तेजस्वी तीन छत्रें. हीं आठ महाप्रातिहार्यें म्हणजे अपूर्व ऐश्वर्यविशेष.

नव्वद गणधर जिनेश्वराची सेवा करितात ।
साधु लक्ष जे प्रकाश रविसम देहीं धरितात ॥ ७५ ॥

( सगरचक्रि–कथा )

बन्धु धाकटा अजित जिनाचा विजयार्णव-नामा ।
सुमङ्गला ही पत्नी त्याची होती गुणसीमा ॥ ७६ ॥
पुत्र जाहला या उभयांना सगर-सुनामाचा ।
दुसरा होता चक्रेश्वरगणि जो शुभकर्माचा ॥ ७७ ॥
नवनिधि झाले प्राप्त जयाला इच्छित फल देती ।
अखण्ड वैभव त्याचें वर्णन कवि नच करूं शकती ॥ ७८ ॥
वदले गणधर गौतम भूपा हे श्रेणिक ऐक ।
सगर-चरित जें श्रवण कराया वाटे बहु कुतुक ॥ ७९ ॥
जम्बूद्वीपीं भरतक्षेत्रीं भूषण भूमीचें ।
नगर अयोध्या सदन असे जें सन्तत लक्ष्मीचें ॥ ८० ॥
जो इक्ष्वाकु प्रसिद्ध नामें ऐशा वंशांत ।
जन्मुनि झाला महाविक्रमी अरिगण करि शान्त ॥ ८१ ॥
नान्दे येथें सगर-चक्रपति समस्त भूपाल ।
ज्याच्या पदयुगिं सदा घासिती विशाल निजभाल[1] ॥ ८२ ॥
निजप्रजेच्या हरि सन्तापा छत्रासम भूप ।
लज्जित होतें करीत ज्याचें मदना वपुरूप[2] ॥ ८३ ॥
एके दिनिं तो खल अश्वावर होउनि आरूढ ।
निघे जयावरि नृपाललक्ष्मी प्रीति करी गाढ ॥ ८४ ॥
अश्वरूप जणु धावे राक्षस थाम्बेना लवही ।
देश नद्या वन पर्वत लंघुनि दूर नृपा नेई ॥ ८५ ॥
हिंस्रश्वापद[3] फिरती जेथें ऐशा भयद वनीं ।
अश्वें नेलें परि नृपपूजित निर्भय सगर मनीं ॥ ८६ ॥
क्रोधें त्यानें लगाम खेचुनि निश्चल हय[4] केला ।
उडी मारुनी उतरे भूवरि मनिं हर्षित झाला ॥ ८७ ॥

---

१ कपाळ.　२ शरीर सौंदर्य.　३ हिंसक सिंह, वाघ आदिक.　४ घोडा.

श्रमलेला हय पडला भूवरि पुनः न तो उठला ।
षट्खण्डाधिप पदप्रवासी क्रमता पथ[1] झाला ॥ ८८ ॥
महासरोवर असतां मार्गी चालत तो पाही ।
जणू चान्दणें खालीं वरती व्यापि दिशा दाही ॥ ८९ ॥
श्रम हरण्यास्तव वन्यकरी[2]सम करी प्रवेश जलीं ।
स्नानें त्याच्या मना नि देहा प्रसन्नता आली ॥ ९० ॥
गोड सुवासिक शीतल निर्मल नीरें[3] प्राशून ।
सरोवराच्या कांठीं बसला नृपाल मोदून ॥ ९१ ॥

( राजकन्येला पाहून सगर मोहित होतो )

प्रफुल्ल कमला समान होतें सुन्दर वदनें[4] जिचें ।
नीलाब्जा[5]सम विशाल नयनें हरि मन भूपाचें ॥ ९२ ॥
हस्तपादयुग विकसित तांबुस कमला लाजविती ।
चक्रवाकसम पुष्टस्तनयुग शोभा वाढविती ॥ ९३ ॥
जणु जलदेवी सरोवराची ऐशा युवतीस ।
पुढें आपुल्या पाहुनि नृपवर करी विचारास ॥ ९४ ॥
सुराङ्गना ही किंवा लक्ष्मी वा रति कामाची ।
अपूर्व शोभा लावण्याची दिसे हिच्या साची ॥ ९५ ॥
हिच्या दर्शनें सुधावृष्टि जणु देहीं मम झाली ।
नसेल पूर्वी नारी ऐशी विधिनें रचिलेली ॥ ९६ ॥
कमलयुगासम नयनयुगानें तिजला पाहून ।
सगर-नृपाचें तत्क्षणिं झालें कामें विद्ध मन ॥ ९७ ॥
कामें पीडित राजसुतेचें झालें खिन्न मन ।
कमला सम जें प्रफुल्ल वदनहि तत्क्षणिं हो म्लान ॥ ९८ ॥
धरुनि सखीकर कष्टें गेली युवती ती सदनीं ।
कामाग्नीनें होउनि विह्वल पडली मृदुशयनीं ॥ ९९ ॥

( कंचुकी सगराला कन्यावृत्त सांगतो )

सगर सरोवर-तीरावरती चाले खिन्नमनें ।
येई तेथें त्वरें कञ्चुकी बोले नम्रपणें ॥ १०० ॥

---

१ मार्ग-रस्ता. २ रानटी हत्ती सारखा. ३ पाणी. ४ तोण्ड. ५ निळ्या कमळासारखे.

येथें भरतक्षेत्रीं स्वामिन् रजतगिरीवरती[1] ।
गगनवल्लभा सुन्दर नगरी स्वर्गा हसते ती ॥ १०१ ॥
भूप सुलोचन विद्याधरपति तेथें राज्य करी ।
अलका-नगरी-समान शोभे तेणें ती नगरी ॥ १०२ ॥
भूपा आहे सहस्र-लोचन नामें सुत विनयी ।
उत्पलमाला सुता स्वरूपें विश्वस्त्री-विजयी[2] ॥ १०३ ॥
चक्रेशाची मनःस्वामिनी होइल कन्या ही ।
हिला पाहतां हृदय तयाचें बहु होइल मोही[3] ॥ १०४ ॥
जन्मतांच ही यापरि कथिलें नैमित्तिक-विबुधें ।
यथार्थ झालें वचन तयाचें पराक्रमैक-निधे ! ॥ १०५ ॥
आतां कथितों वृत्त पूर्व जें स्वामिन् ऐकावें ।
हिच्या पित्याचें, हृदय दयेनें ओलें झणि व्हावें ॥ १०६ ॥
सर्वस्त्रीगणिं शिरोरत्न जणु अशी तुझी तनया ।
देइ सुलोचन खगेश्वरा, मज करीन तिज जाया ॥ १०७ ॥
रथनूपुरपति पूर्णघनानें केली बहु-वार ।
विनन्ति निष्फल होतां कोपें त्यावरि अनिवार ॥ १०८ ॥
हरण कराया हठें जाहला प्रवृत्त पूर्णघन[4] ।
करुनि गर्जना घनांप्रमाणें[5] करि कोपें कंदन[6] ॥ १०९ ॥
सुलोचनाला पराक्रमानें लढून तो मारी ।
झाला उद्यत हरावयाला स्त्रीरत्ना वैरी ॥ ११० ॥
निजभगिनीला घेउनि गेला सहस्रनयन वनीं ।
तिथेंच राही सुलोचनात्मज[7] सुगुप्त दिनरजनीं ॥ १११ ॥
स्वमैत्रिणीसह येथें क्रीडा करण्यास्तव आली ।
तुम्हां बघतां कामशरांनीं विद्ध सती झाली ॥ ११२ ॥
तीव्र उन्हानें पीडित जणु ती घामेजुनि गेली ।
पुतळीसम ती तुम्हां पाहुनि निश्चल बहु झाली ॥ ११३ ॥
वाणी गद्गद निघे मुखांतुनि डवडवती नयन ।
शोकानें जणु गळुनि आसवें म्लान बने वदन ॥ ११४ ॥

---

१ विजयार्ध पर्वतावर. २ सर्व जगांतील स्त्रियांना जिंकणारी. ३ अतिशय अनुरक्त. ४ या नांवाचा विद्याधर राजा. ५ मेघांप्रमाणें. ६ युद्ध. ७ सुलोचनाचा मुलगा.

यापरि बोलत वृद्ध कञ्चुकी असतां त्या स्थानीं ।
सुलोचनात्मज नमुनि चक्रिपद बोले मधुवचनीं ॥ ११५ ॥

( उत्पलमालेबरोबर सगरचक्रीचा विवाह )

स्वामिन् ! आपण येउनि अमुच्या सदनीं आम्हांस ।
धन्य करावें कर करिं घेउनि उत्पलमालेस ॥ ११६ ॥
बोलुनि ऐसें तयें तयाला निजसदनीं नेलें ।
सहस्रनयनें उत्पलमालादानें तोषविलें ॥ ११७ ॥

( चक्रवर्ती सहस्रनयनाला दोन्ही श्रेणींचें स्वामित्व देतो. )

सहस्रनयन नि चक्री आले वसुनि विमानांत ।
विजयार्धावरि गगनवल्लभा नामक नगरींत ॥ ११८ ॥
सहस्रनयना राज्य पित्याचें देउनि चक्रीनें ।
उभयश्रेणी-विद्याधरपति केलें हर्षानें ॥ ११९ ॥
स्त्रीरत्नासह तेथुनि चक्री प्रमुदित[1] होऊन ।
साकेतापुरिं आला ज्यातें नमिती नृपतिगण ॥ १२० ॥
साम्राज्यश्रीलताफलें जणु दशाङ्ग[2]भोगांनीं ।
स्वतःस सुखवी चक्री बहुविध तेवि विनोदांनीं ॥ १२१ ॥

( युद्धांत सहस्रनयन पूर्णघनाचा नाश करतो )

अजित जिनेश्वर एके समयीं साकेतोद्यानीं ।
आले त्यांची दिव्यदेशना प्रगटे आस्थांनीं[3] ॥ १२२ ॥
आले सगळे इन्द्रादिक सुर सगरादिक भूप ।
वसले उचितस्थानीं ज्यांचीं हृदयें निष्पाप ॥ १२३ ॥
पूर्णघनानें समरीं माझ्या जनका मारियलें ।
स्मरतां ऐसें सहस्रदृक्[4]ज्ञन रोषें बहु उसळे ॥ १२४ ॥
ज्यापरि मारी गरुड भुजङ्गा त्यापरि पूर्णघना ।
सहस्रनयनें वधिलें समरीं सिंह जसा हरिणा ॥ १२५ ॥
पूर्णघनाचा सुत घनवाहन पळून तेथून ।
अजित-जिनाच्या पद-कमलांना आला झणि शरण ॥ १२६ ॥

---

१ आनन्दित. २ देवनिर्मित नगर, चक्रादिक चौदा रत्नें, पद्मादिक नऊ निधि, षडङ्ग सैन्य, भाण्डीं, भोजन, शयन, आसन, रथादिक वाहनें, नृत्य-नाटक वगैरे दशांग भोग होत. ३ समवसरणांतील बारा सभामध्यें. ४ डोळे व मन.

भगवन्तांना प्रदक्षिणात्रय घालुनि वन्दून ।
त्यांच्या चरणा-समीप बसला निर्भय होऊन ॥ १२७ ॥
सहस्रनयन हि भीषण घेउनि करांत तरवार ।
त्याच्या पाठोपाठचि आला धरुन मनिं वैर ॥ १२८ ॥
परि प्रभूचें दर्शन होतां कोपें शमे त्याचा ।
शस्त्र करांतुनि गळे विनाशहि झाला वैराचा ॥ १२९ ॥
प्रदक्षिणात्रयपूर्वक वन्दुनि सभेमध्यें बसला ।
प्रभूपदेश-श्रवणीं त्याचा आत्मा बहु रमला ॥ १३० ॥
सगर-चक्रधर करयुग जोडुनि अजित जिना वदला ।
वैर हेतु या उभयांचा जिननाथ ! वदा मजला ॥ १३१ ॥

( सुलोचन व पूर्णघनाचें पूर्व-भव-कथन )

भगवन्तांनीं वैरकथा ही यापरि सांगितली ।
सद्दतुनामिकापुरींत सज्जन-गणांत नैव कलिं ॥ १३२ ॥
नान्दत होता भावन-नामक कोटि-द्रव्यधनी ।
पुत्र तयाचा हरिदासाभिध जो बहु लुब्ध धनीं ॥ १३३ ॥
देउनि पुत्रा हरिदासाला भावन धन वदला ।
वेश्या मांस नि जुगार मदिरा व्यसनां त्यजि सकला ॥ १३४ ॥
येणें वत्सा होय निश्चयें धन सारें नष्ट ।
पापें नरकीं जन्म लाभतां होती अति कष्ट ॥ १३५ ॥
यापरि सांगुनि भावन गेला धनार्जनासाठीं ।
बारा वर्षें तयें मिळविलें द्रव्य चतुःकोटी ॥ १३६ ॥
हरिदासानें व्यसना सेवुनि केला धननाश ।
करून चोरी निर्वाहा करि बान्धुनि अघपाश ॥ १३७ ॥
सुरुंग निर्मुनि करावयाला चोरी नृपसदनीं ।
गेला असतां वृत्त घडे जें कथितों घ्या ध्यानीं ( कानीं ) ॥ १३८ ॥
श्रेष्ठी भावन येउनि राहे नगराबाहेर ।
एकाकी तो सोडुनि आला स्वगृहीं परिवार ॥ १३९ ॥

---

१ तीन फेऱ्या. २ भयंकर. ३ राग. ४ ऐकण्यांत. ५ सद्दतु नांवाच्या नगरांत. ६ तंटा. ७ लोभी. ८ दारू. ९ चार कोटी. १० पापांचा फास. ११ राजाच्या घरीं.

गेला कोठें प्रिये पुत्र गे अपुला हरिदास ।
चोरी करण्या गेला नाथा, निशिं नृपसदनास ॥ १४० ॥
अपाय पुत्रा होइल ऐसें मनांत धरुनि भय ।
जाई भावन शीघ्र सुरुंगें निवारण्या चौर्य[1] ॥ १४१ ॥
हरिदासानें शत्रु असे मम ऐसें वाटून ।
निजजनकाचा कण्ठ टाकिला खड्गें[2] छाटून ॥ १४२ ॥
भावनमनिं ही पुत्राविषयीं द्वेषोदय झाला ।
तीव्राघातें परि खड्गाच्या पावे मरणाला ॥ १४३ ॥
नखादि-चिह्नें स्पर्शें जाणुनि अपुल्या जनकास ।
करी पलायन भयें विदेशीं वरी कुकार्यास ॥ १४४ ॥
मृत्यु पावला तोही कांहीं दिवसें हरिदास ।
पिता पुत्र हे मारुनि फिरले भविं अन्योन्यास[3] ॥ १४५ ॥
केव्हां कुत्रा मांजर उंदिर मुंगुस महिषें[4] असे ।
बैल जन्म हे घेउनि मारिति उभय हि वैरवशें ॥ १४६ ॥
या परि या भविं फिरुनि पुण्यवश उभय विदेहांत ।
पुष्कलावती देशिं जन्मले मानवदेहांत[5] ॥ १४७ ॥
तीव्र-तपानें उभय शतारस्वर्गीं[6] जन्मून ।
भावन झाला पूर्णमेघ हरि झाला शुभनयन ॥ १४८ ॥
धर्मचक्रपति अजित जिनानें वैराचें कथन ।
केलें ऐकुनि सगरें नमिलें श्रीमज्जिनचरण ॥ १४९ ॥

( सगरचरित्र व सहस्रनयन व मेघवाहन यांच्या वैराचें कारण )

तोयदवाहन[7] सहस्रनयनीं कारण वैराचें ।
असे कोणतें आतां सांगा ऐशा प्रश्नाचें ॥ १५० ॥
उत्तर कथिलें अजितजिनानें यापरि सगरास ।
सहस्रनयनीं तुझा स्नेहही ऐके सविशेष ॥ १५१ ॥
जम्बूद्वीपीं भरतक्षेत्रीं पद्मकनगरांत ।
रम्भक नामें दानशील तूं धनिक सुविख्यात ॥ १५२ ॥

---

१ चोरी. २ तरवारीनें. ३ एकमेकांस. ४ रेडा. ५ मनुष्य झाले. ६ अकराव्या स्वर्गाचें शतार हें नांव. ७ मेघवाहन.

शशी नि आवलि या नांवाचे होते शिष्य गुणी ।
वैरी होते अन्योन्यांचे उभयहि विपुल धनी ॥ १५३ ॥
गवळ्या पासुनि गाय घ्यावया विकत शशी आला ।
ठरवुनि किंमत तिची आणण्या स्वधन घरीं गेला ॥ १५४ ॥
दैवनियोगें किंमत देउनि आवलि गायीस ।
घेउनि जाण्या निघे शशी तव भेटे पथिं त्यास ॥ १५५ ॥
क्रोधें झाला लालबुंद शशि तेणें त्या वधिलें ।
मरून झाला म्लेच्छ आवली यापरि कर्म फळें ॥ १५६ ॥
मेला कालान्तरें शशी ही झाला तो बैल ।
म्लेच्छें वैरें तया मारिलें ऐसें वैरफल ॥ १५७ ॥
नरकगतींतुनि निघून झाला आवलि उन्दीर ।
मांजर होउनि शशिनें वधिलें सुखद नसे वैर ॥ १५८ ॥
नरकीं उभयहि पुनः जन्मले जो दुःखागार[2] ।
यापरि चाले भ्रमण तयांचें भवांत अनिवार ॥ १५९ ॥
कूट नि कर्पट या नांवाचे दासीसुत झाले ।
पूर्वभवाच्या पुण्यें श्रीजिनमन्दिरिं भृत्य भले ॥ १६० ॥
रूपानन्द नि सुरूप नामें भूतामर[3] झाले ।
पुण्यें यापरि देवगतीमधिं त्यांना सौख्य मिळे ॥ १६१ ॥
रजोवलीचा पुत्र जाहला कुलधर पूर्व शशी ।
पुरोहिताचा पुण्यभूतिसुत आवलि न स्ववशी ॥ १६२ ॥
अन्योन्यामधिं मैत्री होती तथापि ते उभय ।
महिषीसाठीं[4] वैरी झाले झालें मन अदय[5] ॥ १६३ ॥
कुलन्धरानें पुण्यभूतिवध-निश्चय मनिं केला ।
जैनमुनींच्या उपदेशानें प्रशान्त परि झाला ॥ १६४ ॥
नृपें परीक्षुनि त्याला केलें अपुला सामन्त ।
सुपुण्य उदया येतां होतो नर बहु भाग्ययुत ॥ १६५ ॥
पुण्यभूति हा मिळतें वैभव धर्मे पाहून ।
जैन जाहला मरून तिसऱ्या स्वर्गी तज्जनन ॥ १६६ ॥

---

१ पुष्कळ श्रीमन्त. २ दुःखांचें स्थान. ३ भूत जातीचे व्यन्तरदेव. ४ रेड्यासाठीं. ५ दयारहित.

झालें, कुलधर तिथेंच जन्मे वैभवसम्पन्न ।
भोगां भोगुनि आयु संपतां आलें त्या मरण ॥ १६७ ॥
तदनन्तर ते खण्ड-धातकी-विदेह-वर्षांत[1] ।
सहस्रशिर या भूपालाचे सेवक विख्यात ॥ १६८ ॥
क्रूरामर धन ऐशीं नामें त्यांचीं शुभ होतीं ।
उभयाविषयीं भूपाच्या मनिं होति बहु प्रीति ॥ १६९ ॥
एके दिवशीं भूपासह ते गेले घोरवनीं ।
स्नेह पाहिला क्रूर पशूंचा तेथें निजनयनीं ॥ १७० ॥
महामुनीश्वर तिथें केवली त्यांनीं पाहियला ।
भक्तिभरानें बहुविनयानें प्रणाम त्या केला ॥ १७१ ॥
भूपासह हे दीक्षा घेवुनि तपांत रत झाले ।
भूपति मोक्षा युग्म[1] शतार-स्वर्गाप्रति गेलें ॥ १७२ ॥
पूर्व शशी जो होता आतां घनवाहन झाला ।
सहस्रलोचन आवलि झाला वरिती वैराला ॥ १७३ ॥
पूर्वभवांचें ऐकुनि त्यांचें सगरें वृत्त जिना ।
सहस्रनयनीं मम प्रीति कां वाटे नित्य मना ॥ १७४ ॥
विचारलेल्या या प्रश्नाचें उत्तर तूं ऐक ।
षट्खण्डाधिप, सांगतसे मी जें आहे ठीक ॥ १७५ ॥

( सहस्रनयनावर सगरचक्रवर्तीचें प्रेम असण्याचें कारण,
व सगराचें पूर्वभवकथन )

जिनमुनिदानें रम्भक जन्मे सुरकुरुभूसींत[2] ।
भोगुनि सौख्या सौधर्मामर झाला विख्यात ॥ १७६ ॥
चवून तेथुनि चन्द्रपुरामधिं हरिनृप सुत झाला ।
'दयितव्रत' या नामें भोगी मानवसुखमाला ॥ १७७ ॥
दीक्षा घेउनि जन्मे स्वर्गी चवून तेथून[5] ।
अपरविदेहीं[3] रत्नसञ्चयीं[4] केलें अवतरण ॥ १७८ ॥

---

१ क्रूरामर व धन हे दोघे. २ देवकुरु नामक भोगभूमींत. ३ पश्चिम विदेह क्षेत्रांत. ४ या नांवाच्या नगरांत. ५ जन्म.

महाघोष नृप पिता चन्द्रिका माता शीलवती ।
पुत्र तयांचा नाम पयोबल भोगी सौख्यतति ।। १७९ ।।
दीक्षा घेउनि महामुनीश्वर झाला प्राणान्तीं ।
प्राणत-नाम-स्वर्गीं स्वर्गी झाला वरि कान्ति ।। १८० ।।
नन्तर झाला भरतक्षेत्रीं पृथ्वीपुर-नगरीं ।
जन्म यशोधर नृपसुत ' जय ' तव रूप मनोहारी ।। १८१ ।।
जनकासन्निध घेउनि दीक्षा केलें तप घोर ।
विजयानुत्तरिं अहमिन्द्रज सुख भोगी सुखसार ।। १८२ ।।
तेथून च्युत होउनि आतां चक्री झालास ।
यापरि तव भववर्णन केलें धरि परमोल्हास ।। १८३ ।।
रम्भभवाला आरम्भुनि तव आवलिवरि होतें ।
प्रेम चक्रधर सहस्रलोचनिं म्हणून आतां तें ।। १८४ ।।

( सहस्रनयन व मेघवाहन यांची मैत्री )

यापरि ऐकुनि जिनवदनांतुनि अपुल्या जनकांचें ।
भव संसारीं धर्मीं प्रेम हि झालें त्या साचें ।। १८५ ।।
जातिस्मरण हि उभया झालें तेणें जाणून ।
पूर्व-भवां दृढरुचि त्या उपजे करिति जिनस्तवन ।। १८६ ।।

( श्री अजित जिनस्तुति )

अजित जिनेशा तूं प्राण्यावरि करिशी उपकार ।
हेतु तयाला न कोणताही वदती बुध थोर ।। १८७ ।।
उपमाविरहित रूप तुझें वा अपार शक्ति वसे ।
तुझ्या दर्शनें तृप्ति जयाला जन एकहि न दिसे ।। १८८ ।।
अनन्तसद्गुण लाभ जाहला कृतकृत्यहि असशी ।
सर्वां वघशी सुखस्वरूपी अचिन्त्य तूं असशी ।। १८९ ।।

---

१ चौदाव्या स्वर्गांत. २ देव. ३ पांच अनुत्तरापैकीं पहिलें अनुत्तर विजय आहे. विजय, वैजयंत, जयन्त, अपराजित व सर्वार्थसिद्धि. सांसारिक उत्कृष्ट सुख याहून अन्यत्र मिळतच नाहीं म्हणून यांना अनुत्तर म्हणतात. ४ नऊ ग्रैवेयक, नऊ अनुदिश व पंच अनुत्तरांतील देवांना अहमिन्द्र म्हणतात. ५ कर्मांचा नाश करणें हें कार्य अजितजिनांनी केलें त्यामुळें ते कृतकृत्य होत.

ज्ञेय सर्व तें तुवा जाणिलें अज्ञात न कांहीं ।
विश्वाचें हित नाथा ! आहे तुझ्याच करिं[1] पाही ॥ १९० ॥
भव्यांना तूं धर्मदेशना-हस्ताश्रय[2] देशी ।
भवपातालीं पडणाऱ्यांना अजिता ! उद्धरिशी ॥ १९१ ॥
ऐशी असतां करित जिनस्तुति हर्षित ते झाले ।
आनन्दाचे अश्रु तयांच्या नयनांतुनि आले ॥ १९२ ॥
यापरि करुनि स्तुति ते दोघे अजित जिना नमुन ।
सभेंत बसले वैरा विसरुनि हर्षित होऊन ॥ १९३ ॥
( घनवाहनाला भीमराक्षसेन्द्रापासून राज्यप्राप्ति होतें )
भीम जयाचें सुनाम राक्षसपति[3] जिनसभिं बसला ।
मेघवाहना आलिंगुनि तो यापरि त्या वदला ॥ १९४ ॥
तिसऱ्या द्वीपीं[4] भरतक्षेत्रीं विद्याधर शैलीं ।
कञ्चननगरीं विद्युद्दंष्ट्राभिध नृप शूर बली ॥ १९५ ॥
पूर्वभवीं तूं तनय तयाचा ' रतिवल्लभ ' नामें ।
अत्यन्त प्रिय तुजला आतां वदतो हितकामें ॥ १९६ ॥
लवणसमुद्रीं दुर्जय आहे अमरास हि ऐसा ।
' राक्षस ' नामें द्वीप समस्त द्वीपशिरोमणिसा ॥ १९७ ॥
सर्व दिशामधिं असे सातशे योजन विस्तार ।
ज्याच्यामध्यें त्रिकूटपर्वत सुमेरुसम थोर ॥ १९८ ॥
वलयाकार नि नऊ योजने उंच नभीं दिसतो ।
अतिशय दुर्गम विस्तृत योजन पन्नासें हसतो ॥ १९९ ॥
त्यांच्या वरि मी लङ्कानगरीं सुवर्ण तटयुक्त ।
गृह तोरणें सर्व हेममयें[5] रचिलीं द्युतिसहित ॥ २०० ॥
सहा योजनें गेल्यावरती शुद्धस्फटिकाचा ।
असे जिचा तट करि उपहासा जणु जो ज्योत्स्नेचा[6] ॥ २०१ ॥
रत्नविनिर्मित गृहें जियेचीं लज्जित इन्द्रपुरी ।
पाहुनि होते पातालादिक लङ्कान्ता[7] नगरी ॥ २०२ ॥

---

१ हातांत. २ धर्मोपदेशरूपी हाताचा आधार. ३ व्यन्तरदेवांच्या आठ भेदामध्यें राक्षस हा सहावा भेद आहे अर्थात् राक्षसदेवांचा इन्द्र. ४ पुष्करार्ध द्वीपांत. ५ सुवर्णमय. ६ चन्द्रप्रकाशाचा. ७ पातालंका नांवाची नगरी.

शंभर आणिक पंचवीस जी योजनपरिमाणा[1] ।
शत्रुगणांना अतिशय दुर्गम सुखदायी स्वगणा ॥ २०३ ॥
दोन पुरें हीं वत्सा ! तुजला पुत्रस्नेहानें ।
देतो त्यांचा हो तूं स्वामी अतिशय-तोषानें ॥ २०४ ॥
नवरत्नांचा दिव्यहार मी हा तुजला देतो ।
प्रकाश ज्याचा पसरे सुन्दर कण्ठा भूषवि तो ॥ २०५ ॥
तुला राक्षसी विद्या देतो घेई हर्षभरें ।
अजितप्रभुपद वन्दुनि तूं जा त्वद्दुःखाब्धि[2] सरे ॥ २०६ ॥
रक्षोद्वीपीं राज्य राक्षसी-विद्या-ग्रहणानें ।
राक्षस-वंश प्रसिद्ध झाला त्याच्या नांवानें ॥ २०७ ॥
दीर्घकाल करि घनवाहनखग पुरद्वयीं राज्य ।
नानासौख्यें तया मिळालीं निःशत्रु प्राज्य[3] ॥ २०८ ॥
महाराक्षसा निजपुत्राला राज्य विशाल दिलें ।
अजितजिनाच्या संनिध घेउनि दीक्षा तप केलें ॥ २०९ ॥

( त्रेसष्टशलाका पुण्यपुरुषांचें कथन )

एकेवेळीं अजितजिनाला वन्दुनि सगरानें ।
विचारिलें भो धर्मचक्रपति होतिल किति कथणें ॥ २१० ॥
जगत्रयाला सुख देणारे पूर्वी किति झाले ।
तुझ्यासारखे श्रवण-कुतूहल माझ्या मनिं आलें ॥ २११ ॥
अथवा झाले चक्रेश्वर किति माझ्यासम पूर्वी ।
किंवा होतिल जेणें भूषित होइल ही उर्वी[4] ॥ २१२ ॥
भरतक्षेत्रीं बलनारायण त्यांचे अरिहि[5] किती ।
होतिल मजला सांग जिना ! तूं क्रमें त्रिखण्डपति ॥ २१३ ॥
यापरि असतां विचारिलें जिन दुन्दुभिसम वाणी ।
वदले श्रवणें जिच्या नाशि ती भवदुःखा प्राणी ॥ २१४ ॥

१ एकशेपंचवीस योजन जिचें प्रमाण आहे अशी. २ तुझा दुःखरूपी समुद्र आतां आटला आहे. ३ उत्कृष्ट. ४ पृथ्वी. ५ प्रतिनारायण.

उत्सर्पिण्यवसर्पिणिकालीं[1] तीर्थङ्कर होती ।
भरतक्षेत्रीं सगरा चोविस जाण असें चित्तीं ॥ २१५ ॥
मोहध्वान्तें भरलें होतें सगळें भूतल हें ।
झाले तेव्हां प्रथम जिनेश्वर साकेतीं पाहे ॥ २१६ ॥
होतें तेव्हां भूतल सगळें पाखण्डें रहित ।
निर्धार्मिकता[2] नान्दत होती अराजकासहित ॥ २१७ ॥
कृतयुग केलें आदिजिनानें वर्णत्रय केलें ।
उदर भराया प्रजेस नन्तर उपायही कथिले ॥ २१८ ॥
पुत्र तयांचा भरत जाहला ब्राह्मण-वर्ण तयें ।
रचिला आश्रम कथिलें वृषभें धर्मद्वय[3] सुनयें ॥ २१९ ॥
दीक्षा घेउनि जन्मदुःख-भय विनाशिलें त्यानें ।
कथिले रत्नत्रय[4] भव्यांना विमुक्ति सोपानें ॥ २२० ॥
मुनिवर गेले शरण तयांना भरतादिक गेही[5] ।
महाव्रतांचें करून पालन झाले निर्मोही ॥ २२१ ॥
पुण्यें कांहीं सुजनें तेव्हां मेळविला स्वर्ग ।
करून कर्मक्षयास मिळविति कांहीं अपवर्ग[6] ॥ २२२ ॥
परन्तु कांहीं रचुनि अधर्मा पसरविती त्याला ।
सत्यधर्म नच दिसला त्यांना रविकर घूकालां ॥ २२३ ॥
त्यायोगानें तिर्यग्गतिमधिं फिरले बहुकाल ।
नरकामध्यें दुःखें त्यांनीं अनुभविलीं विपुल ॥ २२४ ॥
ऋषभ जिनाच्या मोक्षानन्तर लोटे बहुकाल ।
स्वर्गापासुनि आलों केलें कृतयुग मी सकल ॥ २२५ ॥
आचारांचा विघात होतो कुदृष्टिजन वाढे ।
धर्मसम्पदा मळकट होते अज्ञान हि गाढें ॥ २२६ ॥

---

१ उत्सर्पिणीच्या तिसऱ्या व अवसर्पिणीच्या चौथ्या विभागांत अर्थात् सुषमसुषमा या विभागकालांत. २ आदिभगवंताचे वेळीं लोकांना धर्म नाहित नव्हता व राजा-प्रजा विभागही नव्हता. नंतर आदिनाथ हे राजा झाले व दीक्षा घेऊन कर्मक्षयानन्तर त्यांनीं धर्माची स्थापना केली. ३ गृहस्थधर्म व मुनिधर्म. ४ सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र. ५ गृहस्थ. ६ मोक्ष. ७ घुबडाला.

ऐशासमर्थी जिन तीर्थंकर येती उदयास।
उन्नत करिती जिनधर्माला हरिति भवत्रास ॥ २२७ ॥
उत्तम बान्धव अशा जिनाला अवलम्बुनि जीव।
सिद्धिपथाला वरिती हरिती समस्त अघ अशिवें ॥ २२८ ॥
मी गेल्यावर मोक्षा होतिल बाविस जिन थोर।
त्रैलोक्याला प्रकाश देतिल करितिल अघ दूर ॥ २२९ ॥
सर्वांचि माझ्या समान होतिल कान्त्यादिक सुगुणें।
त्रिलोकपूजित अनन्तबोधादिक त्या पूर्णपणें ॥ २३० ॥
त्यांचीं नांवें कथितों तुजला मंगलदायक जीं।
मन:शुद्धिकर भव्य स्थापिति नित्य मुखामाजीं ॥ २३१ ॥
पुरुषर्पभ तो ऋपभजिनेश्वर होउनि भरतांत।
गेला साम्प्रत दुसरा आहे आतां मी अजित ॥ २३२ ॥
पुढती होतिल त्यांचीं नांवें घेई ध्यानांत।
पद्योत कानीं हरावयाला समर्थ जी ध्वान्तें ॥ २३३ ॥
मुक्तिश्रीचा सम्भव जेणें सम्भव भगवन्त।
अभिनन्दिति ज्या भव्य सर्व ते अभिनन्दन सन्त ॥ २३४ ॥
सुमति सुमतिचे दाता पद्मप्रभ प्रभावक ते।
सुपार्श्व ज्यांचें शरीर सुन्दर लाजवि चन्द्रातें ॥ २३५ ॥
श्री-चन्द्रप्रभ चन्द्रचि भूवरि रूपें अतिकान्त।
पुष्पदन्त जिन शुक्लध्यानें करिती कर्मान्त ॥ २३६ ॥
शीतल होतिल शीलाचे ते सागर जिन दशम।
श्रेयान् श्रेयस्कर भव्यांना होतिल नित अमम ॥ २३७ ॥
वासुपूज्य जे पूजिति ज्याचे पद नरसुर सन्त।
बारावे जिन होतिल सुन्दर शिवरमणीकान्त ॥ २३८ ॥
विमल अनन्त नि धर्म शान्ति जिन कुन्थु नि अरनाथ।
मोहमल्लहर मल्लिजिनेश्वर कथितिल मोक्षपथ ॥ २३९ ॥
श्रीमुनिसुव्रत नमि नि नेमि जिन पार्श्व महावीर।
देवांचे अधिदेव भारतीं होतिल तीर्थंकर ॥ २४० ॥

---

१ अकल्याण करणारें. २ नरश्रेष्ठ. ३ अज्ञानान्धकार. ४ उत्पत्ति. ५ पूजिती. ६ जिनधर्माची प्रभावना करणारे. ७ मुक्ति देणारे.

करितिल यांचे गर्भजन्म तप केवल मोक्ष असे ।
पञ्चोत्सव सुरपति प्रमोदें भक्ति जयांत वसे ॥ २४१ ॥
जन्मावतरीं[1] मणिगणवर्षण यांच्या करतील ।
सुरशैलावरि सुरेश्वरांनीं स्नापित[2] होतील ॥ २४२ ॥
तेज रूप बल सुख हीं यांचीं निरुपम असतील ।
आत्मध्यानें जन्मरिपूचा विनाश करतील ॥ २४३ ॥
महावीर जिन-रवि अस्ताला गेल्यावरि लोकीं ।
पाखण्डी[3] काजवे स्वतेजा धरतिल अवलोकी ॥ २४४ ॥
भवकूपामधिं पडुनि पाडतिल मोहान्धां इतरां ।
जिकडे तिकडे व्यापुनि जाइल यांनीं भरतधरां[4] ॥ २४५ ॥
तुझ्यासारखा चक्रश्रीचा पतिपूर्वीं एक ।
होउनि गेला आतां दुसरा स्वतःस अवलोक ॥ २४६ ॥
यानन्तरही या भरतामधिं चक्री होतील ।
दश ते सगळे समान-विभवें पुण्यें वरतील ॥ २४७ ॥
भरतीं झाला प्रथम चक्रपति भरत सुनामाचा ।
दुसरा तूं ज्या सगर बोलती समान-धामांचा[5] ॥ २४८ ॥
तिसरा होइल सनत्कुमाराभिध चक्री चौथा ।
मघवा पञ्चम शान्ति जनांना दाविल मुक्तिपथा ॥ २४९ ॥
कुन्थु नि अरजिन सुभूमचक्री तेवि महापद्म ।
हरिषेण नि जयसेन सर्व हे विभवांचें सद्म[6] ॥ २५० ॥
ब्रह्मदत्त हा अन्तिमचक्री षट्खण्डाधिपति ।
होतिल सगळे क्रमें भूपते ? ऐसें मनिं चिन्ती ॥ २५१ ॥
नवनारायण तैसें तदरि[7] हि होतिल तितुकेच ।
नव बलभद्र हि धर्माचरणीं मन ज्यांचें साच ॥ २५२ ॥
अवसर्पिणिचे जिनचक्र्यादिक तुजला सांगितले ।
उत्सर्पिणिकालींही तैसें होतिल सकल भले ॥ २५३ ॥

---

१ जन्मासाठीं गर्भांत आले असतां. २ अभिषेक केला जाईल. ३ अन्यधर्मीय. ४ भारतवर्ष. ५ तेजाचा. ६ घर. ७ नारायणांचे शत्रु प्रतिनारायण.

क्षेत्रीं जैसें भरतीं त्यापरि ऐरावतिं जाण ।
त्रिषष्टि ऐसें पुण्यनरांचें आहे परिमाण ॥ २५४ ॥
भवसङ्कट हें कुकर्म करितां जीवाला मिळतें ।
महापुरुषपद शुभोदयानें शुभांत मति वळतें ॥ २५५ ॥
कालविवर्तन यापरि घडतें जाणुनि हें ध्यावें ।
जिनधर्माला जाणुनि भव्यें स्वहिता साधावें ॥ २५६ ॥
ज्ञानावरणाद्यष्ट कर्मगण विनाशिले ज्यांनीं
मुक्त सिद्ध ते उपमाविरहित सुख त्यांचें जाणीं ॥ २५७ ॥
प्राशुनि यापरि अजित जिनाची वचनसुधा जीव ।
हर्षित झाले रविकिरणांनीं जैसें राजीव ॥ २५८ ॥
तोयदवाहन अशी देशना ऐकुनि अजिताची ।
करूं लागला हृदयीं चिन्ता सन्तत सुहिताची ॥ २५९ ॥
ज्या कर्मानीं जीव खरोखर होतो सन्तप्त ।
कुकर्म-मायामोहित होउनि करितो रति त्यांत ॥ २६० ॥
सुन्दर दिसती बाहेरुनि हे पञ्चेन्द्रिय विषय ।
परि अति दुःखद विपाकमागें जिन वदती सदय ॥ २६१ ॥
दीर्घकाल जरि कान्ता बान्धव आणिक धनसङ्ग ।
असे लाभला सोडुनि जाणें लागे निज अङ्ग ॥ २६२ ॥
न येतसे बा तुझ्याबरोबर भावान्तरीं कोणी ।
विचित्र ऐशी संसाराची दशा असे जाणी ॥ २६३ ॥
धनादि मिळती तोंवर सगळे प्रेमळ दिसतात ।
आज्ञा मानिति अनुसरतीही श्वानासम तात ॥ २६४ ॥
अनन्त गेला काल भवामधिं फिरतांना जीवा ! ।
कोणि न आले तुजसह सोडी परिणति मोहभवा ॥ २६५ ॥
सर्पशरीरासमान असती हे भयकर भोग ।
नरकीं तुजला दुःखांचा बा देतिल संयोग ॥ २६६ ॥
स्वप्नसुखासम बन्धुसमागम आहे अस्थायी ।
इन्द्रचापसम असे विनाशी क्षणिक सुखा देई ॥ २६७ ॥

---

१ त्रेसष्ट पुण्यपुरुष. २ कालाचें परिवर्तन. ३ कमल. ४ घनवाहन किंवा मेघवाहन. ५ हे जीवा. ६ मोहापासून झालेली परिणति. ७ अनित्य. ८ इन्द्रधनुष्य.

जसा बुडबुडा तशीच काया सार न हींत असे ।
तडिल्लतेसम[1] जीवन जीवा ! चञ्चल तव विलसे ॥ २६८ ॥
भवभ्रमाला हेतु सर्व हे आतां सोडीन ।
न सोडणारा धर्म सहायक त्याला घेईन ॥ २६९ ॥
विचार यापरि करून निश्चित विरक्त तो झाला ।
धरा राज्य हें जीर्ण तृणासम गमलें तैं त्याला ॥ २७० ॥
अजित नाथ जिन भव्यजनांना मोक्षाचा मार्ग ।
सांगुनि मिळवी कर्मविनाशें अन्तीं अपवर्ग ॥ २७१ ॥

( सगर पुत्र कथा )

सगरा नव्वद सहा सहस्र नि होत्या प्रिय भार्या ।
साठ सहस्र नि तनय विक्रमी होते त्या आर्या[2] ॥ २७२ ॥
पदनिक्षेपें[3] भूमिकम्पना करीत गेले ते ।
कैलासीं जिननमनें अपुलें अशुभ हरायातें ॥ २७३ ॥
जिन-विम्बांना नमून विनयें सभोवती रचिला ।
खन्दक दण्डा करांत घेउनि खोदुनि भूमितला ॥ २७४ ॥
पातालावधि खोल खन्दका पाहुनि नागेन्द्र ।
क्रोधें उज्ज्वल त्यांना पाही नयनें वहु सान्द्रें[4] ॥ २७५ ॥
क्रोधाग्नीचा तीव्र ज्वालाकलाप त्या घेरी ।
चक्रपतीच्या समस्त पुत्रा भस्मित शीघ्र करी ॥ २७६ ॥
त्यांच्या पैकीं दोन चि पुत्रा दयार्द्र होऊन ।
दग्ध न करि तो दिलें तयानें त्या जीवनदान ॥ २७७ ॥
मृत्यु समस्ता युगपत् आला ऐसें जाणून ।
भीम भगीरथ दुःखी सगराप्रति करिती गमन ॥ ३७८ ॥
वार्ता ऐशी ऐकुनि चक्री प्राणा त्यागील ।
म्हणून विबुधें निषेधिली ती जी दुःखां मूल ॥ २७९ ॥
अनेक भूपति सचिव कुलागत दाविति मुखिं मोद ।
नमून वसले सभेंत चाले वचनीं सुविनोद ॥ २८० ॥

---

१ विजेसारखी. २ श्रेष्ठ सगराला. ३ पाय आपटीत व जमीन कांपवीत. ४ अतिशय तीक्ष्ण.

खुणावलेला एक वृद्ध बुध वचन असें वदला ।
राजन् जगतीं अनित्यता ही दावी निज लीला ॥ २८१ ॥

( अनित्यतेची लीला )

तुझ्या सारखा पराक्रमी नृप भारतवर्षांत ।
भरत चक्रवर्ति झाला त्याचें वर्णन आर्षांत[1] ॥ २८२ ॥
षट्खण्डाची पृथ्वी ज्यानें दासीसम केली ।
झाला तोही अनित्यतावश अशी करी केलि[2] ॥ २८३ ॥
पुत्र तयाचा अर्ककीर्ति जो पराक्रमी सुगुणी ।
प्रसिद्ध आहे वंश जयाचा आतांही जाणी ॥ २८४ ॥
असङ्ख्य राजे झाले याच्या विशाल वंशांत ।
अनित्यतेच्या परि ते झाले प्रविष्ट कोशांत ॥ २८५ ॥
असोत मानव अल्पायूचे परन्तु सुरपति[3] ही ।
विनष्ट होती अनित्यतेचें विलसित[4] हें पाही ॥ २८६ ॥
ज्यांचें करिते त्रिलोक जनता अभिनन्दन मोदें ।
जिनवर ही ते मुक्तिस वरिती अनन्त जी सुख दे ॥ २८७ ॥
जैसे पक्षी विशाल वृक्षीं वसती रात्रींत ।
प्रातःकालीं उडून जाती दिशावकाशांत ॥ २८८ ॥
यापरि मानव-सङ्गम होतो एक कुटुम्बांत ।
स्वकर्मवश परि होउनि जाती दुर्गति-सुगतींत ॥ २८९ ॥
होतें ज्यांचें चरित्र सुन्दर देह हि त्याहून ।
बघतां ज्यांना लोचन आणिक मन हो बेभान ॥ २९० ॥
ते ही आतां कथाशेप जन झाले जाणून ।
होतें अमुचें तद्विरहातें मन अतिशय खिन्न ॥ २९१ ॥
जगांत नाहीं मरणापेक्षां बलिष्ठ कोणीही ।
खडे चारिले सबला त्यानें बुध वदती पाही ॥ २९२ ॥
भरतादिक जे होउनि गेले पूज्य महापुरुप ।
विस्मय वाटे त्यांच्या नाशें कां न फुटे वक्ष[5] ॥ २९३ ॥

१ आगमांत. २ क्रीडा. ३ इन्द्र. ४ विलास, खेळ. ५ छाती.

तरङ्ग विद्युत् फेनें स्वप्न नि बुद्बुदसम विभव।
प्राणिशरीरें प्रियसङ्गम हें शाश्वत नच भाव ॥ २९४ ॥
नसे कुणी जन जो उपमाना जगांत पावेल।
जसा अमर हा तसेच आम्ही अमर्त्य जन सकल ॥ २९५ ॥
समर्थ सागर शोषायाला जे जन असतात।
चूर्ण कराया कर-युग्मानें मेरुस विध्वस्त ॥ २९६ ॥
जे उचलाया समर्थ असती विशाल पृथ्वीस।
गिळावयाला क्षम जे दिसती चन्द्रा सूर्यास ॥ २९७ ॥
ऐसे अद्भुत समर्थ मानव ते ही कालमुखीं।
गेले उरले केवल लोकीं सिद्धचि परम सुखी ॥ २९८ ॥
मृत्युनृपानें त्रैलोक्याला सगळ्या वश केलें।
सिद्धचि केवल तयास लंघुनि मुक्तिपुरीं गेले ॥ २९९ ॥
अगणित राजे यमराजानें निधनाँ प्रति नेले।
आम्हांही तो निधना नेईल सामान्यचि झालें ॥ ३०० ॥
सर्व प्राण्या साधारण हें असतां जगिं मरण।
कोण शाहणा भवकारणशा शोका करि जाण ॥ ३०१ ॥
या परि वर्णन चालत असतां पुत्रयुगा पाही।
इंगित जाणुनि सगर भूमिपति विचार मनिं वाही ॥ ३०२ ॥
सगळे माझे नमीत होते सुत पदयुगलास।
दोनचि दिसती सगळे वाटे गेले विलयास ॥ ३०३ ॥
हें मज मोठें दुःख कथाया होउनि असमर्थ।
इतर निमित्तें कथिती भूपति मत्सुतमरणार्थ ॥ ३०४ ॥
शोकसर्प जरि डसला भूपा प्राणा नच सोडी।
विद्वद्भार्षण-मन्त्रोपायें खेद-विषा पाडी ॥ ३०५ ॥

( सगरराजा विरक्त होऊन दीक्षा घेतो व कर्मक्षय करून मुक्त होतो )

सांसारिक सुख कंदली गर्भासमान निःसार।
जाणुनि देउनि भगीरथीं श्री झाला मुनि थोर ॥ ३०६ ॥

---

१ वीज. २ फेस. ३ नित्य. ४ मरणरहित. ५ समर्थ. ६ यमाच्या तोंडांत. ७ मरणाप्रत. ८ मनांतला अभिप्राय. ९ माझ्या पुत्रांच्या मरणाचा अभिप्राय. १० विद्वानांच्या भाषणरूपी मंत्राच्या इलाजानें. ११ केळी.

पृथ्वी नगराकर[1]मण्डित ही सगर-नृपा गमली ।
जीर्णतृणासम निःस्पृहता मनिं त्याच्या संचरली ॥ ३०७ ॥
भीमरथासह अजितजिनेशा समीप जाऊन ।
केवल-बोधा मिळवुनि मिळवी सिद्धांचें स्थान ॥ ३०८ ॥

( सगरपुत्रांचें भववर्णन )

सगराचा सुत जह्नुभगीरथ पुत्र असे त्याचा ।
राज्य करी तो ज्याची न्यायें युक्त असे वाचा ॥ ३०९ ॥
श्री-श्रुतसागर योगीन्द्रांना विनयें वन्दून ।
प्रश्न विचारी नृपति भगीरथ मनिं जिज्ञासून ॥ ३१० ॥
नाथा ! माझ्या आजाचे सुत एकेवेळींच ।
कोण्या कर्में मरण पावले वदा मला साच ॥ ३११ ॥
त्यांच्यामध्यें मीही होतो परि न च मरण मला ।
आलें नाथा सांगा अपुली आहे मति अमला ॥ ३१२ ॥
भगीरथाच्या प्रश्नाचें मग उत्तर भगवन्त ।
वदले यापरि ऐक नृपाला हे वसुधाकान्ते[3] ! ॥ ३१३ ॥
सम्मेदाला वन्दायाला निघे महासङ्घ ।
ज्यांत आर्यिका मुनि नि श्रावक गृहिणी विगताघ[4] ॥ ३१४ ॥
अन्तिक नामक गांवाजवळी आला तैं लोक ।
हसूं लागले दुर्वाक्यें ते वदति जसें काक ॥ ३१५ ॥
परि त्यामध्यें कुलाल[5] एक व्यक्ति स्तुति बोले ।
निषेध करितो इतरांचा बहु सुगुणें तोचि खुले ॥ ३१६ ॥
त्या गांवाच्या निर्वासितानें[6] चोरी बहु केली ।
तदा नृपानें घेरुनि केली गांवाची होळी ॥ ३१७ ॥
ज्या दिनिं केला दग्ध त्या दिनीं नव्हता कुम्भार ।
गेला होता कोठें तेणें वाचे तो चतुर ॥ ३१८ ॥
कांहीं काळें मरण पावला जन्मे वैश्य-कुळीं ।
नाम तयाचें असे ' महाधन ' अर्थें तेवि वली ॥ ३१९ ॥

---

१ नगरें व सुवर्णरत्नांच्या खाणींनीं शोभणारी. २ निर्मल. ३ पृथ्वीपते. ४ पापरहित. ५ कुम्भार. ६ रहिवाश्यानें.

ग्रामहि झाला वराटकांचा[1] समूह त्या मिळला ।
सौख्या भोगुनि वैश्य अन्यभविं मनुजेश्वरें[2] झाला ॥ ३२० ॥
मातृवाहक[3] प्राणी वनले पूर्वीचा गाव ।
गजपदतलिं ते चूर्ण जाहले फिरती बहुत भव ॥ ३२१ ॥
राजा झाला मुनिपद घेउनि विरक्ति-भावानें ।
स्वर्गीं सुरवर शोभे अपुल्या विशाल विभवानें[4] ॥ ३२२ ॥
नन्तर तेंथिल आयु संपतां नातू सगराचा ।
भगीरथा तूं झाला असशी सत्यचि जिनवाचा ॥ ३२३ ॥
सुचिरभवीं तो ग्राम भ्रमणें सगराङ्गज झाले ।
पूर्वभवाच्या पुण्यें कांहीं त्यांना सौख्य मिळे ॥ ३२४ ॥
सङ्घनिन्दना करून भविं भविं गांव असा झाला ।
केली तूं स्तुति घाली लक्ष्मी गळीं तुझ्या माला ॥ ३२५ ॥
यापरि ऐकुनि भवा भगीरथ झाला मनिं शान्त ।
मुनिपद घेउनि तपोयोग्यें[5] तो पदास हो प्राप्त ॥ ३२६ ॥
यापरि कथिलें सगरचरित्राश्रितोपकथन[6] असे ।
श्रेणिक आतां तुजला कथितो प्रस्तुत जें विलसे ॥ ३२७ ॥

( कमलांत भुंगा मेलेला पाहून इंद्रियवशता दुःखास
कारण आहे असे विचार महारक्षराजा मनांत करतो )

महारक्ष तो विद्याधरपति लङ्काराज्य करी ।
निष्कण्टकसें इन्द्रश्रीची शोभा सतत वरी ॥ ३२८ ॥
एके दिवशीं उद्यानीं तो क्रीडा करण्यास ।
गेला नानाविधा करुनि त्या मानी हर्षास ॥ ३२९ ॥
स्त्रिया तयाला पुष्पें ताडन करिती तोहि तया ।
फेकिति जल त्या पिचकारींनीं वाटे मोद जया ॥ ३३० ॥
ईर्ष्येनें स्त्री रुसली कोणी प्रणाम करुनि तिला ।
सान्त्वन करि तो यापरि करि तो नानाविध लीला ॥ ३३१ ॥

---

१ कवड्यांचा. २ राजा. ३ सूक्ष्म किडे. ४ ऐश्वर्यानें. ५ तपाला योग्य असें पद-स्वर्ग त्याला प्राप्त झालें. ६ मूळ सगराच्या कथेशी सम्बद्ध असलेली गोष्ट तिला उपकथा किंवा उपकथन म्हणतात.

जसा नन्दनीं सुरपति रमतो त्यापरि हा रमला ।
क्रीडा या परि करितां सायंसमय[1] तदा आला ॥ ३३२ ॥
सरोवरांतिल कमलें मिटलीं एका कमलांत ।
भ्रमर गुंतला निघे न बाहिर झाला प्राणान्त ॥ ३३३ ॥
पाहुनि त्याची ऐशी दुःस्थिति भवनाशक[2] चिन्ता ।
महारक्षनृप-मनांत झाली करि जी कर्मान्ता ॥ ३३४ ॥
मकरन्दाच्या रसांत झाला हा लुब्ध भ्रमर ।
मेला त्याच्या या इच्छेला असोचि धिक्कार ॥ ३३५ ॥
आसक्तीनें प्राप्त जाहला भृंगा मरणास ।
ही आसक्ति स्त्रीमुखकमलीं मारिल आम्हास ॥ ३३६ ॥
नाक नि जिह्वा यांनीं पावे भृङ्गा नाशास ।
पञ्चेन्द्रियवश कां न च आम्ही पावू मरणास ॥ ३३७ ॥
अथवा तिर्यक्प्राणी अज्ञचि झाला आसक्त ।
ज्ञानी आम्ही[4] लुब्ध जाहलों कां न कळे यांत ॥ ३३८ ॥
मधें माखिली तरवारीची धारा चाटून ।
होइल कैसें सुख रसनेला[3] तुटेल ती जाण ॥ ३३९ ॥
विपयामध्यें सौख्य केवढें कसलें तें होतें ।
दुःखांची परि परंपरा या तुजवरि कोसळते ॥ ३४० ॥
किम्पाकाच्या फलासारख्या विपयापासून ।
विमुख नरांना मनें नि वचनें कायें मम नमन ॥ ३४१ ॥
मला फसविलें या खलविपयें न जाणिलें परि मी ।
विषाप्रमाणें जीवा मारिति न जाणती कामी ॥ ३४२ ॥
या परि चालत असतां चिन्तन मुनिवर उद्यानीं ।
श्री-श्रुतसागर आले नामें अर्थें हि ज्ञानी ॥ ३४३ ॥

( महारक्षराजा श्रुतसागर मुनींना धर्माचें स्वरूप विचारतो )

स्वरूपसुन्दर जो कान्तीनें चन्द्रा जिंकितसे ।
जो दीप्तीनें सूर्या स्थैर्यें मेरुस हासतसे ॥ ३४४ ॥

---

१ संध्याकाळ.　　२ संसाराचा नाश करण्याचा विचार.　　३ जिभेला.
४ पंचेन्द्रियासक्त मनुष्य.

रागद्वेषें रहित नि धर्मध्यानीं नित निरत ।
मनवचकायें अशुभा नाचरि कषायशमनिं रत ॥ ३४५ ॥
करी इन्द्रिया वश षट्कायप्राणिगणीं प्रेम ।
सप्त-भयांनीं रहित मदाष्टकविरतीचें धाम ॥ ३४६ ॥
मूर्तिमन्त जो मुनीशधर्मचि ऐशा यतिवृन्दा ।
घेउनि आला उपडुनि टाकी कर्माङ्कुर-कन्दा ॥ ३४७ ॥
विपुल विशुद्ध नि जन्तुविवर्जित ऐशा भूमितलीं ।
श्रुतसागर मुनि वसले तन्मुखिं कान्ति दिसे खुलली ॥ ३४८ ॥
उपवनरक्षक-मुखें समजली वार्ता भूपास ।
दर्शन घ्याया गेला मनिं तो धरून बहु हर्ष ॥ ३४९ ॥
करयुग जोडुनि भालावरती ठेवुनि मुनिचरणा ।
महारक्ष तो खगपति वन्दी घेउनि मित्रगणा ॥ ३५० ॥
मुनिसङ्घासहि वन्दुनि हृदयीं ठेवुनि भक्तीस ।
प्रश्न विचारी धर्माचा जो देई मुक्तीस ॥ ३५१ ॥
मुनिवर वदले धर्म अहिंसा जिनेश्वरें कथिला ।
सत्यादिक हे तिचेचि असती तिनेंचि भव मथिला ॥ ३५२ ॥
जी जी गति या जीवा मिळते कर्मोदययोगें ।
होति तियेंतचि रति तज्जीवन लोभें बहुवेगें ॥ ३५३ ॥
त्रैलोक्याच्या लाभा त्यजिती जीवन इच्छून ।
मरणापासुनि भीति तयांना प्रिय जीवित जाण ॥ ३५४ ॥
अधिक कथावें नलगे अनुभवसिद्ध असे सकला ।
स्वजीवित प्रिय तसेंचि अन्या जाणी भूपाला ॥ ३५५ ॥
म्हणून जीवित जे जीवाचें हरिती मूढचि ते ।
क्रूर तयांनी केलें सर्वचि अघ वदति ज्ञाते ॥ ३५६ ॥
हरिती जीवित जे जीवाचें ओझ कर्माचें ।
घेउनि नरकीं पडती उदकीं लोह असें साचें ॥ ३५७ ॥

---

१ पृथ्वी आदिक पंचस्थावर व एक त्रस मिळून षट्कायप्राणी २ सात भय–इहलोक भय, परलोक भय, आकस्मिक भय, मरण भय, वेदना भय, अरक्षक भय व अगुप्ति भय. ३ मदाष्टक, ज्ञान, पूजा, कुल, जाति, बल, ऋद्धि, तप व शरीर यांचा गर्व करणें. ४ प्राणिरहित.

मधाप्रमाणें वचन जयांचें विपदारुण हृदय ।
इन्द्रियविषयीं लम्पट अतिशय चित्त नसे सदय ॥ ३५८ ॥
सदाचार न च ज्यांच्या गांवीं स्वेच्छाजीवी जे ।
ते जन फिरती तिर्यग्गतिमधिं होउनि मलिन रजें ।
प्राण्या दुर्लभ मनुजपणा हा त्याहुनि सौरूप्य[1] ।
दुर्लभ त्याहुनि धनित्म होणें त्याहुनि हें आर्य ॥ ३६० ॥
त्याहुनि दुर्लभ विद्या मिळणें होणें अर्थज्ञ[2] ।
त्याहुनि दुर्लभ धर्मलाभ हा वदती सर्वज्ञ ॥ ३६१ ॥
धर्माचरणें स्वर्गी मिळवी सुख मानव कोणी ।
सुराङ्गनादिक परिवारासह हे नृपते ! जाणी ॥ ३६२ ॥
तेथून च्युत होउनि कृमिकुलपूर्ण[3] नि दुर्गन्धी ।
गर्भगृहीं जें अतिशय दुःसह जाई ज्यास न धी[4] ॥ ३६३ ॥
तो चर्माच्या जाळ्यामध्यें वन्द असा राही ।
मात्राहारा[5] चाटी वाढे संकोचित देहीं ॥ ३६४ ॥
नव-मासान्तीं जन्में घेउनि मानवपर्याया ।
नियमाचारें[6] विरहित होउनि नृजन्म करि वाया ॥ ३६५ ॥
विषया सेवी स्मरांधनि[7] तो कुदृष्टि होऊन ।
भवार्णवामधिं दुःखां भोगी ज्यांना उपमा न ॥ ३६६ ॥
परपीडाकर भाषा त्यागी हिंसा हेतुच ती ।
हिंसा आहे भवास कारण ऐसें कथिति यति ॥ ३६७ ॥
परस्त्रियेचा सङ्ग नि परधनवाञ्छा त्यागावी ।
जी परपिडा-कारण सगळी सुनरें वर्जावी ॥ ३६८ ॥
यापरि ऐकुनि खगपति धर्मस्वरूप वन्दून ।
वदला माझ्या पूर्वभवाचें मुने ! करा कथन ॥ ३६९ ॥
( श्रुतसागरमुनि महारक्षाच्या पूर्वभवांचें वर्णन करतात )
मतिश्रुतावधि-मनःपर्यया ज्ञान-चतुष्कास ।
धरिती ते श्रुतसागर वदले शान्तमनस्कास[8] ॥ ३७० ॥

---

१ सौन्दर्य. २ कार्य जाणणें. ३ किड्यांच्या समूहांनीं भरलेलें. ४ बुद्धि. ५ आईनें भक्षिलेल्या अन्नाचा आहार घेणें. ६ व्रतयुक्त सदाचार. ७ कामलंपट. ८ ज्याचें मन शांत आहे अशा महारक्षाला.

महारक्ष हे खगेश्वरा मी संक्षेपें वदतो।
ऐक पूर्व-भव तुझे सुबुद्धे ! प्रश्न हितावह तो ॥ ३७१ ॥
भरतीं पोदननगरीं होता 'हित' नामा मनुज।
भार्या होती तया माधवी करि जी शुभकाज ॥ ३७२ ॥
'प्रीत' सुनामा त्या उभयांना विनयी सुत झाला।
ज्याच्या हृदयीं भक्तिरसाचा निर्झर पाझरला ॥ ३७३ ॥
त्याच पुरीमाधिं 'उदयाचल' नृप 'अर्हच्छ्री' राणी।
या उभयांना सुपुत्र झाला 'सुवर्णरथ' सुगुणी ॥ ३७४ ॥
एके वेळीं जिनमंदिरिं तो[1] जन-विस्मयकारी।
जिनेन्द्र-पूजा करि भक्तीनें जी भवजलधि-तरी[2] ॥ ३७५ ॥
भव्यजनांच्या 'जय जय' ऐशा शब्दां ऐकून।
जय जय ऐसे शब्द बोलले भावें तव वदनें[3] ॥ ३७६ ॥
झाला हृदयीं मोद करी वपु[4] नृत्य तुझें निपुण।
'प्रीत' नांव तव तेणें सार्थक झालें हे सुजन ! ॥ ३७७ ॥
पुण्य साठलें कालान्तरिं तुज हितकर मृति आली।
यक्षाधिपता प्राप्त जाहली तुज वैभवशाली ॥ ३७८ ॥
अपरविदेहीं काञ्चननगरीं केला शत्रुगणें।
महान् उपद्रव हरिला यक्षें तुवा महायत्नें ॥ ३७९ ॥
धर्म साधन देह यतींचा रक्षुनि सुविशाल।
पुण्यराशि वा उपार्जिला त्वां आत्महितीं मूल ॥ ३८० ॥

आर्या

विजयार्धी तडिदङ्गद खेचर नि श्रीप्रभा तया राणी।
च्युत होउनि या उभया सुत तूं झालास 'उदित' गुणखाणी ॥३८१
'सुरविक्रम' खगपति जो पाहुनि वन्दन करावया आला।
केलेंस तूं निदाना[5] लाभो ऐश्वर्य अग्रभविं मजला ॥ ३८२ ॥
केलेंस तूं महातप ऐशानीं जन्म लाभला तुजला।
तेथून च्युत होउनि पृथुरक्ष[6]-खगेश-जन्म होय भला ॥ ३८३ ॥

---

१ सुवर्णरथ. २ संसारसमुद्रांत नांव. ३ तोण्ड. ४ शरीर. ५ मला पुढील जन्मीं इन्द्रपद किंवा विद्याधरराजपद प्राप्त व्हावें इत्यादिक इच्छा. ६ महारक्ष विद्याधरराजा.

स्त्री-जिह्वावशंवर्ती होऊन भ्रमण तव भवीं झालें ।
रथिरथचक्रासम तद्गणना जिनदेव जाणतात भले ॥ ३८४ ॥
जे तव देह भवान्तरिं झाले एकत्र ते जरी केले ।
लोकीं न मावतिल ते ऐसें श्रीमज्जिनेश्वरें कथिलें ॥ ३८५ ॥
सुरभोग कोटिकल्पावधि भोगून हि न तृप्त मन झालें ।
तें विद्याधर-भोगें तृप्त न होईल समज मनिं अपुलें ॥ ३८६ ॥
आठ दिनावधि आयू तव उरलें जाण हे महारक्षा ।
या स्वप्नोपम-भोगें होइल सन्तोष केवि तव अक्षा ॥ ३८७ ॥
यास्तव भोगेच्छा ही त्यागुनि भव्या शमास अवलम्ब ।
तूं हो निजस्वरूपीं दृढ रत निश्चल दिसे जसा खाम्ब ॥ ३८८ ॥
आयुःक्षय झाल्यानें झाला त्याच्या मनास न च खेद ।
भवचक्रीं जन्मांचें वर्तन संपे न म्हणुनि गतमोद ॥ ३८९ ॥
राज्य दिलें पृथुरक्षें सुररक्षा ज्येष्ठ विक्रमी तनया ।
भास्कररक्षा केलें युवराजा जो धरी सदैव नया ॥ ३९० ॥
परमार्थ-परायण तो पृथुरक्षा सर्वसंग सोडून ।
निर्लोभ पूर्ण होउनि निजस्वरूपांत जाहला मग्न ॥ ३९१ ॥
तो अन्न पान खाद्य नि लेह्याहारा चतुर्विधा सोडी ।
त्याची निजदेहावरि तिळमात्रहि राहिली नसे गोडी ॥ ३९२ ॥
शत्रु नि मित्रावरती समता त्याच्या मनीं सदा नान्दे ।
तो जिनसौधीं मौनव्रतांत राही न खिन्नता बाधे ॥ ३९३ ॥
अभिषेक-पूर्व मोठी जिनपूजा तो करी महानन्दें ।
अर्हत्स्मरणें-ध्यानीं लीनाचें सुयश भूतलीं कोन्दे ॥ ३९४ ॥
साधुनि समाधिमरणा झाला तो देव अमर-लोकांत ।
तेथें सुराङ्गनांचा झाला त्याच्या मना हरी कान्त ॥ ३९५ ॥

---

१ स्त्री व जीभ यांच्या स्वाधीन होऊन. २ पांच इन्द्रियांना किंवा आत्म्याला. ३ आनन्दरहित. ४ महारक्षराजानें. ५ देवरक्षाला. ६ सूर्यरक्षाला. ७ चिवडा, पेढे वगैरे. ८ चाटण्याचे पदार्थ. ९ जिनेश्वराच्या पायांच्या चिन्तनांत १० रत्नत्रयांनें युक्त मरण.

[ जाति चन्द्रकान्त ]

यापरि रक्षोद्वीप-भूपगण असङ्ख्यसे झाले ।
मुक्त जाहले कांहीं कांहीं स्वर्गसुखीं रमले ॥ ३९६ ॥
श्री-श्रेयो-जिन-तीर्थी झाला राक्षसपति एक ।
कीर्तिधवल हें नाम जयाचें होतें न च मूक ॥ ३९७ ॥

वसन्ततिलक

त्याचा पिता नृप घनप्रभ शत्रुनाशी । पद्मा असे सुजननी बहुपुण्यराशि ॥
तो कीर्तिशुभ्र नृप खेचर-भूपमान्य । मानी जिनेन्द्रयजनेंचि[1] निजास धन्य ॥

उपजाति

भवान्तरीं जे करिती तपास । ते वैभवा भोगुनिही उदास ।
करून कर्मक्षय मुक्ति-रामा । मिळे तयां नसेचि मुक्ति सीमा ॥ ३९९ ॥
दुष्कार्य जे आचरितात लोकीं । निन्दा अशांचीच घडे विलोकी ॥
जाणून दुष्कर्म सदा त्यजावें । जिनेश्वराच्या पदिं दास व्हावें ॥ ४०० ॥

इति श्रीरविषेणाचार्यकृते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत
पद्यानुवादे पद्मपुराणे राक्षसवंशाधिकारः पञ्चमं पर्व ॥ ५ ॥

---

१ जिनेश्वराच्या पूजनानें.

# पर्वे सहावें यांतील कथेचा सारांश

ऋषभापासून महावीरापर्यन्त चोवीस तीर्थंकर या भारत वर्षांत झाले. अकरावे तीर्थंकर श्रेयांस. त्यांच्या तीर्थामध्यें कीर्तिधवल या नांवाचा राक्षसवंशांत एक प्रसिद्ध राजा झाला. त्याच्या राणीचें नांव 'देवी' असें होतें व मेहुण्याचें नांव श्रीकण्ठ होतें. हा एकेवेळीं विमानांत बसून मेरुपर्वतावरील जिनमंदिराचें पूजन करून येत असतां त्याला रत्नपुरनगराच्या पुष्पोत्तरराजाची कन्या पद्मा दिसली. दोघांच्या मनांत एकमेकाविषयीं प्रेम उत्पन्न झालें. तेव्हां त्यानें तिला आपल्या विमानांत बसवून नेलें. दासींनीं कोणी राजा पद्मेला हरण करून नेत आहे असें सांगतांच पुष्पोत्तरराजा सैन्य घेऊन त्याच्या मागें लागला.

श्रीकण्ठ आपल्या मेहुण्याला शरण गेला. सर्व हकीकत त्यानें कळविली. इतक्यांत पुष्पोत्तरानें आपल्या सैन्याच्याद्वारें कीर्तिधवलाच्या नगराला (लङ्केला) वेढा घातला. श्रीधवलाच्या दूतानें राजा पुष्पोत्तराला सांगितलें कीं, "महाराज आपल्या कन्येनें श्रीकण्ठाला वरलें आहे. यामुळें श्रीकण्ठ आपला जावई झालेला आहे. यास्तव आपण युद्धासाठीं उद्युक्त होणें हें योग्य नाहीं." असें तो बोलत आहे तोंच पद्मेच्या दासीनें देखील तिचा अभिप्राय असा सांगितला, "बाबा, मी श्रीकण्ठाला आपण होऊन वरिलें आहे. त्यानें मला हरण करून आणिलें नाहीं. यास्तव आपण युद्ध बंद करावें." दूतीचें भाषण ऐकून पुष्पोत्तर शान्त झाला. मोठ्या थाटानें पद्मा व श्रीकण्ठाचा विवाह करून तो आपल्या सैन्यासह रत्नपुराला निघून गेला.

इकडे श्रीकण्ठाला कीर्तिधवलानें म्हटलें, "तूं आपल्या राजधानीकडे जाऊ नकोस, तुला पुष्कळ शत्रु तेथें त्रास देतील. माझ्या या लंकेच्या वायव्य दिशेला

'वानर' नामक द्वीप आहे. तेथें तूं आनंदानें राहा व त्यामुळें मलाही तुझ्या सहवासानें आनन्द वाटेल."

श्रीकण्ठालाही आपल्या मेहुण्याचा स्नेह मोडणें अयोग्य वाटले. तो 'वानर' द्वीपावर राज्य करू लागला. तेथील फलभक्षी सुंदर वानरांना पाहून तो आनंदित झाला व त्यांना कोणीही मारूं नये म्हणून दौंडी पिटवली व अनेक वानर त्यानें पाळले. प्रजाही राजाप्रमाणें वागू लागली. "श्रीकण्ठराजानें ध्वज, छत्र, मुकुट वगैरेमध्यें कौतुकानें वानरांची आकृति काढण्याची प्रथा सुरू केली. यामुळें याच्या वंशांत जे पुढें असंख्य राजे झाले त्या सर्वांनीं या पद्धतीचा अवलंब केला म्हणून त्या सर्वांना वानरवंशी हें नांव प्राप्त झालें."

एकेवेळीं या श्रीकण्ठाला वैराग्य उत्पन्न झालें त्यानें आपल्या वज्रकण्ठ नामक पुत्राला राज्य दिलें व तप करून मुक्त झाला. वज्रकण्ठानंतर अनेक राजे होऊन गेले व न्यायानें राज्य करून प्रजा सुखी केली. अनेकांनीं स्वर्ग व मोक्ष प्राप्त करून घेतला.

राक्षसवंशी राजे व वानरवंशी राजामध्यें स्नेह होता. मुनिसुव्रतनाथाच्याकाळीं वानरवंशांत उदधिरथनामक राजा व राक्षसवंशांत त्याचकालीं तडिद्रथनामक राजा झाला दोघामध्यें स्नेह होता.

एकेवेळीं तडित्केश बगिचांत क्रीडा करण्यासाठी आपल्या स्त्रियासह गेला होता. राजा बगिचांत फिरत असतां त्याचवेळीं एक वानर झाडावरून राण्यांच्या समूहांत घुसला व एका श्रीचन्द्रानामक राणीचें अंग त्यानें ओरबडलें. राणी भीतीनें ओरडूं लागली. राजानें हें पाहिलें व तत्काल त्यानें त्याला विद्ध केलें. वानर थरथर कांपत तेथून पळून गेला. एके ठिकाणीं मुनिसमुदाय बसलेला होतां तेथें तो विह्वळत पडला मुनींना दया आली. त्यांनीं त्याच्या कानांत पंचनमस्कार सांगितला अन्न-पाण्याचा त्याग करवून द्वेष वैराचाही त्याग त्यांनीं करविला व धर्मोपदेश केला. वानर शान्तपणें धर्मश्रवण करीत मरण पावून 'उदधिकुमार' नामक देव झाला.

इकडे राजानें आपल्या नोकरांना इतर वानरांना मारण्याची आज्ञा दिली— हें अवधिज्ञानानें उदधिकुमारानें जाणलें व त्यानें तेथें येऊन एक वानर सैन्यच उत्पन्न केलें व तें सर्व राजाच्या नोकरांना मारूं लागलें व राजाशीही तें लढूं लागलें. राजा घाबरून नम्र झाल्यावर त्या देवानें आपली सर्व हकीकत सांगितली. नंतर ज्यांच्या कृपेनें वानराला देवपणा प्राप्त झाला त्या मुनीश्वराकडे ते दोघे गेले.

मुनीश्वरांनीं राजाला धर्म व कुधर्माचें स्वरूप दृष्टान्त देऊन सांगितलें तें याप्रमाणें— दगडामध्यें जसा पृथ्वीपणा आहे तसा नीलमण्यांतही पृथ्वीपणा आहेच. पृथ्वीपणानें दोघांत समानता असली तरी गुणांच्या अपेक्षेनें नीलमण्याशीं दगड समान व अमूल्य बिलकुल नाहीं. तसें जिनधर्म (अहिंसात्मक) नीलमण्याप्रमाणें आहे व कुधर्म दगडाप्रमाणें आहे. असें सांगून गृहस्थधर्म व मुनिधर्म असे दोन भेद सांगितले. यानंप्रमाणें वानर व राजामध्यें वैर पूर्वभवापासून कसें होतें याचाही खुलासा मुनिराजांनीं केला तो ऐकून देव स्वस्थानीं गेला व तडित्केशराजाला वैराग्य उत्पन्न झालें. त्यानें आपल्या 'सुकेश' नामक पुत्राला राज्य दिलें व 'अम्बरचारी' नामक मुनीश्वराजवळ दीक्षा घेऊन तप केलें व तो स्वर्गांत देव झाला.

वानरवंशी उदधिरथ राजानेंहीं आपल्या 'किष्किन्ध' नामक पुत्राला राज्य दिलें व मुनि होऊन कर्मक्षय केला. त्यानें मोक्ष प्राप्त करून घेतला.

विजयार्धपर्वतावर आदित्यपुर नगराच्या 'विद्यामन्दर' नामक राजाला श्रीमाला नामक सुन्दर कन्या होती. तिचें स्वयंवर करावयाचें राजानें ठरविलें व सर्व विद्याधर राजांना त्यानें बोलाविलें. स्वयंवरमंडपांत किष्किन्धराजा आपल्या आन्ध्रकभावासह गेला. तसेंच अशनिवेग राजाचा मुलगा विजयसिंहही गेला. विजयसिंहाला आपल्या धनाचा व रूपाचा विशेष गर्व होता. आपल्यालाच श्रीमाला माळ घालील असें वाटत होतें. पण श्रीमालेच्या मनाला किष्किधक आवडला व तिनें त्याला वरलें. त्यावेळीं विजयसिंहानें आपल्या बाजूकडे कांहीं राजांना वळवून युद्ध केलें. युद्धांत आन्ध्रकानें विजयसिंहाला ठार मारिलें व ते दोघे बन्धु श्रीमालेला घेऊन आपल्या किष्किधानगरीला गेले.

आपल्या पुत्राला आन्ध्रकानें ठार मारिलें ही वार्ता अशनिवेगाला समजल्याबरोबर तो रागावून किष्किन्धानगरीला ससैन्य आला. तेथें घोरयुद्ध करून आन्ध्रकाला त्यानें ठार मारलें. तेव्हां किष्किधक व सुकेश राजांच्या राजधानी किष्किन्धा व लंका अशनिवेगानें जिंकल्यामुळें हे दोघे राजे पाताळलंकेंत [अलंकारपुरांत] जाऊन राहिले.

एके दिवशीं किष्किन्धराजा विमानांत श्रीमालेसह बसून मेरुपर्वतावरील जिनमंदिरांना वन्दन करण्यासाठीं गेला. परत येतांना 'मधु' नामक पर्वतावर आला तेथें त्याचें सौंदर्य पाहून येथेंच नवीन नगर रचून राहावें असें त्यानें ठरविलें व तेथें 'किष्किन्ध' नांवाचें नवीन नगर रचून तो राहूं लागला. पर्वताचेंही किष्किन्ध हेंच नांव ठेवलें.

किष्किन्धराजाला श्रीमालेपासून सूर्यरजा व ऋक्षरजा असे दोन पुत्र व रविकमला नामक कन्या झाली. रविकमलेचा किष्किंधानें मृगारिदमन राजाबरोबर विवाह केला. या मृगारिदमनानें कर्णपर्वतावर 'कर्णकुल' नगर रचलें व तो रविकमलेसह तेथें सुखानें राहिला.

अलंकारपुरांत सुकेश राज्य करीत होता त्याला तीन पुत्र माली, सुमाली व माल्यवान् हे झाले. थोर झाल्यावर त्यांनीं लंकानगरीवर चढाई केली व तेथें अशनिवेगानें स्थापन केलेल्या निर्घातविद्याधर राजाला ठार मारून लंकेत प्रवेश केला तेथें ते राज्य करू लागले. या तिघांचे विवाह क्रमशः चन्द्रवती, प्रीति व कनकावली या विद्याधर कन्याबरोबर झाले. यानीं सर्व विद्याधर राजांना नम्र केलें.

किष्किंध व सुकेश यांनीं आपल्या पुत्रांना राज्य देऊन जिनदीक्षा धारण केली व ते तपश्चरण करून स्वर्गीय देव झाले.

या पर्वांत वानर वंशाचें वर्णन केलें आहे.

---

# पर्व ६ वें

( श्रीकण्ठ व पद्मा यांचा विवाह )

त्याचे समयीं वैताढ्यावरि मेघपुरीं झाला ।
विद्याधर नृप अतीन्द्र करि तो इन्द्रासम लीला ॥ १ ॥
त्याची पत्नी श्रीमति नामें पुत्र तिला झाला ।
श्रीकण्ठाभिध कन्या देवी देवीसम लीला ॥ २ ॥
रत्नपुरेश्वर विद्याधरपति पुष्पोत्तर याची ।
निजपद्मोत्तर तनयासाठीं सुता अतीन्द्राची ॥ ३ ॥
नृपें अतीन्द्रें कीर्तिधवलवर सुयोग्य पाहून ।
दिली तयाला देवी तनया विभव हि अन्यून[3] ॥ ४ ॥
दिली अतीन्द्रें यशःसितोला कन्या श्रीदेवी ।
वार्ता ऐकुनि पुष्पोत्तर मनिं तीव्रद्वेषा वी ॥ ५ ॥
एके समयीं मेरुगिरीची जिनमन्दिरयात्रा ।
करावया श्रीकण्ठखगेश्वर गेला सुपवित्रा ॥ ६ ॥
श्रीजिनवन्दन, पूजा, स्तुति, गुणगायन भक्तिभरें ।
निघे खगाधिप निजनगराप्रति करुनि जणु स्मर[6] रे ॥ ७ ॥
पद्मा पद्मेसमान सुन्दर पुष्पोत्तरदुहिता ।
पाहुनि झाला कामें विह्वल या परि करि चिन्ता ॥ ८ ॥
सुराङ्गना वा कामसती ही वाला कोण असे ।
रूप हिचें हें अद्भुत सुन्दर मम मन रमवितसे ॥ ९ ॥
श्रीकण्ठाला पाहुनि पद्मामनांत अनुराग[9] ।
उद्भवला तो स्निग्धकटाक्षें झाला जणु सांग[10] ॥ १० ॥
चित्त तियेचें जाणुनि तेणें हरण तिचें केलें ।
नभःपथानें विमान त्याचें शीघ्र तदा चाले ॥ ११ ॥

---

१ कीर्तिधवल राजाचे वेळीं. २ जिची लीला देवाङ्गनेसारखी आहे. ३ पुष्कळ. ४ कीर्तिधवलाला. ५ उत्पन्न केलें. ६ मदन. ७ कन्या. ८ रति. ९ प्रेम. १० शरीरयुक्त.

राजसुतेला हरीत आहे कोणी तरि वीर ।
धावा धावा दासी वदल्या यावें अति शीघ्र ॥ १२ ॥
पुष्पोत्तरनृप बलवान् धावे होउनि सन्नद्ध ।
ससैन्य वेगें मागें लागे झाला कोपान्ध ॥ १३ ॥
सुकीर्तिधवला गेला तेव्हां शरण श्रीकण्ठ ।
वार्ता कथिली जी हरणाची ऐके उत्कण्ठ ॥ १४ ॥
पुष्पोत्तर त्या स्थलास आला समर सुरूं झालें ।
सागरसम निजसैन्यें सगळ्या नगरा घेरियलें ॥ १५ ॥
दूतमुखानें धवल बोलला पुष्पोत्तर भूपा ।
व्यर्थ असे हा रणोद्योग तव दे सोडुनि कोपा ॥ १६ ॥
कन्या कोणा अवश्य द्यावी नियम असे जाण ।
पद्मेनें श्रीकण्ठा वरिलें विचार मनिं आण ॥ १७ ॥
जाणुनि घ्यावें कन्येचें मन नन्तर युद्धास ।
उद्यत व्हावें काय वदावें आम्ही बुद्धास[1] ॥ १८ ॥
पद्मेची ही दूती येउनि वदे नृपालाला ।
श्रीकण्ठा मी वरिलें हरिलें तेणें मग मजला ॥ १९ ॥
म्हणून नाहीं तो अपराधी युद्ध करा बन्द ।
अभिप्राय मम ताता जाणुनि व्हा न च कोपान्ध ॥ २० ॥
आतां आमुचा विवाह करणें आपण योग्य गमे ।
श्रीकण्ठीं मम मन तन्मन ही अन्योन्यांत रमे ॥ २१ ॥
या परि ऐकुनि वच दूतीचें पुष्पोत्तर शान्त ।
सुविचारानें त्याचा तत्क्षणिं झाला कोपान्त[2] ॥ २२ ॥
श्रीकण्ठाचा विवाह केला पद्मेसह मोदें ।
प्रयाण केलें भूपें स्वपुरा भूषित जें सौधें ॥ २३ ॥
सुकीर्ति-धवल श्रीकण्ठाला वदला येथेंच ।
राहा तुजला रिपु विजयार्धीं[3] करितिल बहु जाच ॥ २४ ॥
या द्वीपाच्या वायव्येला 'वानर' नांवाचा ।
द्वीप तीनशे सुयोजनांनीं विस्तृत सौख्याचा ॥ २५ ॥

१ सुज्ञास. २ रागाचा नाश. ३ विजयार्ध पर्वतावर.

बर्बर सिंहल आदिक असती उत्तर द्वीप गम ।
स्वर्गासम अति सुन्दर असती पुरविति जनकाम ॥ २६ ॥
यांतुनि मित्रा द्वीप कोणता पसन्त वाटेल ।
स्वराजधानी करून राहा तेथें सुखशील[1] ॥ २७ ॥
अरिभय येथें अल्प हि नाहीं सदा तुझा योग[2] ।
होउनि वाटे सौख्य मला बहु तूं हि सुखें भोग ॥ २८ ॥

( वानर राजे म्हणण्याचें कारण )

स्नेहवचन हें ऐकुनि अपुल्या जिवलग मित्राचें ।
'वानर' नामद्वीपीं राहुनि भोगी सुख साचें ॥ २९ ॥
किष्किन्धाचलिं किष्किन्धापुर सुराजधानींत ।
सुकीर्तिधवल श्रीकण्ठाला ठेवी मोदांत ॥ ३० ॥
श्रीकण्ठाला तेथें वानर फलभक्षी दिसले ।
अनेक सुन्दर तेणें त्याचें मन हर्षित झालें ॥ ३१ ॥
अमारि[3] घोषुनि त्यांना देई अन्नादिक भूप ।
प्रजा हि वागे नृपासारखी होती निष्पाप ॥ ३२ ॥
ध्वज च्छत्र मुकुटांत तदाकृति कौतुक वश लिहिती ।
वानर नामें प्रसिद्ध झाले विद्याधर जगतीं ॥ ३३ ॥
राज्य वानर-द्वीपीं करिती विद्याधर म्हणुनी ।
'वानर' नामें रूढ जाहले समजावें स्वमनीं ॥ ३४ ॥
श्रीकण्ठाला वज्रकण्ठ या नामें सुत झाला ।
अकुण्ठ[4] विक्रम त्याचा पाहुनि मनिं नृप बहु धाला ॥ ३५ ॥
एके दिवशीं नन्दीश्वर सद्द्वीपीं अमरांना ।
शाश्वत[5] जिनवन्दनार्थ पाही नरपति जातांना ॥ ३६ ॥
बसुनि विमानीं तोहि निघाला नभास आक्रमुनि ।
परि मनुजोत्तर[6]-गिरिवरि त्याचें पावें स्खलन झणी ॥ ३७ ॥
गेले सगळे देव विमानें त्वरें निघून पुढें ।
हाय हाय मी क्षुद्रशक्तिनर जाउ कसा तिकडे ॥ ३८ ॥

---

१ सुखस्वभावाचा. २ सम्बन्ध. ३ मारूं नये अशी आज्ञा देऊन. ४ ज्याचा पराक्रम अडविला जात नाहीं असा. ५ अकृत्रिम जिनप्रतिमा. ६ मानुषोत्तर पर्वतावर.

नन्दीश्वरिं मी जिननाथांच्या अकृत्रिम प्रतिमा ।
वन्दुनि पूजिन बहुभक्तीनें ज्यांना नच उपमा ॥ ३९ ॥
अर्पण त्यांच्या चरणावरि मी करीन विविध फुलें ।
मस्तक भूमीवरि मी टेकुनि अर्पिन सुरस फलें ॥ ४० ॥
या परि केलें मनीं मनोरथ झाले ते विफल ।
पूर्वाशुभ जें कर्म तयाचा उदयचि या मूल ॥ ४१ ॥
आतां ऐशीं करीन कर्मे जेणें अन्य भवीं ।
द्वीपा नन्दीश्वरास जाइन जीं शुभ सुफला वी ॥ ४२ ॥
विचार या परि करून आला परत स्वस्थाना ।

( श्रीकण्ठास मुक्ति प्राप्ति )

वज्रकण्ठ सुत वसवुनि राज्यीं त्यागी संगगणा ॥ ४३ ॥
करून कर्मक्षया मिळविला मोक्ष तयें विमल ।
अखण्ड शाश्वत सौख्य भोगितो नसे जयांत मल ॥ ४४ ॥
होउनि गेले वानरवंशीं अनेक भूपाल ।
वज्रगलादि[1] स्वर्मुक्तीचें सुखभाजन विमल ॥ ४५ ॥
श्रीमुनिसुव्रततीर्थीं झाला नृपाल उदधिरथ ।
वानरवंशीं नसे सोडिला ज्यानें सत्य पथ ॥ ४६ ॥
लङ्कानगरीं सुव्रत-तीर्थीं राक्षस-वंशांत ।
तडित्केशनृप झाला उभय स्नेही धीमन्त ॥ ४७ ॥

( वानर मरून उदधिकुमार असुर होतो )

एके दिवशीं तडित्केशनृप निजाङ्गनासहित ।
उपवनिं गेला क्रीडेकरितां घडे तिथें मात ॥ ४८ ॥
क्रीडातत्पर नृपाल असतां कोणी कपि आला ।
उतरुनि वृक्षावरून खालीं स्त्रीवृन्दीं शिरला ॥ ४९ ॥
श्रीचन्द्रा जी तडित्केश-नृपवराङ्गना[2] होती ।
स्वनखें स्तनयुग तिचें विदारी झाली भययुत ती ॥ ५० ॥
नृपें पाहतां कोपानें शर फेकुनि खर[3] एक ।
वानर केला विद्ध असह्य स्त्रीदुःखें देख ॥ ५१ ॥

---

१ वज्रकण्ठ आदिक. २ सुन्दर स्त्री. ३ तीक्ष्ण.

बाणें विह्वल थरथर कापत वानर तेथून ।
धावत गेला जेथें होता जैनश्रमण-गण[1] ॥ ५२ ॥
दुःख तयाचें असह्य पाहुनि दयें मुनि द्रवले ।
अन्नजलासह वैरत्यागीं तयास रत केलें ॥ ५३ ॥
कानीं कथिला पञ्चगुरूंचा[2] तयें नमस्कार ।
मृतिसमयीं तूं कपे, मन्त्र हा हितकर अवधार ॥ ५४ ॥
मुन्युपदेशें तत्पर झाला कपि मन्त्रश्रवणीं ।
उदधिकुमारासुर तो झाला तत्क्षणिं शुभमरणीं ॥ ५५ ॥
अवधिज्ञानें पूर्वजन्म निज जाणुनि सुर आला ।
पूर्व शरीरा पूजुनि निजमनिं आनन्दित झाला ॥ ५६ ॥
भूपाज्ञेनें इकडे वानरगणास माराया ।
सज्ज जाहले किङ्कर येई प्रकोप[3] सुरहृदया ॥ ५७ ॥
स्वविक्रियेनें वानरसेना करून उत्पन्न ।
लढू लागला नृपपुरुषांसह[4] होई न च खिन्न ॥ ५८ ॥
कित्येकांनीं शिला उचलिल्या कोणी वृक्षास ।
पाहुनि नृपनर पळू लागले धैर्य न कोणास ॥ ५९ ॥
दुष्टा पाप्या भूपा तुजला कोणी न च शरण ।
म्हणून त्याला घेरिति वानर नृप हो मनिं खिन्न ॥ ६० ॥
चिन्ती इतुकें वानरवृन्दीं कैसें बल आलें ।
अन्यचि कांहीं तरि दिसतें हें विनयें मग बोलें ॥ ६१ ॥
बोला तुमचीं दिव्यशरीरें मजला दिसतात ।
विस्मयकारक शक्ति न कपिगणिं सत्य वदा तात ॥ ६२ ॥
बघुनि नम्रता खगराजाची[5] कपिचर[6] देव वदे ।
वृत्त सांगतो तुजला माझें श्रवणीं तें पडु दे ॥ ६३ ॥
पशुस्वभावीं चञ्चल वानर पूर्वभवीं होतो ।
कृतापराधें तुवा खगेन्द्रा बाणें वधिला तो ॥ ६४ ॥

---

१ जैनसाधुसमूह. २ अरिहंत, सिद्ध, आचार्य, उपाध्याय व साधु यांना पंचगुरु म्हणतात त्यांचा पंचनमस्कार मन्त्र " णमो अरहंताणं, णमो सिद्धाणं, णमो आइरियाणं, णमो उवज्झायाणं, णमो लोए सव्व सव्वसाहूणं ". ३ मोठा राग. ४ राजाच्या योद्ध्यांबरोबर. ५ विद्याधर राजाची. ६ पूर्वजन्मीं वानर असलेला.

मुनिप्रसादें दिव्यामरतनु मजला लाभे ही ।
प्रगट दाखवी वैभव विस्मित खगपतिही पाही ॥ ६५ ॥
नंतर तो सुर खगभूपासह गुरुसंनिध गेला ।
प्रदक्षिणात्रय देऊनि विनयें प्रणाम पदिं केला ॥ ६६ ॥
सुगुरो वानर असुनि हि मजला आपण देवपणा ।
वत्सलभावें दिला वंदितों मी अपुल्या चरणां ॥ ६७ ॥

( मुनिराज तडित्केश राजाला व उदधिकुमाराला धर्मोपदेश करतात )

मुनीश वदले सुरविद्याधर ! धर्म तुम्हां कथितों ।
जिनेश्वराचा जो प्राण्यांच्या भवभीतिस मंथितो[1] ॥ ६८ ॥
नाम धर्म परि असे जयाची कृति त्या उलटीच ।
अशा अधर्मा विचारजड[2] जे सेविति जन साच ॥ ६९ ॥
मार्ग असे हा न जाणतां जो दिशि त्या जरि जाई ।
दीर्घकाल जरि होइल इष्टस्थान न त्या येई ॥ ७० ॥
प्राणिवधादिक जीव अधर्मा धर्मचि मानून ।
विषयलम्पटी सेवन करिती प्रमत्त होऊन ॥ ७१ ॥
मिथ्यादर्शन दूषित मानव अधर्म सेवून ।
तिर्यङ्नारक दुःखगणाचें करिती अनुभवन ॥ ७२ ॥
कुहेतु भरले अशा कुशास्त्रा वदती कुगुरु जन ।
धर्मेच्छेनें मूढ ताडिती नभा वृथा जाण ॥ ७३ ॥
कुशासनामधि कांहीं दिसतो हिंसादिकरहित ।
देहश्रमकर धर्म मानवा परि तो करि अहित ॥ ७४ ॥
सम्यग्दर्शन-रहित असा तो मूलच्छिन्न गणा ।
ज्ञान क्षुद्र नि कुचरित मुक्तिस कारण न च माना ॥ ७५ ॥
दगड हि पृथ्वी नील रत्नही पृथ्वी जरि असती ।
पृथ्वीत्वानें, गुणादिकांनीं सम ते न च होती ॥ ७६ ॥
मिथ्यात्व्यांनीं जनास कथिला दगडासम धर्म ।
नीलमण्यासम जैनधर्म हा वदती बुध वर्म ॥ ७७ ॥

---

१ नष्ट करितो. २ विचार नसल्यामुळें जड-मूर्ख.

जिनधर्माचें दया मूल हें अवध दया मूल ।
परिग्रहींना अवध न घडतो हिंसा हेंचि कुल ॥ ७८ ॥
सत्य बोलणें धर्म असे हा त्याविण सुख नाहीं ।
चोरी आणिक परनारीचें वर्जन सुख पाहीं ॥ ७९ ॥
धनलाभामधिं तोष मानणें इन्द्रियजय करणें ।
कषायकृशता[1] ज्ञानिगणामधिं विनय सदा वरणें ॥ ८० ॥
जे सद्दृष्टि श्रावक त्यांचीं व्रतें अशीं जाणा ।
गृहरहितांच्या[2] ऐका धर्मा जो करि कल्याणा ॥ ८१ ॥
वस्त्र न ज्यांना ऐसे मुनिवर हेच महाभूप ।
भवशत्रूला[3] ठार मारिती जे मनिं निष्पाप ॥ ८२ ॥
पांच महाव्रत-गजारूढ जे अङ्गीं घालून ।
त्रिगुप्ति[4] चिलखत दृढ भय[5] ज्यांच्या मनास ठावे न ॥ ८३ ॥
पञ्चसमिति[6] ही पाइक सेना ज्यांची शूर असे ।
नाना सुतपें तीक्ष्ण शस्त्रगण चित्तकरांत वसे ॥ ८४ ॥
कषाय वीरें रक्षित ऐशा मोहगजावरती ।
चढून वसला अशा भवारिस मुनिभूपति वधिति ॥ ८५ ॥
सर्वारम्भत्यागें[7] शोभे सम्यक्त्वें युक्त ।
दशधर्म[8]-स्थित मुनीश्वरांचा सुधर्म संक्षिप्त ॥ ८६ ॥
असा धर्म हा त्रिलोकलक्ष्मी द्याया हेतु असे ।
पुरुषश्रेष्ठें जिनेंचि कथिला मङ्गल सतत दिसे ॥ ८७ ॥
काय कथावा सुगुण तयाचा त्रिलोक-शिखरांत ।
महासौख्य हा सदैव देतो नसेचि ज्या अन्त ॥ ८८ ॥

---

१ क्रोधादिक विकार कमी करीत जाणें. २ मुनींच्या. ३ संसाररूपी वैरी. ४ मन, वचन व शरीर ताब्यांत ठेवणें त्या मनोगुप्ति, वचनगुप्ति व कायगुप्ति होत. ५ इहलोक भय, परलोक भय, वेदना भय, आकस्मिक भय आदिक सात भयें. ६ इर्यासमिति, भाषासमिति, आदिक पांच समिति. दिवसा मार्गानें जीवांना पीडा न होईल असें जाणें, हितकर बोलणें, निर्दोष आहार घेणें, वस्तु घेणें किंवा ठेवणें या क्रिया करतांना जीवांना पीडा होऊ न देणें व मलमूत्र, शेंबूड वगैरे निच्छिद्र जीवरहित जमीनीवर टाकणें या पांच समिति. ७ सर्व हिंसात्मक क्रियांचा त्याग करणें. ८ क्षमामार्दवादिक दहा धर्म.

गृहिधर्मानें स्वर्गीं मिळती नानासुखभोग ।
मनांत चिन्ता करिता ज्यांचा घडतो संयोग ॥ ८९ ॥
निर्वस्त्रांच्या धर्में मनुजा मिळतें मुक्तिसुख ।
अबाध अनुपम अन्तविवर्जित सदैव निर्दुःख ॥ ९० ॥
स्वर्गीं गेले ते नर तेथुनि येउनि मुनि होती ।
अल्पभवांनीं मुक्तिरमेच्या परमसुखा वरिती ॥ ९१ ॥
कुधर्मरत जे मानव असती त्यांना स्वर्ग मिळे ।
काकताल-फलपतन न्यायें, सुख परि दूर पळे ॥ ९२ ॥
कुयोनिमध्यें सन्तत फिरती दुःखें भोगीत ।
काल तयांचा तेथें जातो नसे चि त्या गणित ॥ ९३ ॥
उत्तम आहे वाक्य जगामधिं फक्त जिनाचेंच ।
उत्तम आहे जिनेश्वराचें कथिलें तप साच ॥ ९४ ॥
उत्तम आहे धर्म जिनाचा उत्तम मत हेंच ।
याहुनि सगळीं कुमतें खोटीं देती बहु जाच ॥ ९५ ॥
नगरा जाया पथिक निघाला मार्गीं वृक्षांची ।
खेद-निवारक छाया मिळते द्याया सुख साची ॥ ९६ ॥
जिनमार्गानें मोक्षा जाया झाला उद्युक्त ।
सुरनर-खेचर-रमा नरा त्या मिळे अतित्वरित ॥ ९७ ॥
जे इन्द्रादिक भोग तयांचें कारण जिनधर्म ।
असे चि विस्मय यांत न कांहीं तो देई शर्म ॥ ९८ ॥
गृहि-मुनिधर्माहून असे जें लोकीं विपरीत ।
धर्म तयाला द्यावें नाम न अधर्म तो खचित ॥ ९९ ॥
अशा अधर्में फिरे जीव हा बहु पशुयोनींत ।
वाहन ताडन छेदन भेदन दुःख असे जींत ॥ १०० ॥
नरकबिलें जीं नाना असतीं ज्यामधिं तम दाट ।
थण्ड वायुनें देती नारक जीवा अति कष्ट ॥ १०१ ॥
नरकप्राणी जेथें अनलें[1] दुःखी होतात ।
नानायन्त्रीं देह जयांचें पिळिले जातात ॥ १०२ ॥

---

१ अग्नीनें.

सिंह व्याघ्र नि गिधाड होउनि अन्योन्या खाती ।
चक्र नि भाले करवत यांनीं अन्योन्या वधिती ॥ १०३ ॥
कथिल नि तांबें शिसें तयांच्या रसास पाजून ।
गांधिणमाशा मधमाशांनीं चावविती जाण ॥ १०४ ॥
या परि देती परस्परांना नारक नरकांत ।
दुःखें ज्यांचें वर्णन करण्या गुरु हि न हो शक्त ॥ १०५ ॥
या परि तुम्हीं उभयें केलें दुःखद योनींत ।
धर्में वर्जित भवभ्रमण तें घ्यावें ध्यानांत ॥ १०६ ॥
पुढें हि ऐशी प्रवृत्ति तुमची सन्तत होईल ।
पुनः भवान्तरिं[1] नाना दुःखें अवश्य भोगाल ॥ १०७ ॥
हे मुनिवर्या कुयोनिमध्यें आम्हा उभयांचें ।
भ्रमण जाहलें कैसें सांगा दुःखद जें साचें ॥ १०८ ॥
या परि बोलुनि वचनांनीं स्तुति पुनः पुनः करुन ।
सुममालांनीं पूजुनि पदयुग देव करी नमन ॥ १०९ ॥

( तडित्केशाचें व वानराचें पूर्वभवांचें वर्णन )

वैर वानरावरि का माझें हेतु वदा त्याचा ।
मुनिवर वदले ऐक खगेशा मी वदतो साचा ॥ ११० ॥
श्रावस्तीपुरि अमात्यनन्दन नृपते झालास ।
काशीदेशीं हे देवा तूं लुब्धक[3] होतास ॥ १११ ॥
सचिवसुतानें विषयापासूनि विरक्त होऊन ।
श्रीजिनदीक्षा घेऊनि केलें तपांत मन लीन ॥ ११२ ॥
विहरत विहरत काशीदेशीं वनांत मुनि आला ।
प्राणिविवर्जित[2] जागीं आत्मध्यानीं रत झाला ॥ ११३ ॥
सम्यग्दृष्टि नि कुलीन नारी मुनिपद पूजाया ।
आल्या तेथें ज्यांच्या हृदयीं श्रद्धा प्रेम दया ॥ ११४ ॥
आला तेथें खल अविवेकी क्रूर असा व्याध[3] ।
स्त्रीवृत पाहुनि मुनीस झाला मनांत तो क्रुद्ध ॥ ११५ ॥
स्नानें विरहित मलिनशरीरीं नग्न नि निर्लज्ज ।
अशकुन वाटे शिकार-कार्यी हा योगी आज ॥ ११६ ॥

---

१ पुढीलजन्मीं. २ जीवजन्तूंनीं रहित शुद्ध जागा. ३ पारधी.

बोलुनि ऐशीं नानावचनें कठोर अन् निन्द्य ।
शरादिकांनीं भिववी श्रमणा जो सुरनर-वन्द्य ॥ ११७ ॥
या परि बोलत भिववित असतां मुनीस तो व्याध ।
क्रोधें कलुषित[1] झालें मुनिवर विचार बहुशुद्ध ॥ ११८ ॥
रूक्षभाषणीं या व्याधाला ठोकुनि मुष्टींनीं ।
मारुनि टाकिन विचारधारा येती योगिमनीं ॥ ११९ ॥
झाला अष्टम[2] कापिष्ठाख्य स्वर्गाचा बन्ध ।
मुनीस होता परि तो झाला अतिशय कोपान्ध ॥ १२० ॥
झाला तेव्हां शुभकर्माचा अतिशय अपकर्ष[3] ।
ज्योतिर्वासी देवायूचा राहे अवशेष ॥ १२१ ॥
आयुष्यान्तीं मरून झाला ज्योतिर्देव मुनि ।
तडित्केश खग झाला नन्तर तोचि नभोगमनी[4] ॥ १२२ ॥
व्याध हि भववनिं फिरून झाला वानर चिरकाल ।
तयास बाणें तुवा मारिलें झाला बहु विकल[5] ॥ १२३ ॥
पञ्चगुरूंचा नमस्कार ज्या अपराजित[6] मन्त्र ।
म्हणतीं मिळतां झाला कपि तो ' सागर ' नाम सुर ॥ ११४ ॥
निजभववृत्ता ऐकुनि देवें मुनिवदनांतून ।
करून वन्दन केलें त्यानें स्वस्थानीं गमन ॥ १२५ ॥

( तडित्केश विद्याधर राजा दीक्षा घेऊन स्वर्गी देव होतो )

तडित्केशखग सुकेशतनया स्वराज्य देऊन ।
अम्बरचारिश्रमणशिष्य तो झाला तपिं लीन ॥ १२६ ॥
सम्यग्दर्शन सम्यग्ज्ञान नि सुचरित पाळून ।
समाधिमरणें स्वर्गी झाला सुर ऋद्धिस्थान ॥ १२७ ॥

( श्रीमाला किष्किन्धास वरते )

नृपति घनोदधिरव नांवाचा किष्किन्धानगरीं ।
देउनि आत्मज किष्किन्धाला स्वराज्य-विरति[7] उरीं ॥ १२८ ॥
धरून घेई मुनिवरदीक्षा करून तप घोर ।
सुव्रततीर्थी मुक्त जाहला होउनि मुक्तिवर ॥ १२९ ॥

---

१ मलिन. २ आठवा. ३ हानि. ४ आकाशगमन करणारा विद्याधर. ५ दुःखी. ६ केव्हांहि ज्याचा पराजय होत नाहीं असा. ७ वैराग्य.

विजयार्धाचलिं रथनूपुरपुर अमरपुरा सदृश ।
अशनिवेगखग नायक तेथें भासे अमरेश ॥ १३० ॥
झाले त्याला पुत्र दोन जणु बाहुद्वय[1] त्याचें ।
विजयसिंहसुत विद्युद्वेग नि पराक्रमी साचे ॥ १३१ ॥
आदित्याभिध नगरीं विद्यामन्दर राज्य करी ।
वेगवती त्या राणी सुन्दर भासे जणु अमरी ॥ १३२ ॥
या उभयांना तनया झाली श्रीमाला सुदंती[2] ।
उदरीं आली या उभयांच्या रति जणु मूर्तिमती ॥ १३३ ॥
तिच्या स्वयंवरसमयीं जनकें खगभूपति सारे ।
आले बोलाविल तेधवा तेथें हर्षभरें ॥ १३४ ॥
विजयसिंह ही रूपमदानें तेथें येऊन ।
वसे मञ्चकीं गमे जनांना जणु हा रतिरमण ॥ १३५ ॥
श्रीमालेची किष्किन्धावरि दृष्टि तदा पडली ।
रूप मनोहर त्याचें पाहुनि तयांत ती रमली ॥ १३६ ॥
श्रीमालेनें कण्ठीं घालुनि त्याच्या वरमाला ।
वरिलें त्याला तदा क्षोभ बहु खगव्रजीं[3] झाला ॥ १३७ ॥
विजयसिंह हा सिंह साहसी गर्जुनि तें वदला ।
कोपें भीषण लाली आली त्याच्या वदनाला ॥ १३८ ॥
विद्याधर नृप कोठें कोठें विरूप वानर हे ।
तुम्ही येथुनि शीघ्र पळावें अरण्य हें नोहे ॥ १३९ ॥
वन्य फळें न च येथें निर्झर गिरिकन्दर थोर ।
न वानरांचा गणही येथें जा येथुनि दूर ॥ १४० ॥
कन्या घेउनि या हाकालुनि यांना येथून ।
किष्किन्धान्धक यांचें येथें असे प्रयोजन न ॥ १४१ ॥
किष्किन्धाच्या कांहीं झाले खगेन्द्र बाजूस ।
विजयसिंह-खगपक्षीं कांहीं उद्यत समरास ॥ १४२ ॥
खड्गें कुन्तें[4] बाणें झालें युद्ध तदा घोर ।
पतन पावले लढून कांहीं योद्धे रणशूर ॥ १४३ ॥

---

१ दोन हात. २ जिची सुन्दर दन्तपंक्ति आहे अशी. ३ विद्याधरसमूहांत.
४ भाल्यांनीं.

विजयसिंह खग आन्ध्रक वीरापासुनि मृति[1] पावें ।
खग तत्पक्षी सकल पळाले भिऊन शत गांवें ॥ १४४ ॥
किष्किन्धानें श्रीमालेला किष्किन्धानगरीं ।
नेलें जणु जयलक्ष्मी आली वाटे नृपतिघरीं ॥ १४५ ॥
पुत्रवधानें अशनिवेग खग अतिशय खवळून ।
किष्किन्धापुर घेरी वेगें निर्दय होऊन ॥ १४६ ॥
आन्ध्रक आणिक अशनिवेग हे अन्योन्या समरीं ।
रोषें बाणें ताडन करिती दया न लवहि उरीं ॥ १४७ ॥
कोपें आन्ध्रकमस्तक तेणें जेव्हां तोडियलें ।
सैन्य कपीचें दहा दिशांना पळुनि भयें गेलें ॥ १४८ ॥

( किष्किंधाचा अलंकारपुरांत निवास )

लंकाकिष्किन्धापति[2] दोघे सोडुनि लङ्केस ।
अलंकारपुरिं केला त्यांनीं सशोक विनिवास ॥ १४९ ॥
एके समयीं अशनिवेग नृप विरक्त मनिं झाला ।
विलीन शारदमेघा पाहुनि सोडुनि नृपलीला ॥ १५० ॥
विषयजें[3] मिळतें सुख जें जीवा विनाश पावे तें ।
मनुष्यभव हा दुर्लभ आहे न च समजे त्यांतें ॥ १५१ ॥
विचार थापरि करून त्यानें राज्य सहस्रारा ।
निज-तनयाला दिलें अमोहें समजुनि मनिं कारा[4] ॥ १५२ ॥
विद्युन्नामक निजपुत्रासह वनांत तप घोर ।
करूं लागला जेणें होतें आत्मिक हित थोर ॥ १५३ ॥
लंकानगरीं निर्घाताभिध खेचर राज्य करी ।
अशनिवेग नृप नियुक्त होउनि मनिं प्रमोद धरी ॥ १५४ ॥
श्रीमालेसह एके समयीं आला बाहेर ।
निजनगरांतुनि निर्भय होउनि फिरे नभिं स्वैर[5] ॥ १५५ ॥
मेरुपर्वतीं जिनास वन्दुनि येतांना परत ।
एका गिरिची शोभा त्याचें प्रसन्न करि चित्त ॥ १५६ ॥

---

१ मरण. २ सुकेश व किष्किन्धक हे दोन राक्षसवंशी व वानरवंशी राजे. ३ स्पर्शादिकापासून उत्पन्न होणारें. ४ कैदखाना. ५ स्वच्छन्दानें.

सुन्दर येथें पुर वसवावें इच्छी मन कान्ते ! ॥ १५७ ॥
अलङ्कारपुरिं पातालाच्या उदरीं राहून ।
खिन्न जाहलें मानस माझें येथें रमवीन ॥ १५८ ॥
बोलुनि यापरि विमानांतुनी उतरे गिरिवरती ।
स्वर्गमनोरम किष्किन्धापुर रचिलें शीघ्रगति ॥ १५९ ॥
या शैलाचें पूर्वी होतें मधु ऐसें नाम ।
किष्किन्धाचल नामें आतां झाला सुखधाम ॥ १६० ॥

( रविकमला व मृगारिदमनाचा विवाह )

सम्यक्त्वी जिनपूजनरत नित राही मोदानें ।
श्रीमालेसह सौख्यें भोगित जया न किमपि उणें ॥ १६१ ॥
या उभयांना 'सूर्यरजा'सुत 'ऋक्षरजा' दुसरा ।
'रविकमला' या नामें कन्या झाली बहु चतुरा ॥ १६२ ॥
पाहुनि सुन्दर रूप जियेचें विद्याधर झाले ।
कामशरानीं विह्वल चिन्तातुरत्व मुखिं आलें ॥ १६३ ॥
मेघपुरामधि खेचर नरपति सुमेरु नांवाचा ।
वसे मघोनी राणी त्याची मधुर जिची वाचा ॥ १६४ ॥
तनय तयांना नाम जयाचें 'मृगारिदमन' असे ।
धैर्य पराक्रम सत्यवादिता गुणगण ज्यांत वसे ॥ १६५ ॥
किष्किन्धाची सुता तयाला रविकमला दिसली ।
लाभ हिचा जर मजला होइल चिन्ता नच कसली ॥ १६६ ॥
विचार ऐसा चित्तीं येउनि रात्रन्दिनिं असुखी ।
झाला चिन्ता मनीं तयाच्या पसरे कालमुखी[1] ॥ १६७ ॥
सन्मित्रांनीं किष्किन्धाला कथिलें जाऊन ।
रविकमलेला मृगारिदमनचि सुयोग्य वर जाण ॥ १६८ ॥
ऐकुनि भापण खेचर-भूपें सुमेरु खगवर्या ।
कथिलें देतों तुझ्या सुताला मम दुहिता आर्या[2] ! ॥ १६९ ॥
मृगारिदमनें रविकमलेचा कर करिं घेऊन ।
प्रमोदार्णवीं[3] प्रवेश केला दुःखां विसरून ॥ १७० ॥

---

१ काळ्या तोंडाची चिन्ता. २ हे सज्जना. ३ आनन्दसमुद्रांत.

वसुनि विमानीं तिच्या सवें तो कर्णाचलिं गेला ।
कर्णकुण्डला रचून नगरी भोगी सौख्याला ॥ १७१ ॥

[ माली सुमाली व माल्यवान् यांचा जन्म व विद्याप्राप्ति ]

सुकेश आणिक इन्द्राणी या विद्याधरयुगला[1] ।
सुपुत्र झाले महाविक्रमी करिती वहुलीला ॥ १७२ ॥
माली पहिला दुजा सुमाली तिजा माल्यवान ।
प्रसिद्ध झाले हे गुणभूषण पराक्रमैकधन ॥ १७३ ॥
अनेक विद्या सिद्ध तयांना झाल्या सुखदायी ।
देवासम ते क्रीडा करिती गिरि-सरिता-ठायीं ॥ १७४ ॥
सुकेश एके दिनीं बोलला क्रीडा करण्यास ।
किष्किन्धाचलिं[2] जावें सुत हो नान्यस्थानास ॥ १७५ ॥
दक्षिणसागर-समीप जाणें सुखद न होईल ।
गमन होय जरि कदापि तुम्हां होय न हितमूल ॥ १७६ ॥
ऐकुनि भाषण नमुनि पित्याचे सुत ते पदकमला ।
कारण याचें कथा पिताजी आतां आम्हांला ॥ १७७ ॥

[ दक्षिण सागराकडे न जाण्याचें कारण कथन ]

सांगायाला योग्य नसे तें ऐसें जनक वदे ।
हट्ट मुलांनीं धरिला असतां सांगे वहु खेदें ॥ १७८ ॥
ऐका सुत हो पूर्वी केला स्थापन लङ्केंत ।
निर्घाताभिध खेचर अतिशय दुष्ट नि बलवन्त ॥ १७९ ॥
अशनिवेगखगपतिनें आम्हा त्या नगरींतून ।
दिलें हकालुनि होति प्रिय जी जैसे स्वप्राण ॥ १८० ॥
स्थानीं स्थानीं त्या उभयांनीं स्थापियले हेर ।
अमुचीं छिद्रें पहावयाला असती ते चतुर ॥ १८१ ॥
जागोजागीं मारक यन्त्रें स्थापियलीं त्यांनीं ।
यास्तव दक्षिणसागर तुम्ही वर्जावा नगनीं ॥ १८२ ॥
यापरि जेव्हां कथिलीं तातें स्वकथा दुःखाची ।
उभी राहिली नेत्रयुगामधिं पङ्क्ति अश्रूंची ॥ १८३ ॥

---

१ पति-पत्नींना. २ किष्किन्ध पर्वतावर.

तेव्हां माली क्रोधें वदला गर्वस्मित[1] करून ।
स्वपुष्टभुजयुग विशाल वक्षःस्थल[2] हें पाहून ॥ १८४ ॥
कां नच कथिला आम्हां पूर्वी ताता ! वृत्तान्त ।
स्नेहानें ह्या असो रिपूचा आतां करू अन्त ॥ १८५ ॥
वदुनि असे ते शस्त्रें भीषण बन्धु तिघे क्रोधें ।
राक्षस-सेना घेउनि निघती पराक्रमी योद्धे ॥ १८६ ॥
त्यांनीं मार्गीं रिपुपक्षाचे केले नर ठार ।
कांहीं नम्र नि केले कांहीं स्थानच्युत वीर ॥ १८७ ॥

[ निर्घाताला ठार मारून माली आदिकांचा लंकेत प्रवेश ]

घोरपराक्रम पाहुनि त्यांचा आले सामन्त ।
शरण तयाला लढावयाला आला निर्घात ॥ १८८ ॥
तीक्ष्ण शरांचा करून मारा रिपु जर्जर केला ।
समीप जाउनि मग मालीनें अन्ता प्रति नेला ॥ १८९ ॥
निर्घाताच्या मरणा पाहुनि दानव लङ्केला ।
त्यागुनि गेले विजयार्धावरि अपुल्या स्थानाला ॥ १९० ॥
शस्त्र गळ्यामधिं बान्धुनि आले कांहीं रिपु शरण ।
अभय तयांना देतां त्यांचें प्रसन्न होय मन ॥ १९१ ॥
मालि सुमालि नि माल्यवन्त हे बान्धव लङ्केंत ।
जननी-जनका-सहित राहती जिनपदिं अनुरक्त ॥ १९२ ॥

[ लङ्केंत मालि आदिक त्रिबन्धूंचा विवाह व सानंद राज्यपालन ]

हेमपुराधिप-हेमखगाची चन्द्रवती दुहिता ।
वरून माली भोगी सौख्या जी शीलांत रता ॥ १९३ ॥
प्रीतिकान्त-खगकन्या होती प्रीति जिचें नाम ।
तिला सुमाली वरून झाला सुखी नि गुणधाम ॥ १९४ ॥
कनकखगाची सुन्दर कन्या कनकावलि तिजला ।
वरून मोदें माल्यवन्त नित भोगी सुखमाला ॥ १९५ ॥
उभय-श्रेणी-खगनृप केले वश त्रिबन्धूंनीं ।
आज्ञा मानिति खगनृप सगळे करयुग जोडोनी ॥ १९६ ॥

१ गर्वानें गालांत हंसणें. २ विस्तीर्ण छाती.

सुकेश आणिक किष्किन्धाधिप खगेन्द्र हे दोन ॥
स्वराज्य देउनि झाले पुत्रा निर्ग्रन्थश्रमण ॥ १९७ ॥

विषयज सौख्या भोगुनि सज्जन विरक्त होतात ॥
कर्मध्वंसक-जिनोक्त-शिवपथ उन्नत वरितात ॥ १९८ ॥

आत्मध्यानें जाळुनि पापें होउनि निःसङ्ग ।
अजरामर ते मुक्तिश्रीच्या होती सुखीं दंग ॥ १९९ ॥

महापुरुष जे जिनेश्वराचे होती नित दास ।
सद्गुण मिळवुनि अल्पभवांनीं वरिति शिवश्रीस ॥ २०० ॥

## आर्या

त्यागुनि सकलपरिग्रह शुक्लध्यानें समस्त कर्मगणा ।
जाळुनि सिद्धावासी योगी होतात मुक्तिवर-राणा ॥ २०१ ॥

यापरि जिनदासानें होउनि निर्मोह चरित रत व्हावें ।
रविसम तिमिरा नाशुनि सुबोध राज्यास सतत मिळवावें ॥ २०

इति श्रीरविषेणाचार्यकृते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत
पद्यानुवादे पद्मपुराणे राक्षसवंशाधिकारः षष्ठं पर्व ॥ ७ ॥

## सातव्या पर्वांतील कथांचा सारांश

### इन्द्राचा जन्म

अशनिवेग विद्याधर राजाला सहस्रार नामक शूर पुत्र होता. हा सहस्रार विजयार्ध पर्वतावरील रथनूपुर नामक नगराचा राजा होता. याच्या पत्नीचें नांव चित्तसुन्दरी होतें. इन्द्राच्या वैभवाची इच्छा बाळगणारा एक देव हिच्या गर्भात आला. त्यामुळें तिला इन्द्रपदाचे डोहाळे झाले. राजा सहस्रारानें ते विद्येच्या सामर्थ्यानें पूर्ण केले. जन्मल्यावर राजानें इन्द्र हें नांव ठेविलें. बालपणा संपून हा तरुण झाला. पराक्रमानें यानें सर्व विद्याधर राजांना जिंकिलें. याचे ठिकाणीं विद्या, विनय व शील इन्द्राप्रमाणें होते. यानें स्वत:ला इन्द्र मानिलें. चार बलिष्ठ विद्याधर राजांना सोम, यम वगैरे नांवें देऊन दिक्पाल केलें. बाह्य, अभ्यन्तर व मध्य अशा तीन सभांची रचना करून आपल्या राजधानीचें 'अमरावती' नांव ठेवलें. आपल्या शस्त्राला 'वज्र' हें नांव देऊन स्वत:च्या हत्तीचें ऐरावण नांव ठेवलें. त्यानें स्वत:च्या वारस्त्रियांचीं नांवें रम्भा, उर्वशी वगैरे ठेविलीं. आपल्या सेनापतीचें 'नैगमेषी' असें नांव ठेवून तो राज्य करूं लागला.

लंकेंत राज्य करीत असलेल्या माली नामक विद्याधराला इन्द्राचें वैभव सहन झालें नाहीं व तो त्याच्याशीं युद्ध करण्यास निघाला. वाटेंत पुष्कळ अपशकुनें झालीं व त्याच्या भावानें सुमालीनें परत राजधानीकडे चलण्याविषयीं विनविलें पण त्यानें तें मान्य केलें नाहीं. इन्द्र व मालीचें मोठें युद्ध झालें पण त्याला इन्द्रानें ठार मारिलें. तेव्हां सुमाली व माल्यवान हे त्याचे दोन बंधु आपल्या सेनेसहित पळत निघाले आणि अलंकारपुरांत येऊन राहिले.

इन्द्रानें लंकेच्या राज्यावर कुबेराची स्थापना केली. अलंकारपुरांत सुमाली राज्य करूं लागला. त्याच्या पत्नीचें प्रीतिमति नांव होतें. या उभयांना 'रत्नश्रवा' नामक पुत्र झाला. हा तरुण झाल्यावर वनांत जाऊन 'मनुजसुन्दरी' नामक विद्या यानें प्राप्त करून घेतली.

'कौतुकमंगल' नामक नगरांत व्योमबिन्दु राजा राज्य करीत होता. त्याला कौशिका व केकसी नांवाच्या सुन्दर कन्या होत्या. त्यानें कौशिकेचा विवाह विश्रवसा बरोबर केला व केकसीचा विवाह रत्नश्रवा बरोबर केला.

केकसीला एके रात्रीं पश्चिमप्रहरीं स्वप्नांत सिंह दिसला. त्याचें फल तिनें रत्नश्रवाला विचारलें. तुला अतिशय पराक्रमी असा पुत्र होईल असें त्याने सांगितलें. गर्भांत आलेल्या जीवामुळें आपण इंद्रालाही जिंकावें असें तिला वाटूं लागलें. तिच्या ठिकाणीं अति अभिमान उत्पन्न झाला. जे वडील सासु-सासरे त्यांनाही ती नमस्कार करीत नसे. नऊ महिन्यांनीं तिला पुत्र झाला. हा महासाहसी व शक्तिमान होता. ज्याचें नागासुर रक्षण करीत असत असा अत्यंत तेजस्वी हार त्यानें ओढून बालपणींच आपल्या गळयांत घातला. त्या हाराच्या मोठ्या तेजस्वी मण्यामध्यें त्याच्या तोंडाचें प्रतिबिंब पडल्यामुळें प्रतिबिंब रूपानें त्याचीं दहा तोंडें दिसूं लागलीं. त्यामुळें त्याचें नांव तेव्हांपासून 'दशमुख' असें प्रसिद्ध झालें.

एके वेळीं त्याचा आजा सुमाली मेरु पर्वतावर जिनवन्दना करण्यासाठीं गेला तेथें चार ज्ञानाचे धारक चारण मुनि भेटले. त्यांना वंदन करून सुमालीनें हाराकर्षणाचें वृत्त सांगितलें. तें ऐकून त्यांनीं तुझा मुलगा त्रिखण्डाधिपति होईल असें सांगितलें.

यानंतर रत्नश्रवाला कुंभकर्ण, चन्द्रनखा व बिभीषण अशीं तीन अपत्यें झालीं. एके दिवशीं रावण आपल्या धाकट्या भावासह आकाशांत पाहत असतां एक वैभवशाली विद्याधर जात आहे असें त्याला दिसलें. त्यानें मातेला हा कोण आहे असें विचारलें. ती म्हणाली हा माझ्या वडील बहिणीचा मुलगा वैश्रवण कुबेर आहे. आपले पूर्वज माली वगैरे लंकेंत राज्य करीत होते पण इन्द्रानें युद्धांत माली राजाला मारिलें व लंकाही या वैश्रवणाला त्यानें दिली.

ही हकीकत ऐकून रावण, बिभीषण व कुंभकर्णाला अतिशय राग आला व आम्ही या कुबेराला जिंकून आपली राजधानी लंका पुनः हस्तगत करूं शकतों असें सांगितलें. पण त्यापूर्वी आपण विद्याराधन करावें असें तिघा बंधूंनीं ठरविलें व ते

एका अतिशय दाट व भयंकर अरण्यांत जाऊन विद्यासाधन करूं लागले. त्या ठिकाणीं जंबूद्वीपाधिपति 'अनावृतयक्ष' आपल्या स्त्रिया व नोकरासह क्रीडा करण्यासाठीं आला. त्यांना विद्यासाधनें पासून परावृत्त करण्यासाठीं त्यांनीं पुष्कळ उपद्रव केले परंतु ते चंचल झाले नाहींत. त्यामुळें रावणाला हजारों विद्या, कुंभकर्णाला पांच व बिभीषणाला चार विद्या प्राप्त झाल्या. ही वार्ता सुमाली, रत्नश्रवादिकांना अर्थात् आजोबा, वडील इत्यादिकांना समजली. त्यांनीं आपल्या नातवांची फार प्रशंसा केली त्यामुळें रावण वगैरे लाजून खालीं पाहूं लागले.

पुण्योदयानें विद्या, वैभव आदिकांची प्राप्ति होते व तें पुण्य जिनभक्तीनें प्राप्त होतें. म्हणून मनुष्यानें जिनाचा दास बनून त्याची भक्ति करावी. याप्रमाणें या पर्वाची ही संक्षिप्त कथा आहे.

# पर्व ७ वें इन्द्रराजाची उत्पत्ति

अशनिवेग खग जनक जयाचा नृपति सहस्रार ।
वैताढ्याचलिं रथनुपुरपुरिं राज्य करी थोर ॥ १ ॥
भार्या त्याची चित्तसुन्दरी सुन्दर भाग्यवती ।
आला गर्भी कुणि सुर इच्छुनि सुरपति-पदभूति[1] ॥ २ ॥
आली कृशता तिच्या शरीरीं भूषण गळुनि पडे ।
असे कशाची तुजला इच्छा मजला सांग गडे ॥ ३ ॥
भाषण ऐकुनि हें प्रेमाचें प्रिया पतीस वदे ।
इन्द्रपदाची इच्छा माझ्या हृदया खेदा दे ॥ ४ ॥
विद्याद्वारें इन्द्रविभव तंव बनवि सहस्रार ।
तेणें झाले पूर्ण तियेचे डोहाळे चतुर ॥ ५ ॥
प्रगट जाहला विशाल विक्रम ज्याच्या बाहूंत ।
चित्तसुन्दरी प्रसवे ऐशा तनया गुणवन्त ॥ ६ ॥
इन्द्र तयाचें नाम ठेविलें सार्थक पितरांनीं ।
ये स्वर्गाची शोभा ज्याच्या जननानें[2] रानीं ॥ ७ ॥
विद्या विनय नि शील जयाचें इन्द्रासम होतें ।
अशा सुपुत्रा सहस्रार नृप देई राज्यातें ॥ ८ ॥
समस्त विद्याधर राजांना त्यानें वश केलें ।
इन्द्रदोहदें[3] स्वतःस त्यानें शचिपति मानियलें ॥ ९ ॥
चार नृपांना सोमयमादिक नांवें देऊन ।
दिशापाल हें सुनाम ठेवी स्वदिशीं स्थापून ॥ १० ॥
स्थापी बाह्याभ्यन्तरमध्या अशा सभा तीन ॥
वज्रनाम दे निजायुधाला हर्षित होऊन ॥ ११ ॥
ऐरावण हें नांव ठेविलें स्वगजाचें त्यानें ।
स्वराजधानी अमरावति या शोभे नांवानें ॥ १२ ॥
वारवधूंना[4] रम्भा आदिक नांवें देऊन ।
इन्द्रपदाला खगेन्द्र भोगी नरदेहीं असुन ॥ १३ ॥

---

१ इन्द्रपदाचें वैभव. २ जन्मानें. ३ इन्द्राचे डोहाळे. ४ वेश्यांना.

पायदळाचा होता नायक विद्याधर त्यास ।
सुनैगमेषी सुनाम ठेवुनि रमवी हृदयास ॥ १४ ॥
निजपरिवारा अशीं सुनामें देउनि इन्द्रखगें ।
स्वराज्य-रक्षण केलें सन्तत निजप्रजारागें ॥ १५ ॥
ज्योतिःपुरपति सोम असे हा पूर्व दिशापाल ।
मकरध्वज सुत रविकीर्तीचा पुत्र असे विमल ॥ १६ ॥
वरुणा आणिक मेघरथाचा तनय असा वरुण ।
पश्चिम दिक्पति मेघपुरीचा नृपाल तो जाण ॥ १७ ॥
सूरखगेश्वर-कनकावलि-सुत उत्तर दिक्पाल ।
कुबेर काञ्चननगर-स्वामी रूपें तेजाळ ॥ १८ ॥
कालाग्नि-श्रीप्रभादम्पती-सुत दक्षिणपाल ।
नाम जयाचें यम किष्किन्धा नगरी भूपाल ॥ १९ ॥

( इन्द्रानें युद्धांत मालीचा वध केला )

मालि खगेशा सहन न झालें वैभव इन्द्राचें ।
तेणें उभयहि वैरें झालें समरोद्यत साचें ॥ २० ॥
भाऊ मन्त्री मित्र नि घेउनि अनेक खगभूप ।
माली कालप्रेरित होउनि करुनि निघे कोप ॥ २१ ॥
सिंह नि हत्ती बैल नि रेडे वराह-रूपाचीं ।
अशा वाहनीं बसुनि निघालीं सैन्यें भूपांचीं ॥ २२ ॥
काक नि गर्दभ कोल्हे सारस उजवे बाजूस ।
कठोर-रव ते करून सुचविति अनिष्ट मालीस ॥ २३ ॥
इतरहि अशकुन दुर्निमित्त-गण होती पाहून ।
सुमालि वदला दादा आतां उचित न अरिगमन ॥ २४ ॥
इथेंच राहुनि दिवस आजचा व्यतीत करु, परत ।
अथवा जाऊ निजलंकेला, गमन नसे उचित ॥ २५ ॥
संकोचित निज करून चरणा आकुल होऊन ।
शुष्कतरूची शुष्ककाटकीं वदनीं घेऊन ॥ २६ ॥

---

१ स्वप्रजाप्रेमानें. २ सूरनामक विद्याधर राजा कनकावलि त्याची राणी या दंपतीला कुबेर नामक पुत्र. ३ युद्ध करण्यास सज्ज. ४ मृत्युप्रेरित. ५ शत्रुवर चालून जाणें.

पंख आपुले पुन:पुन: हा हालवितो काक ।
सूर्या पाहुनि कर्कश वदतो शब्द कसे देख ॥ २७ ॥
ज्वाला निघती जिच्या मुखांतुनि ऐशी कोल्हीण ।
अमुच्या जाते उजव्या बाजुस दिसे न कल्याण ॥ २८ ॥
खळें जाहलें सूर्या भवती धड मस्तकहीन ।
नभांत दिसतें रक्त सारखें गळतें त्यांतून ॥ २९ ॥
पडती बघ या विजा कडाडुन पर्वत थरथरती ।
निज-कचपाशा सोडुनि वनिता बघ नभिं या भ्रमती ॥ ३० ॥
गाढव बघ हें नभाकडे मुख करून ओरडतें ।
उकरित चरणें जमीन अमुच्या जणु अशुभा कथितें ॥ ३१ ॥
यापरि ऐकुनि सुमालि-वचना माली त्या वदला ।
हसून बन्धो परतुनि जाणें गमे न उचित मला ॥ ३२ ॥
शत्रु वधावा म्हणून नृप जो करी प्रयाणास ।
फिरेल तो जरि परत कधींही उचित नसे त्यास ॥ ३३ ॥
लाल करुनि जो डोळे धावे अरीस घाताया ।
परत तयाला फिर हें म्हणणें योग्य न त्या समया ॥ ३४ ॥
यापरि बोलुनि तो विजयार्द्धीं सैन्यासह गेला ।
आज्ञालङ्घन करणाऱ्यांचा ध्वंस तयें केला ॥ ३५ ॥
वज्रायुध करिं घेउनि करिवरि होउनि आरूढ ।
इन्द्र हि रोषें निघे जयाची प्रीति रणीं गाढ ॥ ३६ ॥
सोमादिक दिक्पाल निघाले सेनापति हि निघे ।
विद्याधर-भट-सैन्य तेधवा कोपें समरिं रिघे ॥ ३७ ॥
राक्षस-सेने-सवें जाहलें युद्ध महाघोर ।
पर्वतशिखरासमान पडले रथ मोडुनि थोर ॥ ३८ ॥
प्रचण्ड-पवनें नभांत पळती जैसे श्याम घन ।
पळू लागले मदोन्मत्त गज भासे भयद रण ॥ ३९ ॥
तुटून पडलीं वीरमस्तकें दिसती राहुसम ।
खगभूपांचीं रजतच्छत्रें तुटतां चन्द्रसम ॥ ४० ॥
इन्द्रचमूनें तीव्र क्रोधें सेना मालीची ।

---

१ शत्रुवर चढाई करतेवेळीं. २ चान्दीचीं छत्रें.

केली जर्जर तिजला वाटे चिन्ता प्राणाची ॥ ४१ ॥
पळते पाहुनि सेना माझी धैर्य तिला देई ।
सुमालि-आदिक-वीरा घेउनि इन्द्रावरि जाई ॥ ४२ ॥
ज्या परि करितो वारिदं[1] वर्षा तडतड गारांची ।
शरादि[2] वर्षुनि पळवी सेना माली इन्द्राची ॥ ४३ ॥
इन्द्र नि माली यांचें झालें युद्ध पुनः घोर ।
सुमाल्यादिकें दिक्पालांना केलें बहु चूर ॥ ४४ ॥
वानर राक्षस यांचें झालें देवांशीं कदन[3] ।
प्राणाविपर्यी संशयि बनलें उभयांचेंहि मन ॥ ४५ ॥
जयाभिलाषा उपजे तेव्हां मानव हृदयांत ।
तृणासमान प्राण वाटती मन न दयायुक्त ॥ ४६ ॥
माली मेला वानर राक्षस पळत तदा सुटले ।
सुमाल्यधिष्ठित[4] पातालाभिध लङ्केमधिं घुसले ॥ ४७ ॥

[ इन्द्रानें कुबेराला लंकानगरी दिली व रत्नश्रवाचा कैकशी बरोबर विवाह ]

कौतुकमङ्गल नगरीं होता विद्याधर भूप ।
व्योमविन्दु हें नाम जयाचें चरित्र निष्पाप ॥ ४८ ॥
रुपें सुगुणें आनन्दित जी करी अशी जाया[5] ।
आनन्दवती सार्थक नांमा तयास मूर्त दया ॥ ४९ ॥
या उभयांना कन्या झाल्या सुन्दरशा दोन ।
वडिल कौशिकी दुजी केकसी दोघी गुणखाण ॥ ५० ॥
यक्ष-विनिर्मित-नगरी-पालक नरपति विश्रवसा ।
दिली कौशिकी तया नृपानें कविता जणु सुरसा ॥ ५१ ॥
झाला तिजला नामें सुन्दर सुपुत्र वैश्रवण ।
ज्याला पाहुनि होती प्रमुदित नरनारी-नयन ॥ ५२ ॥
इन्द्रें केला वैश्रवणाचा सुन्दर सत्कार ।
बोलें लङ्का नगर तुला मी दिलें असे थोर ॥ ५३ ॥
इन्द्राज्ञेनें राही लङ्का-नगरीं वैश्रवण[6] ।
अलङ्कारपुरिं सुमालि राही राज्य करी छान ॥ ५४ ॥

---

१ मेघ. २ बाणादिक. ३ युद्ध. ४ सुमाली ज्यावर मुख्य आहे. ५ पत्नी. ६ कुबेर.

पत्नी त्याची प्रीतिमती ही गर्भवती झाली।
झाला रत्नश्रवा तयाला सुपुत्र नयशाली ॥ ५५ ॥
कालें सुन्दर यौवन त्याच्या देहीं अवतरलें।
विद्यालाभास्तव वनिं त्यानें गमन तदा केलें ॥ ५६ ॥
तेथें निर्जन कुसुमोद्यान[१]-स्थानीं आराधी।
करांत माला घेउनि विद्या करून शुद्धा धी ॥ ५७ ॥
नासाग्रावरि दृष्टि ठेवुनी तत्पर जपिं झाला।
आली तेथें पित्राज्ञेनें सुन्दर खगबाला ॥ ५८ ॥
'मनुज-सुन्दरी' नामें विद्या प्रसन्न होऊन।
वदली वत्सा वश मी झाल्यें करि माझें ग्रहण ॥ ५९ ॥
विद्यादेवी तथा खगसुता उभया पाहून।
प्रमुदित झालें चित्त तयाचें करि विद्याग्रहण ॥ ६० ॥
पाहुनि अपुल्या पुढें उभी जी होती खगबाला।
येणें येथें तव कां झालें तें तूं सांग मला ॥ ६१ ॥
वदली बाला वृत्त तयाला मधुर करी श्रवण।
पित्राज्ञेनें माझें झालें या स्थलिं आगमन ॥ ६२ ॥
कौतुक-मङ्गल नामक नगरीं माझा जनक करी।
व्योमबिन्दु खगपति प्रमोदें सुराज्य सुनय वरी ॥ ६३ ॥
वडील भगिनी नाम कौशिका असें जिचें आहे।
यक्षपुराधिप असे तियेचा पति खगपति पाहे ॥ ६४ ॥
तिची असे मी बहिण धाकटी जननी-जनकांनीं।
नाम कैकसी असें ठेविलें मम सुज्ञा जाणी ॥ ६५ ॥
सुमालिसुत जो रत्नश्रवखग तो पति होईल।
नैमित्तिक मम जनका बोले सत्यवचःशील ॥ ६६ ॥
तद्वचनाला प्रणाम मानुनि अर्पण मज केलें।
स्वीकारावें अपुल्या सन्निध म्हणून मी आले ॥ ६७ ॥
कैकसि-वचना ऐकुनि रत्नश्रव-खगवर्यानें।
आप्त-बान्धवां आमन्त्रियलें लग्ना हर्षानें ॥ ६८ ॥

---

१ कुसुमोद्यान नामक वनांत.

देवाग्नीच्या साक्षें झाला विवाह उभयांचा ।
भोग दम्पती घेती तेथें नाना विषयांचा ॥ ६९ ॥
'पुष्पान्तक'पुर निर्मुनि राहे विशाल सौधांत ।
क्रीडासुख तो भोगि तिच्यासह यथेच्छ दिनरांत ॥ ७० ॥

[ रत्नश्रवानें स्वप्नफल सांगितलें ]

एके दिवशीं निशावसानीं पाही स्वप्नांत ।
राणी ती कैकसी मृगेन्द्र-प्रवेश वदनांत ॥ ७१ ॥
जागृत होउनि तिनें सकाळीं कथिलें निजनाथा ।
स्वप्नवृत्त तें त्याच्या वाटे प्रमोद-कर चित्ता ॥ ७२ ॥
होइल तुजला महाविक्रमी सुत अरिकुलघाती[1] ।
कीर्ति जयाची विस्तृत होइल समस्त दिक्प्रान्तीं ॥ ७३ ॥
नन्तर जाउनि जिनालयीं ती पूजी जिनवर्या ।
करिती झाली धारण गर्भा ती सुन्दर आर्या ॥ ७४ ॥

[ गर्भामुळें स्वभावांत परिवर्तन झालें ]

गर्भे झाला स्वभाव निष्ठुर वचनीं कर्कशता ।
दृढता आली अङ्गीं तैशी तिच्या जितश्रमता[2] ॥ ७५ ॥
दर्पण असतां तरवारीमधिं मुखा सती पाही ।
इन्द्रालाही आज्ञा द्याया विचार मनिं येई ॥ ७६ ॥
कारण नसतां तिच्या मुखांतुनि येई हुङ्कार ।
अभिमानानें गुरुचरणासहि[3] करि न नमस्कार ॥ ७७ ॥
शत्रुमस्तकीं ठेवावें पद इच्छी चित्त तिचें ।
या परि गर्भप्रभाव तन्मन करि दारुण साचें ॥ ७८ ॥
महासाहसी प्रिये तुला हा होइल गे तनय ।
हट्टी उद्धत राहे ज्याचें चित्त सदा अदय ॥ ७९ ॥

[ दयाळु मातापित्यांना पुत्र निर्दयी कसा होतो या प्रश्नाचें उत्तर ]

हसून वदली पतिंस कैकसी विनय मनीं धरुन ।
दयाळु आपण सुतीं क्रूरता असङ्गत[4] स्थान ॥ ८० ॥

---

१ शत्रुवंशाला नष्ट करणारा. २ श्रम सहन करण्याची शक्ति. ३ वडिलांच्या पायांसही. ४ न जुळणारी अवस्था.

आपण उभयहि जिनवचनामृत-पानीं नित मग्न ।
कशी क्रूरता होइल अपुल्या तनयीं संलग्न ॥ ८१ ॥
अपुल्या देहीं जिनवचनांनीं संस्कृत मज्जाही ।
येइल जन्मा क्रूर पुत्र हा दहा दिशा दाही ॥ ८२ ॥
सुधालतेच्या उदरीं कैसें विष हें जन्मेल ।
प्रखर उष्णता चन्द्रापासुनि कैशी प्रगटेल ॥ ८३ ॥
प्रश्न सतीचा ऐकुनि रत्नश्रवा तिला वदला ।
कर्म तयाचें कारण, आपण नच वाटे मजला ॥ ८४ ॥
प्रमुख्य कारण कर्म तयाचें न पिता नच माता ।
निमित्त केवल आपण आहो वदे तिला भर्ता ॥ ८५ ॥
शत्रुगणाचें आसन कम्पित करुनि तिला झाला
नव मासान्तीं तनय रवीच्या जो धरि तेजाला ॥ ८६ ॥
निजुनि उताणा चरणां हालवि जरि तो लीलेनें ।
शयन-भूमिचा कम्प होतसे अपूर्व बलतेनें[1] ॥ ८७ ॥
पूर्वी राक्षस-नाथें प्रेमें अमूल्य मणिहार ।
मेघवाहना दिला जयाला रक्षिति नागसुर[2] ॥ ८८ ॥
ज्यास भयानें स्पर्श न करिती तयास ओढून ।
भूषविलें निज कोमल कण्ठा स्वकरें घालून ॥ ८९ ॥
पाहुनि माता बाला हर्षें अङ्कावरि बसवी ।
तया महात्मा होइल मानुनि जनक मना रमवी ॥ ९० ॥
स्वच्छ नि मोठ्या हारमण्यामधिं शिशुचीं नववदनें ।
दिसलीं झाला प्रसिद्ध तव हा 'दशमुख' सञ्ज्ञेनें ॥ ९१ ॥
गेला होता एके समयीं सुमालि मेरुवरि ।
जिनगृह वन्दुनि अपूर्व ऐसा प्रमोद हृदयिं वरी ॥ ९२ ॥
चारणमुनिवर-दर्शन होतां वन्दुनि तो त्यास ।
हाराकर्षण-वृत्त शिशूचें सांगे सोल्लास ॥ ९३ ॥
बोधचतुष्टय[3]-धारक मुनिवर वदे सुमालीस ।
अर्धचक्रि-पद-लक्ष्मी त्याला अवश्य होय वश ॥ ९४ ॥

१ सामर्थ्यानें. २ नाग नांवाचे देव. ३ मति, श्रुत, अवधि व मनःपर्यय या चार ज्ञानांचे धारक.

[ केकसीला कुम्भकर्ण बिभीषण व चन्द्रनखा अशीं तीन अपत्यें झालीं ]

भानुस्वप्नें सूचित झाला सती केकसीला ।
भानुकर्ण वा कुम्भकर्ण सुत जो स्नेहल सकलां ॥ ९५ ॥
चन्द्रोज्ज्वलनख-पङ्क्ति जियेची सुता केकसीला ।
झाली नन्तर रूपगुणें जी जिंकी गिरिबाला ॥ ९६ ॥
चन्द्रस्वप्नें सूचित झाला आत्मज नयशील ।
नाम बिभीषण रूप जयाचें विजित-स्मरलील ॥ ९७ ॥
सोळा दण्डाहून अधिकसा उंच धरी देह ।
रावण त्यासम बिभीषणादिक अन्योन्यीं स्नेह ॥ ९८ ॥
निर्भय होउनि वयोऽनुरूप क्रीडा ते करिती ।
बालकाल बहु-सुखांत गेला कौमार्या वरिती ॥ ९९ ॥

[ केकसी रावणाला वैश्रवणाची कथा सांगते ]

## आर्या

एके दिवशीं दशमुख अनुजासह पाहतां नभीं दिसला ।
वैश्रवण जात असतां सुविमानें विपुल-वैभवी त्याला ॥ १०० ॥
माते, कोण असे हा प्रश्ना ऐकून केकसी वदली ।
माझ्या वडील भगिनी सुकौशिकेचा सुपुत्र नयशाली ॥ १०१ ॥
वैश्रवण नांव त्याचें करितो लङ्कापुरींत हा राज्य ।
तव पूर्वज नगरी ही होतें तद्राज्य या स्थलीं प्राज्य ॥ १०२ ॥
जो सर्व खगेन्द्रांचा अधिपति विख्यात इन्द्र नांवाचा ।
वैश्रवण हा तयाचा भटाग्रणी नच असत्य मम वाचा ॥ १०३ ॥
माली तव वडिलाचे पितृव्य होते रणीं महाशूर ।
लढतां समरीं इन्द्रें निजवज्रें मारिलें तया ठार ॥ १०४ ॥
लङ्का नगरी त्यागुनि तव पूर्वज अन्य सर्व सुस्थानीं ।
गेले तथापि त्यांना घोर वनासमचि भासते अवनि ॥ १०५ ॥
प्राप्ति तियेची होइल केव्हां ऐशा मनोरथा सतत ।
फिरविति चित्तपथीं तव पूज्य पिता समज हें स्वहृदयांत ॥ १०६ ॥

---

१ सूर्य. २ चार हातांचा एक दण्ड किंवा धनुष्य. ३ रावण. ४ उत्कृष्ट. ५ शूरांत मुख्य. ६ चुलता. ७ पृथ्वी.

'राक्षस' नाम द्वीपासह लङ्का स्वर्गरम्य जी आहे ।
पाताल-पूर्व-लङ्का राक्षस-विद्या तशीच ती पाहे ॥ १०७ ॥
ही मेघवाहनाला राक्षसभीमें प्रसन्न होऊन ।
जो गतजन्मीं होता पिता तयाचा दिली तयें दान ॥ १०८ ॥
राक्षसवंशाधीनचि होते हें कुलपरंपरें[1] जाण ।
तेणें शत्रुगणाची झाली नाहीं कधीं हि वर मान ॥ १०९ ॥
आम्नाय-राजधानी इन्द्रानें निजबलें हिरावून ।
आहे वैश्रवणाला दिली असें वृत्त हें मनीं आण ॥ ११० ॥
वत्सा ! पिता पितामह असूनही विक्रमी मनीं खिन्न ।
असती सदैव निष्प्रभ दिसती प्रेतासमान ते जाण ॥ १११ ॥
रक्षक नसतां शेतीं स्वच्छन्दें पीक फिरुन खातात ।
रेडे बैल नि हरिणें दुःस्थिति हृदया अशान्ति दे सतत ॥ ११२ ॥
तेथें सानुज[2] जाउनि वत्सा करिशील ती निजाधीन ।
पैतृक[3] निजासनावरि जेव्हां वसशील तो गमे सुदिन ॥ ११३ ॥
ज्यांनीं लङ्का हरिली त्यांना कारागृहांत डांबून ।
तूं ठेविशील जेव्हां मी तो समजेन भाग्यवन्त दिन ॥ ११४ ॥
माझ्या मनीं मनोरथ होती उत्पन्न परि न ते सफल ।
प्रतिदिनिं अंगीं येते कृशता चिन्ता करी मना विकल[4] ॥ ११५ ॥
हें मातृवचन ऐकुनि रोषें भीषण[5] बिभीषणें म्हटलें ॥
खेद नको करुं माते सुत विक्रमरूप ते न तुज दिसले ॥ ११६ ॥
ज्येष्ठ भुजविक्रमी[6] दशकण्ठभ्रात्यापुढें न हे टिकती ।
इन्द्र नि वैश्रवणादिक सिंहापाहून जेवि गज पळती ॥ ११७ ॥
शत्रूनें लङ्केमधि निजराज्य स्थापिलें न हें कळलें ।
मम पूज्य भ्रात्याला आजवरी सहन तें तयें केलें ॥ ११८ ॥
झोपेंत सिंह असतां अज्ञात गजेन्द्रगर्जना सहतो ।
सावध होतां शोधुनि विदीर्ण तद्गण्डमण्डला[8] करितो ॥ ११९ ॥
भाऊ मम दशकण्ठ स्वर्गस्थ करावयास शत्रुगणा ।

---

१ वंशपरंपरेची. २ धाकट्या भावासह. ३ वाडवडिलांच्या सिंहासनावर. ४ खिन्न. ५ भयंकर. ६ पराक्रमी. ७ ज्याच्या हातांमध्यें शक्ति आहे असा. ८ त्यांचे गंडस्थलाला.

आहेंचि सर्वथा क्षम कुम्भश्रुति तो हि नैव किमपि ऊणा ॥ १२० ॥
मज्ज्येष्ठ कुम्भकर्ण भ्राता आज्ञा करील जरि मातें ।
संहार अरिगणांचा करीन मी सत्यवाक्य गण मातें ॥ १२१ ॥
दन्तें डसून अधरा रावण हृदयांत तप्त होऊन ।
वदला माते मन तव वज्रासम मज गमे असे कठिन ॥ १२२ ॥
तूं दुःख घोर साहुनि कथिलें तें आज आमुच्या पुढती ।
माझा हा एकचि भुज शमवी त्वद्दुःख देइ चिर शान्ति ॥ १२३ ॥
शस्त्र न करांत घेतां मी अरिगण तृणसमान उपडीन ।
मद्बाहुवीर्य दुस्तर[3] समर्थ लंघावयास त्या कोण ॥ १२४ ॥
ऐसें यद्यपि आहे तथापि विद्यासमूह साधीन ।
निजबन्धुगणा घेउनि करीन सर्वारिगण निजाधीन ॥ १२५ ॥

( रावणादिक तीन भाऊ विद्या सिद्ध करितात )

देई मला अनुज्ञा[४] ऐसें बोलुनि निजानुजासहित ।
पितृपद वन्दुनि गेला विद्यासिद्ध्यर्थ साधण्या स्वहित ॥ १२६ ॥
जें देवासहि भयकर आपत्ति जिथें पदोपदीं असती ।
रावण बन्धु-युगासह विद्यासिद्ध्यर्थ करि वनीं वसती ॥ १२७ ॥
त्यांनीं ऋषिसम मस्तकिं जटा नि मुकुटास धारिलें होतें ।
करिं जपमाला घेउनि निश्चल नासाग्र[५] दृष्टि करिती ते ॥ १२८ ॥
ते शुभ्र वस्त्र-युगला नेसूनि नि पांघरून भूवरती ।
पद्मासनस्थ बसले बन्धुत्रय शान्ति निजमुखीं धरिती ॥ १२९ ॥
अष्टाक्षरा[६] सुविद्या 'समस्त कामान्नदा[७]' जिचें नाम ।
केली सिद्ध तयांनीं लक्षजपें जी करी क्षुधोपशम[८] ॥ १३० ॥
केला शुचिचित्तांनीं[९] त्यांनीं द्व्यष्टाक्षरा[१०] सुविद्येचा ।
जप दशकोटि-सहस्रें यक्ष अनावृत सुनामधेयांचा[११] ॥ १३१ ॥
जम्बूद्वीपस्वामी क्रीडायास्तव निजाङ्गनासहित ।
आला पाहियलें त्या बन्धुगणाला जपांत नित्य रत ॥ १३२ ॥

१ कुंभकर्ण. २ कांहींही कमी नाहीं. ३ तरून जाण्यास कठिण. ४ परवानगी. ५ नाकाचा शेंडा. ६ आठ अक्षरांची. ७ सर्व इच्छित अन्न देणारी. ८ भुकेची शान्ति. ९ पवित्र मन ज्यांचें आहे अशा रावणादिकांनीं. १० सोळा अक्षरांची. ११ नांवाचा.

विद्यासाधनिं विघ्नें करावया स्वाङ्गनागणा[1] वदला ।
जा क्षोभवा मनाला त्यांच्या त्या पातल्या तिथें महिला[2] ॥ १३३ ॥
अविकारी जपतत्पर सुन्दर त्यांना बघून तत्काल ।
विह्वल नारी झाल्या प्रयत्न त्यांचा न जाहला सफल ॥ १३४ ॥
उघडा डोळे पाहा आम्ही देवाङ्गना तुम्हांस वश ।
झालों यत्न कशाला विद्यासिद्ध्यर्थे लाभलेंचि यश ॥ १३५ ॥
स्वैरक्रीडा अमुच्या सवें करायास सुन्दर-स्थानीं ।
प्रेमें चलाचि आपण येथें वसण्यांत सौख्य नच रानीं ॥ १३६ ॥
जम्बूद्वीपस्वामी यक्ष अनावृतहि तो तया वदला ।
मूर्खानों कष्टें ही सोडा द्या नि स्थला स्वकीय चला ॥ १३७ ॥
ध्यान-दुराग्रह सोडा इच्छित तुमचें करीन मी पूर्ण ।
परि मौन बघुनि त्यांचें त्याच्या चित्तांत कोप ये तूर्ण[3] ॥ १३८ ॥
प्रत्यक्ष देव आहे मी अन्याराधना तुम्ही सोडा ।
झालों प्रसन्न आतां निजहृदयाला सदा सुखीं जोडा ॥ १३९ ॥
मौना न सोडिती ते स्वकिङ्करा तो तयाकडे प्रेषी ।
वृष्टि शिलांची करिती परि ते स्थिर जेवि राहतात ऋषि ॥ १४० ॥
होऊन सर्प मोठे करून फूत्कार वेढिती त्यांना ।
चन्दन-वृक्षास जसे करिती उपसर्ग त्या नये करुणा[4] ॥ १४१ ॥
कोणी सिंह जहाले कोणी आस्वल नि लांडगे कोणी ।
व्याघ्रस्वरूप कोणी तथापि त्यांच्या मनीं न भय आणी ॥ १४२ ॥
रत्नश्रवा पित्याला माता जी कैकसी तिला भगिनी ।
चन्द्रनखेला आणुनि मायेनें[5] करिति ते उभे कोणी ॥ १४३ ॥
रत्नश्रवादि आणुनि पाणी डोळ्यांत बोलती त्यांना ।
आम्हांस मारिती हे लुब्धकजन[6] जेवि मारिति हरिणा ॥ १४४ ॥
मी जनक ही सुमाता चन्द्रनखा बहिण ही असे तुमची ।
रक्षण करा सुतांनो तेणें पसरेल कीर्ति जगिं साची ॥ १४५ ॥
तूं ऊठ ऊठ वत्सा दशकण्ठा[7] रक्षि या उपेक्षी न ।
एकान्त-भक्त[8] अमुचा आले कण्ठांत आमुच्या प्राण ॥ १४६ ॥

---

१ आपल्या देवीसमूहाला. २ स्त्रिया. ३ शीघ्र. ४ दया. ५ विक्रियेनें
६ पारधी. ७ रावणा. ८ एकनिष्ठ दृढभक्त.

चालपणीं तूं ओढुनि निजकण्ठीं घातला महाहार ।
गेलें भुजबल कोठें कोठें गेला तुझा अहङ्कार ॥ १४७ ॥
घटकर्णा तुज ऐकू येईना काय आमुचें वचन ।
आम्हां दीनमुखांना उदास तव पाहती न हे नयन ॥ १४८ ॥
क्षणभरहि तूं विभीषण झालास न भक्तिविमुख मज वाटे ।
परि आज दुष्टदैवें परिवर्तन घडविलें असें मोठें ॥ १४९ ॥
यापरि जनक नि जननी भगिनींचें शोकरुदन ऐकुनि ही ।
चलचित्त न ते झाले मन विद्याराधनांत दृढ राही ॥ १५० ॥
तेव्हां यक्षभटांनीं तोडुनि पित्रादिमस्तकें कोपें ।
टाकून दिलीं तरि ही बन्धुत्रय-चित्त-नीर नच तापे ॥ १५१ ॥
यानन्तर यक्षभटें बन्धुत्रयमस्तकेंहि तोडून ।
अन्योन्यपदीं अर्पण केलीं मायाविभाव दाखवुन ॥ १५२ ॥
तेव्हां कुम्भ-विभीषण-चित्तीं चाञ्चल्य अल्प उद्भवलें ।
गुरुभक्ति हेतु तेथें न हीनशक्तित्व त्या स्थलीं कसलें ॥ १५३ ॥
ही सर्व देवमाया जाणुनि दशकण्ठ आपुल्या ध्येयीं ।
निश्चल अतिशय राही सुमेरु गिरि जेवि सर्व-भूवलयीं ॥ १५४ ॥
ध्यान असें श्रमणोत्तम करिती कर्म समस्त नाशून ।
केवल बोधा मिळवुनि मुक्तीचें करिति ते करग्रहण ॥ १५५ ॥
पाहुनि अपार धैर्या अनेक विद्यासहस्र सिद्ध तया ।
झाल्या आज्ञा आम्हा द्यावी वदल्या नमून खगवर्या ॥ १५६ ॥
गेले भिऊन तेथुनि किङ्कर विद्यासमूह पाहून ।
रावण-कुम्भ-विभीषण-पूजन केलें अनावृतें नमुन ॥ १५७ ॥

## अनुष्टुप्

प्रज्ञप्ति रोहिणी गौरी गांधारी कामदायिनी ।
नभःसंचारिणी तेवी विद्या श्रीकामगामिनी ॥ १५८ ॥
अणिमा लघिमा क्षोभ्या मनःस्तम्भन-कारिणी ।
जगत्कम्पा सुरध्वंसी कौमारी भानुमालिनी ॥ १५९ ॥

---

१ अनावृत यक्षाच्या शूर नोकरांनीं. २ विक्रियेनें. ३ विद्याराधन-कार्यांत ४ श्रेष्ठ विद्याधराला अर्थात् रावणाला. ५ जंबूद्वीपाधिपति अनावृत यक्षानें.

सुविधाना रजोरूपा दहनी विपुलोदरी ।
वज्रोदरी समाकृष्टि घोरा धीराति-भास्वरी ॥ १६० ॥
चारणी भुवनावध्या दारणी मदनाशनी ।
चित्तोद्भवकरी शान्ति कौवेरी वशकारिणी ॥ १६१ ॥
योगेश्वरी वलोत्सादीं वराही अवलोकिनी ।
अनलस्तंभिनी तोयस्तंभिनी तेवि मोहिनी ॥ १६२ ॥
पूर्वभवाच्या सुकृतें[1] स्वल्प दिनांनींच रावणा प्राप्त ।
विद्या अनेक झाल्या आप्तजनांचेंहि चित्त हो मुदित[2] ॥ १६३ ॥
निद्राणी, सर्वाहा, खगामिनी, जृम्भिणी नि रतिवृद्धि ।
विद्यापञ्चक लाभे घटकर्णा[3] यन्मनांत शुभबुद्धि ॥ १६४ ॥
त्यापरि बिभीषणाला विद्या संप्राप्त जाहल्या चार ।
सिद्धार्था अरिदमनी निर्व्याघाता खगामिनी[4] थोर ॥ १६५ ॥
दशकन्धरार्थ[5] रचिलें पुर स्वयम्प्रभ अनावृतें यक्षें ।
उत्तुङ्ग मेरुगिरिसम नानागृहपंक्तियुक्त नित दक्षें[6] ॥ १६६ ॥
माता पिता नि भगिनी हे विद्यासिद्धिवृत्त ऐकून ।
सन्तोषले मनीं वहु आप्त नि सज्जनहि तोषले पूर्ण ॥ १६७ ॥
आशीर्वादा देउनि वदे सुमाली तुझें महाधैर्य ।
वत्सा बघुनि अनावृत जम्बूद्वीपेश तोपला आर्य ॥ १६८ ॥
कान्ति तुझी ही वत्सा, वाटे सूर्यास टाकिते मागें ।
गाम्भीर्य तुझें पाहुनि समुद्र पूत्कारें[7] जणु करूं लागे ॥ १६९ ॥
मन्दर जंबूद्वीपा शोभविती चन्द्रसूर्य आकाशा ।
वंशास शोभविशि तूं स्वयशें उज्ज्वल करून सर्व दिशा ॥ १७० ॥
श्रीमेघवाहनादिक झाले अपुल्या कुलांत पूर्वज जे ।
लङ्कापुरास रक्षुनि झाले कर्मक्षयें हि शिवराजे ॥ १७१ ॥
अमुचें संकट आतां विनष्ट होईल मन्मना वाटे ।
निज-विक्रमानलानें[8] जाळुनि तूं टाकिशील अरिकांटे ॥ १७२ ॥
पूर्वपद-प्राप्तीची पुनरपि आशा मनांत उद्भवली ।
अत्युत्साही तुजला बघुनि मनोवृत्ति मुदित मम झाली ॥ १७३ ॥

---

१ पुण्यानें. २ आनन्दित. ३ कुंभकर्णाला. ४ आकाशगामिनी. ५ रावणासाठीं. ६ निपुण. ७ मोठ्यानें ओरडणें. ८ पराक्रमरूपी अग्नि.

कैलासावरि आम्ही गेलों होतो जिनास वन्दाया ।
तेथें श्रेष्ठ श्रमणा विचारिलें यन्मनीं विशाल दया ॥ १७४ ॥
नाथा ! निवास अमुचा केव्हां लंकापुरींत होईल ।
हें सांगावें जेणें मन अमुचें परममोद पावेल ॥ १७५ ॥
होइल तुझ्या सुताला पुरुषोत्तम पुत्र जेधवा वीर ।
तेव्हां तुमचा होइल लङ्कानगरीं प्रवेश अवधार ॥ १७६ ॥
भरत त्रिखण्ड भोक्ता होइल सत्त्वप्रताप-जयशाली ।
तो निजराज्य-रमेला अरिपासुनि सोडवील विपुल वली ॥ १७७ ॥
मुनिवचन सत्य झालें झाला तव जन्म शोभलें कुल हें ।
तव विक्रमादिसुगुणा वघुनि मनीं मोद जाहला पाहे ॥ १७८ ॥
आजाचें हें भापण ऐकुनि रावण करून नम्र मना ।
घालून मान खालीं सलज्ज झाला स्वसद्गुण-श्रवणा ॥ १७९ ॥
त्यानें मस्तकिं ठेवुनि अञ्जलि सिद्धास नमन तैं केलें ।
त्याच्या प्रभावयोगें सुवन्धु निर्भय सुखामधें रमले ॥ १८० ॥
पूर्वभवार्जित-पुण्यें येते दासी वनून गृहिं लक्ष्मी ।
लाभे रूप तयाला तें जें सुन्दर दिसे बुधा कामीं ॥ १८१ ॥
अग्नीचा कण देखिल भस्म करी विपुल तरुगणास वनीं ।
सिंहाचा वालकही विक्रम दावी विशाल हस्तिगणीं ॥ १८२ ॥
अल्पहि चन्द्राचे कर सरांत विकसविति सर्व कुमुदास ।
रवि-सन्तापा हरिती जनमन जातें तदा प्रमोदास ॥ १८३ ॥
पुण्यार्कोदय होतां तन्द्रा आलस्य नष्ट होतात ।
यत्नास तेज चढतें संपुन जाते समस्त अघरात ॥ १८४ ॥
जिनदास होति जे जे त्यांचें होतें सदैव कल्याण ।
जिनभक्ति हृदयिं ठेवा होईल तियें भवाम्बुधीं तरण ॥ १८५ ॥

इति श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे पद्मपुराणे दशग्रीवाभिधानं नाम सप्तमं पर्व ॥ ७ ॥

---

# आठव्या पर्वांतील कथांचा सारांश

मागील पर्वांत रावणास हजारो विद्यांची प्राप्ति झाली हें सांगितलेंच आहे. यानन्तर पुनः त्यानें सहा दिवस उपवास करून दिव्य चन्द्रहास खड्गाची प्राप्ति करून घेतली

## ( रावणाचा मन्दोदरी बरोबर विवाह )

विजयार्ध पर्वतावर सुरसंगीत नगराच्या मय राजाला मन्दोदरी नांवाची अतिसुन्दर मुलगी होती. ती तरुण झाल्यावर मय राजाला तिच्या लग्नाची काळजी उत्पन्न झाली. सचिवानें म्हटलें 'महाराज सुमालीचा नातू व रत्नश्रवाचा मुलगा रावण फार पराक्रमी व अनेक विद्यांचा स्वामी झाला आहे त्याला आपण आपली कन्या देऊन चिन्तामुक्त व्हावें. मयाला हें म्हणणें मान्य झालें. तो मन्दोदरीला बरोबर घेऊन स्वयंप्रभापुरास गेला. सुमालीनें मन्दोदरीला पाहिलें, रावणासाठीं तुमच्या कन्येचा आम्ही स्वीकार करितो असें हर्षानें त्यानें म्हटलें. यानंतर रावण व मन्दोदरी यांचा शुभदिवशीं विवाह झाला. सुखोपभोगांत उभयतांचा काल जाऊं लागला. कालान्तरानें या उभयतांना इन्द्रजित् व मेघवाहन असे दोन अतिशय पराक्रमी पुत्र झाले.

## ( सहा हजार राजकन्यावरोबर रावणाचा विवाह )

एकेवेळीं मेघरवाचल नामक पर्वतावर रावण क्रीडा करण्यासाठीं गेला होता. तेथें एका सरोवरांत सहा हजार विद्याधर कन्या ज्या देवांगनीप्रमाणें सुंदर होत्या त्या क्रीडा करीत होत्या. त्यांनीं रावणास पाहिलें व त्याच्याविषयीं त्यांच्या मनांत प्रेम उत्पन्न झालें, रावणानें त्यांच्याशीं गांधर्व-विवाह केला. कंचुकींनीं त्यांच्या पित्यांना रावण आपल्या सर्व कन्या घेऊन जात आहे व यांत आपली अपकीर्ति होईल असें सांगितल्यामुळें ते रावणाबरोबर लढूं लागले. रावणानें प्रस्वापनास्त्र सोडून त्यांना निद्राधीन केलें व तो आपल्या सर्व प्रियांना लंकानगरीकडे घेऊन गेला. जागृत होऊन सर्व राजे आपआपल्या राजधानींत लज्जित होऊन निघून गेले.

यानंतर कुंभकर्णाचा विवाह तडिन्मालेबरोबर व बिभीषणाचा विवाह कमलश्री बरोबर झाला. याप्रमाणें हे तिघे बंधु संसारसुखाचा अनुभव घेत असतां आपल्या वंशाची राजधानी लंका आहे व ती आपण हस्तगत करून घेतली पाहिजे असा विचार त्यांच्या मनीं आला. कुंभकर्ण व बिभीषण थोडकें सैन्य घेऊन लंकेवर वारंवार हल्ले करूं लागले. त्यामुळें लंका नगरीवर इन्द्रानें नियुक्त केलेला कुबेर रागावला व त्यानें सुमालीकडे दूत पाठविला व त्यानें बजावलें कीं तुम्ही आपल्या या पोरांना या कार्यापासून परावृत्त जर केलें नाहीं तर जी मालीची दशा आम्ही केली तीच तुमच्या पोरांची केल्याशिवाय राहणार नाहीं. हें दूताचें भाषण ऐकून रावणाला राग आला व त्यानें याप्रमाणें भाषण केलें. "नीचा कुबेरा, तूं इन्द्राधीन होऊन उन्मत्त झाला आहेस. तुझें आम्ही बळ ओळखलें आहे. तूं दुसऱ्याच्या प्रकाशानें प्रकाशित झाला आहेस. तुझे आतां दिवस भरले आहेत" असें बोलून दूताला त्यानीं हाकलून दिलें व तत्काल ससैन्य व आपल्या भावासहित रावण लढण्यास निघाला. प्रचण्ड वारा जसें वृक्ष उपडून टाकतो त्याप्रमाणें त्यानें कुबेर सैन्याचा नाश केला तेव्हां कुबेर अगदीं खिन्न झाला. गोधन नाहींसें झालें म्हणजे गवळी जसा दीन होतो तसा सर्व सैन्य नष्ट झाल्यामुळें कुबेर दीन झाला. त्याचें मन विरक्त झालें. सर्व परिग्रहांचा त्यानें त्याग केला व जिनदीक्षा घेऊन तो मुक्त झाला.

रावणानें कुबेराला जिंकल्याचें चिन्ह म्हणून त्याचें पुष्पक विमान घेतलें व तो आजोबा, वडील, माता, आपले बंधु आणि आपल्या स्त्रिया-पुत्रासह लंकेंत प्रवेश करून तेथें आनन्दानें राज्य करूं लागला.

### ( सुमाली आजोबांनीं रावणाला हरिषेण चरित्र सांगितलें )

एकेवेळीं रावण आजोबासह विमानांत बसून जात असतां त्यानें एका पर्वतावर सरोवरावांचून कमळें, प्रफुल्ल झालीं आहेत हें व अनेक रंगाचे निश्चल मेघही पाहिलें त्याला मोठें आश्चर्य वाटलें व त्याविषयीं आजोबाला प्रश्न विचारला. आजोबा म्हणाले वत्सा हीं कमळें व मेघही नाहींत पण शुभ्र ध्वज व तोरणांनीं शोभित जिनमंदिरें आहेत आणि तीं हरिषेण चक्रवर्तीनें बांधविली आहेत. तुला त्याचें चरित्र संक्षेपानें सांगतों तें ऐक.

कांपिल्य नगरांत सिंहध्वज नामक राजा होता. त्याला वप्रा आणि लक्ष्मी या नांवाच्या दोन राण्या होत्या. दरवर्षी अष्टाह्निक पर्वांत जिनेश्वराचा रथ मिरवत असे व मोठी प्रभावना होई. पण लक्ष्मी राणी म्हणाली माझा ब्रह्मरथ प्रथम नगरांत फिरवा नंतर जिनेश्वराचा रथ फिरविला पाहिजे असें राजाला तिनें म्हटलें व त्यानें

तें मान्य केलें. वप्रा राणीला त्यामुळें फार वाईट वाटलें. तिनें जिनेश्वराचा रथ आधीं जोपर्यंत फिरवला जाणार नाहीं तोपर्यंत मी पूर्वीप्रमाणें आहार घेणार नाहीं व माझी प्रतिज्ञा पूर्ण होईपर्यंत बांधलेली वेणी सोडणार नाहीं. हरिषेणानें मातेला खिन्न होण्याचें कारण विचारलें. मातेनें सर्व हकीकत सांगितली. त्यानें मनांत विचार केला कीं, मला दोघेही पूज्य आहेत. मी कोणाचा द्वेष करूं? शेवटीं त्यानें नगराचा त्याग केला. तो वनांत जाऊन फलमूलादिक भक्षण करूं लागला. त्याचें सौंदर्य पाहून क्रूर पशुही शान्त झाले.

तो प्रवास करीत शतमन्यूच्या आश्रमांत गेला. तेथें त्यानें मदनावलि नामक कन्येस पाहिलें. तिचें त्याच्यावर व त्याचें तिच्यावर प्रेम जडलें पण तिच्या मातेनें तिला अज्ञात व्यक्तीवर प्रेम करूं नकोस म्हणून सांगितलें व ती तिला म्हणाली कीं बाळे तूं चक्रवर्तीचें स्त्रीरत्न होणार आहेस तेव्हां या अज्ञात व्यक्तीवर प्रेम करणें योग्य नाहीं, तसेंच आश्रमांतून ऋषीनींहि हरिषेणाला हाकलून दिलें. या अपमानामुळें त्याला फार दुःख झालें परंतु मदनावलीचा वारंवार त्याच्या मनांत विचार येऊं लागला.

फिरत फिरत तो 'सिन्धुनद' नामक नगरांजवळ गेला नगराच्या बाहेर क्रीडा करण्यासाठीं कांहीं स्त्रिया आल्या. त्यांना त्याचें सौंदर्य सारखे पाहत राहावें असें वाटूं लागलें. इतक्यांत एक माजलेला हत्ती पळत आला. सर्व स्त्रिया घाबरल्या. तुम्ही भिऊ नका मी तुमचें सर्वांचें रक्षण करितो असें म्हणून त्यानें हत्तीला अनेक उपाय करून वश केलें. व तो हत्तीवर बसून राजवाड्यांत आला. त्याचें सिंधुराजानें स्वागत केलें व आपल्या शंभर कन्या त्याला देऊन त्याच्या बरोबर राजानें त्यांचा विवाह केला.

परंतु त्याला मदनावलीचें वारंवार स्मरण होत असे. एके दिवशीं तो महालांत झोपला असतां त्याला एका वेगवती नामक विद्याधरीनें हरण करून आकाशांत नेत असतां तो सावध झाला. आपणास कोणी नेत आहे असें त्याला समजलें. दुष्टे! मला तूं कां नेत आहेस? असें म्हणून त्यानें मुष्टीनें मारण्याचा आविर्भाव केला. तेव्हां वेगवतीनें खरी हकीकत याप्रमाणें सांगितली. सूर्योदयनगरांत चान्द्रधनु राजाला 'जयचन्द्रा' नामक कन्या आहे ती पुरुषांचा द्वेष करीत असल्यामुळें विवाह करून घेणें तिला आवडत नाहीं. या भरत क्षेत्रांतील अनेक सुन्दर पुरुषांचीं चित्रें काढून मी तिला दाखविलीं. पण तिला कोणताही पुरुष पसंत पडला नाहीं शेवटीं मी आपणास चित्राङ्कित करून दाखविलें. तेव्हां मात्र तिला आनंद वाटला व ती पण करून

घेण्यास तयार झाली म्हणून मी आपणांस सुखी करण्यास नेत आहे असा आपला अभिप्राय सांगून तिनें सूर्यपुराला नेलें व राजा आणि कन्येला तिनें ही वार्ता सांगितली. राजानें अद्भुत सुंदर अशा दोघांचा विवाह वैभवानें केला.

कन्येनें भूमिगोचरी राजाबरोबर विवाह केला म्हणून गंगाधर व महीधर हे दोन विद्याधर राजे लढले पण हरिषेणानें त्यांना जिंकलें. ते पळून गेले. या युद्धांत हरिषेणाला चक्रादिरत्नें प्राप्त झालीं. जयचन्द्रेला बरोबर घेऊन हरिषेण शतमन्यूच्या आश्रमाला आला. तेथें जनमेजय राजानें आपली कन्या मदनावलि चक्रवर्तीला दिली. विवाह थाटानें झाला. चक्रवर्तीनें बत्तीस हजार राजाला वश केले व तो आपल्या कांपिल्य नगराला आला. त्यानें आई बापांना वन्दन केलें. आईला फार आनन्द झाला. त्यानें नंतर आईच्या इच्छेप्रमाणें जिनेश्वराचा रथ सर्व नगरांत मिरवून आणला. पर्वत, नदी, समुद्र, गांव, शहर आदिस्थानीं चक्रवर्तीनें हजारो जिनमंदिरें बांधिलीं व फार मोठी जिनधर्माची प्रभावना केली.

चिरकाल राज्य भोगून तो विरक्त झाला. जैन मुनि होऊन कर्मक्षय करून त्यानें अक्षय सुखकारक मोक्ष मिळविला. हें हरिषेणाचें चरित्र ऐकून रावण जिनेश्वरांना वन्दून लंकानगरीला गेला.

कोणे एकेवेळीं रावण सम्मेद शिखराजवळ संस्थलि पर्वतावर सैन्यासह उतरला. त्यावेळीं फार मोठी गर्जना त्यानें ऐकिली. प्रहस्तानें या पर्वतप्रदेशांत अतिशय मोठा हत्ती आहे असें त्याला सांगितलें. रावणानें तेथें जाऊन त्याला वश केलें व त्याचें त्रिलोकमंडन नांव ठेविलें. रावण सभेंत बसला असतां एक विद्याधर तेथें आला व त्यानें सूर्यरजा व ऋक्षरजा या दोन विद्याधर राजांना पकडून किष्किंधा नगरीचा राजा यम त्यांना अतिशय नारक दुःखें देत आहे व आपण त्याला जिंकून या दोघांची सुटका करावी. रावणानें त्याचें म्हणणें मान्य केलें. किष्किंधेला जाऊन यमाशीं तो लढला. त्यानें त्याची नरकाची रचना उध्वस्त केली. राजा यम इन्द्राकडे पळून गेला व तो तेथें सुखानें राहिला.

रावणानें सूर्यरजाला किष्किंधा व ऋक्षरजाला किष्कुपुर दिलें व स्वतः लंकेंत येऊन सुख भोगूं लागला. पुण्योदयानें त्याची कीर्ति चोहोकडें पसरली पूर्व जन्मीं अहिंसा धर्माचें आराधन केलेल्या रावणाचें वैभव व पराक्रम आणि कीर्ति उत्तरोत्तर वाढूं लागले.

———

# पर्व आठवें

( रावणास चन्द्रहास खड्गप्राप्ति )

माता पितरां प्रमुदित वन्धुजनांच्या मनांत उत्साह ।
उत्पन्न करुनि भोगिति वन्धुत्रय सौख्य ठेवुनि स्नेह ॥ १ ॥
करुनि सहा उपवासां साधी दशवदन चन्द्रहासास[1] !
ज्या दशदिग्जय-साधनिं उपाय वदतात थोर विद्वांस ॥ २ ॥

( रावण मन्दोदरी विवाह )

वैताढ्य पर्वतावरि पुर सुरसंगीत सतत संगीत ।
जेथें चाले होता मयखगवर भूप मेदिनीकान्त[2] ॥ ३ ॥
हेमवती नांवाची सकल गुणावास गेहिनी होती ।
मन्दोदरी तयांना कन्या होती अपूर्व रूपवती ॥ ४ ॥
पाहून तिचें यौवन कन्या झाली विवाह योग्या ही ।
वर कोण योग्य हिजला मयनृप चिन्ता अशी मनीं वाही ॥ ५ ॥
विद्याधर-राजांचे सुत कोण गुणी नि अगुणवान् कोण ।
यांचा विचार चित्तीं मयनृप करि परि सचिन्त हो वदन ॥ ६ ॥
अनुरूप वर न दिसला विषाद करि खिन्न नृपति वदनाला ।
परि सचिव नृपति-हृद्गत[3] जाणुनि रचि रुचिर वचन-सुममाला ॥ ७ ॥
स्वामिन् योग्य असे वर विषाद हृदयांतला करा दूर ।
रत्नश्रवा-खगाचा सुत रावण तव सुतेस योग्य वर ॥ ८ ॥
तो निजभुजवल-मण्डित रूपें सम्पन्न सिद्धविद्य असे ।
विद्याधर वृन्दामधिं दुसरा याच्या समान कोण नसे ॥ ९ ॥
हें सचिववचन ऐकुनि नृपहृदया मोद जाहला थोर ।
मन्दोदरीस घेउनि वधावयाला निघे नृपाल वर ॥ १० ॥
आला स्वयंप्रभापुरिं दशकण्ठा वघुनि वाटला तोप ।
मन्दोदरीस पाहुनि सुमालि-चित्तास जाहला हर्ष ॥ ११ ॥
आम्ही दशकण्ठास्तव मयनृपते ! आपली सुता वरिली ।
वदला सुमालि खगपति तव चिन्ता आज सर्वथा हरिली ॥ १२ ॥

---

१ चन्द्रहास नामक दिव्य खड्ग. २ पृथ्वीपति. ३ राजाचे मनांतला अभिप्राय.

मन्दोदरी नि रावण यांचा झाला विवाह शुभदिनीं[1] ।
मयनृप हर्षित होऊनि गेला स्वपुरा सुमालि-पद नमुनि ॥ १३ ॥
रमणीरत्न अशा या भोगी मन्दोदरीसवें भोग ।
रावण सर्वां गमला हा सुन्दर हेमरत्न-संयोग ॥ १४ ॥

[ सहा हजार कन्यांबरोबर रावणाचा विवाह ]

आश्रित मेघें भासे जो जणु उत्पन्न-पक्ष[2] मनुजास ।
मेघरवाचलि गेला दशास्य[3] मोदें विहार करण्यास ॥ १५ ॥
तेथें शुभ सरोवरिं खगनृप कन्या जलीं विहारास ।
आल्या सहासहस्र प्रमाण जणु या सुराङ्गना सुरस ॥ १६ ॥
सूर्या ववती जैशा प्रफुल्लशा कमल-लोचनें बिसिनी[4] ।
खग-कन्या दशकण्ठा झाल्या पाहून सानुराग[5] मनीं ॥ १७ ॥
होऊन कामपीडित करिती त्या प्रार्थना तया वाला ।
व्हावें आपण अमुच्या प्राणांचे नाथ सुगुणगणमाला ॥ १८ ॥
सर्वश्री सुरसुन्दर यांची पद्मावती सुता सुमना[6] ।
बुध नि मनोवेगेची लता अशोकादि कमलदल-नयना ॥ १९ ॥
कनक खगेश्वर संध्या यांची कन्या तडित्प्रभा-नामा ।
कन्यावृन्दीं मुख्या सगळ्या सौन्दर्यराशि गुणसीमा ॥ २० ॥
विश्वप्रख्यात[7] अशा वंशीं जन्मून जाहल्या धन्या ।
यांनीं निज-सौन्दर्यें केल्या लज्जित समस्त सुरकन्या ॥ २१ ॥
गान्धर्व-विवाहानें विवाहिल्या रावणें सरागमनें ।
सर्व खगेश्वर-कन्या जैशी नक्षत्रपंक्ति चन्द्रानें ॥ २२ ॥
क्रीडा करी तयासह तो रावण त्या सरोवरांत उभा ।
शोभे तारावृन्दीं चन्द्र जया पूर्ण लाभली शोभा ॥ २३ ॥
रत्नश्रवा-तनय जो रावण त्यानें समस्त खगकन्या ।
प्रेमें विवाहिल्या ही क्रीडुनि त्या मानिती स्वतःधन्या ॥ २४ ॥

---

१ सुखद दिवशीं. २ ज्याला पंख उत्पन्न झाले आहेत असा. ३ दहा तोण्डांचा रावण अर्थात् रत्नहारांत त्याच्या मुखाचें प्रतिबिंब पडत असे म्हणून त्यास दशास्य दशमुख म्हणतात. ४ कमलांच्या वेली. ५ प्रेमयुक्त. ६ उत्तम मनाची. ७ जगांत सर्वमान्य.

घेऊन तो तयांना रावण जाईल आपुल्या स्थानीं ।
अपकीर्ति दूर अपुली कां नच पसरे विचार घ्या स्वमनीं ॥ २५ ॥
ऐसें कञ्चुकिवृन्दें कथिलेलें वृत्त सरल ऐकून ।
सुरसुन्दरादिकांचें कोपानें तप्त होय कायमन ॥ २६ ॥
सुरसुन्दर कन्यांच्या पित्यासवें येइ तेथ धावून ।
युद्धास सज्ज झाले सोडिति ते रावणावरी बाण ॥ २७ ॥
कन्या दशकण्ठाला वदल्या स्वामिन् विलम्ब न करावा ।
बसुनि विमानीं स्वपुराकडे तुम्ही शीघ्रसा करा धावा ॥ २८ ॥
दशमुख हसून वदला यांना पळवीन शीघ्र येथून ।
हे क्षुद्र कीटकासम याची शूरांत होय गणना न ॥ २९ ॥
ऐसें वदून फेकी शर त्यांचे बाण तोडिले त्वरित ।
स्वप्रेयसीगणाला वदला मद्विक्रमा बघा विदित ॥ ३० ॥
मेघ जसें शैलाला व्यापुनि जलवृष्टि विपुल करितात ।
शरनिकर सकल वर्षुनि त्या व्यापिति परि न होय तो त्रस्त ॥ ३१ ॥
अस्त्रें अस्त्रा खण्डुनि सोडी प्रस्वापनास्त्र त्या वरती ।
भूपाल सर्व मोहित अचेत होऊन भूवरी पडती ॥ ३२ ॥
नन्तर पशूस जैसें दशकण्ठें सकल नागपाशांनीं ।
केलें निगडित अश्रुप्रवाह यें प्रेयसीसुनेत्रगणीं ॥ ३३ ॥
द्या पितृभिक्षा आम्हां ऐकुनि हें दीनवल्लभा-वचन ।
सोडून दे तयांना गेले स्वपुरास दीन होऊन ॥ ३४ ॥
घेउनि निज प्रियागण रावण येई स्वयंप्रभाख्यपुरा ।
भोगी सौख्य तयासह पराक्रमी तत्समान नच दुसरा ॥ ३५ ॥

[ कुम्भकर्ण व बिभीषण यांचा विवाह ]

कुम्भपुराचा होता भूप 'महोदय' उदार मतिमन्त ।
भार्या 'सुरूपनयना' रूपा शीला तिच्या न ये अन्त ॥ ३६ ॥
या उभयांना झाली कन्या नवयौवना तडिन्माला ।
सुन्दर कटाक्ष दिसती तिचे जणू मदनदीर्घशरमाला ॥ ३७ ॥

---

१ शरीर व मन. २ आपल्या आवडत्या स्त्रीसमूहाला. ३ बाणांचा समूह. ४ झोप उत्पन्न करणारे अस्त्र. ५ बांधले. ६ आवडत्या स्त्रियांच्या डोळ्यांत. ७ दाता. ८ तारुण्यांत प्रवेश केलेली. ९ मदनाची लांब अशी बाणांची पंक्ति.

कुम्भा-समान पुष्टस्तन देहीं कान्ति वीज जणूं भासे ।
नयन-द्वन्द्व[1] मनोहर मुखकान्ति-जलांत दीर्घ जणु मासे ॥ ३८ ॥
घटकर्णाला वरिलें प्रेम तियेचें तयांत अनिवार ।
सौख्य तिच्यासह भोगी स्मररति[2] जणु उभय सुन्दराकार ॥ ३९ ॥
हा कुम्भकर्ण होता जिनधर्मासक्त वीर गुणकोष ।
षण्मास झोंप घेतो देती दुर्जन असा तया दोष ॥ ४० ॥
मृग गज अश्व नि रेडे खाई हा जागरूक होऊन ।
ऐशा अवर्णवादीं[3] होती दुर्जनगण प्रसन्न मन ॥ ४१ ॥
परि तो अतिथिजनांना देउनि आहार जेवतो नित्य ।
निद्रा उचितचि घेई ऐसा तन्नियम वदति वुध सत्य ॥ ४२ ॥
परमार्था नच जाणुनि जे करिती पापकल्पना खल ते ।
सुजनीं दोषा देउनि करिती अत्यन्त जवळ नरका ते ॥ ४३ ॥
विजयार्ध पर्वताच्या दक्षिण पङ्क्तींत नगर रम्य असे ।
ज्योतिष्पुर नांवाचें अधिपति त्याचा खगेन्द्र 'वीर' वसे ॥ ४४ ॥
नन्दवती त्या भार्या आर्या उभयास जाहली दुहिता ।
'कमलश्री' नांवाची कमलगृहश्रीच भासते मूर्ता ॥ ४५ ॥
झाला विभीषणाचा विवाह सविभव असा हिच्याशीच ।
धर्मार्थ-सेवनीं रत भोगी अनुकूल सौख्य जें साच ॥ ४६ ॥

[ इन्द्रजित् व मेघवाहन असे दोन पुत्र मंदोदरीला होतात ]

आहे तेज जयाचें देवेन्द्रासारखें असा तनय ।
मन्दोदरीस झाला पराक्रमी सज्जनीं धरी विनय ॥ ४७ ॥
आनन्द थोर झाला रत्नश्रव आदि वंशवृद्धास ।
ठेविति नाम तयाचें अन्वर्थक 'इन्द्रजित्' गुणावास ॥ ४८ ॥
कांहीं कालानन्तर नन्दन झाला दुजा जनानन्द ।
मन्दोदरीस, टाकी जो उपडुनि शत्रुवंशशतकन्द[4] ॥ ४९ ॥
ठेविति नाम तयाचें जननी जनकादि मेघवाहन हें ।
मेघापरि उपकारप्रभृति[5] गुणांना सदैव जो वाहे ॥ ५० ॥

---

१ डोळ्यांची जोडी. २ मदन व त्याची रति. ३ नसता दोष लावणें. ४ शत्रु रूपीं वेळूचे शेंकडो गड्डे. ५ वगैरे.

( रावण व कुबेराचें युद्ध, कुबेराचा पराजय )

ऐकुनि निजवंशाचें वैश्रवणाविषयीं वैर कोपून ।
घटकर्ण विभीषण हे लंकेवरि सतत जाति धावून ॥ ५१ ॥
एके दिनिं धनदानें पाठविला दूत जो सुमालीस ।
वदला शिशूंस अपुल्या ठेवी ताब्यांत अन्यथा नाश ॥ ५२ ॥
हे जाणती न अपुली शक्ति पराची परन्तु अविवेकी ।
कूपांतिल भेकासम पडून मरतील सर्पवदनीं कीं ॥ ५३ ॥
जी पातालीं लंका आहे कूपासमान ती जाणा ।
घटकर्ण अन् विभीषण हे शिशु भेकासमान मनिं आणा ॥ ५४ ॥
लंकेवरि हे येती धावुनि केली सदा उपेक्षाच ।
परि आतां मी त्यांना मालीचा मार्ग दाखविन साच ॥ ५५ ॥
ऐक सुमाले ! माझें वचन तुला तोच मार्ग दावीन ।
नच ठावें बाळ माझें कान तुझा धरुनि शीघ्र वाकविन ॥ ५६ ॥
हें दूतवचन ऐकुनि वदला रावण तयास कोपानें ।
इन्द्राधीनचि राहुनि नीचा झालास धनदें धनदानें ॥ ५७ ॥
आकळिलें बल सगळें आतां उरला न अवधि दिन भरले ॥
करितो उच्चाटन तव दुष्टा मी शीघ्र समज तूं स्वबलें ॥ ५८ ॥
दुसऱ्याच्या सामर्थ्यें लंकेवरि राज्य पामरा ! करिशी ।
लज्जा न वाटते तुज परप्रकाशें प्रकाश तूं धरिशी ॥ ५९ ॥
आहेस दूत यास्तव तुजला मी मारणें नसे उचित ।
बोलून दशग्रीवें दिले हकालुनि सभेंतुनि त्वरित ॥ ६० ॥
तत्काल लढायास्तव निघे दशग्रीव सानुज ससैन्य ।
युद्ध महोत्सव वाटे स्पर्शि न ज्याला कदापि भयदैन्य ॥ ६१ ॥
दूतें कथिल्या ऐकुनि वार्ता वैश्रवण जाहला लाल ।
लंकेहुनि युद्धास्तव बाहेर निघे दिसे जना काल ॥ ६२ ॥
वात प्रचण्ड वृक्षा जैसा टाकी समूळ उपडून ।
रावण धनदचमूला पळवी क्षणभरहि तो करी नय न ॥ ६३ ॥

---

१ कुबेर. २ कुबेरानें. ३ बेडका सारखें. ४ धन देऊन धनद कुबेर झाला. ५ दीना. ६ रावणानें. ७ यम. ८ सैन्याला.

जैसा मत्तगजावरि तुटून पडतो गजारि[1] कोपानें ।
रावण कुबेर-सैन्यीं संचार करी निजप्रतापानें ॥ ६४ ॥
केली दशकण्ठानें अतिशयशी हानि रैदसैन्याची[2] ।
तेणें फारचि झाली दीनदशा तेधवा कुबेराची ॥ ६५ ॥
कमलें काढुनि ज्याचीं नेलीं ऐशा सरासमान दिसे ।
दांत जयाचे तुटले अशा गजासारखा जनां भासे ॥ ६६ ॥
शाखा-विहीन वृक्षा समान निःशोभमान[3] जो झाला ।
यापरि कुबेर अपुल्या हृदयीं चिन्ताशतान्तरीं रुतला ॥ ६७ ॥

( राज्यविरक्त—कुबेर दीक्षा घेऊन कर्ममुक्त होतो. )

अभिमान सर्व गेला तिळमात्रहि राहिला न मजजवळी ।
ज्याच्या जवळि न राहे गोधनसा दीन भासतो गवळी ॥ ६८ ॥
राज्य अनर्थाकारण त्याचा स्वीकार योग्य मज न गमे ।
तें त्यागितांचि माझ्या चित्तीं आत्मानुभूति सतत रमे ॥ ६९ ॥
घटकर्ण विभीपण हे समजे मी त्यास परम उपकारी ।
रावण बन्धु न वैरी नच मी मानीन त्यास अपकारी ॥ ७० ॥
माझी निर्मल झाली बुद्धि तिला हेतु सर्व हे झाले ।
वैराग्य जाहलें मज मोक्षाचें द्वार हें मला दिसलें ॥ ७१ ॥
यापरि विचार येतां हृदयीं शस्त्रास त्यागिलें धनदें ।
सकळ परिग्रह सोडुनि दैगम्बर[4] वृत्त मुक्तिसुख जे दें ॥ ७२ ॥
घेउनि बाह्याभ्यन्तर तपयोगें सकल कर्म नाशून ।
सिद्धपदांत विराजे कुबेरयति जें अनन्तसुखसदन ॥ ७३ ॥
यापरि जिंकुनि धनदा स्वकुल-पराभव[5]-मला तयें धुतलें ।
अरिभङ्ग-चिह्न पुष्पक विमान तेणें अतीव आदरिलें ॥ ७४ ॥
माता पिता नि बान्धव अमात्य अन्तःपुरस्त्रियासहित ।
गेला लङ्का-नगरीं भोगी तद्राज्य मानुनि स्वहित ॥ ७५ ॥

---

१ सिंह. २ कुबेरसैन्याची. ३ शोभारहित. ४ दिशा व आकाश हेंच ज्याचा वेष आहे असें चारित्र अर्थात् महाव्रतरूप मुनिचारित्र. ५ पराजय.

( हरिषेणचक्रवर्ति चरित )

एके दिवशीं रावण बसुनि विमानीं विनम्र गगनांत ।
असतां जात वधे तो कमलावलिफुल्ल पर्वतप्रान्त[1] ॥ ७६ ॥
न दिसे इथें सरोवर कमलें परि फुल्ल केंवि आजोबा ।
सांगा विस्मय वाटे अन्यत्र न पाहिली अशी शोभा ॥ ७७ ॥
तैसें येथें निश्चल मेघहि दिसती अनेक रंगाचे ।
आश्चर्य मना वाटे कारण मजला वदा तुम्ही याचें ॥ ७८ ॥
सिद्धांना मी नमितो असे सुमाली सुभाव ठेवून ।
वदला वत्सा कमलें हीं नच किंवा न मेघ ही जाण ॥ ७९ ॥
शुभ्रध्वजगण-शोभित सुतोरणें ज्या अनेक आहेत ।
जिनमन्दिरें अशीं हीं या गिरिवरि करिति जनमना पूत[2] ॥ ८० ॥
हीं हरिषेणें रचिलीं चक्रीनें जो प्रभावनाधारी[3] ।
झाला असा महात्मा जो जिनवचना धरी सदैव उरीं ॥ ८१ ॥
वत्सा ! यास्तव यांना करुनि नमस्कार चित्त पूत करी ।
ऐशा सुमालि-वचना ऐकुनि रावण महाप्रमोद वरी ॥ ८२ ॥
तेथूनचि करि वन्दन जिनपतिसद्गुण-गणा-मनीं स्मरुन ।
चालू करी विमाना नन्तर रावण करी पुनः प्रश्न ॥ ८३ ॥
हरिषेण चक्रवर्ती होउनि गेला प्रसिद्ध भरतांत ।
जिनमन्दिरें तयानें रचिलीं हरितात पातकव्रात[4] ॥ ८४ ॥
पापविदारक त्याचें ऐकावें चरित इच्छितें स्वमन ।
आजोबा ! मज सांगा केलें मी सावधान निजकर्ण[5] ॥ ८५ ॥
सिंहध्वज नृप होता काम्पिल्यपुरांत विक्रमी चतुर ।
वप्रा तयास राणी उभया हरिषेण पुत्र बहुशूर ॥ ८६ ॥
आष्टाह्निक[6] पर्वामधिं जिनरथयात्रा महोत्सवें नगरीं ।
प्रतिवर्षी ती करवी श्री-जिनधर्म-प्रभावनेस वरी ॥ ८७ ॥

---

१ कमलसमूहानें प्रफुल्ल दिसणारा पर्वताचा प्रदेश. २ पवित्र. ३ दान, तप, जिनपूजा, विद्यामंत्रादिकांनीं जिनधर्माचा महिमा दाखविणारा. ४ समूह. ५ मन लाविलें कर्णी. ६ आषाढ, कार्तिक, व फाल्गुन यांच्या शुद्ध अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत आठ आठ दिवसांत सर्वश्रावक मिळून मोठी जिनपूजा करितात. त्यास आष्टाह्निकपर्व म्हणतात.

सौभाग्यमदें विमल भार्या लक्ष्मी दुजी नृपालाची ।
वदली तयास आधीं ब्रह्मरथभ्रान्ति होउ द्या साची ॥ ८८ ॥
नन्तर जिनरथ फिरवा नगरपथांतून वचन लक्ष्मीचें ।
केलें मान्य नृपानें वर्तन ऐसेंचि कामदासाचें ॥ ८९ ॥
ऐकुनि दुःखद वार्ता वज्राघातासमान वप्रेनें ।
केली तदा प्रतिज्ञा वत्सा ! ती ऐक सावधान-मनें ॥ ९० ॥
माझा रथ या नगरीं फिरेल आधीं तरीच आहार ।
घेईन पूर्ववत् मी ऐसा माझा असेचि निर्धार ॥ ९१ ॥
यापरि निजप्रतिज्ञा-चिह्न अशी बांधली तिनें वेणी ।
धरिलें मौन नि आली शोकानें खिन्नता तिच्या वदनीं ॥ ९२ ॥
उष्ण नि दीर्घश्वासा सोडी ये अश्रुपूर नयनांत ।
दुःखित पाहुनि माता हरिषेणस्वान्त जाहलें व्यथित ॥ ९३ ॥
कां रुदन करिशि माते, कारण याचें वदे मला त्वरित
सत्यार्थ तिनें कथिला तेव्हां पडला विचार चक्रांत ॥ ९४ ॥
जनक नि जननी पूज्य द्वेष करावा कसा नि कोणाचा ।
न दिसे उपाय येथें मजला संकटसमुद्र तरण्याचा ॥ ९५ ॥
अश्रुम्लान जिचें मुख जननी ऐशी कशी बघू नयनीं ।
क्रूरश्वापद जेथें गेला हरिषेण घोरशा विपिनीं ॥ ९६ ॥
मूलफलादिक भक्षुनि निर्भय होउनि वनीं विहार करी ।
रूप तयाचें पाहुनि निर्दय पशुगणहि उपशमास वरी ॥ ९७ ॥
परि मातेचें रडणें जेव्हां स्मरणांत त्याचिया येई ॥
रम्य प्रदेश देखिल तापद त्याला वनाग्नि-सम होई ॥ ९८ ॥
शतमन्यूच्या आश्रमिं मदनावलि नाम कन्यका दिसली ।
मनिं बघतां उभयांच्या प्रीतिलता तत्क्षणांत अंकुरली ॥ ९९ ॥
मदनावलि-पूर्व-कथा संक्षेपें ऐक रावणा आतां ।
जेणें हरिषेणाच्या कथेस येईल वा सुसंगतता ॥ १०० ॥
पुष्कळ सैन्य जयाचें जो तेजस्वी नि रुद्रसम होता ।
त्या 'कालकल्प' भूपें चंपापुर नगर घेरिलें असतां ॥ १०१ ॥

---

१ गर्वानें. २ ब्रह्मदेवाचा रथ फिरविणें. ३ मन. ४ वनांत.

जनमेजय भूपाची पत्नी साध्वी सुरूप नागमती ।
तनया मदनावलि या दोघींची जिनमतांत होति रति ॥ १०२ ॥
यांचें रक्षण व्हावें म्हणून भूपें सुरुंगमार्गानें ।
पाठविलें शतमन्यु-श्रमणाच्या आश्रमास गुप्तपणें ॥ १०३ ॥
नंतर त्यानें केलें युद्ध भयङ्कर परन्तु जय न मिळे ।
दुःखी मनांत होउनि तोही शतमन्यु आश्रमास वळे ॥ १०४ ॥
सुन्दर हरिषेणाला पाहुनि मदनावली स्मरें विद्ध ।
झाली जाणुनि वदली नागमती हृदयिं होउनि क्रुद्ध ॥ १०५ ॥
हे विनयशील बाले! मुनिवर्यें वाक्य जें तुझ्या विषयीं ।
सांगितलें तें कथितें हितकर तूं ठेवि नित्य त्या हृदयीं ॥ १०६ ॥
होशील चक्रवर्ति-स्त्रीरत्न असें मुनीश्वरें कथिलें ।
यास्तव अज्ञातावरि करणें तूं प्रेम होय हें न भलें ॥ १०७ ॥
परि चक्रिरूप नेणुनि तपस्विवृन्दें दिलें हकालून ।
अपमान-शल्य ठेवुनि वनोवनीं तो करीतसे भ्रमण ॥ १०८ ॥
हरिषेणाच्या चित्ता कोठेंही शान्तिलाभ नच झाला ।
विरह तिचा बहु जाचक झाला त्याच्या मना नि देहाला ॥ १०९ ॥
ग्रामीं नगरीं उपवनिं शयनाशनिं सुख न जाहलें त्याला ।
उत्कण्ठाकुल त्याच्या अशान्ति-बाला करी मनीं लीला ॥ ११० ॥
स्त्रीरत्न तें मला जर मिळेल तर निजगृहास जाऊन ।
निजजननी-हृदयांतिल शोकाग्नीचें करीन मी शमन ॥ १११ ॥
नगरीं ग्रामीं उपवनिं नदीतटीं तेवि रम्यगिरि-शिखरीं ।
मी बान्धवीन सुन्दर जिनमन्दिर-पङ्क्ति जी भवास्त हरी ॥ ११२ ॥
मातेच्या शोकानें होउनि सन्तप्त मी मरेन जरी ।
स्त्रीरत्नसङ्गमाशा देइल दहनासमान दाह उरीं ॥ ११३ ॥
यापरि चिन्ताचक्रें फिरे पिशाचासमान हरिषेण ।
नानादेशीं गेला सिन्धुनदाभिध पुरा अशान्तमन ॥ ११४ ॥
स्त्रीगण नगरा बाहिर आला क्रीडार्थ पाहि हरिषेणा ।
अद्भुतरूपें त्याच्या झाला स्तम्भित समर्थ नच गमना ॥ ११५ ॥

---

१ खोदणें व जेवणें.

स्थिर नेत्र करुनि बघती वाटेना तृप्ति त्यांचिया सुमना।
त्याच्या रूपसुधेला प्राशिति निश्चल बनून विधुवदना[1] ॥ ११६ ॥

( उन्मत्त हत्तीला हरिषेण वश करून स्त्रियांचें रक्षण करितो )

आला उन्मत्त करी धावत ललनागणास पाहून।
वदला महात तेव्हां गज हा उन्मत्त नैव मदधीन[2] ॥ ११७ ॥
येथून शीघ्र धावा विलम्ब न करा स्वरक्षणासाठीं।
हा गज धावत आला आहे पाहून आपल्या पाठीं ॥ ११८ ॥
रूपासक्त-स्त्रीजनकर्णीं ही शब्दपंक्ति नैव पडे।
असमर्थ त्या पळाया आला परि मूर्तिमन्त काळ पुढें ॥ ११९ ॥
थरथर कांपत वदल्या रक्षण करि आमुचें महापुरुषा ! ।
आम्ही अबला आलों शरण तुला करि दया सुगुणकोपा ॥१२० ॥
करितों रक्षण तुमचें भय न धरावें मनांत तिळभरही।
बोलुनि पाठीमागें करुनि तयांना गजापुढें राही ॥ १२१ ॥
उडुनि नभीं तो वेगें गजदन्तीं निजपदास देऊन।
चढला तच्छीर्षावरि उतरे तत्काल शेपटावरुन ॥ १२२ ॥
क्रीडा करी गजासह तद्विक्रम[3] पाहण्यास जन जमला।
कांहीं स्त्रीगण खिडकी मधुनि बघे रण नरेन्द्र नच दमला ॥ १२३ ॥
राजमहालांतुनि नृप पाही हें दृश्य सिन्धु नांवाचा ।
मदत तयास कराया प्रेपी तो चतुर वीरगण साचा ॥ १२४ ॥
परि तो येण्यापूर्वी हरिषेणें गजवरास वश केलें।
बसुनि तयावरि मोदें त्याला नगराकडेचि चालविलें ॥ १२५ ॥
निज-सौन्दर्य-करानें[4] नरनारींचीं मनें करी ग्रहण ।
केला प्रवेश तेणें हर्षित झालें अतीव तद्वदन ॥ १२६ ॥

( सिंधुराजाच्या शंभर कन्याबरोबर हरिषेणाचा विवाह )

सिन्धुनृपाच्या शम्भर सुन्दर कन्या विवाहिल्या तेणें।
नगरीं हरिषेणमयी नरनारी वर्णिती कथा सुमनें[5] ॥ १२७ ॥

---

१ चन्द्राप्रमाणें सुन्दर मुखाच्या स्त्रिया. २ माझ्या स्वाधीन. ३ हरिषेणाचा पराक्रम. ४ स्वतःच्या सौंदर्यरूपी हातानें. ५ उत्तम मनानें.

सिन्धुनृपानें केला मोठा सन्मान जरि तथापि तयें ।
झाला हर्ष न त्याला रात्रन्दिन खिन्नता वरी हृदयें ॥ १२८ ॥
स्त्रीरत्नाविण मजला रजनी वर्षासमान दीर्घ गमे ।
ही रात्र संपल्यावर जाइन तिकडे नि चित्त तींत रमे ॥ १२९ ॥
यापरि शय्येवरती करीत चिन्तन कुमार तो पडला ।
झोप उशीरा आली पाही स्वप्नांत रम्य ती बाला ॥ १३० ॥

( वासवधनु राजाच्या जयचन्द्रा कन्येबरोबर हरिषेणाचा विवाह )

खेचरपति-कन्येची ' वेगवती ' नामिका सखी होती ।
हरिषेणास तियेनें हरिलें ती आक्रमी नभास सती ॥ १३१ ॥
परि निद्राक्षय होतां कोणी मजला नभःप्रदेशांत ।
घेऊन जात आहे ऐसें झालें त्वरें तया ज्ञात[1] ॥ १३२ ॥
दुष्टे ! मजला हरिशी किमर्थ कोपें असें तिला वदला ।
वज्रासमान मुष्ट्याघाता[2] उद्युक्त[3] तो यदा झाला ॥ १३३ ॥
वेगवती ती वदली तुजला देण्यास सौख्य मी नेते ।
माझा हेतु न दुसरा समजेलचि शीघ्र सर्व तुजला तें ॥ १३४ ॥
सुन्दर कथा मला ती सांगुनि मम सुखवि कर्णयुगलास ।
वदली सूर्योदयपुरिं ' वासवधनु ' नृपति राहि सोल्हास ॥ १३५ ॥
भार्या ' धी ' नांवाची जयचन्द्रा कन्यका तया उभया ।
पुरुषद्वेष करी ती विवाह करणें रुचे न तद्हृदया ॥ १३६ ॥
जो जो नृप चित्राङ्कित करुन पटीं मी तियेस दाखविला ।
या भरत क्षेत्रांतिल तो तो नृवरा, तियेस नच रुचला ॥ १३७ ॥
नन्तर मी चित्राङ्कित करुन तुजला तियेस दाखविलें ।
त्वच्चित्र[4] बघुनि भद्रा ! हृदय तिचें परम हर्षयुत झालें ॥ १३८ ॥
कामसुखाचा अनुभव याच्या सङ्गें मला न लाभेल ।
मृत्यु मला प्रिय होइल मम मन अन्या कदापि न वरेल ॥ १३९ ॥
पाहून शोक उत्कट त्वत्सुगुणाकृष्ट[5] चित्त होऊन ।
तुजला आणायाचा दृढ प्रतिज्ञा करी मदीयमन ॥ १४० ॥

---

१ समजलें. २ मुष्टींनीं मारण्यास. ३ तत्पर. ४ तुझें चित्र. ५ तुझ्या सद्गुणांनीं आकर्षिलें आहे चित्त जिचें.

आतां तुझ्या प्रसादें सफल झाली मम प्रतिज्ञा ही ।
सूर्योदय पुर आलें प्रवेश सौख्यें तिथें करूं पाही ॥ १४१ ॥
वदली शक्रधनूला अभीष्ट वर आणिला असे ताता ।
कन्येस हि सखये मी रुचला गे जो तुझ्या बहु स्वान्ता ॥ १४२ ॥
केला अद्भुतरूपी वधूवरांचा विवाह भूपानें ।
स्वजनें विस्मित होउनि शुभवचनें शंसिलें प्रमोदानें ॥ १४३ ॥
कन्येनें नि नृपें ही वेगवती शंसिली सुखी झाली ।
सन्मान तिचा केला कीर्ति तिची भूतलांत विस्तरली ॥ १४४ ॥
आम्हां त्यागुनि वरिला ' जयचन्द्रें ' भूमिगोचरी पुरुष ।
चिन्तुनि या परि वरिती गंगा-महि-धर मनांत बहु रोष ॥ १४५ ॥
भाऊ जयचन्द्रेचा सुचाप नामें गुणी महाशूर ।
निजजनकासह येउनि हरिषेणा बोलला बुधप्रवर ॥ १४६ ॥
आपण येथेंच रहा सख्य कराया खलासवें जातो ।
जेणें कटुयुद्धाचा प्रसंग निर्माण जाहला टळतो ॥ १४७ ॥
हरिषेण हसुनि हर्षे वदला परकार्य जो सदा करितो ।
नर निजकार्यामध्यें उदास होऊन केवि वर्ते तो ॥ १४८ ॥
" पूज्य प्रसन्न होउनि द्या युद्धादेश या स्वदासास ।
व्हा न प्रवृत्त आपण पुरवावी अल्पशीच मम आस " ॥ १४९ ॥
श्वशुरें हरिषेणाला अनुमति समरावतार करण्यास ।
जेव्हां दिली तयाला अतिशय झाला रणीं समुल्लास ॥ १५० ॥
शस्त्रास्त्र-सज्जसा रथ पवनासम वेगवन्त ज्या घोडे ।
रविसम तयांत बैसुनि गेला हरिषेण समर-भूमिकडे ॥ १५१ ॥
अनुसरुनि ज्यास गेले खेचर नागाश्वपत्ति घेऊन ।
झालें समर भयंकर तयांत बहु लोक पावले निधन ॥ १५२ ॥
हरिषेण जिथें जाई तेथें न मनुष्य नाश्व वा न गज ।
उरले यमगृहिं गेले नभांत पसरे महीवरील रज ॥ १५३ ॥
पाहुनि हरिषेणाचा तीव्र पराक्रम मनांत घाबरले ।
गंगाधर नि महीधर खेचर तत्काल पळुनिया गेले ॥ १५४ ॥

---

१ मनाला पसन्त असलेला. २ भूमीवर असलेला. ३ श्रेष्ठ. ४ युद्धप्रवेश. ५ उत्साह. ६ हत्ती, घोडे व पायदळ. ७ धूळ.

पुण्योदयें मिळालीं रत्नें समरांत चक्रवर्तिपद ।
लाभे हरिषेणाला खेळे त्याच्या मनांत बहु मोद ॥ १५५ ॥
ऐश्वर्य महान् ज्याचें असा दहावा अरीस दाह कसा ।
मित्रां शीतल करि तो चक्री हरिषेण सर्व भूमि वशा ॥ १५६ ॥
चक्रिश्रीनें भूषित मदनावलिचा परी सदा ध्यास ।
करि तिंज वांचुनि मानी स्वतःस तृणसम नि जो सदोदास ॥१५७॥
शत्रुगणा वश चाले करीत घेउनि महाबला धीर ।
तापसवनांत आला आले तापस समस्त सामोर ॥ १५८ ॥

( मदनावलीचा हरिषेणाबरोबर विवाह )

शतमन्यु-पुत्र ज्याचें जनमेजय नाम त्या नृपालानें ।
मदनावलि हरिषेणा स्त्रीरत्न दिलें अतीव हर्षानें ॥ १५९ ॥
झाला विवाह विभवें जन्माची सफलता तया वाटे ।
आशीर्वाद ऋषींचें मिळतां त्याच्या प्रमोद मनिं दाटे ॥ १६० ॥
बत्तिस सहस्र राजे ज्याच्या चरणास वंदिती सतत ।
काम्पिल्यपुरीं आला वप्राजननीस मोद हो बहुत ॥ १६१ ॥
जननी-जनकांच्या पदिं नमवी निजशीर्ष परम विनयानें ।
जिनरथ मिरवी आधीं चक्री नगरीं प्रभूत-विभवानें ॥ १६२ ॥
वप्रा प्रमुदित झाली झाली धर्मप्रभावना थोर ।
वाहे मकरन्दासम नयनाब्जांतून[1] मोदजलपूर ॥ १६३ ॥
श्रमणश्रावक-हृदयीं शब्दागोचर[3] असीम[4] आनन्द ।
झाला श्रीहरिषेणा मानिति ते श्रीजिनेन्द्र-मत-कन्द ॥ १६४ ॥
भू-पर्वत-सरितातट-नगर-ग्रामीं विशाल उन्नतशीं ।
हरिषेणें जिनसदनें रचिलीं ज्यावरि हसे सदैव शशी[5] ॥ १६५ ॥
चिरकाल राज्य भोगुनि विरक्त होउनि निर्धीश हरिषेण ।
जिनमुनि होउनि अन्तीं मुक्तीश्रीचा बने सदा रमण ॥ १६६ ॥
हरिषेण-चरित ऐकुनि सविस्मयानन्द रावणा झाला ।
जिनपति-चरणा वन्दुनि लङ्का-नगरीस तो सुखें गेला ॥ १६७ ॥

---

१ नेहमी सिंक. २ डोळे रूपी कमळांतून. ३ शब्दांनीं न वर्णितां [illegible].
४ अमर्याद. ५ चन्द्र.

[रावण हत्तीला वश करितो.]

एकेवेळीं दशमुख सम्मेदाचलसमीप येऊन ।
संस्थलि-गिरिवरि उतरे ससैन्य हें स्थान योग्य जाणून ॥ १६८ ॥
तेथें भीषण ऐकुनि रव सारें सैन्य फार घाबरलें ।
गज वृक्षबन्धनातें तोडुनि उन्मुक्त धावनीं झालें ॥ १६९ ॥
घोडे ही खिंकाळुनि कान उभे करुनि पाहतात दिशा ।
हा ध्वनि कोठुनि येतो पुसे दशग्रीव ज्या रमा सुवशा ॥ १७० ॥
वदला प्रहस्त नाथा प्रचण्ड जणु अञ्जनाद्रिगज एक ।
मी पाहिला तयाच्या ध्वनीस ऐकून घाबरे लोक ॥ १७१ ॥
आहे अतिशय मोठा इन्द्रहि असमर्थ ज्या धरायास ।
होइल इतर जनांचा प्रयत्न तो सकल विफल आयास ॥ १७२ ॥
तेव्हां रावण वदला पकडू शकलों गजास या न जरी ।
मी रत्नाङ्गद-शोभित तोडुन टाकीन बाहुयुग्म तरी ॥ १७३ ॥
नन्तर बसुनि विमानीं जाउनि पाही विशाल गजरत्ना ।
मेघश्याम असे जो धरि वदनीं दोन मुशलशा रदनां[1] ॥ १७४ ॥
डोळे मधाप्रमाणें पिंगट ज्याची सुदीर्घ सोंड असे ।
गोल नि पुष्ट नि उन्नत गण्डस्थलयुगलिं मद सदैव वसे ॥ १७५ ॥
उंची असे जयाची करसप्तक[2] रुन्द जो दहा हात ।
लांबी नउ हातांची बलिष्ठतेची समाप्ति जणु येथ ॥ १७६ ॥
उतरुनि खालीं क्रीडा करुनि दशग्रीव वश तयास करी ।
नाम त्रिलोकमण्डन ठेवुनि त्याचें अपूर्व सुयश वरी ॥ १७७ ॥
ऐरावणिं इन्द्र जसा होउनि आरूढ शोभतो तेवी ।
रावण शोभे त्याचें यथार्थ वर्णन करूं शके न कवि ॥ १७८ ॥
गज वश केला यास्तव झाला आनन्द सर्व शिबिरांत ।
आनन्दनृत्य, गायन, वादन चाले समस्त दिनरात ॥ १७९ ॥
प्रातःकालीं दुसरें दिनीं दशग्रीव पर्वतप्रान्तीं ।
वसला सभेंत उन्नत आसनिं धरि सूर्यतुल्य मुखिं कान्ति ॥ १८० ॥

---

१ दांतांना. २ सात हात.

( रावण यम-दिक्पालाला जिंकतो )

आला सभेंत वन्दुनि दशवदना द्वारपाल नम्रपणें ।
वदला आला झाला खेचर जो विद्ध तीव्र-बाणगणें ॥ १८१ ॥
येऊं सभेंत इच्छी आज्ञा त्याला प्रवेश करण्याची ।
आहे कां देव ! वदा मी त्या कळवीन जी असे साची ॥ १८२ ॥
दे पाठवून येथें वदतां गेला नमून दशवदना ।
आला वदला खेचर यापरि वृत्तान्त सकल खिन्नमना ॥ १८३ ॥
मी पवनवेगनामक खेचर चरणा समीप तव आलों ।
दर्शन झालें तेणें अन्तःकरणांत फार मी धालों ॥ १८४ ॥
सूर्यरजा ऋक्षरजा प्रसिद्ध हें भ्रातृयुगल तुज ठावें ।
किष्किन्धा जी नगरी त्यांचें मन नित तिच्याकडे धावें ॥ १८५ ॥
पातालाभिध लंकेहुनि तें तिकडे ससैन्य युग गेलें ।
आक्रमण शीघ्र उभयें क्रोधानें विक्रमें तयें केलें ॥ १८६ ॥
त्या नगरीचा यमपति सावध होऊन सज्ज समरास ।
झाला केलें त्यानें उभयासह युद्ध शक्य न सुरास ॥ १८७ ॥
पकडुनि उभयांना ही कारागारांत टाकिलें त्यानें ।
तो क्रूर सतत त्यांना छळतो मीं पाहिलें स्वनयनानें ॥ १८८ ॥
आश्रित तें युग अपुलें छेदन-भेदादि-दुःख त्या देतो ।
आश्रयभूत खगेन्द्रा दशकण्ठा सुयश अपुलें हरितो ॥ १८९ ॥
तें भ्रातृयुग्म सेवक अपुलें सोडव तयास जाऊन ।
त्यांच्या पराभवानें जन तुज वदतात अभिभवस्थान ॥ १९० ॥
हें वृत्त तन्मुखांतुनि ऐकुनि दशकण्ठचित्त बहु कोपें ॥
होउनि संतप्त वदे नीचा ! तूं भक्षिलास या पापें ॥ १९१ ॥
त्याचें फल मी दुष्टा तुजला चाखावयास लावीन ।
नरका कल्पुनि छळिसी येउनि मी करिन सर्व उच्छेदन ॥ १९२ ॥
बोलुनि यापरि हस्तप्रहस्त आदिक महाभटां समरीं ।
अपुल्या सवें निघाया आज्ञा करि शीघ्र तो कुबेरारि ॥ १९३ ॥
आला किष्कुपुराला रावण वीरा असंख्य घेऊन ।
जाउनि नरकस्थानीं केलें तद्रक्षकां समुच्छिन्न ॥ १९४ ॥

---

१ आनन्दलो. २ वैदूर्यान्तात. ३ यमस्थानें [illegible]. ४ [illegible]. ५ [illegible].

जनबन्धु रावणानें नरकांतुनि सर्व सुजन उद्धरिलें ।
हें ऐकुनि कोपानें यमें लढायास सुभट पाठविलें ॥ १९५ ॥
दुर्धर बाणसमूहें बिभीषणें सकल वीर लोळविले ।
यमसैन्य धावरुनि बहु जीवित-रक्षार्थ दशदिशांत वळे ॥ १९६ ॥
तेव्हां यम कोपानें स्वयं लढायास येइ समरांत ।
दशकण्ठानें रोधुनि म्हटलें युद्धार्थ सिद्ध हो त्वरित ॥ १९७ ॥
फेकुनि यमसूतावरि तीक्ष्ण अशी बाणपङ्क्ति करि त्यास ।
अतिशय जर्जर तेव्हां पडून भूवरि वरी कुमरणास ॥ १९८ ॥
तीक्ष्ण शरांचा मारा करून केलें यमास रथहीन ।
गेला पळून वेगें वदला इन्द्रास वचन अतिदीन ॥ १९९ ॥
हो वा प्रसन्न मजवरि किंवा करि कोप घेइ जीवन वा ।
करि वा इच्छित कांहीं त्याजिलें वा आज खचित यमभावा ॥ २०० ॥
युद्धीं कुबेर ज्यानें केला अभिभूत त्या दशग्रीवें ।
लढुनि मला जिंकयलें अक्षम मी राहण्यास यमभावें ॥ २०१ ॥
रावण मजला दिसला समरांत जणु प्रचण्डवीर-रस ।
किंवा ग्रीष्मज[2]-सूर्यासम तो दिसला असह्य नयनास ॥ २०२ ॥
या यम वचनें आला इन्द्रा बहु कोप उद्यमी झाला ।
दशकण्ठासह लढण्या सचिवगणें तो परन्तु रोधियला ॥ २०३ ॥
वदला मामा आपण राहा स्वस्थ नि करा न मनिं चिन्ता ।
तो खल जाइल कोठें नेईन तयास शीघ्र मी अन्ता ॥ २०४ ॥
जामाताच्या वचनें रिपुभय सोडून सौख्य भोगीत ।
सुरवरगीत-पुरामधिं राहे यम ज्या न राहिली खन्त ॥ २०५ ॥
इकडे सूर्यरजाला किष्कन्धक नगर रावणें दिधलें ।
दिधलें ऋक्षरजाला किष्कुकपुर सुरपुरास जें हसलें ॥ २०६ ॥
तें बन्धुयुग्म राही सुवर्णसौधांत सौख्य भोगीत ।
रावणकृपाकरा[3]श्रय मिळतां झालें प्रसन्न तत्त्वान्त ॥ २०७ ॥
यापरि विजय यमावरि मिळवुनि गेला दशास्य लङ्केस ।
भोगी सुख मनिं ज्याच्या इन्द्रा जिंकावया वसे आस ॥ २०८ ॥

---

१ यमाच्या सारथ्यावर. २ ग्रीष्मऋतूंतला. ३ दयाळु हाताचा आधार.

ज्यानें निर्मल केलें पुण्य तया सकलसंपदा लाभे।
अखिल नाशें त्याचें धवल जगा करि असें सुयश शोभे ॥ २०९ ॥
धर्म अहिंसा आहे करा तयाची उपासना सतत ॥
तो इच्छित सुख देतो जिनदास तया भजोत सुगुण-रत ॥ २१० ॥

इति श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे पद्मपुराणे यमपराजयवर्णनं नामाष्टमं पर्व ॥ ८ ॥

---

# नवव्या पर्वातील कथांचा सारांश

वानर वंशीसूर्यरजा व त्याची पत्नी चन्द्रमालिनी संसारिक सुखांचा उपभोग घेत असतां त्यांना क्रमानें तीन अपत्यें झालीं. दोन पुत्र व एक कन्या. प्रथम पुत्राचें नांव वाली, दुसऱ्याचें सुग्रीव व तिसऱ्या कन्येचें नांव श्रीप्रभा. वालीनें अनेक विद्या प्राप्त करून घेतल्या होत्या. तो अत्यन्त शूर, धीर, ज्ञानी व विवेकी होता. सूर्यरजानें वालीला राज्य दिलें. सुग्रीवाला युवराज केलें व स्वतः 'पिहितमोह' नामक मुनीजवळ जिनदीक्षा घेतली व तप करीत तो विहार करूं लागला.

सूर्यरजाच्या भावाचें नांव ऋक्षरजा होतें व त्याच्या पत्नीचें नांव हरिकान्ता. या उभयापासून नल व नील हे दोन पुत्र झाले.

( चन्द्रनखेचें हरण )

एके दिवशीं रावण मेरुपर्वतावर जिनमन्दिरांना वन्दन करण्यास गेला असतां खरदूषण चन्द्रनखेला हरण करून आपल्या स्थानीं निघून गेला. कुम्भकर्ण व बिभीषणांनीं त्याचा पाठलाग केला पण जिवन्त धरून आणणें त्यांना अशक्य वाटलें म्हणून ते ससैन्य परत आले. रावण वन्दना करून परत आल्यावर त्याला ही वार्ता समजली. तो त्याच्याशी—खरदूषणाशीं लढून चन्द्रनखेला परत आणण्याचा विचार करीत असतां त्याला मंदोदरीनें सांगितलें " नाथ, कन्या ही योग्य वराला द्यावी लागते व खरदूषण योग्य असल्यामुळें त्यानें तिचें हरण केलें व तिलाही तो योग्य वाटला असल्यामुळें त्याला तिनें वरिलें आहे. तेव्हां आपण त्याच्या बरोबर लढण्यास जाऊ नये. युद्धांत तो मारला गेला तर चन्द्रनखेला वैधव्य येईल. कदाचित् आपण तिला त्याच्या पासून परत आणलें तर हरणाच्या दोषामुळें तिच्याशी कोणी विवाह करण्यास तयार होणार नाहीं. यास्तव आपण लढण्यासाठीं जाणें योग्य नाहीं. व तो अनेक विद्यांचा स्वामी असल्यामुळें आपणासही त्याचें मोठें साहाय्य होईल यास्तव लढण्यास जाणें योग्य नाहीं " असें तिनें सांगितलें; तेव्हां रावणानें आपला उद्देश रहित केला.

पाताल लंकेत चन्द्रोदर नामक राजा अनुराधा पत्नी बरोबर सुखानें राज्य करीत होता. पण खरदूषणाबरोबर लढाई होऊन त्याचा पराजय झाला त्यामुळें तो पाताल-लंका त्यागून पत्नीसह वनांत पळून गेला. खरदूषण तेथें राज्य करूं लागला.

चन्द्रोदर राजा वनांत दुर्दैवानें मरण पावला. त्यावेळीं त्याची पत्नी गर्भवती होती. मोठ्या कष्टानें वनांत ती राहिली. नवमासांनीं तिला सिंहासारखा पराक्रमी पुत्र झाला. परंतु त्याला आपल्या पित्याचें राज्य मिळविता आलें नाहीं. वनांतच तो कष्टानें आपल्या मातेसह राहू लागला.

## [ वालीचें रावणाबरोबर युद्ध ]

वालीचा उत्कर्ष रावणाला सहन झाला नाहीं म्हणून त्यानें वालीकडे एक दूत पाठविला. तो " म्हणाला रावणाच्या वंशजांचा व तुझ्या वंशजांचा प्राचीन कालापासून स्वामिसेवक संबंध आहे. तुमच्या वंशजावर रावणवंशजानीं अनेक उपकार केले आहेत. एवढेंच नव्हे तर तुझ्या पित्याला व चुलत्याला यमराजानें कैदेंत घालून पुष्कळ नरकदुःखें दिलीं आहेत व त्यापासून सुटका रावणानें यमाचा पराजय करून केली व ते त्यामुळें पुनः आपल्या राजधानींत येऊन राज्य करूं लागले. यास्तव आपण रावणाची आज्ञा मान्य करून त्याच्या अंकित राहून राज्य करावें." हें दूतानें भाषण ऐकून वालीला क्रोध आला परंतु तो न दाखवितां शांततेनें बोलूं लागला. तो म्हणाला " हे दूता आम्हां उभयतांचे वंशज मागें अन्योन्य मित्र होते. ते स्वतंत्र होते. आमचे वंशज सेवक व रावणाचे वंशज स्वामी नव्हते. मी जिनदेवाशिवाय कोणाला वन्दना नमस्कार करणार नाहीं. अशी प्रतिज्ञा केली. यास्तव मी त्याची आज्ञा मुळींच मानणार नाहीं. व युद्धालाच त्याला उभा राहावयाचें असेल तर मीही तयार आहे." असें वालीनें भाषण केल्यावर दूतानें रावणाला त्याप्रमाणें कळविलें. रावण सैन्यासह आला दोन्हीं सैन्यें लढलीं. पुष्कळ घोडे, हत्ती, वीर मेलेले पाहून वालीला दया आली. तो रावणाकडे येऊन म्हणाला " वीर रावणा ही हिंसा नरकाला नेणारी आहे. शत्रूवर विजय मिळविण्यासाठीं हें युद्ध करणें योग्य नव्हे. आपण दोघेहि श्रावक आहों, आपण दोघे बाहुयुद्ध करूं या." रावणानें त्यांचें बोलणें मान्य केलें. प्रथमतः दोघेंच शस्त्रास्त्रांनी लढले पण त्यांत कोणालाच विजय मिळाला नाहीं. रावण रागावून चन्द्रहास खड्ग घेऊन त्याच्यावर धावला. त्यावेळीं त्याला पटकन पकडून वालीनें भूवलयाला प्रदक्षिणा घातली आणि पुनः रणभूमीवर त्याला आणून ठेविलें. व म्हटलें " रावणा व्यर्थ अभिमान सोड. जिनेश्वराशिवाय इतरांना वंदन करणार नाहीं अशी प्रतिज्ञा मी केली होती ती सफल झाली आहे. हा अभिमान शत्रु आहे. यानें सम्यग्दर्शन मलिन होतें. त्यानें मोहित करून तुला पराजित केलें आहे. असो. मला हें भूमण्डल जिंकण्याची इच्छा नाहीं. तें आतां तूं घे तुला हें हवें

दिली नसती. तुझे उपकार माझेवर झाले आहेत हें मला मान्य आहे. "मी आतां जिनदीक्षा घेऊन मुनि-चारित्र पाळीन, तुझी आज्ञा माझा भाऊ सुग्रीव पाळील." असें बोलून सुग्रीवाला त्यानें आपलें राज्य दिलें. व स्वतः आकाशचन्द्र मुनीजवळ दीक्षा घेऊन तप करूं लागला. विहार करीत वालिमुनि कैलास पर्वतावर आले. व त्यांनीं मासोपवास झाल्यावर आहार घेण्याची प्रतिज्ञा केली व ते त्याप्रमाणें वागत असत. नेहमी आत्मध्यानांत ते तत्पर राहू लागले.

एकेवेळीं नित्यालोक राजाच्या कन्येला-रत्नावलीला वरण्यासाठीं रावण पुष्पक विमानांत बसून निघाला. व जेथें वालीमुनि ध्यानस्थ बसले होते त्या कैलास पर्वताच्या शिखरावरून विमान जात असतां थांबलें. तें कां थांबलें याचा तपास करण्यासाठीं रावण खालीं आला. त्यानें वाली मुनींना पाहिलें. तो अतिशय रागावला. त्यानें या मुनीला समुद्रांत बुडवून टाकावें म्हणून विद्यांचें चिन्तन करून त्या पर्वताच्या तळभागांत प्रवेश केला. तो पर्वत उचलल्यावर विजेप्रमाणें भयंकर शब्द झाला. मुनि शरीरनिःस्पृह होते. या अकार्यानें हा रावण असंख्य जीवांचा नाश करून पातकबंध करील व त्यामुळें हा घोर दुःख भोगील असें त्यांना वाटलें. तसेंच या पर्वतावर भरतानें बांधलेल्या जिनमंदिरांचा नाश झाल्यानें हें तीर्थक्षेत्र नष्ट होईल. आज जिनमंदिरांचें रक्षण व प्राण्यांचें रक्षण करणें हें कार्य मी केलें पाहिजे असा विचार करून त्यांनीं उदार भावानें आपल्या पायाचा आंगटा दाबला त्यामुळें तो उचलेला पर्वत खालीं बसला. रावणाचें अंग दबलें. तोंडांतून रक्त वाहू लागलें. त्यानें मोठ्यानें किंकाळी फोडली. त्याच्या किंकाळीनें सगळा पर्वत प्रतिध्वनियुक्त झाल्यामुळें त्याचें 'रावण' हें नांव प्रसिद्ध झालें.

त्यावेळीं मंदोदरीनें मुनिचरणांना वंदून पतिभिक्षा मागितली. मुनींनीं दयाळु होऊन आपला आंगठा शिथिल केला. पर्वताचा दाब कमी होऊन रावण बाहेर येऊन त्यानें मुनींना वंदन केलें. त्यांची भक्ति करून क्षमा मागितली. नंतर तो जिनमंदिरांत जाऊन वृषभ जिनाच्या गुणभक्तींत अत्यंत लीन झाला. धरणेन्द्रानें त्याची भक्ति पाहून अमोघा नांवाची शक्ति त्याला दिली. नंतर तो नित्यालोक नगरीला गेला. तेथें नित्यालोक राजाच्या रत्नावलि कन्येशी त्याचा विवाह झाला. तेथून तो लंकानगरीला येऊन आनंदानें राहिला.

---

# पर्व नववें

[ वाली विद्याधराचा जन्म ]

## आर्या

सूर्यरजाची पत्नी नाम जिचें चन्द्रमालिनी होतें ।
झाला पुत्र तियेला वाली यत्कीर्ति सुजन-तति गाते ॥ १ ॥
तो धीर वीर होता दया तयाच्या मनीं करी वास ।
ज्ञानी अति-तेजस्वी अनेक विद्याधरां करी दास ॥ २ ॥
प्रतिदिनिं जम्बूद्वीपीं जिनबिम्बा वंदना करायास ।
जात असे नियमानें वाटे त्याच्या मना न आयास ॥ ३ ॥
विद्या अनेक त्याला झाल्या होत्या सुसाध्य खगगणि तो ।
होता श्रेष्ठ खरोखर मेरु जसा सकल पर्वतीं खुलतो ॥ ४ ॥
सुग्रीव त्यास होता लहान भाऊ पराक्रमी धीर ।
विनयादिक सद्‌गुणगण होता त्याचा सदैव परिवार ॥ ५ ॥
झाली श्री जणु दुसरी नामें जी श्रीप्रभा तया भगिनी ।
अनुपम सौंदर्यवती कवि कोण तिच्या गुणा न वाखाणी ॥ ६ ॥
किष्कुप्रमोद नगरीं ऋक्षरजा खगनृपाल राज्य करी ।
हरिकान्ता त्या भार्या रूप जिचें रतिमदास शीघ्र हरी ॥ ७ ॥
या उभयांना झाले नल नील असे कुमार भार दुजे ।
होते स्वजनानन्दी ज्यांना न स्पर्शिलें कधीं हि रजें ॥ ८ ॥
यौवन-लक्ष्मी-भूपित पाहुनि वालीस देइ सूर्यरजा ।
संपूर्ण राज्य अपुलें सुग्रीवाला करून युवराजा ॥ ९ ॥
होउनि शरीर-निःस्पृह सूर्यरजा शिष्य पिहित-मोहाचा ।
झाला यतिवर बनला सुसौध संयमें रमा-विहाराचा ॥ १० ॥
वालीची प्रियभार्या सुन्दर होती ध्रुवा महाराणी ।
होती करीत लज्जित सदा जिचेची सुधेस मधुवाणी ॥ ११ ॥
कपिचिह्न-मुकुट-धारी विपुलैश्वर्या तिच्या सर्व भोगी ।
ज्याची आज्ञा धरिती खगपति होऊन सकल गुप्तराणी ॥ १२ ॥

---

१ बहिण. २ मदन. ३ [illegible]

[ चन्द्रनखा-हरण ]

एके दिनि मन्दरगिरि-चैत्यालय-वन्दना करायास ।
रावण गेला असतां घडली वार्ता सुविस्मयावास ।। १३ ।।
खर विद्याधर येउन चन्द्रनखेला हरून अनुरागें ।
गेला स्वस्थाना प्रति पकडाया सैन्य लागलें मागें ।। १४ ।।
परि कुम्भकर्ण आणिक विभीषणें तें स्वसैन्य परतविलें ।
युद्धीं जिवन्त धरणें शक्य न तें स्वस्थ म्हणुनि गृहिं वसले ।। १५ ।।
येतां स्वगृहीं वार्ता दशकण्ठा समजतां मनीं कुपित ।
सज्ज जहाला युद्धा तेणें मन्दोदरी वदे त्वरित ।। १६ ।।
कन्या नाथ कुणाला देण्याला योग्य ही असे मात ।
वरिलें स्वयं वराला तिनें जरी जाहलेंचि तें उचित ।। १७ ।।
अतिशय पराक्रमी तो खग विद्याधर तिच्या मना रुचला ।
चन्द्रनखेनें वरिलें अयोग्य कां नाथ! हें घडे बोला ।। १८ ।।
आहे पराक्रमी हा याचें होइल सहाय समरांत ।
धावुनि जाणें त्यावरि योग्य न ही गोष्ट घ्या विचारांत ।। १९ ।।
जरि समर घोर झालें उभयहि आहा समान शौर्याचे ।
होईल कोण विजयी दोघांतुनि हें कसें कळायाचें ।। २० ।।
पावे मरण जरी हा हृतकन्येलों[1] कलङ्क लागेल ।
तिजला कोण वराया नाथा बोला तयार होईल ।। २१ ।।
चन्द्रोदरास जिंकुनि पाताल-पुरींत नाथ ! हा राही ।
आतां स्वजन जहाला होइल नच हित तयासवें द्रोहीं ।। २२ ।।
नंतर दशकण्ठ वदे मम प्रिये युद्ध-भीति मनिं नाहीं ।
त्वद्वचन[2] उचित मानुनि आतां निश्चिन्त चित्त मम राही ।। २३ ।।
इकडे चन्द्रोदर खग दुर्दैवें राज्यहीन होऊन ।
वनिं पर्वतीं नदीतटिं खिन्नमना फिरुनि पावला मरण ।। २४ ।।
न जिला विद्येचें बल भार्या होती तयास अनुराधा ।
पति-मरणानें झाली रात्रन्दिन तन्मनास बहु बाधा ।। २५ ।।

---

१ हरण केलेल्या. २ तुझें भाषण.

पतिमृति-कालीं होती गर्भवती ती मृगी-समान वनीं ।
क्षीण-शरीरा चिन्ता झाली हृदयास तेज नच वदनीं ॥ २६ ॥
सिंही प्रसवे सिंहा तैशी प्रसवे विराध बालास ।
ती अनुराधा साध्वी करिती ज्यामधिं नयादिगुण वास ॥ २७ ॥
बाल्यावस्था सरतां आली यौवनदशा विराधास ।
परि अशुभ-कर्म-योगें नच त्याचा सम्पला वनीं वास ॥ २८ ॥
इकडे कथा-प्रसंगीं महाप्रतापी बली असे वाली ।
कथिलें दशवदनाला रोषें त्याच्या मुखास ये लाली ॥ २९ ॥
अन्यप्रताप सहन न सूर्यासम हो जयास रावण तो ।
वालीसन्निध दूता पाठवुनी तन्मुखें असें वदतो ॥ ३० ॥
मी दूत रावणाचा ऐके संदेश सावधान-मनें ।
अमुच्या वंशीं झाला खगेन्द्र जो कीर्तिधवल धवल गुणें ॥ ३१ ॥
वानरवंशीं खगपति नामें श्रीकण्ठ ये तया शरण ।
रक्षण केलें त्याचें तदीयरिपुगण समस्त वश करुन ॥ ३२ ॥
विरहभयानें ठेवी अपुल्या संनिध तयास देऊन ।
सम्पूर्ण कपिद्वीपा केलें सेवक अनुग्रहा करुन ॥ ३३ ॥
तेव्हां पासुनि चाले उभयामधिं भर्तृभृत्य-सम्बन्ध ।
आजवरी तव वंशज नमिती झाले न वैभवें अन्ध ॥ ३४ ॥
तव मम वंशीं झाले अनेक खगभूप हें तुला विदित ।
परि तुजला मी कथितों संक्षेपें श्रवण ती करीं नात ॥ ३५ ॥
किष्किन्ध तव पितामह होउनि गेला रणीं महाशूर ।
झाला सुकेश खगपति प्रपितामह आमुचा नदीं चतुर ॥ ३६ ॥
नृप सूर्यरज जहाला पिता तुझा गुप्तिसदनिं पीडियलें ।
यमभूपें त्या जिंकुनि पराक्रमें मुक्त त्यास मी केलें ॥ ३७ ॥
आम्हा उभयांचा जो होता सम्बन्ध सांगणें न लगे ।
मजला स्वामी मानुनि करावया नमन येइ तूं वेगें ॥ ३८ ॥
किष्किन्धा-राज्यावरि तव जनका स्थापिलें न ठावें कां ।
स्वामी मजला मानुनि हो यदि नत शीघ्र धरि न मनिं शंका ॥ ३९ ॥

---

१ तोंडावर. २ त्याचा शत्रुसमूह. ३ [illegible] ४ [illegible] मालक यांचा संबंध. ५ नमला. ६ वैभवानें [illegible]. ७ [illegible].

या दूतभाषणानें वालि-खगेन्द्रास कोप मनिं आला ।
परि निर्विकार-भावा वदनावरि दाखवून तो वदला ॥ ४० ॥
माहित मजला आहे अन्योन्यावरि कुलद्वयीं स्नेह ।
राक्षस-कपिराजांचा आजवरी यांत नैव सन्देह ॥ ४१ ॥
सुख-दुःखांच्या समयीं केलें साहाय्य एकमेकांनीं ॥
स्नेहचि हेतु तयाला न सेव्यसेवकपणा[1] धरी ध्यानीं ॥ ४२ ॥
मी सर्वज्ञ-जिनाला तेवी निर्ग्रन्थ जैन-मुनिवर्या ।
वन्दन करितों यांविण इतरां नच सांग रावणा आर्या ॥ ४३ ॥
मी सेव्य इतर सेवक ऐसें मानून तोडिला स्नेह ।
दूता त्वत्स्वामीनें वद टाकुनि दे मनांतला मोह ॥ ४४ ॥
होता कुलक्रमागत[2] जो स्नेह तयास मोडिलें त्यानें ।
परि मम दृढ प्रतिज्ञा भंगेल न केधवा हि नियमानें ॥ ४५ ॥
अप्रिय कार्य करी तो करीन त्याचा दृढ प्रतीकार ।
पूर्वस्नेह हराया झाला उद्युक्त तोचि मी न नर ॥ ४६ ॥
बोलुनि या परि दूता वालीनें जा म्हणून सांगितलें ।
दूतें हि दशग्रीवा कथिलें चित्तांत सुदृढ जें ठसलें ॥ ४७ ॥
दूतमुखानें जाणुनि वालि-खगाशय[3] दशास्य रागावें ।
आला ससैन्य वेगें उद्ध्वस्त करीत अग्निसम गांवें ॥ ४८ ॥
किष्किन्धेच्या संनिध आला पाहून वालिराजाही ।
आला ससैन्य केल्या शुभ्र स्वयशें जयें दिशा दाही ॥ ४९ ॥
घनघोर युद्ध झालें तेव्हां दशकण्ठ-वालि-सैन्याचें ।
गजहय-नर बहु मेले दृश्य दिसे फार भयद समराचें ॥ ५० ॥
रथ बहु चूर्णित झाले जागोजागीं मरून हय पडले ।
मत्त गजेन्द्र हि समरीं पर्वतशिखरासमान कोसळले ॥ ५१ ॥
जागो जागीं पडले मरून सैनिक न मोजवे कोणा ।
पाहुनि दृश्य असें हें वालि नृपाच्या मनांत ये करुणा ॥ ५२ ॥
सत्वर येउनि वदला दशानना वालिवीर करुणेनें ।
योग्य नसे ही हिंसा विचार चित्तीं करी विवेकानें ॥ ५३ ॥

---

१ मालकनोकरसंबंध. २ वंशपरंपरेनें चालत आलेला. ३ वालिविद्याधराच्या मनांतला विचार.

क्षुद्र अशा जीवासहि वधणें योग्य न विवेकि-पुरुषास।
हस्त्यादिकजीवांची हिंसा नेईल कां न नरकास ॥ ५४ ॥
अरिजय मिळवाया ही वीरा हिंसा अशी नसे उचित।
निजभुजयुद्धें वीरा विजय-रमा माळ घालिते त्वरित ॥ ५५ ॥

[ बाहुयुद्धांत रावणाचा पराभव ]

भुजबल-शाली वीरा, दे तूं हें सैन्य-युद्ध सोडून।
तूं श्रावक मी श्रावक भुजयुद्धचि योग्य बोलतें स्वमन ॥ ५६ ॥
या परि त्या धर्मज्ञें सांगितलें मान्य रावणें केलें।
उभयहि निज बाहूंनीं लढावया सज्ज तेधवा झाले ॥ ५७ ॥
नानास्त्रांनीं लढलें परि नच जय लाभला कुणा त्यांत।
अन्योन्यास वधाया केलें त्यांनीं प्रयत्न जरि अमित ॥ ५८ ॥
असिचन्द्रहास दारुण महाभुजङ्गासमान घेऊन।
दशकन्धर वालीवर धावे चित्तांत कुपित होऊन ॥ ५९ ॥
परि वालि-खगेन्द्रानें वामभुजें त्यास सुदृढ पकडून।
भूवलय फिरुनि येउनि ठेवियेलें समरिं हृष्ट होऊन ॥ ६० ॥
लज्जावनम्र झालें मुख ज्याचें दशमुखास वालि वदे।
बाहून तुला नेलें हे दशकण्ठा ! वृथाभिमान न दे ॥ ६१ ॥
लोकत्रयपति-पूजित जिन-देवाविण न अन्य वन्द्य मला।
हें सांगतों तुला मी त्या माना त्याग रे सुदृष्टिमला ॥ ६२ ॥
हा मान शत्रु आहे याचा हृदयामधे असे वास।
मोहित केलें त्यानें त्यानें दिधला तुला बहु त्रास ॥ ६३ ॥
पूर्वोपकार सगळे स्मरुनि तुझे मुक्त मी तुला केलें।
आज्ञा अखण्ड चालो समस्त भूराज्य मी तुला दिधलें ॥ ६४ ॥
जिंकायाची इच्छा मनांत उत्पन्न जाहली असती।
माझ्या जरि ही पृथ्वी केव्हांही मी तुला दिली नसती ॥ ६५ ॥
करितो विहार जेथें सिंह अशा वनिं कसा करी वास।
गज गण्डस्थल ज्याचें मदार्द्र तो खचित पावतो नाश ॥ ६६ ॥

---

१ हत्ती, घोडे, पायदळ वगैरे. २ पुष्कळ. ३ डाव्या हातानें. ४ सम्यग्दर्शनाचा अतिचार.

[ वालिराजानें दीक्षाग्रहण व त्यास ऋद्धि-प्राप्ति ]

श्रीजिनदीक्षा घेउनि पाळिन मी अमल मुक्तिचारित्र ।
सुग्रीव तुझी आज्ञा पाळायाचें बनेल सत्पात्र ॥ ६७ ॥
या परि सुग्रीवाला देउनि निजराज्य तो कृपाधार ।
आकाशचन्द्र मुनिवर संनिध उपटून मूर्धकचभार ॥ ६८ ॥
घेउनि दीक्षा झाला ऋद्धींचा एकमात्र आधार ।
त्याच्या समान नव्हता दुसरा मुनिराज जो तपःशूर ॥ ६९ ॥
विहरत नाना-नियमें जाउनि कैलास-पर्वतावरती ।
कायोत्सर्गे प्रतिमायोगातें वालियोगिवर वरिती ॥ ७० ॥
मासोपवास होतां कायोत्सर्गा त्यजून आहारा ।
करिती ग्रहण नि पुनरपि कायोत्सर्गास वरिति अवधारा ॥ ७१ ॥
उत्सर्ग नियम या परि त्यांचा आजीवितान्त नित चाले ।
अङ्गीकृत प्रतिज्ञा निर्वाहीं सन्त चित्त नैव चळे ॥ ७२ ॥

( श्री प्रभेचा रावणाबरोबर विवाह )

इकडे दशकण्ठाला सुग्रीवें श्रीप्रभा निजा भगिनी ।
प्रेमें अर्पण केली रूपें जी श्री-समान गुणखाणी ॥ ७३ ॥
चन्द्रकरासम उज्ज्वल यश पसरे म्हणुनि चन्द्ररश्मि असा ।
सुत वालीचा होता पराक्रमी त्रिभुवनीं दुजा न तसा ॥ ७४ ॥
युवराज-पद तयाला सुग्रीवानें दिलें महामोदें ।
राज्य स्वयं करी जन-हितकर जेथें सदैव सुख नांदे ॥ ७५ ॥
दशकण्ठ निजाज्ञावश सुग्रीवा करुनि मोद मनिं मानी ।
गेला निज लङ्केला घेऊन श्रीप्रभेस बहुमानी ॥ ७६ ॥
वश करुनि खगनृपांना त्यांच्या कन्या वरून हर्षानें ।
सर्व जनमान्य-शासन झाला लोकीं यशःप्रकर्षानें ॥ ७७ ॥
नित्या-लोका नगरीं नृप नित्या-लोक सुजनगण मान्य ।
रत्नावली तयाला कन्या रूपें रतीस दे दैन्य ॥ ७८ ॥

---

१ निरतिचारदोषारहित. २ मस्तकाचे केशसमूह. ३ शरीरावरील ममत्व त्यागून एकेच ठिकाणीं पक्ष, मास, वर्ष अशा नियमानें आत्मध्यानांत तत्पर राहणें तो प्रतिमायोग होय.

तिजला वरावयाला पुष्पक-यानीं वसून दशकण्ठ ।
चाले कैलासावरि येतां झाली विमानगति कुण्ठ ॥ ७९ ॥

[ रावण कैलास पर्वत उचलतो ]

रुकलें विमान पाहुनि वदला दशकण्ठ तीव्र कोपानें ।
माझें विमान रोकुनि इच्छी नर कोण यममुखीं जाणें ॥ ८० ॥
बोलुनि खालीं उतरुनि पाही कैलास-शैल-शिखरास ।
वालि-मुनीन्द्रा वदला वरिशी अद्यापि का विरोधास ॥ ८१ ॥
जगता फसवायाला मुनिव्रता धरिशि हाय दम्भानें ।
परि दाम्भिक मनुजाला उपयोग न होय धर्मलाभानें ॥ ८२ ॥
मजला सचन्द्रहासा धरून फिरलास सर्व भूमिवरी ।
आतां सशैल तुजला अवश्य बुडविन पयोधिच्या नीरीं ॥ ८३ ॥
यापरि बोलुनि फोडुनि अष्टापद गिरितलांत तो शिरला ।
विद्यासहस्र चिन्तुनि उचली दशकण्ठ शीघ्र त्या शैला ॥ ८४ ॥
झाला विजेप्रमाणें तेव्हां रव कर्णपरुष[1] भयकारी ।
गज-सिंह-देव-नरगण विह्वल होऊन मूढतेस वरी ॥ ८५ ॥
उद्धृत[2] पर्वत पाहुनि महर्द्धि-धारी मुनीश-हृदयांत ।
करिती विचार याच्या मात्सर्याचा न जाहला अन्त ॥ ८६ ॥
या कार्यानें दुर्मति[3] घातक होइल असङ्ख्य जीवांचा ।
अघबन्ध घोर होतां भविं भोगिल दुःख हा अनिर्वाचा[4] ॥ ८७ ॥
भरतेश-रचित-जिनवर सदनें तोडून तीर्थविध्वंस ।
करण्या उद्यत झाला गमतो मज खचित राक्षस नृशंस[5] ॥ ८८ ॥
मजला नच भय वाटे आहे मी निजशरीर-निर्मोह[6] ।
समतासुधारसाच्या स्वादीं निर्मग्न मी असन्देह ॥ ८९ ॥

( जिनमंदिर व प्राणिरक्षणासाठीं वाली मुनि आंगठा दाबतात )

परि जिनमन्दिर-रक्षण जीवत्राणार्थं[7] आज सन्नद्ध ।
होउनि रावणशासन करीन हा मत्सरें असे दग्ध[8] ॥ ९० ॥

---

१ कानाला कठोर वाटणारा. २ उचलेला. ३ दुष्ट बुद्धीचा. ४ शब्दांनीं वर्णन न करता येणारें. ५ दुष्ट. ६ स्वतःच्या शरीरावर मोह न करणारा. ७ रक्षणाकरितां. ८ होरपळलेला.

निर्णय घेउनि ऐसा पादाङ्गुष्ठें[1] विशाल-शैलास ।
दावी लीलामात्रें थोडें धरुनी उदास भावास ॥ ९१ ॥
मध्याह्नीं देहाची छाया संकोच पावते जैशी ।
पर्वत वसतां रावण-तनुही संकोच पावली तैशी ॥ ९२ ॥
किंवा कूर्मशरीरा[2] उदका-बाहेर[3] येइ संकोच ।
रावणदेहा पर्वत वसतां संकोच पातला साच ॥ ९३ ॥
भुजदण्ड वक्र झाले येइ मुखांतून रक्त बाहेर ।
ओरडला वेगानें 'रावण' नामास पावला शूर ॥ ९४ ॥
पतिभिक्षा मज यावी वदुनि असें मुनिपदास वंदून ।
मन्दोदरी रडे तें केला तत्काल शिथिल निजचरण ॥ ९५ ॥
रडणें दीन तियेचें ऐकुनि मुनिवरमनीं दया आली ।
केलें मुक्त तयाला तेणें निजवदन घातलें खालीं ॥ ९६ ॥
होऊन निःप्रतापी पश्चात्तापा धरून हृदयांत ।
येउनि वालिमुनींना प्रणाम केला नि जाहला शान्त ॥९७॥
अपराध बहुत केले मुनीश्वरा मी न चित्त मम लाजे ।
गतपार[4] शक्ति असूनिहि मन अपुलें नाथ हें दयें साजे ॥ ९८ ॥
भुजबल अपार असुनिहि नाथा ! भूमण्डला तुवा त्यजिलें ।
असमर्थताचि कारण मूर्खवरें मी परन्तु मानियलें ॥ ९९ ॥
माझ्या आणिक अपुल्या शक्तीचें ज्ञान जाहलें मजला ।
मी क्षुद्र थोर आपण भेद मला आज चांगला कळला ॥ १०० ॥
पर्वत आणिक वारुळ भुजङ्ग तैसेंचि गरुड-राजाचें ।
अन्तर जैसें मोठें तैसें उभयांतलें गमें साचें ॥ १०१ ॥
पाउल पडलें होतें माझें मुनिनाथ मृत्युमार्गांत ।
प्राण दिले अपकाऱ्या वन्दन माझें त्वदीय-चरणांत ॥ १०२ ॥
बोलुनि दृढभक्तीनें पुनः पुनः मागुनि क्षमा घाली ।
हर्षें प्रदक्षिणात्रय तत्पदरज[5] लावि आपुल्या भालीं ॥ १०३ ॥
जाणुनि वालिमुनीचें माहात्म्य सुरां प्रमोद बहु झाला ।
केली त्यांच्यावरती सुरसुमवर्षा[6] सुगन्ध दरवळला ॥ १०४ ॥

---

१ पायाच्या आंगठ्यानें. २ कासव. ३ पाण्याबाहेर. ४ अमर्याद. ५ वाली-मुनीच्या पायांची धूळ. ६ कल्पवृक्षाच्या फुलांची वृष्टि.

यापरि वालिमुनीन्द्रा वन्दुनि भरतेशरचित-जिनसदनीं ।
गेला रावण अन्त:पुरस्त्रियासह सुनम्र होवोनि ॥ १०५ ॥
वृषभादिक[1]-जिनपति-पद-पद्मद्वन्द्वा प्रसन्न-चित्तानें ।
अष्टद्रव्यें यजिलें जिनगुण गाऊन मधुरकण्ठानें ॥ १०६ ॥
काढून निजभुजांतुनि दशकण्ठें स्नायुतार भुजवीणा ।
वाजविली भक्तीनें होउनि जिनगुणगणांत लीनमना[2] ॥ १०७ ॥
तो साहसी दशानन वाजवि बहुरागरम्य भुजवीणा ।
अन्त:पुर.ललनागण सप्तस्वरयुक्त मधुर करि गाना ॥ १०८ ॥
जिनवन्दन करण्यास्तव फणिपति धरणेन्द्र त्या स्थळीं आला ।
अर्हत्पदयुग पूजुनि नन्तर तो त्यास वन्दिता झाला ॥ १०९ ॥
अर्हद्गुणमय गायन वीणावादन करून गातांना ।
धरणें दशाननाला पाहियलें गोड तान घेतांना ॥ ११० ॥
धरणेन्द्र त्यास वदला दशानना भक्तिलीन होऊन ।
तूं गायिलेस जिनगुण तेणें झालें मम प्रसन्न मन ॥ १११ ॥

( धरणेन्द्र रावणाला अमोघविजयाशक्ति देतो. )

अर्हद्गुणस्तुतीचें फल मिळतें मुख्य मोक्ष ऋषि वदती ।
परि मी ऐहिक देइन फल घोळत जें असेल तव चित्तीं ॥ ११२ ॥
रावण यापरि वदला जिनदेवाच्या गुणस्तवें तुष्ट[3] ।
झालास म्हणुनि माझें मन झालें उरगनाथ बहु हृष्ट[4] ॥ ११३ ॥
मज इष्ट दान देतां तव जिनभक्ति-प्रकर्ष होईल ।
करिता फलाभिलाषा माझी जिनभक्ति नाश पावेल ॥ ११४ ॥
मानी दशानना तव निष्कांक्षा[5]गुण बघून मन मोदें ।
देतो अमोघ विजयाशक्ति तुला मी तया नकार न दे ॥ ११५ ॥
देऊन रावणाला शक्ति अमोघा फणीश निजनिलया ।
गेला रावण गुणगण-चिन्तन ज्याच्या न सोडिते हृदया ॥ ११६ ॥
श्रीजिननाथा वन्दुनि नित्यालोकाह्वया पुरीं गेला ।
रत्नावली-कर[6]ग्रह करून दशकण्ठ येइ लंकेला ॥ ११७ ॥

---

१ वृषभादिक जिनेश्वरांच्या पायरूपी कमलांच्या जोडीला. २ एकाग्र चित्ताचा. ३ आनन्दित. ४ हर्षयुक्त. ५ सम्यग्दर्शनाचा दुसरा गुण-सांसारिक फलाची इच्छा न करणें. ६ रत्नावलीशी लग्न करून.

( वालिमुनींना केवलज्ञान होतें व मोक्षप्राप्ति )

वालिमुनीन्द्रा झाला मोहादिक-घाति-कर्म-नाशानें ।
केवल-बोध सुनिर्मल लोकालोकास जाणिलें तेणें ॥ ११८ ॥
यापरि अघातिनाशें शाश्वतसें मोक्षसौख्य त्या लाभे ।
सिद्ध जयाला म्हणती सिद्धगुणांनीं सदैव जो शोभे ॥ ११९ ॥
इन्द्रियविजयी ऐशा श्रमणें मज जिंकलें असें म्हणुन ।
लंकापति दशकन्धर मुनिवन्दन करुनि पूजि तच्चरण ॥ १२० ॥
सम्यग्दृष्टि असा तो ठेवी दृढभक्ति सतत जिनचरणीं ।
उत्तमभोगें विभवें अतृप्त मनि ठेवि पूज्य जिनवाणी ॥ १२१ ॥

[ उपजातिवृत्त ]

जो ऐकतो वालिचरित्र भावें । तो शोभतो भव्यजनीं प्रभावें ।
पराभवा तो न कदापि जातो । तो सर्वदा श्रीजिनदास होतो ॥

इति श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत
पद्यानुवादे पद्मपुराणे वालि निर्वाणाभिधानं नाम नवमं पर्व ॥ ९ ॥

---

१ ज्ञानावरण, दर्शनावरण, अन्तराय व मोहनीय या चार कर्मांना तीं ज्ञानादिकगुणांचा घात करीत असल्यामुळें घातिकर्म म्हणतात. २ वेदनीय, नाम, गोत्र, व आयु यांना अघाति कर्म म्हणतात. ३ सम्यक्त्व, ज्ञान, दर्शन, वीर्य, सूक्ष्म, अव्याबाध सुख, अगुरुलघु, अवगाहन हे आठ सिद्धगुण होत.

# दहाव्या पर्वातील कथांचा सारांश

सुग्रीव रावणाला आपली बहीण श्रीप्रभा देऊन त्याचा आज्ञाधारक मांडलिक बनला होता. ज्योतिःपुर नगराचा राजा ज्वलनशिख. त्याला 'तारा' नांवाची अत्यन्त सुन्दर कन्या होती. चक्राङ्क राजाचा मुलगा साहसगति. तो तारेच्या सौंदर्यावर लुब्ध झाला होता व सुग्रीवहि. दोघांनीं तारा आपल्याला द्यावी म्हणून ज्वलनशिखाला अनेक वेळां विनविलें होतें.

एके वेळीं मुनिचन्द्र नामक ज्ञानी मुनीश्वरांना 'मी कन्या सुग्रीवाला देऊ कां साहसगतीला देऊ' असा प्रश्न विचारला. त्यांनीं साहसगति अल्पायु आहे असें सांगितलें व सुग्रीवाला तूं तारा दे असें म्हटलें. मुनिराजांच्या वचनाला अनुसरून राजानें सुग्रीवाबरोबर तारेचा विवाह केला. तारा आणि सुग्रीव सुखानें राहूं लागले. त्यांना अङ्ग व अंगद असे दोन सद्गुणी पुत्र झाले.

साहसगतीला तारा न मिळाल्यामुळें फार वाईट वाटलें. पण तिची प्राप्ति छलानें किंवा बलानें आपण करून घेऊच असा त्यानें मनांत निश्चय केला. त्यानें 'रूपपरावर्तनीं' नामक विद्या सिद्ध करून घेण्याचें ठरविलें व हिमवान् पर्वताच्या गुहेंत जाऊन पुष्कळ वर्षें त्यानें ती विद्या आराधिली. तिची प्राप्ति झाल्यानें त्याला आनन्द वाटला. आतां आपलें इच्छित जरूर मिळेल असें त्याला वाटूं लागलें.

इकडे रावण दिग्विजयाला निघाला. मेहुण्याला (खरदूषणाला) भेटून पुढें जावें असें ठरवून तो पाताल लंकेला गेला. मेहुण्यानें त्याचें स्वागत करून कांहीं दिवस अत्यादरानें ठेवून घेतलें. नंतर तो पुढें चालला. अनेक मित्रराजेही आपल्या सैन्यासह त्याला येऊन मिळाले त्यामुळें त्याचें सैन्य सागराप्रमाणें विशाल झालें.

अनेक राजे त्याला वश झाले. प्रयाण करीत रावण रेवा [ नर्मदा ] नदीच्या तीराकडे आला. एका सुन्दर स्थानीं त्यानें आपल्या सैन्यासह मुक्काम केला.

प्रातःकालीं शुचिर्भूत होऊन रेवा नदीच्या निर्मल तटावर रत्नमय सिंहासन स्थापून त्यावर रत्नमय जिनमूर्ति ठेवून त्यानें अभिषेक केला व जिनगुण गात जिनप्रभूची पूजा केली. प्रभूच्या चरणांना सुगन्धी केशरगंध चर्चून सुगन्धि कमलें त्यानें वाहिलीं. इतक्यांत पाण्याचा मोठा प्रवाह येऊन ती सर्व पूजाद्रव्यें वाहून गेलीं. 'कोण्या दुष्टानें माझ्या पूजेंत विघ्न आणिलें त्याला बान्धून आणा' अशी आज्ञा रावणानें कोपून केली. तत्काल पुष्कळ सैनिक प्रवाह जिकडून आला होता तिकडे धावले. त्या स्थानीं माहिष्मती नगरीचा राजा सहस्ररश्मि आपल्या अनेक राण्यासह जलक्रीडा करीत होता. जलक्रीडेच्या व्यवस्थेसाठीं त्याचे पुष्कळ सैनिकही तेथें आजुबाजूला होते. रावणाच्या सैनिकांनीं आकाशांतून बाणवृष्टि त्यांच्यावर केली त्यामुळें राजाचे सैनिक पटापट पडूं लागले. राजानें हें पाहिलें व त्यानें आपल्या स्त्रियांना 'थोडा वेळ धैर्य धारण करा मी शत्रूंना जर्जर करून लौकरच येतो' असें सांगितलें व त्यानें खालून विद्याधर सैन्यावर अखण्ड बाणवृष्टि केली. त्यांचीं मस्तकें पटापट जमिनीवर पडूं लागलीं. कांहीं सैनिक पळून गेले. रावणानें त्यांना पळत येतांना पाहिलें व स्वतः राजा बरोबर लढण्यासाठीं तेथें येऊन तो शस्त्रांनीं लढूं लागला. शस्त्रांनीं आपण याला जिंकू शकत नाहीं असें वाटल्यानें त्यानें राजावर मोहनास्त्राचा प्रयोग केला व त्याला बान्धून रावणानें आपल्या शिबिरांत नेलें.

दुसरे दिवशीं रावण सभेंत आनंदानें बसला होता. तेव्हां 'शतबाहु' नामक चारणमुनि तेथें आले. रावणानें उठून भक्तीनें त्याच्या चरणांना नमस्कार केला. एका उच्चासनावर त्यांना त्यानें बसविलें व आपण जमिनीवर बसला. मुनीश्वरांनीं धर्मलाभाचा आशीर्वाद दिल्यावर हात जोडून येण्याचें कारण त्यानें विचारलें. मुनिराज म्हणाले 'राजन् येथून जवळच असलेल्या माहिष्मती नगरीचा मी राजा होतो. मला संसार, शरीर व भोगापासून विरक्ति उत्पन्न झाली व शुद्ध आत्म्याच्या अनुभवाची उत्कण्ठा उत्पन्न झाली. मी माझ्या सहस्रकिरणपुत्राला राज्य दिलें व महाव्रत दीक्षा घेऊन तपश्चरण केलें.' अशी अल्प हकीकत सांगून त्यांनीं मौन धारण केलें.

रावणानें आनन्दानें म्हटलें 'महाराज, सहस्रांशु राजा आपला पुत्र आहे हें मला समजलें. त्याचें शौर्य पाहून मला फार आनन्द झाला. मी दिग्विजयासाठीं

निघून या ठिकाणीं आलों. येथें नर्मदानदीच्या किनाऱ्यावर जिनप्रभूंचें पूजन मी करीत असतां आपल्या पुत्राच्या जलक्रीडेच्या जलप्रवाहानें माझें पूजासाहित्य वाहून गेलें. त्यामुळें मी सहस्रांशु राजाला बांधून येथें आणिलें आहे. माझ्या हातून हें अकार्य घडलें आहे.' असें बोलून राजा सहस्रांशूला सभेंत आणविलें. रावणानें त्याला नमस्कार केला व सहस्रांशूनें आपल्या पित्याला वन्दन केलें व मनांत तो लज्जित झाला.

रावणानें त्याला म्हटलें ' राजन् ! तूं माझा चौथा बंधु आहेस. हे चारणर्षि माझ्या पित्यासारखे आहेत. तूं आपल्या राज्याचें रक्षण कर किंवा माझ्या राज्याचा अंश मी तुला देतो तो घे' असें बोलून राजाला त्यानें मुक्त केलें. राजा म्हणाला ' मला आतां राज्याची इच्छाच नाहीं. मी संसारविरक्त झालों आहे.' असें बोलून त्यानें आपला पुत्र रावणाच्या स्वाधीन केला. अयोध्येचा अनरण्य राजा सहस्रांशूचा मित्र होता. दोघांनीं एकाच वेळीं दीक्षा घेण्याची प्रतिज्ञा केली होती. त्याप्रमाणें सहस्रांशूनें एकदूत अनरण्य राजाकडे पाठविला.

अनरण्य राजाला अनन्तरथ व दशरथ असे दोन पुत्र होते. ज्येष्ठ पुत्र अनन्तरथानें 'मी ही आपल्या बरोबरच दीक्षा घेतो' असें सांगितलें म्हणून अनरण्यानें दशरथ पुत्राला राज्य दिलें व ज्येष्ठ पुत्रासह अनरण्य सहस्रांशु मित्राबरोबर दीक्षित झाला व तिघेजण तपश्चरण करूं लागले. अर्थात या तिघांनीं शतबाहूजवळ महाव्रत दीक्षा घेतली.

रावणानें शतबाहु व सहस्रांशु या मुनिद्वयाला नमस्कार करून निःस्पृहपणानें सहस्रांशु राजाच्या पुत्राला राज्यावर बसविलें.

आत्महित करणारें शुभ कर्म जेव्हां उदयाला येतें तेव्हां त्याला शत्रु किंवा मित्र निमित्त होतात. त्यामुळें आपल्या ठिकाणीं शुभमति उत्पन्न होते. याप्रमाणें या पर्वात सहस्रांशूचें संक्षेपानें चरित्र सांगितलें आहे.

# पर्व दहावें

( सुग्रीवाचा तारेशीं विवाह व अङ्ग आणि अङ्गद यांचा जन्म )

इकडे विजयार्धावरि आहे ज्योतिःपुर प्रसिद्ध पुर ।
भूप ज्वलनशिखाभिध जो विद्याधरगणीं असे प्रवर[1] ॥ १ ॥
जी रूपसंपदेनें शोभे त्या श्रीमती असे भार्या ।
कन्या उभया तारा मान्य जिचे सकल सुगुण बुधवर्या ॥ २ ॥
चक्राङ्कात्मज साहसगति या नामें नृपाल खग एक ।
पाहुनि तिजला विह्वल झाला नुरला तयास सुविवेक ॥ ३ ॥
ज्वलनशिखीला वदला तारा कन्या तुम्ही मला द्यावी ।
सुग्रीव हि खग वोले विनन्ति माझी तुम्ही मनीं घ्यावी ॥ ४ ॥
मुनिचन्द्र श्रमणवरा वन्दून ज्वलनशिख असें वदला ।
दोघे कुलीन वर हे पराक्रमी रूपवन्त कोणाला ॥ ५ ॥
द्यावी माझी कन्या आपण निर्णय करून सांगावें ।
साहसगति हा आहे ज्वलना अल्पायु त्यास त्यागावें ॥ ६ ॥
द्यावी सुग्रीवाला माझ्या वचना प्रमाण तूं मान ।
संशयसागर जाईं तरून मानून नाव मद्वचन[2] ॥ ७ ॥
ज्वलनशिखीनें प्रेमें सुग्रीवाशीं स्वकीय कन्येचा ।
केला विवाह तेणें सुग्रीवा मोद जाहला साचा ॥ ८ ॥
साहसगति अतिदुःखित झाला अभिलाषित[3] नष्ट झाल्यानें ।
तडफडला हृदयीं वहु इकडे तिकडे बघे उदासपणें ॥ ९ ॥
सुग्रीव आणि तारा यांचा गेला सुखांत वहु काल ।
अङ्ग नि अङ्गद झाले पुत्र तया विक्रमी दयाशील ॥ १० ॥

( साहसगतीला विद्या सिद्ध होतें )

तारे विषयीं राहे साहसगतिमनिं सदैव अनुराग ।
लाभेल मला केव्हां सुखद तिचा चुम्बनादि-संयोग ॥ ११ ॥
केव्हां लाभेल मला गाढालिङ्गन सुकोमलाङ्गीचें ।
तिजला बलें छलें[4] वा हरीन भोगीन सुरत-सौख्य तिचें ॥ १२ ॥

---

१ श्रेष्ठ. २ माझें भाषण. ३ इच्छित तारेची अप्राप्ति झाल्यानें. ४ कपटानें.

सिद्ध करावी विद्या ' रूपपरावर्तनी ' सुनामाची ।
तेणें तारा लाभुनि करिता येईल तृप्ति कामाची ॥ १३ ॥
साधाया तो गेला हिमवत्पर्वत गुहेंत तो मूढ ।
झाली तयास विद्या वहुकालें सिद्ध उकललें गूढ ॥ १४ ॥
वाटे मनास त्याच्या आली आनन्द-सागरा भरती ।
ईप्सित[1] सिद्धचि होइल आतां राहील लवहि न भ्रान्ति ॥ १५ ॥
इकडे लंकापुरपति रावण दिग्जय करावयास निघे ।
रवि पूर्वपर्वताहुनि जैसा मेरुप्रदक्षिणेस रिघे ॥ १६ ॥

( भगिनीकडे रावणाचा पाहुणचार )

विद्याधरराजांना भूमिनृपां[2] द्वीपवासि नृपतिगणा ।
वश करुनि तो निघाला भगिनीपति[3] खरखगाकडे राणा ॥ १७ ॥
स्वपुरा वहु शृङ्गारुनि आला स्वागत करावयास खर[4] ।
अर्पुनि नजराणे वहु केला त्यानें अपूर्व सत्कार ॥ १८ ॥
रावण तेथें राहुनि कांहीं दिन तो निघे खरासहित ।
इन्द्रास जिंकण्यास्तव विद्याधर-नृपसहस्र-संयुक्त ॥ १९ ॥
वायु जसा अग्नीला करितो साहाय्य रावणास तसें ।
सुग्रीवाचें होतें ससैन्य तो त्या समीप नित्य वसे ॥ २० ॥
वाढे नदीजलानें समुद्र दशकण्ठ-सैन्य-सागरसें ।
वाढे प्रतिदिनिं रावण करी प्रयाणास भूप मोदरसें ॥ २१ ॥

( रावणाच्या जिनपूजनाची सामुग्री जलप्रवाहानें वाहून जाते )

करित प्रयाण आला रावण रेवानदी[5]-तटावरती ।
स्थान मनोहर पाहुनि सैन्यासह तो करी तिथें वसति ॥ २२ ॥
स्नानें पवित्र होउनि सुधौतसें वस्त्रयुगल[6] नेसून ।
स्थापून मणिमयासनिं मणिमय जिनविम्व नम्र होऊन ॥ २३ ॥
रेवा-शुद्ध-जलानें स्नापी[7] तद्रूप शुद्ध चिन्तून ।
अतिशय सुगन्ध चन्दन-गन्धें चर्ची सुभक्त जिनचरण ॥ २४ ॥

---

१ इच्छिलेलें. २ भूमिगोचरी राजांना. ३ बहिणीचा नवरा. ४ खरदूषण-रावणाचा मेहुणा. ५ नर्मदा नदी. ६ एक नेसून व दुसरें पांघरून. ७ अभिषेक केला.

नाना सुगन्ध कमलें अर्पुनि जिनपति-पदद्वयीं चतुर ।
श्रीजिनगुणगणमाला गायी दशकण्ठ तो खगप्रवर ॥ २५ ॥
यापरि पूजा-तत्पर असतां आला नदी-महापुर ।
उभय तटावर पसरे पूजा वाहून जाय बहु दूर ॥ २६ ॥
पूजापहार होतां दशाननाच्या मनास ये कोप ।
सोडुनि जलप्रवाहा कोण वरें दुष्ट हें करी पाप ॥ २७ ॥
आहे शत्रु अकारण मिथ्यात्वी कोण नृसुर-खगभूप ।
युद्धा उद्यत व्हावें असणें प्रच्छन्न हें महापाप ॥ २८ ॥

( सहस्रांशु राजाला रावण बांधून आपल्या शिबिरांत नेतो. )

बोले खेचर कोणी वदतों मी वृत्त हें असे साचे ।
येथून निकट आहे पत्तन माहिष्मती सुनामाचें ॥ २९ ॥
राजे जयास सेविति नृपति सहस्रांशु जो महाशूर ।
सोडुनि जलप्रवाहा जिनपूजा विघ्न आचरी थोर ॥ ३० ॥
जल केलि करीत आहे अनेक राण्यासवें विलासी तो ।
हसतो गातो वदतो सुगन्धि-जल-सेचना मुदें करितो ॥ ३१ ॥
रक्षक उभय तटावरि सशस्त्र त्याचे सुसज्ज आहेत ।
अमरेन्द्राचे स्वर्गीं सभोवतीं जेवि राहती सतत ॥ ३२ ॥
रुद्ध प्रवाह जेव्हां प्रमुक्त केला विशाल तो धावे ।
पूजालोप तयानें झाला हें नाथ वृत्त परिसावें ॥ ३३ ॥
आहुति पडतां भडके अग्नि जसा कोप होय अनिवार ।
मरण्यास इच्छितो हा शत्रु तयाला करीन मी ठार ॥ ३४ ॥
जाउनि शीघ्र तयाला आणा माझ्या समोर बान्धून ।
यापरि दशाननाज्ञा होतां ते जाति वीर धावून ॥ ३५ ॥
आकाशांतुनि राक्षस भट हे तीरावरील वीराशीं ।
लढले विद्यामोहित पडले होऊन जेवि शवराशि ॥ ३६ ॥
निजसैनिकास पीडिति पाहून मनांत कुपित होऊन ।
वदला निजस्त्रियांना भूप सहस्रांशु यापरी वचन ॥ ३७ ॥

---

१ दोन पायावर. २ मनुष्य, देव, विद्याधर राजा. ३ छपून राहणें. ४ सहस्रांशु या नांवाचा. ५ आनन्दानें. ६ अडविलेला. ७ सोडला.

'धैर्य धरा मी येतो परतून पुनः निघे त्वरें भय न ।'
या परि बोलुनि गेला तयार झाला करावयास रण ॥ ३८ ॥
जोडून शर धनुष्या नभोग[1]-सैन्यीं अखण्डसे सोडी ।
पाहून तया स्वर्गी सुराङ्गनासङ्गमार्थ तो धाडी ॥ ३९ ॥
सगळ्या राक्षस-वीरा वीर सहस्रांशु शीघ्र तो पळवी ।
पेंढ्या जशा तृणांच्या प्रचण्ड वारा नभोऽङ्गणीं फिरवी ॥ ४० ॥
आल्या पळून राक्षस-वीरा रावण बघून कोपानें ।
शरवृष्टि[2] करीत गेला सहस्रकिरणावरि प्रतापानें ॥ ४१ ॥
वीर सहस्रांशूचें अपारसें बाहुवीर्य पाहून ।
आहे अजय्य[3] शस्त्रें नृपाल हा हें मनांत आणून ॥ ४२ ॥
केला मोहन अस्त्र प्रयोग त्यावरि तयास बान्धून ।
नेलें निज-शिबिरामधिं विक्रम त्याचा बहु प्रशंसून ॥ ४३ ॥

( शतबाहु-नामक चारणमुनींचा आगमन-हेतु )

दुसरे दिनीं सभेमधिं बसला रावण अतिप्रमोदानें ।
'शतबाहु' नाम चारण मुनीस पाहून भक्ति-नम्र-मनें ॥ ४४ ॥
उतरून आसनाहुनि पायांतिल रत्नपादुका काढी ।
वन्दन तत्पदयुग्मा करी करी प्रीति आपुली गाढी ॥ ४५ ॥
मानी मुनीश्वरांना गणधर आले सभीं जिनेशाचे ।
बसवून उंच आसनिं भूवर बैसे प्रसन्न मन ज्याचें ॥ ४६ ॥
आशीर्वाद मुनीशें दिला दशास्यास धर्म-लाभाचा ।
करयुग जोडुनि वदला हेतु कथा नाथ भो प्रवेशाचा ॥ ४७ ॥
मुनिवर वदले ऐके खगेन्द्र ! माहिष्मती-पुरीचा मी ।
निःशेष-शत्रु-विजयी होतों पूर्वी पराक्रमी स्वामी ॥ ४८ ॥
झालों भवाङ्गभोगापासुनि सुविरक्त-चित्त दशकण्ठा ! ।
मजला सन्तत लागे शुद्धात्म्याचीच दर्शनोत्कण्ठा ॥ ४९ ॥
पुत्रा सहस्रकिरणा समस्त मी राज्यभार सोपविला ।
मुक्तिपथाचा रथ जणु महाव्रतांचा समूह आचरिला ॥ ५० ॥

---

१ विद्याधर-सैन्यांत. २ बाणांचा वर्षाव. ३ जिंकण्यास अशक्य.

( रावणाचें मुनीश्वरांसमोर भाषण )

अत्यल्प वृत्त सांगुनि मुनीश्वरांनीं सुमौन आदरिलें ।
निज नम्र करुनि मस्तक दशमस्तक वचन तधवा बोले ॥ ५१ ॥
मजला उत्तम कळलें वीर सहस्रांशु-भूप सुत अपुला ।
शौर्य विलोकुनि त्याचें माझ्या आत्म्या प्रमोद बहु झाला ॥ ५२ ॥
दिग्विजयास निघालों क्रमून मी मार्ग या स्थळीं आलों ।
निजशिबिरा रेवातटिं विनिवेशुनि[1] मी मनांत बहु धालों ॥ ५३ ॥
या रम्य नर्मदातटिं रत्नासनिं मी जिनेन्द्र-बिम्बास ।
स्थापुनि[2] सुगन्धिपुष्पें पूजित असतां तदीय-चरणास ॥ ५४ ॥
होता करीत अपुला सहस्रकर सुत निजाङ्गनासहित ।
जलकेलि तत्प्रवाहें पूजासाहित्य जाहलें नष्ट ॥ ५५ ॥
आला मजला तेणें अत्यन्त क्रोध युद्ध मी केलें ।
मी बांधिलें तयाला अकार्य[3] माझ्या करें असें घडलें ॥ ५६ ॥
अपुल्या स्नानजलानें अज्ञानपणें अकार्य हें केलें ।
नाथा ! अपुल्या पुत्रें सावध असतां घडेल कां असलें ॥ ५७ ॥
यापरि दशकण्ठानें वघुनि सहस्रांशुला नमस्कार ।
केला तयें पित्र्याला[4] लज्जित झाला मनांत तो प्रचुर ॥ ५८ ॥

( सहस्रांशु राजा विरक्त होऊन दीक्षा घेतो )

रावण वदला त्याला भाऊ माझा चतुर्थ आहेस ।
या शतबाहु मुनीशा पितृसम मम चित्त मानि सविशेष ॥ ५९ ॥
जा निजराज्या रक्षी किंवा घे वा मदीय राज्यांश[5] ।
तूं घटकर्ण-बिभीषण भावासम मज सदैव आहेस ॥ ६० ॥
या परि बोलुनि केलें दशकण्ठें जेधवा तया मुक्त ।
वदला मजला नलगे राज्यरमा जी असङ्ख्य नृपभुक्त[6] ॥ ६१ ॥
जें संसारा नाशी व्रत तें जनकासमान घेईन ।
हा मार्ग मुनिवरांचा स्वीकारी मुक्त होय तो सुजन ॥ ६२ ॥
बोलून रावणाच्या करांत देऊन आपला तनय ।
पितृचरणीं व्रत घेउनि पाळी धारण करून सद्विनय ॥ ६३ ॥

---

१ रावण. २ स्थापून. ३ वाईट काम. ४ शतबाहु-मुनिवर्याला. ५ राज्याचा हिस्सा. ६ राजांनीं भोगलेली.

( सहस्रांशुराजाचा मित्र अनरण्य राजाही मुनि दीक्षा घेतो )

अनरण्य नृपति होता मित्र तयाचा तयास दूतमुखें ।
कळवी निजव्रताची वार्ता जी देतसे प्रशान्ति-सुखें ॥ ६४ ॥
'आपण दोघे घेऊ महाव्रतें भवविरक्त होऊन ।
समकालीं त्या झालें निज-प्रतिज्ञागतार्थ-संस्मरण ॥ ६५ ॥
सत्यप्रतिज्ञ ऐशा अनरण्यें दशरथास राज्य दिलें ।
ज्येष्ठ सुतासह पाळी महाव्रतां जीं न लिप्त पापमलें ॥ ६६ ॥
शतबाहु सहस्रांशु नि मुनिद्वया रावणें महाविनयें ।
नमुनि सहस्रांशु-सुता राज्य दिलें निःस्पृहत्व-पूर्ण-नयें[1] ॥ ६७ ॥
आत्महिताचें दायक ऐसें शुभ-कर्म येइ जैं उदया ।
किंवा रिपु बान्धव वा हेतु घडे शुभमतीस जनि[2] ध्याया ॥ ६८ ॥
जें अशुभकर्म आहे मोक्षाची मति न तें जना देतें ।
जाणून सज्जनांची अशुभापासुनि शुभांत मति वळते ॥ ६९ ॥
जो शुभकार्यी चित्ता लावाया हेतु तोचि बन्धु गणा ।
परि भोगीं जो लावी त्याला बुध शत्रु वदति विदित[3] जनां ॥ ७० ॥
चरित सहस्रांशूचें अनरण्याचें हि ऐकतो भावें[4] ।
तो मुनि संयम-शीला पाळुनि जिनदास मुक्ति झणिं पावे ॥ ७१ ॥

इत्यार्षे श्रीरविषेणाचार्य-प्रोक्ते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे पद्मपुराणे दशग्रीवप्रस्थाने सहस्ररश्मि-अनरण्यश्रामण्याभिधानं नाम दशमं पर्व ॥ १० ॥

---

१ निरिच्छपणाच्या पूर्ण-पद्धतीनें अर्थात् पूर्ण-निर्लोभ-वृत्तीनें. २ जन्म. ३ माहीत. ४ भक्तीनें.

# अकराव्या पर्वांतील कथांचा सारांश

रावणानें अभिमानी राजांचा अभिमान नाहींसा केला त्यामुळें ते शरण येऊन त्याची आज्ञा मानूं लागले. अनेक जिनमंदिरांचा त्यानें जीर्णोद्धार केला. तो जिनभक्त होता. दीन दरिद्रीजनांना तो पुष्कळ धन देत असे. सम्यग्दृष्टि श्रावकांचा तो आदर करी व जैन साधूंना आदरानें नमस्कार करीत असे.

जो पशुयज्ञ करीत असे व मोटा अभिमानी होता, अशा राजपुरीच्या मरुत्त नामक राजाला वश करावें म्हणून रावण पुष्कळ सैन्यासह जाण्यासाठीं उद्युक्त झाला व आपल्या परिवारासह पुष्पक विमानांत बसून तो निघणार इतक्यांत नारदाची स्वारी 'अन्याय, अन्याय' असें म्हणत आली व याप्रमाणें त्यानें अन्याय सांगावयास सुरुवात केली.

राजन्, राजपुरांत मरुत्त नांवाच्या राजानें निरपराधी पशूंचा यज्ञ चालू केला आहे. मी आकाशांतून खालीं उतरून त्याच्याकडे गेलों व या दीनपशूंचा यज्ञ करणें महान् पापाला कारण आहे असें सांगितलें. 'मी तुला पुण्यकारक यज्ञ कोणता हें सांगतों ऐक' म्हणून असें सांगितलें—

'आत्मा हा यज्ञाचा कर्ता. तप करणें अग्नि व सत्यज्ञान हेंच तूप, शुभाशुभ कर्में या समिधा, क्रोध, अभिमान, माया, लोभ, हास्य, शोकादिक हे पशु व ते सत्यरूपी खांबाला बांधावेत. जीवांचें रक्षणरूपी दक्षिणा, श्रद्धान, सम्यग्ज्ञान व सुचारित्र हेच होमाचे कठडे असें यज्ञाचें स्वरूप आहे. व शुक्लध्यानरूपी होम आहे. असा यज्ञ करणारास मोक्ष अनंत-सुखादि सद्गुणांचें स्थान मिळतें. पशुयज्ञ करणें हें पारध्याचें-नीचाचें कार्य आहे. हें कुलीनांचें नव्हे. हें भाषण ऐकल्याबरोबर ब्राह्मण हातांत काठ्या घेऊन मला मारावयाला आले, मला ठोकूं लागले. मी धावत तुझ्याकडे

आलों आहे. रावणा त्या दीन पशूंच्या रक्षणासाठीं लौकर चल.'

तत्काल रावण पुष्पक विमानांत बसून राजपुराकडे निघाला. रावणाला पाहून राजा मरुत्त भ्याला व त्यानें सर्व पशूंना मुक्त केलें. रावण म्हणाला 'राजा मरुत्ता अहिंसा हा धर्म आहे व त्यानेंच स्वर्ग मोक्षाची प्राप्ति होते. जर तूं पशुयज्ञ करशील तर तुला मी ठार मारीन.' मरुत्तानें पशुयज्ञाचा त्याग केला. रावणानें नारदाला 'पशुयज्ञोत्पत्ति' केव्हांपासून झाली हें सांगा असें म्हटलें. तेव्हां त्यानें याप्रमाणें सांगितलें—

'सुव्रत तीर्थंकराच्या वेळीं ययाति नांवाच्या राजाला वसु नांवाचा मुलगा होता. त्यानें क्षीरकदंब गुरुजवळ वसूला शिकण्यासाठीं ठेविलें होते. गुरुपुत्र पर्वत व नारद नामक ब्राह्मणपुत्र हे वसूचे सहाध्यायी होते. एके वेळीं गुरु आपल्या तीन शिष्यांसह वनांत गेले. तेथें पाठश्रमामुळें शिष्य झोंपी गेले. दोन चारणमुनि त्या वनांत होते. त्यापैकीं एका मुनीनें या तिघांपैकीं एक स्वर्गाला व दोघे नरकाला जातील असें म्हटलें. गुरूंनीं हे शब्द ऐकिले. यांतून नरकाला कोण व स्वर्गाला कोण जाईल हें जाणून घ्यावें म्हणून गुरूनें पिठाचे तीन कोंबडे बनवून ते तिघांच्या हातांत दिले व जेथें कोणी पाहणार नाहीं तेथें जाऊन ते मारा असें सांगितलें. पर्वत व वसु यांनीं जंगलांत जाऊन तेथें कोणी पाहत नाहींत असें बघून त्यांना मारलें. पण नारदानें विचार केला कीं, आपण तर स्वतः पाहत आहोत, आकाशांतून फिरणारे हे पक्षी बघतात व सर्वज्ञाच्या ज्ञानांतही हें आपलें कार्य झळकतें यास्तव ह्या कोंबड्याला जेथें कोणी जाणत नाहीं असा शून्य प्रदेश कोठेंही नाहीं. असें जाणून घरीं येऊन त्यानें सर्व अभिप्राय सांगितला व कोंबडा परत केला. गुरुपुत्र व वसु यांनीं आपण सांगितल्याप्रमाणें शून्य स्थानीं नेऊन कोंबडे मारले असें सांगितलें.

गुरूंनीं नारद स्वर्गगामी व पर्वत आणि वसु हे नरकगामी असें जाणलें व विरक्त होऊन जिनदीक्षा घेतली. तेव्हां पर्वत आपल्या पित्याचें अध्यापन कार्य स्वतः करूं लागला. ययाति राजानें वसूला राज्य दिलें व तो साधु होऊन वनांत गेला व नारदही आपल्या गांवीं जाऊन अध्यापनकार्य करूं लागला. आकाशस्फटिकाच्या कट्ट्यावर वसुराजाचें सिंहासन असल्यामुळें ते अधर आहे असें लोकांना दिसे. वसुराजाच्या सत्यवादितेमुळें सिंहासन अधर आहे अशी त्याची प्रसिद्धि झाली.

एके वेळीं नारद आपल्या गुरुपुत्राला-पर्वताला भेटण्यासाठीं आला त्यावेळीं

पर्वतानें ऋग्वेदांतील ‘अजैर्यष्टव्यम्’ या वाक्याचा ‘मेंढ्यांनीं यज्ञ करावा’ असा अर्थ सांगितला. तो ऐकून गुरुजींनीं ‘तीन वर्षांच्या जुन्या धान्यांनीं होमांत आहुति द्याव्यात’ असा अर्थ केला होता. ‘तूं भ्रान्तीनें विपरीत सांगत आहेस’ असें नारदानें म्हटलें. ‘परंतु तूंच गुरुमान्य अर्थाचें उलट सांगत आहेस; मी गुरुंनीं जो सांगितला तोच सांगत आहे व मी आपला पक्ष वसु राजाला सभाध्यक्ष करून त्याच्यापुढें सिद्ध न करूं शकलों तर जीभ तोडून देईन’ असें पर्वत म्हणाला. पर्वताच्या मातेनेंही म्हटलें ‘बाळा, जरी मी गृहकृत्यांत गुंतलें होते तरीही तुझ्या वडिलांनीं नारद म्हणतो तोच अर्थ सांगितला होता असें मी ऐकलें आहे. यास्तव विपरीत अर्थ सिद्ध करूं शकणार नाहींस, ही प्रतिज्ञा सोड.’ पर्वत म्हणाला ‘माते, जो बाण फेकला तो परत येत नसतो. मी माझी प्रतिज्ञा परत घेणार नाहीं.’

पर्वत माता घाबरली व आपल्या पुत्राला जिह्वाच्छेदानें अपाय होऊ नये म्हणून ती वसुराजाकडे गेली. त्यानें तिचा आदर केला व येण्याचें कारण विचारलें. तिनें मला पुत्रभिक्षा दे असें म्हटलें. ‘तुझ्या पुत्राला अपाय करणाऱ्याला मी स्वर्गास पाठवीन. मी गुरुपुत्राला गुरुतुल्य समजून त्याचें रक्षण करीन. माते तूं बिल्कुल काळजी करूं नकोस.’ असें म्हटल्यानंतर तिनें ‘अजैर्यष्टव्यम्’ या वाक्यांचा अर्थ मेंढ्यांनीं यज्ञ करावा अशी पर्वताची प्रतिज्ञा आहे व नारदानें वरील वाक्याचा अर्थ तीन वर्षांच्या साळींची आहुति द्यावी असा केला आहे व या उभयतांचा वाद तुझ्या अध्यक्षत्वाखालीं होईल, त्यावेळीं पर्वताच्या बाजूनें निर्णय दिला पाहिजे’ असें गुरुपत्नीनें म्हटल्यावर ‘माते मी असत्य कसें बोलूं? तें माझ्यानें बोललें जाणार नाहीं.’ असें वसूनें म्हटलें. गुरुपत्नी रागावली तिनें अतिशय आग्रह केला व वसूनें तिचें म्हणणें कबूल केलें. दोघांचा वाद झाल्यावर वसूनें जेव्हां पर्वताच्या बाजूनें निकाल दिला तेव्हां देवतांनीं स्फटिकाची वेदी फोडून टाकिली. सिंहासन जमिनींत घुसलें. सर्व वृद्ध विद्वानांनीं ‘सत्य बोलून योग्य निर्णय दे’ म्हणून त्याला विनविलें पण त्यानें आग्रह सोडला नाहीं व तो मरून नरकाला गेला.

सर्व नागरिकांनीं पर्वताला हाकालून दिलें पण त्याला कालासुरानें पशुयज्ञ-कार्यीं पुष्कळ साहाय्य केलें. होमामध्यें टाकलेले पशु स्वर्गास विमानानें जात आहेत असें कालासुर दाखवित असे. त्यामुळें लोकांत पशुयज्ञाचा प्रसार झाला.

कालासुराचे सगर राजाबरोबर कांहीं कारणामुळें वैर असल्यानें त्यानें अशा रीतीची माया दाखवून त्याला पशुयज्ञाला प्रवृत्त केलें व त्यानें स्वर्गाची प्राप्ति

व्हावी म्हणून आपल्या पत्नीला सुलसेला होमकुंडांत टाकलें. कालासुरानें तीही विमानानें स्वर्गास जात आहे असें दाखविलें. स्वतःलाही स्वर्ग प्राप्ति व्हावी असा स्वाभिप्राय त्यानें कळविल्यावर त्या कालासुरानें त्याला होमकुण्डांत फेकून दिलें व म्हटलें कीं, 'सुलसेला वरण्यास अयोग्य आहे असें तूं मला ठरवून तिला तूं वरलेंस त्याचें तूं फळ भोग' असें म्हणून तो कालासुर अदृश्य झाला. सगर पशुयज्ञांनीं महान् पाप संचित करून नरकाला गेला.

पर्वताला अनुसरून ब्राह्मणांनीं या हिंसायज्ञाचा सर्वत्र प्रसार केला आहे असें नारदऋषीचें भाषण ऐकून रावणाला फार कोप आला व ब्राह्मणांना आपल्या योद्ध्याकडून ताडन करण्यास सुरवात केली. परंतु नारदाला दया आली. त्यानें सांगितलें कीं 'सुभूम चक्रवर्तीनें एकवीस वेळां ब्राह्मणांचा नाश करून सर्व पृथ्वी निर्ब्राह्मण करण्याचा प्रयत्न केला पण त्यांचा नाश झाला नाहीं. यास्तव तूं या कार्यापासून निवृत्त हो' तेव्हां त्यानें त्याचें म्हणणें मान्य केलें व ब्राह्मणनाशाचें कार्य सोडून दिलें. मरुत्त राजानें आपल्या कनकप्रभा कन्येचा रावणाशीं विवाह केला. रावणाला तिच्यापासून 'कृतचित्रा' नामक सुन्दर कन्या झाली.

हा नारदर्षि कोण असा प्रश्न श्रेणिकानें विचारला तेव्हां गौतम गणधरांनीं त्याची उत्पत्ति-कथा सांगितली. ती अशी—

ब्रह्मरुचि नामक ब्राह्मण आपल्या कूर्मी नामक पत्नीसह वनांत राहत असे. त्याची पत्नी गर्भवती होती. एकेवेळीं जैन मुनि वनांत आले त्यावेळीं तो स्वपत्नीसह त्यांच्या दर्शनास आला. मुनि म्हणाले 'घर त्यागून वनांत राहिलास तरीही तूं कामाधीन झालास हें योग्य नाहीं.' तें भाषण ऐकून त्यानें त्यांच्याजवळ दीक्षा घेतली. तिचा त्यानें त्याग केला व तो त्यांच्याबरोबर विहार करूं लागला. कूर्मीनेंही पंचाणुव्रतें धारण केलीं. नऊ महिन्यांनीं तिला सुन्दर मुलगा झाला. एके दिवशीं त्या बालकाला झाडाखालीं निजवून फळें आणण्यासाठीं ती वनांत गेली. इकडे त्या शान्त बालकाला जृम्भक देवांनीं आपल्या घरीं नेलें व फलरसांनीं त्याचें पोषण केलें.

परत झाडाखालीं आल्यावर मुलगा दिसला नाहीं. ती शोक करूं लागली. पुनः निर्मोह होऊन तिनें विचार केला बालकाचें शुभकर्म त्याचें रक्षण करील. नंतर आर्यिकासंघांत जाऊन तिनें आर्यिकेची दीक्षा घेतली. नारदाला देवांनीं अनेक शास्त्रें शिकविलीं. त्याला आकाशगामिनी विद्या दिली. देवांनीं रक्षण केल्यामुळें

त्याला 'देवर्षि' नांव प्राप्त झालें. राजे त्याचा आदर करीत असत म्हणून तो राजर्षि म्हटला गेला. त्यानें पांच अणुव्रतें धारण केलीं. मस्तकावर शेंडी, गळ्यांत जानवें व हातांत कमंडलु असा त्याचा वेष होता. त्याच्या अंगांत कलहप्रियता होती. पायांत खडावा घालून तो विहरत असे. तो गायन-नर्तन-तत्पर होता. जिनभक्तींत तत्पर असे. पूर्ण ब्रह्मचारी होता. तो न गृहस्थ व न मुनि अशा अवस्थेचा होता. याप्रमाणें नारदाचें स्वरूप गौतमानें श्रेणिकास सांगितलें.

# पर्व ११ वें

[ रावणाच्या स्वभावांचें वर्णन ]

अभिमानी भूपांचा केला अभिमान रावणें दूर ।
येऊन शरण त्याला त्याच्या करिती पदां नमस्कार ॥ १ ॥
झालीं जीं जिनपतिचीं जीर्ण गृहें सुदृढ करवि दशकण्ठ ।
जिनपूजा कार्यामधिं राहे तन्मन सदैव सोत्कण्ठ ॥ २ ॥
जे जिनधर्म-द्वेषी ऐशा खलनरगणास हा द्वेषी ।
दीन दरिद्र जनांना देउनि धन विपुलसें सदा पोषी ॥ ३ ॥
सम्यग्दृष्टि-जनांचा आदर रावण करी सदा विनयी ।
जिनरूपधरा पाहुनि करि वन्दन धरुनि आदरा हृदयीं ॥ ४ ॥

[ नारद ऋषीचें रावणाकडे आगमन होतें व तो मरुत्त राजाबरोबर यज्ञाविषयीं चर्चा करितो ]

राजा राजपुरीचा अभिमानी नम्रता नसे ज्यांत ।
नाम मरुत्त जयाचें पशुवध-यज्ञांत सतत अनुरक्त ॥ ५ ॥
त्याला स्ववश करावें विचार ऐसा मनांत ठेवून ।
जाण्या उद्यत झाला रावण सेना समस्त घेऊन ॥ ६ ॥
पुष्पक-यानामध्यें परिवारासह बसून तो जाई ।
अन्याय असें बोलुनि नारदमुनि रावणाकडे येई ॥ ७ ॥
राजन् राजपुरामधिं मिथ्यात्वी नृप मरुत्त नांवाचा ।
पशुयज्ञ तयें केला कारण जो घोर परम हिंसेचा ॥ ८ ॥
बहु यज्ञमंडपामधिं पशु द्विजें[1] बान्धिले महादीन ।
अपराधरहित ज्यांना वधतां उपजे दया मनीं तूर्ण[2] ॥ ९ ॥
आकाशांतुनि खालीं उतरुनि वदलों मरुत्त भूपास ।
कां पशुगण हा वधितां कण्ठीं घालुनि कठोरसा पाश ॥ १० ॥
मी यज्ञ करित आहे जो मजला ब्राह्मणें असे कथिला ।
बहु पुण्यसंचयास्तव विधेय[3] माझ्या मनास तो गमला ॥ ११ ॥
यज्ञाच्या वेदीवर वधिले पशु देव तुष्ट होतात ।
हाचि महाधर्म असे स्वर्गप्राप्तीस होय हाचि हित ॥ १२ ॥

---

१ ब्राह्मणांनीं. २ शीघ्र. ३ करण्यायोग्य.

मी आज या पशूंनीं करीन हा यज्ञ जेधवां वदला ।
भूपति मरुत्त तेव्हां करुणाघन[1] मन्मनोनभीं[2] आला ॥ १३ ॥
वदलों मरुत्त नृपते ! यज्ञाचें मी स्वरूप सांगेन ।
त्यापरि तूं आचरितां होईल तुझें अवश्य कल्याण ॥ १४ ॥
आत्मा कर्ता आहे यज्ञाचा तपचि अग्नि तूं जाण ।
ज्ञानचि तूप नि कर्मैं[3] समिधा ऐसें वदे जनास जिन ॥ १५ ॥
क्रोधाभिमान माया लोभ नि हास्यादि हेच पशु असती ।
सत्य स्तम्भ नि रक्षण जीवांचें दक्षिणा वदे सुमति ॥ १६ ॥
श्रद्धा सम्यग्ज्ञान नि सुचरित या तीन वेदिका असती ।
यापरि यज्ञाचें हें स्वरूप वेदज्ञ विबुध जन गाती ॥ १७ ॥
शुक्लध्यानें केला असतां हा यज्ञ मुक्त जीवास ।
देतो अनन्त सौख्यादिक सुगुणें युक्त मुक्तिपुरिं वास ॥ १८ ॥
बकरे मेंढे आदिक मारुनि जे यज्ञ लोक करितात ।
राक्षस मम ते वदणें होतिल ते निरयिं दुःखसन्तप्त ॥ १९ ॥
उत्तमवंशीं झाला जन्म तुझा हे मरुत्त राजेन्द्र ।
ज्ञानी वैभवशाली असशी तूं आज भूवरी इन्द्र ॥ २० ॥
यज्ञीं पशुवध करणें व्याधोचित[4] पापकार्य हें आहे ।
हो तूं निवृत्त याहुनि दुःखद हें नरकसदन-सम पाहे ॥ २१ ॥
प्राणिवधानें देखिल जीवाला स्वर्गलाभ होईल ।
अत्यल्प दिनांनीं ही जन तद्रुचिवन्त सकल होतील ॥ २२ ॥
हें मम भाषण ऐकुनि माझ्यावरि विप्र कोपले सगळे ।
हातीं काठ्या घेउनि उद्यत मारावयास ते झाले ॥ २३ ॥
मजला ठोकित असतां राजन् ! धावत तुझ्याकडे आलों ।
रक्षण माझें करि वा पाहुनि तुजला प्रसन्न मी झालों ॥ २४ ॥
रक्षायाला त्याला रावण उतरे तदा नभांतून ।
बसवुनि उच्चासनिं त्या मरुत्त नृप येइ त्याजला शरण ॥ २५ ॥
तेव्हां मरुत्त-भूपें मनिं ज्याच्या भीतिनें दिलें स्थान ।
सोडून सर्व पशुगण दिला तदाज्ञा प्रवन्द्य मानून ॥ २६ ॥

---

१ दयामेघ. २ माझ्या मनरूपी आकाशांत. ३ ज्ञानावरणादिक आठ कर्में. ४ पारध्यांना योग्य.

[ रावणाचा मरुत्त राजाला उपदेश ]

रागावुनि भूपाला वदला रावण न उचित पशुवध हा ।
जाशिल नरका येणें सोडुनि दे तूं अशा नृपा ! मोहा ॥ २७ ॥
धर्म अहिंसा कथिली त्रैलोक्याच्या हितार्थ जिनदेवें ।
तो पशुहिंसेपासुनि कदापि होय न असेचि गण भावें ॥ २८ ॥
लोकद्वय-शत्रु असा यज्ञ नृपाला कदापि तूं न करी ।
करिशील ठार मारिन नरकीं हा घोर वेदना वितरी ॥ २९ ॥
यज्ञत्याग मरुत्तें केला रावण निदेशं मानून ।
यज्ञोत्पत्ति-कथेचें दशानना नारदर्षि करि कथन ॥ ३० ॥

[ यज्ञोत्पत्ति कथा ]

शुक्तिमती नांवाची नगरी जी दशदिशांत विख्यात ।
शुक्तिमती नांवाच्या सरितेची जणु असे सखी विदित ॥ ३१ ॥
सुव्रत तीर्थकराच्या समयीं भूपतिगणांत जो मान्य ।
झाला ययाति राजा साकेतीं विक्रमीं असामान्य ॥ ३२ ॥
त्याला 'वसु' नांवाचा झाला विनयादि सद्‌गुणी तनय ।
विद्वान् नि सत्यवचनी ज्यानें जगतांत आणिला सुनय ॥ ३३ ॥
क्षीरकदम्बक गुरुच्या संनिध पर्वत सुपुत्र जो त्यांचा ।
वसु नृपपुत्र नि नारद होते ते शिकत तीन शुभवाचा ॥ ३४ ॥
कोणे एकेवेळीं निजले पाठश्रमामुळें सगळे ।
चारणमुनि-युग वदले ज्ञान जयांचें कदापि नच ढुवळें ॥ ३५ ॥
स्वर्गीं यांतुनि जाइल एक नि दोघे सुघोर नरकांत ।
क्षीरकदम्बक गुरु हे ऐकुनि वच होति चिन्तनाक्रान्त ॥ ३६ ॥
मी अध्यापक असतां यांतुनि जातील कोणते दोन ।
नरकास शिष्य तुमचे आणि स्वर्गास एक कळतें न ॥ ३७ ॥
जाणुनि घ्यावें वास्तव तिघास बोलाविलें उपाध्यायें ।
बनवून पुष्ट कक्कुट तीन तिघांच्या दिले करांत तयें ॥ ३८ ॥
म्हटलें त्यांना कोणी नाहीं बघणार त्या स्थलीं न्यावें ।
मारुनि त्या शिष्यांनो ! परतुनि माझ्या घरीं तुम्ही यावें ॥ ३९ ॥

१ परमार्थानें. २ देतो. ३ आज्ञा. ४ काळजीनें कष्टी.

जेथें कोणी नाहीं ऐशा शून्य स्थलास जाऊन ।
टाकीं वसुपर्वत-युग सुपिष्ट-कुक्कुट-युगास मारून ॥ ४० ॥
गेला विजनीं नारद गुर्वाज्ञेला प्रमाण मानून ।
पाहुनि दहा दिशांना चिन्ता लागे करूं तदीय-मन ॥ ४१ ॥
गुरु-चरणांनीं कथिलें वत्सा ! नेऊन कोंबडा तेथें ।
तूं ठार मार पाहूं शके न कोणीहि नारदा जेथें ॥ ४२ ॥
ज्ञानें गुरु मम बघती बघतों मी पाहतात पक्षी हे ।
दश लोकपाल बघती बघती सर्वज्ञ कोण नच पाहे ? ॥ ४३ ॥
कोणीही नच पाहे ज्या स्थान असें नसेचि कोठेंही ।
वध्य न कुक्कुट ऐसें गुरुचें तात्पर्य वचन मन गाही ॥ ४४ ॥
मम गुरु दयार्द्र हृदयीं हिंसेपासून दूर नित राहे ।
मति शिष्यांची बघण्या रचिला केवल उपाय हा पाहे ॥ ४५ ॥
या परि विचार हृदयीं करून तो परत कोंबडा नेला ।
तद्वध न करायाचा स्वमनोगत हेतु तैं तयें कथिला ॥ ४६ ॥
हा शिष्य चि सुरलोका जाइल गुरुचित्त निश्चयी झालें ।
भेटुनि तयास वदले वत्सा ! केलेस आज कार्य भलें ॥ ४७ ॥
आले वसु पर्वत ही वदले ते गुरुसमीप जाऊन ।
पिष्ट-विनिर्मित कुक्कुट वधिले शून्य स्थलांत नेऊन ॥ ४८ ॥
गुरु कोपानें वदले तुम्हा कोणी तिथें न जरि दिसले ।
बघतात खेचरादि स्थल शून्य त्रिभुवनांतही न मिळे ॥ ४९ ॥
यास्तव कुक्कुट वधिले पाप्यांनो निर्विवेक होऊन ।
भावी अहितचि दिसतें तुमचें होईल केंवि कल्याण ॥ ५० ॥
क्षीरकदम्ब-गुरूच्या खेदानें मनिं विचार उद्भवला ।
या वसुपर्वतयुगला मी श्रम अध्यापनीं वृथा केला ॥ ५१ ॥
पात्रा-समान परिणति होते अध्यापकोपदेशाची ।
ये स्थानाच्या भेदें मेघजला लवण-मुक्तता साची ॥ ५२ ॥
प्रिय सुत पर्वत मजला प्रियतर त्याहून वसुनृपात्मज हा ।
उभयहि नरका जातिल गमतें त्यजणेंचि योग्य गृहमोहा ॥ ५३ ॥

---

१ जाणतें. २ आपल्या मनांतलें कारण विचार. ३ पक्षी वगैरे. ४ शिष्याला अनुसरून. ५ शिक्षकाच्या उपदेशाची. ६ मीठ व मोत्याचें स्वरूप.

गुरु निर्विण्णमनानें[1] स्वीकारुनि मुनिपदा वना गेला ।
तत्पदिं[2] पर्वत बसला स्वच्छन्दें शास्त्र-पाठनीं[3] रमला ॥ ५४ ॥
नारद गुरुप्रसादें समस्त शास्त्रांत निपुणमति झाला ।
शिष्याध्यापन-कार्यी स्वपुरा येऊन पूर्णसा रमला ॥ ५५ ॥
तेव्हां ययातिभूपें निज वसुपुत्रा समस्त राज्य दिलें ।
दीक्षा घेउनि मुनिपदिं त्यानें रममाण आपणा केलें ॥ ५६ ॥
वसु वसुधापति[4] झाला झाला जणु वासुदेव विभवानें ।
सत्यवचोरत[5] होता प्रसिद्ध हो सत्य-वादिता तेणें ॥ ५७ ॥
एके वेळीं कोणीं हरिणावरि बाण फेकिला व्याधें ।
अडखळुनि अन्तराळीं पडला तेणें न हरिण तो विंधे ॥ ५८ ॥
घ्यावा जाणुनि बाणस्खलनाचा हेतु या विचारानें ।
गेला दिसला त्याला आकाशस्फटिक पाणियुगलानें[6] ॥ ५९ ॥
होता चरत तयाच्या पलीकडे हरिण तो तयांत दिसे ।
प्रतिबिम्बित-रूपानें बाणें तो विद्ध म्हणुनि होत नसे ॥ ६० ॥
खस्फटिकोपल[7] केवल हा स्पर्शें जाणतां नरा येतो ।
अन्योपाय न यातें भूपति-सिंहासनार्ह[8] हा दिसतो ॥ ६१ ॥
एकान्तीं राजाला व्याधानें वृत्त[9] सर्व सांगितलें ।
व्याध नि राजा उभयहि खस्फटिकोपल बघावया गेले ॥ ६२ ॥
राजा प्रमुदित झाला त्यानें व्याधा दिलें प्रभूत धन ।
खस्फटिका आणवुनी त्याची नृप बनवि वेदिका छान ॥ ६३ ॥
ते शिल्पकार भूपें सगळे मारून टाकिले ठार ।
नृप आत्मीय[11] कुणाला मानिति नच वचन वदति जन चतुर ॥ ६४ ॥
चेदीश[12] वसुनृपाचें सिंहासन सुबक वेदिकेवरती ।
सत्य प्रभाव त्याचा कारण नभिं राहण्यास बुध वदती ॥ ६५ ॥
सत्योक्तीनें[13] राहति समीप सन्तुष्ट नित्य देवगण ।
भूप-प्रसिद्धि ऐशी तेव्हां झाली दहा दिशांतून ॥ ६६ ॥

---

१ वैराग्ययुक्त. २ त्याच्या-गुरुगादीवर. ३ शिकविण्यांत. ४ पृथ्वीपति राजा. ५ सत्य भाषणांत तत्पर. ६ दोन हातांनीं. ७ आकाश-स्फटिकाचा पाषाण. ८ राजसिंहासन बनविण्याला योग्य. ९ हकीकत माहिती. १० कट्टा. ११ आपला हितकर्ता. १२ चेदिदेशाचा स्वामी. १३ सत्यभाषणानें.

ऐशी प्रसिद्धि होतां राजे होऊन भीत वश झाले ।
सत्य असो या शिष्या प्रसिद्धि वर्चस्व दाखवी अपुलें ॥ ६७ ॥
एके वेळीं नारद गेला निजगुरु-सुतासमीप बुध ।
तो ऋग्वेद व्याख्या सांगे शिष्यास ये जिला बाध ॥ ६८ ॥
वाक्य 'अजैर्यष्टव्यम्' बोलुनि सांगे मृषार्थ तो त्याचा ।
मेषें यज्ञ करावा वदे नि बुधमान्य अर्थ हा साचा ॥ ६९ ॥
तेव्हां नारद वदला भ्रान्तीनें सांगतोस भलतेंच ।
त्रैवार्षिक धान्यांनीं यज्ञ करावा शुभार्थ हा साच ॥ ७० ॥
उत्पन्न हो न अङ्कुर धान्य असें जून तीन वर्षांचें ।
व्याख्यान असें गुरुचें कां विस्मरलास जें असे साचें ॥ ७१ ॥
पर्वत तेव्हां बोले कथिला तातें न अर्थ जो वदसी ।
मेष चि अर्थ तयाचा कथिला विद्वद्गणें खरा कोषीं ॥ ७२ ॥
नारद नन्तर वदला शब्दाच्या अर्थ कल्पना दोन ।
पहिली मुख्या नि दुजी गौणी गुरु कथिति ती दुजी जाण ॥ ७३ ॥
जो व्युत्पत्त्यर्थ असे त्याला गौणार्थ सुज्ञ वदतात ।
गौणार्थचि यजनांत ज्ञाते उपयुक्त सांगती सन्त ॥ ७४ ॥
गुरुकथितार्थोल्लङ्घन जिनागमाज्ञावमानना करणें ।
ऐशा दुरभिप्रायें होइल कुगतींत कष्टदायि जिणें ॥ ७५ ॥
पर्वत हट्टी वदला गुरुवर्यानें अजार्थ मेष असा ।
कथिला तत्कथितार्थी विरोध माझा करी नच स्पर्शा ॥ ७६ ॥
कथितोस नारदा हे गुरुकथितार्था विरुद्ध अर्थास ।
उपदेशाचें लङ्घन कारण होईल तुज अनर्थास ॥ ७७ ॥
साधावया स्वपक्षा नच मी होइन जरी स्वजिह्वेस ।
टाकुनि देइन तोडुनि ऐशा मम जाण वा प्रतिज्ञेस ॥ ७८ ॥
या वादामधि अपुल्या प्रमाण वसु नृप असे सहाध्यायी ।
हें वचन पर्वताचें केलें तत्काल मान्य त्या समयीं ॥ ७९ ॥

---

१ सामर्थ्य. २ खोटा अर्थ. ३ तीन वर्षांचें जुनें धान्य जें पेरलें असतां उगवत नाहीं ४ विद्वानांच्या समूहानें. ५ गुरुनें सांगितलेल्या अर्थाचें उल्लंघन करणें. ६ जिनेश्वराच्या शास्त्राच्या आज्ञेचा अपमान करणें. ७ वाईट अहितकर विचारानें. ८ मेंढा.

माता हि निजसुताला वदली गृहकार्य लीन असतांही ।
त्रैवार्षिक धान्या अज म्हणतां तव जनक ऐकिलें पाही ॥ ८० ॥
परि तूं ज्या अर्थास्तव पण[1] जिह्वाच्छेद[2] बोललास सुता ।
तो मज अयोग्य वाटे प्रसवेलचि जाण तो अनर्थशता ॥ ८१ ॥
पर्वत मातेस वदे केली आहे अशी प्रतिज्ञा मी ।
जो बाण फेकला तो परत न येई वदे बुधस्वामी[3] ॥ ८२ ॥
होईल पर्वताला अपाय पीडा तिच्या मना जाची ।
वसुसंनिध ती आली प्रीति सुताची जिच्या मनीं साची ॥ ८३ ॥
माते तव दर्शन मज झालें आनन्द वाटला हृदयीं ।
क्षीरकदम्ब गुरूची दिसली जणु मूर्ति आज मज उदयीं[4] ॥ ८४ ॥
करु कोणतें तुझें मी माते वद कार्य काय देउ तुला ।
राजन् आत्मज-भिक्षा[5] कृपालु होऊन शीघ्र देइ मला ॥ ८५ ॥
धनधान्य-भूषणांचा पुत्रावांचुनि मला न उपयोग ।
पर्वतरक्षण-कार्यीं मातें ? देईन मी सदा योग[6] ॥ ८६ ॥
मानीन पूज्य माते गुरुपुत्रा गुरुसमान समजून ।
जो घातेच्छा[7] ठेवी स्वर्गी त्याला अवश्य पाठविन ॥ ८७ ॥
त्याला मारायाला झाला उद्युक्त कोण वद माते ? ।
क्रुद्ध यमाचें आलें त्याला जणु मृत्युपत्र मज गमतें ॥ ८८ ॥
श्रुतशब्दव्याख्यान[8] नि सुतप्रतिज्ञा नि तूं सभाध्यक्ष ।
या परि सगळ्या गोष्टी कथिल्या वसुभूपतीस अपरोक्षें[9] ॥ ८९ ॥
भावाचें तूं रक्षण करण्यासाठीं अजास मेप वद ।
सज्जन वाणीनें ही रक्षिति जीवास यांत नच वाद ॥ ९० ॥
वसु-नृप वदला माते मी मिथ्यावचन सांग बोलु कसें ।
स्वप्राणनाशसमयिंहि मिथ्यावच सन्तवदनिं येत नसे ॥ ९१ ॥
जे पापभीरु असती असत्य नच कोणतेंहि ते वदती ।
गुरुवचन प्रतिकूल नि खोटी साक्ष न कदापि ते देती ॥ ९२ ॥

---

१ प्रतिज्ञा. २ जीभ तोडून टाकणें. ३ महाविद्वान. ४ शुभोदयानें. ५ पुत्रभिक्षा. ६ लक्ष्य. ७ मारण्याची इच्छा. ८ आगमांतील अज शब्दाचें स्पष्टीकरण. ९ प्रत्यक्ष.

जेव्हां आग्रह रोषें गातेनें वसु-नृपेश्वरा केला ।
तेव्हां असत्य भाषा बोलेन म्हणून-नृपति तिज वदला ॥ ९३ ॥
क्षीरकदम्ब गुरूची गेली गृहिणी गृहास मोदानें ।
वसुनृपपरिषदिं[१] गेले नारद पर्वत दशास्य[२] ! हर्षानें ॥ ९४ ॥
माध्यस्थ्य-वृत्ति ज्यांची गुणशाली सभ्य त्या स्थलीं आले ।
क्षीरजलासम सदसद्वादीं हंसासमान ते झाले ॥ ९५ ॥
आकाशस्फटिकाच्या वेदीवरि, भूप आसनीं वसला ।
तेव्हां नभस्तलामधि चन्द्रासम सज्जनास तो दिसला ॥ ९६ ॥
गुरुसुत पर्वत नारद यांनीं पक्षद्वयास माण्डियलें ।
वसु राजन् ! वद सत्यचि वृद्ध ब्राह्मण तयास म्हणि वदले ॥ ९७ ॥
आकाश नि भूमीला सूर्य जसा उभयतास साक्षी तूं ।
तुजला प्रमाण मानिति दे निर्णय योग्य ज्यांत नच किंतु ॥ ९८ ॥
सत्यामुळेंच पृथ्वीवरि वारिद नीरवृष्टि करितात ।
जे सत्य नित्य वदती प्रसन्न सुर सर्व त्यास होतात ॥ ९९ ॥
सत्यामध्यें हे वसुभूपा हा लोक ठेविला जातो ।
तुज कडुनि, सत्य भाषण संतत तव वदनकमलिं देव रतो ॥ १०० ॥
परि या वृद्ध बुधांच्या वचनिं अनादर करून वसु भूप ।
सत्य-प्रसिद्धि अपुली त्यागुनि वदला असत्य जें पाप ॥ १०१ ॥
क्षीरकदम्ब गुरूंनीं शिष्यां अज मेष अर्थ सांगितला ।
मेषें यज्ञ करावा स्वर्ग-प्राप्तीस हेतु तोचि भला ॥ १०२ ॥
तेव्हां वसुराजाच्या मुखनिर्गत या असत्य वचनानें ।
स्फाटिकवेदी[३] फोडुनि टाकियली सर्व कुपित देवगणें ॥ १०३ ॥
वसु वसुधापति पडला भूतलिं जणु जावयास नरकास ।
होउनि असत्यवचनें क्रुद्ध सुरें पाडिलें गमे त्यास ॥ १०४ ॥
नरनाथ घोर नरकीं पडला हिंसक असत्य वचनानें ।
भोगीत दुःख तेथें दुःसह राहे न गम्य जें वचनें ॥ १०५ ॥
वसुचे पृथुवस्वादिक बसले राज्यासनावरी आठ ।
सुत विक्रमी क्रमानें केले परि देवतागणें नष्ट ॥ १०६ ॥

---

१ वसु राज्याच्या सभेंत. २ हे रावणा. ३ आकाशस्फटिकांनीं बनविलेला कट्टा.

नववा पुत्र वसूचा गेला तो पळुनि सुवसु नांवाचा ।
नागपुरामधिं हर्षे राज्य करी प्रिय बनून जनतेचा ॥ १०७ ॥
पुत्र दहावा ज्याचें नाम बृहद्ध्वज पळून तो गेला ।
मथुरानगरीचा पति होउनि भोगी सुरेख सुखलीला ॥ १०८ ॥
काढून धिण्ड पर्वत नगरजनांनीं दिला हकालून ।
कालासुर त्या भेटुनि वदला दे पूर्वदुःख सोडून ॥ १०९ ॥

[ नारदर्षि रावणाला कालासुराची कथा सांगतात ]

दशकण्ठ नारदाला कालासुर कोण हो वदा मजला ।
बोले नारद यापरि वृत्त तयाचें समस्तसें त्याला ॥ ११० ॥
चारणयुगला-नगरीं नृपति अयोधन तयास धृति राणी ।
झाली उभया सुलसा कन्या लक्ष्मीसमान रूपखनी ॥ १११ ॥
बोलाविले तियेच्या स्वयंवरीं नृप अनेक ते आले ।
सगर तयामधिं राजा विभवें जेणें जनास दीपविलें ॥ ११२ ॥
सगर सुयोधनसदनीं दासी मन्दोदरी सदा प्रेषी ।
सगरानुरक्त केलें सुलसा-मानस तिनें तदेकवशी[1] ॥ ११३ ॥
परि राणी सुलसेला वदली मधुपिंग हा असे भाचा ।
त्यालाच तूं वरावें संशय हरि मन्मनांतला साचा ॥ ११४ ॥
हें राणीचें भाषण ऐकुनि मन्दोदरी मनीं वदली ।
अपुल्या विशाल यत्ना केलेल्या आज विफलता आली ॥ ११५ ॥
सगरास वृत्त कथिलें प्रयत्नवैफल्य[2] शीघ्र जाणून ।
अपुल्या पुरोहिताला सांगितलें कार्य देइ साधून ॥ ११६ ॥
तो विश्वभूति होता कवि त्यानें 'नृपति-लक्षण' ग्रन्थ ।
रचिला अयोधनाच्या सभेंत तो वाचिला तयें संथें[3] ॥ ११७ ॥
लक्षणहीन असे जो सभेंत त्यानें प्रवेश न करावा ।
हट्टें प्रवेश करितां पकडुनि तो शीघ्र मारिला जावा ॥ ११८ ॥
लक्षणहीन असे मी सभाप्रवेशार्ह देह मम नाहीं ।
जाणुनि लज्जित होउनि परतुनि गेला स्वकीय तो गेहीं ॥ ११९ ॥
सुलसेनें सगराला वरिलें झाला विवाह सानन्द ।
भोगी सौख्य तिच्यासह मानी तिज तो सदैव सुखकन्द ॥ १२० ॥

१ सगराच्या वश केलें. २ प्रयत्नाची व्यर्थता. ३ शान्तपणें.

होउनि विरक्त झाला मधुपिंगल साधु बालतप केलें ।
मरुनि महाकालाभिध असुरपद प्राप्त तेधवा झालें ॥ १२१ ॥
अवधिज्ञानें जाणुनि सगराचें कपट शीघ्र कोपून ।
त्याला मारायाला तेथें तत्काल येइ धावून ॥ १२२ ॥
परि मनिं विचार केला पापें याच्याकडून करवून ।
मारीन त्यास तेणें भोगिल नरकांत दुःख बहु गहन ॥ १२३ ॥
सगरनृपासम अन्या नरपाला योग्य सन्धि पाहून ।
मारीन असुर ऐशी करीत चिन्ता तिथून करि गमन ॥ १२४ ॥
होऊनि विप्रवेषी[1] शुक्तिमतीच्या तटाकडे आला ।
पाहून पर्वताला प्रेमळ वचनें तयास तो वदला ॥ १२५ ॥
शाण्डिल्य नांव माझें मी जनकाचा तुझ्या असे मित्र ।
मीमोपाध्यायाचे आम्ही दोघे प्रसिद्धसे छात्र[2] ॥ १२६ ॥
नारद नि पुरजनांनीं केला अपमान घोर जाणून ।
तुजला सहाय करण्या आलों दे चित्तखेद सोडून ॥ १२७ ॥
मंत्रें मोहित लोकां करुनि तुझा करिन पक्ष मी प्रबल ।
तूं पशुयज्ञामध्यें प्रगट करी वत्स पूर्ण बुद्धि-बल ॥ १२८ ॥
बोलुनि यापरि पर्वत-सहित असा असुर सकलमनुजगणा ।
कुगतींत पाडण्याला कुधर्म सांगे तया न ये करुणा ॥ १२९ ॥
नाना-रोग नि भूतावेशादि[3] ग्रामनगर-देशांत ।
उत्पन्न तयें केले तेणें जन होय सकल संत्रस्त[4] ॥ १३० ॥
पर्वतमत अनुसरले त्यांचे रोगादि दूर सारून ।
निर्दोष तयें केलें प्रभाव सर्वत्र पाडिला तूर्ण ॥ १३१ ॥
या परि लोकावरती करून उपकृति[5] पुनः पुनः त्यानें ।
स्वमतीं स्थापन केलें शाण्डिल्याच्या सहायदानानें ॥ १३२ ॥
सगराच्या नगरामधिं अन्तःपुरिं तेवि सकलपरिवारीं ॥
नाना दारुणरोग-प्रसार[6] करुणाविहीन असुर करी ॥ १३३ ॥
लोकांचें वच ऐकुनि आला नृप सगर पर्वतापाशी ।
शाण्डिल्य-सहायानें करि पर्वत रोग हरुनि सुखराशि ॥ १३४ ॥

---

१ ब्राह्मण वेषी. २ शिष्य. ३ पिशाच अंगांत येणें. ४ त्रासलेले. ५ उपकार. ६ अनेक भयंकर रोगांचा प्रसार.

'सौत्रामणि' यज्ञामधिं मदिरा-प्राशन न मानिती दोष ।
गोसव नामक यज्ञीं अगम्यगमनास[1] येइ परिपोष ॥ १३५ ॥
जो 'मातृमेध' त्यामधिं जननीवध विहित मानिला आहे ।
पितृवध पितृयज्ञामधिं करणें निर्दोष कार्य हें पाहे ॥ १३६ ॥
वेदीमध्यें करणें कार्य असें नच सदोष मानावें ।
परि वेदि-बाह्य करितां कार्य कदापि न अदोष समजावें ॥ १३७ ॥
पाठीवरि कूर्माच्या[2] स्थापुनि अग्नीस त्यास तर्पावें ।
'हविषा जुहुक' ऐशा मन्त्रें एकाग्र चित्त ठेवावें ॥ १३८ ॥
न मिळे कासव जेव्हां टक्कल पडलें अशा सुविप्रास ।
पिंगट शरीर ज्याचें थकवा आला यदीय-देहास ॥ १३९ ॥
करुनि उभे उदकामधिं निर्मल तुण्डप्रमाण[3] जें आहे ।
कच्छप-तुल्य[4] तयाच्या डोकीवरि अनल[5] ठेविती पाहे ॥ १४० ॥
यापरि करून अग्नि-प्रज्वालन त्यांत विप्रवर्यानें[6] ।
आहुति द्यावी ऐसा सांगितला सुविधि धर्मशास्त्रानें ॥ १४१ ॥
जें झालें जें होइल जें आहे सर्व पुरुष तें आहे ।
तें ब्रह्म अमृत आहे याहुनि जगतांत अन्य न च पाहे ॥ १४२ ॥
जें अन्नानें वाढें शरीर तेंही असे परब्रह्म ।
वध्य[7] नि घातक[8] नाहीं नाहीं याच्यांत कोणतें जिह्म[9] ॥ १४३ ॥
यास्तव यज्ञ करावा मारावे जीव त्यांत निःशङ्क ।
खावें मांस तयाचें तथापि चिकटेल नैव अघपङ्क[10] ॥ १४४ ॥
देवोद्देशें[11] यज्ञीं करणें जो जीववध अपाप असे ।
मांस पवित्र तयाचें यजमानें भक्षणांत दोष नसे ॥ १४५ ॥
इत्याद्युपदेशानें सगराला निजमतांत आणून ।
पशुयज्ञ करविले बहु असुरें त्याच्याकडून अधरवाण ॥ १४६ ॥
यज्ञांत मारलेले जीव विमानीं बसून जातात ।
स्वर्गीं दाखवि ऐसें जन झाले सकल त्यामुळें भ्रान्त[12] ॥ १४७ ॥

---

१ माता, भगिनी, कन्या यांच्याशीं गमन करणें. २ कासवाच्या. ३ तोण्डा-पर्यन्त. ४ कासवासारखें. ५ अग्नि. ६ श्रेष्ठ ब्राह्मणानें. ७ ज्याला मारावयाचें तो. ८ मारणारा. ९ कपट. १० पापरूपी चिखल. ११ देवाच्या निमित्तानें. १२ मोहित.

तो जीवघात पाहुनि नारद झाला तदा दयार्द्रमन ।
खेचर दिवाकराचें साहाय्यें जीवरक्षणीं यत्न ॥ १४८ ॥
केला सर्व पशूंना यज्ञांतुनि करुनि आणिलें हरण ।
परि निर्दय असुरानें हें नारदकार्य जाणिलें जाण ॥ १४९ ॥
यज्ञ-चतुर्दिशिं त्यानें स्थापियल्या वृषभ-जिनवर-प्रतिमा
विद्याघात कराया ज्यांच्या भासे मुखीं सदा सुपमा ॥ १५० ॥
तेव्हां खेचर झाला खिन्न नि संपे उपाय हरणाचा ।
नारद दुःखी झाला कथन न त्याचें करूं शके वाचा ॥ १५१ ॥
तेथुनि निघून गेला इकडे असुरें स्वकीय-मायेनें ।
मोहित सगरा केलें घेरियलें त्यास मरणकालानें ॥ १५२ ॥
यज्ञानलिं सुलसेला टाकुनि करि ती प्रयाण सुरलोकीं ।
असुर असें तो दाखवि सगरा अभिलाप होय अमरसुखीं ॥ १५३ ॥
त्यासहि असुर मखानलिं टाकुनि कोपें असें तदा वदला ।
स्मर कपटानें ठरवुनि वर्ज्य मला सेविलेस सुलसेला ॥ १५४ ॥
नरकांत दुःख दुःसह भोगी आतां असंख्य-काल खला ।
जें हांसत अघ केलें त्याच्या अतितीव्र भोग दुःखफला ॥ १५५ ॥
जणु पापाचा पर्वत ऐशा त्या पर्वतास अनुसरुन ।
केला प्रसार हिंसा-यज्ञांचा ब्राह्मणें दयाहीन ॥ १५६ ॥
यापरि नारद-भाषण ऐकुनि त्याला दशाननें केलें ।
वन्दन मरुत्त-भूपें क्षमा करा म्हणुनि त्यास विनवियलें ॥ १५७ ॥
करुनि क्षमा तयाला बसला तो आसनावरी सुजन ॥
गौतम गणीस वदला श्रेणिक नारद महर्षि हा कोण ॥ १५८ ॥

[ गौतमगणधर नारदाचें जन्मवृत्त श्रेणिकाला सांगतात ]

गौतम गणधर सांगे ब्रह्मरुचि द्विज वनांत राहतसे ।
कूर्मी त्याची भार्या उदरांत जिच्या सुगर्भ वाढतसे ॥ १५९ ॥
मुनिगण तेथें आला एके दिनिं एक साधु त्यास वदे ।
गृहवास भव-भयानें त्यजिला वाधा तथापि मन्मथ दे ॥ १६० ॥
यास्तव वनिं तव वसणें व्यर्थ गमे विषयलुब्ध चित्त तुझें ।
हो तूं विरक्त विप्रा दारपरिग्रह असेचि हें ओझें ॥ १६१ ॥

१ विद्याधर. २ कान्ति. ३ यज्ञाच्या अग्नींत. ४ पत्नी-स्वीकार.

ऐकुनि मुन्युपदेशा जिनशासन अंगिकारिलें त्यानें ।
निर्ग्रन्थ मुनि जहाला शोभे तो सकल-साधु-मूल-गुणें ॥ १६२ ॥
गर्भवती ती कूर्मी विरक्त विषयांत आश्रमीं राही ।
मति जिनधर्मी तत्पर अणुव्रतें ती मनांत दृढ वाही ॥ १६३ ॥
मिथ्यात्व-वर्जिता ती नवमासांनीं प्रसूत वनिं झाली ।
झाला पुत्र तियेला कमलासम कान्ति ज्याचिया गालीं ॥ १६४ ॥
चन्द्रासमान वाढे प्रतिदिनिं रुदना[1]दिदोषरहित सुत ।
वृक्षतलीं त्या ठेवुनि फलार्थे[2] जातां घडे अशी मात ॥ १६५ ॥
जृम्भक-देवगणाला दिसला बाल प्रसन्न-वदनाचा ।
नेला निजगृहिं त्यांनीं फलरस पाजून रक्षिला साचा ॥ १६६ ॥
माता येउनि बघतां वृक्षतलीं सुत तिला न तो दिसला ।
झाला शोक तियेला गालावरि अश्रुवृन्द ओघळला ॥ १६७ ॥
शुभकर्म बालकाचें असेल जेथें तिथेंहि रक्षील ।
सोडून मोह देत्ये तो मजला दुर्भवांत फिरवील ॥ १६८ ॥
ऐसा विचार चित्तीं करून ती आर्यिकागणीं गेली ।
दीक्षा घेउनि साध्वी धर्माचरणांत सतत रत झाली ॥ १६९ ॥
इकडे नाना शास्त्रें त्या नारद बालकास अमरांनीं ।
शिकवून दिली विद्या प्रेमें आकाशगामिनी त्यांनीं ॥ १७० ॥
नारद तरुण जहाला अणुव्रतें अंगिकारिलीं पांच ।
मस्तकिं शिखा, कमण्डलु करांत यज्ञोपवीत गळिं साच ॥ १७१ ॥
कलहप्रियता अंगीं पायीं घालुनि खडाव तो विहरे ।
गायन-नर्तन-तत्पर जिनगुणगानांत चित्त लावि पुरें ॥ १७२ ॥
जो वीरकामुकामधिं मिलापकलहादिकांत चतुर असे ।
स्तुति-वन्दनादिकादर करी तयावरि सदा प्रसन्न दिसे ॥ १७३ ॥
ब्रह्मव्रत दृढ ज्याचें गृहस्थ नच तेवि संयमी नाहीं ।
जृम्भक-देवें पालित म्हणून 'देवर्षि' नाम त्या पाही ॥ १७४ ॥
स्वेच्छाचारी भूतलिं जम्बूद्वीपादिकीं विहार करी ।
येई क्रोध जयावरि त्याच्या नाशार्थ तो प्रवृत्ति वरी ॥ १७५ ॥

---

१ रडणें वगैरे. २ फळें आणण्यासाठीं.

त्यानें निजमातेला आर्यागणिं तप करीत असलेली ।
निज-वपुसादृश्यानें[1] ओळखिलें आणि वन्दना केली ॥ १७६ ॥
पाहून यास भूपति आदरिती उच्च आसना देती ।
तेणें राजकुलामधिं राजर्षि म्हणून होय विख्याति ॥ १७७ ॥
यापरि नारद-सुकथा श्रेणिक ऐकुनि गणीस तो वदला ।
पशुयज्ञपद्धतीनें प्रसिद्ध हा पापमार्ग जगिं झाला ॥ १७८ ॥
या यज्ञपद्धतीचा करून अवलम्ब हे मरुत्त नृप ।
प्राणिवधास नको करु जेणें तुजला गिळील भवकूपं[2] ॥ १७९ ॥
रावणभटें द्विजांना केलें ताडन नि कान पकडून ।
बहु मारहाण केली आले ते सकल तेधवा शरण ॥ १८० ॥

[ नारद दशमुखाला ब्राह्मणोत्पत्ति-कथा सांगतांना आदिभगवन्ताचें चरित्र सांगतो ]

नारदमनि ये करुणा वदला तो रावणा जगोत जगीं ।
निर्वीज न हे होतिल होता नृप भरत यांत अनुरागी[3] ॥ १८१ ॥
या अवसर्पिणि-कालीं चतुर्थ-समयागमीं जिनेन्द्रवृष[4] ।
श्री-वृषभनाथ झाले त्रिज्ञानाचे धरातलीं कोष ॥ १८२ ॥
केलें कृतयुग त्यांनीं सांगितल्या शतकला समस्तजनां ।
ज्यांच्या सकलगुणांचें वर्णन सांगावयास ये न कुणा ॥ १८३ ॥
विभु जन्मतांचि नेला सुमेरुगिरि-मस्तकीं समस्त सुरें ।
क्षीरसमुद्रजलांनीं स्नान तया घातलें सुभक्ति-भरें ॥ १८४ ॥
त्या श्रीवृषभजिनाचें दिव्य नि पातक-विनाशि चरित असे ।
लोकीं प्रसिद्ध झालें दशास्य ! ते तुजशि सर्व विदित दिसे ॥ १८५ ॥
विन्ध्य नि हिमवत्पर्वत हेचि स्तनयुग्म जीस शोभतसे ।
जी आर्यदेश-वदना[5] समुद्ररशना जियेस बहु विलसे ॥ १८६ ॥
काननकेशें[6] शोभे मणिकान्ति जिच्या सदा शरीरांत ।
ऐशा भूभार्येला त्यजुनि जिन प्रथम होय सुतपिं रत ॥ १८७ ॥
केलें हजार वर्षें वज्राङ्ग जिनें महातपश्चरण ।
स्वाम्यनुरागें झाले कच्छादिक-नृप-सहस्र साधुगण ॥ १८८ ॥

---

१ स्वतःच्या शरीराचें सादृश्य पाहून. २ संसाररूपी आड. ३ प्रेम करणारा. ४ जिनेश्वरांत श्रेष्ठ. ५ आर्यदेश जिचें तोंड आहे व समुद्र जिचा कमरपट्टा आहे. ६ वनरूपी केशांना.

उग्र परीषह सहन न होतां हे वल्कलादि नेसून ।
पारिव्राजक आदिक कुमतांचें जाहलें अधिष्ठान ॥ १८९ ॥
सर्व-जगा जें जाणी वृषभजिना होय केवलज्ञान ।
वटवृक्षाचें खालीं असतां आत्मस्वरूप-रममाण ॥ १९० ॥
तेथें देवें केली भगवत्पूजा[1] तदा मनोभावें ॥
त्याच पथें वटपूजन[2] आजहि दिसतें जनास हें ठावें ॥ १९१ ॥
त्याच्या पुत्रें भरतें षट्खण्डेशें मरीचितनयें ही ।
उत्पन्न द्विज केले व्याप्त तयें आज हो समस्त मही ॥ १९२ ॥
दाम्भिक-मिथ्याचारें त्यांनीं मोहित समस्त विश्वास ।
केलें तेणें करुणामहिलेचा[3] कोण्डला असे श्वास ॥ १९३ ॥
केला या विप्रांचा निःपात[4] सुभूमचक्रवर्तीनें ।
जरि एकवीस वेळां झाला न अभाव समज भूप मनें ॥ १९४ ॥
यास्तव दशानना वा सोडुनि दे विप्रनाशि[5]-मार्गास ।
आहे जगीं अहिंसा हेतु स्वर्गापवर्ग[6]-वर्गास ॥ १९५ ॥
सर्वज्ञ जिनेश्वर ही कुमतें रहित न जगास करूं शकले ।
अल्पज्ञानी आम्ही करूं शकू कां कदापि सांग भलें ॥ १९६ ॥
या परि देवर्षीचें वचना ऐकुन दशाँस्य-मनिं[7] मोद ।
झाला जिनेश्वराला केलें वन्दन तयें न ज्या खेद ॥ १९७ ॥
रम्य महापुरुषांच्या सुकथा सांगीतल्या दशास्यास ।
देवयतीनें तेणें तन्मन पावें अतीव हर्षास ॥ १९८ ॥
नन्तर मरुत्तभूपति अञ्जलि बान्धुनि करी नमस्कार ।
लङ्केश रावणाला वदला मी त्यागिला दुराचार ॥ १९९ ॥
अज्ञानानें करिती नाथ ! दुराचरण जीव जाणून ।
व्हावें प्रसन्न मजवरि आपण आहा सदा दयार्द्र-मन ॥ २०० ॥
कनकप्रभा सुता मम करें करावें तिचें करग्रहण ।
उत्तम वस्तुग्रहणीं आपण सत्पात्र नैव अन्य जन ॥ २०१ ॥
मानुनि विनन्ति त्याची प्रणतजनीं[8] जो असे दयाशील ।
स्वीकारिली दशास्यें विवाह झाला समस्त-सुखमूल ॥ २०२ ॥

---

१ वृषभनाथाची पूजा. २ वडाची पूजा. ३ दयारूपी स्त्रीचा. ४ नाश. ५ ब्राह्मण. ६ मोक्ष. ७ रावणाचे मनांत. ८ नम्र मनुष्यावर.

भूपति मरुत्त होउनि अतिशय सन्तुष्ट आदरी सकला ।
वस्त्रालंकारांनीं दिसला कोणी न तेधवा रुसला ॥ २०३ ॥
कनकप्रभेंत झाला रावण रममाण वर्षपर्यन्त ।
झाली तयास कन्या 'कृतचित्रा' जीस बोलती सन्त ॥ २०४ ॥
रूप तियेचें वघतां विस्मय जननयनमानसा होई ।
जणु मूर्तिमन्त शोभा सुजनाचें चित्त चोरण्या येई ॥ २०५ ॥
सामन्त रावणाचे तेजस्वी शूर आणि दृढदेही ।
जयशालीं धरणीतलिं रमले बहु दिवस जेवि निजगेहीं ॥ २०६ ॥
देशीं नगरीं ग्रामीं [1]घोषीं वा जे प्रधान-नर होते ।
नजराणे बहु आणुनि दशास्य[2]चरणद्वयास पूजिति ते ॥ २०७ ॥
त्यांना भाषण बोलुनि मधुर दशग्रीव हर्षयुक्त करी ।
सन्मानहि शिष्टांचा करी मनीं सुगुणराग नित्य धरी ॥ २०८ ॥
सर्वांच्या हृदयामधिं दशकण्ठाविषयिं जाहलें प्रेम ।
"न्यायी दशास्य" ऐसें सुजनमुखीं खेळतें सदा नाम ॥ २०९ ॥
जे पुण्यवन्त असती त्यांचें ऐकून नाम नत होती ।
जन त्या वैभव लाभे आश्चर्याचे निवास ते गमती ॥ २१० ॥
यास्तव सुजनें व्हावें पूजादानव्रतादिकीं निरत ।
व्हावें जिनदास सदा पळून जाईल कां न मग दुरितें[3] ॥ २११ ॥

इत्यार्षे श्रीरविषेणाचार्य-प्रोक्ते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे पद्मपुराणे मरुत्तयज्ञविध्वंसाभिधानं नाम एकादशं पर्व ॥ ११ ॥

---

१ गौळवाडी. २ रावणाच्या दोन पायांना. ३ पातक.

## बाराव्या पर्वांतील कथेचा सारांश

मरुत्त राजाचा पराभव करून व त्याच्या कन्येबरोबर विवाह करून रावण तेथें कांहीं दिवस सुख भोगीत राहिला. नंतर तेथून सैन्यासह प्रयाण करून तो मथुरा नगरीकडे निघाला. मथुरापति हरिवाहन राजानें त्याचें सहर्ष स्वागत केलें. हरिवाहनाचा पुत्र मधु अतिशय सुन्दर होता. शिवाय त्याला चमरेन्द्रानें त्रिशूलनामक दिव्य शस्त्र दिलें होतें. रावणानें त्याला आपली मुलगी द्यावी असा विचार केला. त्यानें मधु राजपुत्राला बोलावून त्रिशूलाची प्राप्ति कशी झाली असा प्रश्न विचारला. मधूनें याप्रमाणें त्याच्या प्राप्तीचा इतिहास सांगितला.

धातकी-खण्डांत ऐरावत क्षेत्रांत 'शतद्वार' नांवाचें नगर होतें. तेथें दोघे मित्र रहात होते. एक मित्र राजा होता त्याचें नांव 'सुमित्र' होतें. त्याच्या मित्राचें नांव प्रभव होतें. तो एका व्यापाऱ्याचा मुलगा होता. पण यांची घनिष्ठ मित्रता होती. एकेवेळीं राजा सुमित्र घोड्यावर बसून गांवाच्या बाहेर क्रीडा करण्यासाठीं निघाला. घोडा दुष्ट होता. त्यानें राजाला एका घोर जंगलांत नेलें. तेथील भिल्ल राजानें सुमित्राला आपल्या घरीं नेलें व त्याचा आपल्या सुंदर वनमाला नामक कन्येबरोबर विवाह केला. राजा सुमित्र मदनाप्रमाणें व वनमाला रतिप्रमाणें दिसत होती. तिच्यासह राजा आपल्या राजधानीला आला. प्रभवानें वनमालेला पाहिलें तेव्हांपासून तिच्या अभिलाषेनें तो कृष्णपक्षाच्या चन्द्राप्रमाणें कृश होऊं लागला. राजानें 'तूं असा रोड कशानें होत आहेस ? तुझ्या मनाला कोणती चिन्ता पीडा देत आहे ? मला सांग' असें म्हटलें. पण तो सांगावयास लाजूं लागला. फारच आग्रह केल्यावर तो म्हणाला राजा माझ्या मनांत वनमालेविषयीं अभिलाषा उत्पन्न झाली आहे. यावर राजा म्हणाला मित्रा, तुझ्यासाठीं राज्याचाही मी त्याग करीन मग एका

क्षुद्र स्त्रीचा कां करणार नाहीं? आज रात्रीं मी तिला तुझ्याकडे पाठवीन. तूं चिन्ता करुं नकोस. असें म्हणून वनमालेला मित्राच्या घरीं पाठविलें व आपणही तेथेंच गुप्तपणें बसला.

रात्रौ ती प्रभवाला म्हणाली राजानें अर्थात् माझ्या पतीनें आपणाकडे मला पाठविलें आहे. त्यांची आज्ञा उल्लंघणें मला शक्य नाहीं. यास्तव आपण माझा स्वीकार करावा. माझ्या पतीचें आपल्यावर अत्यन्त प्रेम आहे. प्रभव म्हणाला वनमाले, मी अगदीं निर्लज्ज आहे. मित्राकरितां प्राणत्याग करणारे पुष्कळ लोक भेटतील. पण आपली भार्या ते देणार नाहींत. हे वनमाले तूं माझी माता आहेस. तूं आतां घरीं जा. या पाप्याला एक शब्दहि बोलूं नकोस. असें बोलून त्यानें तिच्या चरणांना नमस्कार केला व तिला त्यानें घरीं पाठविलें. यानंतर त्यानें म्यानांतून तलवार बाहेर काढली व तो तिनें आपला गळा कापणार इतक्यांत सुमित्र राजानें तेथें प्रवेश करून त्याचा तलवारीचा हात पकडला. हातांतून तलवार काढून घेतली व तो त्याला म्हणाला मित्रा तुझा सत्त्वगुण पाहून मला अत्यानन्द झाला. तूं मनःखेद सोडून आनन्दानें रहा. त्या दोघांनीं दीर्घकाल राज्योपभोग घेतला.

राजा सुमित्रानें जैनमुनिदीक्षा घेतली तप केलें. व ऐशान स्वर्गांत तो जिन भक्त देव झाला. तेथून आयुष्य संपल्यावर तो देव हरिवाहन राजा व राणी माधवी यांचा मधु नामक मुलगा झाला. याप्रमाणें माझी भवकथा आहे. आतां त्रिशूललाभ मला कसा झाला हें सांगतों. माझा मित्र प्रभव संसारांत पुष्कळ जन्म घेत फिरला व एकेवेळीं विश्वावसु व ज्योतिर्मति या जोडप्यांच्या पोटीं श्रीकुमार या नांवाचा मुलगा झाला. त्या भवांत त्यानें निदानयुक्त तप केलें व तो मरून चमरेन्द्र झाला. मागच्या जन्माचें त्याला ज्ञान झालें व त्यानें मित्रस्नेहानें येऊन मला तें दिव्य त्रिशूल दिलें. या त्रिशूलाचें असें सामर्थ्य आहे कीं युद्धांत हजार माणसांना एका क्षणांत हें मारून टाकितें.

याप्रमाणें मधुकुमाराचें मधुचरित्र ऐकून रावणाला मधुर आनन्द झाला. त्यानें आपल्या 'मनोरमा' नामक कन्येचा त्याच्याशीं विवाह केला. नंतर रावण लंकेला जाऊन सुखानें राहिला.

दुर्लङ्घ्यपुरांत नलकूबर राजा राज्य करीत होता. त्याला जिंकण्याची इच्छा रावणाच्या मनांत झाली व तो सैन्यासह निघाला. ही वार्ता राजा नलकूबराला समजली त्यानें आशालिका विद्येच्या द्वारें नगराभोंवतीं अग्निमय तटाची रचना केली. त्यामुळें

रावणाला त्या नगराला आपल्या सैन्यानें घेरा घालण्याचें कार्य करतां आलें नाहीं. तो चिन्ताक्रान्त झाला. पण नलकूबराच्या पत्नीला रावणाची अभिलाषा उत्पन्न झाली. तिनें एका दासीला रावणाकडे पाठविलें. तिनें रावणाला म्हटलें "प्रभो उपरम्भेला आपल्याबरोबर रमण्याची इच्छा आहे. ती आपण तृप्त कराल तर तटाचें रक्षण करणारी आशालिका विद्या ती आपणास देईल. आपण नलकूबरास पकडून दुर्लङ्घ्यपुराचें स्वामी व्हाल. एवढेंच नव्हे तर आपणाला येथें चक्र-रत्नाचीही प्राप्ति होईल." हें दासीचें भाषण ऐकून रावणबंधु बिभीषणानें उपरंभेला पाठवून दे असें दासीला म्हटलें. दासी आनन्दानें निघून गेली. रावण रागानें बिभीषणाला म्हणाला 'बिभीषणा, हें कार्य धर्म, यश व वंशाला कलंकित करणारें आहे. या कार्याला तूं संमति दिली हें योग्य झालें नाहीं" बिभीषण म्हणाला 'बन्धो उपरंभेकडून आधी विद्येची प्राप्ति करून घे व नंतर युक्तियुक्त भाषण करून तिचा त्याग कर.' रावणाला हा विचार पसन्त पडला.

आलिंगनोत्सुक रम्भा आली व तिनें त्याला आशालिका विद्या दिली व आपली रमण्याची इच्छा व्यक्त केली. रावण म्हणाला 'उपरंभे, या वनांत रतिक्रीडा करण्यांत तुला व मलाही सुख होणार नाहीं. आपण या दुर्लङ्घ्यपुरांत क्रीडा करूं. हें नगर हस्तगत होईपर्यन्त तूं धैर्य धर.' असें म्हणून त्यानें तिला पाठविलें. आशालिका विद्या प्राप्त झाल्याबरोबर तो अग्निमय तट नाहींसा झाला. त्या तटावर जीं व्यन्तरदेवाधिष्ठित यंत्रें बसविली होतीं तींही नाहींशीं झालीं. नगरामध्यें रावणानें ससैन्य प्रवेश केला. नलकूबराला बिभीषणानें पकडलें. जेव्हां तो शरण आला तेव्हां रावणानें नलकूबराला त्याच नगराचा पुनः स्वामी बनविलें. उपरंभेला रावण म्हणाला 'उपरंभे, तूं मला आशालिका विद्या दिलीस तूं माझी गुरु, माता व भगिनी झाली आहेस. यास्तव आपल्या पतींतच तूं संतोष ठेव. पातिव्रत्य हेंच स्त्रियांचें भूषण आहे व त्यानेंच सर्व सद्गुणांची प्राप्ति होते. माझ्याविषयीं तूं शुभपवित्र अभिलाषा ठेव.'

नलकूबर राजानें हत्ती, रत्नें वगैरे देवून रावणाचा चांगला आदर केला. नंतर तो रावण रथनूपुर नगराचा स्वामी 'इन्द्र' विद्याधर राजावर स्वारी करण्यासाठीं निघाला.

इन्द्राच्या पित्यानें त्याला म्हटलें "वत्सा, रावणाला तूं आपली रूपवतीनामक अद्वितीय सुंदर कन्या देऊन त्याच्याशीं संधि कर म्हणजे तो पघळून शान्ति धारण

करील." पण हें भाषण त्याला आवडलें नाहीं. तोही आपलें प्रचण्ड सैन्य घेऊन रावणाबरोबर लढला. दोघांनीं एकमेकांशी शस्त्रास्त्रांनीं युद्ध केलें. रावणानें आपला हत्ती इन्द्राच्या ऐरावत हत्तीजवळ आणून त्याच्यावर उडी मारली. महाताला मारून टाकिलें व इन्द्राला त्यानें पकडलें. इन्द्राच्या हत्तीच्या सभोवतीं रावणाच्या वीरांनीं घेरा घातला. याचप्रमाणें इन्द्राच्या पुत्राला जयन्ताला इन्द्रजितानें पकडलें. तत्काल युद्ध समाप्त झालें म्हणून अभयघोषणा करविली. यानंतर रावणानें अत्यन्त वैभवानें मिरवत लंकेमध्यें प्रवेश केला. इन्द्र व त्याच्या जयन्त पुत्राला त्यानें कारागृहांत ठेविलें. या प्रमाणें या पर्वाची ही सारांश कथा आहे.

---

# पर्व १२ वें

यानंतर लङ्केश्वर मथुरानगरीस विक्रमी[१] गेला ।
हरिवाहन नरपालें करुनि स्वागत सहर्ष आदरिला ॥ १ ॥
एके दिनिं सचिवासह दशकण्ठें जाहली सुता अपुली ।
वरदान[२]योग्य याचा विचार केला नि वोलला सुबली[३] ॥ २ ॥
समर जरी इन्द्रासह झालें अपुलें स्वजीवितव्याचा ।
निश्चय केवि कळावा टिकेल वा नच टिकेल तें याचा ॥ ३ ॥
यास्तव आतां बाला-विवाह करणें मना गमे उचित ।
हरिवाहनतनया ती द्यावी मणिकर्नक[४]-योग हा खचित ॥ ४ ॥
कन्येसाठीं रावण वरचिन्ता-युक्त होय समजून ।
बोलावी निजपुत्रा हरिवाहन भूप रूपसम्पन्न ॥ ५ ॥

[ रावणाला मधुराजपुत्र त्रिशूलाची प्राप्ति स्वतःला कशी झाली हें सांगतो ]

त्या सुन्दर तरुणाला प्रणत पदीं बघुनि मोद मनिं झाला ।
दशकण्ठाच्या वदला याला आहेचि योग्य मम बाला ॥ ६ ॥
वोले रावण भूपा शूलायुध लाभ केवि तनयाला ।
तव झाला मज सांगे वदला नरपाल बोल मधुबाला ! ॥ ७ ॥
मधु वदला हे आर्या[५] चमरेन्द्रें पूर्वजन्म-मित्रानें ।
मजला दिलें असे हें ऐके तद्वृत्त एकचित्तानें ॥ ८ ॥
आहे प्रसिद्ध लोकीं द्वीप दुजा धातकी जया नाम ।
क्षेत्र तिथें ऐरावत नान्दे लक्ष्मी जयांत निःसीम[६] ॥ ९ ॥
पुर त्यांत एक होतें नाम जयाचें असें शतद्वार ।
दोघे सुमित्र होते अन्योन्य प्रीति करित ते फार ॥ १० ॥
होता सुमित्र नामें राजाचा पुत्र अन्य कुलपुत्र[७] ।
नाम तयाचें होतें प्रभव नि ते खेळतात एकत्र ॥ ११ ॥
बालपणीं गुरुसन्निध राहुनि नानाकलागमज्ञान ।
शिकले वसन्त-मदनासम अन्योन्यां न सोडिती जाण ॥ १२ ॥

---

१ शूर. २ वराला देण्यायोग्य-विवाह योग्य. ३ शक्तिशाली. ४ रत्नाचा व सुवर्णाचा संबंध. ५ हे पूज्या. ६ सीमारहित. ७ कुलीन घराण्यांतला मुलगा.

झाला सुमित्र नृपसुत तरुणपणीं भूप विपुल धनशाली ।
त्यानें प्रभवा देखिल अपुल्यासम वनविलें न ऊन सुखीं ॥ १३ ॥
नेलें एके समयीं घोरवनीं खल-हयें नृपालास ।
तेथें भिल्ल-नृपालें सुन्दर कन्या विवाहिली त्यास ॥ १४ ॥
राजा वनमालेसह आला रतिसह जसा दुजा मदन ॥
पाहुनि तियेस झाला प्रभव स्मरतप्त[1] हृदयिं बहु खिन्न ॥ १५ ॥
झाला तो प्रतिदिवशीं कृश झाली मलिन कान्ति देहाची ।
जणु चन्द्र कृष्णपक्षीं परिणति जनहो बघा कुमोहाची ॥ १६ ॥
पाहुनि कृशतर मित्रा सुमित्र नृप त्यास बोलला बोल ।
मित्रा ! झडकरि वद रे बाधक[2] वसलें असेल मनिं खोल ॥ १७ ॥
प्रभव तयाला वदला मित्रा सांगावयास मन लाजे ।
जें कुलकलङ्ककारी[3] माझ्या हृदयांत तें सदैव रुजे ॥ १८ ॥
अत्याग्रह भूपानें करिता कथिला मनोनुराग तयें ।
वनमालेविषयींचा प्रभवें होउनि सलज्ज बहु विनयें ॥ १९ ॥
राजा वदला त्याला राज्यहि सोडीन मी तुझ्यासाठीं ।
क्षुद्र स्त्री कां त्यजिन न आजचि घे तूं न होउ वा कष्टी ॥ २० ॥
ऐसें बोलुनि भूपति पाठवि त्याच्याकडे त्वरें तिजला ।
तोही गुप्तपणानें प्रभवाच्या जाउनी गृहीं बसला ॥ २१ ॥
रात्रौ तीही बोले भूपें तुजला दिलें असे मजला ।
सेवी जणु अगदांसम[4] पत्याज्ञा[5] लङ्घणें न शक्य मला ॥ २२ ॥
प्राणत्यागहि माझा करील पतिराज आपुल्यासाठीं ।
या दासीला त्यागि न काय उदासीन ही तुझी दृष्टि ॥ २३ ॥
प्रभवहि ऐसें वदला मजला धिक्कार होय शतवार ।
अतिशय निर्लज्ज असे मी परि मन्मित्र फार दिलदार ॥ २४ ॥
इतरासाठीं देती जन अपुले प्राण परि न भार्येस ।
माझ्यासाठीं यानें केलें दुष्कर अशाहि कार्यास ॥ २५ ॥
दुष्टा अवाच्य[6] नाहीं तैसें मजला अयाच्य[7] नच कांहीं ।
हा मित्र कल्पतरुसम अदेय[8] याला दिसेचि नच पाही ॥ २६ ॥

---

१ कामविकारानें दुःखी. २ पीडा देणारे. ३ वंशाला डाग लावणारें. ४ औषधाप्रमाणें. ५ नवऱ्याची आज्ञा. ६ न बोलण्याचें. ७ न मागण्याचें. ८ न देण्याचें.

हे वनमाले, माझी माता तूं सर्वथा स्वगृहिं जा गे ।
बोलू नको इत:पर या पाप्याला न पाहिही मागें ।। २७ ।।
तेथें गुप्तपणें नृप वसलेला उभयभाषणा ऐके ।
सत्त्व सख्याचें पाहुनि नृपतीची चित्तवृत्ति बहु हरखे ।। २८ ।।
वनमालापद वन्दुनि पाठवि तिजला नृपेश सदनास ।
खड्गें तोडायास्तव झाला उद्युक्त तो स्वकण्ठास ।। २९ ।।
प्रगटुनि सुमित्र वदला सखया ! साहस करूं नकोस असें ।
खड्ग करांतुनि घेई स्नेह जयाच्या अपार हृदयिं वसे ।। ३० ।।
जणु भूतलीं शिरावें म्हणुनि अधोमुख करून लाजेनें ।
वसला प्रभव तयाला नृपाल वदला प्रशान्त-भावानें ।। ३१ ।।
मित्रा तव सत्त्वगुणा बघून माझ्या मनास बहु मोद ।
झाला आनन्दानें राहा सोडून दे मन:खेद ।। ३२ ।।
मैत्री दृढ उभयांची राही नृपपद-सुखास बहुकाल ।
उपभोगिलें तयांनीं स्वभाव ज्यांचा असे दयाशील ।। ३३ ।।
होउनि विरक्त झाला सुमित्र निर्ग्रन्थ साधु सुतपिं रत ।
साधुनि समाधि-मरणा झाला ऐशान-देव जिनभक्त ।। ३४ ।।
तेथुनि चवून झालों हरिवाहनतनय नाम मधु ज्याचें ।
श्रीमाधवी मदीया माता मच्चरित हें असे साचें ।। ३५ ।।
विश्वावसु नि ज्योतिर्मत्युदरीं श्रीकुमार सुत झाला ।
मन्मित्र प्रभवाभिध भवांत बहुकाल जो असे फिरला ।। ३६ ।।
सनिदान[1] तपश्चरणें झाला चमरेन्द्र पूर्वभव जाणी ।
येउनि मजला देई त्रिशूल यापरि मदीय भववाणी[2] ।। ३७ ।।
युगपत्सहस्र[3]-मानव-घातन-कार्यास हें करी ऐशी ।
याची प्रसिद्धि आहे यापरि हें आमुचेंच सुहितैषी ।। ३८ ।।
ऐकुनि सुचरित मधुचें दशकण्ठाला प्रमोद बहु झाला ।
त्यानें दिली तयाला मनोरमाभिध सुता सुगुणमाला ।। ३९ ।।
मथुरेहून निघाला रावण गेला सुमेरुगिरिशिखरीं ।
जिनवन्दना कराया ज्याच्या जिनभक्ति अन्तरांत खरी ।। ४० ।।

---

१ राज्य, देवपद, इन्द्रपद इत्यादिकांच्या प्राप्तिसाठीं तप करणें. २ माझ्या पूर्वजन्माची कथा. ३ एका वेळीं हजार माणसांचा नाश करणें.

वन्दुनि चैत्यें सगळीं लङ्कानगरीं प्रवेश तो करुन ।
राही सौख्या भोगित विशाल पुण्योदयास अनुसरुन ॥ ४१ ॥

[ नलकूबराला वश करण्यासाठीं रावणाचें सैन्य प्रयाण ]

दुर्लङ्घ्यपुरामध्यें नलकूबर अवश रावणास असे ।
त्याला वश करण्याची इच्छा त्याच्या मनांत सतत वसे ॥ ४२ ॥
घटकर्णादिमहाभट वश करण्याला अलङ्घ्यनगरास ।
गेले दशाननाच्या आज्ञेनें विफल होय आयास ॥ ४३ ॥
नलकूबरें स्वनगरासभोवती अग्निमय असा रचिला ।
तट आशाली-विद्यासाहाय्यें[1] दाखवी स्वभयलीला ॥ ४४ ॥
नगरासभोवती शत-योजन-परिमित कुणी प्रवेशास ।
न समर्थ होय मनुज स्थापी तो बहुविधाग्नियंत्रास ॥ ४५ ॥
ज्वाला त्यांच्या पसरुनि कवळाया इच्छितात शत्रुगणा ।
वह्निकुमारासम नल-कूबर रक्षी नसे जया करुणा ॥ ४६ ॥
दुर्लङ्घ्यपुर खरोखर दुर्लङ्घ्यचि वाटलें तदा सकला ।
भग्नोत्साह जहाले वार्ता कथिली तयें दशास्याला ॥ ४७ ॥
येउनि दशास्य पाही अग्निज्वाला-करालनगर-तटा[2] ।
नलकूबरास करणें वश शक्य न वाटलें समस्त भटा ॥ ४८ ॥
काय उपाय करावा नलकूबर वश कसा मला होय ।
बान्धव समस्त घेउनि चिन्तित असतां दशास्य बहुसमय ॥ ४९ ॥
उपरंभा नलकूबरभार्या रावणगुणांत अनुरक्त ।
तल्लाभोपायाची[3] चिन्ता उपजे तदीय हृदयांत ॥ ५० ॥

[ उपरंभा दासीला रावणाकडे पाठवून आपला अभिप्राय कळविते ]

दासी तिनें तयाच्या सन्निध जी कार्यसाधनीं चतुर ।
पाठविली ती वदली दशकण्ठा वचन ऐक मम वीर ॥ ५१ ॥
उपरम्भा नलकूबर-भार्या तव मूर्तिमन्त जयलक्ष्मी ।
इच्छी रमावयाला रमवुनि तिज हो तिचा मनःस्वामी ॥ ५२ ॥
जी तटरक्षण करिते विद्या आशालिका मिळेल तुला ।
उपरम्भा ही रमविल तुजला जैशी शची[4] महेन्द्राला ॥ ५३ ॥

१ आशाली नामक विद्येच्या साहाय्यानें २ अग्निज्वालांनीं भयंकर दिसणारा. ३ रावणाच्या प्राप्तीच्या उपायाची. ४ इन्द्राणी.

नलकूबरास पकडुनि होशिल दुर्लङ्घ्यपत्तन-स्वामी ।
चक्र सुदर्शन येथें तुजला लाभेल दिग्जया नामी ॥ ५४ ॥
या परि दासीवचना दशास्य ऐकुनि बिभीषणा पाही ।
अनुज दशग्रीवाचा म्हणुनि वरें पाठवून तिज देई ॥ ५५ ॥
होऊन कुपित बोले बिभीषणाला दशास्य हें कार्य ।
धर्मयशोवंशांना विरुद्धसें म्हणुनि सर्वथा हेय ॥ ५६ ॥
संमति ऐशा कार्या दिलीस हें नैव चांगलें झालें ।
अपुल्या पूर्वजपुरुषें चित्त परस्त्रीस नैव अर्पियलें ॥ ५७ ॥
नव कुलकलङ्क वंशीं तव वचनें आज जाहला वाटे ।
सन्मार्गासम निर्मल निजवंशीं पेरिले तुवा काटे ॥ ५८ ॥
व्हावें प्रसन्न आर्या महाभुजा कोपकलुष चित्त न हो ।
केवल भाषणमात्रें निर्मलमानसनरीं कलङ्क न भो[२] ॥ ५९ ॥
आर्या येउनि विद्या देवो अरि वश तुझ्या भुजें होवो ।
युक्तिपर-भाषणानें बन्धो ! तुजकडुनि त्यागिली जावो ॥ ६० ॥
हें अनुजाचें भाषण दशाननाला सुमान्य तैं झालें ।
निजवंश-दूषणाचें भय हृदयांतील सर्वथा मिटलें ॥ ६१ ॥
उपरम्भा नलकूबरभार्या आलिङ्गनोत्सुका आली ।
आशालिका तियेनें विद्या होऊन कामविवश दिली ॥ ६२ ॥
व्यन्तरदेवाधिष्ठित घातक अस्त्रें दशाननें हरिलीं ।
अग्निप्राकार[३] हि लय पावे निर्भीकवृत्ति मनिं आली ॥ ६३ ॥
जें दुष्प्रवेश्य होतें दुर्लङ्घ्यपुरीं शिरे दशास्य मुदें ।
निजबन्धु, सैन्य, वाहन घेउनि निजपुण्य मानवां सुख दे ॥ ६४ ॥
युद्धासाठीं झाला नलकूबर वीर सज्ज त्या समयीं ।
धरिलें बिभीषणानें करून आक्रमण[४] पाप ये उदयीं ॥ ६५ ॥
देवासुर हि न जिंकिति सूर्यासम जें असह्य तेजाचें ।
चक्र सुदर्शन झालें दशानना प्राप्त तेधवा साचें ॥ ६६ ॥
आला दशाननाला नलकूबर शरण विनत[५] पदिं झाला ।
तेणें हर्षित होउनि दशास्य पुर तें समृद्ध दे त्याला ॥ ६७ ॥

१ धाकटा भाऊ. २ भो--हे. ३ अग्निमयतट. ४ हल्ला. ५ नम्र.

[ शीलक्षणाचा रावण रंभेला उपदेश करितो. ]

उपरंभेला रावण वदला स्वपतींत ठेव सन्तोष ।
पातिव्रत्य स्त्रीचें भूषण शोभे तयेंचि गुणकोष ॥ ६८ ॥
विद्यादानें तूं गुरुजननी-भगिनी-समान आहेस ।
यास्तव माझ्याठायीं राहो तव गे सदा सदभिलाष ॥ ६९ ॥
कामध्वज-भूपाची तनया तव सुन्दरी असे माता ।
पितृपतिकुलास भूषण हो वाढो तव सदा सुकीर्तिलता ॥ ७० ॥
नलकूबर-राजानें गजरत्नधनादि वस्तु देऊन ।
दशकण्ठाचा केला स्वगृहीं बहुमान त्यास नेऊन ॥ ७१ ॥

[ रावणानें इन्द्रावर प्रयाण व इन्द्रपिता इन्द्राला संधि करण्याचा उपदेश करितो. ]

सेना प्रचण्ड घेउनि रथनूपुरपतिवरि प्रयाण करी ।
भूपसहस्रार वदे तनया इन्द्रास तूं सुसन्धि वरी ॥ ७२ ॥
पुत्रा ! तूं इतरोन्नति हरून निजवंश तुङ्गतम केला ।
तूं घोर-विक्रमी वश केलेस [1]खगाचलस्थ-नृपति-कुला ॥ ७३ ॥
केवल पराक्रमाला आश्रय देणें कदापि न च उचित ।
सामादिक नीतींना आतां हृदयांत घे सुता त्वरित ॥ ७४ ॥
जो सर्वथा पराक्रम विपत्तिकारण कदापि तो होतो ।
एकान्त-विक्रमानें शरभ [2]विपद्द्रिदरींत कोसळतो ॥ ७५ ॥
एकापेक्षा दुसरा जगीं बलाधिक असू शकेल असा ।
चित्तीं विचार ठेवुनि गर्वाला स्थान दे न तूं वत्सा ! ॥ ७६ ॥
वीरांच्या अभिमाना हरणारा आज वीर ये उदया ।
ज्याचा प्रताप पाहुनि लज्जा उत्पन्न होतसे सूर्या ॥ ७७ ॥
कैलास-पर्वताला लीलेनें उचलिलें असे ज्यानें ।
नाशुनि मरुत्तयज्ञापशुवृन्दा रक्षिलें दयार्द्रमनें ॥ ७८ ॥
निजभुजवीणागानें जिनगुणभजनांत जाहला लीन ।
वितरिलि धरणेन्द्रें ज्या अमोघशक्ति प्रसन्न होऊन ॥ ७९ ॥

---

१ विद्याधर पर्वतावर— विजयार्धावर असलेल्या सर्व राजसमूहाला. २ संकट-रूपी पर्वताची दरी.

कुम्भश्रुति नि विभीषण ज्याचे जणु दोन बाहु आहेत ।
तो लङ्केश दशानन सुकेशकुलकमल-सूर्य बहु विदित ॥ ८० ॥
यम नि कुबेर अशा तव दिक्पालयुगास रावणें हरिलें ।
सुग्रीव वानरेन्द्रा वालिभ्रात्यास पत्तिसम केलें ॥ ८१ ॥
दुर्लङ्घ्याग्नितटाच्या दुर्लङ्घ्यपुरीं प्रवेश जैं लाभे ।
तैं नलकूवर धरिला विभीषणें ऐकतां मन क्षोभे ॥ ८२ ॥
यापरि पराक्रमाचीं बघून कार्यें तया प्रणाम करी ।
तेणें चित्त तयाचें पघळुनि तें खचित शान्तिभाव धरी ॥ ८३ ॥
देई तयास अपुली अतिसुन्दर रूपधारिणी तनया ।
रूपवती नांवाची विचार हा मान्य तूं करी मान्या ॥ ८४ ॥
ऐशा सम्बन्धानें सन्धि करावा असे मदीय मत ।
होईल सुहित तेणें घडेल एणें कदापि न च अहित ॥ ८५ ॥

[ पित्याचें भाषण इन्द्राला पसन्त पडत नाहीं. तो उत्तर देतो. ]

हें वचन निज-पित्याचें ऐकुनि तत्काल इन्द्र मन कोपे ।
वदला तो मम वध्यचि त्याविण मम जीव तीव्र संतापे ॥ ८६ ॥
नाधुनिक वैर त्याशीं परि तें आहे सुदीर्घ-कालीन ।
द्यावी तयास कन्या मान्य न हें आपुलें मला वचन ॥ ८७ ॥
श्री-विजयसिंह ताता याच्या आश्रितजनें असे वधिलें !
त्याचें स्मरण तुम्हाला ताता या समयिं कां न तें घडलें ॥ ८८ ॥
याच्या पितामहाची गति जी समरांत मी असे केली ।
याचीहि तीच करितो त्याविण शमणार हा नसेचि कलि ॥ ८९ ॥
ताता स्नेहें कातर-वृत्ति त्यज सहज-धैर्य हृदयिं धरी ।
माझा विक्रम पुष्कळ पाहियला स्मृति न कां त्वदीयउरीं ॥ ९० ॥
यापरि बोलत असतां दुर्धर रथनूपुरास वेढून ।
वसला रावण सैन्यें कथितों त्याचें तुम्हास मी कथन ॥ ९१ ॥

[ रावणाचा दूत येतो व तो इन्द्राला शरण ये असें म्हणतो. ]

येऊन रावणाचा इन्द्राला बोलला असे दूत ।

---

१ सुकेश राजाच्या वंशरूपी कमलाला प्रफुल्ल करण्यास सूर्यासारखा असा रावण.
२ रावणाशीं वैर आतां उत्पन्न झालें नाहीं. ३ रावणाचा आजा माली त्याला इन्द्रानें युद्धांत ठार केलें होतें.

खगनृप अन्यहि राजे प्रणाम करिती उपायनासहित ॥ ९२ ॥
दशकण्ठाची येउनि भक्ति करी प्राप्त जाहली वेळ ।
विस्मृति तुजला झाली घेऊन उपायनास शीघ्र चल ॥ ९३ ॥
त्याच्या चरणीं दाखव देवेन्द्रा भक्ति आपली प्रबल ।
नातरि शक्ति प्रगटवि उभयाभावें विनष्ट होशील ॥ ९४ ॥

[ दूताला इन्द्राचें उत्तर. ]

वदला इन्द्र तयाला दीन नि दुर्बल नृपाल पूजोत ।
झाला प्रमत्त तो खल त्याचा आला समीपसा अन्त ॥ ९५ ॥
गेला असेल त्याचा पूर्वीचा काल विपुल सौख्यांत ।
कालचि जणु मी आलों गिळून त्याला करीन मी फस्त ॥ ९६ ॥
कोपें दारुण रावण दूतें यापरि निवेदिला गेला ।
न च शरण इन्द्र येतो झाला सन्नद्ध घोर युद्धाला ॥ ९७ ॥
सहती न वीर मोठे अन्यांच्या निर्विवेक मदलीला ।
मानी स्वतःस सुरपति असुनिहि नरकीट हा मदें फसला ॥ ९८ ॥

[ इन्द्र नि रावण यांचें युद्ध. इन्द्राला पकडून रावण लंकेला प्रयाण करितो. ]

घेऊन सैन्य मोठें अनेक सामन्त भूप परिवार ।
रथनूपुरनगराहुनि देवेन्द्र निघे करावया समर ॥ ९९ ॥
प्रारंभ होय समरा उभयांच्या सैनिकामधें क्रूर ।
कित्येक वीर जाती समरनदींतून तरुनि जे चतुर ॥ १०० ॥
सामन्तासह लढले सामन्त करांत निशितसा कुन्त ।
घेउनि अन्योन्यावरि फेंकुनि केला तयें तदा अन्त ॥ १०१ ॥
गज अरिगजास पाहुनि शुण्डादण्डें प्रहार करितात ।
निज-दीर्घ-तीक्ष्ण-दन्तें लढती अन्योन्य करिति देहान्त ॥ १०२ ॥
रावण दारुण कोपें निजसैन्याचा विनाश पाहून ।
झाला लढावयाला सन्नद्ध गजेश्वरावरी चढुन ॥ १०३ ॥
आरूढ इन्द्र झाला ऐरावतगजिं सुसज्ज होऊन ।
उभयांचे गज पाहुनि सोंडा सोंडेंत मिळविती तूर्ण ॥ १०४ ॥
अत्यन्त शक्तिशाली दोघे गज ते स्वकीयदन्तांनीं ।
अन्योन्यांना मारिति फुलती ते अग्निच्या स्फुलिंगांनीं ॥ १०५ ॥

---

१ नजराणा. २ ठिणग्यांनीं.

दन्ताघातें होउनि जखमा त्यांतून रक्त जें वाहे ।
जणु मदधारा गण्डस्थलांतुनी उसळतात जन पाहे ॥ १०६ ॥
इन्द्र नि रावण लढती शस्त्रें बाणें नि मुद्गरें वीर ।
जणु दोघे गज लढती दिसे भयप्रद जनास तत्समर ॥ १०७ ॥
अतिशय पराक्रमी ते अस्त्रें अस्त्रास तोडिती तूर्ण ।
जणु पूर्वापर[1]-सागर कोणी कोणा उणा न परिपूर्ण ॥ १०८ ॥
रणयज्ञदीक्षितांचें मन्त्रास्त्रें घोर चाललें युद्ध ।
अन्योन्य वीर भिडले झाले हृदयांत जे महाक्रुद्ध ॥ १०९ ॥
यापरि लढतां लढतां वलि रावण उडुनि जाय वेगानें ।
ऐरावणीं महाता मारी स्वगजावरून लीलेनें ॥ ११० ॥
तत्समयीं इन्द्रगजा राक्षस-वीरें हि वेष्टिलें चपलें ।
गण्डस्थलास अलिगण[2] जैसें घेरून राहती स्ववलें ॥ १११ ॥
दशकण्ठानें जेव्हां धरिलें इन्द्रास सैन्य शीघ्र पळे ।
कोणीं न तेथ राहे स्वप्राणा रक्षण्यास सर्व वळे ॥ ११२ ॥
नेलें दशाननानें इन्द्रा ऐरावतासह स्वैर ।
शिबिरीं अपुल्या झाला श्रेणीद्वयखगनृपाल-पति[3] शूर ॥ ११३ ॥
इन्द्रजितेंही धरिलें इन्द्रसुताला जयन्त ज्या नाम ।
निजकिङ्करा समर्पुनि मानी स्वतः कृतार्थता-धाम[4] ॥ ११४ ॥
अतिशय उत्साहानें सुरसेनेवरि पुनर्यदा धावे ।
वदला दशास्य पुत्रा किमर्थ आतां परिश्रमा घ्यावें ॥ ११५ ॥
सोडून दे प्रयत्ना युद्धापासून परत वा तनया ।
मुख्यास बद्ध केलें अन्या वदतील विबुधगण अनया ॥ ११६ ॥
जे मुख्य बद्ध केले इतरासाठीं प्रयत्न विफल असे ।
तन्दुल करगत होतां फोलाला कोण बोल कुटित वसे ॥ ११७ ॥
हें क्षुद्र सैन्य आणिक सामन्त जगोत आणि जावोत ।
सौख्यें इष्टस्थानीं युद्धापासून वत्स ये परत ॥ ११८ ॥
जैसा नभांत शारदमेघांचा जाय वृन्द वितळून ।
सुरसेनाही गेली सर्व-रणांतून तेधवा पळुन ॥ ११९ ॥

---

१ पूर्व समुद्र व पश्चिम समुद्र. २ भुंग्याचा समूह. ३ दक्षिणश्रेणी व उत्तरश्रेणीच्या विद्याधर राजांचा स्वामी. ४ घर.

रावण-सैन्यें केला प्रचण्ड जयघोष मोद मानून ।
वन्दिगण शंख दुन्दुभि वाजविती बधिर होति दिग्गगन ॥ १२० ॥

[ विजयी रावणाचें लंकानगरींत अपूर्व स्वागत. ]

अत्यन्त वैभवानें लङ्कानगरीकडे प्रयाण करी ।
बन्ध्वादिक-परिवारें दशास्य ज्याच्या अमाप मोद उरीं ॥ १२१ ॥
ध्वज-शोभित तेजस्वी ऐसा रथगण असङ्ख्य तैं चाले ।
जयजय करित निघाले सैन्य हि घेउनि करांत शत भाले ॥ १२२ ॥
सुन्दर चामर ज्यांचें भूषण ऐसा तुरङ्गगण नृत्य ।
चाले करीत पाहुनि वदले गन्धर्व-नृत्य जन सत्य ॥ १२३ ॥
भुङ्गे ज्यांचा सेविति मद जे करितात गर्जना थोर ।
आले गज जणु वाटे ऐरावत-सैन्य आज भूमिवर ॥ १२४ ॥
विजयी होउनि इन्द्रा पकडुनि येई दशास्य लङ्केंत ।
पुररक्षकाधिकारी स्वागत करिती नि पौरं हर्षयुत ॥ १२५ ॥
करिं अर्घ्यपात्र दीपक घेउनि आल्या सुवासिनी नारी ।
ओवाळुनि त्या वदल्या ' नृपेश आचन्द्रसूर्य राज्य करी ' ॥ १२६ ॥
रावण वृद्धजनांना वन्दी पाही प्रसन्नदृष्टीनें ।
अपुल्या मित्रगणा तो बघती जन त्या प्रसन्न हृन्नयनें ॥ १२७ ॥
स्वाभाविक सुन्दर त्या लङ्कानगरींत सर्व मार्गांत ।
चन्दन-केशरसिंचित जलगन्धें मृदुल वाहतो वात ॥ १२८ ॥
प्रतिगृहिं नगरींत ध्वज उभारिले मन्द मन्द पवनानें ।
फडफडुनी बोलाविति या या शोभा हिची बघा नयनें ॥ १२९ ॥
सर्व ऋतूंचीं पुष्पें राजपथीं पसरलीं तयावरुन ।
जातां कोमल त्यांचा स्पर्श पदा सुखवि सतत अन्यून ॥ १३० ॥
प्रत्येक गृहद्वारीं स्थापियले पूर्ण कुम्भ मुखिं कमलें ।
सुममाला गळिं जणु जे वदती अरिहन्त रहित कर्ममलें ॥ १३१ ॥
जैसें देवें वेष्टित शचिपति अमरावतीं प्रवेश करी ।
आरूढ पुष्पकावर खचरें रावण पुरींत विभव वरी ॥ १३२ ॥
वक्षःस्थलिं रत्नांचा हार रुळे विमलकान्ति दिग्वदनीं ।

---

१ भाऊ वगैरे. २ घोड्यांचा समूह. ३ गन्धर्व-नृत्य करणारे देव. ४ हृदयानें व डोळयानीं. ५ अतिशय.

ज्याच्या पसरे भासे वसन्त जणु जो सदैव रात्रिदिनीं ॥ १३३ ॥
केला प्रवेश यापरि दशवदनें सुन्दर स्वसौधांत ।
भोगी वैभवसौख्या चाले जेथें सदोत्सवव्रात ॥ १३४ ॥

[ पुण्य व पापाचें फल. ]

उद्धत शत्रुगणाला तृणसम मानून जिंकितो भूप ।
त्या पूर्वपुण्य कारण समजा हरि तेंचि दुःख-संताप ॥ १३५ ॥
येतां पूर्वभवाचें उदयाला पुण्य विभव बहु लाभे ।
जातां क्षयास येउनि राहे दारिद्र्य तत्क्षणांत उभें ॥ १३६ ॥
पुण्यक्षयें जहाला विभवें हा इन्द्र रहित कान्तीनें ।
जाणुनि पापा त्यागा सुपुण्य सुनरास उच्च विभवा ने ॥ १३७ ॥
दशमुख पूर्वशुभानें वैभववृद्धीस पावला जाणा ।
प्रबल अरींना नाशुनि खण्डत्रय-भूपवृन्द-खगराणा ॥ १३८ ॥
जाणुनि भव्यजनांनो व्हावें जिनदास पुण्य लाभेल ।
इह-परलोक-सुखाचें श्रीजिनपति सांगतात तें मूल ॥ १३९ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे पद्मपुराणे इन्द्रपराभवाभिधानं नाम द्वादशं पर्व ॥ १२ ॥

## तेराव्या पर्वांतील कथेचा सारांश–

रावणानें इन्द्राला पकडून लंकेस नेलें व कैदेंत ठेविलें. इन्द्राचे वडील सहस्रार-महाराज कांहीं लोकपालासह रावणाकडे गेले व इन्द्राला मुक्त करावें म्हणून रावणाला त्यांनीं विनविलें. रावणानें त्यानें कांहीं काम करण्याचें कबूल केलें तर मी इन्द्राला मुक्त करीन असें म्हटलें. अर्थात् प्रतिदिवशीं लंकानगर झाडून स्वच्छ ठेविलें पाहिजे. प्रातःकालीं लङ्कानगरीच्या सर्व रस्त्यावर सुगंधी पाण्याचा सडा घातला पाहिजे. माझ्या जिनपूजनाच्यावेळीं दररोज फुलांच्या माळा गुंफून तयार ठेवाव्यात असें कार्य करील तर मी त्याला मुक्त करीन. या अटी ऐकल्याबरोबर सर्व लोकपालांनीं माना खालीं घातल्या.

हें पाहून रावणास हसूं आलें. नंतर तो इंद्राच्या पित्याला म्हणाला आपण इंद्राप्रमाणें मलाही पित्यासारखेच आहा. मला आपण पूज्य आहात. आपली आज्ञा इन्द्राप्रमाणें मीही मानीन. इन्द्र माझा चौथा भाऊ आहे असें मी समजतो. त्याच्या साहाय्यानें मी ही सगळी पृथ्वी निष्कण्टक करीन. मी आणि इन्द्र आम्ही दोघे आपले किङ्कर आहोत इन्द्राचें सगळे राज्य मी त्याला परत करितो. इन्द्र येथें राहो अथवा रथनूपुरांत राहो जसें त्याला रुचेल तसें त्यानें करावें. येथें तो राहिल्यास मला अधिक आनंद वाटेल.

रावणा! जशी ही लंका तुला प्रिय आहे तसें आम्हाला रथनूपुर आहे. आमचे सर्व बंधुआदिक चातकाप्रमाणें वाट पाहत आहेत. आम्हाला जाऊ दे. असें सहस्रार-महाराजांनीं म्हटलें व ते इन्द्र व लोकपालासह रथनूपुरास निघून गेले.

पराजयामुळें इन्द्राला अतिशय खिन्नता वाटू लागली. तेथें त्याला बगीच्यांत विहार करणें रुचेना. अन्न गोड लागेना. नेहमीं चिन्तेंत चूर झाला. त्यामुळें त्याचें शरीर कृश झालें व त्याची कान्ति मन्द झाली.

एके दिवशीं जिनमंदिरांत खिन्न होऊन बसला असतां त्याच्या मनांत राज्य त्यागून धर्मसेवनांत उरलेलें आयुष्य घालवावें असा विचार आला व त्याचवेळीं तेथें 'निर्वाणसंगम' नामक ज्ञानी आले. इन्द्रानें त्यांना वन्दन केलें. "प्रभो, मी असें कोणतें पाप केलें होतें कीं, ज्यामुळें रावणापासून मला पराभवाचें दुःख प्राप्त झालें आहे?" असा प्रश्न विचारला. तेव्हां राजन्, पूर्वजन्माची कथा ऐक व प्रस्तुत दुःखाचें कारणही सांगतो- असें म्हणून ते याप्रमाणें सांगू लागले:—

पूर्वभवांत तूं शिखिपद नामक गांवीं 'स्त्री' होऊन जन्मला होतास. तुझें 'कुलकान्ता' असें नांव होतें. ही कुलकान्ता नकटी, चिपडी व रोगी होती. कोणी रक्षण करणारे नसल्यामुळें लोकांचें उष्टें अन्न खाऊन जगत होती. तिला त्या जन्मांत सुख मिळालेंच नाहीं. पण मरणसमयीं मुहूर्तपर्यन्त अन्नपाण्याचा व शरीराचा त्याग केला यामुळें ती एका किंपुरुषदेवाची 'पयोधारा' नामक देवी झाली. तिथें तिला नानाप्रकारचीं सुखें मिळालीं. यानन्तर 'मणिनगरांत' ती धरणी व गोमुख या जोडप्यांना 'सहस्रभाग' या नांवाचा पुत्र होऊन जन्मली. या सहस्रभागानें सम्यग्दर्शन व अणुव्रतांचें निर्दोष पालन केलें. त्यामुळें तो मरून शुक्रस्वर्गांत महर्द्धिकदेव झाला. तेथील आयुष्य संपल्यावर महाविदेहांत रत्नसंचयनगरामध्यें मनु नांवाच्या सचिवाला 'गुणवल्ली' नांवाची सद्गुणी पत्नी होती अर्थात् या दंपतीला तो पुत्र झाला. त्याचें नांव 'सामन्तवर्धन' असें होतें. यानें राजाबरोबर जिनदीक्षा घेतली तीव्र तप केलें व त्यामुळें त्याला ऊर्ध्वग्रैवेयकांत अहमिन्द्रपद प्राप्त झालें. तेथून दीर्घायुष्य भोगून आतां तूं 'इन्द्र' विद्याधर झाला आहेस.

आतां रावणापासून तुझा पराभव झाल्याचें कारण ऐक- अरिंजयनगरांत ज्वलनवेग राजा व वेगवती राणी या उभयतांना अहल्या नामक अत्यंत सुंदर कन्या झाली. तिच्या स्वयंवराच्यावेळीं अनेक राजे आले होते व तूंही तेथें गेला होतास. तिनें चन्द्रावर्तनगराच्या आनन्दमाली राजाला वरिलें. त्याच्याविषयीं तुझ्या मनांत मत्सर उत्पन्न झाला.

कांहीं कालपर्यन्त त्यानें तिच्यासह सुखोपभोग घेतला व एकदा वैराग्य उत्पन्न होऊन तो मुनि झाला. महाव्रतें धारण करून तीव्र तप करूं लागला. एके वेळीं तूं त्या मुनीला पाहिलेंस. पूर्वमत्सर जागृत झाला. तूं त्यांना बांधून ठोकूं लागलास. हें कल्याण नामक ऋद्धिधारक मुनीश्वरानें पाहिलें. 'तुला या कृत्याचें घोर प्रायश्चित्त भोगावें लागेल' असें म्हणून उष्णश्वासांनीं तुला भस्म करण्यास ते सज्ज झाल्याचें तुझ्या पत्नीला दिसून आलें. त्यामुळें हा मोठा अनर्थ टाळण्यासाठीं तिनें त्या मुनीश्वरांना मला पतिभिक्षा वाढा म्हणून विनंति केली. त्याच्या चरणांची तिनें पूजा केली. त्यामुळें त्यांचा क्रोध शान्त झाला.

अशा या अशुभ कार्यानें जो तुला अशुभकर्म-बंध झाला. त्याचा उदय होऊन त्यानें रावणापासून पराभवाचें दुःख तुला भोगावयास लाविलें. यासाठीं साधुजनांचा तिरस्कार करणें, त्यांना शिव्या देणें, त्यांना मारणें, ठोकणें या क्रिया-नरकामध्यें जीवांना दुःख देतात, इहलोकींही अकल्याणाला कारण होतात असें जाणून हीं कार्यें त्यागावीत. साधुजनांच्या चरणांची पूजा करावी. त्यांचें रत्नत्रय वाढावें म्हणून त्यांना आहार द्यावा. त्यांची शुश्रूषा करावी. हीं कार्यें स्वर्ग व मोक्षसुखाला कारण होतात. याप्रमाणें सांगून ते निर्वाणसंगम साधु योग्य स्थानीं निघून गेले.

राजा इन्द्रानेंही विरक्त होऊन आपलें राज्य आपल्या जयन्त पुत्राला दिलें. सर्व परिग्रहांचा त्याग करून महाव्रतदीक्षा घेतली. शरीरावर अत्यंत निःस्पृह होऊन त्यानें तीव्र तप केलें व शुक्लध्यानानें घाति अघातिकर्मांचा नाश करून त्यानें मुक्ति-कन्येचें करग्रहण केलें.

या इन्द्रमुनीश्वराप्रमाणें जे आत्मस्वरूपाची प्राप्ति करून घेतात, त्यांना ज्ञानसूर्याचा प्रकाश मिळतो व ते मुक्तिधनी होतात.

---

# तेरावें पर्व.

( रावण इन्द्रपिता सहस्राराच्या प्रार्थनेनें दयाळू होऊन इन्द्राला कारागृहांतून मुक्त करतो. )

नेलें दशाननानें इन्द्रा ऐरावतासह स्वैर ।
शिबिरीं अपुल्या झाला श्रेणीद्वयखगनृपालपति शूर ॥ १ ॥
अभयाज्ञा सर्वांना देउनि तत्काल थांबवी युद्ध ।
लङ्कानगरीं जाउनि इन्द्रा कारागृहांत करि बद्ध ॥ २ ॥
दिक्पालासह आला भूप सहस्रार जनक इन्द्राचा ।
नमुनि दशग्रीवा कर जोडुनि बोले तयास मृदु वाचा ॥ ३ ॥
तुकडा पाषाणाचा उचलावा त्या समान कैलास ।
तूं उचलिलास दोर्वल्[1]लीलेनें शक्य काय इतरांस ॥ ४ ॥
दोर्वलि दशवदना वा, दुर्वल आम्हास जिंकिलें यांत ।
आम्ही लाजायाचें कारण नच नच घडेल विपरीत ॥ ५ ॥
तुजजवळि याचनेला आलों लज्जा न वाटतें मजला ।
दे सुतभिक्षा वत्सा ! होइल विज्ञप्ति नैव मम विफ[2]ला ॥ ६ ॥
रावण यापरि वदला सोडिन इन्द्रास परि सदि[3]क्पाल ।
कर्म करावें निश्चित होऊं देणें तयांत नच भूल ॥ ७ ॥
प्रतिदिनिं लङ्कानगरीं गृहाङ्गणासम सदैव ठेवावी ।
तृणकाष्ठ-धूलिविरहित अस्वच्छ न ती कदापि राहावी ॥ ८ ॥
प्रातःकालीं प्रतिदिनिं सुगन्ध उदकें समस्त लङ्केंत ।
मेघासमान घालुनि सडा करावी प्रसन्नशी त्वरित ॥ ९ ॥
जिनपूजनादि–कार्यीं सुममाला ग्रथित करुनि ठेवावी ।
या कार्यीं न चुकावें प्रतिदिनिं ऐशीच दक्षता घ्यावी ॥ १० ॥
ऐशीं कार्यें प्रतिदिनिं करील तव तनय त्यास सोडीन ।
देईन राज्य त्याचें प्रमाद घडतां प्रसाद राही न ॥ ११ ॥
यापरि वोलुनि पाही लज्जेनें घातलें स्वमुख खालीं ।
ज्यांनीं दिक्पालांना वदला मुखिं हा[4]सता जया आली ॥ १२ ॥

---

१ बाहुबलानें सहित. २ व्यर्थ. ३ यमादि दिक्पालानीं सहित. ४ हसणें.

होऊन नम्र विनयें दशास्य वदला तदा सहस्रारा ।
हृदय सभेचें हरिलें वचन गमे जें जनां सुधाधारा ॥ १३ ॥
हे तात पूज्य जैसा इन्द्रा मजला हि त्या असे अधिक ।
यास्तव तव आज्ञेला पाळिन मम कर्म हें नसे मूकं ॥ १४ ॥
ताता परमार्थानें नसतिल गुरु जरि तुझ्या समान जगीं ।
जाईल भूमि खचितचि गुरुगिरिमुक्ता विभो अधोभागीं ॥ १५ ॥
मी पुण्यवन्त खचितचि कारण आदेश देति पूज्य मला ।
जो पुण्यरहित असतो पूज्याज्ञा-लाभ होय नच त्याला ॥ १६ ॥
भाऊ इन्द्र असे मम चौथा त्याचें सहाय्य मिळवून ।
ही निष्कण्टक पृथ्वी करीन हे पूज्य घेइ जाणून ॥ १७ ॥
मी आणि इन्द्र आम्ही दोघे तव तात भृत्यें आहोत ।
चूडामणिसम मस्तकिं आज्ञा धारण करूं गुरो सतत ॥ १८ ॥
हे लोकपाल सगळे राज्यहि पूर्वी गुरो जसें होतें ।
इन्द्राचें तें तैसें चालो देईल मजसि मोदातें ॥ १९ ॥
येथें रथनूपुरिं वा इन्द्र करो वास त्या रुचेल जसें ।
उभय हि सुभूमि तुमच्या आम्ही दोघेहि खचित नोकरसे ॥ २० ॥
मानस झालें ओलें पिऊन दशकण्ठवचन-मधुर-जला ।
इन्द्रपित्याचें तेव्हां वदला त्याहून तोहि मधु बोला ॥ २१ ॥
वत्सा हे दशकण्ठा ! असति तुझ्यासम जगांत सज्जन जे ।
लोकाल्हादक सुगुणें जन्म तयांचाच सर्वथा साजे ॥ २२ ॥
आयुष्मन्ता ! दिसतो तव शौर्या विनय हा अलङ्कार ।
शौर्यापेक्षाही तव विनयगुणा वर्णिती बुधप्रवर ॥ २३ ॥
दर्शन तव मज झालें माझ्या जन्मास सफलता आली ।
जननी जनक तुझे वा तव जननें जाहले सुकृतशाली ॥ २४ ॥
असशी समर्थ तरिही अपूर्व आहे क्षमा तुझ्याठायीं ।
निर्मल कुन्दसुमासम कीर्ति तुझी सज्जनास सुखदायी ॥ २५ ॥
कीर्ति क्षमा नि विनयें यांनीं कथिलें समस्त सुजनांना ।
न च दोषलेशही तव ठायीं हें मान्य करिति तद्वचनां ॥ २६ ॥

१ मुकें. २ मोठ्या पर्वतांनीं त्यागलेली. ३ पूज्य पुरुषांची आज्ञा. ४ नोकर. ५ विद्वच्छ्रेष्ठ. ६ पुण्यवन्त. ७ कीर्ति, क्षमा विनयांच्या.

वदलास वचन वत्सा जें तूं कृति वाहु तेचि तव करिती ।
मानस वचन नि कृति तव परस्परांना कदापि नान्तरती[1] ॥ २७ ॥
परि जन्मभूमि आम्हां मातेसम वाटते तिचा त्याग ।
करणें शक्य नसे घा अतिसुखकर वाटतो तिचा योग[2] ॥ २८ ॥
निजभूमि त्यागाया आहो असमर्थ मित्रबन्धु-गण ।
जणु चातकाप्रमाणें पाहत आहेत वाट हे सुजन ॥ २९ ॥
जैशी कुलक्रमानें लंकेत प्रीति वाटते तुजला ।
तैशीच जन्मभूमि-प्रीति असे आमुच्या मनीं अतुला[3] ॥ ३० ॥
यास्तव आम्ही जातो अमुच्या जन्मस्थला महाभागा ।
हे देवप्रिय रक्षी भुवनाभोगी विशाल चिरभोगा ॥ ३१ ॥
वोलुनि ऐसें गेला विजयार्ध-नगांस[4] नृपसहस्रार ।
इन्द्र नि दिक्पालांना घेउन नाना-नयांत[5] जो चतुर ॥ ३२ ॥
जरि लोकपाल अपुल्या स्थानीं जाऊन राहिले तरि ही ।
प्रत्येक जीवनाला अपुल्या यन्त्रासमान मनिं पाही ॥ ३३ ॥
विजयार्धवासि-जनता पाहत असतां मनांत ते होती ।
अतिशय लज्जित आणिक खिन्नपणें करिति ते अधोदृष्टि[6] ॥ ३४ ॥
रथनूपुरांत राही इन्द्र जरी चित्त सर्वदा खिन्न ।
प्रीति न उद्यानामधिं रुचिकर लागे तयास नच अन्न ॥ ३५ ॥
जन अन्यकथामध्यें लावी होऊं नये तया स्मरण ।
परि तें पराभवाचें सोडी त्या दुःख एकहि क्षण न ॥ ३६ ॥
चिन्ता करीत राहे राही उद्विग्नशा दशेंत सदा ।
या मानहानिपेक्षा मानि वरा मृत्यु येइ जरि शतधा[7] ॥ ३७ ॥

( इन्द्र पराभवानें खिन्न होऊन मनांत विचार करितो. )

एके दिवशीं वसला होता तो श्रीजिनेन्द्र सदनांत ॥
खिळली दृष्टि तयाची पराभवें कान्तिहीन अङ्गांत ॥ ३८ ॥
जैसें शारदसमयीं मेघांचा वृन्द होतसे नष्ट ।
तैसें विद्यावैभव गेलें विलया नि वाटती कष्ट ॥ ३९ ॥
तीं शस्त्रें ते हत्ती अतिशय ते शूरसुभट ते घोडे

---

१ सोडून राहत नाहींत. २ संयोग. ३ उपमारहित, अतिशय. ४ पर्वताला. ५ साम-दामादिनीतिमध्यें. ६ नजर जमिनीवर लावतात. ७ शेकडो वेळां.

तृणसम सर्वचि झाले दिसते मज मानहानि चोहिकडे ॥ ४० ॥
कर्मचि विचित्र आहे, समर्थ त्याहून अन्य नच कोणी ।
सर्व बलपेक्षांही कर्मबल श्रेष्ठ हें मना जाणी ॥ ४१ ॥
नाना भोगां होतें देत असे पूर्वकर्म मम गेलें ।
विलया आतां आलें उदयाला अशुभकर्म विभव गळे ॥ ४२ ॥
समरक्षेत्रीं आलें असतें जरि मरण मानहानीचें ।
दुःख प्राप्त न झालें असतें तें जगिं अकीर्तिकर साचें ॥ ४३ ॥
मी शत्रुमस्तकावरि ठेउनि चरणास विक्रमें[1] जगलों ।
परि या घोर दशेनें जिवन्त असुनीहि आज मी मेलों ॥ ४४ ॥
आतां आपण सगळा इहलोक-सुखाभिलाष सोडावा ।
मोक्षपदप्राप्तीचें कारण जो धर्म तोचि जोडावा ॥ ४५ ॥
यापरि विचार असतां करीत 'निर्वाणसङ्गम' ज्ञानी ।
आले श्रेष्ठ मुनीश्वर नृप वदला इन्द्र तत्पदा नमुनि ॥ ४६ ॥

( मुनिराज इन्द्राच्या पूर्वभवाचें वर्णन करितात. )

भगवन् पूर्वभवीं मी पापार्जन कोणतें असे केलें ।
भूपदशास्यापासुनि मज परिभव[2]-दुःख भोगणें आलें ॥ ४७ ॥
तेव्हां मुनिवर वदले ऐक नृपा पूर्वजन्म तव सगळे ।
जेणें प्रस्तुत दुःखप्राप्तीचें अशुभ कर्म सकल कळे ॥ ४८ ॥
नाना-दुःखें भरल्या अशा चतुर्गतिभवांत फिरणारा ।
शिखिपद नामक नगरीं आला मानवगतीस धरणारा ॥ ४९ ॥
दीनस्त्रीत्वा धारण केलें ज्या नाम होय 'कुलकान्ता' ।
होती नकटी चिपडी रोगी कोणी जियेस न त्राता[3] ॥ ५० ॥
अशुभ असा कर्मोदय तेणें खाऊन अन्न जें उष्टें ।
जगली कांहिं दिनीं ती नानाविध भोगिलीं तिनें कष्टें ॥ ५१ ॥
अतिजीर्ण वस्त्र देहीं तेंही होतें अनेक ठिगळांचें ।
केस जिच्या डोईचे रूक्ष नि अतिराठ भूत जणू साचें ॥ ५२ ॥
लोक तिला बहु पीडिति सौख्य जिला लाभलें न केव्हांही ।
अन्न नि देहा त्यागुनि मुहूर्त-समयांत ती मरे पाही ॥ ५३ ॥

१ शौर्यानें. २ पराजयाचें. ३ रक्षण करणारा.

झाली किंपुरुष[1]-स्त्री सुनाम होतें जिचें पयोधारा ।
सुख बहु देवगतीचें भोगी जणु जें असे सुधाधारा ॥ ५४ ॥
नंतर मणिनगरामधिं ' धरणी गोमुख ' अशा सुनामाचे ।
स्त्री-पुरुष सुत तयांना सहस्रभागाख्य धाम[2] विनयाचें ॥ ५५ ॥
झाला तो सम्यक्त्वी अणुव्रतें निरतिचारशीं पाळीं ।
मरुनी शुक्रस्वर्गीं महर्द्धि सुर भोगि विविधसौख्याळी[3] ॥ ५६ ॥
तेथून आयु सरतां महाविदेहीं पुरी असे एक ।
जी ' रत्नसंचया ' या नांवा करिते कधींहि नच मूक ॥ ५७ ॥
मनु नामक सचिवाची ' गुणवल्ली ' सुगुणधारिणी होती ।
भार्या बुद्धि जियेची धर्माचरणीं करी सदैव रति ॥ ५८ ॥
झाला या उभयांना सुपुत्र ' सामन्तवर्धनाख्य ' गुणी ।
भूपासह हा दीक्षित तत्पर झाला महाव्रताचरणी ॥ ५९ ॥
अत्यन्त तीव्र केलें तप जीवादिक पदार्थ[4]-विज्ञानी ।
सोशी परीषहांना सम्यक्त्व[5]-विशुद्धि ठेवि नित्य मनीं ॥ ६० ॥
कोपादिकषायांनीं विरहित साधुनि समाधिमरणास ।
अहमिन्द्र तिथें झाला ऊर्ध्व-ग्रैवेयकांत गुणकोष ॥ ६१ ॥
अहमिन्द्राचें तेथें भोगुनि बहुदिव्य-सौख्य चिरकाल ।
च्युत होउनि रथनूपुरि खगेश झालास इन्द्र तूं प्रबल ॥ ६२ ॥
विद्याधिक मी असुनिहि झालों जित मनिं अनादरा न धरी ।
इन्द्रा ! विषण्ण होउनि परितापा[6] नच कदापि विफल वरी ॥ ६३ ॥
निर्बुद्ध मनुज कोणी कोद्रव पेरून शालि[7] इच्छि वृथा ।
कर्मोचित फल मिळतें जीवांना दवडितात चित्तरथा[8] ॥ ६४ ॥
जें भोगाचें साधन झालें तें क्षीण कर्म पूर्वीचें ।
हेतु न असतां न घडे कार्य असे जाण तू मनीं साचें ॥ ६५ ॥
शक्रा[9], पराभवामधिं निमित्त रावण तुला असे झाला ।
परि याच भवीं केलें कुकर्म जें दावि तेंचि फललीला ॥ ६६ ॥

---

१ व्यंतरदेवांच्या आठ भेदापैकीं सहावा भेद. २ स्थान. ३ नानाप्रकारचे सुखसमूह. ४ जीव, अजीव, आस्रव, बन्ध, संवर, निर्जरा व मोक्ष या सात तत्त्वांचा व पुण्यपापांचा ज्ञाता. ५ निर्मल श्रद्धा. ६ संताप, संक्लेश परिणाम. ७ साळी धान्य. ८ मनोरथ. ९ इन्द्रा.

तूं विभवमत्त होउनि कुकृत्य केलेंस आठवे न कसें ।
मद तो विभवज आठव ज्यानें केलें तुला जगांत हसें ॥ ६७ ॥
तुजला स्मरत नसे तो बहुकालापूर्वि जो असे घडला ।
मी सांगतों तुला वा ऐके एकाग्र करुनि चित्तकला ॥ ६८ ॥
धनधान्य-समृद्धीचें स्थान अशी जी अरिंजया नगरी ।
ज्वलनादिवेगभूपति वेगवतीसह तिथें सुराज्य करी ॥ ६९ ॥
या उभयांना झाली नाम अहल्या जिचें अशी कन्या ।
रूपवती ती रतिसम अन्याललना जिच्यापुढें वन्यां ॥ ७० ॥
आले तिच्या स्वयंवरिं वरणेच्छेनें अनेक खगभूप ।
चन्द्रावर्तपुरीचा आला आनन्दमालि तेवि नृप ॥ ७१ ॥
गेला होतास तिथें तूंही इन्द्रा अतीव रणशूर ।
आनन्दमालि-भूपाविषयीं मत्सर धरून भरपूर ॥ ७२ ॥
कन्या करांत घेउनि वरमाला मण्डपामधे आली ।
आनन्दमालि भूपा पाहुनि मनिं ती प्रसन्न बहु झाली ॥ ७३ ॥
घाली त्याच्या कण्ठीं वरमाला मोद जाहला सकला ।
परि तेधवा तुझ्या मनिं उद्भवली मत्सरानलज्वाला ॥ ७४ ॥
मी असतां कन्येनें अन्या वरणें गमे न हें उचित ।
अपमान घोर माझा झाला समजे स्वकीय-हृदयांत ॥ ७५ ॥
भोगी सौख्य तिच्यासह नृपाल आनन्दमालि बहुकाल ।
एकेसमयीं त्याच्या वैराग्य-लता मनांत धरि मूल ॥ ७६ ॥
घेउनि महाव्रतें तो महामुनीसह करी तपश्चरण ।
विहरत सुरथावर्ताचलिं तपिं रत राहि तो महाश्रमण ॥ ७७ ॥
पाहुनि हे इन्द्रा तूं बान्धुनि त्या ठोकिलें मुनिप्रवरा ।
तन्मनिं कोप न उपजे परि वाहे शान्तिचा अखण्ड झरा ॥ ७८ ॥
'हंसावली' नदीच्या कांठीं 'कल्याण' नामक भ्राता ।
आनन्दमालिमुनिचा महातपस्वी महर्द्धिचा भर्ता ॥ ७९ ॥
प्रतिमायोग तयानें समाप्त केला नि बोलला त्याला ।
अपराधरहित-मुनिवर-पीडा देईल घोर दुःख तुला ॥ ८० ॥

१ ऐश्वर्यानें धुंद. २ ऐश्वर्यापासुनि जन्मलेला. ३ रानटी. ४ मत्सररूपी अग्नीची ज्वाला. ५ तपश्चरणानें प्राप्त झालेल्या अणिमा महिमा वगैरे चमत्कारांचा स्वामी.

यापरि बोलुनि कोपें उष्णश्वासें करावया दग्ध ।
सज्ज जहाला मुनिवर पतिभिक्षा द्या मला प्रभो बुद्ध[१] ॥ ८१ ॥
त्वद्भार्या[२] ' सर्वश्री ' होती सम्यक्त्वशालिनी वदली ।
पूजुनि मुनिपद भावें प्रसन्नता तैं तदीयमनिं आली ॥ ८२ ॥
या साध्वीनें मुनिमन केलें नसतें प्रसन्न त्यावेळीं ।
कोपाग्नीचा झाला इन्द्रा असतास खचित अधम बलि ॥ ८३ ॥
लोकत्रयांत नाहीं वस्तु अशी जी तपा असाध्य असे ।
सर्व-बलांच्या मस्तकिं तपोबल श्रेष्ठ सर्वदा विलसे ॥ ८४ ॥
इन्द्राचें सामर्थ्यहि साधुजनाच्या तपापुढें विफल ।
कर्मक्षय हें करितें देतें साधूस मुक्तिपद विमल ॥ ८५ ॥
साधुतिरस्कार करी मिळतें त्या दुःख मानवा नरकीं ।
जो साधुचरणपूजा करितो लाभे तयास सुख नाकीं ॥ ८६ ॥
जो क्रूरचित्त मानव निर्ग्रन्थमुनीस गालिदान[३] करी ।
त्याला खलकर्मोदय नानाविधयातना भवीं वितरी ॥ ८७ ॥
कायेनें वाचेनें तेवि मनें अशुभ कर्म जो करितो ।
दुःख निकाचित[४] भयकर मानव तो या चतुर्गतीं वरितो ॥ ८८ ॥
पुण्यापुण्यात्मकगति कर्में जाणून सुजन त्या धर्मीं ।
निजबुद्धि सदा लाविति कर्माच्या वार घालिती वर्मीं ॥ ८९ ॥
यापरि पूर्वभवाचें वर्णन ऐकून मुनिमुखांतून ।
वन्दुनि इन्द्र मुनीन्द्रा वदला तो करयुगास जोडून ॥ ९० ॥
नाथा, कुकर्म तें मम या भविं येऊन हाय उदयास ।
रावणयुद्धीं छळिलें तेणें हो दुःख तीव्र हृदयास ॥ ९१ ॥
कर्में येउनि उदया देति शुभाशुभ फलें जना विविध ।
इन्द्रापासुनि कीटापर्यंत न त्या नसे कुठें रोध[५] ॥ ९२ ॥
हे भगवन्ता आपण करुनि कृपा बोधिदान[६] मज केलें ।
आतां पातक सगळें समजे मी त्यजुनि दूर मज गेलें ॥ ९३ ॥
यतिवरसंगें दुर्लभ जगांत नच कोणतीहि वस्तु असे ।
जी लाभली न बहु-भविं यत्संगें निजकरांत बोधि वसे ॥ ९४ ॥

---

१ ज्ञानी. २ तुझी पत्नी. ३ शिव्या देणें. ४ ज्याचा उपशम होत नाहीं व जें फल देतेंच असें कर्म. ५ अडथळा. ६ रत्नत्रयदान.

यापरि बोलुनि वन्दन केलें मुनिवरपदास इन्द्रानें ।
उचित स्थाना मुनिवर गेले इन्द्रहि विरक्त होय मनें ॥ ९५ ॥

( इन्द्र स्वपुत्रास राज्य देऊन मुनि होतो. )

जलवुद्‌बुदाप्रमाणें[1] निःसार मनुष्य-जन्म जाणून ।
निजपातकास निन्दुनि सुस्थिर धर्मांत तो करी स्वमन ॥ ९६ ॥
अपुल्या सुतास देउनि रथनूपुरिं राज्य लोकपालांना ।
घेऊन सर्वें जैनी दीक्षा घेई सुरेन्द्र शान्तमना ॥ ९७ ॥
सर्व परिग्रह सोडुनि समस्त कर्मास नष्ट करणारी ।
दीक्षा घेउनि तप करि करुनि स्वमनास पूर्ण अविकारी ॥ ९८ ॥
नानाभोगें लालित[2] होता जरि देह इन्द्रराजाचा ।
करि तो तथापि दुर्वह[3] इतरां तप निःस्पृहत्व गुण साचा ॥ ९९ ॥
असते महानरांची शक्ति जशी तीव्र रौद्रकर्मांत ।
निर्मलकर्मीहि तशी आढळते ती विशुद्धधर्मांत ॥ १०० ॥
दीर्घतपोऽरणिजन्मा[4] शुक्लध्यानानलांत टाकून ।
कर्मसमिद्गण[5] केलें इन्द्रें मुक्तीन्दिरा-करग्रहण[6] ॥ १०१ ॥
असति महामानव जे भोगुनि चिरकाल विविधसे भोग ।
नाशून सकलकर्मा करून ते घेति मुक्ति-संयोग ॥ १०२ ॥
यांत न अल्पहि विस्मय सकल परिग्रहगणास सोडून ।
ध्यानबलें अघ नाशुनि मोठे नर होति मुक्तिचे रमण ॥ १०३ ॥
अतियोग्य समय लाभे अल्पहि अग्निस्फुलिंग जरि असला ।
गिरितुल्य इँन्धनाला[7] जाळी नच कष्ट वाटतें त्याला ॥ १०४ ॥
यापरि जाणुनि निर्मल निजात्मरूपास सुजन मिळविति जे ।
लाभे ज्ञानरवीचा प्रकाश जिनदास होति शिवराजे[8] ॥ १०५ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे पद्मपुराणे इन्द्रनिर्वाणाभिधानं नाम त्रयोदशं पर्व ॥ १३ ॥

---

१ पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणें. २ नाना भोगोपभोगांनीं पुष्ट केलेला. ३ धारण करण्यास कठिण. ४ दीर्घतपरूपी अरणीच्या लांकडापासून उत्पन्न झालेल्या शुक्लध्यानरूपी अग्नींत. ५ कर्मरूपी समिधांचा समूह. ६ मोक्षलक्ष्मीचा हात धरणें अर्थात् मोक्षलक्ष्मीबरोबर विवाह करणें. ७ पर्वताएवढ्या लांकडांना. ८ मुक्तीचे राजे.

## चौदाव्या पर्वांतील कथेचा सारांश

एके दिवशीं त्रिखण्डेश रावण मेरु-पर्वतावरील जिनमंदिरांत जिनेश्वराचें दर्शन, वन्दन, गुणस्मरण व भक्तीनें अष्टद्रव्यांनीं पूजन करून लंकेकडे परत येत असतां त्याचें विमान पुष्पक हें सुवर्णगिरि नांवाच्या पर्वताजवळ आलें. त्यावेळीं रावणाच्या कानीं गंभीर व मधुर असे शब्द पडले. ते ऐकून त्यानें मारीच प्रधानाला हा ध्वनि कोठून येत आहे असा प्रश्न विचारला. मारीचानें म्हटलें प्रभो, हा ध्वनि कोण्यातरी मुनिवर्याला केवलज्ञान झालें आहे हें सुचवीत आहे व आकाशांतून हा देवसमूह त्यांचें पूजन करण्याकरितां निघाला आहे. त्यांच्या मुखांतून जयध्वनि सारखा ऐकूं येत आहे. असें म्हणून सचिव थांबला व पुनः त्यानें विचार करून म्हटलें कीं, देव, अनन्तवीर्य मुनीश्वरांना केवलज्ञान झालें आहे. सुवर्णगिरि पर्वतावर त्यांची सभा दिसत आहे.

सचिवाचा हा खुलासा ऐकून रावण आपल्या परिवारासह तेथें गेला. त्यांच्या चरणांना वन्दून तो विद्याधराच्या समूहांत बसला. एका मुनीनें उठून व केवलींना वन्दून विनयानें मुक्तिसुखाला कारण काय आहे तें ऐकावें म्हणून हा भव्य जीवसमूह अपेक्षा करीत आहे. आपण त्यांना त्याचा उपदेश करावा असें म्हणून ते मुनि बसले. केवलीनीं त्याचें वर्णन करावयाला प्रारंभ केला.

### कर्मांचें स्वरूप

ज्ञानावरणादिक आठ कर्मांनीं सर्व संसारी जीव अनादिकालापासून बांधले आहेत व ते चतुर्गतींत दुःख भोगीत फिरत आहेत. या कर्मांनीं जीवांचे ज्ञानादिगुण झाकले असल्यामुळें त्यांना हित व अहित समजत नाहीं. स्पर्शादिक पांच विषयांत लंपट होऊन अत्यन्त निंद्य कार्यें जीव करतात. धन, स्त्री आदिकांत लुब्ध

होऊन हिंसा, चोरी आदिक पापें करून नरकादि गतींत दुःखें भोगतात. या जगतांत जेथें प्राणी मेला नाहीं व जन्मला नाहीं असा तिळाएवढाही प्रदेश नाहीं. जे विनयी आहेत, कपटरहित आहेत व जें मिळालें त्यांत सन्तोष ठेवतात ते जीव मरून मनुष्य होतात. मनुष्यांतही अनेक प्रकार आहेत. कोणी आर्य कोणी म्लेंच्छ, कित्येक धनी, कित्येक धनहीन, कांहीं विद्वान, कांहीं मूर्ख, कोणी सुन्दर तर कोणी कुरूप अशी नानाविधता मनुष्यांत भरली आहे.

अनेक प्रकारचीं कार्यें करून सुख मिळावें असें इच्छून अनेक मनोरथ करितात. दैवाला अनुसरून कित्येकांना लाभ व हानि प्राप्त होते. कोणी संयम पाळून देवगतींत जन्मतात व तेथें त्यांना कान्ति, प्रभा व सुख प्राप्त होतात.

कोणी सत्पात्राला दान देऊन भोगभूमींत जन्मतात. तेथें त्यांना दहा प्रकारच्या कल्पवृक्षापासून अनेक प्रकारचीं सुखें मिळतात. अहिंसादि पांच महाव्रतें ज्यांना आहेत व तिळमात्रही परिग्रह ज्यांना नाहीं असे जैन मुनि सत्पात्र होत. जे सम्यग्दृष्टि आहेत पण जे व्रती नाहींत तेही जघन्य पात्र समजावेत. अणुव्रतधारी गृहस्थ मध्यम पात्र समजावें. ज्यांना सम्यग्दर्शनही नाहीं त्यांना कुपात्र समजावें.

एकाच विहिरीचें पाणी उसास दिलें असतां मधुर होतें व निंबाला दिलेलें कडू होतें. तसें सम्यग्दृष्टि, महाव्रती व अणुव्रती अशा पात्रांना ज्ञान, औषध, आहार, संयमाची उपकरणें दिलीं असतां त्या पुण्यानें जीवाला भोग-भूमींत जन्म मिळतो व कुपात्राला दिलेल्या दानानें कुभोग-भूमींत जन्म मिळतो.

अन्य मतांत मांसही दान द्यावयास सांगितलें आहे. व संख्या-त्या मांसांचे प्रकारही सांगितले आहेत. मांस दान करण्यास सांगणारे व त्यांत लुब्ध होऊन तें खाणारें दुर्गतींत जन्मतात.

कित्येकांनीं पशु, बगीचा, घर, शेत हे ही दान देण्याचे पदार्थ सांगितले आहेत व याच्या दानानें पुण्य मिळतें असें म्हणणें दगडांतून पाणी मिळतें असे मानण्यासारखें आहे.

पण हे वरील पदार्थ जिनेश्वराला उद्देशून दिलें तर शिंपींत पडलेलें पाणी जसें मोती बनतें तसे हे दीर्घकाल सुख प्राप्तीस कारण होतात. मनांतील भाव पुण्य पापास कारण होतात. शुभ भावावाचून दान दिलें तर पर्वतावर पडलेल्या पावसाप्रमाणें व्यर्थ होतें.

रागी, द्वेषी, मोही, हातांत शस्त्र घेणारे हे खरे देव नाहींत. त्यांची उपासना

करण्यानें मुक्ति मिळत नाहीं. तीव्राग्नि-सेवनानें तहान नाहींशी होत नसतें. अशा देवाची भक्ति करू नये.

जिनेश्वराचें मंदिर बांधून जिनेश्वराची दीप धूप फलांदिकांनीं पूजा करणें त्यासाठीं दान देणें हें स्वर्ग सुखाला कारण आहे. जे जिनमार्गांत प्रवृत्त आहेत त्यांना योग्य असे वस्त्रादिक देणें विपुल सुखाला कारण होतें.

( धर्म कशाला म्हणावें )

जो दुर्गतींतून काढून जीवाला उत्तम सुख प्राप्त करून देतो तो धर्म होय. त्यालाच जिनधर्म म्हणतात. या धर्माचे मुनिधर्म व गृहस्थधर्म असे दोन भेद आहेत व त्यापासून काय फल मिळतें याचें अनन्तवीर्य केवलीनीं याप्रमाणें वर्णन केलें :—

( मुनिधर्म )

हिंसा, चोरी, खोटें भाषण, मैथुन सेवन व परिग्रह धन, धान्यादिक यांचा पूर्ण त्याग करून जे तप करितात. क्षमा, मार्दव, आर्जव आदिक दहा धर्मांचें पालन करितात. जाणें, बसणें, आहार करणें, मलमूत्रादिक टाकणें यामध्यें जीवांना बाधा न होईल त्यांचा नाश न होईल अशी प्रवृत्ति करितात ते मुनि होत. क्रोध, मान, माया व लोभ हा संसाराचा परिवार आहे असें समजून त्यांचा त्याग करितात ते मुनि होत. या मुनिधर्माच्या पालनानें आत्म्यांत अपूर्व सामर्थ्य प्राप्त होतें. अनेक ऋद्धि प्राप्त होतात. या धर्माला धारण करणारे मुनि सर्व कर्मांचा नाश करून मुक्त होतात. मुनि जगावर फार मोठा उपकार करितात. जीवांना खरा मार्ग दाखवितात. मुनिधर्माचें पालन करणारा जीव स्वर्ग सुखाची प्राप्ति करून घेतो. याप्रमाणें मुनिधर्माचें स्वरूप ऐकून रावणाच्या बंधूनें कुंभकर्णानें गृहस्थधर्माचें स्वरूप सांगा म्हणून केवली भगवंताना विनंति केली तेव्हां त्यांनीं गृहस्थ धर्माचें स्वरूप व भेद सांगितले ते याप्रमाणें—

पुत्र पत्नी आदिकांच्या स्नेहानें जे बद्ध झालेले आहेत ते गृहस्थ होत. त्यांच्या धर्माला गृहस्थ-धर्म म्हणतात. यांचा पांच अणुव्रतें तीन गुणव्रतें व चार शिक्षाव्रतें असा बारा प्रकारचा धर्म आहे.

त्रसजीवांचा वध करण्याचा संकल्प न करणें हें अहिंसाणुव्रत. ज्यापासून जीवपीडा होईल असें स्थूल असत्य न बोलणें हें सत्याणुव्रत. धन हें प्राण आहे म्हणून तें हरण करणें. चोरी न करणें हें अचौर्याणुव्रत, स्वस्त्रीमध्यें संतोष मानणें ब्रह्मचर्यव्रत आणि धनधान्यादिकाचें परिमाण ठरविणें व अधिकाविषयीं निःस्पृह

राहणें यास परिग्रहप्रमाण अणुव्रत म्हणतात. निःस्पृहतेचें फल येथेंच जीवाला मिळतें असें नाहीं परलोकींही तो सुखी होतो.

भद्र व काञ्चन नामक दोन पुरुष मार्गानें चालले होते. त्यांना वाटेंत एक पिशवी पडलेली दिसली. ती घ्यावी असें दोघांना वाटलें दोघांनीं ती घेतली. भद्रानें त्या पिशवींतून फक्त एक रुपया काढून घेतला त्यानें आपल्या लोभाला आळा घातला व काञ्चनानें सर्व पिशवीच घेतली. तो फार लोभी होता. रुपयांच्या मालकानें माझी पिशवी काञ्चनाला सांपडली आहे तो मला देत नाहीं म्हणून तक्रार केली. राजानें काञ्चनाला दण्ड केला व पिशवी ज्याची त्याला मिळाली. भद्रानें आपण होऊन रुपया राजाकडे आणून दिला तेव्हां राजानें त्याच्या निःस्पृहपणाची स्तुति करून त्याचा त्यानें आदर केला. यास्तव क्षुद्र मनुष्यही या गुणामुळें आदरणीय होतो. म्हणून हीं पांच अणुव्रतें पाळणारा गृहस्थ आदरणीय होतो असें समजावें.

१ अनर्थ दण्डव्रत– प्रयोजनाशिवाय पाणी वगैरेचा वापर करणें, व्यर्थ गवत तोडणें, व्यर्थ अमुकाचा विजय होवो अमुकाचा पराजय होवो इत्यादिक चिन्तन हें सर्व अनर्थ दण्ड आहेत त्याचा त्याग करावा. २ दिग्व्रत– दिशा व विदिशांचें प्रमाण करून लोभाला आळा घालणें. ३ भोगोपभोग परिमाण– अन्नादिक भोग व वस्त्रादिक उपभोग यांचें संख्यांचें प्रमाण करून तें न उल्लंघणें. अशीं तीन गुणव्रतें आहेत. १ सामायिक हा संसार अशरण आहे, अशुभ आहे व दुःखद आहे व मोक्ष रक्षक आहे, शुभ आहे व सुखदायक आहे. मोक्ष आत्म्याचें शुद्ध स्वरूप आहे असा विचार करणें. २ प्रोषधोपवास– अष्टमी चतुर्दशी दिवशीं उपवास करून सप्तमी नवमी दिवशीं तसेंच त्रयोदशी पौर्णिमा अमावस्येला एकाशन करणें यास प्रोषधोपवास म्हणतात. या दिवसांत सामायिकांत अधिक वेळ घालवावा. धर्मकथा करण्यांत वेळ घालवावा. ३ अतिथिसंविभाग पात्राला आहारादिक दान देणें. ४ सल्लेखना– आयुष्याच्या क्षयाचें वेळीं अर्थात् मरणसमयीं कषाय व शरीर कृश करून पञ्चपरमेष्ठीचें चिन्तन करीत प्राण विसर्जन करणें हें चौथें शिक्षाव्रत आहे. गृहस्थानें मद्य, मांस, मधु, वेश्या व रात्रीं भोजन यांचा त्याग करावा. शील, सम्यग्दर्शन, साधूंना दान देणें ही कर्तव्यें न करणारा श्रावक संसारसमुद्र कसा तरून जाईल ? रात्रिभोजन त्याग, वगैरे नियमापैकीं एकादाही नियम ज्याला नसेल तर तो गृहस्थ फुटक्या कुंभासारखा समजावा. इत्यादिक उपदेश ऐकून सर्व सभा आनन्दित झाली. कित्येकांनीं सम्यग्दर्शन धारण केलें, कोणी अणुव्रतें धारण केलीं.

यानंतर धर्मरथ मुनिराज रावणाला याप्रमाणें बोलले. राजन् तूं या धर्मरत्नाच्या

द्वीपांत आलेला आहेस. येथून तूं आपल्या शक्तीस अनुसरून एकादें तरी नियमरत्न घ्यावेस. एकादा नियम घेणें तुला कठिण जाणार नाहीं. रावण विचार करूं लागला माझें मन अतिशय चञ्चल व भोगलोलुप आहे. जरी माझा आहार मद्य मांसादिकांनीं रहित अति पवित्र आहे तरी गृहस्थाच्या हिंसादि पांचविरति पैकीं एकादि विरतिही घेण्यास असमर्थ आहे. मी कोणतें तपोव्रत धारण करण्यास समर्थ जरी नसलों तरीही मी एक नियम पाळूं शकेन. "जगांत अशी स्त्री नाहीं कीं जी मला पाहून वश होणार नाहीं. यास्तव अन्यस्त्रीला बलात्कारादिकांनीं वश करून तिचें सेवन करणार नाहीं." असें व्रत मी घेईन असा रावणानें मनांत विचार केला व तो म्हणाला, भगवन् जी मला इच्छित नाहीं अशा परस्त्रीचें मी सेवन करणार नाहीं. हें व्रत मी घेतों असें म्हणून त्यानें तें व्रत घेतलें.

कुंभकर्णानें 'दररोज प्रातःकालीं शुचिर्भूत होऊन जिनेन्द्राची अभिषेकपूर्वक पूजा करीन व निर्ग्रन्थ मुनिश्वराला पूजा पूर्वक आहार देईन नंतर मी जेवीन. असा नियम व इतरहि अनेक नियम त्यानें घेतले नंतर ते दोघे केवलींना वंदन करून लंकेला निघून गेले.

# चौदावें पर्व

एके दिनीं दशानन मन्दरगिरिवरि जिनेन्द्र-बिम्बास ।
वन्दन करावयाला गेला जें देइ सौख्य-कन्दास ॥ १ ॥
भक्ति-प्रसन्न-हृदयें दर्शन वन्दन तथा गुणस्मरण ।
अष्टद्रव्यें पूजन करून ठेवून हृदयिं जिनचरण ॥ २ ॥
पुष्पक यानीं बैसुनि येतां मार्गी गभीर मधुर-रव ।
कानीं पडतां सचिवा पुसे तदा तो त्रिखण्डभूमिधव[1] ॥ ३ ॥
मारीचा सर्व दिशा नानारंगें मनास मोहविती ।
माझ्या कर्णयुगाला हे अश्रुतपूर्व[2] शब्द लोभविती ॥ ४ ॥
केवल बोध जहाला देवा कोणा महामुनीशास ।
पूजन त्याचें करण्या गमन करी देववृन्द सोल्हास ॥ ५ ॥
त्यांच्या मणिभूपांचा[3] प्रकाश पसरे अनेक रङ्गांचा ।
देवांचा हा जयरव भासे जणु घोष जलतरङ्गांचा ॥ ६ ॥
श्रमणा अनन्तवीर्या सुवर्णगिरिवरि सुकेवलज्ञान ।
उत्पन्न जाहल्यानें जात असे वन्दनार्थ देवगण ॥ ७ ॥
सचिवाच्या त्या ऐकुनि वचना रावणा आनन्द झाला ।
गेला मुनिवर्याच्या सभेंत तद्वन्दना करायाला ॥ ८ ॥
करुनि नमस्कार स्तुति उदात्त भक्तींत लीन करुनि मना ।
स्वीकारी खगनृपगणिं जाउनि रावण निजोचित स्थाना ॥ ९ ॥
धर्मोपदेश केला मुनिवर्यें तो समस्त ऐकून ।
रावण सुदृष्टि-भावित[4] झाला आनन्द-सागरीं मग्न ॥ १० ॥
नृसुरस्तुत मुनिवर्या वदले मुनि एक हात जोडून ।
धर्मा-धर्मफलाला जाणाया इच्छितात हे सुजन ॥ ११ ॥
भगवन् मुक्तिसुखाला आहे कारण जगांत हो काय ? ।
हें सर्व जाणण्याला उत्सुक दिसतो नृदेव-समुदाय ॥ १२ ॥
नन्तर सर्व हितप्रिय निर्मल विपुलार्थ[5] सुमित[6] शब्दांत ।
केला उपदेश तयें ज्याला वाखाणिती सदा सन्त ॥ १३ ॥

---

१ त्रिखण्डांचा स्वामी. २ पूर्वी न ऐकलेलें. ३ रत्नालंकारांचा. ४ सम्यग्दर्शनाच्या भावानें संस्कृत. ५ पुष्कळ अर्थ ज्यांत भरलेला आहे. ६ थोडके.

( कर्मांचें वर्णन. )

कर्में अनादि असती ज्ञानावरणादि आठ भेदांची ।
बद्ध जयांनीं फिरती चतुर्गतीं जीव दुःख ज्या जाची ॥ १४ ॥
या कर्मावरणांनीं आत्म्याची शक्ति झांकली जाते ।
तेणें हिताहिताचें स्वरूप समजे तयास बोधशतें ॥ १५ ॥
लक्षावधि योनीमधिं जैशीं ज्या प्राप्त इन्द्रियें होतीं ।
अनुभव तैसा मिळतो सुखदुःखीं त्या वदे जनास यति ॥ १६ ॥
रागी द्वेषी मोही होउनि अतितीव्र-मन्द-मध्यपणें ।
करिती जीव चतुर्गतिमध्यें चक्रा[1]समान कुभ्रमणें ॥ १७ ॥
ज्ञानावृति-कर्मोदय[2] होतां स्वहितास जीव नच समजे ।
दुर्लभ अतिशय मानव जन्मानें तो जरी जगीं साजे ॥ १८ ॥

( हिंसादिक पापाचें फल. )

स्पर्शरसेन्द्रिय-लम्पट होउनि अतिनिन्द्य कार्य करितात ।
जेणें पातकभारें नरकसमुद्रांत जीव बुडतात ॥ १९ ॥
होउनि धनादिकामधिं लुब्ध नि निष्करुण[3]-चित्त घात करी ।
जननी-जनकसुतादिक जीवांचा नच विवेक हृदयिं धरी ॥ २० ॥
गर्भस्था[4] बालांना वृद्धां तरुणां नरां नि नारींना ।
तीव्र क्रूर क्रोधें होउनि नर मारितात पक्षिगणां ॥ २१ ॥
स्थल-जलजंन्तुविघातें सुधर्म लाभे मनांत समजून ।
जे जन्तुघात करिती त्यांचें नरकांत होतसे जनन[5] ॥ २२ ॥
जे बोलती असत्यचि परधन-हरणांत लाविती चित्त ।
बहुघोर-वेदनाकुल अशरण होऊन जाति नरकांत ॥ २३ ॥
पिळति मधाचें पोळें वनास जे आग लाविती कुनर ।
हिंसा करिती धीवर[6] पापी त्या बोलती बुधप्रवर ॥ २४ ॥
जे मांस ज्या प्रकारें भक्षण करितात मनुज नरकांत ।
नारक त्यांना भक्षिति तशा प्रकारें असेचि हें विदित ॥ २५ ॥
बह्वारम्भ[7]परिग्रहिं ज्यांचें आसक्त जाहलें हृदय ।
परिणाम तीव्र ज्यांचे नरकीं ते जन्मतात नर अदय ॥ २६ ॥

---

१ चाकाप्रमाणें. २ ज्ञानावरण कर्माच्या उदयानें. ३ निर्दयमनाचा. ४ माते वगैरे. ५ जन्म. ६ मासे मारणारे. ७ हिंसक कामें.

साधुद्वेषा करती पापी मिथ्यात्व सतत आचरती ।
रौद्रध्यांना[1] वरिती जन नरकिं दुःखसागरा भजती ॥ २७ ॥
शब्दस्पर्शरसादिक-विषयीं आसक्ति आणि मायेस ।
करिती जीव जगीं ते होतात प्राप्त पशु अवस्थेस ॥ २८ ॥
ज्यांनीं अन्योन्यांचा विनाश केला अनेक शस्त्रांनीं ।
त्यांना पशुपर्यायीं विनाश तैसा मिळे गणा स्वमनीं ॥ २९ ॥
संसारीं भ्रमतांना जीवांचा जन्म जाहला न जिथें ।
वा मृति तिलप्रदेशहि नाहीं वदती जिनागम-ज्ञाते ॥ ३० ॥
विनय जयांच्या चित्तीं कपट नसे तेवि लब्ध[2] सन्तोष ।
ऐसे मरुनि प्राणी मानव होतात सुगुणगण-कोष ॥ ३१ ॥
मोहित होउनि मानव परमसुखा हेतु सोडिती धर्मा ।
क्षणिक-सुखासाठीं ते आचरिती दुःखदायि अघकर्मा ॥ ३२ ॥
हो प्राप्त पूर्व कर्मे आर्यपणा म्लेंच्छता तशी जीवा ।
होतो श्रीमन्त कुणी दरिद्रता ये कुणास अधनभवा ॥ ३३ ॥
कर्मे वेष्टित होउनि करिती नाना मनोरथा कोणी ।
परि सफलता न येते राहि पराधीनताचि त्या जाणी ॥ ३४ ॥
कोणी कुरूप असती परि असती सर्वदा धनस्वामी ।
कोणी निर्धन असती सुन्दरता प्राप्त होय त्या नामी ॥ ३५ ॥
दीर्घायुष्य कुणाला कोणी अति अल्पकाल जगतात ।
इच्छित मिळतें कोणा कोणाचें होय नष्ट हस्तगत[3] ॥ ३६ ॥
कोणी स्वामी होउनि आज्ञा करितात धरिति शिरिं कोणी ।
कोणी रणांत जाती कोणी तुडविति समस्त ही धरणी ॥ ३७ ॥
जलपर्यटना[4] करिती शेतीं बीजास पेरिती कोणी ।
या नानाविध कार्यीं दैवा अनुरूप लाभ वाहा नि ॥ ३८ ॥
या नाना कार्यांतहि सुखदुःखांची विचित्रता दिसते ।
परि हें दुःखचि सगळें सुख सङ्कल्पांत सर्वदा असतें ॥ ३९ ॥
कोणी सरागसंयम कोणी संयम असंयमा वरिती ।
निष्काम निर्जरा कुणि बालतपश्चरण[5] मनुज कुणि करिती ॥ ४० ॥

---

१ हिंसादिक पापकार्यांचें अखण्ड चिन्तन. २ जें मिळालें तेवढ्या धनांत संतोष. ३ हातांत असलेले धनादिक. ४ समुद्र नदी यांच्यांतून प्रवास. ५ पञ्चाग्नि तप आदिक.

ऐशा या आचरणें चतुर्णिकायांत देवपण कोणा ।
कोणी महार्द्धिधारी कोणा अल्पर्द्धिधारिता जाणा ॥ ४१ ॥
कान्ति, प्रभाव[1], लेश्या[2], स्थिति[3], सुख, अभिमान आदि हेतूंनीं ।
ते देव कर्मसंग्रह करून फिरतात घोर भवविपिनीं[4] ॥ ४२ ॥
अरघट्टघटी[5] फिरतें यन्त्र जसें या चतुर्गतींत सदा ।
तैसें प्राणी फिरती त्यांना विश्रान्ति-लाभ नैव कदा ॥ ४३ ॥
संकल्प अशुभ दुःखा प्रसवे परि शुभ सुखास जीवाचा ।
अष्ट-प्रकार-कर्मक्षयें[6] मिळे मोक्ष हीच जिनवाचा ॥ ४४ ॥

( दान व पात्रापात्राचें वर्णन )

देऊन दान देखिल पात्रविशेषास भोग भूभोग ।
मिळविति जेथें कल्पद्रुम-सौख्यें आणि देह नीरोग ॥ ४५ ॥
पूर्ण अहिंसा-पालक चोवीस परिग्रहांस सोडून ।
रागद्वेषां त्यागिति उत्तम सत्पात्र त्यास वदति जिन ॥ ४६ ॥
सम्यग्दर्शन निर्मल ज्याचे परि जो तपा न आचारी ।
पात्र तया हि म्हणावें मिथ्या श्रद्धान निश्चयें वारी ॥ ४७ ॥
मिथ्यात्वादि-विपत्तीहुनि जे वारुनि सुरक्षणा करिती ।
सम्यग्दर्शन-योगें भव्यांच्या जे भवश्रमा हरिती ॥ ४८ ॥
उत्तम सन्मुनि ऐसे निर्मल दर्शन नि बोध-चारित्रें ।
असतात युक्त नित्यचि त्यांचीं गात्रें[7] पवित्र जिनसूत्रें ॥ ४९ ॥
मानीं अपमानीं ही समान जे असति सौख्य-दुःखांत ।
तृण काञ्चन सम वाटें जिननाम वसे सदैव सुमुखांत ॥ ५० ॥
तीव्र तपीं जे तत्पर तत्त्व-ध्यानांत ठेविती स्वमन ।
ते श्रमण पात्र उत्तम भव्य तयांच्या पदां करो नमन ॥ ५१ ॥
त्यांना भावें द्यावें निजशक्तीचा विचार अनुसरुन ।
अन्नादिक उपयोगी भव्यांचें तें करील कल्याण ॥ ५२ ॥
उत्तम शेतामध्यें पेरियलें बीज विपुल फल देतें ।
शुद्धमनें सत्पात्रीं दान दिलें इष्ट सुफल-दायी तें ॥ ५३ ॥

---

१ उपकार अपकार करण्याची शक्ति. २ कषाय युक्त मन वचन शरीरांची प्रवृत्ति. ३ आयुष्य. ४ संसारवनांत. ५ रहाटगाडगें. ६ ज्ञानावरण, दर्शनावरण, वेदनीय, मोहनीय, आयु, नाम, गोत्र व अन्तराय या आठ कर्मांच्या नाशानें. ७ शरीरें.

भरले जयांत रागद्वेषादिक तें न पात्र मानावें ।
फललाभाची इच्छा विफलचि ऐसें मनांत नित ध्यावें ।। ५४ ।।
खारट शेतामध्यें बीजा अङ्कुर कदापि नच येतो ।
मिथ्यादृष्टि कुपात्रीं देतां फललाभ सर्वही जळतो ।। ५५ ।।
एका विहिरीचेंही पाणी देतां उसास मधु होतें ।
निम्ब-वनातें देतां सगळें अतिकडुपणास पावे तें ।। ५६ ।।
एका सरोवरांतिल पिऊन जल गाय मधुर दुग्धा दे ।
सर्प प्राशन करितां विषपरिणति त्यास घोर बहु लाभे ।। ५७ ।।
सम्यग्दर्शन-भावित पात्रीं भावें दिलें असे दान ।
तें शुभफलास कारण होतें ऐसें जिनागमीं वचन ।। ५८ ।।
मिथ्यादर्शन-युक्ता शुभाशुभा तें फलास देत असे ।
यास्तव मिथ्यात्वामधिं संसारभ्रमण-हेतुताचि वसे ।। ५९ ।।
दीनान्धादिक लोकां करुणेनें दान द्यावया कथिलें ।
फल त्याचें जरि नोत्तम[1] दुःख हरायास तें असेचि भलें ।। ६० ।।
धर्मस्वरूप कथिती अन्यमतीं आपणास अनुकूल ।
तो धर्म परीक्षावा हितेच्छु-मनुजें नितान्त शुभशील ।। ६१ ।।
जे आपणा समानचि कामक्रोधादियुक्त आहेत ।
त्यांना देण्यापासून फलभोग न कोणताहि वडतात ।। ६२ ।।
मिथ्यामत-प्रभावित होउनि सर्वत्र दान जे देती ।
मोही जन ते बनले हिताहितीं नच विचार तच्चित्तीं ।। ६३ ।।
जें मिष्ट नि बलदायी मांस असे भक्ष्य सांगती पापी ।
संल्यांहि[2] कथिति त्यांची पापांची त्या वदा तुम्ही वापी[3] ।। ६४ ।।
ते प्रेरिति दात्यांना मांसीं होऊन लुब्ध भक्षिति तें ।
दात्यासह ते जाती नरकीं बहु घोरवेदनीं दुरितें ।। ६५ ।।
जे आपणास मानिति ऋषि कथिती जीवदान युक्त न तें ।
पशुलम्पटां तयांना जिनागमीं निंद्य मानिति ज्ञाते ।। ६६ ।।
दान पशूंचें केलें असतां ताडन नि भार वाहून ।
दुःख तयाला देती म्हणून हें दान योग्य गमतें न ।। ६७ ।।

---

१ न उत्तम. २ सायाळ, घोरपड, गेंडा, कासव, ससा व ज्यांना पांच नखें आहेत असे प्राणी भक्ष्य आहेत असे जे अन्यधर्मीय म्हणतात ते पापी होत. ३ विहीर.

उद्यान शेतवाडा देण्यांत हि जीव पीडिले जाती ।
म्हणुनि न पुण्या कारण पाषाणांतून नैव उदकाप्ति[1] ॥ ६८ ॥
सर्व प्राण्यां द्यावें सुजनानें अभयदान नि ज्ञान ।
औषध अन्न नि वस्त्रें जें प्रासुकें[2] ज्यांत जीव पीडा न ॥ ६९ ॥
निन्दित दान हि होतें प्रशंसनीयचि विशिष्ट पात्रानें ।
शिंपीत पतित पाणी मोत्यें बनतें जसें सुनियमानें ॥ ७० ॥
उद्देशून जिनांना पशु[3] भूम्यादिक[4] दिले जरी भावें ।
देतात दीर्घकालिक भोगादिक हें मनीं सदा ध्यावें ॥ ७१ ॥
भाव मनांतिल कारण जीवांना होति पुण्य-पापास ।
त्या वांचुनि दानाला गिरिवरि[5] वर्षासमानता खास ॥ ७२ ॥
सर्वज्ञ वीतरागा जिनेश्वराला मनांत ठेवून ।
देणें दान तयाचें फल वर्णायास कोण हो निपुण ॥ ७३ ॥
करिशस्त्र-ग्रहणानें द्वेषाची सिद्धि अन्य देवांत ।
रागिपणा स्त्रीभूषण-सम्पर्कें प्रगट होतसे खचित ॥ ७४ ॥
राग-द्वेषा पाहुनि मोह तयामधि अवश्य जाणावा ।
मोहचि त्याचें कारण त्याविण ते[6] पावती न दृढभावा ॥ ७५ ॥
जे दोष शेष असती समस्त ते मोहमयचि आहेत ।
हे देव दान-कारण नसति भवभ्रमण-हेतु होतात ॥ ७६ ॥
मन्द कषाय जयाचे काला देशादिकास अनुसरुन ।
ते नर याहुनि पूज्यचि ऐसें सांगे जनास जैन जन ॥ ७७ ॥
रागी-द्वेषी-मोही देव न हे दानविषय[7] होतात ।
अधम हि जन तत्तुल्यचि ते हि न कां मधुर सुफल देतात ॥ ७८ ॥
शुभ कर्मांचा दिसतो यद्यपि यांच्यांत उदय-हेतु न हे ।
मोक्षा कदापि होती भवभ्रमायास-हेतु हे पाहे ॥ ७९ ॥
तीव्राग्निसेवनानें तृष्णेचा[8] नाश केवि होइल ? ।
वाळू पिळून कधिही तैलेच्छा होय केवि ती सफल ? ॥ ८० ॥

---

१ दगडांतून पाणी मिळत नाहीं. २ ज्यांत जीववध नाहीं असे अन्नादिक. ३ गाय वगैरे. ४ शेत, घर, दुकान वगैरे. ५ पर्वतावर पाऊस पडल्याप्रमाणें. ६ राग-द्वेषादिक. ७ दान देण्यास योग्य अर्थात् पात्र. ८ तहानेचा.

जरि पंगु पांगळ्याला समर्थ देशान्तरास न्यायास ।
होइल राग-द्वेषी देवापासुनि हि सुफल सविशेष ॥ ८१ ॥
हे पाप-कर्मकारी देव कदापि न सुपात्र होतात ।
तद्भक्त केवि होतिल पात्र असा ह्या विचार चित्तांत ॥ ८२ ॥
लोभप्रेरित होउनि पापी यज्ञीं प्रवृत्त होतात ।
असतां करीत यज्ञा जनहि तया द्रव्य सतत देतात ॥ ८३ ॥
यास्तव जिनेश्वराच्या उद्देशें दान जें दिलें जातें ।
तें सर्व दोषविरहित महाफलाला अवश्य कीं देतें ॥ ८४ ॥
व्यापारासम तेथें अल्प नि वैपुल्य[1] पाहणें पडतें ।
बहु अल्पाचा करिते वस्तु पराभव असें सदा घडतें ॥ ८५ ॥
ज्या परि विषकण झाला सरोवरा प्राप्त त्या न बिघडवितो ।
जिनधर्मोद्यत जीवा हिंसालेश न अघास वितरी तो ॥ ८६ ॥
प्रासादादिक यास्तव बान्धावे श्रीजिनेशभक्तीनें ।
धूपप्रदीपमालादिक[2] देति महाफलास सुज्ञ म्हणे ॥ ८७ ॥
दान जिनोद्देशानें देतां स्वर्गीं मनुष्यलोकांत ।
जीवास भोग मिळती उन्नत अत्यन्त वदति जन सन्त ॥ ८८ ॥
जिनमार्गीं जे असती प्रवृत्त त्या दान योग्यसें द्यावें ।
तें विपुलभोग देतें दात्याची सुगुणपङ्क्ति जगिं धावे ॥ ८९ ॥
सम्यग्दृष्टि नरांना भक्ति नि शक्तीस हृदयिं ठेवून ।
देणें दानचि राहे चोरें लुटिलें अवश्य इतर गण ॥ ९० ॥
ज्ञानाच्या साम्राज्यीं केवल हा बोध सर्वदा राहे ।
तेणें निर्वाणाचा सुलाभ सुध्यान लाभतां पाहे ॥ ९१ ॥
अवशिष्ट सर्व कर्में विनष्ट होऊन जीव निर्बाध ।
सौख्य ज्ञान नि दर्शन अनन्त मिळतात ज्या नसे रोध ॥ ९२ ॥
अशरीर सिद्ध असती निजस्वभावस्थ लोकशिखरांत ।
आपत्तिरहित राहति वक्तव्याभाव राहतो त्यांत ॥ ९३ ॥
तृष्णा ज्याची अतिशय ते दुःखाग्नींत होरपळतात ।
पुण्यजलाविण भविं या त्यांना सङ्क्लेश तीव्र होतात ॥ ९४ ॥

---

१ पुष्कळपणा. २ धूप, दीप, पुष्पमालादिक.

मिथ्यादर्शनवश ते पातक तिमिरांत चाचपडतात ।
परि धर्मसूर्य किरणें यथार्थ-बोधास होति ते प्राप्त ॥ ९५ ॥
अशुभ नि लोहविनिर्मित अधर्मपञ्जर तयांत रुद्ध वसे ।
आशावश हा मानव धर्माचरणेंचि मुक्त होत असे ॥ ९६ ॥
श्रीलोकबिंदु सारीं विशद असा अर्थ धर्म नांवाचा ।
सांगितला तो येथें कथितो ध्यानांत घ्या तुम्ही साचा ॥ ९७ ॥

( धर्मलाभ शब्दाची व्याख्या )

हा धर्म शब्द धारण अर्थी निष्पन्न जाहला आहे ।
धृ प्रकृति नि म प्रत्यय धर्म असे रूप वदति बुध पाहे ॥ ९८ ॥
उत्तम जो आचरितां असंख्यजीवास दुर्गतीमध्यें ।
पडतां उद्धरि कथिला जातो तो धर्म आगमीं शुद्धें ॥ ९९ ॥
लभिधातु प्राप्त्यर्थी असे नि ती प्राप्ति वदति संपर्क[१] ।
त्या धर्माच्या लाभा वदती जिनधर्म-लाभ जिन अर्क[२] ॥ १०० ॥
श्रीमज्जिनेश्वराचा सांगितला धर्म मी समासानें ।
तत्फलभेदासह[३] तो कथितो ऐका तुम्ही सुशान्त मनें ॥ १०१ ॥

( व्रतें, समिति, गुप्ति, दशधर्म व तप यांचें वर्णन )

हिंसा भाषण असत्य चोरी मैथुन हीं चार ।
धनादितृष्णा[४] पाप पांचवें दुर्गतिचें द्वार ॥ १०२ ॥
विरक्त होणें यापासुनि जें व्रत त्या म्हणतात ।
धारण करणें तयास हितकर आगमि वदतात ॥ १०३ ॥
जाणें, वदणें, अन्ना घेणें, घेणें[५], नि त्यजणें ।
मलमूत्राचें क्षेपण ऐशीं कार्यें हीं करणें ॥ १०४ ॥
जीवां बाधा न होय ऐशी चिन्ता ठेवून ।
प्रवृत्ति करणें समिति तयाला वदती विबुधगण ॥ १०५ ॥
पालन करणें या समितींचें यत्नें साधूनें ।
निरारम्भता अपरिग्रहता साधूचें जगणें ॥ १०६ ॥

---

१ जीवाबरोबर धर्म एकरूप होणें याला धर्मलाभ म्हणतात. २ सूर्य. ३ त्या धर्माचीं फलें व त्याचे भेद. ४ धन धान्यादिकांचा लोभ. ५ शास्त्र, कमण्डलु वगैरे जमिनीवर ठेवतांना किंवा घेतांना जीवांना बाधा न देणें.

वचन मनाची निजदेहाची प्रवृत्ति जी त्यजणें ।
कोमलता या असणें तिजला गुप्ति असें वदणें ॥ १०७ ॥
ठेवुनि आदर या गुप्तींच्या आचरणा करणें ।
संसारांतुनि जीवा रक्षिति गुप्ति तया वदणें ॥ १०८ ॥
क्रोध मान मनिं माया लोभ हि कषाय हे चार ।
महाशत्रु हे या जीवाचे संसृति-परिवार ॥ १०९ ॥
फिरविति जीवा चतुर्गतीमधि सिद्धावाचून ।
संसारी जे जीव तयांना हेचि भयस्थान ॥ ११० ॥
क्षमा मार्दवें सरळपणानें ममता त्यागानें ।
क्रोधादींचा निग्रह करणें आगम मनिं धरणें ॥ १११ ॥
व्रतादिकांना धर्म म्हणावें त्यागहि धर्म असे ।
दान तयाला म्हणती सगळे वर्णन येथ दिसे ॥ ११२ ॥
स्पर्शन रसना नाक नेत्र हे कान अशीं पांच ।
असतिं इन्द्रियें तया जिंकणें धर्म असे वाच ॥ ११३ ॥
अन्न नि पान नि खाद्य लेह्य हे चारचि आहार ।
त्याग तयाचा करणें अनशन तप वदती चतुर ॥ ११४ ॥
उणें जेवणें[1] दाता[2] आदिक सङ्कल्पा करणें ।
त्याग रसांचा[3] एकान्त-स्थलिं शयनासन[4] भजणें ॥ ११५ ॥
काय-क्लेश हि सहा तपें हीं बाह्य तया नाम ।
आध्यात्मिक तप वाढायास्तव हीं सुन्दर धाम ॥ ११६ ॥
प्रायश्चित्त नि विनय नि वैयावृत्त्य, स्वाध्याय ।
व्युत्सर्गासह वरध्यान हें अन्तस्तप होय ॥ ११७ ॥

[ या धर्मांचीं विविध फळें व सामर्थ्य ]

भेद तयांचे जितके होती धर्म तया नाम ।
या धर्मांनीं जीवां मिळतें मुक्तिश्री-धाम[5] ॥ ११८ ॥
या धर्मानें भव्य जीव जे निष्कर्मा[6] होती ।
अद्भुत येते बल देहामधि वर्णु किती महती ॥ ११९ ॥

---

१ अवमोदर्य. २ वृत्ति परिसंख्यान तप. ३ रसपरित्याग तप. ४ विविक्त शय्यासन. ५ मोक्षलक्ष्मीचें घर. ६ पापकर्म व पुण्यकर्मांनीं रहित.

समर्थ होतो उपदेशाया नरसुर-खगनाथा ।
लोकाकाशा रोधाया ही सद्वैक्रियपन्था ॥ १२० ॥
त्रैलोक्याला एका घासीं गिळावया क्षमता ।
येते धर्मे या जीवाच्या ठायीं अद्भुतता ॥ १२१ ॥
नष्ट करी हा सुधर्म जगतीं रविकर-सन्तापा ।
शीतपणा ही हरि चन्द्राचा निर्विष करि सापा ॥ १२२ ॥
जलवृष्टीनें समस्त जगतां हा टाकी भरुन ।
आनन्दाचे वाहवि वारे सुखी करी पूर्ण ॥ १२३ ॥
धर्म करी हा योगिजनामधिं सामर्थ्य प्रगट ।
क्रोधें करिती भस्म जगाला देती बहु कष्ट ॥ १२४ ॥
मेरुपर्वता जेणें योगी उचलूं शकतात ।
सर्व समुद्रां पृथ्वीवरती पसरविती त्वरित ॥ १२५ ॥
ज्योतिश्चक्रा उद्धाराया इन्द्रादिक-हृदयीं ।
भीति रचाया समर्थ होती होउनि मनिं अदयी ॥ १२६ ॥
प्रसन्न होतां रत्नकाञ्चना वर्षुनि भूमीला ।
हिरण्मयी वा वसुधा करिती दाविति निजलीला ॥ १२७ ॥
दयार्द्र होतां हृदय यतींचें निजपद धूलीनें ।
अतितीव्रहि जे व्याधि तयांना झडकरि शमना नें ॥ १२८ ॥
विस्मित करिति ऐशा विभवा उपजविती यति ते ।
सद्धर्माची थोर चमत्कृति तेथें अवतरते ॥ १२९ ॥
धर्में अन्यहि दुष्कर कार्यें जीव जगीं करितो ।
असाध्य असला शब्दचि कोषामधला हा हरितो ॥ १३० ॥
धर्में मरणा प्राप्त जाहले जे नर लंघिति ते ।
ज्योतिश्चक्रा सौधर्मादिक जाती स्वर्गातें ॥ १३१ ॥
होती कांहीं सामानिक सुर इन्द्र कुणी होती ।
पद हि नराच्या अहमिन्द्राचें धर्में ये हातीं ॥ १३२ ॥

---

१ देवांच्या वैक्रियिक सामर्थ्यालाही तपोधर्माचें सामर्थ्य रोकतें. २ चन्द्र-सूर्यादि ज्योतिर्देव जेथें राहतात तो प्रदेश ज्यास ज्योतिर्लोक म्हणतात. ३-४ रत्न-सुवर्णसंपन्न पृथ्वी. ५ इन्द्रासारखा परिवार, आयु, शक्ति व भोगोपभोग ज्यांना असतात ते देव. ६ नव ग्रैवेयक, नव अनुदिश व पंचानुत्तर येथील देवांना अहमिंद्र म्हणतात.

अनेक मजले असती ज्यांना मणिमय-सौधांत ।
देव राहती निजाङ्गनासह आमृति मोदांत ॥ १३३ ॥
चमर-सिंह-गज-रुरु-अश्वादिक-वाहनिं बैसून ।
रम्य स्थानीं क्रीडा करिती सौख्या उपमा न ॥ १३४ ॥
चन्द्रसूर्यसम कान्ति जयांची अशा विमानांत ।
सद्धर्मानें सुखें राहती भङ्ग न मानांत ॥ १३५ ॥

[ देव व देवाङ्गनांचें शरीरवर्णन ]

नसे शरीरीं घाम रोग रज सुगन्ध-संयुक्त ।
मृदु नि मनोहर नयनानन्दी चन्द्रासम कान्त ॥ १३६ ॥
नानाभूषण-भूपित ऐसें उपपादज असतें ।
सदैव तरुणचि सदैव सुवलचि सदैव जें हसतें ॥ १३७ ॥
चरण जयांचे कमलदलासम सुकान्ति-नखयुक्त ।
पैंजण ज्यांचें रुणझुण करिती मोद 'मना' देत ॥ १३८ ॥
कदलीस्तंभासमान माण्ड्या कंवर वारीक ।
कंवरपट्टा मृदुवस्त्रासह जो न असे मूक ॥ १३९ ॥
त्रिवळी सुन्दर उदर जयांचें स्तनमण्डल मोठें ।
कुसुममृदुल तनु वाहुलतायुग अतिसुन्दर वाटे ॥ १४० ॥
रत्नकङ्कणें सुन्दर दिसतीं मधुर-रवें युक्त ।
अशोकपल्लव-कान्ति-स्पर्श नि मानस करि मुदित ॥ १४१ ॥
कराङ्गुली ज्या अतिशय सुन्दर ऐसे कर दोन ।
स्मरपाशासम मना मोहविति असति सदा अरुण ॥ १४२ ॥
त्रिरेखशंखासम-कण्ठाच्या ओष्ठीं ज्या लाल ।
दन्तपङ्क्ति जणु मोत्यें सुन्दर चन्द्रासम गाल ॥ १४३ ॥
डोळे ज्यांचे रक्त-सिता-सित कमलें जणु दोन ।
भुवया रेखिव ज्यांच्या वरती सुवक्र धनु जाण ॥ १४४ ॥
ज्यांचे ऐसें सुन्दर वघतां मुख हो मुदित मन ।
भृङ्ग-वर्ण-सम केश जयांचें दलसुन्दर कान ॥ १४५ ॥

---

१ मृत्युपर्यन्त. २–३ हरिणाच्या जाती. ४ धूळ-मल. ५ देवांच्या जन्म-स्थानाला उपपाद म्हणतात. उपपादापासून जन्मलेलें शरीर उपपादज होय. ६ केळीच्या खांब्रासारखें. ७ कृश. ८ तांबडे. ९ तांबूस, पांढरे व काळे.

मधुर जयांच्या निघे मुखांतुनि रव जणु मधुधारा।
कर्णभाजनें प्राशुनि तृप्त न हो सुरगण सारा ॥ १४६ ॥
नन्दन-कुसुमासमान ज्यांचा सुगन्ध निश्वास।
उत्कट करिति प्रीति वल्लभीं जणु ज्या नखमांस ॥ १४७ ॥
पतिहृद्गत ज्या समजुनि तैशा आचरणा करिती।
पञ्चेन्द्रिय-सुख देउनि त्याला आनन्दित होती ॥ १४८ ॥
अशा अप्सरा स्वर्गामध्यें धर्में मिळतात।
विषय-सौख्य सुर भोगिति कळतें नच त्या दिनरात ॥ १४९ ॥
स्वर्गीं जें सुख मनुष्यलोकीं जीवाला मिळतें।
तें धर्माचें फल जिनवाणी भव्यां नित कथितें ॥ १५० ॥
खालीं मध्यें उर्ध्वजगीं जें सुख परिणत होतें।
जिनधर्माचें फल जाणावें दुःख न ज्या कळतें ॥ १५१ ॥

[ धर्माचरणापासून मिळणारें फल ]

दाता भोक्ता जो मर्यादा-पालक नर आहे।
मनुज हजारों तयास रक्षिति धर्मज फल पाहे ॥ १५२ ॥
सुन्दर भूषण धारण करिती लक्षावधि देव।
अधिपति त्यांचा इन्द्र असे हा धर्माचा भाव ॥ १५३ ॥
शासन[1] त्याचें समस्त देवावरती जें चाले।
पूर्वजन्मकृत फल धर्माचें म्हणती बुध सगळे ॥ १५४ ॥
मोहारीला[2] समूळ नाशुनि रत्नत्रयिं पूर्ण।
सिद्ध होति नर निर्मल धर्मज जाणा फल तूर्ण[3] ॥ १५५ ॥
नर-जन्माविण धर्म-प्राप्ति न होते जाणून।
श्रेष्ठ सर्वगतिमध्यें जाणा नरत्व वदति जिन ॥ १५६ ॥
सर्व-नरामधिं राजा पशुगणि सिंह जसा श्रेष्ठ।
पक्ष्यामध्यें गरुड मानिती नृगति गतिज्येष्ठ ॥ १५७ ॥
सार धर्म हा जगत्रयामधिं सर्वेन्द्रिय-सुखद।
नरदेहीं तो केला जातो नृत्व श्रेष्ठ वद ॥ १५८ ॥
तृणांत साळी श्रेष्ठ द्रुमगणि चन्दन मुख्य गणा।
पाषाणामधिं रत्नें भविं हा मानुष[4]-भव माना ॥ १५९ ॥

१ प्रभुत्व. २ मोहनीय कर्म. ३ शीघ्र. ४ मनुष्य जन्म.

उत्सर्पिणिचे काल हजारों भ्रमुनिहि जीवास ।
नृजन्म लाभे किंवा नाहीं अन्नचि गुणवास ॥ १६० ॥
दुर्लभ नरभव मिळुनिहि दुःख-क्षयकर जो न करी ।
धर्म कुगति नच चुके तयाची जी दुःख न दारी ॥ १६१ ॥
पडलें सागरजलीं रत्न नच पुनरपि तें मिळतें ।
दुर्लभ नरभव दवडी त्याची दुर्गति नच टळते ॥ १६२ ॥
नरलोकांतचि धर्माचरणें स्वर्गादिकिं जीव ।
सुफल तयाचें मिळविति सज्जन ठेवुनि सद्भाव ॥ १६३ ॥
सर्वज्ञाची वाणी ऐकुनि कुम्भश्रवणानें ।
वन्दुनि भावें करयुग जोडुनि पुसिलें हर्षगणें ॥ १६४ ॥
भगवन्ता मज तृप्ति न झाली धर्म-श्रवणानें ।
प्रकार त्याचे सांगा मजला विलया दुरिता ने ॥ १६५ ॥
'अनन्तबल' मुनि विशेष वदले धर्माचें रूप ।
टळेल जेणें भव्य-जनांचें अनन्तसें पाप ॥ १६६ ॥

[ जिनधर्माचे श्रावकधर्म व मुनिधर्म असे दोन भेद ]

भव्य प्राणी संसारांतुनि मुक्त जयें होती ।
मुनि नि श्रावक पाळिति धर्मा द्विभेद जिन कथिती ॥ १६७ ॥
महाधर्म हा साधु पाळिती श्रावक अणुधर्मा ।
अनगारांचा पहिला देई इतरा शुभशर्मा ॥ १६८ ॥

[ मुनीश्वराच्या आचारांचें वर्णन ]

संगत्यागी मी श्रमणांचा कथितों आचार ।
पापविनाशक वीतरागता-संवर्धनिं चतुर ॥ १६९ ॥
सुव्रत जिन जे लीलामात्रें जाणिति जगतास ।
शासन ज्यांचें अदोष ज्यांच्या रुचतें चित्तास ॥ १७० ॥
एरण्डासम असार जाणुनि नरभव ते धन्य ।
विरक्त होउनि दीक्षा घेती त्यासम नच अन्य ॥ १७१ ॥
पंचमहाव्रत पञ्चसमिति नि त्रिगुप्ति पाळून ।
अपार धैर्या धारण करिती उपद्रवा सहुन ॥ १७२ ॥

---

१ फाडीत नाहीं. २ अहिंसादिक पांच महाव्रतरूप धर्म. ३ अहिंसादिकांचें एकदेशानें पालन करणें हा अणुधर्म. ४ घररहित अर्थात् नग्न जैन साधूंचा. ५ गृहस्थांना.

मनीं अहिंसा सत्य अचौर्य ब्रह्मव्रत धरिती ।
तिळमात्रहि जे परिग्रहांना आश्रय नच देती ॥ १७३ ॥
देहावरिहि प्रेम ज्यांचें नसतें नीराग[1] ।
कसा परिग्रह मुनि ठेविति ते असती निःसङ्ग ॥ १७४ ॥
जो केशाग्रसमहि[2] परिग्रह राखी नच जवळी ।
धीर साधु तो शुक्लध्यानें अघेन्धना[3] जाळी ॥ १७५ ॥
असंग होउनि वायु वाहतो विहरति जे तैसे ।
खग[4] सपरिग्रह तसे हि नच जे निःस्पृहताचि वसे ॥ १७६ ॥
जैसें नभ मलमलिन न होतें तैसें निर्मल जे ।
स्तुत्याचारी[5] शान्ति जयामधिं चन्द्रासम साजे ॥ १७७ ॥
ज्यांच्या ठायीं तेज तपाचें सूर्यासम दिसतें ।
व्रत तप संयम सर्व सुनिर्मल पाप न ज्या शिवतें ॥ १७८ ॥
समुद्र जैसें गभीर सुगुणें सुमेरुसम धीर ।
भीत-कासवा सम संकोचिति निजेन्द्रियां प्रवर ॥ १७९ ॥
क्षमा क्षमेसम[6] मनांत ज्यांच्या कषाय नच ज्यांना ।
चतुरशीति-गुण-लक्ष जयामधिं धरिती शीलगणा ॥ १८० ॥
जे अष्टादशसहस्र[7] शीला निर्मल धरितात ।
तपोरमेनें भूषित सिद्धिस्पृहेंत रत शान्त ॥ १८१ ॥
जे जीवादिक जिनें पदार्था कथिले मनिं धरिती ।
परमत जाणुनि समता धरिती शान्ति-रमा वरिती ॥ १८२ ॥
यम-नियमांचें पालन करिती उद्धतता त्यजिती ।
नाना-लब्धि[8]-प्राप्ति होउनिहि उपेक्षिता वरिती ॥ १८३ ॥
जे लोकोत्तम मंगल जगता भूषण जगताचें ।
क्षीणकर्म जे श्रमण विराजति देवपदीं साचे ॥ १८४ ॥
दोन चार भव करून धारण कर्मा नाशून ।
ज्ञानसुखादिक अनन्त जेथें मिळविति निर्वाण ॥ १८५ ॥

---

१ रागद्वेषरहित. २ केसाच्या अग्रभागा इतकाही. ३ पापरूपी लाकडांना. ४ पक्षी. ५ प्रशंसनीय चरित्र ज्यांचें आहे असे. ६ पृथ्वीसारखी. ७ अठरा हजार. ८ अनेक ऋद्धि.

[ गृहस्थधर्माचें वर्णन ]

सुतभार्यादि-स्नेहपञ्जरीं जे अडकुनि पडले ।
धर्मोपाया कथितो त्यांना हित श्रवोत भले ॥ १८६ ॥
व्रतें अहिंसा सत्य अचौर्य स्वस्त्री-सन्तोष ।
परिग्रहाचें प्रमाण असतीं हीं सद्गुणकोष ॥ १८७ ॥
दिग्व्रत आदिक गुणव्रतें जीं तीं पाळिती तीन ।
गृहस्थ शिक्षाव्रतें चार हीं होतीं गुणसदन ॥ १८८ ॥
व्रतपरिपालन होण्यासाठीं सुभावना कथिती ।
श्रीजिनपुङ्गव गृहस्थ सतत स्नेहें आचरती ॥ १८९ ॥
जसा स्वदेह प्रिय इतरांना जाणुनि ठेवावी ।
प्राणिगणामधिं दया सद्गुणा प्रसवे वदति कवि ॥ १९० ॥
प्राणिदया ही कथिति जिनेश्वर धर्माधिष्ठान[1] ।
निर्दयचित्तीं स्वल्प हि धर्मा मिळतें न स्थान ॥ १९१ ॥
जे परपीडा-कारण भाषण असत्य तें चि वदा ।
परहितकर जें सत्याणुव्रत तें प्रिय सर्व बुधां ॥ १९२ ॥
हिंसा चोरी असत्य आदिक पापा आचरती ।
परभविं तेणें वचनागोचर दुःखें त्या मिळतीं ॥ १९३ ॥
इहपरलोकीं दुःखद पापां सुबुद्धि नच करिती ।
प्रयत्न-पूर्वक दुर्जनसंगा सदैव ते त्यजितीं ॥ १९४ ॥
परभार्या ही गणुनि भुजंगी[2] तिजला त्यागावी ।
लुब्ध तिच्यामधिं नर नाशाप्रति जाती वदति कवि ॥ १९५ ॥
कुणी स्वभार्या हरुनि सेविलीं दुःखें तळमळतो ।
जैसें आपण तसेंच इतरहि विचार मनिं करितो ॥ १९६ ॥
परभार्यारति[3] करितो त्याला इथेंचि फल मिळतें ।
वधादि तिर्यङ्नारकगतिमधिं असङ्ख्य दुःख-शतें ॥ १९७ ॥
निरङ्कुशेच्छा[4] असे तियेला आळा घालावा ।
मर्यादित ती सुखकर होइल जाणी हे जीवा ॥ १९८ ॥

---

१ धर्माचा पाया. २ सर्पीण. ३ परस्त्रींत प्रेम. ४ अमर्याद इच्छा-लोभ.

[ इच्छेला आळा घालणारा व न घालणारा यांची कथा ]

भद्र नि काञ्चन या पुरुषांची येथें जाणावी ।
सुकथा इच्छा-प्रमाण सुखकर ठसेल मनिं भावी ॥ १९९ ॥
भद्र नि काञ्चन मार्गी यांना पिशवी पडलेली ।
नयनें दिसली घ्यावी ऐशी इच्छा उद्भवली ॥ २०० ॥
परन्तु मानव भद्र तयांतुनि एकचि दीनार ।
काढुनि घेई काञ्चन पिशवी लुब्ध मनीं फार ॥ २०१ ॥
दीनारांचा स्वामी त्यानें वृत्त नृपालास ।
कथिलें काञ्चन दण्डित झाला भोगी कुफलास ॥ २०२ ॥
भद्रें आपण होउनि भूपा मोदें दीनार ।
दिला नि म्हटलें भूपा याचा करि रे स्वीकार ॥ २०३ ॥
तेव्हां भूपें करून आदर पूजियला भद्र ।
इच्छा सांकुश करि नर पूजित होय जरी क्षुद्र ॥ २०४ ॥

[ गुणव्रतांचें वर्णन ]

अनर्थदण्डा त्यजिणें पहिलें दिशा नि विदिशांचें ।
प्रमाण करणें दुजें गुणव्रत कथिती जिन साचें ॥ २०५ ॥
जे भोगाचें उपभोगाचें पदार्थ परिमाण ।
करणें त्यांचें तिजें गुणव्रत वदती मुनि जैन ॥ २०६ ॥

[ शिक्षाव्रताचें वर्णन ]

सामायिक हें पहिलें शिक्षाव्रत जिनवर कथिती ।
प्रोषधअनशन[2] दुजें वदावें ऐसें वदति यति ॥ २०७ ॥
जें अन्नादिक अतिथि-जनाला देणें तें तिसरें ।
आयुष्यान्तीं सल्लेखन हें चौथें जाण खरें ॥ २०८ ॥
तिथिसंकेत न ज्याच्या हृदयीं न परिग्रह ज्याला ।
गुणी श्रमण जो येई सदना अतिथि वदा त्याला ॥ २०९ ॥
लोभा त्यागुनि निजविभवाला देणें अनुसरुन ।
भिक्षा औषध उपकरणादिक अतिथिस तो जैन ॥ २१० ॥

---

१ ताब्यांत ठेवणें. २ सप्तमी व नवमी, त्रयोदशी व पौर्णिमा किंवा अमावास्या या दिवशीं एकदां जेवून अष्टमी व चतुर्दशी दिनीं उपवास करणें तो प्रोषधोपवास होय.

दाता पाळी अतिथिदान हें शिक्षाव्रत पूत ।
कीर्ति तयाची तेणें पसरे नरसुरलोकांत ॥ २११ ॥
दारू[1] मांस नि मधु निशिभोजन[2] जुगार परनारी ।
वेश्या त्यांच्या त्यागा वदती सुनियम अविकारी ॥ २१२ ॥
या परि पाळुनि गृहस्थ धर्मा समाधिमरणानें ।
श्रावक मिळविति सुदेवपद जें रत्नत्रययत्नें ॥ २१३ ॥
दैवायू[3] ही समाप्त होतां स्वर्गाहुनि चवुन ।
उच्च-कुलामधिं सुमनुष्यत्वें होतें तज्जनन ॥ २१४ ॥
यापरि धारण करुनि आठ भव रत्नत्रय-लाभें ।
सर्व परिग्रह सोडुनि मुनिपदिं मुक्तपदें शोभें ॥ २१५ ॥

[ फक्त सम्यग्दर्शनानेंही जीव सुखी होतो ]

दुर्लभ नृभवा मिळवुनि उक्ताचरणीं असमर्थ ।
श्रद्धाना करि जीवादिक-नव-पदांत अन्वर्थ ॥ २१६ ॥
सम्यग्दृष्टि हि केवल होउनि सुदेव-गुरुशास्त्रीं ।
श्रद्धा करि वा होइल जेणें ती अघसंहर्त्री[4] ॥ २१७ ॥
केवल सम्यग्दर्शन जरि ही प्राप्त कुणा झालें ।
दुःसह दुर्गति-दुःख-त्रासा त्यानें मेटविलें ॥ २१८ ॥

[ जिनवन्दन करण्याचें फल ]

## आर्या

करितो जिना स्वभावें जोडुनि करयुगल जो नमस्कार ।
पुण्याधार असे तो पापस्पर्शेंहि राहतो दूर ॥ २१९ ॥
स्मरतो जिनास भावें जातें भवकोटि-पाप विलयास ।
रवि उदयाला येतां न मिळे पद[5] अन्धकार-निचयास[6] ॥ २२० ॥
सर्व प्रशस्त असती ग्रह त्याचें शकुन त्यास शुभ सारे ।
त्रैलोक्य सार-रत्ना जिनास धरि हृदयिं मनुज भक्तिभरें ॥ २२१ ॥
अरिहन्तांना नमितों ऐसें भाषण निघे मुखांतून ।
तो कर्म-मुक्त होतो अल्पहि याच्यांत राहि संशय न ॥ २२२ ॥

---

१ मद्य. २ रात्री जेवणें. ३ देवाचें आयुष्य. ४ पापांचा नाश करणारी. ५ स्थान. ६ समूहास.

जिनचन्द्रकथाकिरणस्पर्शे[1] हृत्कुमुद[2] हें फुलें ज्याचें ।
निर्वाण-योग्य नर तो जाणावा सुज्ञवचन हें साचें ॥ २२३ ॥
अर्हत्सिद्धमुनींना करितो जन जो मुदें नमस्कार ।
अत्यल्प जन्म त्याचें मुक्तीचें त्या खुलें गृहद्वार ॥ २२४ ॥
जिनबिम्ब नि जिनमन्दिर जिनपूजा करुनि करि जिनस्तवन ।
दुर्लभ तया न कांहीं मुक्तिश्री लावि त्याकडे चि मन ॥ २२५ ॥
राजा शेतकरी वा धनाढ्य अथवा असो कुणी दीन ।
जिनधर्म हृदयिं ज्याच्या तो सर्वां मान्य होतसे जाण ॥ २२६ ॥
मधु मांस नि मदिरादिक अभक्ष्य यांचा न करिति उपयोग ।
श्रेष्ठगृही ते असती मिटतो त्यांचा अवश्य भवरोग ॥ २२७ ॥
श्रीजिनधर्मी शंका धनादिकेच्छा मनीं न करि वास ।
रोगितिरस्कार न करि होतो प्रिय तो समस्त सुजनास ॥ २२८ ॥
मिथ्यादृष्टि-जनांची करी प्रशंसा करी न निन्दा ही ।
अन्यमताची स्तुतिहि न तो सर्वां मान्य होतसे पाही ॥ २२९ ॥
नेसुनि धुतलें धोतर अंगावरि उपरणें असे ज्यास ।
जिनवन्दनेस जाई प्रिय तो होई न काय कोणास ॥ २३० ॥
गन्धाक्षत-पुष्पादिक घेउनि पात्रांत भूमि पाहून ।
जाई जो जिनमन्दिरिं तो नर होतो पवित्र सुखसदन ॥ २३१ ॥
ज्याच्या विकार नाहीं मनांत सद्भावनाचि नित राही ।
शुभकार्यी मन ज्याचें त्याच्या पुण्यास अन्त नच पाही ॥ २३२ ॥
परधन तृणसम पाहे पाही स्वसमान अन्य-जीवास ।
परभार्या मातेसम तो चि असे पुरुष सकल गुणकोष ॥ २३३ ॥
केव्हां दीक्षा घेउनि विहार मी मेदिनीवरी[3] करिन ।
खपवून कर्म होइन मुक्तिश्रीचा कदा वरें रमण ॥ २३४ ॥
ऐसें प्रतिदिनिं ज्याच्या निर्मल चित्तांत होतसे ध्यान ।
कर्मे भिऊन संगति त्याची जणु तीं गमेचि करिती न ॥ २३५ ॥
सात नि आठ भवांनीं कित्येकां सिद्धि होतसे प्राप्त ।
उग्र तपानें कांहीं द्वित्रिभवांनींच[4] मुक्त होतात ॥ २३६ ॥

---

१ जिनेश्वररूपी चन्द्राच्या कथारूपी किरणांच्या स्पर्शानें. २ हृदयरूपी रात्रि-विकासी कमल. ३ पृथ्वीवर. ४ दोन तीन जन्मांनींच.

आनन्द शिवरमेचा मिळविति उत्तम तया न अवकाश ।
मध्यम मध्यम-कालें मिळविति गुणरत्नकोष सविशेष ॥ २३७ ॥
असमर्थ भव्य असती घेति विसावा सुमार्ग जाणून ।
वेळ तया बहु लागे होती ते मुक्तिवल्लभा-रमण ॥ २३८ ॥

[ अज्ञान, मिथ्यात्व, स्वैराचार हे संसारांत फिरवितात ]

परि जे मार्ग न जाणति गेले शतयोजनें जरी दूर ।
ते फिरतातचि इष्टप्राप्ति तयांना न बोलती चतुर ॥ २३९ ॥
उग्रतपें[1] जरि करिती मिथ्यादर्शन असे सदा उदरीं ।
ते जन्ममृत्युवर्जित-मुक्तिपदाचे न होति अधिकारी ॥ २४० ॥
मोहान्धकार भरला जेथें फिरती कषाय-सर्पगण ।
ऐशा भववनिं न मिळे मुक्तीचा मार्ग सर्वसुख-खाण ॥ २४१ ॥
शीलव्रत ज्या नाहीं नाहीं सम्यक्त्व नच असे त्याग[1] ।
भवसागर तरणें त्या नच होतें भोग तोचि भवरोग ॥ २४२ ॥
विन्ध्यप्रवाह[2] जेथें वाहुनि नेतो प्रचण्ड गजराजा ।
तेथें दीन सशांची काय कथा वाहतात बहुत अजा ॥ २४३ ॥

[ कुगुरु भवतारक होत नाहींत ]

जन्म नि मृत्यु जरा हे असती या भोवरे भवाब्धींत ।
पाखण्डी गुरु बुडती तरून जातील केवि तद्भक्त ॥ २४४ ॥
जैशी शिला शिलेला जलांत तारावया समर्थ नसे ।
पाखंडी गुरुठायीं भक्ता तारावया न शक्ति वसे ॥ २४५ ॥

[ सद्गुरु भवतारक आहेत ]

सुतपें दग्ध जयांनीं केलीं पापें, न ज्या परिग्रहही ।
ऐसें सुतत्त्ववेदी गुरु उपदेशेंचि तारिती पाही ॥ २४६ ॥
या भीमभवाब्धीमधिं[3] मनुष्यभव हा असे मणि-द्वीप ।
त्याची प्राप्ति प्राण्या होते जेव्हांचि संपतें पाप ॥ २४७ ॥
घ्यावीत नियमरत्नें अवश्य विबुधें तरी न तो घेई ।
नरभव जातां पुनरपि जीवा न प्राप्त होतसे पाही ॥ २४८ ॥

---

१ संयम, दान देणें. २ विन्ध्य पर्वताप्रमाणें मोठा जलप्रवाह. ३ भयंकर संसारसमुद्रांत.

दोरीसाठीं जैसा रत्नें फोडून टाकितो मूढ ।
विषयार्थ धर्मरत्ना चूर्ण करी दुःख भोगितो गाढ[1] ॥ २४९ ॥

[ अनित्यादि बारा अनुप्रेक्षांचें चिन्तन करावें ]

धन देह गेह यांची अनित्यता सतत हृदयिं जाणावी ।
रक्षक कोणी नाहीं धर्माविण ही कथा मनीं घ्यावी ॥ २५० ॥
हा देह अशुचि[2] आहे आत्म्यापासून भिन्न जाणावा ।
आत्माचि एकटा हा फिरतो भवि हा विचार आणावा ॥ २५१ ॥
संसारीं जीवाला जन्मजरामरण पीडिती पाहे ।
लोकीं विचित्रता बहु कर्मांची हृदयिं घेइ बापा हे ।
जीवीं मिथ्यात्वादिक हेतूंनीं कर्म येइ आस्रव तो ।
रत्नत्रय-परिणामें येइ न तें संवरांत[3] जीव रतो ॥ २५३ ॥
जें कर्म बांधलेलें येउनि उदयास झडुनि जातें तें ।
ती निर्जरा गणावी नाव जशी छिद्ररहित जलिं तरते ॥ २५४ ॥
रत्नत्रय हें दुर्लभ जीवाला प्राप्त व्हावया कठिण ।
होते मनुष्यजन्मीं त्याची परिपूर्णता मनीं आण ॥ २५५ ॥
यापरि जिनेश्वरांनीं धर्माचें जें स्वरूप सांगितलें ।
ध्यावें तें हृदयामधिं जेणें संसारसागरा मथिलें ॥ २५६ ॥
ज्या आगमांत कथिल्या बारा हृदयीं सदा अनुप्रेक्षा ।
चिन्ताव्या त्या मनुजें अनलांसम[4] जाळितात भवकक्षा[5] ॥ २५७ ॥
जैशी स्वशक्ति आहे तिजला अनुसरुनि धर्म पाळावा ।
फल त्याचें त्या मिळतें स्वर्गादिक भूमि जाण हे जीवा ॥ २५८ ॥
यापरि वदतां केवलिमुनीश त्या कुम्भकर्ण विनयानें ।
वदला नाथा सांगा नियमाचे भेद ऐकु द्या कानें ॥ २५९ ॥
नंतर भगवान् वदले कुम्भश्रवणा[6] करून मन शान्त ।
बा ऐक तप नि नियमीं भेद नसे करिति तेचि कर्मान्त ॥ २६० ॥
नियमें युक्त असे जो तो शक्तीनें गणा तपस्वीच ।
सर्व प्रयत्न करिती विद्वज्जन नियम-पालनीं साच ॥ २६१ ॥

---

१ तीव्र. २ अपवित्र. ३ कर्माचें आत्म्यांत येणें ज्यांनीं बंद पडते असे गुप्ति समिति वगैरे स्वरूपाचे परिणाम त्यांना संवर म्हणतात. ४ अग्निप्रमाणें. ५ संसाररूपी जंगलाला. ६ कुम्भकर्णा.

थोडें थोडें देखिल पुण्य नरानें अवश्य मिळवावें ।
जलबिन्दु सतत पडतां होतात नद्या मनांत हें ध्यावें ॥ २६२ ॥

[ नियमाचें महत्त्व व फल ]

एकमुहूर्तावधि जो आहारत्याग अनुदिनीं करितो ।
मासावधि जो वागे तो जन एकोपवासयुत होतो ॥ २६३ ॥
स्वर्गीं तयास मिळतीं मानसभोजनसुखें प्रमोदकर ।
वर्षें दहा हजारावधि नियमा पाळि तो बुधप्रवर ॥ २६४ ॥
श्रद्धा जिनमतिं ठेवुनि पूर्वीं जो पाळिला असे नियम ।
बहु पल्यावधि लाभे स्वर्गीं सुख हानि करुं शके न यम ॥ २६५ ॥

[ पवनाकन्येला नियम पालनाचें फल मिळालें ]

तेथून च्युत होउनि मनुजभवीं भोग लाभती विपुल ।
तापसकुलजा कन्या पवनेला प्राप्त जाहले अतुल[1] ॥ २६६ ॥
जी दुःखिनी उपवनीं अबन्धु बदरादिकास[2] भक्षून ।
पाळून मुहूर्ताचें व्रत झाली ती नृपादर-स्थान ॥ २६७ ॥
या व्रत-पालन-योगें राजानें धन तिला दिलें बहुत ।
तेणें धर्माचरणीं चित्त तिचें जाहलें विशेष रत ॥ २६८ ॥
प्रतिदिनिं दोन मुहूर्तावधिचें आहारवर्जन-व्रत हें ।
जो मासावधि पाळी उपवासद्वय-फलास तो लाहे ॥ २६९ ॥
तीस मुहूर्तावधि जो मानव करि भोजनव्रता त्यास ।
जितके दिन पाळी हें व्रत तितुकें फल मिळेल सविशेष ॥ २७० ॥
याचें फल सुरलोकीं मिळून पुनरपि मनुष्यलोकांत ।
तो अद्भुतप्रभावी होतो न पडे कदापि शोकांत ॥ २७१ ॥

[ व्रतपालनानें मिळणाऱ्या अवस्थाचें वर्णन ]

धर्माचरणें वरिती लावण्यवती नि कुलवती नारी ।
वैर कुणाशि न त्याचें अरि ही होतात त्यास सुखकारी ॥ २७२ ॥
नारी व्रतयुक्ता ज्या स्वर्गाहुनि आयु संपतां चवती ।
येथें महानराच्या भार्या लक्ष्मीसमान त्या होती ॥ २७३ ॥
सूर्यास्त जाहल्यावर आहार-त्याग जो करी व्रतिक ।
सम्यग्दृष्टि तयाला महाभ्युदययुक्त लाभतो लोक ॥ २७४ ॥

---

१ उपमारहित. २ बोरें वगैरें.

स्वर्गीं सुर तो होतो तो बहुपल्योपमान-कालांत ।
मणिमय-सौधीं भोगी सुख बहु नानासुराङ्गनासहित ॥ २७५ ॥

( जिनभक्तिच करावी )

दुर्लभ मनुष्य-भव हा लावावा श्रीजिनेन्द्रभक्तींत ।
नाहीं जिनदेवासम देव दुजा जो गुणेंचि संयुक्त ॥ २७६ ॥
ज्याची सुवर्णमणिमय सभा असे सेवितात नृसुर जया ।
चौतिस अतिशय ज्याला जो झाला प्राप्त घातिकर्मजया ॥ २७७ ॥
रूप जयाचें टाकी मागें जरि शतसहस्र-रवि-तेजा ।
जननेत्र-सौख्यदायी भक्तांच्या शमवि सर्व-कर्म-रुजा ॥ २७८ ॥
जो भव्य जिनवराला भक्तीनें करितसे नमस्कार ।
तो अल्पकाल जातां तरून जातो भवाब्धिचें तीर ॥ २७९ ॥
जिनभक्ति हाचि आहे शान्ति-प्राप्त्यर्थ एक सदुपाय ।
इतर दिसेना यास्तव याला सेवोत भव्य अनपाय ॥ २८० ॥
सांगितलें कुमतांनीं शान्ति-प्राप्त्यर्थ शेकडों मार्ग ।
परि ते नेउनि सोडिति कुगतिपुरीं देति ते न अपवर्ग ॥ २८१ ॥
कारण करुणा सम्यक् त्यांत नसे म्हणुनि शान्ति नच देती ।
यास्तव त्या त्यागावें जरी न होई न दूर भवभीति ॥ २८२ ॥

( दयावन्तांनीं मद्यादिक व रात्रिभोजन त्यागावें )

मधु मांस नि मदिरेचें सेवन जेथें दया कशी तेथें ।
धोका तिथें गणावा जातां लुटितात चोर ज्या कुपथें[1] ॥ २८३ ॥
जिनमार्गीं नच दूषण-कणिका हि अभक्ष्य सर्वदा असती ।
हे मधु मांस नि मदिरा भक्षक कुगतींत सर्वदा रुळती ॥ २८४ ॥
रजनीभोजन[2] करि जो त्याच्यांतहि नच दया वसे जाणा ।
शुभकर्मा तो नाशी नसे तयाच्या मनीं स्वपरकरुणा ॥ २८५ ॥
रजनीभोजन आहे अधर्म परि धर्म मानितीं कुमतें ।
जे निशिभोजन करिती त्यांना कुगतींत मिळति दुःखशतें ॥ २८६ ॥
अस्तास सूर्य जातां रात्रौ[3] भोजन जयास आवडतें ।
देईल कुगति हें मज ऐसें ज्याच्या मना न आकळतें[4] ॥ २८७ ॥

१ कुमार्गानें. २ रात्रीं जेवण. ३ रात्रींत. ४ समजते.

रात्रौ अन्नामध्यें कीट नि केशादि दिसति नयनें न ।
भक्षण त्याचें होतां देहीं जडती अनेक रोगगण ॥ २८८ ॥
जो निशिभोजन करितो भूतप्रेतादिकास घेऊन ।
तो जेवतो मनामधिं समजा त्याचें न होय कल्याण ॥ २८९ ॥
रात्रीं भोजन करणें उंदिर-मार्जार-आदि-जीवगणें ।
भोजन करणें जाणा, ऐसें भोजन पवित्र कोण म्हणे ॥ २९० ॥
अस्तास सूर्य गेला असतां भोजन निशेंत करिती जे ।
मानवरूपी पशु ते ऐसें वदतात उचित गणराजे ॥ २९१ ॥
निशिदिनिं भोजन करि जो जिनशासन-विमुख सर्वदा राही ।
निर्व्रत नियमें विरहित परलोकीं तो सुखी कसा पाही ॥ २९२ ॥
हृदयिं दया नच ज्याच्या जो जिननिन्दा करी असा नर तो ।
अन्यभवीं पापानें अतिशय दुर्गन्धवदन युत होतो ॥ २९३ ॥
जो मद्य मांस खातो चोरी निशिं भोजनास आचरितो ।
सेवी परस्त्रियेला इहपर-जन्मास नष्ट करितो तो ॥ २९४ ॥
अल्पायु जन्मतो तो लागे दारिद्र्य त्याचिया पाठीं ।
रोगें पीडित त्याच्या पाठीं यमराज हाणितो काठी ॥ २९५ ॥
निशिं भोजन पापानें जन्म नि मरणा अनेकदा करितो ।
गर्भांत दुःख भोगी मानव कुगतींत दीर्घसा फिरतो ॥ २९६ ॥
रात्रौ भोजन करि जो जो मिथ्यात्वास सतत कवटाळी ।
सूकर मांजर उंदिर आदिक जन्मांत दुःख दे टाळी ॥ २९७ ॥
जो दुर्मति निशिं भोजन करितो फिरतो कुयोनि-जन्मांत ।
दुःखेंचि भोगितो तो त्याच्या लिहिलें न सौख्य भालांत ॥ २९८ ॥
जो जिनमतास मिळवुनि नियमा पाळी अनन्यभावानें ।
तो सर्व पाप जाळुनि पावें स्वर्गादिकास नियमानें ॥ २९९ ॥
जे रत्नत्रय-धारी अणुव्रतीं स्थिर असे महापुरुष ।
सूर्योदय झाल्यावरि घेती आहार ज्यांत नच दोष ॥ ३०० ॥
करुणा मनांत ठेवुनि रात्रौ भोजन कदापि नच घेती ।
स्वर्गीं उत्तम भोगा भोगिति होऊन ते विमान-पति ॥ ३०१ ॥

---

१ भूत प्रेत हे व्यन्तर देवाचे प्रकार आहेत. हे रात्रीं फिरतात. यांच्या स्पर्शानें अन्न अपवित्र होतें. २ गणधर. ३ दुर्गंधी तोंडाचा.

च्युत होउनि ते होती मनुष्य उत्तम कुलांत त्या मिळतें ।
बलभद्रादिक-पदवी जी जीवांना अबाध सुख देतें ॥ ३०२ ॥
सौधर्मादि-स्वर्गीं दिनभोजी शुचि-चरित्र पालक जे ।
सामानिकादिपदवीधारक विख्यात होति सुरराजे ॥ ३०३ ॥

[ रात्रीं भोजन करणाऱ्या स्त्रियांना दुःखें प्राप्त होतात ]

निशिंभोजन ज्या करिती नारी होती अनाथ तत्पापें ।
माता पिता नि भाऊ यांनीं त्या रहित होति सुख संपे ॥ ३०४ ॥
धन-बन्धु-रहित ऐसा पति त्यांना लाभतो दरिद्रीच ।
परगृहिं करून कार्यं भरिती त्या उदर पति हि करि जाच ॥ ३०५ ॥
निशिंभोजन करण्यानें दुःखी होतात बाल विधवा ही ।
पाप असें नारींना कुदशा देऊन दुःख दे पाही ॥ ३०६ ॥

[ दिनभोजी स्त्रियांना सर्व सुखें वैभवादि प्राप्त होतात ]

शान्त कषाय जयांचे रक्षिति शीलास रत्न मानून ।
ज्या साधुभक्ति करिती विरत सदा रात्रिभुक्तिपासून ॥ ३०७ ॥
ऐशा नारीरत्ना मिळती स्वर्गांत इष्ट जे भोग ।
परिवार मानि आज्ञा करून शिरिं हस्तयुगलसंयोग ॥ ३०८ ॥
स्वर्गच्युत त्या होउनि वैभवयुत वरकुलांत जन्मून ।
सुगुण-सुलक्षणयोगें प्रमुदित करितात सतत सुजन-मन ॥ ३०९ ॥
बघतां सकल जनांच्या नयना नि मना प्रमोद बहु वाटे ।
अमृतासम निघणाऱ्या शब्दां ऐकून हर्ष मनिं दाटे ॥ ३१० ॥
सुन्दर सकल कलागम चतुर सुनारीजनास पाहून ।
खगलबलहरि-चक्रीचें उत्कण्ठायुक्त होय खचित मन ॥ ३११ ॥
श्रेष्ठ नरांच्या पत्नीपदास संप्राप्त ज्या स्त्रिया होती ।
दिनभोजन-पुण्याचें त्यांना फल लाभतें सुधी वदती ॥ ३१२ ॥
श्रीकान्ता नि सुभद्रा यांच्यासम रूप लाभतें त्यांना ।
दिनभोजन पुण्यचि त्या हेतु असें निश्चयें मनीं माना ॥ ३१३ ॥
नारीनें नि नरानें अन्तःकरणांत नियम घेऊन ।
सापाय-रात्रि भोजन सोडावें तें असेचि अघजनन ॥ ३१४ ॥

१ दिवसाच मी जेवीन असें व्रत धारण करणारे. २ सर्व कलाशास्त्र जाणणाऱ्या. ३ विद्याधर, बलभद्र, नारायण व चक्रवर्तीचें. ४ रोगादिक पीडा उत्पन्न करणारें. ५ पापजनक.

अत्यल्पशा प्रयासें यापरि मिळतें नरास सुख थोर ।
यास्तव दिनींच जेवा सुखलाभा कोण इच्छितो न नर ॥ ३१५ ॥
धर्म सुखोत्पत्तीचें मूळ नि दुःखा अधर्म जाणून ।
धर्मासि सुजन घेती त्यजिति अधर्मासि सर्प चिन्तून ॥ ३१६ ॥

( धर्माचरणाचें फल )

आबाल[1]-वृद्ध आहे प्रसिद्ध हें धर्म हाचि सुख दाता ।
तदितर[2] दुःखां देतो धर्माविण अन्य जगति न त्राता ॥ ३१७ ॥
धर्माच्या माहात्म्या पाहा सुर मरुनि मनुजलोकांत ।
सुन्दर नि महाभोगी नर होतो सकल-मेदिनीकान्त[3] ॥ ३१८ ॥
जळिं नि स्थलांत होतीं रत्नें तीं सकल होति त्या प्राप्त ।
जरि तो उदास झाला सुखीच तो तो पडे न दुःखांत ॥ ३१९ ॥
त्याचीं सुवर्णवस्त्रें[4] धनधान्यादिक समस्त भाण्डार ।
रक्षिति मानव हातीं घेऊन धनुष्य बाण तरवार ॥ ३२० ॥
पुष्कळ गायी हत्ती म्हशी नि घोडे नि सुरथ पायदळ ।
गांवें नगरें देश हि मिळती त्या प्राप्त होय बुद्धिबल ॥ ३२१ ॥
वैभव विशाल दास नि दासी त्या सेविती सदाकाल ।
वैसुनि सिंहासनिं तो राज्य करी विपुल ज्यास बाहुबल ॥ ३२२ ॥
हंसीसम गति ज्यांची सुन्दरतेच्या खनी अशा नारी ।
शीलव्रत-समलङ्कृत भार्या त्या रमवितात जणु अमरी ॥ ३२३ ॥

( अज्ञान व पापोदयामुळें धर्माचरणाकडे प्रवृत्ति होत नाहीं. )

सुखसम्पत्प्राप्तीचा धर्मचि आहे उपाय हा कोणी ।
न च जाणती म्हणून न करिती यत्नास होति दुःखधनी ॥ ३२४ ॥
पापोदयवश कोणी धर्माचें रूप सर्व जाणुनि ही ।
सौख्योपाया धर्मा सेविति नच होति सतत अघमोही[5] ॥ ३२५ ॥
उपशान्त पाप होतां जाती श्रीगुरुपदा कुणी शरण ।
धर्मस्वरूप ऐकुनि त्याचें ते करिति सतत आचरण ॥ ३२६ ॥

---

१ बालकापासून वृद्धापर्यन्त. २ धर्माहून भिन्न अर्थात् अधर्म. ३ पृथ्वीपति. ४ भरजरी वस्त्रें. ५ पापानें मोहित.

( मुनींच्या आहारानंतर जेवू असें व्रत धारण करणाऱ्यांना
मिळणाऱ्या वैभवादिकांचें निरूपण. )

करितात नियम कोणी जेवू मुनिभुक्ति[1] जाहल्यावरती ।
स्वर्गी येतिल केव्हां त्यांची इच्छून वाट सुर बघती ॥ ३२७ ॥
ते तेजस्वी होती देवसमूहांत इन्द्रपद घेती ।
सामानिक वा होती इन्द्रहि त्यांच्या समादरा करिती ॥ ३२८ ॥
जैसें बीज वडाचें स्वल्प हि असतां विशाल तरु होतें ।
केलें थोडें ही तप भोगफला विपुल मानवा देतें ॥ ३२९ ॥
नेत्र-प्रमोददायक होता आत्मज[2] कुबेरकान्ताचा ।
धर्मी प्रवृत्ति होती त्याची हा पूर्वधर्मगुण[3] साचा ॥ ३३० ॥
मुनिवेलाव्रत-धारी देऊन मुनीश्वरास आहार ।
मणि-कनकवृष्टि पाही कुबेरदयिताख्य सुगुणगणपूर ॥ ३३१ ॥
भूमण्डलांत झाला प्रसिद्ध तो विक्रमी धनी चतुर ।
झाला विरक्त काले मानून शरीरभोग निःसार ॥ ३३२ ॥
घेऊन महादीक्षा कठिण तपश्चरण करुनि साचार[4] ।
स्वर्गीं सुरेन्द्र झाला मुनिवेलाव्रत असे सुखाधार ॥ ३३३ ॥
अनगार-महर्षीचें वेलाव्रत पुण्यवन्त करितात ।
ते हरिषेण-नृपासम भोगाच्या वैभवास वरितात ॥ ३३४ ॥
पाळुनि मुनिवेलाव्रत विशालगिरितुल्य पुण्य साठविलें ।
तेणें हरिषेणाच्या पदरीं षट्खण्ड-चक्रिपद पडलें ॥ ३३५ ॥

( एकाशन-व्रताचें फल वर्णन. )

जाणुनि मुनिपदसन्निध हृदयीं ठेवुनि सदा समाधान ।
व्रत एकाशन घेती सम्यक्त्वी पाळतात आमरण ॥ ३३६ ॥
अन्तीं समाधिमरणें मरून मणिजडित सुर-विमानांत ।
होतात महर्द्धिकसुर इन्द्राहुनि हीन जे न मानांत ॥ ३३७ ॥
नित्य-प्रकाश जेथें अशा विमानांत राहती सुचिर ।
देवीवृन्दामध्यें क्रीडा करितात ते कलाचतुर ॥ ३३८ ॥

---

१ मुनींचें भोजन. २ मुलगा. ३ पूर्वजन्मीं आचरणांत आणलेल्या धर्माचा गुण. ४ निर्दोष, जसें आगमांत तप वर्णिलें आहे त्याप्रमाणें तप करणें.

कण्ठांत हार हातीं कडे नि तोडे सुवर्णरत्नांचें ।
कम्बर कटिसूत्रानें दिसते सुररूप गोजिरें[1] साचें ॥ ३३९ ॥
शिरि मुकुटरत्न सुन्दर सेवक धरितात छत्र तें शोभे ।
वारिति चामर सुरगण सभोंवती देहरक्षि देव अमर उभे ॥ ३४० ॥

( पर्वदिनीं उपवास करण्याचें फल. )

उत्तम महाव्रती जे, धरिति अणुव्रत असे उपासक ही ।
जाणुनि शरीर अध्रुव होती संसार-भोग-निर्मोही ॥ ३४१ ॥
उपवास शान्त मानस ठेवुनि जे अष्टमीस करितात ।
तेवी चतुर्दशीदिनिं पुण्याच्या सञ्चयास वरितात ॥ ३४२ ॥
देवायुर्बन्ध तया होतो सौधर्म आदि सुरलोकीं ।
ते जन्मतात जाणा अहमिन्द्र-पदींहि सुजन अवलोकी ॥ ३४३ ॥
विनयें विनम्र दिसती असती गुणशील-हारसंयुक्त ।
जे राहती तपीं रत निःसंशय होति अमर अतिकान्त ॥ ३४४ ॥
इच्छित भोगुनि भोगा या नरलोकांत मनुजपति होती ।
श्रीमज्जिनेश्वराचें मत हितकर दृढ मनांत ते धरिती ॥ ३४५ ॥
जिनशासनांत राहुनि साधुपदीं कर्मनाश करितात ।
मिळवुनि अनन्त सद्गुण मुक्तिश्री-सौख्य भोगिती सतत ॥ ३४६ ॥
प्रतिदिवशीं नर करितो जिना नमस्कार जो त्रिकालांत ।
स्तुति करुनि तनुमनानें वचनें पापास मारितो लाथ ॥ ३४७ ॥
मन पर्वताप्रमाणें निश्चल हाले न कुमतवातांनीं ।
त्याचें दृढ सम्यक्त्व स्वर्गीं इन्द्रादि-देव-गण वानी ॥ ३४८ ॥
गुण-भूषणें सजे तो तच्छीलाचा[2] सुगन्ध दरवळतो ।
सर्वेन्द्रिय-सुखदायक भोगा स्वर्गांत सुनर मिळवी तो ॥ ३४९ ॥
शुभगति-युगलीं[3] घेउनि कांहीं भव तो समस्त-कर्मगणा ।
नाशून मुक्तिनगरीं होतो तो अन्तहीन शिवराणा ॥ ३५० ॥

( वैराग्य न होण्याचें कारण. )

पञ्चेन्द्रिय-विषयांचा पगडा बसला असे मनावरती ।
संपूर्ण प्राण्यांच्या म्हणून विरतींत ते न करिति रति[4] ॥ ३५१ ॥

---

१ सुन्दर. २ त्याच्या शीलव्रताचा. ३ देवगति व मनुष्यगति या दोन गति शुभ आहेत. ४ प्रेम.

परि जे नर पुरुषोत्तम विषान्न विषयास मानुनि त्यजिती ।
मोक्षा कारण ऐशा महाव्रतां ते महादरें वरितीं ॥ ३५२ ॥
संसारीं भ्रमणाऱ्या प्राण्यानें एकही विरक्ति जरी ।
सम्यक्त्वासह वरिली होइल भवसागरीं अवश्य तरी ॥ ३५३ ॥
एक हि नियम जयांना नाहीं ते नच मनुष्य पशुचि गणा ।
अथवा ते फुटलेल्या कुम्भासम सुगुणरहित सतत म्हणा ॥ ३५४ ॥
सुगुण नि सुचरित यांनीं समृद्ध एक हि असे जया नियम ।
इन्द्रिय कषाय निद्रा स्नेह नि विकथा प्रमादरहित शम ॥ ३५५ ॥
जो नर इच्छा करितो संसार-समुद्र तरुनि जायाची ।
ती सफल होय त्याच्या सहवासा सुररमा[1] सदा याची ॥ ३५६ ॥
दुष्कृत्या जे त्यजिति न वसे दुराग्रह सदा निजज्ञानीं ।
ते जन्मान्धा सम नर फिरती कुगतींत घोर भवविपिनीं ॥ ३५७ ॥
केवलि अनन्तवीर्य-प्रभूपदेशा श्रवून[2] आनन्द ।
नृसुरपशूंना झाला तद्वर्णन करूं शके न हा मन्द ॥ ३५८ ॥
सम्यक्त्वी जन कांहीं अणुव्रती सुजन जाहले कांहीं ।
कांहीं महाव्रती जन आत्महितीं दक्ष होति हे पाही ॥ ३५९ ॥

( धर्मरथमुनि रावणाला नियम घे असें म्हणतात. )

या नंतर धर्मरथें श्रमणें ऐसें दशानना म्हटलें ।
घे नियम भव्य कांहीं जशी असे शक्ति सौख्य होय भलें ॥ ३६० ॥
हे नृपते तूं जाणी द्वीप असे हा सुधर्म-रत्नांचा ।
तूं नियमरत्न घेई यापासुनि हो अदीन[3]-हृदयाचा ॥ ३६१ ॥
चिन्ता नको करूं वा महाजना त्याग खेद-हेतु नसे ।
ऐसें धर्मरथानें म्हटलें नियमांत सर्व सौख्य वसे ॥ ३६२ ॥
परि रावण मनिं चिन्ती माझें भोगानुरक्त चित्त असे ।
व्याकुलता मज अतिशय नियमग्रहणास मी करूं कैसें ॥ ३६३ ॥
स्वाभाविक मम आहे भक्ष्यान्न सुगन्ध शुद्ध बलदायी ।
मधु-मद्य-मांसविरहित विरति तथापि न धरूं शके हृदयीं ॥ ३६४ ॥
स्थूल-प्राणि-वधादि-त्यागा-भिध विरति करूं शकेल गृही ।
मी त्यापैकी न करूं शकेन धारण असा असे मोही ॥ ३६५ ॥

१ देवलक्ष्मी. २ ऐकून. ३ निर्भय.

मत्त-गजासम माझें मन आहे त्यांत विरति-परिणाम ।
न दिसे काय करूं मी मन माझें हें दिसेंचि बेफाम ॥ ३६६ ॥
आहे शूर जरी मी समर्थ नाहीं तपोव्रत-ग्रहणीं ।
कैसें तपोव्रता हे धरिती सुजन न तयास मी जाणी ॥ ३६७ ॥
अथवा मी या नियमा ग्रहण करूं काय सुन्दरी नारी ।
अन्याची जी नेच्छी मज तिजवरि मी बलादि[1] नैव करी ॥ ३६८ ॥
क्षुद्र असे मी अतिशय चित्ताच्या निश्चया न घेउ शके ।
न कळे मज या समयीं मोठेपण हाय केवि टिकवु शके ॥ ३६९ ॥
लोकत्रयांत उत्तम नारी जी नच वचून वश न मला ।
होइल यास्तव नियमा घेणें नच कठिन या दिसे काला ॥ ३७० ॥
मानोन्नति[2] ज्याच्या मनिं जी उच्छिष्टान्न[3]-तुल्य परनारी ।
सेवील कसा तिजला विष्टा अपवित्र केवि कोण वरी ॥ ३७१ ॥
यापरि निर्णय घेउनि अनन्तवीर्यक्रमांस[4] वन्दून ।
नृसुरासुरासमक्ष प्रगट करी तो दशास्य हें वचन ॥ ३७२ ॥
भगवन्ता परनारी इच्छा-वर्जित तिला न घेईन ।
नियम असे हा माझा मी मृतिपर्यन्त खचित पाळीन ॥ ३७३ ॥
अरिहन्त सिद्ध साधु नि जिनधर्मा बोलती चतुःशरण ।
रक्षण करिति भवांतुनि बुध वदती योग्य नाम या जाण ॥ ३७४ ॥
निश्चल सुमेरुसम जो साक्षी ठेवून या चतुःशरणा[5] ।
श्रीभानुकर्ण घेई या नियमा नमुनि केवलीचरणा ॥ ३७५ ॥
प्रातःकालीं प्रतिदिनिं उठून नि स्नानशुद्ध होऊन ।
स्तुतिपूजा अभिषेका जिनेश्वराच्या अवश्य मी करिन ॥ ३७६ ॥
निर्ग्रन्थयतिवरांची करीन पूजा विधीस अनुसरून ।
घेइन तदनन्तर मी आहारा शान्त चित्त ठेवून ॥ ३७७ ॥
यापरि रविकर्णानें[6] अन्य हि नियमा अनेक घेऊन ।
श्रीकेवलीस वन्दन केलें जिनदासभाव[7] ठेवून ॥ ३७८ ॥

---

१ बलात्कार वगैरे. २ स्वाभिमानाची उन्नति. ३ उष्ट्या अन्नासारखी.
४ अनन्तवीर्य केवलीच्या पायांना. ५ संसारांतून जीवांचें रक्षण करणाऱ्या चार व्यक्ति.
६ कुम्भकर्णाचें रविकर्ण असेंहि नांव होतें. ७ जिनेश्वराचा दास होण्याचा भाव अर्थात् जिनभक्ति.

तदनन्तर देवासुर सगळे जिनदास आपुल्या सदना ।
होउनि हर्षित गेले करून सानन्द-सकलजन-नयना ॥ ३७९ ॥
आकाशांतुनि असतां लंकेला जात इन्द्रतुल्य जना ।
रावणकलशश्रुति[1] हे दिसले ज्यांच्या प्रमोद होय मना ॥ ३८० ॥
प्रजाजनानें केलें स्वागत गेले लङ्कत ।
उभय हि नाना सुखें भोगिती जिनपदिं अनुरक्त ॥ ३८१ ॥
कर्में जेव्हां प्रशान्त होतीं भावी हित ज्यांचें ।
रुचे तयांना सुगुरु-देशना[2] वदती बुध साचें ॥ ३८२ ॥
धर्माचरणीं उद्यत झालें ज्यांचें मन सुजनें ।
जिनोपदेश श्रवण करावा तयें प्रमोदानें ॥ ३८३ ॥
विनयें धर्मश्रवणा करिती श्रद्धा ठेवून ।
जिनदासांचा बोध[3] वाढतो सुचरितसम्पन्न[4] ॥ ३८४ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे पद्मपुराणे 'अनन्तबलधर्माभिधानं' नाम चतुर्दशं पर्व ॥ १४ ॥

---

१ कुम्भकर्ण. २ सद्गुरुचा उपदेश. ३ सम्यग्ज्ञान. ४ निर्दोष चारित्रानें पूर्ण.

## पंधराव्या पर्वांतील कथेचा सारांश–

श्रीकुंभकर्णाप्रमाणें अनन्तवीर्यकेवलींना वन्दन करून बिभीषण व हनुमन्तानें गृहस्थाचीं अहिंसादि पांच अणुव्रतें धारण केलीं. हनुमन्त हा सम्यक्त्व व शीलव्रतांत सुमेरुपर्वताप्रमाणें दृढ होता. त्याचें वैभव व सौन्दर्यही श्रेष्ठ दर्जाचें होतें. असें गौतमगणधरांनीं म्हटल्यावर प्रभो, हा हनुमान् कोण व त्याची प्रसिद्धि कशी झाली हे मला सांगा अशी श्रेणिकानें विनंति केली. तेव्हां गणधरांनीं त्याचें चरित्र याप्रमाणें सांगितलें:—

या भरत क्षेत्रांत विजयार्ध पर्वतावर आदित्यपुर-नगरांत प्रल्हाद राजा राज्य करीत होता. त्याच्या पत्नीचें नांव केतुमती असें होते. तिच्यावर त्याचें अतिशय प्रेम होतें. या उभयतांना 'पवनंजय' नांवाचा मुलगा झाला. हा वाऱ्याप्रमाणें चञ्चलमनाचा होता. तो तरुण झाल्यावर त्याच्या लग्नाची चिन्ता प्रल्हादाच्या मनांत उत्पन्न झाली.

प्रल्हादराजाचा मित्र दन्तिपर्वतावरील माहेन्द्र नगरांत राज्य करीत होता. त्याचें 'महेन्द्र' असें नांव होतें. राजा महेन्द्राच्या राणीचें नांव चित्तवेगा होतें. या उभयतांना अरिंदमादिक शंभर पुत्र होते व अंजना नांवाची कन्या होती. ती अत्यंत सुन्दर होती. तिच्याशीं आपल्या पुत्राचा– पवनंजयाचा विवाह व्हावा अशी प्रल्हादाची इच्छा होती व त्याच्या इच्छेला अनुकूल असा एक प्रसंग प्राप्त झाला. तो असा:—

अष्टाह्निकपर्वांत कैलास पर्वतावर आदिभगवन्तांना वन्दन करण्याकरितां प्रल्हाद राजा आपल्या पुत्रादिकासह गेला होता. व महेन्द्रराजाही सपरिवार तेथें आला. उभयतांची भेट झाली. तेव्हां प्रल्हादानें महेन्द्राला आपल्या पुत्रासाठीं 'अंजने' ची याचना केली. महेन्द्रानें मोठ्या आनंदानें होकार दिला व ज्योतिष्यांनीं तीन दिवसानन्तर लग्नाचा मुहूर्त आहे असें सांगितलें.

कैलासपर्वतावरील मानस सरोवराच्या कांठीं अत्यंत सुन्दर मण्डप रचला गेला. या तीन दिवसांचा अवधि पवनञ्जयाला फार मोठा वाटला व अंजनेला पाहण्याची तीव्र उत्कण्ठा त्याच्या मनांत उत्पन्न झाली. तो आपल्या प्रहसित मित्रासह महेन्द्रराजाच्या महालांत सातव्या मजल्यावर रात्रौ गुप्तरूपानें अञ्जनेचें सौन्दर्य पाहण्यासाठीं जाऊन बसला.

अंजना मिश्रकेशी व वसन्ततिलका या दोन मैत्रिणीसह तेथें बसलेली त्यांना दिसली व त्या दोघींचीं अंजनेविषयींचीं भाषणें त्यांनीं याप्रमाणें ऐकिलीं. वसन्ततिलका– अंजने तूं धन्य आहेस. तुला पवनंजय हा सर्वथा योग्य पति लाभणार म्हणून मला अतिशय आनन्द झाला. मिश्रकेशी– मला तर पवनंजयापेक्षा विद्युत्प्रभ हा योग्य वर आहे असें वाटतें. वसन्ततिलका– विद्युत्प्रभ अल्पायुषी आहे. यास्तव तो केव्हांही योग्य वर नाहीं अशी माझी समजूत आहे. मिश्रकेशी– अग जरी विद्युत्प्रभ अल्पायुषी आहे तरी तो अमृतासारखा आहे व पवनंजय हा विषाप्रमाणें आहे. पवनंजयाच्या लाभानें अंजना सुखी होणार नाहीं. या दोघींचा संवाद ऐकून अंजनेनें मिश्रकेशीचा निषेध केला नाहीं. ती स्वस्थ बसली असें पाहून पवनंजयाला राग आला व तो मिश्रकेशीला मारण्यासाठीं जाणार असें पाहून प्रहसितानें म्हटलें मित्रा, स्त्री ही गायीप्रमाणें अवध्य आहे. तिचा वध करणें योग्य नाहीं व जरी अंजना स्वस्थ बसली, तिनें मिश्रकेशीचा निषेध केला नाहीं तरीही ती तुलाच योग्य वर मानतें असें प्रहसित म्हणाला. कोपानें लालबुन्द झालेल्या पवनंजयानें हिचा स्वीकार करावयाचा नाहीं असें ठरविलें व तेथून नगराकडे जाण्यास उद्युक्त झाला.

प्रहसितानें पवनंजयाला म्हटलें मित्रा, प्रल्हादमहाराज व महेन्द्र या दोघा वडिलांनीं तुम्हा उभयतांचा विवाह करणें ठरविलें आहे व तुझ्या रुसून जाण्यानें या दोघांची मोठी मानहानि होईल. यास्तव तूं परत जाण्याचा विचार सोडून दे. मित्राच्या विचाराला मान देणें योग्य वाटल्यामुळें त्यानें जाण्याचा विचार रहित केला.

नंतर तिसरे दिवशीं या उभयतांचा मोठ्या थाटानें विवाह झाला. पण पवनंजयाच्या मनांत अंजनेविषयीं तिटकारा उत्पन्न झालेला कमी झाला नाहीं.

दोघेही व्याही आपल्या परिवारासह तेथें एक महिन्यापर्यन्त आनंदानें राहिले. एकमेकांचा त्यांनीं चांगला आदर केला. जातांना एकमुहूर्त ते कष्टी झाले.

गौतमगणधर श्रेणिकाला म्हणाले श्रेणिका जे नेहमीं जिनभक्ति करितात व जिनेश्वराचें चिन्तन करितात त्यांना कधी वियोग-दुःख प्राप्त होत नाहीं.

---

# पंधरावें पर्व

---

अनुष्टुप्

वंदिला हनुमन्तानें अनन्तवल केवली ।
विभीषणें हि ज्याच्यांत अनन्त सुगुणावली[1] ॥ १ ॥
हनुमन्तें गृहस्थाचीं व्रतें हर्षून घेतलीं ।
विभीषणें हि ज्या योगें श्रेष्टता येइ भूतलीं ॥ २ ॥
दृढता-शील सम्यक्त्वीं हनुमन्तांत जी असे ।
तशी न गिरिराजांत[2] वदती वुध ती वसे ॥ ३ ॥
वैभवादिक सौभाग्य हनुमंतांत उत्तम ।
वदले गौतमगणी वारिती जे मनस्तम[3] ॥ ४ ॥
ऐकून गणि-वाक्यास मगधाधीश वोलला ।
हनुमान् हा प्रभो कोण महिमा केवि पावला ॥ ५ ॥
राहतो हा प्रभो कोठें कैशी त्याची विशिष्टता ।
समजावी मनीं इच्छा झाली माझ्या समुत्कटा ॥ ६ ॥
सज्जनांच्या गुणा गाया प्रमोद वहु वाटतो ।
श्री-गौतमगणेशास सज्जनांचा स्वभाव तो ॥ ७ ॥
वदले गौतमगणी सांगतों मी सविस्तर ।
त्याचें चरित्र वा ऐक चित्त देऊन सत्वर ॥ ८ ॥
येथील भरतक्षेत्रीं विजयार्धा-चला-वरि ।
राजा प्रह्लाद आदित्यपुरीं राज्य सुखें करी ॥ ९ ॥
तया केतुमती भार्या प्राणापेक्षा हि त्या प्रिय ।
झाला सुपुत्र उभया यन्नाम[4] पवनञ्जय ॥ १० ॥
करी सदा नभांतून गमना जयशालिता ।
अशा गुणेंचि अन्वर्थ पवनञ्जयता सुता ॥ ११ ॥
जयलक्ष्मी सदा नान्दे रुन्द वक्षःस्थलान्तरीं ।
पवनासम चाञ्चल्य सदा जो धरि अन्तरीं[5] ॥ १२ ॥

---

१ अनन्तसद्गुणांची पङ्क्ति. २ मेरुपर्वतांत. ३ मनांतील अज्ञानान्धकार.
४ ज्याचें नांव. ५ मनांत.

चन्द्रासमान ज्या पूर्ण तारुण्य शुभ लाभलें ।
पाहून तें नृपमनीं लग्नचिन्तन[1] ये भलें ॥ १३ ॥
सम्बद्ध या कथेशीच कथा ऐशी दुजी असे ।
दन्ति-पर्वति माहेन्द्र-नगरी वैभवें वसे ॥ १४ ॥
महेन्द्रखग भूपाल महेन्द्रासम वैभवी[2] ।
जिनभक्ति करी राज्य तीच सार असे भवीं[3] ॥ १५ ॥
चित्तवेगा तया भार्या असे जी मृदुभाषिणी ।
पातिव्रत्य-गुणें शोभे नभिं जेवि अर्हमणि[4] ॥ १६ ॥
अरिन्दमादिक सुत उभयां शत जाहले ।
ते सर्व वीर-लक्ष्मीचे जणु वल्लभ[5] शोभले ॥ १७ ॥
अञ्जना तनया झाली यानन्तर शुभा तया ।
सुन्दरी जी रतिसमा विनयादिगुणाश्रया[6] ॥ १८ ॥
शुक्लांत वाढते चन्द्रलेखा प्रतिदिनीं जशी ।
मोहवी यौवन तिचें आकाशीं पूर्णिमा शशी ॥ १९ ॥
बाला-लावण्य पाहून चिन्ता तातान्तरीं स्फुरे ।
वर योग्य असे कोण विचारें तें सदा झुरे ॥ २० ॥
मन्त्र्यांनीं कथिलें राजन्, वर होण्यास योग्य जे ।
खगेन्द्रपुत्र[7] विपुल चिन्ता मनिं कशी रुजे ॥ २१ ॥
खगेश हरि नांवाचा विद्युत्प्रभ तया सुत ।
विक्रमी अञ्जनेला तो वर योग्यचि निश्चित ॥ २२ ॥
प्रह्लादपुत्र तरुण विक्रमी कामसुन्दर ।
पवनञ्जय होण्यास योग्य तो अञ्जनावर ॥ २३ ॥
रावणाचा सुत असे इन्द्रजित् पहिला गुणी ।
मेघनाद दुजा योग्य वाटती वर मन्मनीं ॥ २४ ॥
यांतून योग्य जो कोण वाटतो आपुल्या मना ।
द्यावी त्या अञ्जना बाला त्यागावी चित्त-चिन्तना[8] ॥ २५ ॥
हें सर्व लिहिले चित्रपटीं त्यांतून आवडे ।
पवनञ्जय भूपाला दृष्टि त्याच्यावरी जडे ॥ २६ ॥

---

१ लग्नाची काळजी. २ ऐश्वर्यवान्. ३ संसारांत. ४ सूर्य. ५ प्रिय पति. ६ आधार. ७ विद्याधरराजांचे. ८ मनांतील काळजी.

मंत्री वदे प्रभो योग्य सर्वथा पवनञ्जय ।
दीर्घायुषी गुणी रूपी विक्रमी जाणतो नय ॥ २७ ॥
एकदा खगभूपाल कैलासाचलिं पातले ।
आष्टाह्निकदिनीं[1] श्रीमज्जिना पूजुनि तोषले ॥ २८ ॥
महेन्द्र भूप प्रह्लाद अन्योन्या वदले मुदें ।
जाहली बहु वर्षांनीं भेट कोणा न सौख्य दे ॥ २९ ॥
प्रह्लाद वदला मित्रा महेन्द्रा तव अञ्जना ।
माझ्या सुताला पवना दे माझी तुज याचना ॥ ३० ॥
जें माझ्या मनि हा तेंच मागतो मनि तोषला ।
प्रह्लाद याचना मान्य तुझी तत्क्षणिं बोलला ॥ ३१ ॥
आजपासून तिसऱ्या दिवशीं कार्य हें करू ।
मानसाख्य-सरस्तीरीं कार्यसागर हा तरू ॥ ३२ ॥
बोलून गेले स्वस्थानीं ते दोघे हर्षले मनीं ।
तटीं सरोवराच्या ते पातले तिसरे दिनीं ॥ ३३ ॥
विवाहमण्डप जिथें रचिला अतिसुन्दर ।
वाटे समस्त सुजना लक्ष्मीचें जणु मन्दिर ॥ ३४ ॥
मित्रा प्रहसिता बोले सोत्कण्ठ पवनञ्जय ।
अञ्जना पाहिलिस कां कैसें रूप किती वय ॥ ३५ ॥
उर्वश्यादिक ज्या नारी सुरांच्या रूपसुन्दरी ।
त्याहून रम्य ही आहे अञ्जना जाण अन्तरीं ॥ ३६ ॥
रूप आहे निरुपम जें शब्दें वर्णितां न ये ।
पाहून थक्क होशील भाग्याब्धि भरतीस ये ॥ ३७ ॥
दूर आहे विवाहाचा दिन आज बघावया ।
मन अत्युत्सुक असे माझें लौकर जाउ या ॥ ३८ ॥
बोले प्रहसिता मित्रा पवनञ्जय तेधवा ।
तद्दर्शनाविण घटी मास वर्ष समान वा ॥ ३९ ॥
निशासमयिं जाऊन पाहू गुप्तपणें तिला ।
पवना वदला मित्र करी सहन कोमला ॥ ४० ॥

---

१ नन्दीश्वर-पर्वाच्या उत्सवांत.

रात्रौ आकाशमार्गानें गेले उभय मित्र ते ।
सातव्या मजलीं सौधीं तिचें पाहति रूप तें ॥ ४१ ॥
वसन्तमाला वदली धन्य आहेस अञ्जने ! ।
पवनञ्जयं हा लाभे तुला पति शुभानने ॥ ४२ ॥
मिश्रकेशी म्हणे विद्युत्प्रभ हा योग्य वाटतो ।
अञ्जनेला पति जसा पवनञ्जय नैव तो ॥ ४३ ॥
स्वल्पायु विद्युत्प्रभ तो केव्हां ही वर योग्य न ।
पवनञ्जय हा योग्य वाटे चन्द्रसमानन ॥ ४४ ॥
पुनः वसन्तमालेस मिश्रकेशी वदे सखी ।
पवञ्जनय-लाभानें अञ्जना नच हो सुखी ॥ ४५ ॥
स्वल्पायु विद्युत्प्रभ ही अमृतासम तो असे ।
पवनञ्जय-दीर्घायु विषासम मला दिसे ॥ ४६ ॥
हें मिश्रकेशी-वचन ऐकून न निषेधि तें ।
अञ्जना हें प्रिय तिला असावें मज वाटतें ॥ ४७ ॥
ऐसा विचार चित्तांत येतां क्रोधान्ध[1] जाहला ।
सखीमस्तक तोडाया खड्ग घेऊन धावला ॥ ४८ ॥
सापराधा[2] जरी नारी न वधावेंचि वा तिला ।
करें धरून पवना प्रहासे[3] मग बोलला ॥ ४९ ॥
जशी अवध्य[4] असते गाय स्त्री ही न वध्य ती ।
अञ्जना सुन्दरी आहे निर्दोषचि वदू किती ॥ ५० ॥
अपराधी जरि नसे तथापि न निषेधिते ।
हिचा स्वीकार करणें मला योग्य न वाटतें ॥ ५१ ॥
ऐसें बोलून तेथून प्रहासा सह तो निघे ।
शय्येवरी जरि पडे न निद्रा त्याजला वघे ॥ ५२ ॥
सकाळीं वदला मित्रा जिच्या स्नेह मनीं नसे ।
वरावी ती कशासाठीं सौख्यदा ती न होतसे ॥ ५३ ॥
म्हणून स्वपुरा जाऊ राहावें या स्थलीं कसें ? ।
जें मना नावडे अन्न सेवणें व्यर्थ तें असे ॥ ५४ ॥

---

१ रागानें बेफाम. २ अपराध जिनें केला आहे अशी. ३ प्रहसित.
४ मारण्याला अयोग्य.

ऐसें बोलून पवन निघे स्वपुरिं जावया ।
रुष्ट झाला मनीं फार वायुवत् चालतां जया ॥ ५५ ॥
मित्रें प्रहासें धरिलें स्नेहें वचन बोलुनी ।
जें मान्य केलें लंघून जाणें योग्य न हो जनीं ॥ ५६ ॥
वडिलें जें ठरविलें मान्य तें करि वा सुखें ।
अनादर तयांचा तूं न करी व्यक्त वा मुखें ॥ ५७ ॥
अञ्जनेची नसे चूक याच्यांत तिळमात्र ही ।
मैत्रिणींचा असे दोष धरी चित्तीं न रोषही ॥ ५८ ॥
तुझ्या नि अञ्जनेच्या ही जनकीं ठेव आदर ।
शल्य हें हृदयांतून टाक काढून सत्वर ॥ ५९ ॥
सकलांच्या तुझें जाणें मानहानीस कारण ।
विचार देई सोडून दिसे यांत विवेक न ॥ ६० ॥
प्रहास बोलतां ऐसें पवनञ्जय थाम्बला ।
झाला विवाह थाटानें परि मानी न तो भला ॥ ६१ ॥
पक्षद्वयान्त[3] ते सर्व प्रमोदें तेथ राहिले ।
लतायुत द्रुमें[4] जिथें फलपुष्पें विराजले ॥ ६२ ॥
व्याही उभय अन्योन्यां आदरें गोड बोलती ।
सत्कार एकमेकांचा करिती ज्या नसे मिति[5] ॥ ६३ ॥
स्वपुरा जावया सज्ज सम्बन्धी जन जाहले ।
त्यांचे वियोगदुःखानें मन अत्यन्त पीडिलें ॥ ६४ ॥
भक्तीनें होति जे नित्य जिनांचे दास दुःख न ।
त्यांना कदापि जाणून करावें जिन-चिन्तन ॥ ६५ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत
पद्यानुवादे पद्मचरिते अञ्जनासुन्दरी-विवाहाभिधानं नाम पञ्चदशं पर्व ॥ १५ ॥

---

१ वाऱ्याप्रमाणें. २ पिल्यामध्यें. ३ एक महिनापर्यन्त. ४ वेलींनीं सहित झाडें. ५ प्रमाण.

# सोळाव्या पर्वांतील कथेचा सारांश

## पवनंजय व अंजनेची कथा

प्रल्हादराजा पुत्र व सुनेसह आपल्या नगराला गेला. सुनेला— अंजनेला त्यानें एक सुन्दर महाल राहण्यासाठीं दिला. परंतु पवनंजयानें अंजनेकडे ढुंकूनसुद्धा पाहिलें नाहीं. तो कधींही तिच्या महालांत गेला नाहीं. त्यामुळें अंजना अतिशय दुःखी झाली. तिचीं पुष्कळवर्षें अशीं पतिविरह-दुःखांत गेली. तिच्या मैत्रिणींना तिचें दुःखीजीवन पाहून अतिशय दुःख झालें.

एकेवेळीं प्रल्हादराजाच्या सभेंत रावणाकडून दूत आला. तो म्हणाला— राजन्, वरुणाबरोबर रावणाचें वैर वाढलें. त्याला जिंकण्यासाठीं त्यानें त्याच्या नगराला वेढा घातला आहे.

वरुणराजाहि आपल्या पुत्रासह शहराबाहेर रावणाबरोबर लढण्याकरितां आला. वरुणाच्या राजीव, पुण्डरीक आदि पुत्रांनीं खूप शौर्य गाजविलें. त्यांनीं रावणाच्या मेहुण्याला— खरदूषणाला पकडून आपल्या शिबिरांत नेऊन अटकेंत ठेविलें आहे.

तेव्हां रावणानें अनेक विद्याधर राजाकडे दूत पाठवून साहाय्य करण्यासाठीं लौकर ससैन्य या असें कळविलें व आपणाकडे मी आलों आहे. यास्तव आपण रावणास साहाय्य करण्याकरितां ससैन्य लौकर निघावें. रावणाच्या आज्ञेप्रमाणें प्रल्हादराजा निघाला पण त्याला पवनंजयानें "पिताजी, आपण येथेंच राहावें मी युद्धास जातो" असें सांगून, निघण्याची तयारी केली. आपल्या मित्रादिकांना भेटून तो ससैन्य निघाला. ही वार्ता अंजनेला समजली. ती महालावरून खालीं आली व पतीच्या चरणावर मस्तक ठेवून तिनें दीनवाणीनें म्हटलें "नाथ, आपण स्वजनांना प्रेमानें मधुर भाषण करून निघालेले आहांत या दीनदासीला एक तरी मधुर शब्द बोला." मी आपली हजारो मंगलें— इच्छितें. "पुनः आपले सुखानें आगमन होवो," परंतु

पवनंजयानें तिची अवज्ञा केली. रागानें येथून बाजूला सरक असें म्हटलें व तिच्यावर जळजळीत असा कटाक्ष फेकला व पुढें प्रयाण केलें.

ही अवज्ञा असह्य होऊन ती धाडकन् अंगणांत पडली. पवनंजय आकाश-मार्गानें निघून सायंकाळीं कैलासपर्वताच्या मानससरोवराजवळ ससैन्य आला. तेथें प्रासाद-रचना करून सरोवराच्या कांठीं सुखकर शीत हवेचा अनुभव घेत बसला.

त्यावेळीं चक्रवाकी पतिविरहानें आक्रन्दन करीत पतीचा शोध करूं लागली. पाण्याचा शीतस्पर्श तिच्या शरीराला उष्ण भासूं लागला. चन्द्राच्या शीतल चांदण्याचे तिच्या अंगाला चटके बसूं लागले. हें करुणावह दृश्य पाहून पवनंजयाला अंजनेची आठवण झाली. "आपल्या विरहानें ती अतिशय दुःखी झाली आहे. आपण लग्नापासून तिचा त्याग केला आहे. लग्न होऊन पुष्कळवर्षे झाली पण तिला एका शब्दानेंहि आपण आपलें प्रेम व्यक्त केलें नाहीं. जर आपण तिची यावेळीं भेट घेतली नाहीं तर ती विरहदुःखानें प्राणत्याग करील." असें त्याला वाटूं लागलें. व आपला अभिप्राय त्यानें 'प्रहसित' मित्राला कळविला. त्यानेंही त्याला दुजोरा देऊन सांगितलें कीं, 'अवश्य तूं अंजनेची भेट घे. व तिला सुखी कर नंतर युद्धासाठीं प्रयाण करता येईल.

नंतर ते दोघे तेथून निघाले व अंजनेच्या महालाकडे आले. प्रहसित पवनाला म्हणाला मित्रा, थोडावेळ तूं येथेंच थांब मी अंजनेची काय अवस्था झाली आहे हें चटकन् पाहून येतो व नंतर तूं तिच्याकडे जा. असें म्हणून त्यानें गुप्तपणें महालांत प्रवेश केला. तिचें विरहदुःख पाहून त्याचें मन द्रवलें व तो प्रगट होऊन तिला म्हणाला 'स्वामिनी, मी प्रहसित आहे व पवनंजय आतां येत आहे हें कळविण्यासाठीं मी आलो आहे. माझ्या भाषणांत एकही शब्द खोटा नाहीं असें म्हणून तो पवनंजयाकडे जायाला निघाला इतक्यांत पवनंजयानें तेथें प्रवेश केला.

प्रहसित महालाच्या बाहेर गेला. पवनंजयानें 'मीं तुला फार छळलें, मी क्षुद्रहृदयाचा मनुष्य आहे तूं मला क्षमा कर. मी हात जोडतो' असें म्हणून तो तिच्या पायावर मस्तक ठेवणार इतक्यांत तिनें म्हटलें नाथ आपण महापुरुष आहा. मी क्षुद्र स्त्री आपल्या चरणाची दासी आहे. असें म्हणून ती दूर सरली.

पवनंजयानें तिला गाढ आलिंगून पलंगावर बसविलें. ती रात्र उभयतांनीं आनन्दांत व्यतीत केली. आनंदाच्या भरांत रात्र केव्हां संपली हें त्या जोडप्यांना समजलें नाहीं.

प्रातःकाल झाला व पवनंजय जाण्यासाठीं निघाला. तेव्हां अंजनेनें हात जोडून म्हटलें "नाथ, मी ऋतुस्नात असल्यामुळें आपल्या संगमानें मला गर्भ राहण्याचा संभव आहे व आपण कोणाला न कळवितां जात असल्यामुळें आपल्यापरोक्ष 'अपवाद' मी नाहींसा करूं शकणार नाहीं– याचा विचार करा." पवनंजयानें 'प्रिये घाबरूं नकोस, मी तुला माझ्या नावाचें हें कडें देतो. अपवादप्रसंगीं तूं दाखव असें बोलून तो प्रहसितासह तेथून मानससरोवराकडे गेला व तेथून सैन्यासह रावणाकडे जाऊन पोचला.

# पर्व सोळावें

वधूवरास घेऊन प्रल्हाद स्वपुरा निघे ।
अञ्जनेविपयीं स्नेह वराच्या न मनीं रिघे ॥ १ ॥
अञ्जनेला दिला सौध राहाया बहु सुन्दर ।
परि प्रवेश न करी केव्हांही तो तिचा वर ॥ २ ॥
एक शब्दहि बोले न नच नेत्रेंहि पाहि तो ।
राहे अति उदासीन मनीं रोपचि वाहतो ॥ ३ ॥
कृष्णपक्षीं निशा[1] जैशी चन्द्राविण न शोभते ।
अञ्जना पवनावीण शोभारहित भासते ॥ ४ ॥

( अंजनेला झालेल्या पतिविरहाचें वर्णन. )

साध्वी पतिवियोगानें शय्येवरि सदा वळे ।
अत्यन्त दीर्घशी वाटे वर्षासम निशा गळे ॥ ५ ॥
गुडघ्यावरि ठेवून मुखचन्द्र सदा वसे ।
खिन्ना पतिमना साध्वी मुखावरि हसे नसे ॥ ६ ॥
करुणा मनिं येऊन सखी बोलाविती तिला ।
पतिध्यानांत राहून न बोले विरहाकुला[2] ॥ ७ ॥
दुःखांत या परि तिचा असतां काल चालला ।
दशास्य-दूत प्रल्हादाकडे येऊन बोलला ॥ ८ ॥

( रावणानें पाठविलेल्या दूताचें भाषण. )

वैर राक्षस-राजाचें वरुणासह जाहलें ।
प्रणाम तो नच करी तेणें समर जुम्पलें ॥ ९ ॥
आहे रावण तो कोण त्याला मानीन मी नच ।
कुबेर, इन्द्र, यम तें मानोत नित तद्वचें[3] ॥ १० ॥
सहस्ररश्मि मी नाहीं नाहीं मी नलकूवर ।
मरुत्त नृप मी नाहीं जो झाला वश सत्वर ॥ ११ ॥
देवतादत्तरत्नांनीं रावणा गर्व जाहला ।
हरीन सगळा तो मी जो असे बहु साठला ॥ १२ ॥

---

१ अमावास्येची रात्र. २ पतिविरहानें खिन्न झालेली. ३ रावणाची आज्ञा.

असें भाषण ऐकून कोपें सन्तप्त रावण ।
वरुणाच्या पुरा रोधी सैन्य घेऊन दारुण ॥ १३ ॥
राजीव-पुण्डरीकादि पुत्रांनीं परिवारित ।
निघे वरुण युद्धार्थ कोपज्वालाकरालित ॥ १४ ॥
केलें वरुणपुत्रांनीं युद्ध फार भयङ्कर ।
नेला धरून युद्धांत खरदूषण सत्वर ॥ १५ ॥
तेव्हां घावरलें सैन्य राक्षसांचें पलायन ।
करी वरुण सानन्द नगरांत प्रवेशन ॥ १६ ॥
विद्याधर-नृपालांना दूत पाठविले म्हणी ।
साहाय्य करण्यासाठीं यावें सैन्यास घेउनी ॥ १७ ॥
आज्ञापत्रें दशास्याचीं पाहून खगभूपति ।
निघाले सैन्य घेऊन आले ते रावणाप्रति ॥ १८ ॥
प्रल्हादहि दशास्यास साहाय्य करण्यास्तव ।
निघे ससैन्य पाहून पवनंजय तद्भव ॥ १९ ॥

( पवनंजयाचें युद्धासाठीं प्रयाण. )

वदे पिताजी येथेंच राहा आपण मी रणा ।
जातो साहाय्य करितों चिन्ता जावे न रावणा ॥ २० ॥
तन्मनोरथ हा पूर्ण करील तुमचा सुत ।
असें साग्रहें बोलून निघाया होय उद्यत ॥ २१ ॥
सम्बन्धि स्वजनां सर्वां सांगून पवनञ्जय ।
निघे ही समजे वार्ता अञ्जनेला यदा भय ॥ २२ ॥
वाटे घ्यावें स्वभर्त्याचें दर्शना तंव उत्सुक ।
होऊन आली तीं खालीं उभी राहेचि संमुख ॥ २३ ॥
जी शुक्ल-प्रतिपच्चन्द्राप्रमाणें कृश जाहली ।
वाटे जनास जणु जी शुभ्र पाषाणवाहुली ॥ २४ ॥
भालावरी जिच्या केश आले होते अशी स्थिर ।
खांबास टेकुनि उभी राही ही दीनता चिर ॥ २५ ॥

---

१ क्रोधाग्नीनें भयंकर. २ विद्याधर-राजे. ३ प्रल्हादापासून उत्पन्न झालेला अर्थात् त्याचा पुत्र पवनञ्जय. ४ आग्रहानें. ५ शुक्लपक्षाच्या पहिल्या दिवशीं जशी चन्द्राची कोर वारीक असते तशी.

जिच्या ओघळ अश्रूचे दिसती वदनावर ।
पाहिली अञ्जना ऐशी पवनें दूर तूं सर ॥ २६ ॥
म्हटलें कोप येऊन तेव्हां ती कर जोडुन ।
वदली चरणीं त्याच्या आदरें शीर्ष ठेवुन ॥ २७ ॥
प्रेमें बोलून मधुर स्वजनां नाथ चालला ।
न एक शब्द हि मला तिरस्कारें हि बोलला ॥ २८ ॥
असो स्मरण दासीचें मनीं व्हावें कधीं तरी ।
विज्ञप्ति एवढी माझी घ्यावी कर्णीं हृदन्तरीं ॥ २९ ॥
द्यावी दासीस या भेट पुनः कुशल आपुलें ।
इच्छिते नाथ दीना ही सहस्राधिक[1]-मङ्गलें ॥ ३० ॥
येणें व्हावें पुनः नाथ तुष्टि पुष्टि सदा असो ।
होवोत मार्ग सगळे शिवसौख्य[2] सदा वसो ॥ ३१ ॥
वदली दीन-वाणीनें अञ्जना स्थिर-लोचना ।
अवज्ञुनि तिला जाई तो शूर समराङ्गणा ॥ ३२ ॥
पत्यवज्ञा[3]-वियोगानें दुःखी ती अङ्गणीं पडे ।
प्रचण्डपवनाघातें[4] लता जेवि तटाकडे ॥ ३३ ॥
पवनञ्जय वेगानें आकाशें जात पोचला ।
रात्रि-प्रारम्भ-समयीं सैन्यें तो मानसस्थला ॥ ३४ ॥
तेथें प्रासादरचना करून नृपपुत्र तो ।
सरोवरतटीं बैसे शीतवातास सेवितो ॥ ३५ ॥
तेथें पतिवियोगानें चक्रवाकीस पीडित ।
पाही जी निजआक्रन्दें पतीला नित्य वाहत ॥ ३६ ॥
गेलें तच्चित्त तैं तेणें महेन्द्र-तनयेकडे ।
चक्रवाकी-समचि ती आहे भोगीत सांकडें[5] ॥ ३७ ॥
मृणालखण्ड[6] जो तोडीं आहे तैसाचि राहिला ।
लागे शीत-जल-स्पर्श उष्णसा कोमला तिला ॥ ३८ ॥

---

१ हजारोपेक्षाही अधिक. २ सुख देणारें. ३ पतीनें केलेला तिरस्कार व पतीचा विरह. ४ सोसाट्याच्या वाऱ्याच्या मारानें. ५ कष्ट—विरहदुःख. ६ कमळाच्या देठाचे तुकडे.

चन्द्राचे शीत किरण तिच्या अंगास जाळिती ।
करुणाक्रन्दन[1] करी पाहे ऐशी तिची स्थिति ॥ ३९ ॥
दिवसां चक्रवाकी ही क्रीडा पतिसवें करी ।
परन्तु रात्रिसमयीं दुःखिता होय अन्तरीं ॥ ४० ॥
( अंजनेचें विरहदुःख नाहींसें करण्यासाठीं पवनाचें आगमन. )
अञ्जनेस विवाहून सर्वथा त्यागिलें तिला ।
न एक शब्द हि मुखें बोललों आज तें मला ॥ ४१ ॥
दुःख देई मना फार वागणें मम निर्दय ।
प्राणा त्यागील कीं काय वाटतें मन्मना भय ॥ ४२ ॥
प्रयाणसमयीं केला मी तिरस्कार जो तिचा ।
तो घोर दुःखदायीच हेतु होईल मृत्युचा ॥ ४३ ॥
विचार या परि मनीं येतां हृदयिं ये दया ।
सान्त्वनार्थ तिच्या जावें हेतु तेंचि सुखोदया ॥ ४४ ॥
बोले प्रहसिता तेव्हां पवन स्वमनोगत ।
हसून मित्र वदला विवेक मनिं जागृत ॥ ४५ ॥
बहुसंवत्सरें[2] झाला तेणें होईल तद्धित ।
जाणें योग्य मला वाटे हो मित्रा शीघ्र उद्यत ॥ ४६ ॥
जाऊन बोल मधुर सुखी करि तिच्या मना ।
तदनन्तर येईल जातां बा तुजला रणा ॥ ४७ ॥
अनुकूलोक्ति[3] मित्राची जाणून पवनञ्जय ।
निघे तत्काल घेऊन मित्रा शुभदयोदय[4] ॥ ४८ ॥
अञ्जनेच्या गृहद्वारा समीप मग येउन ।
उभा ठाके प्रहसितासह हर्षित होउन ॥ ४९ ॥
येथेंचि थांब पवना गुप्त जाऊन मी गृहीं ।
पाहतो अञ्जनादेवी-दुरवस्थेस[5] सर्व ही ॥ ५० ॥
केला प्रवेश बोलून सौधीं कोणी न जाणती ।
अशा प्रदेशीं राहून पाहतो सुमति[6] स्थिति ॥ ५१ ॥

---

१ दयेला उत्पन्न करणारें रडणें. २ अनेक वर्षांनीं. ३ अनुकूल भाषण. ४ चांगल्या दयेची ज्याच्या मनांत उत्पत्ति झाली आहे असा. ५ अंजनादेवीची दुःखदायक अवस्था. ६ सुबुद्धीचा प्रहसित.

(विरहदुःखी अंजना)

अल्पोदकीं[1] तळमळे मत्सी[2] त्या परि अञ्जना ।
शय्येवरी तळमळे शान्ति वाटे न तन्मना ॥ ५२ ॥
हिमें[3] कमलिनी जैशी ज्योत्स्नेनें तेवि अञ्जना ।
झाली दुःखित पाहून खिन्नता येइ तन्मना ॥ ५३ ॥
पलङ्गावरती केव्हां खालीं येऊन ती वसे ।
पुनः पलङ्गावरती, खाली वर करितसे ॥ ५४ ॥
हाय हाय असे शब्द निघती वदनांतुनी ।
दीर्घ निश्वास हि निवे अश्रु येतात लोचनीं ॥ ५५ ॥
वसन्ततिलका बोले धैर्य बाई धरून गे ।
आल्या दुःखास भोगावें उपायान्तर त्या नुगे[4] ॥ ५६ ॥
शून्यचित्त बघे लावी दृष्टि कोणीकडे तरी ।
लाकडी पुतळी वाटे बघे जो तीस अन्तरीं ॥ ५७ ॥
प्रहास प्रगटे तेथें अकस्मात् बघतां तया ।
भूत आलें असें वाटे धरी मन तिचें भया ॥ ५८ ॥
धैर्य तथापि वदली तुझें येणें न योग्य हें ।
जा चालता हो येथून मन कोपें तिचें दहे ॥ ५९ ॥
वसन्तमाले या मार गचांडी दे हकालुनि ।
मी चन्द्रनिर्मल असे नाहीं माझ्या क्षमा मनीं ॥ ६० ॥
अधिकार असे फक्त येण्याचा पवनञ्जया ।
येथें अन्या न कोणास मन्मनीं न वसे दया ॥ ६१ ॥
का पाहतोस निर्लज्जा मला जा नीघ येथुनी ।
प्रहास वन्दुनि वदे हो शान्त स्वामिनी मनीं ॥ ६२ ॥
जसा वसन्त कामाचा[5] मित्र मी पवनञ्जया ।
उत्कण्ठें तो इथें आला शीघ्र बोलावितों तया ॥ ६३ ॥
मी स्वामिनि पुढें आलों आतां येईलचि प्रिय ।
वियोगदुःख सगळें पावेल नियमें लय ॥ ६४ ॥

---

१ थोड्या पाण्यांत. २ स्त्री मासा. ३ थंडीनें. ४ दुसरा उपाय उगवला नाहीं. ५ मदनाचा.

अञ्जना वदली मातें दैवानें उपहासिलें ।
प्रहास तूंहि हससी माझें होईल कां भलें ॥ ६५ ॥
अथवा दोष न तुझा मत्कर्माचाच दोष हा ।
पतित्यक्ता म्हणुनि मी कर्मदोषं छळी हहा ॥ ६६ ॥
*लग्नापासूनचि मला आजपर्यन्त सोडिलें ।
वर्षं बावीस पतिनें जिवन्त तरि राहिलें ॥ ६७ ॥
मी फार छळिलें ऐशा विचारें दुःख जाहलें ।
ज्याला प्रह्लादतनयें तेथें पाऊल टाकिलें ॥ ६८ ॥
तद्वाणी गद्गदा झाली नेत्रीं अश्रु तरारले ।
अतीव हळवें झालें मन तद्धैर्य तैं गळें ॥ ६९ ॥
प्रिये निर्दोष असतां दोषारोप तुझ्यावरी ।
लग्नापासून करुनि त्यागिलें तूं क्षमा करी ॥ ७० ॥
अवज्ञिलें तुला फार जळतो आज अन्तरीं ।
जीवितेश तिला बोले पवनञ्जय यापरि ॥ ७१ ॥
नाथा बघून आलेल्या झाली लज्जित अन्तरीं ।
हर्ष झाला तिला फार कान्ति येइ मुखावरि ॥ ७२ ॥
हत्ती लतेस सोंडेनें उचली त्यापरी तिला ।
उचलून महास्नेहें मञ्चकावरि बैसला ॥ ७३ ॥

( अंजना सुंदरी व पवनंजय यांचें मीलन. )

वदे पवन तैं तीस बुद्धि क्षुद्र असे मम ।
केलें दुःखित दुष्टें मी झालों निर्दय निर्मम ॥ ७४ ॥
करी क्षमा मजवरि प्रिये मी हात जोडितों ।
अपराधी असे मोठा पदीं मस्तक ठेवितों ॥ ७५ ॥
क्षुद्र स्त्री मी असे नाथ महापुरुष आपण ।
क्षमा मला न मागावी ऐकावें मम भाषण ॥ ७६ ॥
मी आपुली सदा दासी धन्य हा आजचा क्षण ।
अत्यानन्द मला झाला मावे तो गगनांत न ॥ ७७ ॥

---

* तस्या विनापराधेन मया परिभवः कृतः ।
द्व्यग्रं विंशतिमब्दानां पाषाणसमचेतसा ॥ १३७ ॥ पर्व १६

वसन्तमालिका आणि प्रहास तदनन्तर ।
गेले तेथून वसले दम्पती मञ्चकावर ॥ ७८ ॥
दृढ आलिङ्गुनि वदे अञ्जनेस प्रभञ्जन[1] ।
गेलें दुःख तुझें दूर सुखवी हा तुला जन ॥ ७९ ॥
दम्पती करिती नाना रतिक्रीडा सुखार्णवीं ।
झाले निमग्न नुमजे संपली रात्र ही नवी ॥ ८० ॥
प्रभातकाल पाहून अञ्जनेस वदे प्रिय ।
जयार्थ मी प्रिये जातो दुःखाचें न तुला भय ॥ ८१ ॥
इतःपर नको देऊ स्थान खेदा सखीसवें ।
राही प्रमोद मानून दुःख आतां न जाणवें ॥ ८२ ॥
नाथा आहा महाशूर जय सिद्धचि आपुला ।
कृतार्थ शीघ्र होऊन दर्शनें सुखवा मला ॥ ८३ ॥
वार्ता मी दुसरी एक आपण नाथ सांगते ।
मी आजचि ऋतुस्नात गर्भ हो तव संगतें ॥ ८४ ॥
परोक्ष आपुल्या नाथ निन्दितील मला खल ।
अपवाद हराया न क्षम हो अवलावल ॥ ८५ ॥
प्रिये नकोस चिन्ता तूं करूं येईन शीघ्र मी ।
अपवाद न केव्हांही येऊ देईन मी क्षमी[2] ॥ ८६ ॥
अथवा मी तुझ्या सोधीं आलों होतो असें जयें ।
होय सूचित मन्नाम-वलयां[3] घेइ तूं प्रिये ॥ ८७ ॥
अपवादप्रसंगीं तूं वलया दाखवी जना ।
टळेल तेणें तो मोद होईल तुझिया मना ॥ ८८ ॥
देऊन वलया गेला नभोमार्गें प्रभञ्जन ।
अपुल्या शिबिरीं ज्याचें हर्षमग्न बने मन ॥ ८९ ॥

## आर्या.

शुभ कर्माच्या उदयें जीवाला वस्तु चांगल्या मिळती ।
तेणें त्या सुख होतें बनून अरि मित्र करि अतिप्रीति ॥ ९० ॥

---

१ पवनञ्जय. २ समर्थ. ३ माझें नांव खोदलेलें कडें.

केव्हां जीवा ठायीं अशुभाचा उदय तीव्र होऊन।
दुःख तयाला होतें तळमळतें तेधवा अतीव मन ॥ ९१ ॥
संसारी जीवाची न सारखी राहते कधीं हि दशा।
करितो प्राणी पातक मनांत परि ठेवि सतत सौख्याशा ॥ ९२ ॥
आजन्म-मरण कांहीं जीव सुखी सर्वदा जना दिसती।
धर्में विहीन परि ते भवान्तरीं तीव्र दुःख अनुभवती ॥ ९३ ॥
जिनवरधर्म जनांना असुखाचा नाश करुनि सुख देतो।
जिनदास जो तयाला अवलम्बी मुक्तिसौख्यरत होतो ॥ ९४ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे पद्मपुराणे पवनाञ्जनासंभोगाभिधानं नाम षोडशं पर्व ॥ १६ ॥

---

## सतराव्या पर्वांतील कथेचा सारांश

अंजनासुन्दरीच्या मनाला आनंदित करून पवनंजय रावणाला युद्धांत साहाय्य करण्याकरितां गेला. पवनाला पाहून रावणाला आनंद वाटला. रावणाच्या आज्ञेनें वरुणावर पवनानें आक्रमण केलें व आपल्या पराक्रमानें त्यानें रावणाला आनन्दित केलें.

इकडे पवनञ्जयाच्या भेटीनें अञ्जनेला गर्भ राहिला. व तो वाढू लागला. गर्भामुळें अंजनेचे स्तनाग्र काळे झाले– चालतांना आळस जाणवूं लागला. डोळे ज्यास्त तेजस्वी दिसूं लागले– हीं गर्भलक्षणें पाहून सासूला वाटलें कीं अंजनेचें पाऊल वाकडें पडलें. मुलानें लग्नापासूनच तिचा त्याग केला असल्यामुळें त्याच्यापासून तिला गर्भ राहणें शक्यच नाहीं असें तिला खात्रीनें वाटलें. त्यामुळें ती तिच्यावर अतिशय रागावली– "मी तशी कुलटा नाहीं, मला गर्भ पवनंजयापासूनच राहिला आहे. त्यांनीं ज्यादिवशीं युद्धासाठीं प्रयाण केलें त्याच दिवशीं रात्रीं माझ्या महालांत ते आले होते. व अपवादापासून रक्षण व्हावें म्हणून त्यांनीं स्वनामांकित हें कडें दिलें आहे. मी शुद्ध आहे असें तिनें पुष्कळ सांगितलें. परंतु ती म्हणाली माझ्या मुलानें तुझा त्यागच केला आहे. यास्तव तूं मला कडे दाखवून फसवीत आहेस. तूं आमच्या कुलाला कलंकित केलें आहेस. तुला आतां एक निमिष देखिल आम्ही येथें राहू देणार नाहीं" असें बोलून तिनें रथ सज्ज करविला व रथ हाकणाऱ्याला अंजनेच्या बापाच्या गांवाजवळ तिला सोडून ये म्हणून निक्षून सांगितलें. रथांत अंजना व वसन्तमाला दोघींना बसवून तो रथ त्यानें महेन्द्र नगराजवळ थांबविला. त्या दोघींना उतरावयास सांगितलें व तो रथ त्यानें परत आदित्यपुराकडे नेला.

अंजना अतिशय दुःखित झाली. संध्याकाळ झाल्यामुळें त्या दोघींना महेन्द्र-पुराला जाता आलें नाहीं. सकाळीं बापाच्या– महेन्द्रराजाच्या दरवाजापुढें दोघी आल्या. वसंतमालेनें सर्व हकीकत द्वारपालाला सांगितलीं. त्यानें आपल्या पित्याची परवानगी विचारून मी आंत प्रवेश करू देईन असें सांगितलें. तो आंत गेला. सर्व

हकीकत सांगितल्यावर राजाला– पित्याला कलंकित झालेल्या मुलीला घरीं ठेवून घेणें योग्य नाहीं असें वाटलें. अंजनेच्या भावाला– प्रसन्नकीर्तीलाहि तसेंच वाटलें. तो म्हणाला " पिताजी ज्या करंगळीला सर्पदंश झाला आहे ती तोडूनच टाकली पाहिजे तसेंच या कलंकित अंजनेचाहि त्यागच केला पाहिजे. आपण हिला घरांत बिलकुल आश्रय देऊं नका एवढेंच नव्हे तर हिला गावांतही कोठें ठेवूं नका " असें सांगितलें. त्यामुळें पित्याचें शहर त्यागून वनांत त्या दोघींना जावें लागलें. अंजना अत्यंत दुःखी झाली. तिची अशी अवस्था पाहून लोकांच्याही डोळ्यांत अश्रु उभे राहत असत.

गर्भभारानें थकलेली अपवादानें दुःखी झालेली अशी ती अंजना वनांतून चालत असतां पायांत काटे मोडून रक्तानें जमीन लाल झाली. चालत चालत एका पर्वताच्या गुहेजवळ त्या दोघी आल्या. तेथें एक ' अमितगति ' नामक मुनि बसले होते. त्यांच्या देहकान्तीनें तो गुहाप्रदेश उज्ज्वल झाला होता. त्या दोघींनीं त्यांना वंदन केलें. त्यांनीं दोघींना ' धर्मलाभ ' आशीर्वाद दिला. वसन्तमालेनें अंजनेची सर्व हकीकत सांगितली व तिनें म्हटलें कीं प्रभो, हिच्या गर्भात कोणता जीव आला आहे कीं ज्याच्यामुळें हिला अतिशय दुःख भोगावें लागत आहे? मुनीश्वर म्हणाले, गर्भांत आलेल्या जीवामुळें हिला दुःख भोगावें लागलें आहे असें नाहीं. त्याचें कारण दुसरेंच आहे. प्रथमतः गर्भांत आलेल्या पुण्यवान् जीवाचें पूर्वचरित्र सांगतों तें ऐका.

या जंबूद्वीपांत मन्दर नामक नगरांत प्रियनंदी व जाया या दंपतीला ' दमयन्त ' नामक पुत्र झाला. तो एकदा आपल्या अनेक मित्रासह बगीचांत जलक्रीडा करण्यासाठीं गेला असतां त्याला मुनीश्वराचें दर्शन झालें व त्यांचा धर्मोपदेश ऐकायला मिळाला. त्यानें सम्यक्त्वासह अणुव्रतें घेतलीं; तो सत्पात्रांना आहारादि दान देत असे. मरणसमयीं समाधि साधून तो स्वर्गांत जन्मला; तेथील आयुष्य संपल्यावर मृगांक पुरांत हरिचन्द्र व प्रियंगुलक्ष्मी या राजदंपतीला ' सिंहचन्द्र ' नामक पुत्र झाला. यानें जिनधर्माचें पालन करून समाधिमरणानें प्राण-विसर्जन केलें. स्वर्गांतील दिव्यसुखानुभव घेऊन मरण झाल्यावर वैताढ्यपर्वतावरील ' वारुणी ' नगरांत सुकण्ठ व कनकोदरी या राजदंपतीचा पुत्र ' सिंहवाहन ' या नांवाचा झाला. यानें विमलतीर्थंकरांच्या तीर्थांत विरक्त होऊन ' लक्ष्मीतिलक ' मुनीश्वराजवळ दीक्षा घेतली. उत्तम तप व आत्मचिंतन करून लांतव स्वर्गांत तो जन्मला. तेथून आयुष्य संपल्यावर तो अंजनेच्या उदरीं गर्भांत आला आहे. येथपर्यन्त गर्भस्थ जीवाचें पूर्वभव वर्णन केलें.

यानंतर अमितगतींनीं अंजनेला कोणत्या कारणांनीं दुःख प्राप्त झालें, तें याप्रमाणें सांगितलें:– बाळे, अंजने ज्या भवांत तूं सुकण्ठराजाची पट्टराणी कनकोदरी होतीस तेव्हां तुला 'लक्ष्मी' नांवाची एक अत्यन्त सुन्दर, जिनधर्म तत्पर, सम्यग्दृष्टि, जिनभक्ति व जिनपूजेंत तत्पर राहणारी सवत होती. तुला पट्टराणीपदाचा मोठा गर्व होता. तूं तिचा मत्सर करीत होतीस. एकदा तूं मत्सरामुळें जिनप्रतिमा उचलून बाह्यप्रदेशांत नेऊन ठेविलीस.

त्यादिवशीं 'संयमश्री' नामक प्रसिद्ध तपस्विनी आर्यिका आहारासाठीं आली होती. तिला जिनेश्वराचा घोर अविनय तूं केलेला आहेस असें समजलें. तिनें आहाराचा त्याग करून तुझें हित व्हावें म्हणून तुला उपदेश केला. ती म्हणाली वत्से "मिथ्यात्वानें मोहित होऊन तूं हें घोर अविनय कार्य केलें आहेस. याचें कटु फल तुला भोगावें लागेल. जरी जिनबिम्ब रागावत नाहीं किंवा प्रसन्नही होत नाहीं पण तुझ्या ठिकाणीं त्याच्या संबन्धानें जो द्वेष उत्पन्न झाला तो पापबन्धाला कारण झाला आहे. जिनेश्वर, निर्ग्रन्थगुरु व जिनशास्त्र रागद्वेपरहित असतात. पण त्यांच्याविषयीं रागद्वेष जीवाचे ठिकाणी होऊन ते शुभकर्म व अशुभकर्मांच्या बन्धाला कारण होतात. अग्निसेवनानें थंडीचें दुःख नाहींसें होतें; अन्नजलसेवनानें भूक तहान मिटते तसें जिनगुरुशास्त्रांच्या पूजेनें विनयानें शुभ-हित-कल्याण होतें व तिरस्कारानें अहित होतें. पापापासून दुःख व पुण्यानें सुख मिळतें. पुढच्या जन्मीं तुला सुख मिळावें म्हणून तूं जिनपूजा करीत जा, मनांत विवेक धारण कर" या उपदेशानें तिनें मिथ्यात्व त्यागलें. तिला जिनगुरुशास्त्रांत दृढ श्रद्धान उत्पन्न झालें. तिनें गृहस्थधर्म धारण केला. यथाशक्ति तपोव्रतें केलीं. आर्यिकेनें केलेल्या उपदेशाचा स्वीकार केल्यामुळें तिला आनंद वाटला व ती स्वस्थानीं निघून गेली. पुढें तूं आयुष्य संपेपर्यन्त गृहस्थधर्माचें उत्तम पालन केलेंस. मरणोत्तर स्वर्गांत उत्पन्न होऊन सुख भोगलेंस तेथून च्युत होऊन तूं महेन्द्रकन्या अंजना झालीस. या भवांत जिनप्रतिमेचा कांहीं काल बाह्यप्रदेशांत ठेवून जो अविनय-तिरस्कार केला होतास त्या अशुभकर्माचा उदय येऊन पतीनें तुझा बावीस वर्षें तिरस्कार केला. तुझा त्याग केला. तें दुःख तुझें आतां संपलें. तूं येथून सुखी होशील. तुझ्या गर्भी महापुरुष आला आहे. तो तुझ्या दुःखाला कारण नाहीं असें समज.

याप्रमाणें पूर्वभवाचें वर्णन करून ते मुनिराज आकाशमार्गानें निघून गेले.

अंजना व तिची सखी वसन्तमाला दोघींनी त्यांना वंदन केलें व त्याच गुहेंत त्या राहिल्या. रात्रीं एक सिंह त्या गुहेजवळ आला पण तें संकट त्या गुहेच्या रक्षक देवानें नाहींसें केलें. प्रसूतीचा समय आला व तिनें अत्यंत सुन्दर व तेजस्वी बालकाला जन्म दिला. त्याचवेळीं तेथें तिचा मामा प्रतिसूर्य आपल्या पत्नीसह आला व त्यानें तिला ओळखलें. मामाबरोबर आलेल्या ज्योतिष्यानें बालकाची जन्मकुण्डली वर्तविली व बालक महापुरुष होणार असल्याचें विवेचन करून सांगितलें. नंतर बालकासह व सखीसह विमानांत बसून अंजना मामाबरोबर जात असतां बालकानें मोत्याचे घोस पाहून उसळी मारली व तो खालीं पर्वताच्या शिलेवर पडला. पण वज्रदेहीं असल्यामुळें त्याला कांहींच इजा झाली नाहीं. शिलेचे मात्र शेकडो तुकडे झाले. बालकाला मातेच्या मामानें शिलेवरून उचलून विमानांत आणिलें. थोड्या वेळानें ही सर्व मंडळी हनूरुहपुराला येऊन पोहोंचली. बालकाचा जन्मोत्सव मोठ्या थाटानें केला. बालकाचीं श्रीशैल व हनुमान अशीं दोन नांवें ठेवलीं. वज्राप्रमाणें शिलेचें चूर्ण केल्यामुळें श्रीशैल व हनूरुहपुरांत वृद्धिंगत झाल्यामुळें हनूमान् अशी दोन सार्थक नांवें योजिली गेलीं.

अंजना पुत्रप्राप्तीमुळें सुखी होती पण पतिविरहामुळें तिला दुःख होत होतें. आपल्यावर आलेल्या अपवादाचें परिमार्जन होऊन पूर्वीचें पूज्यसतीपद केव्हां प्राप्त होईल ही चिन्ता तिच्या मनाला सतत दुःखी करीत होती. यामुळें तिच्या देहांत कृशता आली होती.

या पर्वाचा निष्कर्ष याप्रमाणें जाणावा—

पुण्योदयानें सुख मिळतें व संकटें दूर होतात. म्हणून पापापासून दूर राहून मानवानें जिनभक्ति करावी व सुचारित्राचें पालन करावें. त्यामुळें सुख मिळतें व परंपरेनें मोक्ष प्राप्त होतो.

# सतरावें पर्व.

गेला ससैन्य तेथून दशकण्ठाकडे त्वरें ।
पाहून पवना त्याचें मोदें मन भरे पुरें ॥ १ ॥
रावणाज्ञा मिळवुनी वरुणावरि धावला ।
बघून विक्रमा त्याच्या दशास्य मनिं मोदला ॥ २ ॥
[ गर्भवती अंजनेला केतुमती सासू घरांतून हाकालून देते. ]
पवनञ्जय-भेटीनें गर्भ त्याच दिनीं तिला ।
राहिला शुक्तिपुटकीं[1] जसा मौक्तिक[2] शोभला ॥ ३ ॥
अञ्जनेच्या मुखीं आला तेधवा पांढरेपणा ।
स्तनाग्र काळे बनले आलस्य गमन-क्षणा ॥ ४ ॥
नेत्रीं उज्ज्वलता आली गर्भाचीं लक्षणें अशीं ।
पाहून सासू वदली अञ्जना न दिसे वशी[3] ॥ ५ ॥
कलङ्कित तुवा केलीं कुलें दुष्ट कुलक्षणें ।
पति देशान्तरीं जातां दिसतीं गर्भलक्षणें ॥ ६ ॥
माझ्या पुत्रें अवज्ञून लग्नापासून सोडिलें ।
तुला तूं शुद्धचि असे मी अद्यावधि[4] मानिलें ॥ ७ ॥
परि नाहींस तूं तैशी आतां निश्चित जाहलें ।
गालबोट अकार्यें या अस्मद्वंशास लागलें ॥ ८ ॥
कठोरशब्दें सासूच्या अञ्जना खिन्न जाहली ।
अश्रूंनीं भरले डोळे कष्टें यापरि बोलली ॥ ९ ॥
माते प्रयाण येथून केलें त्याच दिनीं इथें ।
रात्रौ परत येऊन तोषवीलें तुझ्या सुतें ॥ १० ॥
नामाङ्कित[5] कडें त्यांनीं अपवाद हरावया ।
दिलें असे परनरस्पर्श नाहीं तनूस या ॥ ११ ॥
खालीं करून वदन लज्जेनें राहिली उभी ।
कापें थरथरा वाटे सासू ही मूर्तिमन्त भी[6] ॥ १२ ॥

---

१ जोड शिंपलींत. २ मोती. ३ मनाला ताब्यांत ठेवणारी. ४ आजपर्यन्त. ५ नांव कोरलेलें. ६ भय.

बोले केतुमती सासू तथापि अतिरुष्ट ती ।
पवनें नांव हि तुझें वर्जिलें केंवि संगति ॥ १३ ॥
वलया मज दावून फसवायास इच्छिशी ।
जारिणी फसवायाचे प्रकार बहु जाणशी ॥ १४ ॥
चालती हो घरांतून आमुच्या व्यभिचारिणी ।
कुलटांचें[१] न हें स्थान राहे नच अशी कुणी ॥ १५ ॥
तिरस्कार नि धिक्कार करून बहु या परि ।
पाठवी क्रूर ती सासू जनकाच्या तिला घरीं ॥ १६ ॥
राक्षसी अञ्जनेला ती रथांत बसवी बळें ।
जे सन्त पीडिलें जाती विना हेतु[२] हहा ! खलें ॥ १७ ॥
नेला महेन्द्रनगरा समीप रथ किङ्करें ।
म्हटलें आपण इथें उतरावें मृदु स्वरें ॥ १८ ॥
जेव्हां उतरली खालीं रथावरुनि अञ्जना ।
येतों असें तो वदला तिला करुनि वन्दना ॥ १९ ॥
अञ्जना-दुःख पाहून जणु दुःखित जाहला ।
रवि पश्चिमशैलाच्या शिखरीं अस्त पावला ॥ २० ॥
आली निशा पसरला अंधार सगळें जग ।
काळें झालें न दिसती दिशा पूर्वादि वा नग[३] ॥ २१ ॥
अञ्जनेच्या मना वाटे भय निद्रा न लोचनीं ।
संपेल रात्र ही केव्हां तिला वाटे प्रतिक्षणीं ॥ २२ ॥
जागून काढली रात्र रवि ये उदयाचलीं ।
सकाळीं ये पितृगृहा अञ्जना मनिं लाजली ॥ २३ ॥
[ अंजनेच्या पित्यानेंहि तिला घरांत ठेवून घेतलें नाहीं. ]
भिकारिणी मम दिसे जाणिलें द्वाररक्षकें ।
वसन्तमाला वदली घडलें वृत्त जें निकें ॥ २४ ॥
द्वारपाल वदे राजन् कथा ही घडली अशी ।
अञ्जना तनया आली दिसे जैसा दिनीं शशी[४] ॥ २५ ॥

---

१ व्यभिचारिणींचें. २ कारण नसतां–दोष नसतां. ३ वृक्ष अथवा पर्वत. ४ चन्द्र.

सर्व वृत्तान्त ऐकून नृपाचें म्लान हो मुख ।
अशी कन्या कशी घ्यावी घरीं होईल कां सुख ॥ २६ ॥
कर्मोदयासम असे स्त्रीचरित्र अतर्क्य[1] हें ।
न देव जाणे ब्रह्मादि नरबुद्धि कशी मेहे[2] ॥ २७ ॥
कुलटा ही मम कुला कलङ्कित करावया ।
आली न योग्य वाटे ही मला आश्रय द्यावया ॥ २८ ॥
अञ्जनाचा जरी लेश शुभ्र वस्त्रास लागला ।
मानिती त्यास मलिन देई आश्रय जो हिला ॥ २९ ॥
ऐशा विचारें वदला द्वारपालास तो नृप ।
प्रवेश हिजला नाहीं पापाचा होय कां खपे[3] ॥ ३० ॥
प्रसन्नकीर्ति वदला हिचा भाऊ नृपेश्वरा ।
पिताजी द्या हकालून न स्नेहा हृदयीं वरा ॥ ३१ ॥
हिनें दूपित वंशास केलें ठेवा न ही घरीं ।
सर्पे दंष्ट[4] असे बोट छेदावें न दया वरी ॥ ३२ ॥
महोत्साह[5] वदे मन्त्री ऐकावें मम भाषण ।
सुनांना दुष्ट ज्या सास्वा त्या देतात हकालुन ॥ ३३ ॥
अशा मुलींना बापाचें घर रक्षक हें असे ।
म्हणून अञ्जनेला घ्या घरीं पाठविता कसें ? ॥ ३४ ॥
हिची केतुमती सासू दुष्ट आहे म्हणून ही ।
ठेवा घरीं न त्यागावी हिला मानू नका अहि[6] ॥ ३५ ॥
करून निर्णय हिचा सदोष जरि वाटली ।
द्यावें तिला हकालून राहाया हो नच स्थली ॥ ३६ ॥
जगीं सास्वा अशा दुष्ट सर्वत्र दिसती जरी ।
त्या सुनेला हकालून देती वार्ता न ही खरी ॥ ३७ ॥
अञ्जनेचेंच दुर्वृत्त[7] असे ऐसें म्हणून हा ।
प्रसङ्ग ये तिजवरी अपराधवती पहा ॥ ३८ ॥

---

१ ज्याचा मनुष्यबुद्धि विचार करूं शकत नाहीं असें. २ जाणील. ३ पापाला क्षमा नाहीं. ४ सर्पानें दंश केलेलें. ५ या नांवाचा. ६ सर्पासारखी. ७ वाईट आचरण-व्यभिचार.

हिचा द्वेष सदा होता पवनांच्या मनामधिं ।
ही दुर्गुणा[1] असावीच अन्यथा न त्यजी सुधी ॥ ३९ ॥
पवनापासुनि हिला गर्भसम्भव शक्य न ।
हिला द्यावें हकालून हिचें तोण्ड बघेन न ॥ ४० ॥
ऐसें महेन्द्र बोलून प्रवेशाज्ञा घरांत न ।
सांग जा बोलला द्वाररक्षका वच दारुण ॥ ४१ ॥
बाई, प्रवेश करण्या पित्राज्ञा न तुम्हा असे ।
म्हणून आतां येथून जाणें उचित हें दिसे ॥ ४२ ॥
वसन्तमालिका आणि अञ्जना म्लान होउनि ।
अश्रु ढाळीत निघतां ये अश्रु जनलोचनीं ॥ ४३ ॥

[ वनांतील दुःखांनीं दुःखित अशा अंजनेनें मनांत आलेले विचार वसंततिलकेला सांगितलें. ]

क्षुधा तृषा नि मार्गाच्या श्रमें जी शान्त जाहली ।
दर्भविद्ध पदांतील रक्तानें भूमि रंगली ॥ ४४ ॥
पदोपदीं अडखळे प्रतिवृक्षीं पुनः वसे ।
सखीसह पुनः चाले पुनः नेत्राश्रु ती पुसे ॥ ४५ ॥
अनेक नगर-ग्रामीं मिळे त्यांना न आश्रय ।
घोरारण्यांत त्या गेल्या मानून जन निर्दय ॥ ४६ ॥
तेथें तरुतलीं एका अञ्जना बसली श्रमें ।
शोकासह विचारांच्या पङ्क्ति चित्त तदा वमे ॥ ४७ ॥
मन्द भाग्य असे माझें सगळी वृद्धमंडळी ।
विचारशून्य बनली शुष्क होईल ही कळी ॥ ४८ ॥
दण्डिलें मजला आधीं अपराध-विवेचन ।
करिती हे कदा नेणें वाटे न्याय विलक्षण ॥ ४९ ॥
कुला कलङ्कापासून सासूनें रक्षिलें भलें ।
देशोधडीस लावून सुनेला निर्दयें वळें ॥ ५० ॥
बाबा तुम्ही ही कन्येची काळजी वाहता भली ।
अविचारें घरीं येतां तिला वनिं पिटाळ्ली ॥ ५१ ॥

---

१ शहाणा.

कन्येच्या हृदयां होतां माता दुःख त्वरें हरी ।
परि तातभयें तूं ही उपेक्षा वरिली खरी ॥ ५२ ॥
जिवन्त तात असतां भावांचा अधिकार न ।
मत त्यांचें असो कांहीं गौण होतें चि मुख्य न ॥ ५३ ॥
नाथा आपण युद्धार्थ दूर जातां असे घडे ।
म्हणून सर्व शत्रूंचें सभोंवति कडें पडे ॥ ५४ ॥
मन्दभाग्य अशा नारी त्यांत मीच शिरोमणि ।
पतिवांचून जगते दुःखांची जाहले खनि॥ ५५ ॥
या शोकाचा असे काय उपयोग पुढें चल ।
वसन्तमाला वदली आहेत सगळे खलं ॥ ५६ ॥
करून शान्त हृदय तिचें नेई तिला पुढें ।
ध्यानांत लीन जे ऐशा पाहती श्रमणाकडे ॥ ५७ ॥
गुहा उजळली त्यांच्या तेजानें मोद वाटला ।
केला त्यांनीं नमस्कार भक्तीनें कण्ठ दाटला ॥ ५८ ॥
समाप्त करुनि ध्यान वोलले मुनिवर्य ते ।
धर्मलाभ तुम्हा होवो कल्याणकर सुस्मितें ॥ ५९ ॥
करून भक्तिभावानें नमस्कार मुनीश्वरा ।
वसन्तमालिका वोले ऐकावी करुणाकरा ॥ ६० ॥
महेन्द्रतनया आहे अञ्जना बहु दुःखित ।
सासूनें सदनांतून तिला केलें निराकृत ॥ ६१ ॥
लाविला दोष तिजला आहे ही व्यभिचारिणी ।
आली पित्याकडे वाला तो हि देई हकालुनि ॥ ६२ ॥
कोण आला हिच्या गर्भीं झाली ऐशी दशा कशी ।
सांगा सकल आम्हांस रत्नत्रयधनी वशी ॥ ६३ ॥

[ गर्भांत असलेल्या बालकाचें पूर्वभव-वर्णन मुनिराज करितात. ]

'अमितगति' हें नांव ज्यांचें ऐसें मुनीश्वर ।
वदले ऐक गे वत्से सांगतों सर्व सत्वर ॥ ६४ ॥
जंम्बूद्वीपांत भरतक्षेत्रीं मन्दर नामक ।
पुर एक वसे तेथें श्रेष्ठी सम्पत्ति-धारक ॥ ६५ ॥

---

१ खाण. २ दुष्ट. ३ हितकर.

'प्रियनन्दी' असे त्याचें नांव तो सुजना प्रिय ।
'जाया' नामक त्या जाया रूपें रतिवरी जय ॥ ६६ ॥
तिनें मिळविला होता झाला त्या उभया सुत ।
दमयन्त असे नांव त्याचें चित्त दयायुत ॥ ६७ ॥
वसन्तसमयीं गेला जलक्रीडा करावया ।
अनेक मित्र घेऊन उद्यानीं तेधवा तया ॥ ६८ ॥
दिसे एका प्रदेशांत ध्यान-स्वाध्याय-तत्पर ।
समूह मुनिवर्यांचा दिगम्बर जितस्मरें[1] ॥ ६९ ॥
धर्मोपदेश ऐकून श्रद्धा निर्दोष ठेविली ।
सम्यक्त्वासह भव्यानें व्रतें हि बहु पाळिलीं ॥ ७० ॥
श्रद्धादि[2]सप्तगुणवान् दाता होऊन योग्य जे ।
आहारादिक साधूस दिलें त्यानें सुनीरजें[3] ॥ ७१ ॥
कालान्तरीं सुमरणें नियमासह तो सुधी ।
जन्मे स्वर्गात त्या लाभे नानासौख्य-पयोनिधि ॥ ७२ ॥
आयुष्य संपतां देव च्युत होऊन तेथुन ।
कोठें तो जन्मला ऐका शान्तता मनिं ठेवुन ॥ ७३ ॥
जम्बूद्वीपांत भरतीं मृगाङ्कपुर सुन्दर ।
तेथें राज्य करी भूप भासे जणु पुरन्दर[5] ॥ ७४ ॥
हरिचन्द्र सुनामें तो प्रजापालन-तत्पर ।
राणी प्रियङ्गुलक्ष्मी त्या वाटे रति खरोखर ॥ ७५ ॥
या झाला उभयां पुत्र सिंहचन्द्र सुनामक ।
प्रद्युम्नासम ज्या प्राप्त जाहलें रामणीयक[6] ॥ ७६ ॥
जिनधर्मास पाळून त्यानें प्राणा विसर्जिलें ।
स्वर्गात दिव्य सौख्यास तयें सानन्द[7] भोगिलें ॥ ७७ ॥
च्युत तेथून होऊन जम्बूद्वीपांत भारतीं ।
वैताढ्यशैलीं नगरी वारुणी देइ जी रति[4] ॥ ७८ ॥

---

१ ज्यानें कामविकार जिंकला आहे. २ श्रद्धा, संतोष, भक्ति, विज्ञान, निर्लोभता, क्षमा व उदारता हे दात्याचे सात गुण. ३ पापरहित. ४ सुखसमुद्र. ५ इन्द्र. ६ सौंदर्य. ७ आनन्द.

सुकण्ठ नामें राजाला राणी ही कनकोदरी ।
सिंहवाहन या झाला पुत्र वैरिगजां हरि[1] ॥ ७९ ॥
विद्याजनित जीं नाना सौख्यें तीं भोगिलीं तयें ।
राज्योपभोग घेऊन प्रजा संरक्षिली नयें ॥ ८० ॥
श्रीमद्विमलतीर्थेश-तीर्थीं वैराग्य जाहलें ।
घनवाहन पुत्राला सर्व राज्य समर्पिलें ॥ ८१ ॥
असार भव जाणून लक्ष्मीतिलक-सन्निध ।
निर्ग्रन्थदीक्षा घेई जी भवरोगास औषध ॥ ८२ ॥
समीचीन[2]-व्रतां पाळी जीं श्रीजिनवरोदितें[3] ।
अध्रुवादि अनुप्रेक्षा भावी चित्तांत सन्तत ॥ ८३ ॥
त्यागून देह-ममता करी तप सुदुश्चर ।
रत्नत्रयांत तो राही मुनीश्वर सदा स्थिर ॥ ८४ ॥
नानालब्धि[4] तया झाल्या प्राप्त ज्या इच्छित-प्रद ।
तथापि तो सहतसे क्षुधादि अति-दुःखद ॥ ८५ ॥
आयुःसमाप्तिसमयीं निर्मलध्यान-तत्पर ।
राहून तो मुनिवर लान्तवीं जाहला सुर ॥ ८६ ॥
इच्छानुरूप भोगास स्वर्गी[5] स्वर्गीय[6] भोगतो ।
छद्मस्थ-जन-वाणीस वर्णवे न कदापि तो ॥ ८७ ॥
पुण्यावशेषें तेथून च्युत झाल्या सुरेश्वरा ।
अञ्जना धारण करी गर्भीं हो विक्रमी खरा ॥ ८८ ॥
गर्भस्थ जीव हा कोण याचें वर्णन हें असे ।
वियोग-दुःख कां झालें त्याचें कारण हें दिसे ॥ ८९ ॥
[ अंजनेच्या विरहदुःखाचें कारण मुनीश्वर सांगतात. ]
पूर्वीं जी वर्णिली राणी नामें श्रीकनकोदरा ।
तिला लक्ष्मी सुनामाची सपत्नी अति-सुन्दरा ॥ ९० ॥
सम्यग्दर्शनपूतात्मा[7] साधु-पूजन-कारिणी ।
साधर्मिक-जनीं नित्य जी वात्सल्य-विधायिनी[8] ॥ ९१ ॥

---

१ सिंह. २ उत्तम निर्दोष. ३ जिनेश्वरांनीं सांगितलेलीं. ४ अनेक ऋद्धि. ५ देव. ६ स्वर्गांत प्राप्त होणाऱ्या. ७ सम्यग्दर्शनानें जिचा आत्मा पवित्र झाला अशी. ८ धार्मिक जनावर प्रेम करणारी.

ती श्रीजिनेन्द्र-देवाच्या प्रतिमा-पूजनीं रता ।
भक्तीनें तद्गुणगणा गाई धरुनि नम्रता ॥ ९२ ॥
या कृत्यें जाहली लक्ष्मीवरि श्रीकनकोदरी ।
क्रुद्ध तेवि सदा राहे ती तिच्यावरि मत्सरी ॥ ९३ ॥
ठेविली बाह्य-भागांत श्रीजिनप्रतिमा तिनें ।
महादेव्यभिमानानें अविवेकि अशा मनें ॥ ९४ ॥
संयमश्री जिचें नांव जी प्रसिद्ध तपस्विनी ।
आर्यिका त्या स्थलीं आली आहारार्थ विवेकिनी ॥ ९५ ॥
श्रीजिनप्रतिबिम्बाचा तिरस्कार बघून ती ।
खिन्न होऊन आहारा त्यागून वदली सती ॥ ९६ ॥
मिथ्यात्व-मोहित-मते, कनकोदरि दुःखद ।
केलेंस घोर हें कार्य कैसें तूं मजला वद ॥ ९७ ॥
बाळे, करून हृदया शान्त ऐक तुझें हित ।
अकार्य करिती जीव कषायवश-मोहित ॥ ९८ ॥
चतुर्गतिमधें जीव फिरतां त्यास लाभतें ।
कटुकर्मशमें जाण सुकुलीं मनुजत्व तें ॥ ९९ ॥
तुला सुमानुषत्वादि[१] लाभलें हे शुभानने ।
केलास निन्द्य आचार तेणें ये दुःख भोगणें ॥ १०० ॥
सुमनुष्यत्व लाभून शुभकर्म न जो करी ।
सुरत्न प्राप्त होऊन दिलें फेकून सागरीं ॥ १०१ ॥
मनोवचन-कायांची शुभवृत्ति करी हित ।
परन्तु अशुभा वृत्ति जीवाला करि दुःखित ॥ १०२ ॥
करिती कार्य हित जे तया उत्तम जाणिजे ।
अहितीं करिती प्रेम त्यांना अधम मानिजे ॥ १०३ ॥
प्रतिमा श्रीजिनेन्द्राची तूं तिरस्कारिलीस गे ।
ती दुःख-हेतु होईल भवान्तरिं मनांत घे ॥ १०४ ॥
न हो प्रसन्न वा क्रुद्ध जरी गे जिनबिम्ब हें ।
शुभाशुभास होतेंच हें कारण मनांत घे ॥ १०५ ॥

---

१ उत्तम मनुष्यपणा, उत्तम कुल, उत्तम वैभव आदि.

जिनांत नसती रागद्वेष ते न हिताहित ।
करिती अपुल्या होती विचारा हेतु निश्चित ॥ १०६ ॥
श्रीजिना गुरु शास्त्रास पाहून द्वेष ये मनीं ।
जेधवा तेधवा पापबन्ध दुःखद हो झणि ॥ १०७ ॥
अग्निसेवन केल्यानें शीतदुःख न हो जनां ।
अन्नें शीतजलें भूक तहान न छळी मना ॥ १०८ ॥
तैसें श्रीजिनपूजेनें मानवा सुख लाभतें ।
तिरस्कार करी त्याला दुःखांचीं मिळतीं शतें ॥ १०९ ॥
जें दुःख लोकीं दिसतें पापापासून जन्मतें ।
सुख जें पूर्व-जन्मोत्थ[1] पुण्य-हेतु तयास तें ॥ ११० ॥
अन्यजन्मीं हि लाभावें सुख यास्तव तूं करी ।
जिनार्चा भक्तिभावानें विवेका धरि अन्तरीं ॥ १११ ॥
जिनबिम्ब-तिरस्कारें नरकीं घोर वेदना ।
होऊ नयेत तुजला ये अशी करुणा मना ॥ ११२ ॥
म्हणून मी तुला केला बोध भव्ये ! मनांत घे ।
ऐशा हितोपदेशानें मन तत्पूजनीं रिघे ॥ ११३ ॥
नरकोद्भवे[2]-दुःखाच्या भयें मिथ्यात्व त्यागिलें ।
जिनसद्गुरुसच्छास्त्रीं श्रद्धान दृढ जाहलें ॥ ११४ ॥
स्वीकारी गृहिधर्मा तीं यथाशक्ति तपोव्रता ।
आचरी दुसऱ्या जन्मीं जणु तीं जाहली[3] स्थिरता ॥ ११५ ॥
पुनः श्रीजिनबिम्बास पूर्व-स्थानांत ठेवुनि ।
पूजी प्रतिदिनीं भावें सुगन्धि-सुमनोगणीं[4] ॥ ११६ ॥
आर्यिका संयमश्रीच्या मना आनन्द वाटला ।
सुधर्मीं तिज जोडून गेली ती स्वोचितस्थला[5] ॥ ११७ ॥
घरांत राहुनि करी सुतपा कनकोदरी ।
मरून शान्त-चित्तानें स्वर्गसौख्यास ती वरी ॥ ११८ ॥

---

१ पूर्वजन्माच्या पुण्यामुळें या जन्मीं सुख मिळतें. २ नरकांत उत्पन्न होणाऱ्या. ३ प्राप्त झाली. ४ सुगन्धित-पुष्पसमूहानें. ५ जेथें गृहत्याग्यांचा अर्थात् मुनींचा धर्म पाळला जातो अशा वनादि एकान्तस्थानीं.

च्युत तेथून होऊन महेन्द्रनृपनन्दना ।
तूं जाहलीस पुण्यानें बाळे त्वन्नाम अञ्जना ॥ ११९ ॥
पूर्वार्जित-सुपुण्यानें जन्मलीस महाकुलीं ।
पतिश्रेष्ठ तुला लाभे लाभेल सुख भूतलीं ॥ १२० ॥
त्रिकालपूज्य प्रतिमा जिनाची द्वेष ठेवुनी ।
तूं ठेवलीस बाहेर कांहीं वेळ अशा क्षणीं ॥ १२१ ॥
जो तुला जाहला बन्ध पापाचा उदयास ये ।
या भवीं दुःख तुजला झालें पाप करूं नये ॥ १२२ ॥
करीत असतां विद्युत्प्रभाची सुगुणस्तुति ।
मिश्रकेशी तया दोही पवनें ऐकतांच ती ॥ १२३ ॥
द्वेष त्याच्या मनीं झाला अञ्जनेविषयीं तदा ।
तेव्हांपासून हिजला त्यागिलें भोगि आपदा ॥ १२४ ॥
निघाला लढण्या जेव्हां चक्रवाकीस पाहिलें ।
विरहें रडणारी जी दयार्द्र मन जाहलें ॥ १२५ ॥
तेव्हां विरह-दुःखास आला दूर करावया ।
करून गर्भाधानास[2] पुनः गेला लढावया ॥ १२६ ॥
बोलून या परि पुनः दयालु मुनि बोलले ।
वाणी मिष्ट मुखांतून जणु त्यांच्या सुधा गळे ॥ १२७ ॥
केलेंस कर्म अशुभ बाळे पूर्वभवांत जें ।
त्यानें घोर दिलें दुःख त्याचया सम नसें दुजें ॥ १२८ ॥
पुनः निन्द्य असें कर्म नकोस करु अञ्जने ।
माझें वचन तूं वत्से ! सदैव हृदयांत ने ॥ १२९ ॥
जीं जीं जीवास मिळतीं नानाविध सुखें जगीं ।
जिनभक्तिविशेषानें तीं तीं मिथ्या नसेचि गी[3] ॥ १३० ॥
भवाब्धींतुनि तारून नेती ऐशा जिनेश्वरीं ।
करी भक्ति नि भावानें पूजा करि मुनीश्वरीं ॥ १३१ ॥
रत्नत्रय दिलें पूर्व-जन्मीं जें आर्यिकें तुला ।
अधोगति[4] निवाराया हस्तालम्बचि जाहला ॥ १३२ ॥

---

१ जाळी. २ गर्भ स्थापन करणें. ३ वाणी. ४ नरकगति व पशुगति व नीचकुलांत जन्म.

तुझ्या गर्भी महाभाग्य-शाली आला असे मुली ।
महावैभव लाभेल शंकेची ही नसे स्थली ॥ १३३ ॥
ज्याच्या पराक्रमगुणां खण्डू न शकती सुर ।
जो असे रूप-सम्पन्न म्हणती त्या जिन स्मरें ॥ १३४ ॥
थोड्याच दिवसें बाळे, प्रियसङ्ग घडेल गे ।
म्हणून मान तूं मोद न संशय मनांत घे ॥ १३५ ॥
ऐसें ऐकून वचन दोघींनीं नमिले पद ।
त्रिज्ञानिमुनिवर्याचे भवीं जीवास सौख्यद ॥ १३६ ॥
आशीर्वचन बोलून दोघींना ते नभःपथें ।
गेले योग्य अशा स्थानीं घडे संयमता जिथें ॥ १३७ ॥
पर्यङ्कासन घालून झाले ध्यानांत तत्पर ।
गुहेंत ज्या मुनिवर पर्यङ्का नाम सुन्दर ॥ १३८ ॥
प्राप्त झाले तिला आली पूज्यता बहु सत्वर ।
राही सखीसह तिथें अञ्जना मोद-निर्भर ॥ १३९ ॥
व्यवस्था अन्नपानाची केली विद्याबलें तदा ।
प्रेमें वसन्तमालेनें सखी होतेचि सौख्यदा ॥ १४० ॥
प्रियें रहित पाहाया कारुण्यें रविमण्डल ।
समर्थ नच गांठी तें म्हणून अपराचल ॥ १४१ ॥
अञ्जना-दुःख पाहून सूर्याचे मन्द जाहले ।
करें चित्रस्थ-सूर्याच्या करासमचि भासले ॥ १४२ ॥
रवि अस्ताचला गेला सन्ध्या प्रगट जाहली ।
आकाश लाल बनलें सिंह आला तया स्थलीं ॥ १४३ ॥
होणाऱ्या उपसर्गानें जणु ज्या प्रेरणा दिली ।
चोहींकडून तिमिररेखा प्रगट जाहली ॥ १४४ ॥
दीपाप्रमाणें नयन दाढा वज्राङ्कुरासम ।
क्रकचाँसम ज्या दांत सटा ज्या अग्निच्या सम ॥ १४५ ॥

---

१ मदन. २ मति, श्रुत व अवधि या तीन ज्ञानाचे धारक. ३ प्रियें—पवनंजयानें रहित. ४ पश्चिमपर्वत—अस्तपर्वत. ५ किरण. ६ अंधाराचे धागे. ७ करवतीप्रमाणें.

लोहाङ्कुशासम नखें छाती ज्याची शिलेसम ।
असा सिंह तिथें आला गजा मारावया क्षम ॥ १४६ ॥
पाहून त्यास दोघींना अत्यन्त भय वाटलें ।
सर्वाङ्ग त्यांचें हृदयासह कम्पित जाहलें ॥ १४७ ॥
तेव्हां सुरगुहास्वामी दयें प्रगट जाहला ।
मणिचूल जया नाम शरभाकृति[1] शोभला ॥ १४८ ॥
पाहून त्यास तेथून मृगेन्द्र भय-विह्वल ।
पळून गेला सकल शान्त होय वनस्थल ॥ १४९ ॥
शरभाकार सोडून निजरूपास धारण ।
केलें देवें मधुरसें आकर्षक सुगायन ॥ १५० ॥
मुनिसुव्रतनाथाचें गुणस्तवन गायिलें ।
ऐकून तें सखियुग जिनभक्तींत रंगलें ॥ १५१ ॥
गुहेंत सुव्रत-जिनप्रतिमा स्थापिली तयें ।
पुष्पें आणून यजिती वन्दिती विनयाश्रयें ॥ १५२ ॥
या परि जात असतां प्रसूतिदिनें[2] पातला ।
सखीनें रचिली शय्या पल्लवांची[3] सुकोमला ॥ १५३ ॥

[ हनूमन्ताचा जन्म. ]

जैशी सिंहा प्रसवते सिंही त्यापरि अञ्जना ।
सुता प्रसवली प्राची[4] दिशा जैशी विरोचना[5] ॥ १५४ ॥
सुतदेह-प्रकाशानें गुहा झाली प्रकाशित ।
दिला मुलामा सोन्याचा दिसे ऐशी सुशोभित ॥ १५५ ॥
वज्र अंकुश चक्रादि ज्याच्या पदिं सुलक्षणें ।
होतीं प्रफुल्ल कमलासमान मुखलोचनें[6] ॥ १५६ ॥
ऐशा सुन्दर-पुत्रास अङ्कीं घेऊन अञ्जना ।
रडे स्मरून उभया कुला ती सुन्दराङ्गना ॥ १५७ ॥
या घोर वनिं हे वत्सा जन्मोत्सव कसा करूं ।
माता-पितामह-स्थान न हें तूं दीन लेकरूं ॥ १५८ ॥

---

१ सिंहाचा शत्रु याला अष्टापद असेंही नांव आहे. २ बाळंत होण्याचा दि
३ कोवळ्या पानांची. ४ पूर्वदिशा. ५ सूर्या. ६ तोंड व डोळे.

तुझ्या वदनचन्द्रास पवून मन मोदलें ।
असतें सर्व सुजनमनीं आश्चर्य दाटलें ॥ १५९ ॥
अनाथा दीन मी झाल्ये साजरा मी कसा करूं ।
तुझा दिवस जन्माचा कोणा देवास मी स्मरूं ॥ १६० ॥
करीत असतां ऐसा शोक तेव्हां वदे सखी ।
सुपुत्र-निधि-लाभानें आज झालीस तूं सुखी ॥ १६१ ॥
हीं देहलक्षणें याचीं महापुरुप-सूचक ।
राजलक्ष्मी वरायाला याला होईल उत्सुक ॥ १६२ ॥
भुङ्गयांनीं गाति संगीत वेली चञ्चल पल्लव ।
तुझ्या पुत्रोत्सवासाठीं नाचती तरु ज्या धव[1] ॥ १६३ ॥
अवाल-तेज वालाचें प्रभावी दिसते मला ।
भावी समस्त कल्याण सूचवी ज्या नसे तुला[2] ॥ १६४ ॥
असा संवाद दोघींचा असतां चालला यदा ।
आलें विमान आकाशीं तेजस्वी सूर्यसें तदा ॥ १६५ ॥

[ अंजनेच्या मामाचें आगमन. ]

पाहून अञ्जनेला तें अरि वा वन्धु या स्थला ।
येऊन मम नेईल काय वालास कोमला ॥ १६६ ॥
अशी शङ्का उपजली खिन्न झालें तिचें मन ।
पुनः शोक करूं लागे शोकाचे शब्द ऐकुन ॥ १६७ ॥
विमानस्वामि-हृदयीं तेधवा जन्मली दया ।
आला इथें रडे कोण तें तो शीघ्र वघावया ॥ १६८ ॥
शिरे गुहेंत अपुल्या पत्नीसहित तो खग[3] ।
करी स्वागत हर्पानें अञ्जनेची सखी मग ॥ १६९ ॥
ही कुणाची सुता पत्नी कुणाची ही इथें कशी ।
ही मोहवी मना माझ्या दर्शनानें जसा शशी ॥ १७० ॥
विना कारण दुष्टानें छळिलें वाटतें कुणी ।
नसे दोप हिचा कांहीं गमे ही मज सद्गुणी ॥ १७१ ॥
वाटतें मन्मना हें कीं, तूं आहेस हिची सखी ।
हिच्या दुःखांत तूं दुःखी हिच्या सौख्यांत तूं सुखी ॥ १७२ ॥

---

१ पति. २ उपमा. ३ विद्याधर.

अकारणोपकारी[1] हा हिच्या पुण्योदयें जन।
आला वसन्तमालेचें सांगे जणु असे मन ॥ १७३ ॥

[ मामाला वसन्तमाला अंजनेची कथा सांगते. ]

हे सज्जना कथा ऐक हिची तूं करुणावह[2]।
सुता महेन्द्र-राजाची सोशी ही दुःख दुःसह ॥ १७४ ॥
अञ्जना हें तिचें नांव पवनञ्जय हा पति।
प्रह्लादराजसुत तो वानूं त्याच्या गुणा किती ॥ १७५ ॥
रणीं साहाय्य करण्या गेला तो रावणा असे।
अज्ञात सौधीं येऊन कुपें रात्रौ हिच्या वसे ॥ १७६ ॥
हिच्या करून उदरीं गर्भाधान पुनः निघे।
भेटून दशकण्ठाला मोदें समरिं तो रिघे ॥ १७७ ॥
वाढला गर्भ उदरीं सासू केतुमती मनीं।
दुष्ट-स्वभावी कुपित झाली जी क्रूरताखनी[3] ॥ १७८ ॥
अञ्जनेनें तिला वृत्त घडलें कथिलें खरें।
वलयीं पति-नामाचें तिनें दाखविलें करें[4] ॥ १७९ ॥
तथापि अविचारानें हाकालून दिलें तियें।
हृदयांत तिच्या हाय दयेचा लवही न ये ॥ १८० ॥
मी तिच्यासह तेथून तिच्या पितृगृहाकडे।
गेलें न गृहिं तो घेई पडलें घोर सांकडें ॥ १८१ ॥
आली तेथून ही बाला कोमला घोर या वनीं।
प्रसूत आज ही झाली येथें साध्वी विवेकिनी ॥ १८२ ॥
हिनें जें भोगिलें दुःख मी सांगाया समर्थ न।
ऐसें वसन्तमालेनें कथिलें सत्यभाषण ॥ १८३ ॥
ऐकून सर्व घेऊन निघे त्याच्या मुखांतुन।
वाणी प्रमोदवी त्यांच्या मना तैसें सुधा हि न ॥ १८४ ॥
ही माझी भगिनीपुत्री[5] बहु-कालेंचि पाहिली।
हिचें बदललें रूप तेणें ही नच जाणिली ॥ १८५ ॥

---

१ प्रयोजन नसतां उपकार करणारा. २ दयेला उत्पन्न करणारी. ३ निर्दयपणाची खाण. ४ कडें. ५ बहिणीची-चित्तवेगेची मुलगी.

विचित्र-भानु जनक माता सुन्दर-मालिनी ।
प्रतिसूर्य असे माझें नाम हो मोद मन्मनीं ॥ १८६ ॥
मनोवेगा असे माझी भगिनी ही सुता तिची ।
अञ्जना रूप पाहून हिचें लाजतसे शची[1] ॥ १८७ ॥
सुदैवें आज मजला तव दर्शन जाहलें ।
रडूं नकोस वत्से तूं दुःख गे तव संपलें ॥ १८८ ॥
मामा असे हा अपुला कळलें जेधवा तिला ।
नव-प्रवाह दुःखाचा वेगानें वाहु लागला ॥ १८९ ॥
इष्ट-मित्रास बघतां दुःखपूर उचंबळे ।
शोकास थाम्बवि तिच्या तो सान्त्वन-महाबलें ॥ १९० ॥
दैवज्ञा[2] शिशुचे भावी शुभाशुभ विचारिलें ।
तदा तो हृष्ट होऊन सांगे त्यांना स्वधीबलें[3] ॥ १९१ ॥
हा होईल महाराजा मुक्त होईल या भवीं ।
चैत्र-कृष्णाष्टमी याची जन्मवेला शुभास वी ॥ १९२ ॥
नक्षत्र याचें श्रवण दिनस्वामी असे रवि ।
मेषावरि असे सूर्य उच्च तो वदती कवि[4] ॥ १९३ ॥
विराजे मकरीं चन्द्र राहे मंगल तो वृषीं[5] ।
बुध मीनीं असे ज्याचा असे जनक हा शशी ॥ १९४ ॥
गुरु राहे कुलीरांत[6] उच्च स्थानांत शोभला ।
शुक्र मीनांत दिसतो शनिही तो असे भला ॥ १९५ ॥
मीन-लग्नोदयीं ब्रह्मयोगीं हें सर्व चांगलें ।
चिन्ता नको करूं वत्से पुण्योदय करी भलें ॥ १९६ ॥
शनैश्चरास रवि हा दृष्टीनें पूर्ण पाहतो ।
अर्धावलोकनें तेवि सूर्याला लोहिताङ्ग[7] तो ॥ १९७ ॥
विनारु पादोन-दृष्टीनें भास्करा[8] अवलोकितो ।
नसे ददित्य अर्धदृष्टीनें बृहस्पतिस पाहतो ॥ १९८ ॥

१ इन्द्राणी. २ ज्योतिष्याला. ३ स्वतःच्या ज्योतिष-ज्ञानाच्या सामर्थ्यानें. ४ विद्वान लोक. ५ वृषभ राशीवर. ६ कर्क राशींत. ७ मंगळ. ८ सूर्याला. ९ सूर्य. १० गुरूस.

संपूर्णदृष्टिनें चन्द्र गुरुला जेवि पाहतो ।
तोहि तेवि तया चन्द्रावरि दृष्टिस लावितो ॥ १९९ ॥
शनी पादोन-दृष्टीनें गुरुला जेवि पाहतो ।
अर्धावलोकनें पाही गुरु सूर्यसुतास[1] तो ॥ २०० ॥
गुरु पादोन-दृष्टीनें शुक्राला वघतो जसा ।
गुरूस त्याच दृष्टीनें शुक्रही पाहतो तसा ॥ २०१ ॥
उरले ग्रह जे अन्य तदपेक्षा इथें नसे ।
उदयक्षेत्र-कालाचें वल-वैपुल्य हें दिसे ॥ २०२ ॥
सूर्य, मङ्गल, देवांचा गुरु हे राज्य सांगती ।
शनी निवेदन करी शिशूला मुक्तिसंगति ॥ २०३ ॥
उच्चस्थानीं जरी राहे गुरु एकही देइ तो ।
सर्वकल्याण-मालेस ऐसें दैवज्ञ सांगतो ॥ २०४ ॥
शिशूच्या जन्मकालांत ब्रह्मयोग असे तथा ।
मुहूर्त शुभ नांवाचा कथिती शुभशी कथा ॥ २०५ ॥
ब्रह्मस्थान नि सौख्याचा शिशूला होय संगम ।
शिशुजन्मग्रहांचें हें चक्र आहेचि उत्तम ॥ २०६ ॥
होईल शुभवस्तूंचा शिशूला लाभ सर्वदा ।
वघे न आपदा यास वरील सुखसंपदा ॥ २०७ ॥
ऐकून वालकाचें हें जन्मलग्न-सुवर्णन ।
प्रमोद सकला झाला तो चित्तीं मावलांचि न ॥ २०८ ॥
प्रतिसूर्य-खगेशानें दैवज्ञास दिलें धन ।
यथेष्ट तेधवा त्याचें अतिसंतोषलें मन ॥ २०९ ॥
सवाला[2] अञ्जना झाली हृदयीं तेधवा सुखी ।
जिची वसन्तमाला ही प्राणतुल्य असे सखी ॥ २१० ॥
सर्वासह निघे तेव्हां प्रतिसूर्य खगेश्वर ।
वसवून विमानांत जाहला हर्ष निर्भर ॥ २११ ॥
अञ्जना वालका अंकीं घेऊन वसली मुदें ।
सौन्दर्य त्याचें तिजला हर्षकोष अपार दे ॥ २१२ ॥

---

१ शनीला. २ वालकासहित.

मोत्यांचे घोस पाहून झाला बालक हर्षित ।
घ्यायास ते करयुगें होतें तन्मन इच्छित ॥ २१३ ॥
उडून अंकावरुन वेगें तो गह्वरीं पडे ।
वज्रतुल्य तदाघातें शैलाचे फुटले कडे ॥ २१४ ॥
शेकडो तुकडे झाले शिलेचे तो जियेवरी ।
पडला परि बाधा न झाला हर्षित अन्तरीं ॥ २१५ ॥
वक्षःस्थलास हातांनीं बडवी खिन्न अञ्जना ।
रुदनानें करी व्याप्त ती गुहा-शैल-कानना ॥ २१६ ॥
प्रतिसूर्य निघे बाला तत्काल हुडकावया ।
निर्बाध देहा पाहून पावे तो मनिं विस्मया ॥ २१७ ॥
अंगुष्ठ घालुनि मुखीं उताणा बाळ खेळतो ।
हालवी हात पायास मंद गालांत हासतो ॥ २१८ ॥
नष्ट झाल्या निधिसम स्नेहें घेऊन तो करीं ।
आला देऊन भाचीला झाला हर्षित अन्तरीं ॥ २१९ ॥
वज्रासमान या बालें शिला फोडून टाकिली ।
अञ्जने ! विस्मयाक्रान्त जाहली मन्मनःस्थली ॥ २२० ॥
अमानुष धरी बाले ! शक्ति हा तव बालक ।
यौवनीं वर्ण्य नच ती सिद्धीचा होय नायक ॥ २२१ ॥
ऐसें बोलून तो भालीं प्रतिसूर्य खगेश्वर ।
ठेवी करयुगा झाला हृदयीं हर्ष-निर्भर ॥ २२२ ॥
दिल्या प्रदक्षिणा तीन आपुल्या अञ्जनेसह ।
नमस्कार करी त्याला कांतीचें जो दिसे गृह ॥ २२३ ॥
मनोवेगें विमानानें हनूरुहपुरामधिं ।
सबाला अञ्जना ठेवी स्वसौधीं तो प्रसन्नधी ॥ २२४ ॥
अत्यादर तयें केला अञ्जनेचा खगेश्वरें ।
बालें सर्व स्त्रिया केल्या सहर्ष जणु त्या स्मरें ॥ २२५ ॥
हनूमान् नाम सकलें बालाचें ठेविलें जनें ।
पाहून त्यास सर्वांचीं कृतार्थ बनलीं मनें ॥ २२६ ॥

---

१ दरीत. २ गुहा, पर्वत व जंगलाला. ३ माझ्या मनाचा प्रदेश आश्चर्यानें भरून गेला. ४ मदनानें. ५ कृतकृत्य.

विमानांतून पडतां शैलाला चूर्णिलें तयें।
श्रीशैल हें दुजें नाम बालाचें शोभलें नयें ॥ २२७ ॥
हनूरुहपुरामध्यें वाढला बाल हा शुभ।
हनूमान् नाम तेणें ही शक्ति अन्यत्र दुर्लभ ॥ २२८ ॥
क्रीडा करीत तो बाल सुखानें वाढला तिथें।
मानसोदकिं वाढावा हंस लोकमनोरथें ॥ २२९ ॥
दोषारोपण सासूनें जें माझ्यावरि लादलें।
कैसें तें दूर होईल यश वा पसरें भलें ॥ २३० ॥
शल्यासम मनांतून ही चिन्ता दूर होइल।
उपायें कवणें लाभे माझें पद सुनिर्मल ॥ २३१ ॥
ऐसें मनीं तिच्या येती रात्रंदिन विचार जे।
कृश झाली तयें साध्वी चिन्ता वल्लीसमा रुजे ॥ २३२ ॥
यापरी हनुमन्ताचें जन्म-वर्णन जाहलें।
वृत्त मी कथितों आतां पवनाचें जसें कळे ॥ २३३ ॥

## आर्या.

जें वज्र पर्वताचे शत तुकडे करुनि टाकितें तें ही।
पुण्योदयें नराला कुसुमासम मृदुल होतसे पाही ॥ २३४ ॥
पुण्यें अग्निहि शीतल चन्द्रासम कमलतुल्य वा होतो।
खड्गहि रमणीमृदु-भुजयुगलासम मानवास सुख देतो ॥ २३५ ॥
ऐसें जाणुनि पापापासून विरक्त मानवें व्हावें।
होउनि जिनदास सदा श्रीजिनचरितीं मनास लावावें ॥ २३६ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे हनूमत्सम्भवाभिधानं नाम सप्तदशं पर्व ॥ १७ ॥

---

१ मानस-सरोवराच्या पाण्यांत व मनरूपी पाण्यांत.

## अठराव्या पर्वांत वर्णिलेल्या कथेचा सारांश.

अंजनादेवीचें समाधान करून पवनंजय पुनः माता-पित्यांना न कळवितां रावणाकडे ससैन्य आला. 'राजेन्द्र आपण चिन्ता करूं नका. जय निश्चित आपणासच प्राप्त होईल' असें बोलून पवन रणभूमीवर गेला. वरुणाला त्यानें जिंकिलें. खर-दूषणाला शत्रूच्या शिबिरांतून पराक्रमानें आणिलें. व दोघांना रावणापुढें उभें केलें. आपल्या मेहुण्याला पाहून रावण आनन्दला. वरुणानें रावणाबरोबर सन्धि केल्यावर त्याला त्यानें बन्धनांतून मुक्त केलें व तो आपल्या नगराकडे निघून गेला.

रावणानें पवनंजयाचा गौरव केला व घरीं जाण्यास संमति दिली. प्रथमतः मातापित्यांना वन्दन करून नंतर तो अंजनेच्या महालांत गेला. त्याला ती तेथें दिसली नाहीं. एका दासीला त्यानें विचारलें व तिनें याप्रमाणें सांगितलें:— युवराज, आपण रावणाला युद्ध-साहाय्य करण्यासाठीं निघून गेल्यावर अंजनेचीं गर्भचिह्नें पाहून आपल्या मातोश्रीला राग आला. तिला व्यभिचारिणी समजून बापाच्या घरीं तिनें पाठवून दिलें.

हें ऐकून पवनंजय तत्काल सासरवाडीला गेला. तेथेंही त्याला ती दिसली नाहीं. तिच्या आई-बापांनीं तिला व्यभिचारित्वाच्या आरोपामुळें ठेऊन घेतलें नाहीं हें तेथें एका दासीकडून समजल्यामुळें तो तेथूनही निघाला व वन, पर्वत, गुहा आदिक प्रदेशांत जाऊन तिचा शोध करूं लागला. बरोबर त्याचा मित्र प्रहसित होताच. त्यानें प्रहसितास म्हटलें 'मित्रा अंजनेची भेट झाली तरच मी घरीं येईन अन्यथा नाहीं. व तूं ही वार्ता घरीं सांग म्हणून बळेंच त्याला त्यानें घरीं पाठवून दिलें. व स्वतः वेड्यासारखें वृक्षादिकांना अंजना कोठें आहे, तुम्ही तिला पाहिलें काय असें विचारूं लागला.

आपल्या कालमेघ हत्तीवरून प्रवास करीत तो भूतरवानामक जंगलांत येऊन पोहोंचला. हत्तीवरून उतरून त्यानें हातांतलें शस्त्र फेकून दिलें. अंगांतलें चिलखत काढून टाकलें व एका मोठ्या झाडाच्या खालीं सावलींत बसून त्यानें हत्तीला म्हटलें हे गजराज मी तुला आतां सोडलें आहे. तूं वनांत यथेच्छ फीर. तुला जें स्थल आवडेल तेथें राहा.

मला प्रियेची प्राप्ति झाली नाहीं म्हणून आतां मी येथें माझा नाश करून घेणार आहे असें म्हणून तो तिथें मौनानें अंजनेचा विचार करीत बसला. त्यानें अन्न पाणी त्यागलें. इकडे प्रहसितानें पवनंजयाच्या मातापित्याला सर्व हकीकत कळविली. मी अविचारानें सुनेला दोष लावून हकालून दिलें. त्यामुळें सून व पुत्र दोघांना मुकलें म्हणून ती अतिशय रडूं लागली. पवनंजयाच्या पित्यानें—प्रल्हादानें चोहीकडें दूत पाठवून विद्याधरांना बोलाविलें. त्यांच्यासह व स्वतः आपल्या पत्नीसह प्रहसिताला पुढें करून पुत्र व स्नुषा यांना तो हुडकण्यास निघाला. एक दूत त्यानें हनूरुहपुरास प्रतिसूर्य-विद्याधर-राजाकडे पाठविला होता. त्यानें पवनंजयाबद्दल वार्ता कळविली. ही वार्ता अंजनेला समजली. तिला फार वाईट वाटलें. तेव्हां प्रतिसूर्यानें तिचें सान्त्वन केलें व तोही विमानांत बसून शोध करण्यासाठीं आला. शेवटीं सर्व विद्याधर व प्रतिसूर्य राजा भूतरवा अटवींत आले. तेथें त्यांनीं पवनाचा हत्ती पाहिला व त्यामुळें पवन येथें असलाच पाहिजे असें त्यांना खात्रीनें वाटलें. व तो त्यांना जवळ आल्यावर दिसलाही. पण कालमेघ रागावला व कोणालाही पवनाजवळ येऊ देईना. तेव्हां त्यांनीं हत्तीणी तेथें आणिल्या. त्यांना पाहून तो हत्ती त्यांच्याकडे वळला व सर्व विद्याधर व पवनाचे माता-पिता व प्रतिसूर्य हे जवळ आले. प्रतिसूर्यानें अंजना सुंदरी व पुत्र हनूमान सुरक्षित माझ्याकडे आहेत असें सांगितल्यावर पवनंजयानें मौन सोडलें नंतर पवनंजयाला, त्याच्या माता-पित्यांना व सर्व विद्याधरांना त्यानें हनूरुहपुराकडे नेलें. सर्व विद्याधरांना दोन महिने ठेवून घेऊन त्यांचा आदर सत्कार करून त्यानें पाठविलें. पवनाचे माता-पिता सूर्यपुराकडे गेले. पवनंजय आणि अंजना यांचा समागम होऊन त्यांना पुनः कधीं विरहाचा प्रसंग आला नाहीं. त्यांचा पुत्र हनूमान थोर झाला. नानाप्रकारच्या विद्या त्याला प्राप्त झाल्या.

# अठरावें पर्व

[ पवनंजय वरुणाला बांधून रावणापुढें आणतो ]

या परी हनुमन्ताचें जन्म–वर्णन जाहलें ।
वृत्त मी कथितों आतां पवनाचें जसें कळें ॥ १ ॥

आला दशाननापाशीं तदाज्ञें पवनञ्जय ।
झाला दशानना हर्ष लाभेल मजला जय ॥ २ ॥

ऐसें मानून कथिली युद्धवार्ता तयें तया ।
चिन्ता करूं नको राजन्, मिळवूं निश्चयें जया ॥ ३ ॥

असें बोलून पवन निघे युद्धा महारथी ।
लढला जलकान्ताशी बांधिलें त्यास तद्रथीं ॥ ४ ॥

केलें मुक्त तयें शीघ्र चातुर्यें खरदूषणा ।
आला घेऊन उभया बोलला मग रावणा ॥ ५ ॥

राजन् या जलकान्तास बान्धून तुज सन्निध ।
आणिलें राज–नीतिज्ञ तूं आहेस महाबुध ॥ ६ ॥

हर्षला रावण मनीं पाहून खरदूषणा ।
जलकान्तास बघतां उद्भवे कोप तन्मना ॥ ७ ॥

रावणा सन्धिकार्यांत साहाय्य पवनञ्जयें ।
केलें प्रगट चातुर्य सान होऊन ही वयें ॥ ८ ॥

तेणें दशानन मनीं महानन्दित जाहला ।
गौरवून तया मित्रस्नेहानें त्यास बोलला ॥ ९ ॥

पवनञ्जय मित्रा ! तूं रणीं साहाय्य जें दिलें ।
यशस्वी जाहलों तेणें तुझें होवो सदा भलें ॥ १० ॥

ऐसें बोलून लंकेला सपरिग्रह रावण ।
गेला तया विचारून स्वगृहास समीरण ॥ ११ ॥

( घरीं अंजना न दिसल्यामुळें पवनाचें सासरवाडीस प्रयाण व तेथेंही न दिसल्यामुळें पर्वत जंगल आदि स्थानांत भटकणें )

---

१ कथा.

वन्दून जननी ताता गेला तो अंजनागृहीं ।
दिसली न तिथें त्याला तद्गाढप्रणया मही ॥ १२ ॥
अंजनाहीन सदन त्या उदासीन वाटलें ।
दिनचन्द्रासम दिसे खिन्न तन्मन जाहलें ॥ १३ ॥
जिचें दर्शन नेत्रांना अमृताञ्जनसें गमे ।
गेली प्रिया कुठें माझी जिच्यांत मन हें रमे ॥ १४ ॥
ऐसें विचारिलें त्यानें एका नारीस त्या स्थलीं ।
तेव्हां ती नम्र होऊन त्याला या परि बोलली ॥ १५ ॥
रावणा रणिं साहाय्य गेला देण्यास आपण ।
कुमार येथें घडला प्रसंग बहु दारुण ॥ १६ ॥
पाहून अञ्जना गर्भचिह्नं कुपित जाहली ।
माता तुझी केतुमती कठोर वच बोलली ॥ १७ ॥
तुजला त्यागिलें पुत्रें कां हें समजलें मला ।
राहूं नकोस तूं येथें स्वैरिणी[1] तूं न निर्मला ॥ १८ ॥
ऐसें बोलून बसवी सखीसह रथीं तिला ।
पाठवी ती पितृपुरा हृदयें न च कोमला ॥ १९ ॥
आला नोकर सोडून वनांत अतिदीन ती ।
हरिणीसम दुःखानें गांजली हा ! महासती ॥ २० ॥
वार्ता दारुण ऐकून दुःखी तेथून तो निघे ।
कुमार वायुवेगानें महेन्द्रनगरीं रिघे ॥ २१ ॥
दिसली न प्रिया तेथें तया श्वशुरमन्दिरीं ।
बाला विचारिली एक सांग वार्ता मला खरी ॥ २२ ॥
प्रिया तुझी इथें आली होती परि तिला घरीं ।
घेतलें तत्पित्यानें न झाली दुःखित अन्तरीं ॥ २३ ॥
दुःशील-दोष-शंकेनें[2] देई हाकालुनी तिला ।
पुढें झालें तिचें काय नाहीं माहीत हें मला ॥ २४ ॥
वज्राघातासम तिची ऐकून वचनावलि ।
वायु झाला मनीं खिन्न तद्बुद्धि भ्रान्त जाहली ॥ २५ ॥

१ व्यभिचारिणी. २ व्यभिचार दोषाच्या भीतीनें.

प्रियाञ्जनेस शोधाया वनशैलादिक-स्थलीं ।
फिरला तो परि कुठें त्यास ती नच भेटली ॥ २६ ॥
मित्रा प्रहसिता खिन्न होऊन मग बोलला ।
जननी-जनका सांग भ्रमलों वहु भूतला ॥ २७ ॥
दिसली न प्रिया कोठें परन्तु हुडकीन मी ।
वनशैल-गुहास्थानीं मम यत्न नसे कमी ॥ २८ ॥
दुर्दैवें ती न दिसली माझीहि मृति निश्चित ।
होईल अन्ना त्यागून नान्यथा[1] मम भाषित ॥ २९ ॥
ऐकून वायु वचना गेला सूर्यपुरा प्रति ।
मित्रा सोडून जातांना वाटलें दुःख त्या अति ॥ ३० ॥
वाक्य प्रहसिताचें हें ऐकून अति-दुःखित ।
झाली केतुमती तेव्हां पडे भूतलिं मूर्च्छित ॥ ३१ ॥
पुनः सावध होऊन वायु-मित्रास बोलली ।
त्याला कष्टांत टाकून तूं कां आलास या स्थलीं ॥ ३२ ॥
न मिळेल प्रिया माझी परतेन न मी घरीं ।
तिच्या शोधार्थ सगळ्या भ्रमेन पृथिवीवरि ॥ ३३ ॥
ऐसें[2] सांगून मजला तो वळें मित्र पाठवी ।
आलों रविपुरा अस्ताचलाला तेंवि तो रवि ॥ ३४ ॥
चढून वातञ्जयही कालमेघ-गजावरि ।
फिरे वनीं गिरिदरीं चिन्ता मनिं अशी करी ॥ ३५ ॥
शोकानें म्लान जी झाली जी पद्मासम कोमल ।
गेली असेल ती कोठें अञ्जना मनिं निर्मल ॥ ३६ ॥
जी खिन्न गर्भभारानें मनानें ऋजु[3] जी असे ।
विरहाग्नि जिला जाळी वनीं केंवि सुखें वसे ॥ ३७ ॥
सखी वसन्तमालेनें असेल त्याजिलें तिला ।
धरू शकेल ती केवि स्वप्राणा अतिकोमला ॥ ३८ ॥
शोकानें अन्ध होऊन प्रिया विषमशों[4] पथीं ।
पडून जीर्ण-कूपांत झाली काय यमातिथि[5] ॥ ३९ ॥

---

१ माझें बोलणें बदलावयाचें नाहीं. २ पवनंजय. ३ सरळ. ४ उंच सकल अवघड मार्गात. ५ यमाची पाहुणी.

जी खिन्न गर्भभारानें ऐकून वनिं गर्जना ।
सिंहाची सोडिलें काय तिनें तत्क्षणिं जीवना ॥ ४० ॥
पाण्याचा थेंबहि जिथें न मिळे रूक्ष काननीं ।
गळा सुकून मरण पावली काय या क्षणीं ॥ ४१ ॥
दर्भानें विद्ध चरण झाल्यानें एकही पद ।
जाण्या समर्थ न जियें वरिला मृत्यु दुःखद ॥ ४२ ॥
किंवा खल-खगेशानें[1] असेल हरिलें तिला ।
कळली न च वार्ता ही कोणाकडुनिही मला ॥ ४३ ॥
किंवा अनेक-दुःखांनीं गर्भाचा पात जाहला ।
विरक्त होउनि तिनें आर्यिकाश्रम सेविला ॥ ४४ ॥
ऐशा विचारें पवन झाला अत्यन्त विह्वल ।
फिरे सर्वत्र सतत राहे कोठें न निश्चल ॥ ४५ ॥
विरहें सर्व जग हें तयाला शून्य भासलें ।
त्यानें निश्चय तैं केला मरणें हें चि चांगलें ॥ ४६ ॥
तिच्या विरह-दुःखानें शैलवृक्ष-नदी-वनीं ।
दिसे न रम्यता त्याला वाटे त्या रूक्ष मेदिनी[2] ॥ ४७ ॥
पुसे आम्रादि-वृक्षास पाहिली काय अञ्जना ।
तिच्या वार्तेस सांगून माझ्या संतोष वा मना ॥ ४८ ॥
अत्यन्त दुःख ज्या होतें असे मानव निश्चित ।
विवेकें हीन होतात होति ते मूढतायुत[3] ॥ ४९ ॥
प्रवेशला भूतरवा अटवींत प्रभञ्जन[4] ।
गजावरून उतरे जाहला मलिनानन ॥ ५० ॥
हातांतलें दिलें शस्त्र त्यानें फेकून भूवरी ।
अंगांतलें चिलखत काढिलें शांतता वरी ॥ ५१ ॥
महातरुतळीं शीतच्छाया पाहून बैसला ।
विहार करि वा आतां गजा तूं स्वैर बोलला ॥ ५२ ॥
सल्लकी-पल्लवा भक्षी प्राशी शीत नदी-जल ।
विहार करि तूं तेथें तुला जें आवडे स्थल ॥ ५३ ॥

१ दुष्ट विद्याधर राजानें. २ पृथ्वी. ३ मूर्खपणानें युक्त. ४ पवनंजय.

शोक-पीडित या माझ्या स्वामीला मी त्यजीन न ।
उभा येथेंच राहीन त्याचें करिन रक्षण ॥ ५४ ॥
अशा विचारें तो राही मित्रासम उभा करी ।
अंगरक्षक तो वाटे शस्त्र ज्याच्या असें करीं ॥ ५५ ॥
स्वामीस मी कसें सोडूं विचार करि तो करी ।
यांना रक्षीन मी येथें अकृज्ञ न मी उरीं ॥ ५६ ॥
प्रियांजना-परि-प्राप्ति मजला नच झाहली ।
प्राण-नाशास येथेंच गमे ही उचित स्थली ॥ ५७ ॥

आर्या

पवनाच्या जनकाचें जननीचें तेवि वृत्त सांगेन ।
गौतमगणधर वदले ऐक श्रेणिक करून शान्त मन ॥ ५८ ॥
प्रहसित जाउनि वदला पवनाचें वृत्त जनक-जननीस ।
तेणें आली त्यांच्या भरती तत्काल शोकजलधीस[1] ॥ ५९ ॥
पुत्राच्या शोकानें झाली अत्यन्त विद्ध[2] केतुमती ।
घळ घळ नयनयुगांतुनि वाहे अश्रुप्रवाह शीघ्रगति ॥ ६० ॥
हे प्रहसिता ! सुताला माझ्या कां एकटाच आलास ।
सोडुनि योग्य न गमतें तव येणें खचित मित्र-भावास ॥ ६१ ॥
प्रहसित वदला माते जवळ मला मित्र राहुं देईना ।
मजला वळेंचि त्यानें पाठविलें यश न येइ मम यत्ना ॥ ६२ ॥
गेला मित्र कुठें तव गेली तव सून अंजना जेथें ।
गेली कोठें ती वद नाहीं माहीत तें मला माते ! ॥ ६३ ॥
ज्यांना विवेक नाहीं अविचारें करिति कार्य मानव जे ।
पश्चात्ताप तयांना होतो हे श्रेणिका मनीं समजे ॥ ६४ ॥
जरि अञ्जना न मजला दिसली मी खचित मृत्यु पावेन ।
माते ! केली पुत्रें तुझ्या प्रतिज्ञा मनांत हें आण ॥ ६५ ॥
प्रहसित-वचना ऐकुनि केतुमतीनें विलाप जो केला ।
सर्वस्त्रीवृन्दाच्या नयनांतुनि अश्रुपूर ओघळला ॥ ६६ ॥
सत्य-प्रकार जाणुनि न च घेतां मी अकार्य जें केलें ।
तेणें मम पुत्राचें जीवन अत्यंत संकटीं पडलें ॥ ६७ ॥

---

१ एक समुद्रास. २ दुःखी.

क्रूर स्वभाव माझा माझें मन नित्य वक्रता[1] धरितें ।
अविचारानें केलें कार्य सदा कटु-फलास हा ! देतें ॥ ६
पवनाविण ही नगरी न दिसे सुन्दर उदास भासतसे ।
विस्तृत विजयार्धाचल माझ्या हृदया भकास सतत दिसे
राक्षस-पति जो रावण त्याचें हें सैन्य मन्द-कान्ति दिसे ।
चन्द्राविण रजनीमधि काळ्या पक्षांत कान्ति केवि वसे ॥
जो रावणें हि साध्य न वरुणाशीं संधि साधिला गेला ।
तुजकडुनि कथन त्याचें वत्सा करणें असे न शक्य मला
वत्सा विनयाधारा गेलास कुठें कुठें तुला पाहू ।
झडकरि भेटाया यें पराक्रमा धरिति दोन तव बाहू ॥ ७
दुःखाग्नि मला जाळी तो शमवायास शीघ्र येऊन ।
दर्शनजलसिञ्चन[2] करि ठावें मजला तुझें दयार्द्र मन ॥
करि ती विलाप जननी स्वकर मुखीं ताड ताड मारून ।
सान्त्वन करावयाचें प्रल्हादा कार्य वाटलें गहन ॥ ७४ ॥
सुतविरहज-दुःखानें त्याच्या ही लोचनांत जल आलें ।
परि तनया हुडकाया त्याचें मन सज्ज तेधवा झालें ॥ ७५
तो प्रहसितास वदला दाखव तूं वत्स मार्ग आम्हांस ।
तनया शोधाया चल लागोत अनेक दिवस वा मास ॥ ७
दोन्ही श्रेणींतिल जे बोलावुनि घेतले समस्त खग ।
परिवारासह आले प्रल्हादीं व्यक्त करुनि अनुराग ॥ ७७
पवना शोधायाला बसुनि विमानांत चालले खग ते ।
यत्नें गुहादि पाहति करून एकाग्र सकल नयनांतें ॥ ७८
प्रतिसूर्याला कळली वार्ता प्रल्हाद-दूत-वदनानें ।
तो अञ्जनेस सांगे दुःखानें स्खलितें जाहल्या वचनें ॥ ७
पहिल्या दुःखापेक्षां मोठें हें दुःख वाटलें तिजला ।
डोळे भरून आले अश्रुजलें करुण-रुदन करि बाला ॥ ८

१ कपट. २ पुनः येऊन भेटणेंरूपी पाणी शिंपडणें. ३

हे नाथा प्राणप्रिय ! मम मन तव पदयुगांत लीन असे ।
दुःखी मजला त्यागुनि आपण गेलात योग्य हें न दिसे ॥ ८१ ॥
पूर्वीच्या कोपाला अद्यापि मनांत नाथ ठेवून ।
सोडुनि मजला जाणें अपुलें हें उचितसें म्हणे कोण ॥ ८२ ॥
अमृतासमान हितकर मधुर असें वाक्य एक तरि बोला ।
नित्य महापुरुषांची असते आपन्निवारणीं लीला ॥ ८३ ॥
अपुलें दर्शन होइल या इच्छेनेंच रक्षिले प्राण ।
परि ती विफल जहाली मजला अति-शीघ्र येउ दे मरण ॥ ८४ ॥
पतिसंगाचे केले मनीं मनोरथ असंख्य ते झाले ।
निष्फल समस्त पडतां दुर्दैवाचे कठोरतम घाले ॥ ८५ ॥
या मन्दभागिनीस्तव पतीस ती प्राप्त जाहली काय ।
कुदशा जिची मनामधिं शंका डोकावते पुनः हाय ! ॥ ८६ ॥
वदली वसन्तमाला मनीं अमंगल नकोस आणू हें ।
लौकर पतिमुखदर्शन होइल मम वचन सत्य हें पाहें ॥ ८७ ॥
प्रतिसूर्य अंजनेला वदला कल्याणि ! पतिस आणीन ।
मी शीघ्र अशुभ शंका काढुनि तूं टाक गे मनांतून ॥ ८८ ॥
यापरि आश्वासुनि तो बसुनि विमानांत तीव्रवेगी जें ।
भूतल पाहत गेला होते ज्यासह अनेक खगराजे ॥ ८९ ॥
'भूतरवा'[1] अटवीमधिं आले ते सजलजलदतुल्यगजा[2] ।
पाहुनि वदले त्याला कोण वरें ओळखे न खगराजा ॥ ९० ॥
हा 'कालमेघ'[3] जेथें पवनंजय त्या स्थलीं असावाच ।
अनुमान आमुचें हें वाटें होईल सर्वथा साच ॥ ९१ ॥
मित्रासमान हा गज पवनाच्या जवळ सर्वदा राहे ।
ऐसें बोलत तो खगसमूह मनिं भीति धरुनि त्या पाहे ॥ ९२ ॥
विद्याधररव मोठा ऐकुनि गजराज गर्जुनी पाहे ।
जिकडे तिकडिल खेचर वृन्द मनीं तेधवा भया वाहे ॥ ९३ ॥
पाहून जनसमूहा स्वामीच्या रक्षणांत तत्पर तो ।
गज पवनाच्या सन्निध राहे अन्यत्र नैव तो वळतो ॥ ९४ ॥

---

१ या नांवाच्या जंगलांत. २ पाण्यानें भरलेल्या मेघासारखा श्याम.
३ या नांवाचा पवनंजयाचा हत्ती.

पवनंजया सभोंवति सलील फिरवून सोंड गज फिरतो ।
क्रोधें पाहुनि खेचर-गणास भिववून शीघ्र पळवी तो ॥ ९५ ॥
आणून हस्तिणींना केलें वश गजवरास खगवृन्दें ।
नन्तर उत्सुक होउनि आले पवनासमीप आनन्दें ॥ ९६ ॥
सर्व उपायामध्यें वश करण्याचा उपाय नारीच ।
तेणें प्रचण्ड गज तो चित्रगजासमचि[1] जाहला साच ॥ ९७ ॥
चित्रासम अति निश्चल वसलेला पवन पाहिला त्यांनीं ।
केली विज्ञप्ति तया प्रत्युत्तर देइ तो न त्या मौनी[2] ॥ ९८ ॥
प्रल्हाद नि केतुमती पवनाच्या मस्तकास हुंगून ।
वदले तया प्रमोदें पुत्रा स्वीकारिलेस कां मौन ॥ ९९ ॥
मृदुशयनोचित-देहा[3] विजन[4]-वनीं कष्टवू नकोस सुता ।
माता-पिता म्हणाले परि त्यांचें होय सर्व वचन वृथा ॥ १०० ॥
पवन न त्यांना बोले करुनि अभिप्राय खूण त्या कळवी ।
मी मरणाचा निश्चय केला आशय असा तया दावी ॥ १०१ ॥
भेटेल अंजना नच जोवरि मजला न अन्न सेवीन ।
बोलेन न मी कांहीं ऐसें माझें असें प्रतिज्ञान[5] ॥ १०२ ॥
डोकें घालुनि खालीं मौनव्रत अंगिकारिलें पवनें ।
केली मृतिप्रतिज्ञा[6] करिती खग शोक सर्व खिन्नमनें ॥ १०३ ॥
प्रतिसूर्य हंसुनि वदला नभश्चरांनो अधीर होउ नका ।
मी बोलवीन पवना तुम्ही त्यागाल तेधवा शोका ॥ १०४ ॥
भेटुनि पवना वदला अनुक्रमें मी कुमार सांगेन ।
जें वृत्त ऐक सगळें अपुलें तूं शान्त चित्त ठेवून ॥ १०५ ॥
सन्ध्याभ्रपर्वतावरि झालें उत्पन्न केवलज्ञान ।
नामें अनङ्गवीची मुनिवर्या घातिकर्म घातून ॥ १०६ ॥
वन्दन करून त्यांना बसुनि विमानांत जात असतांना ।
एका शैलावरती आलों आक्रुष्ट शब्द करि कानां ॥ १०७ ॥
स्त्रीचा तो रुदनध्वनि होता वीणेसमान मधुर जरी ।
करुणा उत्पन्न करी आलों जाणावयास तच्छिखरीं ॥ १०८ ॥

---

१ चित्रांतील हत्तीसारखा. २ न बोलणारा ३ मऊ शय्येवर झोपण्यास योग्य तुझें शरीर आहे. ४ निर्जन. ५ प्रतिज्ञा. ६ मरणाची प्रतिज्ञा.

पर्यङ्का नांवाच्या गुहेंत रुदनानुसार जाऊन ।
मी पाहिलें सखीसह तेथें करि अञ्जना सती रुदन ॥ १०९ ॥
निर्वासनकारण[1] जें सांगितलें तें वसन्तमालेनें ।
आश्वासिलें तिला मी झाली ती तेधवा प्रसन्न मनें ॥ ११० ॥
ज्याच्या देहावरती होतीं शुभलक्षणें अनेक अशा ।
ती अञ्जना प्रसवली पुत्रां उज्ज्वल करी समस्त दिशा ॥ १११ ॥
या वार्ताश्रवणानें पवनाच्या जाहला मना तोष ।
नन्तर काय पुढें हो तद्वदनांतुनि असा निघे घोष[2] ॥ ११२ ॥
प्रतिभानु पुनः वदला तो सुन्दर बाल त्या विमानांत ।
ठेवित असतां पडला त्या शैलाच्या शिला-समूहांत ॥ ११३ ॥
हें ऐकतांच झाला पवनञ्जय तीव्र-दुःख-सन्तप्त ।
काय घडे हें बोलुनि निजभालावरि[3] करी कराघात[4] ॥ ११४ ॥
विद्याधर ही झाले सगळे हाकारमुखर[5] परि वदला ।
प्रतिभानु पुनः ऐका बालाची काय जाहली लीला ॥ ११५ ॥
पडला ज्या पाषाणीं त्याचे तत्काल जाहले तुकडे ।
परि बाल अक्षताङ्गचि[6] गालीं स्मित करुनि पाहि चोहिकडे ॥ ११६ ॥
यास्तव आम्ही त्याचें श्रीशैल असें सुनाम ठेवून ।
त्याला घेउनि बसलों सगळे यानांत मुदित[7] होऊन ॥ ११७ ॥
गेलों वसन्तमाला नि अंजनेसह हनूरुहाख्यपुरीं ।
वाढे बालक तेथें मावे आनन्द आमुच्या न उरीं ॥ ११८ ॥
नांव हनूमान् त्याचें दुसरें उत्सव करून ठेवियलें ।
अद्भुतकर्मा[8] बालक पवना त्याचें सदैव होय भलें ॥ ११९ ॥
शीलें परिपूर्ण अशी माझ्या नगरांत अंजना राहे ।
त्वद्विरहानल योगें पवना कृशता वपूंत[9] ती वाहे ॥ १२० ॥
ऐकुनि अद्भुत सुकथा पवनासह सकल हृष्ट खग झाले ।
बाला नि अञ्जनेला बघण्या उत्सुक पुराकडे गेले ॥ १२१ ॥

---

१ हकालून देण्याचें कारण. २ शब्द. ३ कपाळावर. ४ हातानें बडविणें. ५ हाय हाय असा शब्द वारंवार बोलणारे. ६ ज्याच्या अंगाला जखम जाहली नाहीं असा. ७ आनन्दित. ८ आश्चर्यकारक कार्य करणारा. ९ शरीरांत.

संयोग दंपतीचा व्हावा ऐशी धरून अभिलाषा ।
ते विद्याधर गेले होय महोत्सव उणें न परितोषा ॥ १२२ ॥
सर्व-खगा प्रतिसूर्यें करून अत्याग्रहास ठेवियलें ।
मासद्वयान्त सौधीं अनुदिनिं[1] नव नव सुखास अनुभविलें ॥ १२३ ॥
प्रतिसूर्यें सर्व खगा वस्त्राद्युपचार[2] करुनि पाठविलें ।
स्वर्गामधिं मासद्वय निवास केला असें तया गमलें ॥ १२४ ॥
पवना नि अंजनेला हनुमन्ताच्या बघून शिशुलीला ।
आनन्द फार झाला गेला चिरविरह पूर्ण विलयाला ॥ १२५ ॥
बाल्यावस्था संपुनि हनुमंताची कुमार तो झाला ।
नानाविद्या साधुनि सुकृतानें करि अनेक शुभलीला ॥ १२६ ॥
यौवन-शोभा आली त्याच्या देहा अतीव सुन्दर तो ।
नर-नारींच्या नयना आणि मना कामदेव-सम हरि तो ॥ १२७ ॥
स्वर्गीं उपभोगुनि जें उरलें सत्पुण्य तें तया लावी ।
जिनपूजनादिकार्यीं नाना-वैभव-यशास ही तें वी ॥ १२८ ॥
श्रीशैलाच्या जननें झाला पवनाञ्जना समगम जो ।
ऐके त्या जिनदासा सुख, यश, धन, विजय सर्वदैव भजो ॥ १२९ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुले कृतपद्यानुवादे पवनाञ्जना-समागमाभिधानं नाम अष्टादशं पर्व ॥ १८ ॥

---

१ प्रत्येक दिवशीं. २ वस्त्रादिकांनीं आहेर सन्मान.

# एकोणीसाव्या पर्वांतील कथेचा सारांश

हनूरुहनगरांत अञ्जना व पवनञ्जय सुखानें राहू लागले. हनूमानानें बाल्या-वस्थेंतून कुमारावस्थेंत प्रवेश केला. त्याला सर्व कला व विद्यांचें उत्तम ज्ञान झालें. शस्त्रशास्त्रांचा तो ज्ञाता झाला. आधींच सुन्दर असलेला हनूमान् तारुण्यांत फारच सुन्दर दिसूं लागला.

इकडे रावणाशीं संधि करूनही वरुणानें त्याचें उल्लङ्घन केलें. त्यामुळें पुनः युद्धाचा प्रसंग उद्भवला. अनेक विद्याधर राजांना रावणानें दूत पाठवून युद्धास साहाय्य करण्यासाठीं कळविलें. ते सैन्यासह रावणाकडे आले.

हनूरुहपुरांत प्रतिसूर्य राजाकडेही त्याचा दूत लेख घेऊन आला. तो वाचून प्रतिसूर्य व पवनंजय दोघेही युद्धसाहाय्य करण्यासाठीं निघण्याची तयारी करूं लागले. मारुतीला हें वृत्त समजलें. मीच युद्धासाठीं जाईन आपण जाऊ नये. असें तो आपल्या पित्याला व आईच्या मामाला म्हणाला. नखानें तोडतां येणाऱ्या गवता-साठीं कुऱ्हाड कशास पाहिजे ? यास्तव मीच जातों असें त्यानें म्हटलें. व त्याचा आग्रह पाहून त्यांनींही संमति दिली.

मारुति सैन्यासह रावणाकडे आला. पवनंजयानें आपल्या पुत्राला पाठविलेलें पाहून रावणाला आनन्द वाटला. त्याच्या मुखावरचें तेज पाहूनच याच्या साहाय्यानें आपण वरुणाला जिंकू असें त्याला वाटलें.

युद्धाला सुरुवात झाली. रावणानें वरुणाचें नगर घेरलें. वरुणही आपल्या शूर शंभर पुत्रासह नगरांतून लढण्यासाठीं बाहेर पडला. त्यानें रावणसैन्यावर तीव्र हल्ला केला. रावणाचें सैन्य घाबरून पळून जाऊ लागलें तेव्हां त्याला धैर्य देण्यासाठीं रावण रणांत आला. वरुणाच्या शंभर पुत्रांनीं घेरलें. व त्याला त्यांनीं बाणांनीं जर्जर केलें हें पाहून मारुति रावणाकडे आला व तो वरुणपुत्राबरोबर लढूं लागला. रावण तेथून निघून वरुण-राजाबरोबर युद्ध करूं लागला.

इकडे सिंह जसा अनेक हत्तीबरोबर लढतो तसें मारुति वरुणपुत्राबरोबर विद्येच्या सामर्थ्यानें लढला व त्यानें त्यांना बांधून टाकिलें. व वानरी-विद्येच्या साहाय्यानें शेपटीच्याद्वारें इतर अनेक वीरासही त्यानें बान्धलें.

वरुणाबरोबर रावणाचेंही घोर युद्ध सुरू झालें. पण आपल्या शंभर पुत्रांना मारुतीनें बांधून टाकिलें हें समजल्यामुळें तो हताश झाला. विद्यांचें स्मरण होईना. ही संधि साधून रावणानें त्याच्या 'योधिनी' नामक विद्येचें छेदन केलें व त्याला जिवन्त पकडलें. व तरवारीच्या पिंजऱ्यामध्यें त्याला डांबून टाकिलें. व त्याला कुम्भकर्णाच्या ताब्यांत दिलें. याप्रमाणें युद्ध संपवून सर्वत्र अभय घोषणा करवून शत्रुसैन्यालाही निर्भय केलें.

पण गांवांत आपल्या कांहीं सैन्यासह कुम्भकर्ण घुसला व त्याच्या सैन्यानें लूटालूट केली. कांहीं सुन्दर स्त्रियांनाही त्यानें पकडून आणिलें. रावणाला हें समजलें तेव्हां कुम्भकर्णावर तो रागावला. तो म्हणाला 'कुम्भकर्णा' हें दुराचरण आपल्या कुलाला कलंक लावणारें आहे' या स्त्रियांना तूं पकडून आणलेस हें तर फार गैर केलेंस" असें म्हणून तो पुन: त्या स्त्रियांना म्हणाला 'मातांनो आपण भिऊं नका. शोक सोडा. क्षमा करा आमच्या हातून चूक झाली आहे.' असें बोलून त्यानें सर्व स्त्रियांना सोडून दिलें. रावणाला प्रशंसून त्या स्त्रिया आपल्या घरीं गेल्या.

इकडे शूर वरुणाला आपल्या पुढें आणविलें व त्यालाही तो म्हणाला 'वरुणराजा, तूं खेद करूं नकोस. युद्धांत पकडला जाणें हें खेदाला कारण नाहीं. पळणें हें योग्य नव्हे. तें खेदाचें कारण आहे' असें म्हणून त्याला पूर्वीप्रमाणेंच राज्य कर व प्रजांचें रक्षण कर म्हणून सोडून दिलें.

वरुणानें रावणाला 'सत्यवती' कन्या देऊन मोठ्या थाटानें विवाह केला. नंतर रावण मारुतीसह लंकेला गेला. मारुतीच्या पराक्रमानें रावण अतिशय प्रसन्न झाला होता. त्यानें चन्द्रनखेच्या 'अनंगपुष्पा' कन्येबरोबर मारुतीचा विवाह केला. नलराजानें त्याला आपली 'हरिमालिनी' कन्या दिली. किन्नर नामक राजानें आपल्या शंभर कन्याबरोबर त्याचा विवाह केला. सुग्रीव राजानें आपल्या 'पद्मरागा' नांवाच्या अत्यंत सुन्दर कन्येबरोबर त्याचा विवाह केला. मारुति अतिशय उत्कर्षशाली झाला हें पाहून अंजना व पवनंजयांना मोठा आनंद वाटला. ते सर्व सुखानें राहिले. रावणही लंकेत राहून सुखोपभोग घेऊं लागला.

---

# एकोणीसावें पर्व

[युद्धांत साहाय्य करण्यासाठीं आलेल्या मारुतीला पाहून रावण आनन्दित होतो.]

हनूरुहपुरीं राहे अंजना पवनंजय ।
हनूमन्तासह सुखें तया शिकविती नय ॥ १ ॥
कला नि विद्या सकल प्राप्त झाल्या मरुत्सुता[1] ।
शस्त्रशास्त्रांत चतुरा आली त्या बहु दक्षता ॥ २ ॥
होते करिकराकार[2] पुष्ट त्याचें भुजद्वय ।
विशाल वक्षःस्थलही शोभे जणु रमालय[3] ॥ ३ ॥
झालें त्या प्राप्त तारुण्य लावण्यहि[4] मनोहर ।
दिसे तो पौर्णिमाचन्द्रापेक्षाहि बहु सुन्दर ॥ ४ ॥
इकडे क्रुद्ध झालेल्या रावणें सन्धि-दूषण ।
केलें म्हणून वरुणीं प्रयाण चमु[5] घेउन ॥ ५ ॥
दूतें वार्ता कथियली आले विद्याधरेश्वर ।
तेणें जमविला मोठा रावणें सैन्यसागर ॥ ६ ॥
साहाय्य करण्या यावें प्रतिसूर्य-खगेश्वरा ।
पवनासह ही माझी ऐकावी प्रार्थना-गिरा[6] ॥ ७ ॥
ऐसा लेख दिला दूतें प्रतिसूर्य-करामधिं ।
पाहिला पवनानेंही जो आहे चतुरस्रधी[7] ॥ ८ ॥
राज्यपालन तूं वत्स करी युद्धीं सहायता ।
कराया रावणा जातो आम्हीं तूं ठेव दक्षता ॥ ९ ॥
बोलून ऐसें उभय युद्धासाठीं मनोजवें[8] ।
निघाले म्हटलें नम्र होऊन पवनोद्भवें[9] ॥ १० ॥
युद्धार्थ मीच जाईन न जावें तात आपण ।
नखच्छेद्य[10] तृणासाठीं खड्गाचें न प्रयोजन ॥ ११ ॥

---

१ हनूमान. २ हत्तीच्या सोंडेप्रमाणें पुष्ट. ३ लक्ष्मीचें घर. ४ सौन्दर्य. ५ सैन्य. ६ विनंतीचें भाषण. ७ चतुर बुद्धीचा. ८ मनाच्या वेगानें. ९ हनूमन्तानें. १० नखानें तोडतां येणारें.

वत्सा ! तूं बाल आहेस युद्धास्वाद नसे तुला ।
म्हणून राज्य रक्षाया राहे येथेंच कोमला ॥ १२ ॥
श्रीशैल वदला ताता मुक्तिस्वाद[1] कुणा असे ।
तथापि ती मिळविती योगी तैसेंचि हें दिसें ॥ १३ ॥
जाऊन अरि जिंकीन माना संशय यांत न ।
सूर्यापूर्वींच अंधार हरी अरुण तत्क्षण ॥ १४ ॥
मला बालक मानून निषेधावें न आपण ।
असे पौरुष ज्याच्यांत वयोऽल्पत्व[2] न कारण ॥ १५ ॥
निवारिलें तरी हा न थांबेल दिसलें असें ।
याच्यांत पौरुष-गुण ज्या न पार असा दिसे ॥ १६ ॥
युद्धास जावया तातें अनुज्ञा[3] जेधवा दिली ।
प्रमोदसलिलें त्याची भरली हृत्सरःस्थली[4] ॥ १७ ॥
स्नानभोजन पूर्वाहीं करून गमन-क्षणीं ।
तो वन्दी श्रीजिनां सिद्धां भक्ति ज्याच्या वसे मनीं ॥ १८ ॥
मातेच्या मातुला[5] तेवी जननी-जनकादिकां ।
नमून तो निघे जेव्हां दिसला रविसारखा ॥ १९ ॥
रवितुल्य विमानांत वसे पवन-नन्दन ।
वीरश्रेष्ठ निघे वेगें शस्त्रें घेऊन भीषण ॥ २० ॥
'जलवीचि' सुनामाच्या शैलीं[6] श्रीशैल पातला ।
सेना विशाल घेऊन रवि अस्तास पावला ॥ २१ ॥
कथा सांगून वीरांच्या व्यतीत रजनी करी ।
दिनीं लंकेस तो पोचे शौर्य ज्याच्या वसे उरीं ॥ २२ ॥
श्रीशैल-सैन्य पाहून झाले विस्मित राक्षस ।
हनूमद्रूप हरितें त्यांचें नयन मानस ॥ २३ ॥
विमानांतून पडतां शैलाचें चूर्ण हा करी ।
तेणें 'श्रीशैल' नांवाची हा अन्वर्थकता धरी ॥ २४ ॥
असें वर्णन ऐकून चालला रावणाकडे ।
सभोंवती असे ज्याच्या तेजाचें फांकलें कडें ॥ २५ ॥

---

१ मोक्षाचा अनुभव. २ वयानें लहानपणा. ३ अनुमति. ४ हृदयरूपी सरोवराची जागा. ५ मामाला. ६ पर्वतावर.

प्रेमें रावण भेटून तो तया बहु आदरी ।
स्निग्धशी दृष्टि सतत फेकी तो मारुतीवरी ॥ २६ ॥
वाढवी प्रेम अपुलें माझ्यावरि समीरणें ।
पाठवी पुत्र ज्याच्यांत असंख्य दिसती गुण ॥ २७ ॥
महासत्त्व नि तेजस्वी हा वीर मज लाभला ।
अवश्य जय लाभेल नसे दुस्तर तो मला ॥ २८ ॥
रावणें वर्णितां ऐसे गुण मारुति लाजला ।
करी अधो वदन तो तेणें अधिक शोभला ॥ २९ ॥
भावियुद्ध-भयें सूर्य गेला अस्ताचलावरी ।
सन्ध्या सती अनुसरे प्रेम ठेवून अन्तरीं ॥ ३० ॥
चन्द्रानें नभिं येऊन दहा उजळिल्या दिशा ।
शोभे निशावधू त्याची जी झाली पूर्ण तद्वशा ॥ ३१ ॥
झाली पहाट अरुणप्रकाश पसरें नभीं ।
सूर्यापुढें दिनरमा प्रेमानें राहिली उभी ॥ ३२ ॥
सैन्यसागर घेऊन निघे रोषें दशानन ।
ज्याच्या बरोबर असे वीर मारुतनन्दन[2] ॥ ३३ ॥
अरातिवरि[3] जातांना भासे रावण तो कसा ? ।
कुठारराम[4]ावरती चक्रेश्वर सुभूमसा[5] ॥ ३४ ॥

(मारुति वरुणाच्या शंभर पुत्रांना पराक्रमानें युद्धांत बांधतो.)

वरुणाच्या पुरा घेरी क्रोधें जेव्हां दशानन ।
झालें प्रक्षुब्ध पुर तें करी वरुण गर्जन ॥ ३५ ॥
पाताल-पुंडरीकाख्यपुरांत भट उत्तम ।
सन्नद्ध झाले युद्धास कोपाचा ज्यां नसे शम ॥ ३६ ॥
निघाले भट युद्धास असुरासम भासती ।
चमरासुरसा[6] शोभे तदा वरुण-भूपति ॥ ३७ ॥
सुत शम्भर राजाचे युद्धा उद्युक्त जाहले ।
नभीं शस्त्रगणें ज्यांच्या रविदर्शन लोपलें ॥ ३८ ॥

---

१ पवनंजय. २ पवनंजयाचा पुत्र मारुति. ३ शत्रू. ४ परशुराम. ५ या नांवाचा चक्रवर्ती. ६ चमरेन्द्रासारखा.

भीषणाक्रमणें त्यांनीं शत्रुसेना पिटाळली ।
शस्त्रें गळून घामानें तिच्या पतन पावली ॥ ३९ ॥
पाहून सैन्य पळतें आपुलें क्रुद्ध रावण ।
रिपुसैन्या करी विद्ध वर्षून शर दारुण ॥ ४० ॥
घेरिती जलवृष्टीनें जैसें जलद भास्करा ।
रावणा नृपपुत्रांनीं घेरिलें पृथिवीश्वरा[1] ॥ ४१ ॥
त्यांच्या शरसमूहांनीं झाला रावण जर्जर ।
परंतु सोडी न च तो मानिसिंह रणाजिरें[2] ॥ ४२ ॥
कुंभकर्णास वरुणें तथा इन्द्रजितासही ।
केलें जर्जर बाणांनीं रुधिरें लाल हो मही ॥ ४३ ॥
शरविद्ध-दशग्रीव रुधिरें लाल जाहला ।
भटां पलाशि[3]पुष्पांच्या समूहासम भासला ॥ ४४ ॥
पाहून रावणाची ही दशा मारुति कोपला ।
तो सूर्यासम तेजस्वी लढाया रणिं पातला ॥ ४५ ॥
प्रचण्ड वायु मेघांना पळवी जेवि मारुति ।
वरुणाच्या शतसुतां शौर्यें ज्यास नसे मिति ॥ ४६ ॥
युद्ध होतें मृगेन्द्राचें जैसें मत्तगजासवें ।
झालें श्रीशैलाचें तसे तें यथार्थ न वर्णवे ॥ ४७ ॥
विद्यासामर्थ्य-लाभानें तयें समरिं बांधिलें ।
पशूस बांधिती जैसें तेणें तन्मन हर्षलें ॥ ४८ ॥
शिरून शत्रुसैन्यांत वीर विध्वंसिले तयें ।
बघून शौर्य सुरही थक्क झाले सुविस्मयें ॥ ४९ ॥
विशाल वानराचें तो बनवी रूप आपुलें ।
शेपटीनें तयें वीर ओढून बहु बांधले ॥ ५० ॥
करीत असतां युद्ध-क्रीडा श्रीशैल यापरि ।
आला वरुण भूपाल क्रुद्ध होऊन त्या वरि ॥ ५१ ॥
हनूमन्ताकडे येत आहे वरुण पाहुन ।
राक्षसाधिप रोषानें धावे त्यावरि रावण ॥ ५२ ॥

१ त्रिखण्डाचा अधिपति. २ रणांगण. ३ पळसाच्या फुलासमान.

दोघांचें जाहलें घोर युद्ध कातर-भीतिद[1] ।
कुतुकें पाहिलें देव-देवींनीं विस्मयप्रद ॥ ५३ ॥
बांधिले शतपुत्रांना वरुणें वृत्त ऐकिलें ।
शोकें त्याचें तदा चित्त धैर्यें रहित जाहलें ॥ ५४ ॥
विद्यास्मृति न त्या झाली ढिला झाला पराक्रम ।
आतां हा जिकणें शक्य आहे वरुण दुर्दम ॥ ५५ ॥
दशास्यें सन्धि साधून विद्या छेदुनि योधिनी[2] ।
जिवन्त धरिलें त्यास मनीं हर्षित होउनि ॥ ५६ ॥
शस्त्रांच्या पिंजऱ्यामध्यें त्याला डांवुनि ठेविलें ।
रक्षाया कुम्भकर्णाच्या तयें ताब्यांत त्या दिलें ॥ ५७ ॥
दिली दशास्यें अभय-घोषणा युद्ध संपलें ।
विश्रान्ति घ्यावी सैन्यांनीं असें सर्वा निवेदिलें ॥ ५८ ॥
'भवनोन्माद' उद्यानीं राहिला राक्षसेश्वर ।
विजयानन्द त्या झाला जो नसे शब्दगोचर ॥ ५९ ॥
समुद्रजल-संगानें झालेला वायु शीतल ।
सैन्याच्या युद्धखेदाला हरी मन्द नि कोमल ॥ ६० ॥
स्वामीस धरिलें ऐसें जाणून सगळें वल ।
शिरलें नगरामध्यें भीतीनें होय आकुल ॥ ६१ ॥
शस्त्रादिसाधनें तींच तेवि तेच महाभट ।
प्रधानाच्या वियोगानें झाले ते विफलोत्कट ॥ ६२ ॥
पुण्याची श्रेष्ठता जाणा ज्याच्या उदयिं मानव ।
अनेक उदया येती नाशें आपत्ति ही नव ॥ ६३ ॥
शत्रूवरील कोपानें कुम्भकर्ण शिरे पुरीं ।
देई उपद्रव जनां दया ज्याच्या नसे उरीं ॥ ६४ ॥
भटाकडून लुटवी धनरत्नादिकास तो ।
न लोभ जरि त्या होता शत्रुत्वें नर कोपतो ॥ ६५ ॥
रतिसौंदर्य धरिती देहीं ऐशा कुलांगना ।
हरिल्या कुम्भकर्णानें करिती वहु रोदना ॥ ६६ ॥

१ भित्र्यांना भीति दाखविणारें. २ जिच्यामुळें खूप लढता येतें अशी विद्यादेवता.

विनानीं ठेविलें त्यांना अन्योन्या बोलती असे ।
शीलनाशें सखे ! प्राण मम देहीं न तो वसे ॥ ६७ ॥
सन्दिग्धमरणा कोणी नारी सखिस बोलली ।
आठवून पतीला ती परि मूर्च्छित जाहली ॥ ६८ ॥
माता पिता पति भ्राता पुत्राला करुणस्वरें ।
सोडवा वदती दीन छाती बडविती करें ॥ ६९ ॥
आला घेऊन तो ऐशा स्त्रियांना रावणापुढें ।
कोपानें लाविली तेणें दृष्टि कुंभश्रुतीकडे ॥ ७० ॥
वदला बालका ! तूं न कार्य केलेंस चांगलें ।
दुराचरण हें मोठें येणें होईल कां भलें ? ॥ ७१ ॥
यांचा न दोष कांहींही यांना बान्धून आणणें ।
अन्याय हा असे मोठा चांगलें कोण या म्हणें ॥ ७२ ॥
करी रक्षण दीनांचें शत्रुलोकास संहरी ।
गुरूस सेवी स्वकरें उपदेश मनीं धरी ॥ ७३ ॥
मातांनो ! दोष तुमचा कांहींही न. भिऊं नका ।
क्षमा करावी होतात बालकांच्या अशा चुका ॥ ७४ ॥
बोलून ऐसें सोडून दिल्या त्या सकल स्त्रिया ।
गेल्या घरीं प्रशंसून रावणाच्या शुभा नयां ॥ ७५ ॥
आणवी सुभटद्वारें वरुणा शूर रावण ।
लज्जेनें तेधवा खालीं करी वरुण आनन ॥ ७६ ॥
युद्धीं पकडला जाणें हें न शोकास कारण ।
वीरग्रहण हें आहे सत्कीर्तीचेंच भूषण ॥ ७७ ॥
रणांत इच्छिती वीर दोन गोष्टीस सज्जना ! ।
धरणें तेवि मरणा इच्छिती न पलायना ॥ ७८ ॥
राज्य पूर्वीप्रमाणेंच रक्षी स्वपदिं राहुनी ।
मित्र-बांधवसंपन्न हो उपद्रव नाहुनि ॥ ७९ ॥

उपजातिवृत्त.

ऐकून हें भाषण रावणाचें । तो बोलला वीर प्रचेत साचें ॥
विशाल आहे तव पुण्य नाथ! । द्वेषी तुला होयचि तो अनाथ ॥८०॥

---

१ मरणाविषयीं जिचा संशय वाटते अशी. २ कुंभकर्णाकडे. ३ दुर्नीति.

आहे तुझें धैर्य यतिप्रमाणें । स्तुतीस तें पात्र असेंचि मानें ॥
चक्रादिरत्नाविण जिंकिलेस । मला तुझें पुण्य दिसे विशेष ॥ ८१ ॥
प्रभाव जो वायुसुतांत आहे । तुझेंचि त्या कारण पुण्य पाहे ।
म्हणून तो शौर्यविशेष-शाली । आज्ञा तुझी मोद धरून पाळी ॥ ८२ ॥
पृथ्वी न ही सत्य असे कुणाची । वंशक्रमें, उक्ति असेचि साची ।
ज्याचा असे विक्रमकोप त्याची । ही वीरभोग्या वदतात साची ॥ ८३ ॥
तूं आमुचा ईश विशालकीर्ते ! क्षमा करी वा शुभधाममूर्ते[1] ! ।
मी बोललों भाषण कोपयुक्त । क्षमा करी तूं तुज तेंचि युक्त ॥ ८४ ॥
आहेस तूं उन्नत कार्यकारी । संबन्ध व्हावा न तयास वारी ।
स्वीकारि तूं सत्यवतीसुतेस । ही पूर्ण माझी करि तूंच आस ॥ ८५ ॥
झाला विवाहोत्सव मोदकारी । दशास्यहस्तावरि देइ वारि ।
स्वीकारिली सत्यवती तयानें । हो मण्डपीं सुन्दर नृत्यगाणें ॥ ८६ ॥
सन्मान केला वरुणें तयाचा । प्रसंग झाला सगळा सुखाचा ।
लंकेस जायास निघे दशास्य । मुखीं जयाच्या नित मोदहास्य ॥ ८७ ॥
कन्यावियोगें बहु दुःख वाटे । सुप्रेम ज्याच्या हृदयांत दाटे ।
लंकापुरा प्रेपुनि जावयास । येई स्वकीया नृप तो पुरीस ॥ ८८ ॥
नेलें हनुमन्ताला दशकण्ठें मुदित हृदयिं होऊन ।
लङ्कापुरीस केला तेणें त्याचा अपूर्व सन्मान ॥ ८९ ॥
चन्द्रनखेची कन्या 'अनङ्गपुष्पा' असे जिचें नाम ।
ती श्रीशैलास दिली होता जो कामतुल्य[2] अभिराम ॥ ९० ॥
पुरकर्णकुण्डलामधिं केला राज्याभिषेक मोदानें ।
त्याचा याचक-वर्गी केलें सन्तुष्ट उचित धनदानें ॥ ९१ ॥
'हरिमालिनी' सुकन्या रूपानें जिंकिलें रमेस जिनें ।
किष्कुपुरीं नलभूपें दिली तया वैभवें प्रसन्नमनें ॥ ९२ ॥
शंभर किन्नरकन्या[3] वरिल्या किन्नरसुगीत-नगरांत ।
भोगी सौख्य तयासह लाभे ज्या विजय नित्य समरांत ॥ ९३ ॥
किष्किन्धपुरामध्यें राजा सुग्रीव अधिप खचरांचा ।
तारा तयास भार्या रूपें हरि गर्व अमररामांचा[4] ॥ ९४ ॥

---

१ शुभ तेजाची मूर्ति असा. २ मदनासारखा. ३ किन्नर नामक राजाच्या कन्या. ४ देवाङ्गनांचा.

'पद्मरागा' जिचें नांव झाली या उभया सुता ।
जी रूपें भासते पद्मा कोमलाङ्गी जशी लता ॥ ९५ ॥
यौवनीं खुललें रूप विवाहायोग्य जाहली ।
चिन्ता सुग्रीवहृदयीं उत्तरोत्तर वाढली ॥ ९६ ॥
पटांत नृपपुत्रांचीं चित्रें विविध काढिलीं ।
सुतेनें पाहिलीं सर्व तिला योग्य न वाटलीं ॥ ९७ ॥
सखीनें हनुमंताचें चित्र दाखविलें तिला ।
पाहून मोद परम तिच्या हृदयिं जाहला ॥ ९८ ॥
तुला आवडला काय वदली तिजला सखी ।
याच्याविण न होईन सांगत्ये मी खरें सुखी ॥ ९९ ॥
सखी जाऊन वदली ताता श्रीशैल आवडे ।
पद्मरागामना आज संपलें तव सांकडें[1] ॥ १०० ॥
पटांत पद्मरागेचें चित्र सुन्दर रेखिलें ।
जें चित्रकारवर्गानें पाहून बहु शंसिलें ॥ १०१ ॥
दूताजवळ देऊन सुग्रीव पट पाठवी ।
श्रीपुरीं हनुमन्ताला प्रणामें[2] दूत दाखवी ॥ १०२ ॥
सुग्रीवतनयाचित्र पाहून अतिसुन्दर ।
झाला स्मरशरें विद्ध होऊन मनिं जर्जर ॥ १०३ ॥
ही प्राप्त न मला झाली जगणें मम निष्फल ।
चिन्ता मनांत उपजे तियें तो होय आकुल ॥ १०४ ॥
गेला सुग्रीवनगरा परिवारास घेउन ।
केलें स्वागत सुग्रीवें अर्घपाद्यादि[3] देउन ॥ १०५ ॥
रूप त्याचें प्रमोदानें बघती नागराङ्गना ।
पुनः पुनः बघावें तें वाटे त्यांच्या सदा मना ॥ १०६ ॥
केला प्रवेश सुग्रीव-सौधीं श्रीपवनात्मजें ।
पाहून पद्मरागेस अनुराग मनीं रुजे ॥ १०७ ॥
झाला विवाह विभवें उभया मोद वाटला ।
माता-पित्यांच्या हृदयीं आनन्द बहु दाटला ॥ १०८ ॥

१ संकट. २ नमस्कार करून. ३ पाय धुणें, आसनावर बसविणें वगैरे.

अञ्जना आणि पवन सुग्रीवास विचारुन ।
सवधूक सुपुत्रास स्वपुरा जाति घेउन ॥ १०९ ॥
कन्या-वियोगें सुग्रीवतारा पीडित जाहले ।
परि योग्य वरा दानें मनीं सन्तोष पावले ॥ ११० ॥
समस्तभूतलीं पुत्रकीर्ति विस्तारली असे ।
अञ्जना-पवना यांना सुख चोहीकडे दिसे ॥ १११ ॥
देतात मजला मान मान्य मारुतिसारखे ।
असें वाटून लंकेंत दशानन वसे सुखें ॥ ११२ ॥
सर्वशत्रु-विनाशानें त्रिखण्डपति जाहला ।
विशालकीर्तिकान्तीचा दशास्य बहु शोभला ॥ ११३ ॥

उपजातिवृत्त.

राण्या तयाला अठरा हजार । मन्दोदरी सुन्दर त्यांत फार ।
ती मुख्य राणी गुणराजधानी । शची तियेला नित फार वानी ॥११४॥
महाप्रभावी दशकण्ठ झाला । खण्डत्रयेशत्व मिळे तयाला ।
विद्याधरांनीं अभिषेक केला । सुखांत त्याचा बहु काल गेला ॥ ११५॥
मध्याह्नसूर्यासम तेज ज्याचें । असेंचि जें दिव्य अमोघ साचें ।
तें चक्र लाभे शुभ रावणास । जें निश्चयानें करि शत्रुनाश ॥ ११६ ॥

वसन्ततिलक.

जें दण्डरत्न जणु मृत्यु अरीस वाटे ।
जें उग्रतेज धरि भीति खलास देतें ।
उल्कासमूह जणु गुंफियला सुदीर्घ ।
शस्त्रालयीं पुजुनि रावण देई अर्घ ॥ ११७ ॥
शुभकर्मोदयें प्राप्त झाली लंका कुलक्रमें ।
असा रावण विख्यात कीर्तीचा तींत तो रमे ॥ ११८ ॥
ज्याचें अद्‌भुत ऐश्वर्य प्रजाजनाहिता करी ।
संसारांतील जें सौख्य स्वयं येऊनि त्या वरी ॥ ११९ ॥
सम्यक्त्व-ज्ञान-चारित्र-प्राप्ति-कारण जें असे ।
मुनिसुव्रतनाथाच्या तीर्थीं पावनता वसे ॥ १२० ॥

---

१ पत्नीसहिता.

परंतु लोटला काल फार मोठा तयामुळें ।
मिथ्यात्व माजलें फार सत्यार्थ न कुणा कळे ॥ १२१ ॥
सत्यार्थ-मूढ कविंनीं प्रधान नर दूषिलें ।
तयांचें अन्यथा-रूप शास्त्रीं त्यांनीं निवेदिलें ॥ १२२ ॥
सम्यग्ज्ञान जया नाहीं पशुहिंसेंत रंगलें ।
कुग्रन्थ-जाल रचिलें अज्ञान नर वञ्चिलें ॥ १२३ ॥
जैसें घडलें आहे महानरांचें चरित्र तेंचि कथी ।
तें जैनशास्त्र आहे सुजना तें लाविते यथार्थ-पथिं ॥ १२४ ॥
वन्दन करून त्याला श्रेणिक जिनदास सूर्यसम झाला ।
कुमतोक्त-ग्रन्थातें त्यागून जिनागमांत तो रमला ॥ १२५ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत
पद्यानुवादे रावणसाम्राज्याभिधानं नाम एकोनविंशतितमं पर्व
विद्याधरकाण्डं समाप्तम् ॥ १९ ॥

---

# विसाव्या पर्वांतील कथांचा सारांश

गौतमगणधरांनीं रावणाच्या जन्मादिकांची अर्थात् त्याच्या जीवनांत घडलेल्या अनेक घटनांची सविस्तर माहिती श्रेणिकराजाला सांगितली. ती ऐकून त्याला आनंद वाटला. नंतर त्यानें गणधरांना वृषभादितीर्थंकर, भरतादिक बारा चक्रवर्ती, नऊ बलभद्र, नऊ नारायण व नऊ प्रतिनारायण यांची माहिती सांगा असा प्रश्न केला. तो ऐकून श्रीगौतम यतीश्वरांनीं प्रथमतः वृषभादितीर्थंकरांचें पूर्वजन्म, त्यांचे दीक्षागुरु, त्यांच्या पूर्वजन्माच्या राजधान्या यांची माहिती सांगितली. कोणत्या स्वर्गापासून या भरतक्षेत्रांत त्यांचा जन्म झाला याचें वर्णन करतांना त्यांच्या या जन्मांतील मातापिता, जन्मनक्षत्र, त्यांच्या राजधानी, दीक्षावृक्ष व त्यांनीं तपश्चरण करून कोठें मोक्षप्राप्ति करून घेतली त्या स्थानांचें वर्णन त्यांनीं केलें. तसेंच त्यांचें आयुष्य, शरीराची उंची, शरीराचा रंग यांचाही उल्लेख त्यांनीं केला. आयुष्याचें वर्णन करण्याच्यापूर्वी कालाचे भेद व पल्यादि-कालाचें प्रमाण यांचीही माहिती त्यांनीं श्रेणिकाला सांगितली. ती सांगून नंतर त्यांनीं भरतादि चक्रवर्तींचीं चरित्रें थोडक्यांत सांगितलीं. तीं याप्रमाणें:—

१ भरतचरित्र—श्रीवृषभनाथ हे भरतचक्रवर्तीचे पिता. मातेचें नांव यशस्वती. भरताला सुदर्शन चक्रादिक चौदा दिव्यरत्नांची प्राप्ति झाली. त्यानें चक्राच्या साहाय्यानें पांच म्लेच्छखण्ड व एक आर्यखण्ड अशा षट्खण्डपृथ्वीला जिंकिलें. यानें ही पृथ्वी जिंकल्यामुळें या पृथ्वीला 'भारत' हें नांव प्राप्त झालें. दीर्घकालपर्यन्त त्यानें पृथ्वीचा उपभोग घेतला. एकदा वैराग्य झालें तेव्हां त्यानें दीक्षा घेतली. केशलोच केल्यानंतर त्याला केवलज्ञान प्राप्त झालें. सर्व कर्मांचा नाश करून त्यानें पूर्णज्ञानादि गुणांची प्राप्ति अर्थात् मोक्ष प्राप्त करून घेतला.

२ सगरचरित्र— हा चक्रवर्ती पूर्वजन्मीं पृथ्वीपुरनगराचा 'विजय' नामक राजा होता. उत्तमरीतीनें प्रजापालन करून त्यानें वैराग्य झाल्यावर 'यशोधर' आचार्यापासून निर्ग्रन्थ दीक्षा घेतली. तीव्र तप करून तो 'विजय' नामक अनुत्तर

स्वर्गांत अहमिन्द्र झाला. दिव्यसुखांचा अनुभव घेऊन तो तेथून च्युत होऊन अयोध्येंत 'विजय' राजा व सुमंगलाराणी यांच्या पोटीं 'सगर' नांवाचा पुत्र झाला. याला महापुण्योदयामुळें चक्रवर्तीचें वैभव प्राप्त झालें. याला साठ हजार पुत्र होते. ते एकेवेळीं धरणेन्द्राच्या कोपाला बळी पडून मरण पावले त्यामुळें सगराला वैराग्य झालें. राज्य त्यागून तो जैन मुनि झाला व तीव्र तपश्चरणानें कर्मक्षय करून मुक्त झाला.

३ मघवचरित्र– हा पूर्वजन्मीं 'पुण्डरीकिणी' नगरीचा 'शशिभ' नांवाचा राजा होता. विरक्त होऊन तो 'विमल' गुरूंचा शिष्य झाला. तपश्चरणानें ग्रैवेयक-स्वर्गांत जन्मून अहमिन्द्र देव झाला. तेथून आयुष्य संपल्यावर श्रावस्ती नगरांत राजा सुमित्र व राणी भद्रवती यांचा 'मघव' नामक पुत्र झाला. हा सगराप्रमाणें चक्रवर्ती झाला. याची चौदा हजार देव आज्ञा मानीत असत व बत्तीस हजार राजे आज्ञावश होते. पुष्कळवर्षें राज्य करून हा विरक्त झाला. दीक्षा घेऊन तप करून समाधिमरणानें प्रथमस्वर्गांत महर्द्धिक देव झाला.

४ सनत्कुमारचरित्र– गोवर्धन नामक गांवांत जिनदत्त नांवाचा एक अतिशय धर्मनिष्ठ सावकार राहत होता. त्याच्या पत्नीचें नांव 'विनयवती' होतें. जिनदत्त श्रावक धर्मतत्पर राहून समाधिमरणानें स्वर्गांत देव झाला. विनयवतीला पतिमरणानें फार दुःख झालें. त्याच नगरांत हेमभुज नामक एक श्रावक होता. त्यानें धर्मोपदेशानें तिचा शोक नाहींसा करून तिला दान–जिनपूजनादिकार्यांत तत्पर केलें. तिनें एक सुन्दर जिनमंदिर बांधविलें. तें हेमभुजाच्या प्रेरणेनेंच. 'विनयवती' याप्रमाणें धर्माचरण करूं लागली. कालान्तरानें ती विरक्त झाली. तिनें आर्यिकेची दीक्षा घेतली. तप केलें व ती देवलोकांत देव झाली. कालान्तरानें 'हेमभुज' मरण पावला. धर्मकार्यांत अनुमोदन दिल्यामुळें तो एक सुन्दर यक्षदेव झाला. त्या भवांत त्यानें श्रावकमुनि आदिकांचें संकट दूर केलें. धर्मप्रेमामुळें तो सम्यग्दृष्टि-खरा श्रद्धानी झाला. नंतर दोन-तीन सुजन्म धारण करून तो महापुर-नगराचा राजा सुप्रभ व राणी तिलका या उभयतांना 'धर्मरुचि' नामक पुत्र झाला. कालान्तरानें विरक्त होऊन सुप्रभ आचार्याजवळ त्यानें दीक्षा घेतली. जीवदया, शीलव्रत, साधूंचें वैयावृत्य करणें आदिक गुण त्याच्या ठिकाणीं उत्कर्ष पावले होते. सल्लेखना साधून तो चौथ्या महेन्द्रस्वर्गांत देव झाला. तेथें दिव्यसुखें अनुभवून मरण पावला व नागपुरांत 'सहदेव राजा व राणी विजया' यांना सनत्कुमार नांवाचा अत्यन्त सुन्दर पुत्र झाला. सुदर्शनचक्रादि चौदा दिव्यरत्नें प्राप्त होऊन चक्रवर्ती झाला.

एकेवेळीं सौधर्मेन्द्रानें त्याच्या सौन्दर्याचें वर्णन केलें. तें ऐकून पाहण्यासाठीं कांहीं देव आले. त्यावेळीं व्यायाम-शाळेंत चक्रवर्तीला त्यांनीं पाहिलें. अंगाला तांबडी माती लागलेली होती. बाहु पिळदार व मांड्या पुष्ट, आणि छाती रुन्द व भरलेली पाहून देवांना इन्द्राचें वर्णन यथार्थ होतें असें वाटलें व त्यांनीं आपला अभिप्राय चक्रवर्तीला कळविला. चक्रवर्ती म्हणाला "सुरहो आपण थोडावेळ थांबा. मी स्नान भोजनादिक आटोपून सभेंत येऊन बसेन तेव्हां आपण मला पाहावें" देवांनीं कबूल केलें व त्याप्रमाणें चक्रवर्ती भोजनादिक आटोपून वस्त्रालंकार धारण करून सिंहासनावर बसला. देवांनीं पाहून म्हटलें 'राजन्, आपलें पूर्वीचें सौंदर्य आतां राहिलें नाहीं. मनुष्याचें सौंदर्य विजेप्रमाणें क्षणभंगुर व असार आहे.' हें देवांचें भाषण ऐकून चक्रवर्ती विरक्त झाला. दीक्षा घेऊन तीव्र तपश्चरण केलें. त्याला अनेक ऋद्धि प्राप्त झाल्या. ऋद्धींच्याद्वारें देहांत उत्पन्न झालेल्या रोगांचा नाश करणें शक्य असतांही देहाविषयीं अत्यंत ममत्वहीन होऊन त्यानें त्यांच्या वेदना सहन केल्या व अशा-रीतीनें आयुष्यान्तीं समाधिधारण करून तो मरण पावला व चौथ्या स्वर्गांत तो महर्द्धिक देव झाला. धर्मनाथ तीर्थंकर मोक्षाला गेल्यानन्तर व शान्तिनाथ तीर्थंकर उत्पन्न होण्याच्यापूर्वी अर्थात् अन्तरकालांत मघवा व सनत्कुमार हे दोन चक्रवर्ती होऊन गेले.

५ श्रीशान्तिनाथचक्री– पुण्डरीकिणी-नगरांत मेघरथ राजा राज्य करीत होता. तो संसारापासून विरक्त झाला. घनरथमुनीश्वराचा शिष्य होऊन त्यानें घोर तप केलें. त्यांच्या चरणाजवळ दर्शनविशुद्ध्यादि सोळा भावनांनीं त्याला तीर्थंकर–कर्मबन्धही झाला. मरणोत्तर तो सर्वार्थसिद्धिमध्यें अहमिन्द्र देव झाला. तेथून च्युत होऊन हस्तिनापुरांत विश्वसेन राजा व ऐराराणी यांना तो पुत्र झाला. इन्द्रांनीं जन्मदिनीं मेरुपर्वतावर नेऊन क्षीरसमुद्रजलाच्या १००८ घागरींनीं अभिषेक केला. बालकाला वस्त्रालंकारांनीं भूषित करून परत आणून ऐरामातेच्या मांडीवर बसविलें. इन्द्रांनीं त्याचें 'शान्तिनाथ' असें नांव ठेविलें. तरुणपणीं चक्रादि रत्नें प्राप्त झालीं. षट्खण्डैश्वर्य मिळालें. पुष्कळ वर्षें चक्रिसुखानुभव घेऊन विरक्तता आल्यावर स्वतः दीक्षा घेऊन तपानें सर्वकर्मांचा नाश करून सम्मेदशिखरावर हे प्रभु मुक्त झाले.

६ कुन्थुनाथचक्रवर्ती– सुसीमानगरींत फार पूर्वी सिंहरथ राजा राज्य करीत होता. त्याला दिवसां उल्कापात पाहून वैराग्य झालें. त्यानें घनरथ गुरुपासून दीक्षा घेतली. तप करून सर्वार्थसिद्धांत अहमिन्द्रपद त्याला प्राप्त झालें. नंतर तेथून च्युत

होऊन भरतक्षेत्रांत हस्तिनापुरांत सूर्यराजा श्रीराणीसह राज्य करीत होता. या उभयांना वरील अहमिन्द्र कुन्थुनाथ नामक पुत्र झाला. मेरुपर्वतावर नेऊन इन्द्रांनीं अभिषेक करून श्रीमातेच्या मांडीवर कुन्थुनाथास दिलें. तरुणपणीं चक्रिपद मिळालें. चक्रिसुखानुभवानन्तर विरक्त होऊन त्यांनीं दीक्षा घेतली. कर्मक्षय करून मुक्तिरमा मिळविली.

७ अरनाथचक्री– पूर्वजन्मीं पद्मरथराजा क्षेमानगरींत राज्य करीत होता. त्याला वैराग्य झालें. त्यानें नन्दन तीर्थंकराजवळ दीक्षा घेऊन तप केलें तीर्थंकर कर्माचा बन्ध झाला व सर्वार्थसिद्धिमध्यें अहमिन्द्रदेव झाला. तेथून येऊन हस्तिनापुरांत राजा सुदर्शन व मित्रसेना याचा पुत्र अरनाथ झाला. मेरुपर्वतावर इन्द्रांनीं अभिषेक करून मातेच्या ओटींत ठेविलें. तरुण झाल्यावर चक्रवर्तिपद प्राप्त झालें. यानंतर विरक्त होऊन कर्मक्षय करून सम्मेदपर्वतावर मुक्त झाले.

८ सुभौमचक्रवर्ती– धन्यपुर-नगराचा राजा कनकाभानें विचित्रगुप्त गुरुजवळ दीक्षा घेतली. तप करून तो जयन्तांत उत्पन्न झाला. तेथून च्युत होऊन ईशावती-नगराचा राजा कार्तवीर्य व राणी तारा या उभयतांना तो सुभौम नामक पुत्र झाला. परशुरामानें कार्तवीर्य राजाला ठार मारिलें होतें व त्यानें क्षत्रिय राजांचा सातवेळां निःपात केला. त्यानें त्यांचे दांत काढून पात्रांत भरले व आपला शत्रु ओळखण्यासाठीं त्यानें मोठें अन्नसत्र स्थापन केलें. तेथें जेवणास आलेल्यांना प्रथमतः थाळींत घालून दांत दाखविले जात असत. ज्याच्या दृष्टीनें त्या दातांचें दूध बनेल तो तुझा शत्रु ओळख असें परशुरामास निमित्तज्ञानें सांगितलें होतें.

सुभूम तेथें वेषान्तर करून आला. दांत त्याला दाखविले. त्याच्या तीव्र दृष्टीनें त्यांचें दूध बनलें. हाच आपला शत्रु असें समजून त्याला मारण्यासाठीं तो आला त्यावेळीं दन्तपात्रच चक्ररत्न झालें व तें फेकून सुभौमानें परशुरामाचा नाश केला. सुभौमानें अत्यंत रागानें एकवीसवेळां ब्राह्मणांचा संहार केला. त्यावेळीं पुष्कळ ब्राह्मण परीट वगैरे जातींत लपून राहिले व अशारीतीनें त्यांनीं आपलें संरक्षण केलें म्हणून सर्वथा ब्राह्मणांचा नाश त्याला करता आला नाहीं. हा चक्रवर्ती अत्यंत विषयलुब्ध होऊन मरण पावला व सातव्या नरकांत जन्मला.

९ महापद्मचक्रवर्ती– वीतशोक-नगरांत चिन्तामणि नामक राजा पुत्रप्रेमानें प्रजापालन करीत होता. एकेवेळीं तो विरक्त झाला. त्यानें सुप्रभगुरुजवळ दीक्षा घेतली. खूप तप केलें व तो ब्रह्मस्वर्गांत ऋद्धिशाली देव झाला. तेथील आयुष्य

संपल्यावर अवशिष्ट पुण्यानें नागपुरांत राजा पद्मरथ व राणी मयूरी यांना महापद्म नामक पुत्र झाला. हा फार पराक्रमी होता. याला चक्रवर्तिपद प्राप्त झालें. हा धार्मिकवृत्तीचा होता. याला अत्यंत सुन्दर आठ कन्या होत्या. त्यांनीं रूपगर्वामुळें कोण्याही राजाशीं विवाह केला नाहीं. आठ विद्याधर-राजांनीं त्या कन्यांचें हरण केलें. चक्रवर्तीला अतिशय राग आला व त्यानें त्यांचा युद्धांत पराजय केला व आपल्या कन्यांना त्यानें परत आणिलें. अपमानित झाल्यामुळें विद्याधर राजांनीं दीक्षा घेतली व ते आत्मसुखांत तत्पर झाले. चक्रवर्तीच्या आठ कन्यांनीं विरक्त होऊन दीक्षा घेतली. त्या आर्यिका झाल्या व स्वर्गांत देवपद त्यांना मिळालें. राजा महापद्मही विरक्त होऊन त्यानें पद्मनामक पुत्राला राज्य दिलें व विष्णुनामक पुत्रासह दीक्षा घेतली. व कर्मांचा क्षय करून तो मुक्त झाला. हा चक्री अर व मल्लि यांच्या अन्तराल-कालांत झाला.

१० हरिषेणचक्रवर्ती– विजयपुराच्या राजाचें महेन्द्रदत्त असें नांव होतें. त्यानें नन्दनगुरुजवळ दीक्षा घेतली. व तो चौथ्यास्वर्गांत देव झाला. तेथील सुखें भोगून आयुष्यान्तीं तो या भरतक्षेत्रांत कांपिल्य-नगरांत हरिकेतु राजा व वप्राराणी यांचा हरिषेण नांवाचा पुत्र झाला. यानें चक्रवर्तिपदाचा दीर्घकाल अनुभव घेतला. भारतांत अनेक ठिकाणीं पर्वत, नदी, गांव वगैरे ठिकाणीं अनेक जिनमंदिरें बांधिलीं. यानें मुनिसुव्रतनाथाचें तीर्थांत दीक्षा घेऊन कर्मक्षयानें मोक्ष प्राप्त करून घेतला.

११ जयसेनचक्रवर्ती– फार पूर्वी राजपुरांत ‘ असित ’ नांवाचा राजा राज्य करीत होता. निर्मलबुद्धि असल्यामुळें तो धर्माचरणांत तत्पर होता. कालान्तरानें वैराग्य झाल्यानें राज्यत्याग करून सुधर्ममित्र गुरूजवळ तो दीक्षा घेऊन तप करूं लागला. आयुष्यान्तीं समाधिमरणानें ब्रह्मस्वर्गांत तो देव झाला. स्वर्गीयसुखांचा अनुभव घेऊन तो तेथून च्युत झाला व राजपुर-नगरांत विजय राजा व यशस्वती राणी यांना जयसेन पुत्र झाला. तरुणावस्थेंत त्याच्या आयुधशालेंत चक्ररत्न उत्पन्न झालें. दिग्विजय करून त्यानें षट्खण्ड जिंकिलें. दशांगभोगांचा अनुभव घेऊन त्यानें विरक्त होऊन जिनदीक्षा घेतली. तप करून कर्मनाश केला व तो मुक्तिपति झाला.

१२ ब्रह्मदत्तचक्रवर्ती– काशी देशांत संभूत नामक राजानें स्वतन्त्रलिंग नामक निर्ग्रन्थगुरूजवळ दीक्षा घेतली व तप करून तो कमलगुल्म विमानांत देव झाला. तेथून काम्पिल्यपुरांत ब्रह्मरथ व चूला या राजदंपतीला ब्रह्मदत्त नामक पुत्र झाला.

पुण्योदयानें चक्ररत्नाची प्राप्ति झाली व तो षट्खण्डचक्रवर्ती झाला. पण आपलें सर्व आयुष्य विषयोपभोगांत त्यानें घालविलें. व शिकारीच्या व्यसनांत तो तत्पर राहिला. मरण पावून सातव्या नरकांत जन्मला. हा चक्रवर्ती नेमिनाथ व पार्श्वनाथ यांच्या अन्तरकालांत होऊन गेला.

जसे बारा चक्रवर्ती या भारतांत झाले तसें नारायण, प्रतिनारायण, अर्ध-चक्रवर्तीहि या भारतांत होऊन गेले. हे नारायण, प्रतिनारायण विषयासक्तीनें आरंभ प्रारंभ करून मरतात व नियमानें नरकांत उत्पन्न होतात. पण नारायणाचे भाऊ नऊ बलभद्र हे निर्ग्रन्थ साधु होऊन तपश्चरण करून स्वर्ग व मोक्षाची प्राप्ति करून घेतात.

नऊनारायण– त्रिपृष्ट, द्विपृष्ट, स्वयंभू पुरुषोत्तम, पुरुषसिंह, पुण्डरीक, दत्त, नारायण ( लक्ष्मण ) व कृष्ण यांचे वडील भाऊ बलभद्र पदवीचे धारक असतात. त्यांचीं नांवें– विजय, अचल, सुधर्म, सुप्रभ, सुदर्शन, नन्दी, नन्दिमित्र, राम व ( पद्म ) ९ पद्म.

प्रतिनारायण नारायणाचे शत्रु यांचें पूर्वजन्मापासून वैर असतें. त्यामुळें युद्ध होऊन प्रतिनारायणाचा वध नारायण चक्रानें करितात. अश्वग्रीव, तारक, मेरक, निशुंभ, मधुकैटभ, बली, प्रहरण, रावण व जरासन्ध. नारायण, प्रतिनारायण यांच्या राजधानी, यांच्या पट्टराण्या इत्यादिकांचें वर्णन या पर्वात केलें आहे तें येथें संक्षेपानें दिलें आहे.

# विसावें पर्व.

( पूर्वजन्मासह जिनेश्वर व चक्रवर्तींचें वर्णन. )

यापरि रावणवैभव ऐकुनि भूप प्रसन्न बहु झाला ।
गौतमगणीस नमुनि श्रेणिक पुनरपि तया असें वदला ॥ १ ॥
प्रतिनारायण-रावण-जन्मादिक वृत्त सर्व मी श्रविलें ।
कपिराक्षस-वंशांचें तव प्रसादेंचि चरित मज कळलें ॥ २ ॥
जिनचक्रींच्या आतां चरित श्रवणास इच्छितें हृदय ।
पूर्वभवासह त्यांच्या सांग मला करुनि चित्त तव सदय ॥ ३ ॥
झाला प्रसिद्ध अष्टम भूतलिं बलभद्र कोणत्या वंशीं ।
तत्पित्रादिक-वृत्तहि सांग मला चित्त होय अभिलाषी ॥ ४ ॥
ऐशा भूपप्रश्ना ऐकुनि झाला गणीस बहु मोद ।
नृपते ! जिनजन्मांचें वर्णन तूं ऐक हरिल भवखेद ॥ ५ ॥
श्रीवृषभ अजित सम्भव अभिनन्दन सुमतिनाथ पञ्चम हे ।
पद्मप्रभ नि सुपार्श्वप्रभु नाम अघांस दूर करि पाहे ॥ ६ ॥
श्रीचन्द्रप्रभ अष्टम सुविधि नि शीतल भवास संहरिती ।
तेणें मुक्तिरमेला सुभक्तजन निश्चयें मुदें वरिती ॥ ७ ॥
श्रेयांस वासुपूज्य नि विमलांचें स्मरण पापराशि हरी ।
जिनवर अनन्त धर्मप्रभु पापगजेन्द्र-मर्दनांत हरि ॥ ८ ॥
श्रीशान्ति कुन्थु अर हे स्मरा हराया समर्थ आहेत ।
यांचें स्मरण करी जो त्याचें होतें कदापि नच अहित ॥ ९ ॥
मल्लि नि मुनिसुव्रत जिन नमि नेमि नि पार्श्व वीर चोविस हे ।
आहेत वन्द्य आतां वीराचें तीर्थ चालतें पाहे ॥ १० ॥
पूर्वभवीं वृषभाचें सुरम्य पुर पुण्डरीकिणी होतें ।
तेवि-सुसीमा नगरी अजिताची सुरपुरा सदा हसते ॥ ११ ॥
पूर्वभवांत क्षेमा-नगरी होती तृतीय-जिनपतिची ।
अभिनन्दननाथाची पुरी असे रत्नसञ्चया साची ॥ १२ ॥

---

१ आठवा बलभद्र रामचन्द्र. २ पापाला. ३ सिंह.

सुमतिजिना आरम्भुनि वसुपूज्यात्मज-जिनान्त याच पुरी ।
पूर्वभव-राजधानी होत्या त्या सर्वदैव हृदयिं धरी ॥ १३ ॥
विमल-जिनेशापासुनि वीरापर्यंत पूर्वजन्म-पुरी ।
नांवें त्यांचीं कथितो क्रमशः श्रेणिक नृपाल अवधारी ॥ १४ ॥
सुमहानगर, अरिष्टा, सुमाद्रिका, पुण्डरीकिणी नगरी ।
सीमासहित सुसीमा, क्षेमानगरी असे मनोहारी ॥ १५ ॥
नामें व्यतीतशोक नि चम्पापुर तेवि रुचिर[1] कौशाम्बी ।
श्रीनागपुर, अयोध्या, छत्राकाराख्यनगर बहु शोभी ॥ १६ ॥
ऋषभादि-जिनवरांची होती जी नामपङ्क्ति पूर्वभवीं ।
ती ऐक भूमिपाला श्रवणें जाईल पाप परगांवी ॥ १७ ॥
श्रीवज्रनाभि, विमलादिवाह, विपुलादि अन्तवाहन[2] हें ।
नाम महाबल, अतिबल, अपराजित, नन्दिषेण शुभ पाहे ॥ १८ ॥
पद्म, महापद्म तसें पद्मोत्तर, पद्मगुल्म शुभ नाम ।
श्रीनलिनगुल्म, पद्मासन, पद्मरथाख्य सकल-शुभधाम ॥ १९ ॥
श्रीपद्मरथ नि दृढरथ, सुमेघरथ, सिंहरथ नि वैश्रवण ।
श्रीधर्म, अप्रतिष्ठ नि सिद्धार्थानन्द[3] तेवि नन्द गण ॥ २० ॥

( ऋषभादि-तीर्थंकरांच्या पूर्वभवांतील दीक्षागुरूंचीं नांवें. )

हीं पूर्वजन्मनामें जिनवर्यांचीं नृपेश सांगितलीं ।
आतां तद्गुरु नामें वदतों असतीं प्रसिद्ध भूमितलीं ॥ २१ ॥
श्रीवज्रसेन, रिपुदम तथा स्वयम्प्रभ नि विमलवाहन हे ।
सीमन्धर पिहितास्रव रोधिति कर्मास्रवास झणि पाहे ॥ २२ ॥
तैसें अरिन्दमाभिध नाम युगन्धर सुधर्मधारी हे ।
सर्वजनानन्दाभिध अभय नि आनन्द सुगुणरत राहे ॥ २३ ॥
श्रीवज्रदत्त मुनिवर सुवज्रनाभ्याख्य, सर्वगुप्त गण ।
चिन्तारक्ष सुनामा जो जिनधर्मास मानितो प्राण ॥ २४ ॥
श्रीविपुलवाहनाभिध, घनरव, संवरसुनाम वरधर्म ।
तेवि सुनन्द नि नन्दन ज्यांना लाभे अखण्डसें शर्म ॥ २५ ॥

---

१ सुन्दर. २ विपुलवाहन. ३ सिद्धार्थ व आनन्द.

गुरु जो व्यतीत-शोक द्रमिल प्रौष्टिल गणा सुगुरुनामें ।
श्रीजिनपूर्वभवाची सदा स्मरावी नरें स्वहितकामें ॥ २६ ॥

( वृषभादिक जिन जेथून येथें अवतरले त्या स्वर्गादिकांचीं नांवें. )

सर्वार्थसिद्धिपासुनि होऊन च्युत जिनेन्द्र भरतांत ।
श्रीवृषभ, धर्मशान्ति, श्रीकुन्थु प्रगटलेचि आर्यांत ॥ २७ ॥
ज्यांच्या जननें झाला अजेयसा बन्धुवर्ग शत्रुगणें ।
अवतरले अजितप्रभु अनुत्तरांतुनि दुज्या वुधेशें म्हणे ॥ २८ ॥
विजयापासुनि येउनि अभिनन्दननाथ तीर्थंकर झाले ।
चन्द्रप्रभ, सुमतीश्वर अनुत्तराहुनि दुज्या तिज्या आले ॥ २९ ॥
नमि, नेमि नि अर, मल्लिप्रभु अपराजितें अनुत्तरांतून ।
श्रीपुष्पदन्त आले प्राणतनामक-सुरालयांतून ॥ ३० ॥
आद्य ग्रैवेयकिं जें असे सुदर्शन विमान तेथून ।
सम्भवजिन या भरतीं अवतरले नृप करी तया नमन ॥ ३१ ॥
ऊर्ध्वग्रैवेयाचें प्रीतिंकर जें विमान तेथून ।
पद्मप्रभजिन भरतीं आर्यावर्तांत जन्मले जाण ॥ ३२ ॥
ग्रैवेयक जें मध्यम सुभद्र नामक विमान त्यांत असे ।
तेथुनि सुपार्श्व आले जन्मा भरतांत सुजनिं मोद वसे ॥ ३३ ॥
आरण-सुरालयाचा अवतरला इन्द्र जन्मला भरतीं ।
शीतल जिनपति झाला त्याला भूपा करी सदा प्रणति ॥ ३४ ॥
अच्युत-सुरपति उतरुनि जो पुष्पोत्तर-विमानपति होता ।
झाला श्रेयान् जिनवर तो देवो सौख्य सर्वदा प्रणता ॥ ३५ ॥
जो दशमस्वर्गाचा अधिपति तेथून अवतरे भरतीं ।
श्रीवासुपूज्य झाला मतांत त्याच्या करी नृपेश! रति ॥ ३६ ॥

---

१ स्वहिताची इच्छा करणाऱ्यानें. २ पांचवें अनुत्तर. ३ वैजयंताहून. ४ विद्वानांचे स्वामी गणधर. ५ पहिलें अनुत्तर. ६ जयंताहून. ७ चौथ्या अनुत्तराहून. ८ चौदाव्या स्वर्गाहून. ९ ग्रैवेयक नऊ आहेत. पहिल्या तीन ग्रैवेयकांना अधोग्रैवेयक, चार, पांच व साहव्याला मध्यम व सात आठ व नऊ या ग्रैवेयकांना ऊर्ध्वग्रैवेयक म्हणतात. १० पंधरावा स्वर्ग. ११ सोळावा स्वर्ग. १२ दहावा स्वर्ग महाशुक्र होय.

इन्द्र सहस्राराचा[1] तेथुनि काम्पिल्य-पत्तनीं जन्मे ।
श्रीविमलनाथ झाला तेरावा जिन जयांत मुक्ति रमे ॥ ३७ ॥
अच्युतपति पुष्पोत्तर-विमाननायक तिथून होऊन ।
च्युत साकेतीं झाला अनन्तजिन त्या करी नृपा नमन ॥ ३८ ॥
प्राणतपति[2] होऊन च्युत सुव्रतनाथ पञ्चशैलपुरीं ।
झाला वन्दून तया श्रेणिक तत्सुगुण ठेव सतत उरीं ॥ ३९ ॥
येऊन आनतांतुनि[3] झाला काशींत पार्श्वनाथ जिन ।
सुरपति ज्याचें आहे भवताप-विनाशकारि सद्वचन ॥ ४० ॥
अच्युत पुष्पोत्तर-पति होऊन च्युत तिथून कुण्डपुरीं ।
श्रीवर्धमान झाला जिन भूपा तत्पदास नमन करी ॥ ४१ ॥

( वृषभादि-तीर्थकरांच्या माता-पिता, जन्मनक्षत्र, मुक्तिस्थान आदिकांचें कथन. )

माता पिता नि नगरी जन्मसुनक्षत्र मुक्तिचें स्थान ।
दीक्षावृक्ष जिनांचे यांचें आतां करीन मी कथन ॥ ४२ ॥
वृषभजिनाची माता मरुदेवी तेवि नाभिराज पिता ।
नक्षत्र उत्तरादिकआषाढा[4] जन्मनगर साकेता ॥ ४३ ॥
वटवृक्षतळीं दीक्षा मोक्षाचें स्थान वदति कैलास ।
हे श्रेणिका प्रथम ते करोत जिनवृषभ पूर्ण तव आस ॥ ४४ ॥
नगर अयोध्या विजया जितशत्रु पिता नि रोहिणी ऋक्ष[5] ।
सम्मेदाचलिं मुक्ति नि दीक्षातरु तेवि सातवण वृक्ष ॥ ४५ ॥
अजितजिनाचें यापरि वर्णन भूपा करो तुझें सुहित ।
मंगल लोकोत्तम ते पापा वारुनि करोत तुज पूत ॥ ४६ ॥
सेना संभव-माता जनक जितारि नि विमुक्ति सम्मेदीं ।
शाल ज्येष्ठा[6] श्रावस्ती तुज नृप करोत आनन्दी ॥ ४७ ॥
संवर पिता नि माता सिद्धार्था सरलवृक्ष सम्मेद ।
नक्षत्र पुनर्वसु ज्या देवो अभिनन्द नित्य तुज मोद ॥ ४८ ॥

---

१ बारावा स्वर्ग. २ चौदावा स्वर्ग प्राणत तेथील इन्द्र. ३ तेराव्या स्वर्गाहून आनताहून. ४ उत्तराषाढा. ५ नक्षत्र. ६ ज्येष्ठा नामक जन्मनक्षत्र.

मेघप्रभ नि अयोध्या मघा प्रियङ्गु नि सुमङ्गला माता ।
ज्यांचे सुमति जिनेश्वर नृपाल होवोत ते तुला त्राता ॥ ४९ ॥
माता असे सुसीमा धरण पिता पुर सुरख-कौशाम्बी ।
वृक्ष प्रियङ्गु चित्रा नृपते ! पद्मप्रभास आलम्बी ॥ ५० ॥
श्रीसुप्रतिष्ठ पृथिवी काशी-नगरी शिरीष विशिखा हे ।
जिनवर सुपार्श्व भूपा मङ्गलदायक सदैव तुज पाहे ॥ ५१ ॥
नागद्रुम अनुराधा पिता महासेन लक्ष्मणा जननी ।
चन्द्रपुरी चन्द्रप्रभ तुजला देवोत सतत शुद्धि मनीं ॥ ५२ ॥
सुग्रीव पिता रामा माता ज्याची पुरी नि काकन्दी ।
साल नि मूल नि जिनवर सुविधि तुला नृप करोत आनन्दी ॥ ५३ ॥
प्लक्ष तरु जनक दृढरथ भद्रिलपुर तेवि पूर्व आषाढा ।
माता जया सुनन्दा शीतल जिन तव करोत भक्ति दृढा ॥ ५४ ॥
माता विष्णुश्री ज्या पिता जया विष्णुराज नांवाचा ।
पुर सिंहनाद तिन्दुक नक्षत्र श्रवण निर्मला वाचा ॥ ५५ ॥
तो श्रेयान् जिन दुरिता नाशुनि तव सतत सम्पदा देवो ।
श्रेयस्कर तव भावें श्रेणिक नृप सकल कर्म लय पावो ॥ ५६ ॥

अनुष्टुब्– माता जया पिता ज्याला वसुपूज्य नि पाडली ।
चम्पापुरी शतभिष वासुपूज्य महाबली ॥ ५७ ॥
प्रभु तो श्रेणिका देवो विश्वसंमान्यता तुला ।
सेवा ज्याची सदा नाशी भव्यप्राणि-मनोमला ॥ ५८ ॥

माता शर्मा ज्याची कृतवर्मा हा पिता असे ज्यास ।
काम्पिल्यपुरी आला जो प्रोष्ठपदोत्तरीं सुजन्मास ॥ ५९ ॥
जम्बूवृक्षाखालीं जिनदीक्षा घेतली स्वयं विमलें ।
सम्मेदिं मुक्ति तो जिन करो तुला मुक्त पूर्ण पापमलें ॥ ६० ॥
पिंपळ तरु साकेता सर्वयशा सिंहसेन मातपिता ।
नक्षत्र रेवती जिन अनन्त तो नाथ तव हरो दुरिता ॥ ६१ ॥

---

१ जनकाचें नांव. २ वाघाट्याचें झाड. ३ पृथ्वी-माता. ४ नागकेसर वृक्ष. ५ सालवृक्ष. ६ मूला नक्षत्र. ७ पिंपरी. ८ टेण्डूचें झाड. ९ पाडळीचें झाड. १० उत्तर-प्रोष्ठपदा जन्मनक्षत्र. ११ जांभळाचें झाड.

दधिपर्ण[1] वृक्ष नगरी रत्नपुरी सुव्रता जया माता ।
नृप भानु जनक पुष्यभ[2] धर्म हरो तो तुझ्या सदा दुरिता ॥ ६२ ॥
माता-पिता जयाचे ऐरा श्रीविश्वसेन आहेत ।
भरणीभ[3] हस्तिनापुर नन्दिद्रुम[4] शान्ति अघ करो शान्त ॥ ६३॥
माता 'श्री' सूर्य-पिता गजपुर पुर कृत्तिका नि नक्षत्र ।
तरु तिलक[5] कुन्थुजिन तो होवो तुज संकटातपीं छत्र ॥ ६४ ॥
सम्मेदमुक्ति मित्रा पिता सुदर्शन नि हस्तिना-नगर ।
आम्रतरु रोहिणी अर देवो तो श्रेणिकास सुखपूर ॥ ६५ ॥
मिथिलापुर कुम्भपिता माता ज्याची प्रभावती होती ।
तरु आम्र अश्विनी तो देवो प्रभुमल्लि सतत सौख्यतति ॥ ६६ ॥
पद्मावती सुमित्र श्रवण नि सुव्रतजिनेश चम्पक हे ।
सम्मेद तुला सुखकर देउनि होवोत आत्मगुण-पोहे ॥ ६७ ॥
विजय नि मिथिला वप्रा वकुल नि नमिनाथ अश्विनी तुज हे ।
श्रेणिक जिनधर्माच्या करून देती समागमा पाहे ॥ ६८ ॥
माता शिवा जयाला पिता असे श्रीसमुद्रविजय गुणी ।
शौरिपुर मेषशृङ्ग[6] द्रुम ते नेमीश सकलगुणखाणी ॥ ६९ ॥
चित्रा नक्षत्र असे मोक्ष जया ऊर्जयन्त गिरिवरती ।
प्रभु नेमिजिनेश्वर ते श्रेणिकभूपास देति सौख्यतति ॥ ७० ॥
वामा माता ज्याला पिता जया अश्वसेन भूपाल ।
काशीपुरी विशाखा धव[7]तरु शाखा धरीतसे लोल ॥ ७१ ॥
श्रीपार्श्वनाथ जिनपति करो तुला श्रेणिका सुधर्म रत ।
याच्या शुभाश्रयानें लाभेल नृपा अवश्य आत्महित ॥ ७२ ॥
जन्मपुर कुण्डनगरी पावापुरिं मोक्ष जाहला वीरा ।
प्रियकारिणी सुमाता सिद्धार्थ पिता मनांत अवधारा ॥ ७३ ॥
शालद्रुम[8] दीक्षा तरु हस्तोत्तरिं जन्म जाहलें ज्याचें ।
तो वीर श्रेणिक सुख देवो तुजला विमुक्ति-रमणीचें ॥ ७४ ॥
मोक्षस्थान जिनागमिं कथिलें चंपाच वासुपूज्याचें ।
कथिलीं जिनत्रयाचीं इतर स्थानें मनांत घ्या साचें ॥ ७५ ॥

---

१ कवठाचें झाड. २ पुष्य नक्षत्र. ३ भरणी नक्षत्र. ४ नान्दिवृक्ष. ५ तिलकवृक्ष. ६ मदेशिंगीचें झाड. ७ धावडा झाड. ८ शालवृक्ष.

सम्मेदाचल कथिलें शेषजिनांचें सुमुक्तिचें स्थान ।
श्रेणिक त्या त्या स्थानीं अपुल्या चित्तास तूं करी लीन ॥ ७६ ॥
शान्ति नि कुन्थु नि अर जिन झाले षट्खण्डचक्रवर्ती हे ।
इतर जिनेश्वर झाले राजे सामान्य आगमीं पाहे ॥ ७७ ॥
श्रीचन्द्रप्रभ होते शुभ्र जसे तेवि पुष्पदन्त जिन ।
सप्तम-सुपार्श्व देहीं प्रियङ्गुपुष्पासमान धरि वर्ण ॥ ७८ ॥
साळी अपक्व[1] जैशा वर्ण तसा पार्श्वनाथदेहांत ।
पद्मप्रभ-वपु साजे वर्णानें पद्मरागमणि मूर्त ॥ ७९ ॥
पळसाच्या पुष्पासम लाल असें वासुपूज्य-वपु शोभे ।
हा नीलाञ्जन-गिरि जणु मुनिसुव्रतनाथदेह निज आभें[2] ॥ ८० ॥
मोराच्या कण्ठासम शोभा ये नेमिनाथ-देहास ।
धरिती सुतप्त-हेमासम[3] शेष जिनेश वपुंत आभेस ॥ ८१ ॥
त्यजिलें कुमारकालीं गेहा भवभोग-देह-विरतिमनें[4] ।
श्रीवासुपूज्य मल्लि नि नेमीश्वर पार्श्व वर्धमान जिनें ॥ ८२ ॥
बाकीचे तीर्थंकर होउनि राजे प्रजाहि सुखवून ।
झाले विरक्त बोधुनि भव्यजनां पावले सुनिर्वाण ॥ ८३ ॥
जिन सर्व शतेन्द्रांनीं केले अभिषिक्त मेरुगिरिवरती ।
नमिले नि पूजिले नि स्तविले गाउनि विशालसुगुणतति ॥ ८४ ॥
भक्ति जयांची केली असतां लाभे समस्त कल्याण ।
अद्भुत महत्त्वधारक करोत जिन आमुचें सदा अवन[5] ॥ ८५ ॥
आयुःप्रमाण त्यांचें सांगा श्रीगौतमा असें पुसिलें ।
श्रीश्रेणिकें नृपानें हृदया येण्या पवित्रता अपुलें ॥ ८६ ॥
ज्या ज्या जिनेश्वराच्या अन्तरकालांत राम नव झाले ।
तेही कथावयास्तव करी कृपा श्रेणिकें असें पुसिलें ॥ ८७ ॥
संख्याज्ञानासाठीं तुजला मी सांगतो सुदृष्टान्त ।
तो ऐक हे नृपाला करून हृदयास आपुलें शान्त ॥ ८८ ॥

( दृष्टान्त देऊन अलौकिक संख्येचा खुलासा गणधर करितात. )

---

१ कच्च्या साळीच्या रंगासारखा. २ कान्तीनें. ३ तापविलेल्या सोन्यासारखा. ४ संसार, भोगपदार्थ व शरीरापासून विरक्त झालेल्या मनानें. ५ रक्षण.

खड्डा एक खणावा योजन ज्याचें प्रमाण सांगितलें ।
लांबी रुंदी खोली तितुकिच मतिनें प्रमाण मानियलें ॥ ८९ ॥
नुकतेच जन्मलेल्या मेंढ्यांच्या रोम अग्रभागांनीं ।
तो गर्त्त भरुनि करणें कठिन तया द्रव्यपल्य वदति मुनि ॥ ९० ॥
एकेक वर्षशतकें काढावा एक एक रोमाग्र ।
तो रिक्त होय जेव्हां वदति तया कालपल्य कर्मोग्र[1] ॥ ९१ ॥
जे कालपल्य त्यांचे दशकोटी-कोटि संपतां होतो ।
सागरकाल सुभव्या ऐसें जिनदेव आगमीं कथितो ॥ ९२ ॥
दशकोटि-कोटिसागर काला अवसर्पिणी सुधी वदती ।
उत्सर्पिणीप्रमाणहि तितुकेंच जना कथी श्रुतज्ञतति[2] ॥ ९३ ॥
कालस्वभाव ऐसा परिवर्तनशील सर्वदा आहे ।
मासांत शुक्ल-कृष्णद्वंन्द्वाचें[3] जेवि घडतसे पाहे ॥ ९४ ॥
या प्रत्येक युगाचे सहा सहा भेद वर्णिले असती ।
वस्तूंच्या वीर्यादिक गुणांत हे हानिवृद्धि नित करिती ॥ ९५ ॥
सुषमा-सुषमा पहिला असे चतुःकोटिकोटि-जलधीचा ।
सुषमा, सुषमादुःषम जो त्रिद्विक-कोटिकोटिचा साचा ॥ ९६ ॥
दुःषमसुषमा आहे द्विककालाब्दोन-कोटिकोटीचा ।
दुःषम जो एकेविस हजार-वर्ष-प्रमाणसा साचा ॥ ९७ ॥
अतिदुःषमाहि तितुका असे कथी आगमांत जिनवाणी ।
उत्सर्पिणि अवसर्पिणि-कालयुगा वदति कल्प सुज्ञानी ॥ ९८ ॥
वृषभजिन मुक्त झाले असतां पन्नासकोटिलक्ष अशीं ।
सागर वर्षे जातां झाले श्रीअजित सुजनगणतोषी ॥ ९९ ॥
अजितानन्तर सागर वर्षे जीं तीस-कोटि-लक्ष अशीं ।
गेलीं सम्भव जिनवर झाले ज्या वन्दितात परमर्षि ॥ १०० ॥
यानंतर ही जातां वर्षे दशलक्षकोटि अब्धि अशीं ।
अभिनन्दन जिन आले जे होते सतत भव्य-हितदर्शी ॥ १०१ ॥

---

१ कर्मांचा नाश करण्यांत भयंकर असलेले. २ श्रुतज्ञानी मुनींचा समूह.
३ जोडीचे. ४ दुःषमा व अतिदुःषमा या दोन कालांचीं २१ हजार, २१ हजार वर्षे
त्यांत वजा केली आहे व अशी एक कोटिकोटि सागरवर्षे.

नवलक्षकोटि-सागर-वर्षे झालीं व्यतीत धर्ममय ।
सुमतीश्वर अवतरले वर्तविलें धर्मतीर्थ शुभ सदय ॥ १०२ ॥
नव्वद-हजार-कोटी-सागर झाले व्यतीत पष्ट जिन ।
अवतरले पद्मप्रभ तत्पदयुगिं भव्य जाहले लीन ॥ १०३ ॥
नवकोटिसहस्रावधि-सागर झाले समाप्त ज्या वेळीं ।
सप्तम जिन अवतरले ठेवुनि करयुगल वन्दितों भालीं ॥ १०४ ॥
नवशतकोटी-सागर-कालाचा अन्त जाहल्यावरती ।
चन्द्रप्रभ उद्भवले त्यांच्या चरणद्वया मम प्रणति ॥ १०५ ॥
नव्वदकोटी-सागर कालाचा अन्त जाहल्यावरती ।
श्रीपुष्पदन्ततीर्थोत्पत्ति करी सकल भव्यजन-शान्ति ॥ १०६ ॥
नवकोटि-सागरोपम होतां समय व्यतीत त्यावेळीं ।
शीतल जिनवर झाले वन्दन माझें तदीयपद-युगलीं ॥ १०७ ॥
शंभर सागर असती कमी जयामधिं असा महाकाल ।
जो कोटिसागरांचा होतां तो व्ययित[२] तेधवा सकल ॥ १०८ ॥
झाले श्रेयोजिनपति त्यांच्या मी चरणपङ्कजा नमितों ।
ध्याऊन सतत ज्यांना सुभव्यजन मुक्तिपत्तना जातो ॥ १०९ ॥
चौपन-सागर-वर्षे व्यतीत होतां जिनेश बारावें ।
श्रीवासुपूज्य झाले सुजनें तच्चरित सतत वानावें ॥ ११० ॥
जो तीस सागरांचा होतां काल व्यतीत विमल जिन ।
झाले त्यांच्या पदयुगिं नृसुरासुर करिति आदरें नमन ॥ १११ ॥
नवसागर-वर्षांनीं अनन्त जिननाथ भूतलीं आले ।
वन्दक भव्यजनांना रत्नत्रयमार्ग निश्चयेंचि मिळे ॥ ११२ ॥
जो चार सागरांचा झाला जेव्हां व्यतीतसा काल ।
धर्म-जिनेश्वर आले सुधर्मरत होति बालगोपाल ॥ ११३ ॥
पाऊण-पल्यवर्जित धर्म-जिनाचें त्रिसागरावधिक ।
तीर्थ प्रवृत्त झालें नन्तर जिन शान्ति देति भव्यसुख ॥ ११४ ॥
पल्यार्धकाल नान्दे शान्तिजिनाचें सुतीर्थ जगतांत ।
भव[३]दुःख द्यावयाला भव्यां झाला अतीव असमर्थ ॥ ११५ ॥

१ सुपार्श्व जिनेन्द्र. २ संपला असतां. ३ संसार.

कोटीसहस्रवर्षें न्यून असे पावपल्यपर्यन्त ।
कुन्थु जिनतीर्थ झालें करितें जें भव्यसुजनकर्मान्त[1] ॥ ११६ ॥
पल्यार्धकाल जातां भरतीं श्रीकुन्थुनाथ अवतरले ।
ज्यांच्या तीर्थी मिळवुनि असंख्य सज्जन भवाम्बुधीं तरले ॥ ११७ ॥
जो पावपल्य त्यांतुनि उणें असे षट्सहस्रकोटि-मित ।
काल व्यतीत होतां झाले जिन सुजनमान्य अरनाथ ॥ ११८ ॥
कोटी-सहस्रवर्षें होतें अरनाथ-तीर्थ भरतांत ।
भवसागर तरण्याला दिला तयें सज्जना सदा हात ॥ ११९ ॥
पासष्ट लक्ष चौऱ्याऐंशि सहस्राब्द हे उणे ज्यांत ।
वर्षें सहस्रकोटी जातां ये मल्लिनाथ भरतांत ॥ १२० ॥
तीर्थ तयाचें राही नन्तर चौपन्न-लक्ष-वर्ष-मित ।
अनुसरुनि मार्ग त्याचा झाले जन मुक्त करुनि कर्मान्त ॥ १२१ ॥
तितुकीं वर्षें जातां श्रीमुनिसुव्रत जिनेन्द्र अवतरले ।
व्रतमय त्यांनीं केली भारतभू सुजन अमितसे तरले ॥ १२२ ॥
या सुव्रतनाथाचें षड्लक्षाब्दान्त[2] तीर्थ या भरतीं ।
झालें प्रवृत्त ज्यामधिं मुनि भव्यांच्या मनोमला हरिती ॥ १२३ ॥
यानंतर अवतरले नमिजिन तारावया भवांतून ।
तत्तीर्थ पंचलक्षाब्दावधि[3] राही तयास मम नमन ॥ १२४ ॥
यानंतर नेमीश्वर आले जन्मास हर्ष सर्वांस ।
झाला कुणी न दुःखी जनवदनीं सर्वदा दिसे हास ॥ १२५ ॥
त्र्यांयशि हजार वर्षें सप्तशतक त्यावरीही पन्नास ।
श्रीनेमितीर्थ राही दुरितांचा करित तें सदा ध्वंस ॥ १२६ ॥
वर्षें अडीचशे जिनपार्श्वाचें तीर्थ राहिलें भरतीं ।
श्रीवीरतीर्थ वर्णिन आतां भूपाल घेइ तें चित्तीं ॥ १२७ ॥
राहिल वीरजिनाचें तीर्थ जगीं दोनशे दहाशतकें[4] ।
तो पर्यन्त जनांच्या मारिल तें पातका सदा फटके ॥ १२८ ॥
दुःषमकालान्तासह या तीर्थाचा हि अन्त होईल ।
अतिदुःषमांत भूपा अधर्म या भारतांत माजेल ॥ १२९ ॥

---

१ ज्ञानावरणादिक सर्व कर्मांचा नाश. २ सहा लक्ष वर्षांपर्यंत. ३ पांच लक्ष वर्षांपर्यंत. ४ एकवीस हजार वर्षांपर्यंत.

धुतले पदयुग ज्याचे सुरपतिमणिमुकुटकान्तिनीरांनीं[1] ।
ते वर्धमान जिनपति झाले कर्मान्त करुनि मुक्तिधनी ॥ १३० ॥
पंचमकालीं येथें देवांचें वंद जाहलें येणें ।
अतिशय विलया गेला अज्ञानाचें मनीं वसे ठाणें ॥ १३१ ॥
हे श्रेणिका नृपाला भूप तुझ्यासम गुणी न होतील ।
दुष्ट प्रजा हि होइल अन्योन्या ती सदैव फसवील ॥ १३२ ॥
निःशील व्रतरहित नि नर-नारी क्लेशयुक्त होतील ।
व्याधिशतांनीं[2] पीडित मन त्यांचें क्रूर नित्य राहील ॥ १३३ ॥
अतिवृष्टि मेघ करितिल कोठें होइल अवृष्टि देशांत ।
मूषकशुक-शलभांनीं[3] जनता होईल चिन्तनाक्रान्त ॥ १३४ ॥
मोह-सुरापानें जन रागी द्वेषी नि मत्त होतील ।
पापी गर्वोद्धत ते दीना पाहून खूप हसतील ॥ १३५ ॥
वदनें वदुनि कुभाषण धनलोभानें अकार्य करतील ।
रात्रीं खद्योत[4] जसें भूवरि हे क्रूर मनुज फिरतील ॥ १३६ ॥
होतील कुधर्मीं रत अन्यांना ही तसेंच करतील ।
अपकारामधिं तत्पर राहुनि जन दुर्गतींत जातील ॥ १३७ ॥
मिथ्याशास्त्राध्ययनें लोक अहङ्कारयुक्त होतील ।
हिंसाशास्त्र-कुठारें[5] मूढद्रुमवृन्द[6] तुटुनि पडतील ॥ १३८ ॥
दुष्षमकालारम्भीं जन उंची सात हात राहील ।
कालक्रमें तियेमधिं मगधेशा हानि होत जाईल ॥ १३९ ॥
अतिदुष्षम-कालामधिं आरम्भीं दोन हात राहील ।
आयुष्य वीस वर्षें ऐसें तूं जाण वा दयाशील ॥ १४० ॥
या कालापरभागीं[7] उंची करमात्र एक राहील ।
आयु नि सोळा वर्षें कष्टें जगतील निष्कृपाशील ॥ १४१ ॥
सरपटणारे प्राणी जैसे वेडूक आदि खाऊन ।
जगती तैसें जगतिल तज्जीवनकष्ट तीव्र होईल ॥ १४२ ॥

---

१ देवेंद्रांच्या रत्नजडित मुकुटांच्या कांतिरूप पाण्यानें. २ शेकडों रोगांनीं. ३ उंदीर, पोपट व टोळांनीं. ४ काजवे. ५ खोट्या शास्त्ररूपी कुऱ्हाडीनें. ६ मूर्खरूपी वृक्षांचा समूह. ७ या कालाच्या दुसऱ्या विभागांत.

होतिल कुरूप देहीं सन्तत पापक्रियेंत रमतील ।
अज्ञानी पशुसम ते व्याधींनीं त्रस्तदेह होतील ॥ १४३ ॥
राजा-प्रजा-व्यवस्था पतिपत्न्यादिक-समस्त-सम्बन्ध ।
होतील नष्ट सगळे मोहें होतील कुनर जणु अन्ध ॥ १४४ ॥
कोणी नसे कुणाचा सेवक मालक न कोण कोणाचे ।
धनगृहवस्त्रादिक नच दुःखचि एकान्त दुष्पमीं साचें ॥ १४५ ॥
धर्मार्थ-कामसम्भव ऐशा चेष्टा विनष्ट होतील ।
पापाचे जणु मानव पुतळे त्यासमयिं सकल दिसतील ॥ १४६ ॥
क्षय चन्द्र कृष्णपक्षीं पावे शुक्लांत जेवि तो वाढे ।
आयुर्वपुरादींची हानि नि वाढ द्विकालि समज घडे ॥ १४७ ॥
जी उत्सवादि कार्यें समृद्ध होती दिनीं न रात्रींत ।
तद्वत् या कालद्वयिं वपुरादिक-वृद्धि-हानि होतात ॥ १४८ ॥
अवसर्पिणिकालांत क्रमें क्रमें हानि ज्यापरी घडते ।
उत्सर्पिणींत होते वाढ असें सुज्ञ वदति सत्यचि तें ॥ १४९ ॥

( वृषभादि-तीर्थकरांच्या देहाची उंची व त्यांच्या आयुष्याचें वर्णन. )

अन्तर तीर्थकरांचें कथिलें तुजला नृपाल उत्सेध[1] ।
क्रमवार सांगतो मी जेणें होइल तुला खरा बोध[2] ॥ १५० ॥
श्रीवृषभनाथदेहीं उंची गण पांचशे धनुष्यांची ।
पन्नास चाप हानि क्रमें क्रमें नव[3]-जिनान्त ती साची ॥ १५१ ॥
नव्वद धनुष्य होती उंची शीतल-जिनेश-देहांत ।
दश दश हानि जहाली चौदावें श्रीजिनेशपर्यन्त[4] ॥ १५२ ॥
पंचेचाळिस होता चापोन्नत देह धर्मनाथाचा ।
नेमि जिनावधि झाला क्षय परि तो पांच पांच चापांचा ॥ १५३ ॥
नउ हात उंच होता पार्श्वजिनाचा सुदेह वीराचा ।
तो सात हात होता झाला परि विजित देह माराचा ॥ १५४ ॥
पहिल्या कुलङ्करा[5]चें पल्योपम-दशम अंश आयु असे ।
दशमदशमांश भूपा शेप-मनूंचें जिनागमीं विलसे ॥ १५५ ॥

---

१ शरीराची उंची. २ माहिती. ३ नवव्या पुष्पदन्त तीर्थकरा[illegible]. ४ चौदावें अनन्त जिनेश्वरापर्यंत. ५ प्रतिश्रुति कुलकराचे.

चौऱ्यांशि-पूर्वलक्ष प्रथमें जिनाचें असें गणी वदले ।
दुसऱ्याचें सूरिवरें द्वासप्तति-पूर्व-लक्ष सांगितलें ॥ १५६ ॥
तिसऱ्या तीर्थंकराचें आयु असे साठ-लक्ष-पूर्वाचें ।
नन्तर पांच जिनाचें दहा-दहांनीं विहीनसें साचें ॥ १५७ ॥
आयुष्य पुष्पदन्तीं जाणावें दोन-लक्ष-पूर्वांचें ।
श्रीशीतल-जिनपतिचें आयु असे एक-पूर्व-लाखाचें ॥ १५८ ॥
चौऱ्यांयशि लक्ष आयू श्रेयांसाचें नि वासुपूज्याचें ।
बाहात्तर लक्ष असे वदती जिनराज दिव्यशा वाचें ॥ १५९ ॥
विमलानन्त नि धर्म नि शान्ति जिनांचें क्रमें असें कथिती ।
आयुष्य साठ तीस नि दश लक्ष नि एक लक्ष सूरितति ॥ १६० ॥
नव्वद हजार आणिक पञ्चसहस्राधिकायु कुन्थु जिनीं ।
चौऱ्यांयशिसहस्रायू अरनाथा बोलतात जैनमुनि ॥ १६१ ॥
पांचसहस्र नि आयू पन्नास सहस्र मल्लिनाथाचें ।
तीस सहस्रायु असे सुव्रतनाथास वदति बुध साचें ॥ १६२ ॥
नमिनाथ-जिनपतीचें दहा सहस्रायु नेमिनाथाचें ।
एकसहस्रायु असे शतवर्षायुष्य तेंवि पार्श्वाचे ॥ १६३ ॥
श्रीवीरजिनपतीचें बाहत्तर वर्षं आयु सांगितलें ।
भारत सर्व-जिनांच्या पादरजें पूत हें असे झालें ॥ १६४ ॥

( भरतादिक चक्रवर्तीचीं चरित्रें )

झाले या भरतामधिं बारा चक्रेश सांगतो त्यांचीं ।
संक्षेपानें चरितें जीं असतीं पापतापहर साचीं ॥ १६५ ॥
ऋषभजिनेशापासुनि यशस्वतीला पराक्रमी झाला ।
सुत 'भरत' नाम ज्याचें भारत जेणें समस्त वश केला ॥ १६६ ॥
ज्याच्या नांवानें हा विशाल भूमिप्रदेश षट्खण्ड ।
'भारत' नामा पावे रक्षी ज्याचा विशाल भुजदण्ड ॥ १६७ ॥
जो पुण्डरीकिणीपुरिं पीठ सुनामें प्रसिद्ध पूर्वभवीं ।
होता पराक्रमी नृप यद्गुणगानीं समर्थ नैव कवि ॥ १६८ ॥
होउनि विरक्त झाला कुरुसेनाचा सुशिष्य घोरतपी ।
सर्वार्थसिद्धि मिळवी तेथें तो शान्ति-सुखद अमृता पी ॥ १६९ ॥

---

१ वृषभनाथाचें. २ अजितनाथाचें बाहात्तर लक्षपूर्व. ३ संभवनाथाचें.

दुःखद भवभय होतें ज्याच्या हृदयांत सर्वदा जागें।
घे लोचानन्तर तो कैवल्यरमा-करा करीं वेगें ॥ १७० ॥
जी त्रैलोक्या जाणी ऐशा सर्वज्ञतेस मिळवून।
जो कर्मसंक्षयानें झाला शाश्वत-सुखीं सदा लीन ॥ १७१ ॥

( सगरचक्रिचरित्र. )

पृथ्वीपुर नगराचा होता भूपाल विजय नांवाचा।
अरिगण जिंकी शौर्यें जिंकी ज्याची सुधेस ही वाचा ॥ १७२ ॥
भवभोग नि देहाची स्थिति तो जाणुनि अनित्य वनिं गेला।
नमुनि यशोधर-गुरुपद होउनि मुनि तत्पदांत नित रमला ॥ १७३ ॥
साधुनि समाधि-मरणा विजयीं अहमिन्द्रतेस तो पावे।
भोग अनुत्तम भोगी पूजी जिनगृहिं जिना सदा भावें ॥ १७४ ॥
तेथून च्युत होउनि साकेतीं पुत्र होय विजयाचा।
माता सुमंगला ज्या झाला तो 'सगर' या सुनामाचा ॥ १७५ ॥
देवहि ज्याची आज्ञा सुममालेसम सदा शिरीं धरिती।
तो चक्रिसौख्य भोगी मौक्तिकसम शुभ्र कीर्ति बुध गाती ॥ १७६ ॥
साठ हजार तयाला होते सुत सर्पराजकोपानें।
मेले दुःखी झाला पुत्र-वियोगाग्नि-तीव्र-तापानें ॥ १७७ ॥
राज्य त्यागुनि झाला विरक्त जिनमुनि करी तपश्चरण।
केवल-बोधा मिळवुनि मुक्तिश्रीचें करी करग्रहण ॥ १७८ ॥

( मघवचक्रिचरित्र )

जो पुण्डरीकिणीपुरिं पूर्वभवीं 'शशिभ' नाम नृप होता।
विमलगुरूंचा झाला विरक्त होऊन शिष्य शुभचेता[1] ॥ १७९ ॥
ग्रैवेयकांत जन्मे तेथें भोगून दिव्य-सौख्यास।
आयुष्यान्तीं त्यागुनि तनु[2] तो झाला इथें महापुरुष ॥ १८० ॥
श्रावस्ती-नगरामधि होता राजा सुमित्र नांवाचा।
राणी भद्रवती त्या जिंकी वीणारवा जिची वाचा ॥ १८१ ॥
या उभयांना झाला ग्रैवेयकदेव 'मघव' नांवाचा।
तनय जयाच्या चरिता इन्द्राची वर्णिते शुभा वाचा ॥ १८२ ॥

---

१ शुभमनाचा. २ शरीर.

नवनिधि चौदा रत्नें यांचा स्वामी तृतीय चक्रपति ।
झाला आज्ञा ज्याची मानिति चौदा सहस्र देवततति[१] ॥ १८३ ॥
भोगून चक्रिसौख्या दीक्षा घेऊन मुनि-तपास करी ।
साधुनि समाधि-मरणा प्रथम स्वर्गांत देवसौख्य वरी ॥ १८४ ॥
श्रीधर्मशान्ति यांच्या अन्तरकालांत[२] चक्रपति झाला ।
हिमशुभ्र कीर्ति ज्याची गाती नित किन्नरादि-सुरवाला ॥ १८५ ॥

[ सनत्कुमार-चक्रवर्ति-चरित्र. ]

यानन्तर वृत्त घेट चतुर्थचक्री-सनत्कुमाराचें ।
निजदेहें जिंकियलें जेणें सौन्दर्य खचित माराचें[३] ॥ १८६ ॥
गौतमगणीस वदला नृप केलें पुण्य कोणतें सांगा ।
जेणें या चक्रीच्या अपूर्व सौन्दर्य लाभलें अङ्गा ॥ १८७ ॥
संक्षेपानें कथिला महामुनीशें तया पुराणार्थ ।
वर्षशतें हि वदाया विद्वज्जन होय अन्य असमर्थ ॥ १८८ ॥
तिर्यग्नारक-दुःखें कुमनुष्याची हि लाभती त्यास ।
जों वरि जीव न मिळवी दुर्लभ ऐशा जिनेन्द्रधर्मास ॥ १८९ ॥
गोवर्धन नांवाचा गांव जिथें विपुल सुखद जन होते ।
नान्दत होता श्रेष्ठी नामें जिनदत्त जो सुखी तेथें ॥ १९० ॥
जैसें तळें-सरोवर-नदीगणीं श्रेष्ठसा समुद्र असे ।
विन्ध्यादिसर्वशैलीं पर्वतनायक सुमेरुगिरिच दिसे ॥ १९१ ॥
चन्द्रादिग्रहवृन्दीं सूर्य श्रेष्ठ नि तृणांत ऊस असे ।
जैसें लतासमूहीं ताम्बूल-लताचि सुन्दरा विलसे ॥ १९२ ॥
निम्बकदम्बाम्रादिक-तरुगणिं हरिचन्दनास उत्तमता ।
संपूर्णकुलामध्यें आली श्रावककुलास-नायकता ॥ १९३ ॥
कारण आचारांनीं तेंच असे या जगांत अतिपूत[४] ।
शुभगति देण्यामध्यें तेंच असे वा नितान्त नित सन्त ॥ १९४ ॥
जिनदत्त श्रावककुलिं जन्मुनि जिनपूजनादि कार्यांत ।
तत्पर राहुनि गेला गुणभूषण शुभगतींत तो त्वरित ॥ १९५ ॥

---

१ देवसमूह. २ धर्मनाथाच्या नंतर व शान्ति जिनाच्या पूर्वी. ३ मदनाचें.
४ अतिशय पवित्र.

श्रावकधर्मीं तत्पर शीलसुमांचा सुगन्ध जी धरिते ।
विनयवती तत्पत्नी तन्मरणें धरि मनांत दुःखातें ॥ १९६ ॥
गोवर्धन-नगरामधिं सुन्दर मन्दिर तिनें जिनेशाचें ।
बान्धविलें भक्तांच्या नयना नि मनास लुब्ध करि साचें ॥ १९७ ॥
दीक्षा घेउनि केलें सुतप तिनें दीर्घकालपर्यन्त ।
साधुनि समाधिमरणा उपजे ती रम्य अमरलोकांत ॥ १९८ ॥
होता त्याच पुरामधिं सदा सदाचार-पालनीं निरत ।
'हेमभुज' नाम ज्याचें उत्साही जो गृहस्थधर्मांत ॥ १९९ ॥
त्यानें विनयवतीला जिनमन्दिर बान्धण्यांत उद्युक्त ।
केलें नि महापूजन-कार्यीं अनुमोदिलें तिला सतत ॥ २०० ॥
आयुष्य संपल्यावरि झाला तो यक्ष कमल-तुल्याक्ष ।
श्रीजिनवन्दन-तत्पर संघांचा धरितसे सदा पक्ष ॥ २०१ ॥
सम्यग्दृष्टि असा तो सुर झाला मरुनि तीन जन्मांत ।
सुमनुष्य देव मानव होउनि झाला जिनेन्द्रपदभक्त ॥ २०२ ॥
होतें नगर महापुर सुप्रभ नामें नृपाल राज्य करी ।
राणी तिलका त्याची पातिव्रत्यादिसद्गुणास वरी ॥ २०३ ॥
त्या राजदंपतीला झाला तो पुत्र धर्मरुचि नामा ।
धर्मप्रेमी होता होती त्याच्या गुणां न जगिं सीमा ॥ २०४ ॥
सुप्रभ-सूरिवराचा झाला तो शिष्य विरत होऊन ।
व्रत-समितिगुप्ति पाळी निजदेहीं निःस्पृहत्व ठेवून ॥ २०५ ॥
तो धैर्यवन्त मुनिवर पाळी शीलास दोष निन्दून ।
जीवदया-गुण-धारी इन्द्रियजेता करी तपश्चरण ॥ २०६ ॥
शङ्कादिक-दोषांना नाशून सुदर्शनास तो उजळी ।
वैयावृत्य करी तो साधूंचें अशुभ कर्मगण जाळी ॥ २०७ ॥
चौथ्या स्वर्गीं जन्मे साधुनि तो साधु साधुमरणास ।
देवीगण-वेष्टित सुर भोगी बहुकाल दिव्यभोगास ॥ २०८ ॥
सहदेव भूप होता नागपुरीं राजनीतिनिपुण करी ।
निजविजयाराणीसह सुराज्य तो शत्रुशौर्यगर्व हरी ॥ २०९ ॥

---

१ फुलांचा. २ कमलासारखा डोळ्याचा. ३ बाजू. ४ वैराग्ययुक्त. ५ समाधिमरण.

माहेन्द्रस्वर्गच्युत सुर तो उभयास तनय नयनिपुण।
झाला ज्याला पाहुनि मदनचि हा बुध म्हणेल नच कोण॥ २१०॥
नांव तयाचें ठेवी भूपति सुन्दर 'सनत्कुमार' असे।
ज्याच्या रूपगुणाची कीर्ति सुरालयिं[1] सुरेन्द्रवदनिं वसे॥ २११॥
झालें चक्र सुदर्शन त्याच्या उत्पन्न आयुधागारीं।
षट्खण्डमही वश करि विनम्र राही सदैव अनगारीं[2]॥ २१२॥
देवापेक्षा अधिकचि सौन्दर्य असे सनत्कुमाराचें।
सौधर्मेन्द्रें कथिलें प्रगटे विस्मय मनांत अमरांचें॥ २१३॥
उत्पन्न मनि कुतूहल झालें आले बघावयास सुर।
प्रासादीं त्या दिसलें सनत्कुमारस्वरूप अतिरुचिर॥ २१४॥
व्यायामें जो श्रमला ज्याच्या अंगास तांबडी माती।
पिळदार दण्ड ज्याचे झळके वदनीं अपूर्वशी कान्ति॥ २१५॥
छाती रुंद जयाची शिरिं मर्दन आवळेल तेलाचें।
स्नानासाठीं पंचा कमरेला लपटला असे ज्याचे॥ २१६॥
स्नानोचितासनावरि[3] बसलेला राजराज[4] तो दिसला।
आगतदेवसमूहा हर्षानें तो तया असें वदला॥ २१७॥
असुनि हि मनुष्य अपुलें देवसमूहास रूप आकर्षी।
इन्द्रें सभेंत म्हटलें सत्यचि तें जेवि पूर्णिमास्थ-शशी॥ २१८॥
अथवा] ,, ,, ,, ,, ,, संशयास झणि नाशी
चक्री त्यांना वदला देवांनो स्नान करुनि जेवीन।
वस्त्रें नि भूषणांनीं या मी देहास खूप सजवीन॥ २१९॥
येउनि सभेंत मणिमय-सिंहासनिं मी बसेन त्या समयीं।
पाहा माझ्या रूपा जाण्याची न च करा तुम्ही घाई॥ २२०॥
मान्य तयें तें केलें तेव्हां स्नानादि सर्व उरकून।
येऊन आसनावरि बसला देहा विशेष सजवून॥ २२१॥
पाहुनि पुनरपि म्हटलें देवांनीं पूर्वरूप हें नाहीं।
ही मानववपुशोभा असार नि क्षणिकशी गमे पाही॥ २२२॥

---

१ स्वर्गांत. २ दिगंबर जैनसाधूंत. ३ स्नानायोग्य आसनावर. ४ राजांचा राजा चक्रवर्ती.

प्रथमचि दिसलें आम्हां अपुलें हें रूप यौवनें युक्त ।
सुन्दर तैसें नाहीं क्षणिक विजेपरि मना करी व्यथित ॥ २२३ ॥
देवापासुनि ऐकुनि असार अपुलें शरीर-सौन्दर्य ।
चक्री विरक्त झाला करी तपश्चरण वनुनि मुनिवर्य ॥ २२४ ॥
होतां महर्द्धिलाभ हि सहन करी तो सदा महारोगा ।
चौथ्या स्वर्गी जन्मे भोगी तेथें सुदिव्यशा भोगा ॥ २२५ ॥

[ शान्ति, कुन्थु व अर या तीन चक्रवर्तींचीं संक्षित कथा. ]

पुरपुण्डरीकिणीमाधें झाला नरपाल मेघरथनामा ।
घनरथ सुशिष्य होउनि करी तपश्चरण ज्यास नच सीमा ॥ २२६ ॥
पञ्चमअनुत्तरामधिं जन्मुनि भोगी विशालभोगास ।
परिभोग रोग समजुनि मानी हितकर निजात्मसौख्यास ॥ २२७ ॥
श्रीविश्वसेन नरपति ऐराराणीसवें सुराज्य करी ।
नागपुरीं या उभया झाला सुत शान्ति अशुभ सर्व हरी ॥ २२८ ॥
जन्मदिनीं मेरूवरि केला अभिषेक त्यास नेऊन ।
इन्द्रें सुरासुरांसह मात्रंकीं वसवि परत आणून ॥ २२९ ॥
यौवनिं चक्री झाला षट्खण्डांचे सुभोग सेवून ।
तृणवद्राज्या त्यागुनि वैराग्यें सुतप तो करी गहन ॥ २३० ॥
या परि पञ्चमचक्री सोळावा तीर्थनाथ होऊन ।
मुक्तिरमापति झाले त्यांच्या करि तो पदाम्बुजां नमन ॥ २३१ ॥
कुन्थु नि अर यानन्तर झाले चक्री नि तीर्थनाथ युग ।
तप करुनि मुक्त झाले अखण्ड हे भोगितात सुखभोग ॥ २३२ ॥
श्रीधर्मशान्ति यांच्या अन्तरकालीं सनत्कुमार नृप ।
चक्री अन्तर जाणी जिनत्रयीं अपुलेंचि गुणकूप ॥ २३३ ॥

( सुभौमचक्रवर्तीचें संक्षित चरित्र. )

धान्यपुरीं नृप होता ज्याचें कनकाभ नाम विख्यात ।
झाला विचित्रगुप्ताचार्यांचा शिष्य वनुनि सुविरक्त ॥ २३४ ॥
केलें सुतप तयानें झाला उत्पन्न तो जयन्तांत ।
सुख दिव्य तिथें भोगी अप्रतिहत दीर्घकालपर्यन्त ॥ २३५ ॥

---

१ सर्वार्थसिद्धि विमानांत. २ आईच्या ओटींत. ३ नंतर. ४ दोन तीर्थंकर व दोन चक्री. ५ विघ्नरहित अखण्ड.

ईशावतीपुरीमाधिं राज्य करी कार्तवीर्य सानन्द ।
तारा तयास जाया नृप होता कीर्तिवल्लरीकन्द ॥ २३६ ॥
झाला पुत्र तयांना स्वर्गाहुनि तो चवून कनकाभ ।
नांव सुभूम तयाचें लक्ष्मी त्याच्यावरी करी लोभ ॥ २३७ ॥
तो चक्राधिप झाला पट्खण्डांचा अधीश भरतांत ।
पितृवधक जामदग्न्या[1] मारुनि ही जाहला न तो शान्त ॥ २३८ ॥
या जामदग्न्यभूपें भूप क्षत्रिय असङ्ख्य जे वधिलें ।
दांत तयांचें पात्रीं ज्यानें बघतां सुदुग्धसे झाले ॥ २३९ ॥
तें दूध पीत असतां झालें तें पात्र चक्ररत्न करीं ।
तेणेंचि जामदग्न्या वधून तद्विभव सकल शीघ्र हरी ॥ २४० ॥
अष्टाङ्गनिमित्तज्ञें जें कथिलें वृत्त तें तसें घडलें ।
श्रेणिक वैर न हितकर येणें प्राणी असङ्ख्यसे रडले ॥ २४१ ॥
या जामदग्न्य-विप्रें निःक्षत्रिय भूमि सातदां केली ।
चण्डसुभूमें निर्द्विज केली ती एकवीसदां सगळी ॥ २४२ ॥
अत्युग्र शासनाचें याच्या भय वाळगून हृदयांत ।
रजकादिकुलीं लपले ब्राह्मण निजजीवितावनीं निरत ॥ २४३ ॥
हा अष्टम चक्राधिप अरमल्लि-जिनान्तराल-कालांत ।
भोगानुरक्त झाला सञ्चित करि विपुलपातक-व्रातें[2] ॥ २४४ ॥
विषयासक्ति मनामधिं त्याच्या अत्यन्त तीव्र उद्भवली ।
भोगी मरून सप्तम-नरकीं तो विविध घोर दुःखाली[3] ॥ २४५ ॥

( महापद्मचक्रि-चरित )

चिन्तामणि नामक नृप पूर्वभवीं वीतशोक-नगरांत ।
होता प्रजा सुतासम पाळी झाला भवांत सुविरक्त ॥ २४६ ॥
घेई मुनिदीक्षा तो सुप्रभगुरुपदयुगास वन्दून ।
पाळी महाव्रतांना सुगुप्तिसमितींत लीन होऊन ॥ २४७ ॥
ब्रह्मस्वर्गीं स्वर्गी[4] झाला सल्लेखनेस सेवून ।
सुररामासह भोगी दिव्यसुखें दीर्घकाल अन्यून ॥ २४८ ॥
राणी जया मयूरी राज्य जयाचें प्रसिद्ध नागपुरीं ।
धावे कीर्ति दिगन्तरिं नृपाल जो पद्मरथ सुनाम धरी ॥ २४९ ॥

---

१ परशुरामाला. २ समूह. ३ दुःखसमूह. ४ देव.

ब्रह्मस्वर्गीचा सुर आयुष्यान्तीं चवून तेथून ।
या उभया सुत झाला नाम महापद्म वदति त्या निपुण ॥ २५० ॥
हा नवमचक्रवर्ती कीर्ति जयाची सदैव अघहर्त्री ।
पाळी समग्र भरता वीर दुजा नच समग्र या क्षत्रीं[1] ॥ २५१ ॥
सौन्दर्यगर्व ज्यांना होता भूपास आठ त्या कन्या ।
इच्छिति ज्या न पतीला सुरकन्यांना हि मानिती वन्यां[2] ॥ २५२ ॥
सौन्दर्यलुब्ध होउनि हरिल्या विद्याधराष्टकें कन्या ।
सहन महापद्मा हें झालें नच निखिलभूपगण-मान्या ॥ २५३ ॥
धावा करून भूपें जिंकुनि विद्याधराष्टकास रणीं ।
शौर्यानें आणियल्या वाणी ज्याची असे सुधेवाणी ॥ २५४ ॥
झाल्या विरक्त कन्या त्यागुनि संसार-देह-भोगांना ।
संयम रक्षुनि अन्तीं स्वर्गी सुख भोगितात त्या नाना ॥ २५५ ॥
विद्याधरभूपाष्टक शरीर-भवभोग-विरत होऊन ।
जनमान्य साधु झाले झाले आत्मिक-सुखांत रममाण ॥ २५६ ॥
चक्रेशाही झालें वैराग्य सुता-विरक्ति पाहून ।
राज्य दिलें पद्मसुता विष्णुसुतांसह करी तपोग्रहण ॥ २५७ ॥
करुनि महातप चक्री कर्मक्षय करुनि केवलज्ञानी ।
झाला लोकाग्रावरि अरमल्लि-जिनान्तरांत[3] मुक्तिधनी ॥ २५८ ॥

( हरिषेण चक्रिकथा )

विजयपुरीं नृप होता विक्रमशाली महेन्द्रदत्त गुणी ।
होऊन शिष्य नन्दन-गुरुपद सेवी व्रतास धन मानी ॥ २५९ ॥
आयुष्यान्तीं झाला चौथ्या स्वर्गी सुखांत बहु लीन ।
देवी-परिवारासह केलि[4] करी हृष्टचित्त होऊन ॥ २६० ॥
हरिकेतु भूप वप्राराणीसह पृथुल कपिल-नगरांत ।
भूपच्छत्रच्छाया असुनि हि करि अरिजनास संत्रस्त ॥ २६१ ॥
या उभयांना झाला हरिषेण सुपुत्र परमरमणीय ।
षट्खण्डाधिप झाला नव्हतें याच्यासमान जगिं शौर्य ॥ २६२ ॥
हा दशमचक्रवर्ती करि जिनमन्दिर-विभूषिता धरणी ।
सुव्रत-तीर्थी कर्मक्षया करी जाहला अनन्तगुणी ॥ २६३ ॥

---

१ क्षत्रियांत. २ रानटी. ३ अरनाथानंतर व मल्लिजिनापूर्वी. ४ क्रीडा.

( जयसेनचक्रिकथा. )

नामें असित असे नृप परि तो सितशुभ्रकीर्तिचा होता ।
राजपुरामधिं ज्याची शुभमति राहे सदैव धर्मरता ॥ २६४ ॥
झाला विरक्तमति तो निर्ग्रन्थ सुधर्ममित्रगुरु-शिष्य ।
पंचेन्द्रियां मनाला निजस्वरूपांत तो करी वश्य ॥ २६५ ॥
अन्तीं समाधिमरणें ब्रह्मस्वर्गांत जाहला देव ।
झाला सुराङ्गनारत सुकृताची भोगिली तयें ठेव ॥ २६६ ॥
तेथून च्युत होउनि यशस्वती-विजय-तनय नयशाली ।
जयसेन चक्रवर्ती सित ज्याच्या नान्दते सदा गालीं ॥ २६७ ॥
चक्रीशविभव भोगुनि विरक्त झाला नृपाल जयसेन ।
निर्ग्रन्थ साधु झाला केला रत्नत्रयीं तयें यत्न ॥ २६८ ॥
शुक्लध्यानानें तो कुकर्मकाष्ठास पूर्ण जाळून ।
सिद्ध विशुद्ध जहाला मुक्तिश्रीसौख्य-सागरीं मग्न ॥ २६९ ॥

( ब्रह्मदत्तचक्रीची कथा )

संभूतभवीं काशीदेशीं श्रीब्रह्मदत्त चक्रपति ।
झाला स्वतंत्रलिङ्गाचार्य पदा नमुनि भक्तियुक्त यति ॥ २७० ॥
तीव्रतपश्चरणानें मरून तो कमलगुल्म सुविमानीं ।
झाला महर्द्धिकामर विभवें शचिपति-समानता मानी ॥ २७१ ॥
कालान्तीं स्वर्गातुनि चवून काम्पिल्य पत्तनीं जन्मे ।
श्रीब्रह्मरथ नि चूला-तनय श्रीब्रह्मदत्त सतत रमे ॥ २७२ ॥
षट्खण्ड भरतचक्रें जिंकुनि होऊन वैभवासक्त ।
जन्में सप्तमनरकीं भोगी तो दुःखराशि अत्यन्त ॥ १७३ ॥
श्रीनेमिपार्श्वनाथान्तरालकालांत अन्त्य चक्रपति ।
झाला मृगयादोषें भोगी नरकांत सतत दुःखतति ॥ २७४ ॥
षट्खण्ड-भूमिपति हे सांगितले मगधनाथ मी सकल ।
कोण शुभाशुभ यांच्या गति रोधाया समर्थ होईल ॥ २७५ ॥

( पुण्यपापांचें फल. )

पूर्वार्जित कर्मांचें फल शुभ वा अशुभ सकल ऐकून ।
अनुभवुनि हि पाहुनि ही कां मानव उचित कार्य करिती न ॥ २७६ ॥

१ शुभ्रपांढरा. २ राजनीतीनें शोभणारा तज्ज्ञ. ३ इन्द्राच्या बरोबरीचा.

मोदक आदिक कोणी घेउनि जाती न मनुज परलोकीं ।
परि पाप-पुण्य पदरीं घेउनि जातात भूप! अवलोकीं ॥ २७७ ॥
कैलासाच्या शिखरासमान उत्तुङ्ग शुभ्रसौधांत ।
राहति जे जन समजा पुण्यद्रुम फलचि घेति पदरांत ॥ २७८ ॥
धन-कनक-स्त्री-वैभव-दासी-दासादि विपुल परिवार ।
पुण्यतरूचीं सुफलें ऐसें वदतात आगमज्ञ नर ॥ २७९ ॥
शीतोष्ण दुःख जेथें ऐशा कुगृहीं निवास करितात ।
दारिद्र्यें पीडित जे पाप-द्रुमफल[1] मिळे तया उचित ॥ २८० ॥
पर्वततुल्य गजावरी चढुनि पुरांतून[2] वैभवें जाती ।
चामर-छत्रें शोभित नृप पुण्यफलास सतत अनुभवती ॥ २८१ ॥
सुन्दर चामर ज्यांच्या कर्णा भूषित करून हसतात ।
ऐशा सुडौल अश्वावरून जे नृप विहार करितात ॥ २८२ ॥
मागें पुढें नि बाजुस पाइक ज्यांच्या अनेक असतात ।
ते सुकृतनरपतीच्या प्रसन्नतेचें सुपात्र[3] होतात ॥ २८३ ॥
प्रासादासम सुन्दर रथांत जन जे वसून जातात ।
ते सुकृतपर्वताच्या स्वादु झऱ्याच्या जलास पीतात ॥ २८४ ॥
पाय जयांचे फुटले देहावरि मलिन लक्तरें असतीं ।
फिरती ऐसे नर जे पापविपद्रुमफलास अनुभवती ॥ २८५ ॥
जे सोन्याच्या ताटीं अमृतासम मधुर अन्न खातात ।
धर्मरसायनफल हें त्यांना लाभे मुनीन्द्र म्हणतात ॥ २८६ ॥
देवेन्द्र-चक्रपतिपद किंवा नृपपद नरास जें मिळतें ।
फल तें दयालतेचें जिनवाणी सज्जना असें कथितें ॥ २८७ ॥
बलभद्र केशवांचें वैभव जें श्रेष्ठ मानवा मिळतें ।
धर्माचें जाणावें सुफल असे वदति आगम-ज्ञाते ॥ २८८ ॥
बलराम-केशवांचें वर्णन मगधाधिपास सांगितलें ।
श्रीगौतमगणनाथें तें श्रीरविषेणसूरि वदति भलें ॥ २८९ ॥

( नारायणांच्या पूर्वभव नगरींचीं नावें. )

हास्तिनपुर साकेता श्रावस्ती तेवि रम्य कौशाम्बी ।
पोदन नि शैलपत्तन सिंहपुरी जलदमण्डला चुम्बी ॥ २९० ॥

---

१ पापवृक्षाचें फल. २ नगरांतून. ३ स्थान. ४ ढगांच्या समूहाला.

कौशाम्बी हास्तिन या नगरी श्रीवासुदेव पूर्वभवी ।
होत्या त्यांच्या निर्भय जाणाव्या वदति आगमज्ञ कवि ॥ २९१ ॥

( नारायणांची पूर्वभव नांवें. )

अतिवीर विश्वनन्दी पर्वत दुसरा तृतीय धनमित्र ।
सागरदत्त जयाचा ध्वनि भासे हा समुद्र जणु रुद्र ॥ २९२ ॥
विकट, प्रियमित्र तथा मानस चेष्टित असेचि सप्तम तो ।
अष्टम असे पुनर्वसु नवचा श्रीगंगदेव अरि मथितो ॥ २९३ ॥
पूर्वभवीं कृष्णांचीं नांवें जीं श्रेणिका तुला कथिलीं ।
तीं ठेव स्मरणामधिं जिनवीरें आगमांत सांगितलीं ॥ २९४ ॥

( नारायणपद-प्राप्त होण्यांचीं कारणें. )

निर्दयता नि पराजय दरिद्रता प्रियवियोग दुर्भाग्य ।
इत्यादि कारणांनीं नारायणताप्ति कथिति बुध योग्य ॥ २९५ ॥
सनिदान तपा करिती तत्त्वज्ञानें विहीन होऊन ।
तेणें बलभद्रांचे मानव बनतात अनुज मनिं जाण ॥ २९६ ॥
यास्तव सनिदान तपा प्रयत्नपूर्वक अवश्य वर्जावें ।
कारण सुतीव्र दुःखा होतें हें हेतु हृदयिं जाणावें ॥ २९७ ॥

( दीक्षागुरूंचीं नांवें. )

संभूत आद्य दुसरे सुभद्र वसुदर्शनाख्य हे तिसरे ।
श्रेयांस नि भूति पंचम वसुभूति कषाय ज्यांत नैव उरे ॥ २९८ ॥
श्रीघोषसेन सप्तम अम्भोधि मुनीन्द आठवे जाण ।
द्रुमसेन हे हरींचे पूर्वभवीं वदति विबुध सुगुरु गण ॥ २९९ ॥

( स्वर्गांचीं नांवें. )

स्वर्ग महाशुक्राख्य प्राणत लान्तव तथा सहस्रार ।
ब्रह्म नि माहेन्द्र तथा पहिला सौधर्म वदति जन चतुर ॥ ३०० ॥
सानत्कुमार तिसरा तेवि महाशुक्र येथुनी आले ।
पुण्यावशेषयोगें भरतीं नव वासुदेव हे झाले ॥ ३०१ ॥

( नारायणांच्या जन्मभूमिः )

पोदननगर द्वारावती नि हास्तिन पुनः हि तेंच असे ।
पुर चक्रपुर कुशाग्र नि मिथिला जी सुरपुरीस सतत हसे ॥ ३०२ ॥

साकेता मथुरा या नारायणजन्मभूमि आहेत ।
धनसंपन्न नि सन्तत उत्सवपरिपूर्ण सुजन वसतात ॥ ३०३ ॥

( नारायणांचे पिता, माता व पत्नी यांचें वर्णन. )

पहिला नृप प्रजापति दुसरा श्रीब्रह्मभूति मानावा ।
तो रौद्रनाद सोम नि विख्यात शिवाकराख्य जाणावा ॥ ३०४ ॥
सम्पूर्णमूर्धनामा सप्तम जो अग्निनाद दशरथ हे ।
वसुदेव जनक असती नव कृष्णांचे असे नृपा पाहे ॥ ३०५ ॥
पहिली मृगावती गण दुजी असे माधवी तिजी पृथिवी ।
सीता नि अम्बिका या लक्ष्मी सप्तम सुकेशिनी देवी ॥ ३०६ ॥
तेवि सुमित्रा नवमी रूपवती देवकी अशा माता ।
जाणा नव कृष्णांच्या शीलगुणाराधनीं सदा निरता ॥ ३०७ ॥
जी सुप्रभा प्रथम ती दुजी असे रूपिणी तिजी प्रभवा ।
चौथी मनोहरा मग असे सुनेत्रा धरी शुभा भावा ॥ ३०८ ॥
विमला आनन्दवती प्रभावती रुक्मिणी अशीं नांवें ।
असति महादेवींचीं नव कृष्णांच्या असें मनीं ध्यावें ॥ ३०९ ॥

( बलभद्रांचीं पूर्वभव-नगरें, पूर्वभव नांवें, पूर्वभवांतील दीक्षागुरु यांचें वर्णन. )

सुरसदनासम सदनें जींत अशी पुण्डरीकिणी नगरी ।
पृथ्वीपुर दुसरें पुर आनन्दपुरीं प्रजा प्रमोद[१] वरी ॥ ३१० ॥
नन्दपुरी ती चौथी व्यतीतशोका नि विजयपुर विजयी ।
रम्य सुसीमा क्षेमा हास्तिन जेथें प्रजा असे विनयी ॥ ३११ ॥
ही नव बलदेवांची पूर्वभवांतील जाण भूपाल ।
नगरें क्रमेंचि कथिलीं कथितों तत्पूर्व-जन्न मी सकल ॥ ३१२ ॥
बल, मारुतवेग असे यानन्तर नन्दिमित्र तो तिसरा ।
चौथा असे महाबल पुरुषर्षभ भव्य हो न ज्या विसरा ॥ ३१३ ॥
षष्ठ सुदर्शन आणिक सप्तम बोला वसुन्धराख्य तथा ।
श्रीचन्द्र, शंख ऐसें बलपूर्वभवांत नांव हो न वृथा ॥ ३१४ ॥
यांच्या पूर्वभवाच्या गुरुवर्गाचें असे नृपा कथन ।
यन्नामवर्णनें ही होय जनांच्या भवाब्धिचें[२] मथन ॥ ३१५ ॥

---

१ आनन्द. २ संसारसमुद्राचें.

अमृतार, महासुव्रत, सुव्रत वृषभ नि असे प्रजापाल ।
दमवर, सुधर्म, अर्णव, विद्रुम वलसुहितहेतु हे मूल ॥ ३१६ ॥
हलधर तीन अनुत्तरिं निवसत होते असें मनीं आण ।
तीन सहस्रारामधिं ब्रह्मस्वर्गांत दोन हें जाण ॥ ३१७ ॥
एक महाशुक्रामधिं पूर्वभवींचे निवास हे आण ।
च्युत तेथुनि हे होउनि झाले वलभद्र सौख्यहेतु गण ॥ ३१८ ॥

( वलभद्रांच्या मातांचीं नांवें व कोणत्या तीर्थकरांच्यावेळीं हे झाले याचें कथन. )

वलभद्रांच्या माता नामें त्यांचीं तुला कथीन नृपा ।
ज्या शीलभूषणानें भूषित होत्या सुरूप गुणकूपा ॥ ३१९ ॥
ज्या भद्रा अम्भोजा आणि सुभद्रा सुदर्शना जाण ।
तेवि सुभद्रा विजया नि वैजयन्ती अनन्यगुण-पूर्ण ॥ ३२० ॥
अपराजिता नि नवमी नांव जिचें रोहिणी असें होतें ।
नव वलभद्र-सुमाता पातिव्रत्यांत चित्त दृढ होतें ॥ ३२१ ॥
श्रेयान् आदि जिनेन्द्रापासुनि धर्मान्त पांच जिनसमयीं ।
झाले त्रिपृष्ट आदिक वलभद्रानुज हि पांच नित्यजयी ॥ ३२२ ॥
श्रेयांस वासुपूज्या विमल अनन्तास धर्मनाथास ।
नमिति त्रिपृष्ट आदिक नारायण नमवुनि स्वमाथास ॥ ३२३ ॥
षष्ठ नि सप्तम नमिती नारायण दोन मल्लि सुव्रत या ।
श्रीजिनयुगास मिळविति जे कर्मगणावरी सदा विजया ॥ ३२४ ॥
नमि-सुव्रतान्तरालीं लक्ष्मण झाला नि सुव्रता वन्दी ।
नेमि-जिनेन्द्रास नमी नवम श्रीकृष्ण सतत आनन्दी ॥ ३२५ ॥

( नऊ प्रतिनारायणांच्या राजधानींचें त्यांच्या नांवासह वर्णन. )

प्रतिकृष्ण नऊ झाले नगरें त्यांचीं कथीन भूप ! तुला ।
रत्नांच्या किरणांनीं लाजवितीं जीं सुरेन्द्रनगरीला ॥ ३२६ ॥
अलका, विजय, नि नन्दन, पृथ्वीपुर, जाण तेवि हरि-नगर ।
सूर्यपुर, सिंहनगर नि लंका श्रीराजगृह असे प्रवर ॥ ३२७ ॥

---

१ सद्गुणाच्या विहिरी. २ श्रेयान्, वासुपूज्य, विमल, अनन्त व धर्म यांच्या अस्तित्वकालीं.

अश्वग्रीव नि तारक मेरक मधु कैटभाख्य हे चार।
पंचम निशुंभ मानी बलि नि प्रह्लाद सातवा चतुर ॥ ३२८ ॥
दशकण्ठ आठवा गण नवम जरासन्ध वैभवें अन्ध ।
अरि हे नव कृष्णांचे ज्यांना नरकायुचा घडे बन्ध ॥ ३२९ ॥

( बलभद्रांचे दीक्षागुरु व त्यांना स्वर्गमोक्षप्राप्ति. )

नवबलभद्रें दीक्षा घेउनि ज्यांच्या समीप तप केलें ।
त्या नव सुगुरुवरांचें नाम स्मरणेंहि होय खचित भलें ॥ ३३० ॥
पहिलें सुवर्णकुम्भ नि सत्कीर्ति, सुधर्म जाण चवथे जे ।
त्यांचें नाम महामुनि, मृगाङ्क पञ्चम सुनाम हें साजे ॥ ३३१ ॥
श्रुतकीर्ति सुमित्राभिध भुवनश्रुत आठवे नि सुव्रत हे ।
रामांचे दीक्षागुरु ज्यांच्या स्मरणें प्रसन्नता लाहे ॥ ३३२ ॥
बलभद्र आठ गेले मोक्षा भववन समस्त जाळून ।
ब्रह्मस्वर्गी नववा कथिलें वीरें तया करी नमन ॥ ३३३ ॥

[ चन्द्रकान्त जाति ]

जिनपति-वर्णन केलें आधीं मंगलदायक जें ।
जावें त्यांना शरण नरानें मुक्तिपुरीराजे ॥ ३३४ ॥
तदनन्तर मी कथिलें भारत-विजयी नृप बारा ।
त्रिखण्डपति जे स्पर्शि न नउ नउ ज्या संयम वारा ॥ ३३५ ॥
कथिले नव बलभद्र जाति जे स्वर्ग नि मोक्षास ।
संयमधारक नियमें होती वश नच अक्षास ॥ ३३६ ॥
या सर्वांचें पूर्वभवादिक जें कथिलें वृत्त ।
तें तूं ध्यानी ठेव श्रेणिक होशिल भवमुक्त ॥ ३३७ ॥
भवसागर हा असे भयानक दुःखतरङ्गांनीं ।
दुर्गतिवडवाग्नीनें झाला सुतप्त समज मनीं ॥ ३३८ ॥
दास जिनांचे होउनि त्यांचें नांव सदा घेती ।
भव्य असे ते संयम नावें मोक्षपुरा जाती ॥ ३३९ ॥

इत्यार्षे श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे पद्मपुराणे तीर्थकरादिभवानुकीर्तनं नाम विंशतितमं पर्व ॥ २० ॥

## एकवीसाव्या पर्वांत वर्णिलेल्या कथेचा सारांश.

आठवे बलभद्र राम व आठवे नारायण लक्ष्मण हे श्रीमुनिसुव्रत तीर्थकरांचे तीर्थांत उत्पन्न झाले म्हणून त्यांचें चरित्र गौतमगणधरांनीं श्रेणिकास या पर्वांत सांगितलें आहे. श्रीमुनिसुव्रत हरिवंशांत जन्मले म्हणून त्या वंशाची उत्पत्ति श्रेणिकाला प्रथमतः गणधरांनीं अशी सांगितली–

दहावे शीतलनाथ तीर्थंकर मोक्षाला गेल्यानन्तर कौशाम्बी नगरांत सुमुख-नामक राजा होऊन गेला. याच नगरांत वीरक नामक व्यापारी आपल्या वनमाला पत्नीसह राहत होता. ती अत्यंत सुन्दर होती. तिला पाहून राजानें तिचें हरण केलें. वीरकाला अतिशय दुःख झालें. परन्तु बलिष्ठ राजापासून आपली पत्नी परत आणणें त्याला शक्यच नव्हतें. त्यानें खिन्न होऊन घर त्यागलें. निर्मोह होऊन त्यानें तप केलें व तो स्वर्गांत देव झाला.

इकडे राजा सुमुख जैन मुनींना दान देऊन कालान्तरानें मरण पावला व विजयार्ध पर्वताच्या दक्षिण-श्रेणींत हरिपुरनगरांत क्षत्रिय वंशांत जन्मला व वन-मालाही एका विद्याधराची कन्या होऊन जन्मली. तरुण झाल्यावर या दोघांचा विवाह झाला. हें जोडपें क्रीडा करण्यासाठीं हरिक्षेत्रांत गेलें होतें. स्वर्गांत देव झालेल्या वीरकानें अवधिज्ञानानें सुमुख व वनमाला कोठें जन्मले आहेत हें जाणलें. त्याला फार कोप आला. त्यानें त्यांचें हरण करून कोठेंतरी फेकून द्यावें असा विचार केला. हरिक्षेत्रांत येऊन त्यानें त्या दोघांना उचलून चंपापुरींत आणून ठेविलें. चंपापुरचा हा राजा झाला. हा हरण करून आणल्यामुळें 'हरि' या नांवानें प्रसिद्ध झाला. पुढें याच्या वंशांत असंख्य राजे झाले. व हा वंश या भारतांत कीर्ति-संपन्न झाला.

याच वंशांत राजगृह नगरांत सुमित्र नांवाचा राजा आपल्या पद्मावती नामक राणीसह राज्य करीत होता. एकेवेळीं राणीला पहांटेच्यावेळीं हत्ती, बैल, सिंह, हत्ती जिला स्नान घालीत आहेत अशी लक्ष्मी इत्यादि सोळा स्वप्नें पडलीं. प्रातःकालीं जिनपूजादि कृत्यें उरकून सुमित्र राजाला तिनें स्वप्नांचें फल विचारिलें. तुला त्रिलोक

नायक तीर्थंकर पुत्र होणार आहे असें राजानें सांगितलें. तें ऐकून तिला अत्यंत आनन्द वाटला. श्री न्ही आदिक देवता मातेची सेवा करूं लागल्या. कुबेरानें जिनेश्वर गर्भांत येण्यापूर्वीं सहा महिनें व नंतर नऊ महिनेपर्यन्त रत्नवृष्टि केली. प्रभु जन्मल्यानंतर इन्द्रांनीं त्यांना मेरु पर्वतावर नेऊन त्यांचा क्षीरसमुद्रजलानें अभिषेक केला व परत आणून मातेच्या मांडीवर त्यांना बसविलें व ते स्वर्गास गेले. जेव्हां प्रभु मातेच्या गर्भांत आलें तेव्हां ती व्रतांत तत्पर राहिली म्हणून प्रभूचें नांव सुव्रत असें ठेवण्यांत आलें.

प्रभूच्या बाललीलांनीं माता-पिता व बंधुजनांना अत्यानंद होत असे. याप्रमाणें बाल्यदशा संपून प्रभूंनीं तारुण्यांत प्रवेश केला. इन्द्र नाना भोगोपभोगांचे पदार्थ पाठवून प्रभूची सेवा करीत होता. अनेक राजकन्याबरोबर प्रभूंचा विवाह झाला. व पुष्कळ वर्षें त्यांचीं सुखोपभोगांत गेलीं.

एकेवेळीं प्रभूंना आकाशांत शरत्कालाचे शुभ्र मेघ विलीन होत असतांना दिसले. त्यांना वैराग्य झालें. लौकान्तिक देवांनीं प्रभूच्या वैराग्याची प्रशंसा केली. इन्द्रादिकांनीं प्रभूंना वस्त्रालंकारांनी भूषित करून ‘अपराजिता’ नामक पालखींत बसवून दीक्षास्थानीं नेलें. तेथें सर्व परिग्रहांचा त्याग करून व ‘नमःसिद्धेभ्यः’ असे म्हणून सिद्धांना त्यांनीं नमस्कार करून केशलोच केला. दोन उपवासानन्तर प्रभु आहारासाठीं निघाले. त्यांना वृषभदत्त राजानें नवधा विधीनें आहार दिला.

आहारानन्तर प्रभु पुनः वनांत जाऊन तप करूं लागले. एकेवेळीं चंपकवृक्षाखालीं प्रभु ध्यानस्थ बसले. घातिकर्मांचा नाश होऊन त्यांना केवलज्ञान प्राप्त झालें. आर्य देशांत विहार करून गृहस्थधर्म व मुनिधर्मांचा उपदेश केला. व बारा सभासह ते सम्मेदशिखरावर येऊन अघाति कर्मांच्या नाशानें मुक्त झाले.

मुनिसुव्रतनाथाच्या पुत्रानें सुव्रतानेंही राज्य करून आपल्या दक्ष नामक पुत्राला राज्य दिलें व मुनिव्रतें धारण करून कर्मक्षयानें मोक्ष प्राप्त करून घेतला.

सुव्रत राजानंतर दक्ष, इलावर्धन, श्रीवर्धन, श्रीवृक्ष, संजयन्त असे अनेक राजे हरिवंशांत होऊन स्वर्ग मोक्षाला गेले. याच वंशांत राजा मैथिल व राणी विपुला यांच्यापासून जनक व कनक असे राजे उत्पन्न झाले.

इक्ष्वाकु वंशांतही वृषभनाथ, भरत, अर्ककीर्ति, सोम वगैरे असंख्य राजे उत्पन्न झाल्यानंतर मुनिसुव्रतनाथाच्या तीर्थकालीं श्रीविजय व हेमचूला राणी या

उभयांना सुरेन्द्रमन्यु नामक पुत्र झाला. याच्या पत्नीचें नांव 'कीर्ति' होतें. या जोडप्याला वज्रबाहु व पुरन्दर असे दोन पुत्र झाले.

नागपुर नगरांत इभवाहन राजा राज्य करीत होता. त्याला 'मनोदया' नांवाची सुंदर मुलगी होती. तिचा विवाह वज्रबाहुशीं झाला. कांहीं दिवस नागपुरांत राहून वज्रबाहु उदयसुंदर मेहुणा व मनोदया पत्नी यांच्यासह आपल्या राजधानी-कडे निघाला होता. मार्गांत अनेक दृश्यें पाहत ते वसन्तगिरि पर्वताजवळ आले. त्या पर्वतावर गुणसागर नांवाचे एक साधु आतापनयोगानें आत्मचिन्तन करीत असलेले त्याला दिसले. दुरूनच वज्रबाहूनें त्यांना पाहून नमस्कार केला. मेघाला पाहून मोराला आनंद होतो तसा आनंद त्याला झाला. व अशा साधूचें दर्शन महापुण्यवन्ताशिवाय इतरांना होत नसतें असें तो म्हणू लागला. हें ऐकून उदय-सुन्दरानें थट्टेनें म्हटलें आपण त्या साधूची फार प्रशंसा करीत आहात. काय आपला दीक्षा घेण्याचा विचार आहे ? जर तसा असेल तर माझेंही आपणांस साहाय्य होईल. हें ऐकून वज्रबाहूनें म्हटलें उदयसुन्दर, आपण आपल्या प्रतिज्ञेपासून भ्रष्ट होऊ नका बरें ? मी खरोखरच दीक्षा घेण्याचा विचार करीत आहे. माझ्याबरोबर आपणांसही दीक्षा घ्यावी लागेल हें ध्यानांत घ्या. आपल्या मेहुण्याचा निश्चय पाहून त्यानें म्हटलें कीं, " राजन् मी थट्टा केली. थट्टेंत केलेली प्रतिज्ञा मोडली तरी पातक लागत नसतें आणि आपला नुकताच विवाह मनोदयेशीं झाला आहे. अद्यापि विवाहाचें कंकणही सुटलें नाहीं तोंच आपण दीक्षोद्यत होत आहांत हें पाहून माझ्या बहिणीला अर्थात् आपल्या पत्नीला अतिशय दुःख होईल. यास्तव हा विचार आपण मनांतून काढून टाका." वज्रबाहु म्हणाला उदयसुंदरा! उत्तम चारित्र पाळणें हें मनुष्यजन्माचें उत्तम फल आहे व तुम्ही केलेली थट्टा मी खरें हित करणारी आहे असें मानतो. व तुमची बहिण ही उत्तम कुलीन स्त्री आहे. ती आर्यिका होऊन आत्महित करण्यास बिलकुल मागेंपुढें पाहणार नाहीं. यास्तव तुम्ही आपला विचार निश्चित केला पाहिजे असें बोलून तो मेहुणा व पत्नीसह गुणसागर योगि-राजाकडे गेला. व आपला हेतु त्यांना कळवून दीक्षा घेतली. उदयसुन्दरानेंही दीक्षा घेतली व मनोदया ही आर्यिका होऊन उत्तम तप करूं लागली.

ही वार्ता, श्रीविजयाला अर्थात् वज्रबाहूच्या आजोबाला कळली. त्याला फार आश्चर्य वाटलें व आपण वृद्ध होऊनही मुनि होऊन स्वहित करून घेतलें नाहीं म्हणून खेद प्रगट केला. व तोही आपल्या पुरन्दर नामक दुसऱ्या नातूला राज्य देऊन 'निर्वाणघोष' नामक मुनीश्वराजवळ जाऊन मुनि झाला.

इकडे पुरन्दर राज्यपालन करीत आपल्या पृथिवीमति नामक पत्नीसह संसारसुखाचा अनुभव घेत असतां तिला गर्भ राहिला व नऊ महिन्यांनीं ती प्रसूत झाली. बालकाचें नांव त्या उभयतांनीं 'कीर्तिधर' असें ठेविलें. कीर्तिधर तरुण झाल्यावर पुरन्दरानें त्याला राज्य देऊन क्षेमंकर मुनिजवळ मुनिदीक्षा घेतली. व आत्महित साधलें.

कीर्तिधराचा सहदेवी नामक राजकन्येबरोबर विवाह झाला. एकेवेळीं सूर्य-ग्रहण पाहून आपणांसही वृद्धावस्थारूपी ग्रहण लागेल व आपल्याला यमग्रास व्हावें लागेल. यास्तव या तरुण अवस्थेंतच आपण दीक्षा घेऊन आत्महित करावें असा विचार करून मंत्रिगणाला राज्य सांभाळण्यास सांगून आपण दीक्षा घेण्यास निघाला. मंत्र्यांनीं त्याला परावृत्त करण्यासाठीं एक युक्ति रचली 'त्यांनीं एका टोपलींत पुष्कळसे कोळसे आणिले व त्या ढिगांत वैडूर्य रत्न ठेविलें. त्याच्या कांतीनें ते कोळसे चमकू लागले. व तें काढून बाजूला ठेवल्यावर ते निस्तेज दिसूं लागले. मंत्र्यांनीं राजाला हें दृश्य दाखवून म्हटलें कीं, प्रभो आपण वैडूर्यरत्नासारखें स्वयं-प्रभ-स्वयंप्रकाशयुत आहांत व आम्हीं आपणामुळें प्रकाशित आहोंत. आमच्या ठिकाणीं राज्यरक्षणाचें सामर्थ्य नाहीं व दुसरी गोष्ट अशी कीं, आपणास अद्यापि पुत्र झालेला नाहीं. पुत्र झाल्यावर आपण त्याला राज्य देऊन दीक्षा घ्यावी. यावेळीं दीक्षा घ्याल तर शत्रु राज्य हस्तगत करतील व प्रजेला फार कष्ट भोगावें लागेल. हें सयुक्त भाषण ऐकून राजा कीर्तिधर राज्यपालन करूं लागला.

एकेवेळीं सहदेवीला गर्भ राहिला. तिनें ही वार्ता गुप्त ठेविली. व नऊ महिन्यांनीं प्रसूत झाली. मुलगा झाला पण ही वार्ता राजाला कळूं नका अशी तिनें सर्वांना सक्त ताकीद दिली व गुप्तरीतीनें पुत्राचें रक्षण करूं लागली. पण एका दीन ब्राह्मणानें राजसभेंत जाऊन 'राजा तूं जयवंत हो, तुला सद्गुणी पुत्र झाला आहे' अशी वार्ता कळविली. राजानें त्या गरीबाला पुष्कळ धन देऊन त्याला श्रीमंत केलें व पंधरा दिवसाच्या बाळाला त्यानें राज्य दिलें व मंत्र्यांना त्याचें चांगलें रक्षण करावयास सांगून वनांत प्रवेश केला तेथें विजयसेन मुनीश्वराजवळ त्यानें दीक्षा घेतली. व तपश्चरण करीत गुरुबरोबर विहार करूं लागला. अशा निःस्पृही मुनींना आमचा नमस्कार असो.

---

# एकवीसावें पर्व

[ सुमुख राजा वीरकश्रेष्ठीच्या पत्नीचें हरण करितो. ]

आतां तुजला नृपा श्रेणिका अष्टम रामाचें ।
वंशीं[1] कथितों नृप-मौक्तिक ज्या भूपविती साचें ॥ १ ॥
जिनेन्द्र शीतल मोक्षा गेल्यानन्तर नृप झाला ।
कौशाम्बीपुरिं सुमुख जयाची श्रवण करी लीला ॥ २ ॥
वीरकनामक वैश्य याच पुरिं निजभार्येसहित ।
राहत होता नृप हरि भार्या त्याची दुर्वृत्त[2] ॥ ३ ॥
भोगी तिजसह कामसुखें जीं लुब्ध मना करितीं ।
'दानें' देई जैनमुनींना भोग-सुखा देतीं ॥ ४ ॥
मरून युगलें विजयार्धाच्या दक्षिण पङ्क्तींत ।
हरिपुरनगरीं जन्में पुण्यें क्षत्रियवंशांत ॥ ५ ॥
एके वेळीं जाई क्रीडायास हरिक्षेत्रीं ।
तारुण्यानें निवास केला होता यद्रात्रीं ॥ ६ ॥
पत्नी-विरहानलें जयाचा होरपळे देह ।
दीक्षा घेई वीरक तप करि होउनि निर्मोह ॥ ७ ॥
स्वर्गीं झाला मरून सुर तो तेथें सुख भोगी ।
सुराङ्गनासह नाना-क्रीडा करून अनुरागी ॥ ८ ॥

[ देव झालेल्या श्रेष्ठी वीरकानें वैरी जोडप्याला हरण करून भरतक्षेत्रांत ठेविलें. ]

एकेवेळीं अवधिज्ञानें वैरी जाणून ।
हरण कराया उद्यत झाला मनांत कोपून ॥ ९ ॥
वैरिदम्पती क्रीडत होते मुदें हरिक्षेत्रीं ।
पूर्वभवीं जे कामें झाले होते उत्सूत्री[3] ॥ १० ॥
उचलुनि आणि दीन जोडपें त्या क्षेत्रांतून ।
स्थापी भरतक्षेत्रीं झालें मनांत जें खिन्न ॥ ११ ॥

---

१ वंश—वेळू व वंश. २ दुराचारी. ३ दुराचारी.

हरिवर्षांतुनि सुरें आणिलें म्हणून हरि नामें ।
प्रसिद्ध झाला तो नृप चम्पापुरींत सतत रमे ॥ १२ ॥
तनय महागिरि तयास झाला धरि जो विनयास ।
अनयापासुनि दूर रहाया पडे न आयास ॥ १३ ॥
महागिरीला आत्मज[1] झाला हिमगिरि नांवाचा ।
वर्णन त्याच्या सुगुणाचें करुं शके न बुधवाचा ॥ १४ ॥
हिमगिरिपासुनि वसुगिरि झाला तयास इन्द्रगिरि ।
इन्द्रगिरीला रत्नमाल सुत शासन अरिस करी ॥ १५ ॥
या परि झाले हरि-वंशामधिं अनेक-शत राजे ।
कीर्तिनगारा त्यांचा संतत दहा दिशीं वाजे ॥ १६ ॥

[ श्रीमुनिसुव्रत-तीर्थंकरांचा जन्म ]

प्रसिद्ध झाला या वंशामधिं सुमित्र नरपाल ।
कुशाग्र-नगरीं शत्रुगणाला भासे जणुं काल[2] ॥ १७ ॥
जो कान्तीनें निशाकराला भोगें इन्द्रास ।
तेजें गाम्भीर्यानें जिंकी सूर्य समुद्रास ॥ १८ ॥
होती पद्मावती तयाला पद्माक्षी जाया ।
विष्णु नृपा जणु मानुनि पद्मा[3] आली रमवाया ॥ १९ ॥
शोभत होता सर्व सुलक्षणवृन्द तिच्या देहीं ।
नान्दत होती प्रसन्नता जणुं सदैव नृपगेहीं ॥ २० ॥
प्रासादीं ती सुखद झोपली शय्येवरि राणी ।
पश्चिमरात्रीं सोळा स्वप्नें पाही सुखखाणी ॥ २१ ॥
गजेन्द्र बैल नि मृगेन्द्र लक्ष्मी स्नापिति गज जीस ।
मालायुग इन[4] चन्द्र मत्स्ययुग करिती क्रीडेस ॥ २२ ॥
घटयुग, कमलें शोभित ऐसा तडाग ती पाही ।
समुद्र सिंहासन मणिसुन्दर अशा विमाना ही ॥ २३ ॥
भवन शुभ्र जें पातालांतुनि येई नागाचें ।
वने इन्द्रधनु मणिराशींच्या किरणसमूहाचें ॥ २४ ॥
प्रखरानल ती माता पाही धूर न ज्यांत वसे ।
सोळा स्वप्नें बघुनि तियेचें मोदें चित्त हसे ॥ २५ ॥

---

१ पुत्र. २ यम. ३ लक्ष्मी. ४ सूर्य.

विस्मित झालें चित्त जिचें ती बुद्धिमती राणी ।
प्रातःकृत्यें उरकुनि आली नृपा-समीप क्षणी ॥ २६ ॥
वदली नाथा ! करयुग जोडुनी सांगा स्वप्नार्थ ।
ऐकायाची उत्सुकता मम होवो अन्वर्थ[1] ॥ २७ ॥
वदता झाला नृप स्वप्नफल जेव्हां राणीला ।
आकाशांतुनि रत्नांचा गण भूवरि कोसळला ॥ २८ ॥
तीन कोटि अन् अर्धकोटि धन नृपसौधामाजीं ।
इन्द्राज्ञेनें यक्ष[2] प्रतिदिनिं वर्षी मनिं राजी ॥ २९ ॥
मास पंधरा अखण्ड ऐशी झाली वसुवृष्टि ।
नगर रत्नमय झालें दिसले जन कोण न कष्टी ॥ ३० ॥
कमलवासिनी श्री ह्री आदिक जिन-जननीसेवा ।
करावयाला आल्या हृदयीं धरून वहुभावा ॥ ३१ ॥
जन्म जाहला त्याच दिनीं जिन सुमेरुवरि नेला ।
सुरपरिवारें क्षीरजलानें इन्द्रें स्नापियला ॥ ३२ ॥
पूजुनि भावें स्तवुनि नि वन्दुनि नगरीं आणून ।
मात्रङ्कीं[3] जिन बाला स्थापी शचिपति मोदून ॥ ३३ ॥
जिनेश गर्भी असतां माता सुव्रत-रत झाली ।
प्रसिद्ध झाले सुव्रत नामें श्रीजिन भूमितलीं ॥ ३४ ॥
अञ्जनशैला-समान असुनिहि वर्णे जिन-बाल ।
स्वदेहतेजें जिंकी सूर्या हें विस्मयमूल ॥ ३५ ॥
इन्द्र प्रतिदिनिं आणुनि देई नानाविधभोग ।
सेवुनि अहमिन्द्रज सुख मानी सुतुच्छ जिननाग[4] ॥ ३६ ॥
हाहा हूहू तुंबरु नारद विश्वावसु देव ।
प्रभुगुणगाना करिती संतत ठेवुनि मनिं भाव ॥ ३७ ॥
वीणावेणू आदिक वाद्यें जिनप्रभुस्नान ।
वाजत असतां प्रतिदिनिं होतें जें करि मुदित जन ॥ ३८ ॥
स्मित लज्जित नि प्रसाद आदिक विलास नारींचे ।
जिनास रमविति यौवनकालीं ते वहु त्यास रुचे ॥ ३९ ॥

१ सफल. २ कुबेर. ३ आईच्या मांडीवर. ४ जिनश्रेष्ठ.

[ मुनिसुव्रतनाथ विरक्त होऊन दीक्षा घेतात. ]

नभांत शारद-मेघा वघतां विलयातें गेले ।
विरक्ति तेणें प्रभुह्रदिं वाढे लौकान्तिक आले ॥ ४० ॥
भगवंतानें विचार केला यापरि ह्रदयांत ।
भव हा आहे अशुभ नि अशरण दुःखप्रद सान्त[1] ॥ ४१ ॥
शरीर जन्मे रक्तवीर्य त्या कारण होऊन ।
रक्तादिक जे सप्तधातु[2] त्या वाढवि तें जाण ॥ ४२ ॥
भोगाचे जे पदार्थ दिसती प्रारंभीं सुखद ।
अवसानीं[3] परि कटु ते गमती तथापि मोहान्ध ॥ ४३ ॥
या भोगास्तव पापें करिती प्राणिगणां वधिती ।
असत्य वदती चोरी करिती परललना वरिती ॥ ४४ ॥
झाले असतां प्राप्तहि वाढे तृष्णा मनिं शम न ।
नदीजलांनीं समुद्र भोगें आत्मा तृप्तचि न ॥ ४५ ॥
यास्तव आतां स्वहित कराया यांना त्यागीन ।
भवरोगाला वाढविण्याला अपथ्य हे जाण ॥ ४६ ॥
लौकान्तिक ही वदले देवा पूर्व-तृतीय-भवीं ।
विचार केला होता ह्रदयीं स्वपरहिता तो वी[4] ॥ ४७ ॥
सर्व विश्व हें जन्म-जरामृति-तमोऽन्ध-कूपांत[5] ।
पडलें त्याला उद्धाराया करुणा ह्रदयांत ॥ ४८ ॥
उद्भवलेली होती ती जणुं कल्पलता वाटे ।
सफल आज ती होइल ऐसें जनवन्धो गमतें ॥ ४९ ॥
नावाडी तूं ज्ञान तुझें हें वल्हें आहेत ।
तप ही नौका गुणरत्नांनीं भरली हें विदिन[6] ॥ ५० ॥
भव्य जीव हे वसले असती या तप-नौकेंत ।
सांभाळुनि त्या नेई नाथा ! विमुक्ति-नगरांत ॥ ५१ ॥
या परि बोलुनि ते लौकान्तिक देव जिना नमुन ।
गेले अपुल्या स्वर्गी अपुला नियोग[7] संपवुन ॥ ५२ ॥

---

१ नाशवन्त. २ रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, [हाडें], मज्जा, शुक्र. ३ शेवटीं. ४ प्रसवत आहे. ५ जन्म, वृद्धावस्था, मरणरूपी दाट अंधाराच्या आडांत. ६ माहीत आहे. ७ कर्तव्य.

निःस्पृह होउनि जिननाथानें अपुल्या पुत्रास ।
दिलें सुव्रता राज्य जयामधिं नसे रिपुत्रास ॥ ५३ ॥
अपराजित या शिविकेमध्यें मुनिसुव्रत वसले ।
देवें भूपें स्कन्धीं वाहुनि उद्यानीं नेलें ॥ ५४ ॥
विपुलोद्यानीं रम्यशिलातलिं जिनवर वैसून ।
वाह्याभ्यन्तर-संगा सोडुनि ते झाले श्रमण ॥ ५५ ॥
सिद्धेभ्यो नम वोलुनि ऐसें कच-लोचा करिती ।
उपवासद्वय धरून हृदयीं दीक्षेला वरिती ॥ ५६ ॥
उपवासद्वय झाल्यावरती आहारार्थ निघे ।
ईर्यासमिति-प्रपालनानें राजगृहांत रिघे ॥ ५७ ॥
वृपभदत्त नृप पूजी त्यांना नवधा भक्तीनें ।
निरन्तरायाहारें भरलें तन्मन मोदानें ।
तपोऽर्थ विभुनें अन्न सेविलें तेणें वृपदत्त ।
पञ्चाश्चर्या प्राप्त जाहला मोदा अत्यन्त ॥ ५९ ॥

[ मुनिसुव्रतनाथांना कैवल्यप्राप्ति व मोक्ष. ]

चम्पकवृक्षाखालीं शुक्लध्यानीं रत झाले ।
घातिकर्मगण नाशुनि दिव्यज्ञानी जिन वनले ॥ ६० ॥
शतेन्द्र आले परिवारासह करुनि 'स्तुति' नमिती ।
उत्तम-धर्म प्रभुचा ऐकुनि हर्षित मनिं होती ॥ ६१ ॥
निर्मल ऐशा गृहिमुनिधर्मा ऐकुनि नर देव ।
स्वस्वस्थाना वन्दुनि गेले धरून मनिं भाव ॥ ६२ ॥
मुनिसुव्रत जिन अनेक देशीं धर्मा प्रगटवुन ।
श्रीसम्मेदीं आले द्वादश[1]सभिका घेऊन ॥ ६३ ॥
अघातिकर्मा नाशुनि झाले लोकाग्रीं सिद्ध ।
निर्मल हेमासमान झाले ते अतिशय शुद्ध ॥ ६४ ॥
श्रीमुनिसुव्रत माहात्म्या जे पढती जिनदास ।
श्रवण करिति वा भावें त्याच्या पापा ये नाश ॥ ६५ ॥

---

१ वारा प्रकारचा गण-भवनवास्यादिक देव व देवी आर्यिका, श्रावक, श्राविका व मुनि.

निर्मल रत्नत्रय त्या मिळतें जाती मोक्षास ।
पुनरपि आगम न घडे त्यांचा न गळीं भवपाश ॥ ६६ ॥

( सुव्रत-राजाच्या वंशांत झालेल्या अनेक राजांचें कथन. )

सुव्रत भूपें राज्य रक्षिलें प्रजा सुखी केली[1] ।
ईति भीति नच त्याच्या राज्यीं जन बहु करि केली ॥ ६७ ॥
विरक्त होउनि दक्ष सुताला दिलें तयें राज्य ।
वनांत जाउनि केलें त्यानें विविध तपः प्राज्य ॥ ६८ ॥
घाति अघाति नि कर्मा नाशुनि मिळवी तो मोक्ष ।
अनन्त अनुपम सौख्य जयाला न दिसे प्रतिपक्ष[2] ॥ ६९ ॥
दक्षापासुनि इलावर्धनाभिध सुत नयशाली ।
झाला त्याच्यापासुनि तनय श्रीवर्धनसुवली ॥ ७० ॥
झाला श्रीवर्धनास पुत्र श्रीवृक्षाख्य शुभ ।
वृत्ति जयाची परोपकारी होती निर्लोभ ॥ ७१ ॥
श्रीवृक्षाला तनय जाहला सुसंजयन्त नृप ।
त्याच्यापासुनि कुणिम धरापति[3] होता गुणकूप ॥ ७२ ॥
कुणिमापासुनि पुत्र महारथ महारथी झाला ।
पुत्र तयाचा असे पुलोमा राज्यावरि आला ॥ ७३ ॥
यापरि झाले हरि-वंशामधिं सहस्रशो राजे ।
गेले कांहीं मोक्षा झाले लिप्त न कर्मरजें ॥ ७४ ॥
कांहीं गेले पुण्याचारें मरुनि स्वर्गांत[4] ।
आत्मा त्यांचा सुस्थिर राही त्रिरत्न-मार्गांत ॥ ७५ ॥

( हरिवंशांत जनक राजाची उत्पत्ति. )

या परि झाले क्रमशः पार्थिव या हरिवंशांत ।
झाला नंतर इन्द्रध्वज नृप जो बहु सतिवन्त ॥ ७६ ॥
पुत्र तयाला मैथिल नामें झाला विख्यात ।
विपुला त्याची राणी होती शील जिचें पूत ॥ ७७ ॥
जी परमश्री असुनि हि कोटिपदिं दरिद्रतायुक्त ।
झाला तिजला जनक सुनामा सुत अतिनिष्णात[5] ॥ ७८ ॥

---

१ क्रीडा. २ शत्रु. अर्थात् दुःखरहित अविनाशी मोक्ष-सुख. ३ राजा. ४ कंबरेमध्यें. ५ अतिशय चतुर.

करी प्रजेचें संतत हित तो जनकासम जनक ।
भाऊ त्याला दुसरा ज्याचें नाम असे कनक ॥ ७९ ॥
जनकनृपोद्भव यापरि कथिला हे श्रेणिक तुजला ।
त्या वंशा मी कथितो जेथें दशरथ उद्भवला ॥ ८० ॥
इक्ष्वाकूंच्या रम्य कुलामधि नाभिज वृषभ जिन ।
जन्मुनि मोक्षा गेले गिरि तो कैलासचि जाण ॥ ८१ ॥
याच कुलामधि वंशा भूषण भरत नि रवि[2] सोम[3] ।
झाले गेले मोक्षा देहीं होते जे अमम ॥ ८२ ॥
असंख्य गेला कुलीं काल या असंख्य नृप झाले ।
करून दुश्चर भूप तपें हे मोक्षा प्रति गेले ॥ ८३ ॥
सुकृतवन्त नर सौख्यें भोगिती अपुण्य सुकतात ।
कर्मविपाका भवांत भोगित संतत फिरतात ॥ ८४ ॥
वरून खालीं खालुनि वरती चाक जसें फिरतें ।
जीवामागें उत्सव-संकट-चक्र सदा भ्रमतें ॥ ८५ ॥
जीवीं मायालोभमदादिक उद्भवती दोष ।
वाढुनि त्यांचा बनतो नृपते ! प्रचण्डसा कोष ॥ ८६ ॥
निर्धन मानव आयू सरतां दुःखें मरतात ।
अपमृत्यूचें कारण मिळतां करिती निजघात ॥ ८७ ॥
जीव शुभाशुभकर्मे नाना कार्यें करितात ।
भल्या बुऱ्या वा विचारचक्रीं सदैव फिरतात ॥ ८८ ॥
जगण्यासाठीं नाना करिती व्यवसाया[4] मनुज ।
अयोग्य कार्यें करिती कोणी सोडुनि कुललाज ॥ ८९ ॥
धनलाभास्तव करिती कोणी धनिकाचें स्तवन ।
नाचुनि गाती चरणा नमिती माना सोडून ॥ ९० ॥
चित्रपटासम चेष्टित करवी अवसर्पिणिकाल ।
हळूं हळूं तो पावत होतां विलय धरापाल[5] ॥ ९१ ॥

## आर्या वृत्त.

श्रीसुव्रतजिनपतिचें चालत असतां सुतीर्थ त्या कालीं ।
नृप विजय शूर झाला शत्रुगणा जो वनांत हाकाली ॥ ९२ ॥

१ पित्याप्रमाणें. २ अर्ककीर्ति. ३ सोमयश. ४ उद्योग. ४ हे श्रेणिक राजा.

( इक्ष्वाकुवंशांत वज्रबाहुराजा जन्मला. )

राणी सुवर्णचूला होती त्या शान्त कान्त सरलमना ।
सुरमन्यु पुत्र झाला होता क्षम जो प्रजापरित्राणा ॥ ९३ ॥
कीर्ति तयाची भार्या रविचन्द्रसमान दोन पुत्र तया ।
वज्रासम भुज ज्याचे म्हणून जो वज्रबाहु धरि विनया ॥ ९४ ॥
दुसरा पुत्र पुरन्दर अरिगण पाहुनि जयास दर[1] पावे ।
दीनास दान देउनि हृदय जयाचें सदैव मोदावें ॥ ९५ ॥
इभवाहन नृप होता त्याकालीं परमरम्य-नागपुरीं ।
चूडामणि त्या भार्या चूडामणि जी सतींत नच दुसरी ॥ ९६ ॥
झाली उभया तनया 'मनोदया' जी दया मनीं वाहे ।
यत्सौन्दर्य-गुणाचा लक्षांशहि खेचरी न रति लाहे ॥ ९७ ॥
कर निजकरांत घेउनि वरिलें श्रीवज्रबाहुनें तिजला ।
अतिशय मोहित होउनि रतिसौख्यसरोवरीं तिच्या रमला ॥ ९८ ॥
नभिं रोहिणी नि शोभे चन्द्र जसा जोडपें तयें शोभे ।
'श्रीवज्रबाहु' पुष्पीं भ्रमर जसा तो मनोदयीं लोभे ॥ ९९ ॥
श्वशुरगृहीं कांहीं दिन राहून निघे पुराकडे जाया ।
प्रेमें उदया घेउनि घेउनि सुन्दर मनोदया जाया ॥ १०० ॥
मार्गी अनेक दृश्यें नदीसरोवर-वनादि पाहुनि ते ।
अचलासमीप आले नाम जयाचें 'वसन्तगिरि' होतें ॥ १०१ ॥
उच्च तयाच्या शिखरीं योगीश्वर निष्परिग्रही होते ।
जणु मुक्तिपत्तनाच्या मार्गा तेथून बघत होते ते ॥ १०२ ॥
आतापन[2] योगीं रत 'गुणसागर' मुनिवरास पाहून ।
बहुभक्तियुक्त होउनि दुरून करि वज्रबाहु त्या नमन ॥ १०३ ॥

( वज्रबाहु उदयसुन्दरासह दीक्षा घेतो. )

पाहुनि मेघा जैसा मयूर हृदयीं प्रमोद बहु पावे ।
बघतां वज्रभुजाचें भक्तीनें चित्त त्याकडे धावें ॥ १०४ ॥
चिन्तामणि[3]सम दिसले वन्द्य असे हे मुनीश मज आज ।
अत्यन्त विपुल पुण्यें पवित्र करितिल तदीय पादरज[4] ॥ १०५ ॥

---

१ भय. २ उन्हाळ्यांत पर्वतशिखरावर बसून किंवा उन्हांत राहून तप करणें. ३ चिन्तामणि रत्नाप्रमाणें इच्छित वस्तु देणारे. ४ पायाची धूळ.

ऐसें बोलत असतां कुमार त्या उदयसुन्दरें म्हटलें ।
दीक्षा घ्यायाचा कां विचार बोला असे मनीं अपुले ॥ १०६ ॥
जरि हा विचार अंपुला माझेंहि तया सहाय होईल ।
ऐसें हास्यें वदला सत्यचि मानी कुमार शुभशील ॥ १०७ ॥
माझा विचार निश्चित, मागें घेऊ नकोस तव वचन ।
बोलून वज्रभुज तो उतरुनि करि मुनिवराकडे गमन ॥ १०८ ॥
मी थट्टेनें वदलों ऐसें त्या उदयसुन्दरें म्हटलें ।
जरि लंघिली प्रतिज्ञा वाटे नच पाप त्यांत तें कसलें ॥ १०९ ॥
साहाय्य सर्व कार्यीं होत असे तव असेचि दे यांत ।
होऊ नको प्रतिज्ञाभ्रष्ट वदे वचन घेइ हृदयांत ॥ ११० ॥
आहे विवाहमङ्गल-कङ्कण अद्यापि या तुझ्या हातीं ।
ही तव जाया दुःखित होइल ऐसा विचार करि चित्तीं ॥ १११ ॥
संसार-सौख्य-वञ्चित[1] होईल तुझी मनोदया जाया ।
तूं त्यागितां तियेला होइल जीवन तिचें न कां वाया ॥ ११२ ॥
वज्रभुज त्यास वदला सुचरित[2] फल हें मनुष्यजन्माचें ।
तव थट्टेचें वचनहि हितकर मी मानितों मनीं साचें ॥ ११३ ॥
स्वातिजलबिन्दु जैसे मेघापासून शुक्तिपुट[3]कांत ।
मोतीं होतीं थट्टा-वचनें तव मद्धितार्थ होतात ॥ ११४ ॥
तव ही कुलीन भगिनी दीक्षेनें निजहितास साधील ।
ही आर्यिकागणामधिं इन्दु-कलातुल्य भगणिं[4] शोभेल ॥ ११५ ॥
करुनि व्रतोपदेशा दीक्षोद्यत तूं हिला अवश्य करी ।
अनुसर अमुच्या मार्गा निजप्रतिज्ञेस निश्चयेंचि वरी ॥ ११६ ॥
उदयासहि उपदेशुनि मुनिसंनिध वज्रसुभुज गमन करी ।
थट्टा वचनहि ऐसें सुजनाचें होतसेंचि हितकारी ॥ ११७ ॥
गुणरत्नांचा सागर जणु गुणसागर ऋषीस वन्दून ।
दीक्षा घेउनि झालें त्रिक[5] तें सुतपांत सतत रममाण ॥ ११८ ॥
मुनि वज्रबाहु झाला वार्ता ऐकून भूप विजय वदे ।
बालक विरक्त होती न वृद्ध हें मन्मनास खेदा दे ॥ ११९ ॥

---

१ रहित. २ मुनींचा महाव्रताचार. ३ शिंपलीच्या पोटांत. ४ नक्षत्रसमूहांत.
५ तिघेजण.

नव वय असतां माझा नातू होउनि विरक्त मुनि तपतो ।
मी थेरडा असूनहि विषयापासुनि विरक्त नच होतो ॥ १२० ॥
( नातू मुनि झाल्यामुळें आजोबाही विरक्त होऊन मुनि झाले. )
तो भाग्यवन्त माझा नातू गवतासमान भोगास ।
मानुनि विरक्त झाला परि भोगांची सुटे न मज आस ॥ १२१ ॥
मी निर्भाग्य-शिरोमणि विषयांच्या खोल कर्दमीं[1] फसलों ।
कैसें हित मम होइल कृतान्तवदनांत[2] हाय मी गेलों ॥ १२२ ॥
जो इन्द्रनीलमणिसम होता माझा समस्त कचभार[3] ।
विकसितकाशसुमासम[4] झाला गांठी जरा हि अनिवार ॥ १२३ ॥
वर्षाहत-चित्रासम[5] झाला मम कान्तिहीनदेह जरी ।
विषयासक्ति सुटेना झालों मी गलितगात्र देह जरी[6] ॥ १२४ ॥
यापरि वदून झाला विषयापासून तो स्पृहारहित[7] ।
देउनि पुरन्दराला राज्य तयें करुनि घेतलें स्वहित ॥ १२५ ॥
निर्वाणघोष नामक यतिसंनिध तो विरक्त होऊन ।
उपडून केशभारा यति झाला आत्मचिन्तनीं लीन ॥ १२६ ॥
पृथिवीमती पुरन्दरभार्या प्रसवे सुतास कीर्तिधरा ।
ज्याच्या प्रसृत[8]-यशानें झाली ही सकल धवल सधर[9]-धरा ॥ १२७ ॥
कौशल-देशनृपाची सहदेवी सुन्दरी सुता होती ।
कीर्तिधराची झाली पत्नी ती सद्गुणी नि विनयवती ॥ १२८ ॥
देउनि पुरन्दरानें कीर्तिधरा राज्य घेतली दीक्षा ।
क्षेमङ्कर गुरुसंनिध करून जी प्राप्त देतसे मोक्षा ॥ १२९ ॥
( कीर्तिधर राजा विरक्त होऊन राज्यत्याग करण्यास उद्युक्त झाला.
परन्तु मन्त्रिजनानें युक्तीनें राज्यपालनांत स्थिर केलें. )
अरिगण करून निजवश भोगी भूपाल देवसम भोगा ।
एके दिवशीं पाही निरभ्र[10]-नाभिं राहु-सूर्य-संयोगा ॥ १३० ॥
जो चन्द्रकान्ति नाशुनि समस्त-तिमिरास दूर सारून ।
पसरी प्रकाश अपुला निजकिरणें पद्मवृन्द खुलवून ॥ १३१ ॥

---

१ चिखलांत. २ यमाच्या तोंडांत. ३ केशसमूह. ४ फुललेलें काश नांवाचें फूल, हें पांढरें असतें. ५ पावसानें फिकें झालेल्या चित्रासारखें. ६ म्हातारा. ७ इच्छारहित. ८ पसरलेल्या. ९ पर्वतासहित पृथ्वी. १० ढगांनीं रहित.

ऐसा रवि प्रखर हा अपणापासून दूर राहूस ।
करण्या असमर्थ दिसे चुकवूं कोणी शके न दैवास ॥ १३२ ॥
यौवन-सूर्य हि ऐसा लागे त्याला जगीं जरा-ग्रहण[1] ।
स्त्री-पुत्रादिक-पाशें निबद्ध हा जन्तु पावतो मरण ॥ १३३ ॥
आहे अनित्य जग हें ऐसें मानुनि वदे स्वमन्त्रिगणा ।
पृथ्वी ससागरा[2] ही रक्षा जाईन मी तपोऽर्थ[3] वना ॥ १३४ ॥
या परि वदतां भूपति सभाजनाच्या मना विषाद गमे ।
राजन् रक्षण करता सदा प्रजाजन सुखी म्हणून रमे ॥ १३५ ॥
त्यागाल जरि मही[4] ही निःशत्रुक[5] राज्य केवि राहील ।
नृपसंरक्षण आहे जनवैभववृद्धि-हेतु अनुकूल ॥ १३६ ॥
भववन असे भयानक जरारुजाद्यग्नि[6] पेटला त्यांत ।
पाहून घाबरें मन विरक्ति-जलसेचनें गमे शान्त ॥ १३७ ॥
नृपमन विरक्त पाहुनि मन्त्रिजनें युक्ति रम्यशी रचिली ।
वैडूर्य कोळशाच्या ढिगांत ठेवून पङ्क्ति[7] ती वदली ॥ १३८ ॥
वैडूर्य-रत्न आहे अतिशय हें कान्तियुक्त चित्तहर ।
हे कोळसे हि खुलले तत्कान्तीनें मनांत अवधार[8] ॥ १३९ ॥
वैडूर्य रत्न नंतर काढुनि बाजूस ठेविलें दिसती ।
ते कोळसे न सुन्दर वदली तेव्हां नृपास मन्त्रितति[9] ॥ १४० ॥
नाथा आपण असतां आम्हा शोभा नि राज्य हें शोभे ।
आपण वनांत जातां घेइल अरिगण सुराज्य हें लोभें ॥ १४१ ॥
व्हावें प्रजाजनांचें रक्षण सुस्थिर नि राज्य हें व्हावें ।
यास्तव अपुल्या जनकें राज्यीं सुस्थापिलें तुम्हां भावें ॥ १४२ ॥
राजन्! सुपुत्र होतां त्याला देऊन राज्य वनि जावें ।
दीक्षा घेउनि मुक्तिप्राप्त्यर्थ तपांत चित्त ठेवावें ॥ १४३ ॥
या परि मन्त्रिवरांचें भाषण ऐकुनि नृपाल कीर्तिधर ।
पालन करी प्रजेचें रक्षुनि खड्गें[10] स्वराज्यविस्तार ॥ १४४ ॥

---

१ म्हातारपणाचें ग्रहण. २ समुद्रासह. ३ तप करण्यासाठीं. ४ पृथ्वी. ५ शत्रुरहित. ६ वृद्धता, रोग वगैरे. ७ मंत्रिगण. ८ समज. ९ मंत्रिसमूह. १० तरवारीनें.

सहदेवीसह भूपति पञ्चेन्द्रिय-सौख्य किर्तिधर भोगी ।
परि मनिं विरक्तभावें झाला न तयीं कदापि अनुरागी[1] ॥ १४५ ॥
राणीस गर्भ राहे नव-मासें जाहला तियेस सुत ।
जन्मोत्सव नच केला प्रसङ्ग हा ठेविला तियें गुप्त ॥ १४६ ॥
" आचन्द्रसूर्य[2] राजन्! राज्य करी सुत तुला सुगुणवन्त ।
झाला सफल मनोरथ तव तूं होशील सतत जयवन्त " ॥ १४७ ॥
या परि सभेंत येउनि वदला द्विज[3] एक दीन मोदानें ।
दारिद्र्य दूर केलें भूपें त्याचें प्रभूत-धनदानें ॥ १४८ ॥
मातेच्या मांडीवरि निजलेल्या पक्षजात[4]-पुत्रास ।
राजसभीं आणवुनी देई नृप राज्य धरुनि मनिं हर्ष ॥ १४९ ॥
कोशलपुर त्यासमयीं ध्वजा-पताकां नि तोरणें यांनीं ।
शृङ्गारिलें प्रजा त्या बघून निजनयन सफलता मानी ॥ १५० ॥
पुरनाम तेंचि झालें प्रसद्ध तत्समयिं बालराजाचें ।
कोशलकुमार होवो सन्तत जयवन्त वदति बुध साचें ॥ १५१ ॥
यांनिं विजयसेन-मुनिवर-चरणासंनिध समस्त-संगास ।
त्यागून भूप झाला मुनि मानी तृणसमान अंगास ॥ १५२ ॥
करि तीव्र तपश्चरणा करून मुनिचरितिं नित्य लीनमना ।
जिनदास वंदना करि करयुग जोडून त्याचिया चरणां ॥ १५३ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे सुव्रतवज्रबाहुकीर्तिधरमहात्म्यवर्णनं नाम एकविंशतितमं पर्व ॥ २१ ॥

---

१ आसक्त. २ जगांत सूर्यचन्द्र असेपर्यन्त. ३ ब्राह्मण. ४ जन्मून पंधरा दिवस ज्याला झाले आहेत.

# बावीस व तेवीस पर्वांतील कथांचा सारांश

श्रीकीर्तिधरमुनि क्षुधादिक परीषह सहन करून घोर तप करीत अनेक गांवें व नगरांत विहार करीत कोशलानगरींत आले. राजवाड्यांत प्रवेश करीत असतांना सहदेवी राणीनें या नागव्याला आंत येऊं देऊं नकोस दरवाजे बंद करून घ्या असें द्वारपालांना म्हणाली. हे जैनमुनि राजाच्या मनांत वैराग्य उत्पन्न करून राज्यविमुख करतात. माझ्या मुलाच्या नजरेला जैनमुनि पडूं नयेत असा बंदोबस्त मला करावयाचा आहे असें तिनें रागावून सांगितलें. राणीच्या आज्ञेनें कीर्तिधर—मुनीश्वरांना द्वारपालांनीं नगराच्या बाहेर केलें.

राणीच्या मनांत कोणत्याही धर्माचे साधु गावांत न येऊं देण्याचा विचार होता त्यामुळें शैवादिक साधूंनाहीं तिनें नगरांत येऊं दिलें नाहीं. कीर्तिधरमुनींना राणीच्या आज्ञेनें द्वारपाल हाकून देत असतां दायीनें पाहिलें. तिला फार वाईट वाटलें. ही राणी आपल्या नवऱ्याविषयीं इतकी क्रुद्ध झालेली पाहून ती मोठ्यानें रडूं लागली.

तिचें रडणें सुकोशलराजाच्या कानीं पडलें. तो तेथें धांवत आला. तुला कोणी दुखविलें तें सांग मी त्या व्यक्तीला कडक शासन करीन. दायीनें सांगितलें ' राजन्, तूं जन्मून पंधरा दिवसच झाले होते तेव्हां तुझ्या पित्यानें— कीर्तिधरराजानें तुला राज्य दिलें व तो जैनमुनि होऊन अनेक स्थानीं विहार करूं लागला. आज तो येथें आहारासाठीं राजवाड्यांत प्रवेश करीत असतां राणीनें रोषानें त्याला द्वारपालांच्याद्वारें हाकालून दिलें व वाड्याचे दरवाजे बन्द केले. हें दृश्य पाहून माझ्या मनाला फार वाईट वाटलें, तुझ्या वडिलांचें माझ्यावर फार उपकार झाले आहेत. माझ्या रडण्याचें हें कारण आहे.

हें ऐकून राजा सुकोशलला फार वाईट वाटलें व बापाचें दर्शन घेण्यासाठीं तो राजवाड्यांतून वेगानें बाहेर पडला. वाटेंत मुनिराज कोणत्या मार्गानें गेले हें लोकांना विचारीत तो मुनिवर्यांच्या स्थानीं जाऊन पोहोंचला. मुनींना हाकालून दिल्यामुळें त्याला फार वाईट वाटत होतें. त्यानें तीन प्रदक्षिणा देऊन मुनींना साष्टांग नमस्कार केला व मान खालीं घालून ' मला प्रभो दीक्षा द्या ' असें म्हणू लागला.

इतक्यांत छत्र चामर धारण करणारे नोकर, प्रधानादिक अधिकारी वर्ग व अन्तःपुरांतील राजस्त्रिया त्याठिकाणीं धांवत आल्या. सुकोशल राजाची मुख्यराणी गर्भवती होती. तिला पाहून राजानें म्हटलें कीं हिच्या उदरांतील गर्भ मुलाचा असेल तर मी त्या गर्भस्थ बालकाला राज्य दिलें आहे. असें म्हणून राजानें कीर्तिधर-मुनीश्वरांच्या आज्ञेनें दीक्षा घेतली. सर्व परिग्रहांचा त्याग केला— केशलोच केला. महाव्रतादिक मुनिमूलगुण धारण केले. तत्काल तेथून ते पिता-पुत्र विहार करण्यासाठीं अन्यत्र गेले.

इकडे सुकोशलाची माता राणी सहदेवी पति व पुत्राच्या वियोग दुःखानें आर्त-ध्यानी होऊन मेली व एका घोर जंगलांत ती वाघीण झाली. ते पिता-पुत्र विहार करीत अनेक तीर्थस्थानांचें दर्शन घेत एका जंगलामध्यें आले. चातुर्मासाला सुरवात झाल्यामुळें त्यांनीं त्या जंगलांतच राहून चार महिने व्यतीत करण्याचें ठरविलें. तेथें कायोत्सर्गानें उभे किंवा बसून धर्मध्यानांत चातुर्मास संपविला. नंतर ते आहारासाठीं उभयमुनि नगराकडे जाऊं लागले. सहदेवीराणी जी वाघीण झाली होती तिनें सुकोशलमुनींना पाहिलें. तीव्र क्रोधानें ती त्यांच्या अंगावर धावली. त्यांना तिनें ओरबडलें. ती आपल्या तीक्ष्ण व बळकट दांतांनीं त्यांचे अवयव फोडूं लागली. सर्वांगांतून रक्तांच्या धारा वाहूं लागल्या. मुनिराज सुकोशलांनीं हा दुःसह उपसर्ग शांतपणानें सहन केला. व ते सर्व-कर्मांच्या नाशानें केवलज्ञानी व तत्काल मुक्त झाले. देवांचीं आसनें कंपित होऊन त्यांनीं त्यांच्या देहाची पुष्पवृष्टि करून पूजा केली.

श्रीकीर्तिधरमुनींनाही शुक्लध्यानानें केवलज्ञान झालें. त्यांनीं वाघिणीला उपदेश केला. तिनें आहार-पाण्याचा पूर्ण त्याग करून संन्यासमरणानें प्राण त्याग केला व ती स्वर्गाला गेली.

इकडे सुकोशलाच्या स्त्रीला— विचित्रमालेला मुलगा झाला. त्यानें हिरण्यसुन्दर असें नांव ठेविलें. कालान्तरानें तरुण झाल्यावर त्याचा विवाह हरिराजाच्या कन्ये-बरोबर— अमृतवतीबरोबर झाला. त्यानें पुष्कळ वर्षे सुखोपभोग घेतला. एके दिवशीं डोक्यांत एक पांढरा केस दिसला. तो पाहून हा यमदूत मला बोलावण्यास जणु आला आहे असें त्याला वाटलें. तो विरक्त झाला. त्यानें नघुषपुत्राला राज्य दिलें व विमलघोष मुनीजवळ दीक्षा घेऊन तप केलें व तो समाधिमरणानें मरून स्वर्गांत देव झाला.

नघुषराजाच्या पत्नीचें नांव सिंहिका होतें. ती पतिप्रमाणेंच शूर असल्यामुळें तिच्यावर राज्य सोपवून नघुष उत्तरदिशांच्या राजांना जिंकण्यासाठीं निघून गेला. दक्षिणेच्या राजांना राजा नगरींत नाहीं असें समजलें तेव्हां ते त्या नगरीवर चालून आले. राणी शौर्यानें लढली. त्यांना तिनें पिटाळून लाविलें. व नगरीचें रक्षण करण्यासाठीं एका आप्त असलेल्या शूर राजाची नेमणूक तिनें केली व स्वतः दक्षिणेच्या राजांना जिंकण्यासाठीं सैन्य घेऊन निघाली. कांहीं दिवसांनीं जिंकून ती परत आली. राजाही उत्तरदिशा जिंकून आला. त्याला ही वार्ता समजल्यामुळें तिच्या शीलाविषयीं त्याचें मन साशंक झालें. त्यानें तिचें वैभव व प्रधानराणीपद हिरावून घेतलें. त्यामुळें ती दुःखी झाली पण तिचें राजावरील प्रेम तिळमात्रही कमी झालें नाहीं.

एके वेळीं राजा दाहज्वरानें आजारी पडला. वैद्यांचीं औषधें विफल झालीं. कांहींही गुण आला नाहीं. राणीला फार काळजी उत्पन्न झाली. ज्यानें आपला कलंक नष्ट होईल व राजाचा दाहज्वर नाहींसा होईल असा उपाय करण्याचा विचार तिनें केला.

तिनें सर्व राजे, प्रधानादिक अधिकारीवर्ग, व प्रजांचे प्रधाननेते या सर्वांना राजसभेंत बोलावलें. ते सर्व आल्यावर तिनें सर्वांना नमस्कार करून म्हटलें "जनहो, राजा नघुषावांचून मी स्वप्नांतही इतराला पति मानिलें नाहीं. राजा नघुष हाच माझा पति व स्वामी आहे. पुरोहितानें दिलेलें हें पाणी माझ्या पतीला आरोग्य देवो व माझा कलंकही तें नाहींसें करो." असें म्हणून तें पाणी जेव्हां राजाच्या अंगावर तिनें शिंपडलें तेव्हां राजाचा दाहज्वर क्षणांत नाहींसा झाला. राजाला थडथडून थंडी वाजून आली. वीणेप्रमाणें दांत वाजू लागले. जणु बर्फांत आपण बुडालों आहों असें त्यास वाटलें.

हें दृश्य पाहिल्याबरोबर राजाच्या मनांतील संशय नाहींसा झाला. सर्वांनीं राणी सिंहिका या निष्कलंक शीलवती आहेत असें म्हणून तिचा जय जयकार केला. राजानेंही प्रसन्न होऊन तिला पुनः प्रधानराणीचें पद व वैभव दिलें. तो तिच्यावर फार प्रेम करू लागला. देवांनींही अदृश्यरूपानें राणीवर पुष्पवृष्टि करून तिच्या शीलाचें अभिनन्दन केलें. बरोबरच आहे कीं, शुभकर्माचा उदय झाला म्हणजे जीवांना इष्ट-संयोग होतो व अनिष्ट दुःख नाहींसें होतें.

सिंहिकेला नघुषापासून ' सौदास ' नांवाचा पुत्र झाला. हा आई-बापाप्रमाणें मोठा पराक्रमी होता. तरुण झाल्यावर राजानें याला राज्य दिलें व स्वतः दीक्षा घेऊन समाधिमरणानें स्वर्ग मिळविला.

सौदासाला चातुर्मासाच्या समाप्तीच्या अष्टाह्निकांत मांस खाण्याची अत्यंत प्रबल इच्छा उत्पन्न झाली. स्वैपाक्याला त्यानें मांस शिजविण्यास सांगितलें. पण तो म्हणाला राजन्, या आठ दिवसांत सर्व लोक जिनपूजनादि शुभकार्यें करितात. कोणीही हिंसा करीत नाहींत. मी मांस कोठून आणू ?

" मला मांस मिळालें नाहीं तर मी जिवन्त राहणार नाहीं. कोठूनही मांस आण अशी माझी तुला आज्ञा आहे. "

राजाची प्राणान्तिक दशा पाहून स्वैपाकी स्मशानांत गेला. तेथें नुकतेंच पुरलेल्या बालक-प्रेताला उकरून काढून व वस्त्रानें झाकून तो वाड्यांत घेऊन आला. त्याचें मांस काढून व स्वादिष्ट-मसाला घालून शिजवून तें सौदास राजाला वाढलें. तें खावून त्याला फार आनंद वाटला व असलें मधुर मांस तूं कोठून आणिलेस मला सांग असें त्यानें म्हटलें. मला अभय द्या म्हणजे मी सांगतों असें म्हणून अभय मिळाल्यानंतर खरा प्रकार त्यानें सांगितला. तो ऐकून प्रत्येक दिवशीं मला मनुष्य-मांसच तूं दिलें पाहिजेस नाहींतर मी तुला मारून टाकीन असें राजा म्हणाला. भीतीनें स्वैपाक्यानें पुढील उपाय केला. तो दररोज संध्याकाळीं झोळीमध्यें लाडू घालून गावांत मुलांना वाटीत फिरत असे. व शेवटीं एकाद्या मुलाला मारून व झोळींत घालून वेगानें राजवाड्यांत जात असे. त्याचें मांस शिजवून राजाला देत असे. गावांत मुलें कमी होऊं लागलीं. सर्व लोक अगदीं खवळले. त्यांनीं शोध केला. स्वैपाकी मुलांना मारतो व राजा त्यांचें मांस खातो असें आढळून आलें. लोकांनीं त्या दोघांनाही निर्वासित केलें व राजाच्या मुलाला— सिंहरथाला त्याचें राज्य दिलें.

इकडे राजानें स्वैपाक्याला मारून त्याचें मांस खाल्लें. व तो अनेक देशांत व नगरें व वनांत भटकूं लागला. स्मशानांतील प्रेतें उकरून तो खात असे. अतिशय मांसव्यसनी तो बनला. सिंहाप्रमाणें तो प्राण्यावर तुटून पडून त्याचें मांस खात असे म्हणून ' सिंहसौदास ' या नांवानें तो प्रसिद्ध झाला.

हा राजा फिरत फिरत दक्षिणेकडे आला. तेथें एका जैनमुनीच्या उपदेशाचा परिणाम होऊन अहिंसा, सत्य, अचौर्य, मैथुनसेवन व परिग्रहमनाण अशीं श्रावकव्रतें घेऊन तो अणुव्रती श्रावक झाला.

महापुरी नगरीचा निपुत्रिक राजा मरण पावला. तेव्हां प्रधानांनीं हत्ती सजवून तो गावाच्या बाहेर सोडला. गांवाकडे निघालेल्या सौदासाला हत्तीनें आपल्या खांद्यावर घेतलें. प्रधानांनीं व प्रजाजनांनीं त्याला राज्याभिषेक करुन राजा केलें. सौदासानें शत्रूंना जिंकून प्रजांचें पुत्रवत् पालन केलें.

एकेवेळीं सौदासानें आपल्या पुत्राकडे दूत पाठवून मला नमस्कार करण्यासाठीं ये असें कळविलें पण तो आपल्या बापाकडे गेला नाहीं. "पण तुम्ही जगांत निंदनीय झालेले आहांत. मी नमस्कार करणार नाहीं" असें कळविलें. तेव्हां सौदास लढण्याकरितां सैन्यासह आला. दोघांचें युद्ध झालें. पुत्राला त्यानें जिंकिलें. त्याचा गर्व नाहींसा केला.

पण त्याच्या अन्तःकरणांत दया उत्पन्न झाली व त्यानें मुलाला महापुरीचेंही राज्य दिलें. व जिनदीक्षा घेऊन तप करूं लागला.

या सिंहरथानंतर इक्ष्वाकुवंशांत अनेक राजे होऊन गेले. कित्येकांनीं कर्मक्षय करून मुक्ति मिळविली. कित्येक स्वर्गाला गेले. याच वंशांत रघु राजा झाला. त्याच्या पुत्राचें नांव 'अनरण्य' होतें. त्यानें अरण्यांतही इन्द्रनगराप्रमाणें मोठीं शहरें वसविलीं म्हणून त्याचें नांव अन्वर्थक होतें.

अनरण्याला अनन्तरथ व दशरथ असे दोन पुत्र होतें. अनरण्याच्या मित्रराजाचें नांव सहस्रांशु— हा माहिष्मती-नगरीचा राजा. याचा रावणानें पराभव केला तेव्हां तो विरक्त होऊन मुनि झाला. ही वार्ता अनरण्याला समजली. त्यानें आपल्या वडील पुत्राला राज्य द्यावयाचें ठरविलें पण त्यानें राज्याचा अंगीकार केला नाहीं. म्हणून त्यानें एक महिन्याचा बालक असलेल्या दशरथ पुत्राला राज्य दिलें व अनन्तरथासह दीक्षा घेतली. तपश्चरण करून अनरण्य मुनि संसारमुक्त झाले. अनन्तरथही केवलज्ञानी होऊन विहार करू लागले व त्यांचें अनन्तवीर्य हें नांव प्रसिद्ध झालें.

दशरथ कालक्रमानें तरुण झाला. तो शस्त्रास्त्रामध्यें निपुण व पराक्रमी होता. त्यानें शत्रुगणाला वश केलें. त्याचा अपराजिता, सुमित्रा व सुप्रभा या तीन राजकन्या-बरोबर विवाह झाला. राजा दशरथ सम्यग्दृष्टि होता. त्यानें भरतादिक राजांनीं बांधविलेल्या मंदिरांचा जीर्णोद्धार केला. व स्वतःही अनेक जिनमंदिरें बांधविलीं. तो रत्नांनीं जिनपूजा करीत असे.

ज्यांनीं पूर्वभवीं जिनधर्माचरणांत आपलें आयुष्य वेचलेलें असतें त्यांना इहलोकीं धनधान्य वैभव प्राप्त होतें. यास्तव भव्यांनीं धर्माचरणांत तत्पर असावें.

# बावीसावें पर्व.

( राणी सहदेवीनें राजवाड्यांत कीर्तिधर मुनींच्या प्रवेशाला बंदी केली.)

साही क्षुधादि-परिषह उपवासादिक करी तपें घोर ।
निजगुरुसह बहुदेशीं ग्रामीं नगरीं करून सुविहार ॥ १ ॥
इकडे कोशल-नगरीमध्यें बालक सुकोशलाख्य नृप ।
वाढून शुक्लचन्द्रासम झाला तरुण सकलगुण-कूप ॥ २ ॥
श्रीसहदेवी राणी यति कीर्तिधरावरीं महारुष्ट ।
झाली बाला त्यागुनि गेला चाण्डाल हा महादुष्ट ॥ ३ ॥
एके दिनीं विनीतानगरी मुनिराज कीर्तिधर आले ।
सुतपें शोषित-देहीं निजस्वरूपांत पूर्ण जे रमले ॥ ४ ॥
भोजनसमयीं आले राजगृहाचे समीप सहदेवी ।
पाहून त्यास झाली कुपित-व्याघ्रीसमान जणु भावी[1] ॥ ५ ॥
ती द्वाररक्षकांना बोले राणी तदा कडाडून ।
हा दुष्ट नागवा मुनि शिरेल घ्या द्वार शीघ्र लावून ॥ ६ ॥
हा गृहभेदी[2] आहे याला तत्काल द्या हकालून ।
जोंवरि कोशल सुत मम पाहि न ज्याचें असें दयार्द्रमन ॥ ७ ॥
जे नग्न अन्य मानव जरि करितिल या गृहीं प्रवेशास ।
शासन करीन तुम्हां नसे ममाज्ञेंत संशयावास ॥ ८ ॥
राज्यश्रीचा करिती हे मानव नग्न सर्वदा द्वेष ।
उद्योग-परनृपांना[3] विरक्त करिति न वसे दयालेश ॥ ९ ॥
यापरि राज्ञीवचना ऐकुनिया द्वाररक्षकें क्रूरें ।
नगरांतुनि घालविला[4] मुनिवर तो दूर शीघ्र अविचारें ॥ १० ॥
शैवादिक धर्माचे होते जे साधु तेहि राणीनें ।
नगरांतुनि निर्वासित केले त्यावरिल तीव्र कोपानें ॥ ११ ॥
पुत्रश्रवणीं न पडो त्रिकालिंही शब्द धर्म नांवाचा ।
केली अशी व्यवस्था पाहा जनहो प्रभाव मोहाचा ॥ १२ ॥

---

१ भविष्यकाली वाघीण होणारी. २ घरांत फूट उत्पन्न करणारा. ३ वाणिज्यादि, उद्योगांत तत्पर राहणारे. ४ हाकालून दिले.

निजपति मुनिवर झाला तेणें मज पतिविहीनता आली ।
तद्दर्शनें सुपुत्र हि होतां येईल दुःखयुग[1] भालीं ॥ १३ ॥
पति-पूज्य हा स्त्रियेला पूज्यतर व्रतधरांग्रणी[2] झाला ।
तरि ही हा नगरांतुनि निरसाया योग्य वाटलें मजला ॥ १४ ॥
ना तरि सुत त्या वघतां निजराज्य त्याग करुनि जाईल ।
पतिपुत्रोभय दुःखें देहीं मत्प्राण नैव राहील ॥ १५ ॥
स्त्रीचें वा पुरुषाचें जेव्हां मोहाभिभूत[3] मन होतें ।
तेव्हां सुनिश्चयानें तेथें अविवेकिताचि अवतरते ॥ १६ ॥

( सुकोशलाची दायी मुनींना हाकलून दिल्यामुळें रडूं लागली. )

दायी सुकोशलाची होती जी स्वामिभक्त हें न तिला ।
रुचलें मन वहु दुःखी झालें करि मुक्तकंण्ठ[4] रुदनाला ॥ १७ ॥
तद्रुदनध्वनि कानीं पडतां आला कुमार त्या स्थानीं ।
कां रुदन करिशि माते ! केला अपराध कां तुझा कोणी ॥ १८ ॥
नवमास-मात्र धारण केलें उदरीं मला स्वमातेनें ।
परि पुष्ट देह माझा झाला माते ! त्वदीय-दुग्धानें ॥ १९ ॥
जननीहून तुला मी मानितसे श्रेष्ठ वोल अपमान ।
केला कोणी तव गे कोणी ओढून घेतलें मरण ॥ २० ॥
माझ्या जननीनें ही असेल अपमान गे जरी केला ।
करिन तिची हि अवज्ञा[5] नाहीं मी वदलणार या वोला ॥ २१ ॥

( दायी मुनींना हाकून देण्याचें कारण सांगते. )

ऐकुनि वचन नृपाचें दायीनें वृत्त सर्व सांगितलें ।
निजनयनोदक हस्तें पुसून रडणेंहि पूर्ण थाम्बविलें ॥ २२ ॥
भवभयपीडित-जनकें[6] तुजला वालकपणींच राज्य दिलें ।
गेला तपोवना तो हृदयीं वैराग्य ज्याचिया रुजलें ॥ २३ ॥
भिक्षार्थ आज येउनि करीत असतां प्रवेश राजगृहीं ।
तव मात्राज्ञें रक्षक-किङ्करनिकरें[7] निवारिलें पाही ॥ २४ ॥

---

१ पतिवियोग-दुःख व पुत्रवियोग-दुःख. २ महाव्रतें धारण करणाऱ्या मुनिमध्यें श्रेष्ठ. ३ मोहानें पराजित. ४ गळा मोकळा करून रडूं लागली. ५ अपमान. ६ संसारभयापासून दुःखित. ७ द्वाररक्षण करणाऱ्या नोकरांच्या समूहाकडून.

तो मी प्रसङ्ग पाहुनि झाले कष्टी अतीव हृदयांत ।
शोकावेगें रडणें थांबवु शकलें न मी अशी मात ॥ २५ ॥
तुजकडुनि होत असतां गौरव माझा करील अपमान ।
वद कोण दिवस असतां अंधाराचें घडेल आगमन ॥ २६ ॥
या परि मम रुदनाचें कारण राजन् तुला असे कथिलें ।
तव जनकादर माझ्या विषयीं रुदना निमित्त होय भलें ॥ २७ ॥
घडला वियोग असतां तव पितयाचा तथापि मी जगलें ।
जणु देह लोहमय मम आहे म्हणुनीच काय तो न गळे ॥ २८ ॥
निर्ग्रन्थमुनिवराचें दर्शन होतां विरक्ति तव हृदयां ।
होइल या भीतीनें तव माता आचरी अशा अनयां ॥ २९ ॥
सर्व तुझे पूर्वज नृप होउनि गेले जिनेन्द्र-धर्मरत ।
देऊन राज्य पुत्रा जाउनि वनिं साधिति स्वकीय हित ॥ ३० ॥
बाहेर न केव्हांही जाउ दिलें राजमन्दिरांतून ।
तुजला याचें कारण सचिवापासून घेइ जाणून ॥ ३१ ॥
अश्वभ्रमणादिक जें नृपशिक्षण तेंहि सर्व येथेंच ।
बाह्यसमीर-स्पर्श हि नच तुजला घडविला असे साच ॥ ३२ ॥

( राजा धांवत मुनिकडे जातो. )

या परि दायीपासून घेई वृत्तान्त सर्व जाणून ।
करुनि त्वरा निघाला नृपाल बाहेर मन्दिरांतून ॥ ३३ ॥
जीं छत्रचामरादिक नृपचिन्हें भूप देइ सोडून ।
पादत्राणावांचुनि पडला बाहेर तो त्वरा करुन ॥ ३४ ॥
अतिशय उत्कण्ठेनें पुसे सुकोशल जनास येथून ।
गेले कवण दिशेला मुनिवर सांगा मला कृपा करून ॥ ३५ ॥
धावत छत्रधरादिक तत्पृष्ठीं भीत भृत्य होऊन ।
गेले वेगें धाले नृपास मुनिपदसमीप पाहून ॥ ३६ ॥
प्रासुक-शिलातलावर बसले होते मुनि प्रसन्नपणें ।
कर जोडून सुकोशल नृपाल करि तीन त्या परिक्रमणें ॥ ३७ ॥

---

१ अन्यायास. २ बाहेरील वाऱ्याचा स्पर्शही. ३ पायांत जोडे न घालतां. ४ चाकर. ५ आनंदले. ६ प्रदक्षिणा.

होऊन स्नेहाकुल भूमीवरि मस्तकास लववून ।
मुनिपदयुग्मा भूपति अष्टाङ्गांनीं करी तदा नमन ॥ ३८ ॥
करयुग जोडुन विनयें भूप मुनीश्वर-पदापुढें राही ।
निःसारिलें घरांतुनि सलज्ज होऊन नम्र जणु पाही ॥ ३९ ॥

( गर्भांतील बालकाला राज्य देऊन राजा दीक्षा घेतो. )

अग्निज्वाला-कुलगृहिं[1] नर सुप्त जसा प्रचण्ड मेघरवें[2] ।
जागृत केला जावा आपण मजला तथैव शुभ दैवें ॥ ४० ॥
जें जन्माद्यग्नींनीं भवगृह[3] चोहोंकडून घेरियलें ।
मी गाढ-मोहनिद्रित असतां मुनिराज आज बोधियलें ॥ ४१ ॥
आतां कृपा करावी दीक्षा देऊन मजसि तारावें ।
संसार-सागरामधिं बुडत असे संयमाख्य-पट्टनावें[4] ॥ ४२ ॥
या परि बोलत असतां भूप सुकोशल विनम्र होऊन ।
आला तेथें सगळा व्याकुल होऊन शीघ्र सचिवगण ॥ ४३ ॥
आली सुकोशलाची राणी वाही मनीं विषादा जी ।
होती गर्भवती ती प्रमुख्य अन्तःपुर-स्त्रियामाजीं ॥ ४४ ॥
पति दीक्षोन्मुख पाहुनि राज्ञींचा वृन्द खिन्नमुख झाला ।
कण्ठांतुनि रुदन-ध्वनि अलि-गुंजारव-समान उद्भवला ॥ ४५ ॥
देवी-विचित्रमाला-गर्भी सुत जर असेल मी त्याला ।
निःस्पृह होऊन दिलें स्वराज्य ऐसें नृपाल तैं वदला ॥ ४६ ॥
आशा-पाशा तोडुनि तृणसम राज्यास शीघ्र सोडून ।
बाह्याभ्यन्तर-संगा त्यागुनि कचलोच[5] मस्तकीं करुन ॥ ४७ ॥
घेउनि महाव्रतादिक मूलगुणा निजगुरूस वन्दून ।
शान्त सुकोशल करि तो जनकासह विहृति[6] साधु होऊन ॥ ४८ ॥
इकडे पुत्रवियोगज आर्तध्यानांत[7] मरण पाऊन ।
माता सुकोशलाची झाली व्याघ्री मनांत निष्करुण ॥ ४९ ॥

---

१ व्याप्त. २ ढगांच्या शब्दानीं. ३ संसाररूपी घर. ४ प्राणिसंयम व इंद्रिय-संयमानें जीवांचें व आपलें संरक्षण करणें हीच मजबूत निश्छिद्र नांव. ५ केश उपडणें दाढी मिशा व मस्तकाचे केश हातानें उपडणें. ६ विहार. ७ पुत्रविरहापासून उत्पन्न झालेल्या दुःखानें एकाग्रचिन्तनांत.

भक्षी हरिणादिक पशु पापाचरणांत हर्ष मानून ।
स्वच्छन्दानें राही नसे विवेका तिच्या मनीं स्थान ॥ ५० ॥
हें साधुयुग्म राही सूर्यास्तासमयिं घोरें-गहनांत ।
स्वात्मस्वरूपचिन्तनिं रत निजदेहावरी सदा विरत ॥ ५१ ॥
( एका घोर वनांत येऊन हे पितापुत्र-मुनि चातुर्मास-व्रत करितात. )
सोशी क्षुधादि-बाधा शीतोष्णादिक-परीषहा घोर ।
निर्दोष मुनिव्रतगण पाळी जो समिति-पंचकीं चतुर ॥ ५२ ॥
यापरि विहरत असतां विरहिजना भयद येइ घनकाल ।
नभ मेघें आच्छादुनि दिग्ललना वदन तो करी काल ॥ ५३ ॥
घनें कृष्ण पर्वतासम पसरुनि नभिं घोरगर्जना करिती ।
तेणें भय वाटुनि जणु रविचन्द्र-ग्रह कुठेंहि नच दिसती ॥ ५४ ॥
सन्तत जलधारांचें वर्षण केलें समस्त जलदांनीं ।
धरणी तृणाङ्कुरांनीं नवशालूनें जशी खुले तरुणी ॥ ५५ ॥
भूवरि सरिता गर्जति आकाशीं मेघ गर्जना करिती ।
शोधिति निदाघकाला कोठें बसलास दडुनि जणु म्हणती ॥ ५६ ॥
सर्वदिशामधिं चमकुनि विजा जणू भूप्रदेश बघतात ।
जलपूर्ण कोणता वा अपूर्ण वा कोणता निहाळीत ॥ ५७ ॥
जीवदया ज्यांच्या मनिं ऐसे निर्ग्रन्थ शान्त मुनि पूत ।
स्थान प्रासुक पाहुनि चातुर्मासव्रतांत होति रत ॥ ५८ ॥
श्रावक घेती नाना नियम नि करितात साधुसेवेस ।
चातुर्मास दिनामधिं धर्माचरणांत मानिती तोष ॥ ५९ ॥
यापरि चातुर्मासीं यथोक्त आचारपालनीं निरत ।
उभय पिता-सुत मुनिवर आत्मध्यानांत लीन होति नित ॥ ६० ॥
संपूर्ण चतुर्मासीं महोपवास-व्रतास आचरिती ।
ते श्रमण दोन तरुतळिं आत्मध्यानांत सतत रति करिती ॥ ६१ ॥
पर्यङ्कासनयोगें केव्हां वीरासनादि-योगांनीं ।
केव्हां कायोत्सर्गें समाप्त केलें धनागमा त्यांनीं ॥ ६२ ॥

१ भयंकर वनांत. २ मेघ. ३ मेघनीं. ४ पृथ्वी. ५ उन्हाळा. ६ जन्तुरहित. ७ कांहीं दिवसांचें व्रत. ८ दोन जैनमुनि पितापुत्र. ९ शरीरावरील ममता त्यागून बसून किंवा उभे राहून तप करणें.

यानन्तर शरदागम प्रातःकालासमान उज्ज्वला ।
सोद्योग लोक झाले आला सूर्यप्रकाश भूमितला ॥ ६३ ॥
नभिं शुभ्र मेघ दिसती वायूनें मन्द कम्प जे धरिती ।
विकसित काशसुमांचे[1] समूह जणु शुभ्र कापसा हसती ॥ ६४ ॥
आकाशांत निशाकर[2] विहार तारागणास घेऊन ।
असतां करीत शोभे सिताब्जवृन्दांत[3] हंससम छान ॥ ६५ ॥
चन्द्रप्रकाश पसरे क्षीरसमुद्रासमान गगनांत ।
चोहिकडे भूवरही प्रसन्नता जेवि सुकविकवनांत ॥ ६६ ॥
निर्मलता ये गगनीं वाटे सूर्यप्रकाश सुखद जना ।
आनन्दाचें भरतें आलें भूमण्डलांत जीवगणां ॥ ६७ ॥
करिती विहार मुनिगण भूवरि जिनतीर्थ-वन्दनेकरितां ।
चातुर्मास असा हा भव्यजनांचा समस्त अघहर्ता ॥ ६८ ॥

( वाघिणीनें सुकोशलमुनींना विदारण करून खाल्लें.
शुक्लध्यानानें केवली होऊन सुकोशल मुनि मुक्त झाले. )

तें कीर्तिधर-सुकोशल-मुनियुग उपवासपारणार्थ निघे ।
होते समीप पुर जें मार्गीं व्याघ्री तयास शीघ्र बघे ॥ ६९ ॥
बघतां उभया आली व्याघ्रीमानें परमकोपनिष्ठुरता[4] ।
दाढा जिच्या भयंकर मुखिं यमवदनासमान भीषणता ॥ ७० ॥
मस्तकिं यमध्वजेसम करून शेपूट येइ धावून ।
उकरी भूमि नखांनीं सुकोशलावरि करी समाक्रमणें[5] ॥ ७१ ॥
त्या समयीं तें मुनियुग देहीं निर्मम बनून निजरूपीं ।
होउनि निर्भय राहे स्थिर तेणें पूर्वकर्म तें कापी ॥ ७२ ॥
व्याघ्री दुष्ट क्रोधी सुकोशलाच्या समस्त अंगास ।
स्वमुखें फाडुनि फोडी दाढांनीं गिळुनि रक्तमांसास ॥ ७३ ॥
दारित-सर्वाङ्गांतुनि वाहे रक्तप्रवाह जोरानें ।
गेरुगिरीसम भासे सुकोशलश्रमण लाल रुधिरानें[6] ॥ ७४ ॥
कर चरण पाठ पोटा कण्ठ नि मस्तक समस्त अंगास ।
फाडुनि खाइ व्याघ्री सर्वावयवा करून ती ग्रास ॥ ७५ ॥

---

१ प्रफुल्ल झालेल्या गवती फुलाप्रमाणें. २ चंद्र. ३ पांढऱ्या कमलसमूहांत. ४ अतिशय रागानें मनांत निर्दयता येणें. ५ हल्ला. ६ रक्तानें.

अत्यन्त प्रेम जिचें होतें तनयावरी अशी माता ।
व्याघ्री होउनि खाते संसाराची असे विचित्रकथा ॥ ७६ ॥
जगिं जन्मान्तरिं बान्धव असती जे जीव तेचि अन्यभवीं ।
होतात शत्रु, अमृतहि विष होतें सत्य सांगतात कवि ॥ ७७ ॥
शुक्लध्यानबलानें सुकोशलश्रमण केवलज्ञानी ।
झाले अघातिनाशें मुक्तिश्रीच्या गळ्यांत कण्ठमणि ॥ ७८ ॥
येउनि सुरासुरासह इन्द्रांनीं दिव्य पुष्पवर्षानीं ।
तत्तनुपूजा केली करुनि स्तुतिगान विपुल-हर्षानीं ॥ ७९ ॥
श्रीकीर्तिधर-यतीन्द्रें केला व्याघ्रीस मधुर उपदेश ।
संन्यास-मरण साधुनि भोगी स्वर्गांत विपुल-सुख-कोष ॥ ८० ॥
श्रीकीर्तिधर मुनीन्द्रें ध्यानाग्नीनें कुकर्मकाष्ठांस ।
जाळुनि केवलबोधें हरिले जगिं भव्य-जीव-कष्टास ॥ ८१ ॥
तत्केवल बोधाचा महिमा पूजुनि शतेन्द्र सविशेष ।
करुनि गुणस्तुति मिळविति भक्तीनें विपुल-पुण्यधनकोष ॥ ८२ ॥
माहात्म्य हें सुकोशल-मुनिवर्याचें पढेल जिनदास ।
उपसर्गमुक्त होइल होउनि दीर्घायु विपुलसुख-वास ॥ ८३ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे सुकोशलमाहात्म्यवर्णनं नाम द्वाविंशतितमं पर्व ॥ २२ ॥

---

१ नाम, वेदनीय, आयु व गोत्र यांना अघातिकर्में म्हणतात. २ सुकोशल-मुनीच्या शरीराची पूजा. ३ कुकर्मरूपी लांकडांना.

# तेवीसावें पर्व.

देवी विचित्रमाला प्रसवे पुत्रास जो अरित्रास ।
देई शरीर ज्याचें होतें सुन्दर सुलक्षणावास ॥ १ ॥
गर्भी असतां माता हिरण्यसुन्दर[1] जनास बहु भासे ।
यास्तव 'हिरण्यसुन्दर' नाम तयाचें यथार्थसें विलसे ॥ २ ॥
आली तयास यौवनदशा तदा हरिनृपाल-तनयेस ।
वरिलें तयें जियेचें 'अमृतवती' नाम जिंकि अमृतास ॥ ३ ॥
भोगी तिच्यासवें हा महामना अमृततुल्य-भोगास ।
पुष्कळ वर्षे गेलीं कदापि न प्राप्त हो वियोगास ॥ ४ ॥

( हिरण्यगर्भानें नघुपाला राज्य देऊन दीक्षा घेतली
व तप करुन तो स्वर्गात देव झाला. )

अलिकुलकाल[2]-सुकेशीं निजशिरिं तो पाहि शुभ्र केशास ।
झाला विरक्त हृदयीं प्रगटे वदनांत तेधवा हास ॥ ५ ॥
आला यमदूत असे वाटे बोलावण्यास आज मला ।
परि खिन्न न मनिं झाला वदला शाश्वत नसे जगीं कमला[3] ॥ ६ ॥
जरि देह आज दिसतो जननयना शक्ति-कान्ति-संपन्न ।
माझा तरी जराही ग्रासुनिया हा ! करील कीं खिन्न ॥ ७ ॥
चन्दनतरुसम सुन्दर उपजवि हा देह मन्मना मोह ।
परि जाळील जरानल अंगारांचें[4] करील जणु गेह ॥ ८ ॥
पाहे पिशाच जैसा प्रवेश करण्यास योग्य समयास ।
बघतील वाट रोग प्रवेश देतील करुनि आयास ॥ ९ ॥
बसला टपून आहे जो मृत्युव्याघ्र आक्रमायास[5] ।
अवसर मिळतां कैसें चुकविल आत्मन् ! स्वकीय समयास ॥ १० ॥
जे कर्मभूमिलाभें निजनर-जन्मास सफल करितात ।
बसुनि व्रत-नावेमधिं ते भवसागर तरून जातात ॥ ११ ॥

---

१ सोन्याप्रमाणें सुन्दर. २ भुंग्यांच्या समूहाप्रमाणें काळे. ३ लक्ष्मी. ४ कोळशाचे. ५ पकडण्यास.

या परि चिन्तुनि चित्तीं अमृतवतीच्या सुतास नघुषास ।
देउनि सविभव-राज्या वदला साधूस विमलघोषास ॥ १२ ॥
योगिन् द्या मज दीक्षा जन्मजरामृत्युनाशदक्षा[1] जी ।
त्वत्पद सन्निध घेउनि मिळविन आत्मिक अनन्त गुणराजी[2] ॥ १३ ॥
घेउनि दीक्षा केलें हिरण्यगर्भे सुघोर सुतपास ।
शुभमरणें अमरीजन[3] त्याच्या घाली गळयांत करपाश ॥ १४ ॥
जो गर्भी असतां ही अशुभाची घोषणा न जगिं झाली ।
म्हणुनि 'नघोष' जयाला अन्वर्थक नाम देति विबुधाली[4] ॥ १५ ॥

( नघुष राजा उत्तर-दिग्विजयास्तव गेला व सिंहिकेला
त्यानें आपला राज्यभार दिला. )

उत्तर-दिग्विजयास्तव गेला निजराज्यभार देऊन ।
भार्येस सिंहिकेला जी होती विक्रमांत अन्यून ॥ १६ ॥
परि दाक्षिणात्य भूपति जाणुनि वृत्तान्त हा पुरी घ्याया ।
आले बहु सैन्यासह लढण्यास्तव सिद्ध जाहली आर्या ॥ १७ ॥
जिंकुनि त्यांना समरीं लावी सकलां पिटाळुनी दूर ।
निज-नगर-रक्षणास्तव योजी जी आप्त भूप बहु शूर ॥ १८ ॥
( राजाही-उत्तर-दिग्विजय करून आला पण राणीच्या शीलाविषयीं
संशयी होऊन त्यानें तिचें वैभव व मुख्यराणीपद काढून घेतलें.)

घेउनि निज बहु सैन्या गेली दक्षिणदिशेस जिंकाया ।
विजयी होउनि आली झाले सन्नद्ध[5] भाट गुण गाया ॥ १९ ॥
नघुष नृपाल हि आला करून वश उत्तरीय[6]-भूपगणा ।
परि निजभार्या-विक्रम ऐकुनि ठेवी मनांत रुष्टपणा ॥ २० ॥
जी एवढा पराक्रम गाजविते ती अखण्डशीला न ।
अविवेकें भूपाचें कोपें मन नयन जाहलें अरुण[7] ॥ २१ ॥
आहे कुलीन जी स्त्री ती या परि विक्रमा न गाजविते ।
बुद्धि अशी तिज नुपजे शोभे लज्जा-मर्यादि[8]-सुगुण-शतें ॥ २२ ॥

---

१ चतुर. २ गुणपङ्क्ति. ३ देवाङ्गनासमूह. ४ विद्वानांचा समूह.
५ तयार. ६ उत्तर दिशेचे. ७ लाल. ८ नीति वगैरे.

वैभव धन देवीपद सर्व तिचें हरुनि घेतलें भूपें ।
अत्यन्त दीन झाली आली ऐशी दशा पुरापापें ॥ २३ ॥
हें दुःख सर्व सोशी साध्वी पापोदयास समजून ।
परि निजपतिचें ठायीं प्रेम तिचें किमपि जाहले नोन ॥ २४ ॥
कोणे एके समयीं दाहज्वर रोग होय भूपास ।
वैद्यौषधें जहालीं विफल नि पावेचि रोग कोपास ॥ २५ ॥
जाणुनि असाध्य रोगा राणी शोकाकुला तदा झाली ।
केला सदुपाय तिनें निजशुद्धीचाहि जो वने वाली ॥ २६ ॥

(राणीनें राजाचा दाहज्वर त्याच्या अंगावर पाणी शिंपडून नाहींसा केला व आपले अखण्डशीलहि सिद्ध केलें.)

नृपवर्ग राजपुरुष प्रजाजनीं मुख्य लोक जे असती ।
बोलावून तियेनें उपाय केला नमून त्यापुढती ॥ २७ ॥
साध्वी पुरोहितानें उदक दिलें तें करांत घेऊन ।
श्रीसिंहिका समस्ता वदली सादर कराब्ज जोडून ॥ २८ ॥
ऐका समस्त जनहो नघुप-नृपाविण मनांत अन्या मी ।
स्वप्नींहि मानिलें नच पति केवल 'नघुप' हाचि मत्स्वामी ॥ २९ ॥
या करगृहीत उदकें माझा ज्वररहित आज पति होवो ।
आरोग्य त्यास लाभो कलङ्क विलयास शीघ्र मम जावो ॥ ३० ॥
नघुषनृपाङ्गावरती ऐसें बोलून सिंचिलें पाणी ।
ज्वररहित भूप झाला विगतकलङ्का वने तदा राणी ॥ ३१ ॥
हिममग्न-मानवासम थंडीनें भूप थरथरा कांपे ।
वीणेसम दन्तध्वनि नृपवदनीं हो नि रोगही संपे ॥ ३२ ॥
आरोग्य त्यास लाभे झाला राणीवर प्रसन्न नृप ।
जयघोष करुनि जनता वदली राणी असेचि निष्पाप ॥ ३३ ॥
पुनरपि नघुष-नृपानें प्रधानराज्ञीपदास देऊन ।
गौरविलें सिंहीला प्रीति तिच्यावरि करून अन्यून ॥ ३४ ॥

---

१ मुख्य राणीचें पद. २ पूर्वजन्माच्या पापानें. ३ कमी झालें नाहीं. ४ संरक्षक. ५ हातरूपी कमळ. ६ हातांत घेतलेल्या पाण्यानें. ७ बर्फात बुडालेला. ८ मुख्य राणीचें पद.

नव्हतीं दिसत शरीरें ज्यांचीं ऐसे नभांत देवगण ।
सुमें[1] वर्षुनि साध्वीवरि वदले जयशब्द मुदित होऊन ॥ ३५ ॥
प्राणप्रिय ती झाली भोगी राजा तिच्यासवें भोग ।
शुभकर्मोदय होतां प्राण्या होतात इष्ट-संयोग ॥ ३६ ॥
झाला भूपापासुनि तिजला सौदास नाम सत्पुत्र ।
जो जनकमार्गगामी[2] होता सज्जनगणास सन्मित्र ॥ ३७ ॥
जिंकुनि अरीस केलें सुदास यानें म्हणून सौदास ।
झाला प्रसिद्ध नृप हा विभवें जिंकून तेवि धनदास[3] ॥ ३८ ॥
नघुषानें सौदासा राज्याचा भार सर्व देऊन ।
केला प्रवेश मुनिपथिं मिळवी स्वर्गीं महर्द्धिक-स्थान ॥ ३९ ॥

( मांसाभिलाषी सौदासाला स्वैपाक्यानें मनुष्य-मांस खावयास दिलें. )

तद्गोत्रीं आष्टाह्निक चातुर्मासांत मांस कोणीही ।
खात नसे मांसानें वाटविलें निजशरीर नर तो ही ॥ ४० ॥
सकल प्रजाहि पाळी नियमा पूर्वोक्त नैव अवमानी ।
परि सौदास-मनामधिं झाला मांसाभिलाष त्याच दिनीं ॥ ४१ ॥
प्रागशुभकर्म उदया येतां रोकूं शकेल त्या कोण ।
उदयास सूर्य असतां येत तया आडवू शके न जन ॥ ४२ ॥
मज मांसभक्षणाची इच्छा अनिवार जाहली सूदा[4] ।
शिजवून मांस खाया देई मत्प्राण वाचवी विबुधा ॥ ४३ ॥
जिनपूजनादि कार्यें या आठ दिनांत करिती सकल जन ।
वध जीवाचा करिति न आणू मी मांस सांग कोठून ॥ ४४ ॥
न मिळे मांस मला जर माझे जातील आज रे प्राण ।
आज्ञा माझी तुजला कोठूनहि मांस आज तूं आण ॥ ४५ ॥
पाहुनि दशा नृपाची सैपाकी पोचला श्मशानांत ।
उकरी बालप्रेता झांकुनि आणि नृपाल-सदनांत ॥ ४६ ॥
काढून मांस त्याचें मधुर मसाला तयांत घालून ।
शिजवून वाढिलें तें खातां झालें प्रसन्न नृपति-मन ॥ ४७ ॥

---

१ फुलें. २ बापाच्या-नघुषाच्या मार्गाला अनुसरणारा. ३ कुबेराला.
४ स्वैपाकी.

नरमांसरसास्वादें आनन्दुनि नृपति वोलला वोल ।
कोठून आणिलें रे मांस स्वादिष्ट आज तूं वोल ॥ ४८ ॥

( मनुष्याचें मांसच मला खावयास दे नाहींतर मी तुला खावून टाकीन असें म्हटल्यावर स्वैपाक्यानें जें कार्य केलें त्याचें वर्णन. )

भूपास सूद वदला देतां मज अभयदान सांगेन ।
देतां नृपें तया तो यथार्थतेचें करी तदा कथन ॥ ४९ ॥
प्रतिदिनिं मनुष्यमांसचि दे मज खायास अन्यथा तुजला ।
मारिन भूपभयानें उपाय त्याच्या मनीं असा सुचला ॥ ५० ॥
मोदक झोळीमध्यें पुष्कळ घेऊन देइ वालास ।
प्रतिदिनिं शिशुगणें मागें लागे त्याचा धरून अभिलाप ॥ ५१ ॥
अन्तिम वालक मारुनि घालुनि झोळींत नेइ वेगानें ।
शिजवुनि मांस तयाचें घाली खाई नृपाल मोदानें ॥ ५२ ॥
शिशुहानि-हेतु नुमजे व्याकुलता ये प्रजेस खेदानें ।
करितां वहु अन्वेषणें सज्जन सन्तप्त होति कोपानें ॥ ५३ ॥
सूद असे शिशुघातक राजा तन्मांसभक्षणीं लुब्ध ।
जाणुनि उभया केलें निर्वासित होउनी मनीं क्रुद्ध ॥ ५४ ॥

( सौदासाचें सिंहसौदास हें नांव पडण्याचें कारण. )

सिंहरथ पुत्र त्याचा दिलें तया राज्य सकल पौरजनें ।
खाउनि सूदा भटके सौदास अनेक देश नगर वनें ॥ ५५ ॥
जाउनि पुरश्मशानीं प्रेतें उकरून खाइ सौदास ।
प्रवल नि निर्दय झाला मांसव्यसनांत त्यास येइ रस ॥ ५६ ॥
सिंहासमान पकडुनि खाई प्राण्यास म्हणुनि जन त्यास ।
म्हणु लागले धरातलिं आहे हा क्रूरसिंह सौदास ॥ ५७ ॥
येऊन दक्षिणापथिं जैनयतींचा श्रवून उपदेश ।
घेई अणुव्रतें तो श्रावक वनला वने दयाकोष ॥ ५८ ॥
पुत्रविवर्जित पावे महापुरीचा नृपाल मरणास ।
भूप गजें स्वस्कन्धीं स्थापियला भाग्यवन्त सौदास ॥ ५९ ॥

---

१ सत्य परिस्थितीचें. २ वालकांचा समूह. ३ वालक कमी होण्याचें कारण. ४ शोध.

सचिवें प्रजाजनानें केला राज्याभिषेक बहुविभवें।
नमवी शत्रुगणा तो प्रजेस पाळी सदैव सुतभावें॥ ६० ॥

(सौदास युद्धांत पुत्राला जिंकून दयेनें पुनः त्याला
राज्य देऊन मुनि होतो.)

येई नमन कराया वदणारा एक दूत पाठविला।
तनया समीप अपुल्या सौदासें तो तथापि नच गेला॥ ६१ ॥
लिहिलें तनयें जनका जगांत तूं निन्दनीय झालास।
तव पदिं नत मी होय न निर्भय उत्तर असे वदे त्यास॥ ६२ ॥
सौदास कुपित झाला घेउनि सेना लढावयास निघे।
मानव भक्षक येउनि खाइल आम्हांस भीति नृमनिं रिघे॥ ६३ ॥
देशांत होय खळबळ गेले सोडुनि निवास देशास।
निजजीवित रक्षाया त्यजिले त्यांनीं स्वकीय धनकोश॥ ६४ ॥
आला स्वसैन्य घेउनि पुत्रासह करुनि समरं घनघोर।
जिंकी तया प्रतापें मद त्याचा सकल करुनि बहु चूर॥ ६५ ॥
उपजे सौदासाच्या मनिं करुणा उभय राज्यभर तनया।
अर्पुनि दीक्षा घेउनि आचरि तप जिनमतांत धरि विनया॥ ६६ ॥
सिंहरथानन्तर बहु झाले इक्ष्वाकुवंशिं राजगण।
कित्येक मुक्त झाले मुनिव्रता आचरून आमरण॥ ६७ ॥
यानंतर रघु झाला पराक्रमी गाजवून घोर रण।
अनरण्य भूप झाला त्याचा सुत जो करी प्रजात्राण॥ ६८ ॥

(अनरण्य दशरथास राज्य देऊन वडीलपुत्र अनन्तरथासह
मुनिदीक्षा घेतो.)

साकेता नि विनीता जिला अयोध्या असें असे नाव।
अनरण्य-राजधानी इन्द्रपुरीसम जिचा असे विभव॥ ६९ ॥
करुनि अरण्यांतहि पुररचना अनरण्य नाम तो पावे।
वनिं देश-निवासानें सुजनांचें सुमन कां न तोषावें॥ ७० ॥
पृथिवीमति नावाची राणी याला महागुणा होती।
होती सुन्दर भोगी तिच्यासवें तो नृपाल सौख्यतति॥ ७१ ॥

---

१ पुत्राप्रमाणें. २ मनुष्यांच्या मनांत. ३ युद्ध. ४ प्रजेचें रक्षण. ५ ऐश्वर्य. ६ सुखसमूह.

झाले सुत त्या उभयां उभय नसे भय तयांस समरांत ।
ज्येष्ठ अनन्तरथाभिध दशरथ लघुसुत असे महीविदित[1] ॥ ७२ ॥
माहिष्मतीपुरीचा नृपति सहस्रांशु विक्रमी चतुर ।
अनरण्य-मित्र होता अन्योन्य-प्रीतियुक्त सुगुणधर ॥ ७३ ॥
युद्धांत रावणानें रविकरें[2] केला यदा पराभूत ।
तेंव्हां जिनमुनि होउनि उभयतपीं जाहला सदैव रत ॥ ७४ ॥
या दूतकथित वृत्ता ऐकुनि अनरण्य विरत मनिं झाला ।
घे राज्यभार सारा ज्येष्ठ सुता भूप तो तदा वदला ॥ ७५ ॥
होउनि विरक्त तोही इच्छी ध्यायास सत्तपोभार ।
दे मासजात[3]-दशरथ-शिरावरी भूप सर्व राज्यभर ॥ ७६ ॥
अनरण्य चरमदेही कर्मक्षय करुनि मोक्षसुख पावे ।
पावे सुकेवलीचें अनन्तरथ पद विशुद्धशा भावें ॥ ७७ ॥
झाले प्रसिद्ध भूवर मुनिराज अनन्तवीर्य या नामें ।
सूर्या करी पराजित तें केवलिवपु[4] अमन्द निजधामें[5] ॥ ७८ ॥
दशरथ जो बालक-नृप झाला कालक्रमें युवा धीर ।
अतिशूर न्यायी बहु तैसा शस्त्रास्त्रचालनीं चतुर ॥ ७९ ॥
नक्षत्रीं चन्द्र जसा ग्रहांत वा सूर्य भूपवृन्दांत ।
दशरथ राजा शोभे सुमेरुगिरि जेवि सकल शैलांत ॥ ८० ॥
केलें वश शत्रुगणा दशरथ-भूपें प्रजा सुखी झाली ।
पाहुनि तद्दानगुणा गेली स्वर्गास कल्पवृक्षाली[6] ॥ ८१ ॥
पाळी निजवंशाचें राज्य सदा सावधान राहून ।
त्यानें जिनधर्माला स्थान दिलें मनिं कदापि अन्या न ॥ ८२ ॥

( दशरथ राजाचे तीन राजकन्यांबरोबर विवाह. )

दर्भस्थल नगराचा भूप सुकोशल असे तया राणी ।
अमृतप्रभा जियेचें अमृतासम नाम अमृतमय वाणी ॥ ८३ ॥
या उभयांना झाली सुन्दर अपराजिता सुनाम सुता ।
रतिकडुनिहि रूपादि-स्त्रीसुगुणें जी कदापि नैव जिता[7] ॥ ८४ ॥

---

१ पृथ्वीवर प्रसिद्ध. २ सूर्यरश्मि किंवा सहस्ररश्मि राजा. ३ ज्याला जन्मून एक महिना झाला असा. ४ अनन्तरथ केवलीचें शरीर. ५ स्वकान्तीनें. ६ कल्पवृक्षांचा समूह. ७ जिंकली गेली.

दशरथ-विवाह झाला तिच्यासवें जोडपें सदा शोभे ।
भृङ्ग जसा कमलावरि नृपदृष्टि तिच्यावरी सदा लोभे ॥ ८५ ॥
पुर कमलसंकुलाभिध नृपाल तेथें 'सुबन्धु' तिलक वसे ।
मित्रा तयास राणी होती जी रतिसमा सदा विलसे ॥ ८६ ॥
या उभयांना झाली नाम जिचें कैकयी अशी तनया ।
दशरथ विवाह झाला तिच्यासवें सोडिते न जी विनया ॥ ८७ ॥
नाम सुमित्रा होतें जिचें दुजें प्रिय नृपास बहु झाली ।
चन्द्रास रोहिणी रति कामा करि जो तिच्यासवें केली ॥ ८८ ॥
तिसरी राणी होती दशरथभूपास सुप्रभा नामा ।
भोगी सुखें तिघींसह धर्मा अविरुद्ध सेवि तो कामा ॥ ८९ ॥

( सम्यग्दृष्टि राजा दशरथानें भरतादिकांनीं बांधलेल्या जिनमंदिरांचा जीर्णोद्धार केला व नवींही जिनमंदिरें बांधविलीं. )

सम्यग्दर्शन मिळवी राज्यहि परमोदयी तयास मिळे ।
सम्यग्दर्शन मणिसम[1] राज्य तृणासम असें तयास कळे ॥ ९० ॥
देई राज्य अधोगति त्यजिलें नच त्यास तो असे जाणी ।
सम्यग्दर्शन देतें ऊर्ध्वचि हे गति असें मनीं आणी ॥ ९१ ॥
भरतादिक-राजांनीं जिनसदनें करविलीं करी त्यांचा ।
जीर्णोद्धार जयानें अपूर्व सुन्दरपणा गमे साचा ॥ ९२ ॥
इन्द्र जयांना वंदिति सुन्दर जिनमंदिरें तयें रचिलीं ।
रत्नसमूहें पूजी जिनबिम्बा जें अघास[2] हाकाली ॥ ९३ ॥
अन्यभवीं जिनधर्माचरणीं आयुष्य वेचिलें ज्यानें ।
त्या जिनदासा स्वर्गीं सुरलक्ष्मी प्राप्त होय नियमानें ॥ ९४ ॥
तो इहलोकीं पुनरपि समृद्ध धनधान्य-वैभवें होतो ।
सूर्यासमान सर्वां सज्ज्ञानाचा प्रकाश वितरी[3] तो ॥ ९५ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे दशरथोत्पत्त्यभिधानं नाम त्रयोविंशतितमं पर्व ॥ २३ ॥

---

१ रत्नासारखें. २ पापाला. ३ देतो.

# पर्व चोवीस व पंचवीस यांतील कथासार

रावण त्रिखण्डराज्याचा उपभोग घेत असतां एके दिवशीं त्याच्याकडे एक निमित्तज्ञानी आला. त्याला रावणानें मला स्वाभाविक मृत्यु येईल कां कांहीं कारणांनीं असा प्रश्न विचारला.

नैमित्तिक म्हणाला राजन्, जनकराजाची कन्या व दशरथ राजाचे पुत्र रामलक्ष्मण हे तुझ्या मृत्युस कारण होतील. त्यावेळीं बिभीषणानें म्हटलें नैमित्तिका, मी तुझें वचन असत्य करीन कारण मी त्यांचे जनक जे जनक व दशरथ यांनाच मारून टाकीन.

रावणाच्या सभेंत त्यावेळीं नारदही होते. ते सभेंतून ही चर्चा ऐकून उठले व आकाशमार्गानें दशरथाकडे आले, व त्याला म्हणाले राजन्! बिभीषणानें तुझा व जनक राजाचा नाश करण्याचा विचार केला आहे. तुम्हा दोघा विषयींची सर्व माहिती त्यानें गुप्तहेराकडून मिळविली आहे. यास्तव तुम्ही राज्यत्याग करून वेषांतरानें परदेशीं कांहीं दिवस जाणें बरें होईल. व ही हकीकत मी जनकालाही कळवितो असें म्हणून ते आकाशमार्गानें मिथिलेला गेले व ही सर्व हकीकत जनक राजालाही कळवून नंतर ते आपल्या स्थानीं निघून गेले. इकडे दशरथ राजा व जनक यांच्या प्रधानांनीं जनक व दशरथ राजाचे पुतळे बनविले; ज्यांना पाहून हे दशरथ व जनकच आहेत असें वाटावें. व ते त्यांनीं अन्तःपुरांत थोड्याशा अंधाराच्या ठिकाणीं स्थापन केले.

बिभीषणानें आपले पुष्कळ शूर योद्धे या दोन राजांचा वध करण्यासाठीं पाठविले परंतु राजवाड्याच्या सभोंवती अतिशय कडक बंदोबस्त होता. त्यामुळें ते जाऊंच शकले नाहींत. पुष्कळ दिवस बिभीषणानें त्यांच्या आगमनाची वाट पाहिली. नंतर त्यानें स्वतःच जाण्याचें ठरविलें. बरोबर विद्युद्विलसित नामक विद्याधरास घेऊन तो अन्तःपुरांत शिरला. विद्युद्विलसितानें दशरथाला पाहून त्याचें मस्तक तोडलें. त्यांतून रक्त गळूं लागलें. त्यानें तें मस्तक बिभीषणास दाखविलें. त्याची खात्री झाली. याचप्रमाणें मिथिलेंत जाऊन जनकाचेंही मस्तक तोडलें व तीं दोन मस्तकें त्यांनीं समुद्रांत फेकून दिलीं व ते लंकेला जाऊन पोहोंचले.

बिभीषणाच्या मनाला वाईट वाटू लागलें. आपण दोन निरपराधी राजांचा वध केला हें योग्य झालें नाहीं. रावणाचा वध यांच्या क्षुद्र सन्ततीपासून होणें शक्य नव्हते. जरी विषारी सर्पापासून जन्मलेला सर्प विषारी असतो तरीही तो गरुडाला मारूं शकत नाहीं. तद्वत् यांच्यापासून जन्मणाऱ्या जानकी, राम, व लक्ष्मणापासून रावणाचा वध होणें शक्य नाहीं. मी गरीब बिचाऱ्या दशरथ व जनकांचा व्यर्थच वध केला. असा विचार करून त्या पापक्षालनासाठीं त्यानें जिनपूजन, दान आदिक कार्यें केलीं व त्यामुळें त्याच्या मनाची अशान्तता नाहींशी झाली.

इकडे दशरथ व जनकराजा वेषान्तर करून दीनाप्रमाणें अनेक गावें व नगरांस गेले. व फिरत फिरत ते उत्तरादिशेंत कौतुकमंगल नामक नगरास येऊन पोचले. या नगराच्या राजाचें 'शुभमति' असें नांव होतें. त्याच्या पत्नीचें पृथ्वीश्री नांव होतें. या उभयतांना 'केकया' नांवाची अत्यंत सुन्दर व कलाचतुर कन्या होती. ती तरुण झाली तेव्हा तिचें स्वयंवर करण्याचा राजानें विचार ठरविला व अनेक राजांना आमंत्रणें पाठविलीं. स्वयंवर मंडपांत मञ्चकावर अनेक राजे बसले होते. जनक व दशरथ हे वेषान्तर करून आलेले होते व ते सामान्य लोकांत बसले.

केकया हातांत वरमाला घेऊन मंडपांत आली. तिनें अनेक राजांना पाहिलें पण कोणीही वरण्यास योग्य तिला वाटला नाहीं. नंतर सामान्य लोकांकडे तिची दृष्टि वळली. त्या लोकांत दशरथ राजा सर्वांपेक्षा खुलून दिसत असल्यामुळें तिच्या मनाला तो आवडला व तिनें त्याला माला घालून वरलें.

कांहीं सज्जन राजांना कन्येनें योग्य वराला वरलें म्हणून आनंद वाटला. पण कांहीं राजांना त्याच्याविषयीं मत्सर उत्पन्न झाला. ते युद्धाला उत्सुक झाले. दशरथ-राजाच्या रथावर सारथीचें कार्य केकईनें उत्तम रीतीनें केलें. व दशरथानें खूप पराक्रम दाखविला. सर्वांचा त्यानें पराजय केला. यानंतर दशरथ व जनक आपआपल्या राजधानीला गेले.

राजा दशरथानें सभेंत केकईच्या सारथ्यकार्याची फार प्रशंसा केली व तिला वर माग म्हणून सांगितलें. तिनें मला जेव्हां गरज वाटेल तेव्हां आपण द्या असें म्हटलें व राजानें त्याप्रमाणें वर देण्याचें कबूल केलें.

जे सद्गुणी महापुरुष असतात त्यांना त्यांच्या सदाचाराचें फल मिळतें. त्यांचीं संकटें नाहींशी होतात. त्या जिनभक्तांच्या अन्तःकरणाला अविचाराचा कधींही स्पर्श होत नाहीं.

# चोवीसावें पर्व

[ मला स्वाभाविक मरण येईल कीं इतर कारणानें येईल असा निमित्तज्ञान्याला रावणानें प्रश्न विचारला तेव्हां त्यानें असें उत्तर दिलें.]

इकडे त्रिखण्ड राज्या भोगी रावण अखण्ड-पुण्य-बळें ।
गेला सुखभोगामधिं काल किती हें तया तदा न कळे ॥ १ ॥
एके दिनिं नैमित्तिक[1] सभेंत येतां तया पुसे विनयें ।
अमर हि मरती जगतीं कोणा मरणास टाळतां नच ये ॥ २ ॥
येईल मृत्यु मजला स्वाभाविक अन्य हेतु वा होय ।
नैमित्तिकोत्तमा ! तूं सांगे मजला धरी मनीं न भय ॥ ३ ॥
होईल जानकी जी दशरथसुत रामचन्द्र लक्ष्मण जे ।
त्यांच्या पासुनि होइल मृत्यु तुझा निश्चयें मनीं समजे ॥ ४ ॥
बोले तया बिभीषण नैमित्तिक ! वचन सत्य तव आहे ।
परि मी असत्य सगळें करीन तव वचन जाण बापा हें ॥ ५ ॥
जे कन्या तनयांचे पिता असे जनक नृपति दशरथ हे ।
रावणमरणा कारण त्यांचा निःपात करिन मी पाहें ॥ ६ ॥
बीजविनाशें अंकुरजनन[2] न होइल निश्चयें जाण ।
नैमित्तिका तुझें वच असत्य मी करिन यांत विस्मय न ॥ ७ ॥
भाषण बिभीषणाचें नारद ऐकुनि सभेतुनी उठला ।
आकाशपथ क्रमितां दशरथ-नृपसदनिं शीघ्र अवतरला[3] ॥ ८ ॥
पाहून नारदाला केला दशरथनृपें नमस्कार ।
बसवुनि उच्चासनिं त्या गुरुवद्गौरव करून तो चतुर ॥ ९ ॥
वदला आपण कोठुनि आला सांगा समस्त विशदार्थ[4] ।
नारद कथिता झाला सज्जन ज्याच्या मनीं नसे स्वार्थ ॥ १० ॥

---

१ आकाश, ज़मीन, शरीराचीं अंगें व उपांगें, स्वर, शरीरावरील तीळ, मस वगैरे व्यंजनें, श्रीवृक्ष, स्वस्तिकादिक लक्षणें, छिन्न व स्वप्न या आठांना निमित्त म्हणतात. या निमित्तावरून त्रिकालीं प्राण्यांच्या हिताहिताचें ज्यांना असतें त्यांना नैमित्तिक म्हणतात. २ उत्पत्ति. ३ उतरला. ४ स्पष्ट अभिप्राय.

गेलों होतो राजन् हर्षें[2] पूर्वी विदेहवर्षांत[1] ।
श्रीपुण्डरीकिणीपुरिं वैभव होतें जिचें प्रकर्षांत ॥ ११ ॥
‘ सीमन्धर ’ जिनपतिचें दीक्षाकल्याण पाहिलें मोदें ।
सर्वसुरांनीं केलें भक्तजनां जें विशाल-तोपा दे ॥ १२ ॥
नन्तर सुमेरुगिरिवरि जाउनि जिनमन्दिरास वन्दून ।
लङ्कमध्यें येउनि केलें शान्तीश्वरास मी नमन ॥ १३ ॥
रावण-सदनीं गेलों असतां तेथें अपूर्व जी मात ।
घडली कथन तियेचें करितों मी ऐक करुनि मन शान्त ॥ १४ ॥
बोलुनि ऐसें केली खूण तयें दशरथास समजुनि ती ।
स्वगृहीं जाण्या कथिलें अन्य नृपा घ्यावयास विश्रान्ति ॥ १५ ॥
गेले नृपाल सगळे पाहुनि एकान्त नारदें म्हटलें ।
आतां कथितों राजन् ! तुजला रावण सभेंत जें घडलें ॥ १६ ॥
नैमित्तिक-विद्वांसें जें कथिलें तें समस्त ऐकून ।
आलों राजन् कथितों एकाग्र करून ऐक वा स्वमन ॥ १७ ॥

नारद असें सांगतो—

[ “ बिभीषणानें तुझा व जनकाचा वध करण्याचा निश्चय केला आहे म्हणून तुम्ही राजधानीचा त्याग करून वेषांतर करून परदेशीं जावें. ” ]

दशरथतनयें केला जाइल दशकण्ठमृत्यु समरांत ।
जनकसुता-सीतेस्तव कथिली नैमित्तिकें अशी मात ॥ १८ ॥
दशरथ-जनक नृपाची-वध प्रतिज्ञा बिभीषणें केली ।
तुम्हा उभयांचीही चरपुरुषें माहिती तयास दिली ॥ १९ ॥
मजही त्यानें पुसिलें जनक नि दशरथ मला मुने सांगा ।
जाणत असाल आपण निघो मुखांतून वचन जणु गंगा ॥ २० ॥
वदलों बिभीषणा मी अन्वेषण[3] करुनि सकल सांगेन ।
बोलुनि ऐसें आलों शीघ्र तुला तें करावया कथन ॥ २१ ॥
येईल तो महाभुज[4] शीघ्र इथें वध करावया तुमचा ।
वृत्तान्त ऐकिला मी असत्य नच सर्वथा असे साचा ॥ २२ ॥

---

१ विदेहक्षेत्रांत, हें जम्बूद्वीपाचें चौथें क्षेत्र आहे. २ हर्षानें. ३ शोध.
४ ज्याचे हात पुष्ट आहेत असा.

या परि नारदवचना ऐकुनि भूपति महादरें पूजी ।
गेला नन्तर नारद होउनि जनकासमीप बहु राजी ॥ २३ ॥
सांगून त्यास तद्वत् नारद गेला स्वकीय आवासा ।
नृप उभय राज्य सचिवीं गेले स्थापुनि देश निर्वासा ॥ २४ ॥
इकडे नृपालयामाधिं शत्रु फसावा म्हणून सचिवगणें ।
दशरथपुतळा रचिला स्थापियला तो तमांत निपुणपणें ॥ २५ ॥
या परि जनकाच्याही सचिवें पुतळा रचून जनकाचा ।
स्थापून राज्यरक्षण केलें ज्याची सती असे वाचा ॥ २६ ॥
इकडे जनक नि दशरथ वेषान्तर करुनि भूवरि भ्रमण ।
करिते झाले नानाग्रामपुरीं जेवि दीन रंकजन ॥ २७ ॥
उभयांचा वध करण्या पाठविले नर अनेक उभयपुरीं ।
खगवर-बिभीषणानें प्रवेश त्यांच्या न होय नृपति-घरीं ॥ २८ ॥
घेऊन खड्ग हस्तीं भूपप्रासादरक्षणीं निरत ।
सेवक दिवा नि रात्रीं आलें वैफल्य तत्प्रवेशांत ॥ २९ ॥
गेले दिन बहु झालें कार्य न जाणुन विभीषणें गमन ।
केलें स्वयं प्रवेशा विद्युद्विलसिति-खगास घेऊन ॥ ३० ॥
अन्तःपुरांत दशरथ सिंहासनिं वैसला वघून असे ।
विद्युद्विलसित कापी तन्मस्तक यन्मनीं दया न वसे ॥ ३१ ॥
स्वामीस दाखवी तें त्यांतुनि ठिबकें अखण्डधारेनें ।
रक्त दिलें तें फेकुनि सागरिं लङ्केस जाय शान्तमनें ॥ ३२ ॥
या परि जनकाचेंही कापुनि शिर सेवकें कृपाहीन ।
कृतकार्य हो विभीषण आनन्दित जाहलें तदीय मन ॥ ३३ ॥
उभयस्थानीं उठला शोकाचा परिजनांत कल्लोळ ।
परि सत्यार्थज्ञानें झाले साश्चर्य-चित्त ते सकल ॥ ३४ ॥
या अशुभशान्तिसाठीं पूजा दानादि कर्म आचरि तो ।
तेणें शान्त जहालें मन त्याचें तें अघांत नैव रतो ॥ ३५॥
कांहीं दिन गेल्यावरि विचार आला विभीषण स्वान्तीं ।
खोट्या भयेंचि वधिलें भूपयुगा धरुनि मी मनिं भ्रान्ति ॥ ३६ ॥

---

१ आनंदित. २ अपुल्या स्थानीं. ३ अंधारांत. ४ हितकारक. ५ मिथिला व अयोध्येंत. ६ व्यर्थपणा. ७ विद्युद्विलसित नामक विद्याधरास.

विपधर-सर्पापासुनि जन्मे जरि सर्प तीव्र-विषवन्त ।
होइल समर्थ कैसा गरुडाचा तो करावया अन्त ॥ ३७ ॥
इन्द्र-परांक्रमशाली रावण कोठें कुठें नृपालयुग ।
गज मन्दगमन कोठें सिंह कुठें नित्य-पवनसमवेग ॥ ३८ ॥
जें जेवढें नि जेथें ज्यापासुनि सुख नि दुःख लाभेल ।
तें तेवढें नि तेथें त्यापासुनि कर्मजन्य होईल ॥ ३९ ॥
कर्माधीन असे नर चुकवायाला समर्थता त्या न ।
सम्यग् निमित्त जाणी जरि घेइ न कां करून कल्याण ॥ ४० ॥
नैमित्तिकवचनातें ऐकुनि केला विवेक न मनांत ।
धिक्कार असो मजला केला मी नृपतियुग्म-देहान्त ॥ ४१ ॥
अविवेकी मी बनलों केला मी निरपराध-नृप-घात ।
निःसार बुद्धि होतां पडे अकार्यचि सदैव पदरांत ॥ ४२ ॥
रावणनगरी लंका विशाल ऐशा वसे समुद्रांत ।
जी सुरगणा हि साध्य न होइल मनुजें कशी पराभूत ॥ ४३ ॥
नृपयुगवध मी केला अकर्म ऐसें न करिन केव्हांही ।
ऐशा सुविचारें जिनदास विभीपण सुखांत रत राही ॥ ४४ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत
पद्यानुवादे बिभीषणव्यसनवर्णनं नाम चतुर्विंशतितमं पर्व ॥ २४ ॥

---

१ इन्द्राप्रमाणें पराक्रमी. २ वाऱ्याप्रमाणें वेगाचा. ३ कर्मापासून उत्पन्न होणारें.

# पंचवीसावें पर्व

[ केकयीनें दशरथ राजास वरलें. ]

उत्तरदिशेंत इकडे पुर कौतुकमंगलाख्य एक वसे ।
तट ज्याचा शैलासम कष्टें रवि लंघण्या समर्थ दिसे ॥ १ ॥
तेथें शुभमति राजा शुभकार्यीं नित्य तो प्रवर्ततसे ।
यास्तव अर्थें[1] नामें निज प्रजापालनांत दक्ष वसे ॥ २ ॥
पृथ्वीश्री नांवाची राणी गुणभूषणा तयास असे ।
झाली उभया कन्या सकलकलाचतुरता जियेंत वसे ॥ ३ ॥
सर्वाङ्गसुन्दरा जी नांव जिचें केकया सदा विलसे ।
यद्रूप बघुनि लज्जित सुराङ्गनागण सुरालयांत वसे ॥ ४ ॥
श्रीद्रोणमेघ नामक झाला भूपास पुत्र एक गुणी ।
मेघासमान हितकर गुण ज्याचे लोक सकल वारवाणी ॥ ५ ॥
उपवर झाली कन्या योग्य हिला वर जगांत कोण असे ।
येतां विचार हृदयीं नृप चिन्तातुर तदा उदास दिसे ॥ ६ ॥
सचिवमतानें ठरवी स्वयंवराचें विधान भूपाल ।
हरिवाहनादि भूपति बसले सिंहासनीं मनीं लोल[2] ॥ ७ ॥
दशरथ नृप जनकासह वेषान्तर करुनि मण्डपीं आला ।
सामान्य-जनसमूहीं अज्ञात[3] असा तिथें सुखें बसला ॥ ८ ॥
आली सभेंत बाला तिच्यासवें प्रियसखी तिची आली ।
नृप-नाम-तद्गुणादिक्रम क्रमें चतुर वर्णिती झाली ॥ ९ ॥
परि केकया-मनाला वर लक्षणयोग्य त्यांत दिसला न ।
फिरतां दशरथ दिसला नृवर तुला योग्य वर वदे स्वमन ॥ १० ॥
कण्ठीं तिनें तयाच्या प्रेमकटाक्षें सलज्ज होऊन ।
माला अर्पण केली दृष्टि तयाच्या पदांत ठेवून ॥ ११ ॥

---

१ अर्थानेंही राजा शुभमति होता. २ मनांत कन्येला वरण्याची इच्छा करणारे. ३ राजा म्हणून ओळखला गेलेला.

सज्जन भूपति वदले कन्येनें योग्य पुरुष हा वरिला ।
उद्यत नरपति झाले कांहीं स्वपुरा प्रति प्रयाणाला ॥ १२ ॥
परि कांहीं नृप झाले धरून कन्याभिलाप बहु कुपित ।
उद्धत होउनि वदले युद्धीं याला करूं पराभूत ॥ १३ ॥
कुलशील नच जयाचें ज्ञात अशा मानवा हिनें वरिलें ।
आम्हां असमान्य आहे बोलुनि युद्धास भूप ते उठले ॥ १४ ॥
शुभमति राजा बोले व्याकुल होउनि वरास त्यासमयीं ।
कन्येसह रथिं वैसुनि जावें मी भूपकोप हा शमवी ॥ १५ ॥
तो धैर्यवन्त बोले श्वशुरा वर हसुनि काळजी सोडा ।
मी या सर्व नृपांना पळवीन नि हरिन आपुली पीडा ॥ १६ ॥
यापरि बोलुनि वसला उत्तमरथिं वीर समर करण्यास ।
तेव्हां तो वर पावे शारदमध्यांह्न-सूर्य-तुलनेस ॥ १७ ॥
उतरवुनि सारथ्याला करांत चाबुक लगाम घेऊन ।
ती केकया वसे रथिं निर्भय पौरुष जिच्यांत अन्यून ॥ १८ ॥
आज्ञा द्यावी नाथा कोणा भूपाकडे रथा वळवूं ।
झाला प्रसन्न भूपा यम आज तुझ्यावरी कुणा कळवूं ॥ १९ ॥
या सैन्याच्या पुढती उभा असे प्रमुख भूप जो तिकडे ।
रथ वळवी गे कान्ते बाणें त्याचे करीन शत तुकडे ॥ २० ॥
यापरि आज्ञा देतां रथास वळवून त्या नृपा पुढती ।
नेई बाला धैर्ये शर वर्षुनि उभय वीर ते लढती ॥ २१ ॥
करुनि पराभव त्याचा पळवी दशरथ तया क्षणार्धांत ।
स्याद्वादी जणु वादी सुनयें दुर्णयबुधा करी ध्वस्त ॥ २२ ॥
रथचालनचातुर्यें अनेक भूपाकडे रथा वळवी ।
जैसें सुकेकया ती शरवर्षे वर हि शीघ्र त्या पळवी ॥ २३ ॥
हरिवाहनादि राजे दुःसह दशरथपराक्रमा बघुन ।
गेले पळून जैसे प्रचण्ड सिंहास पाहतां हरिण ॥ २४ ॥
छत्र ध्वज हय सारथि तोडुनि मारुनि नृपा करी विरथ ।
दशरथ हय, सारथि, रथ निज रक्षुनि शुद्ध ठेवि सर्वस्व ॥ २५ ॥

---

१ शारदऋतुच्या मध्यदिवसांत आलेल्या सूर्यासारखा. २ स्याद्वाद. ३ अनेकांतें वस्तुविवेचन करणारा विद्वान. ४ पुरुषांनी पळती.

जायेस नि स्वतःला रक्षुनि करी शस्त्रहीन शत्रुगणा ।
पाहुनि दशरथविक्रम नभांत अतिहर्ष होइ अमरजना ॥ २६ ॥
कन्या नि दशरथाची करी प्रशंसा स्वमित्र-शत्रुगण ।
युद्धान्त गोड झाला झाला आनन्द ज्या नसे मान[1] ॥ २७ ॥
घेऊन केकयेचा कर दशरथ होय केकयारमण ।
रोहिणिकर करिं घेउनि विधु[2] झाला जेवि रोहिणीरमण[3] ॥ २८ ॥
झालें कौतुक कौतुक-मंगल नगरांत या विवाहाचें ।
कन्या आणि वराचें शुभमतिनें शुभचि चिन्तिलें साचें ॥ २९ ॥
घेऊन केकयेला दशरथ गेला पुरी अयोध्येस ।
जनक हि मिथिला नगरा झाला उभयास परमसंतोष ॥ ३० ॥
तो भीतिरहित दशरथ स्वर्गी इन्द्रासमान निजनगरीं ।
सुख भोगी शत्रु गजा भासे संहारकारि जेवि हरि[4] ॥ ३१ ॥
एकेदिनीं सभेमधिं समस्त पत्नीसमक्ष भूप वदे ।
युद्धांत केकयेनें केलें साहाय्य विपुल सौख्या दे ॥ ३२ ॥
सारथ्य-कर्म केलें हिनेंचि सम्प्राप्त विजय मज झाला ।
जरि अरुण सूत नसतां निखिल तमोहरपणा न ये रविला ॥ ३३ ॥
या परि गुणप्रशंसा ऐकुनि ती केकया बघे खालीं ।
भूप वदे गे सुन्दरि वर मागे ती मनांत बहु धाली ॥ ३४ ॥
शुभमति कन्या बोले मी वर मागेन नैव यावेळीं ।
अपुल्या सन्निध ठेवा यथाप्रसंगांत द्या नि द्या टाळी ॥ ३५ ॥
देईन तुला मी तो जेव्हां तूं मागशील सुन्दरि गे ।
या परि बोलुनि नरपति उठुनि सभेतुनि निजालयांत रिघे ॥ ३६ ॥
या परि नृपयुग्माचें कथिलें गौतमगणेश्वरें वृत्त ।
तें ऐकुनि मगधाधिप झाला हृदयांत विस्मयव्याप्त ॥ ३७ ॥
पुनरपि गणधर वदले भूपाला या उदार-वंशांत ।
झाले महापुरुष जे ऐक तयाचें गुणाश्रयी वृत्त ॥ ३८ ॥
जे सद्गुणी महानर त्यांना सुख लाभतें सदाचारें ।
जिनदास ते जगामधिं मन त्यांचें स्पृष्ट हो न अविचारें ॥ ३९ ॥

---

१ प्रमाण, मोजमाप. २ चंद्र. ३ रोहिणीचा पति. ४ सिंह.

असदाचारें मानव मिळवी दुःखास सतत समजून।
त्यागी असदाचारा होशिल जिनदास सौख्यसम्पन्न ॥ ४० ॥

इत्यार्पे रविपेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे केकयावरप्रदानं नाम पंचविंशतितमं पर्व ॥ २५ ॥

---

## सव्वीसाव्या पर्वांतील कथेचा सारांश–

दशरथ राजाला चार राण्या होत्या व सर्व राण्यावर त्याचें अतिशय प्रेम होतें. पहिल्या पत्नीला– अपराजितेला पहाटेच्यावेळीं हत्ती, सिंह, चन्द्र व सूर्य अशीं स्वप्नें पडलीं. सकाळीं वाद्यांचा मधुर ध्वनि ऐकून ती जागृत झाली. स्नानानन्तर जिनपूजनादि कार्य करून दशरथ महाराजाला नमस्कार करून नम्रतेनें स्वतःला पडलेल्या स्वप्नांचें वर्णन तिनें केलें. व या स्वप्नांचा अभिप्राय तिनें विचारला. राजा म्हणाला प्रिये, तुला बाह्य व अन्तरंग शत्रूंचा नाश करणारा पराक्रमी पुत्र होईल. हें स्वप्नफल ऐकून ती आनन्दित झाली.

पुढें तिचा गर्भ वाढत चालला. मुख तेजस्वी दिसू लागलें. दररोज पतिबरोबर ती जिनपूजन करीत असे. अन्तःकरणांत उत्तरोत्तर अतिशय शान्ति उत्पन्न होत गेली.

दशरथाच्या दुसऱ्या पत्नीचें नांव सुमित्रा होतें. तिलाही एकदा पहाटेच्या-वेळीं चार स्वप्नें पडलीं. ज्यांच्या मुखावर कमलें आहेत, ज्यांच्यांत सुगंधित शीतल पाणी आहे असे कुंभ हातांत घेऊन श्री व कीर्तिदेवता ज्याला स्नान घालीत आहेत असा सिंह पहिल्या स्वप्नांत पाहिला. दुसऱ्या स्वप्नांत ज्याचे तेजस्वी किरण चोहीकडे पसरलेले आहेत असें चक्ररत्न तिनें पाहिलें. तिसऱ्या स्वप्नांत तिनें अतिशय उंच पर्वताच्या शिखरावर आपण बसलों आहोत असें पाहिलें. व चौथ्या स्वप्नांत चोहीकडे नजर टाकून विशाल पृथ्वीचें अवलोकन करीत आहोत असें दृश्य तिनें पाहिलें. तिनेंही प्रातःकालीं प्रातर्विधि आटोपल्यानन्तर राजाला स्वप्नफलें विचारलीं– राजा म्हणाला प्रिये, शत्रुविध्वंसक, युगमुख्य, अत्यन्त तेजस्वी व ज्याची आज्ञा सर्व राजे मानतील असा पुत्र तुला होईल. हें फल ऐकून राणी सुमित्रा आपल्या प्रासादांत गेली.

इकडे नऊ महिने पूर्ण झाल्यावर पूर्णचन्द्राप्रमाणें सुन्दर पुत्र अपराजितेला झाला. ही वार्ता सांगणाऱ्याला प्रजानें पुष्कळ धन दिलें. फार मोठा उत्सव राजानें केला व कमलाप्रमाणें मुख, डोळे व हात-पाय ज्याचे आहेत अशा त्या पुत्राचें नांव त्यानें आपल्या बन्धुजनासह 'पद्म' असें ठेविलें.

राणी सुमित्रेलाही नवमासानन्तर कान्तियुक्त, श्यामवर्णाचा, शुभ लक्षणांनीं युक्त असा पुत्र झाला. याच्या जन्माचेवेळीं शत्रुदेशांत त्यांना खेद उत्पन्न करणारे अनेक अशुभ उत्पात झाले. वडील पुत्राच्या जन्मोत्सवाप्रमाणेंच याचाही मोठा जन्मोत्सव झाला. व सुन्दर लक्षणांचा याचा देह पाहून राजानें याचें 'लक्ष्मण' असें नांव ठेविलें. राम व लक्ष्मण शुक्लचन्द्राप्रमाणें वाढून विद्याग्रहण करण्याच्या वयांत आले. यांच्यामध्यें अनेक जन्माच्या संबन्धामुळें परस्परावर अतिशय प्रेम उत्पन्न झालें होतें.

यानंतर बाकीच्या दोन राण्यांना— केकया व सुप्रभा यांना भरत व शत्रुघ्न असे पुत्र झाले. भरत हा भरताप्रमाणें भाग्यवान् व जनमान्य होता. शत्रुघ्न शत्रूंचा नाश करणारा असल्यामुळें अन्वर्थक नांवाचा होता. हे चार पुत्र चार समुद्राप्रमाणें होतें. किंवा सामदामादि चार राजनयाप्रमाणें शोभत होते.

या चार पुत्रांना शस्त्रास्त्रादिकांचें ज्ञान 'ऐरी' नामक गुरुपासून झालें. हा भार्गव गोत्रांत जन्मलेला होता. याच्या पित्याचें नांव 'शिखी' व मातेचें 'इषु' हें होतें. हा ल्हानपणीं फार द्वाड असल्यामुळें आई-बापांनीं याला घरांतून हाकून दिलें होतें. हा कांपिल्य नगरांतून विद्याभ्यासासाठीं राजगृह नगरास गेला. तेथें 'वैवस्वत' नामक गुरुजवळ धनुर्विद्या व शस्त्रास्त्रविद्या शिकून अतिशय कुशल झाला. 'वैवस्वतानें' आपल्या मुलीबरोबर याचा विवाह केला व हा पत्नीसह अयोध्येला आला. राजा दशरथाला त्यानें आपलें शस्त्रास्त्र विद्येचें कौशल्य दाखविलें. तेव्हां राजानें रामादिकांना शस्त्रास्त्रविद्या शिकविण्याच्या कामीं याची योजना केली. रामचन्द्रादिकांत याचें शस्त्रास्त्रकौशल्य चन्द्राचें निर्मल बिंब निर्मल जलाशयांत जसें प्रगट होतें तसें प्रगट झालें.

राजाला आपले सर्व पुत्र शस्त्रास्त्र विद्येबरोबर अन्य [illegible] पाहून अतिशय आनन्द झाला व त्यानें ऐरीगुरुजीस वस्त्रालंकार व धनादिक देऊन त्यांचा चांगला सत्कार केला.

राम व लक्ष्मणांचे देहांत फार मोठें बल होतें. ते बुक्की मारून पर्वतशिलेचें चूर्ण करीत असत. धनुष्याला बाण जोडून वेध्य विद्ध करीत असतां सूर्यमंडळही कंपित होत असे. याप्रमाणें त्यांचें बल पाहून आपण सुरासुरांनाही अजिंक्य आहोंत असें वाटू लागलें.

जे जिनदास होऊन जिनभक्ति करितात त्यांचें नेहमीं भलेंच होतें असें जाणून जिनभक्ति करावी म्हणजे विशाल पुण्य प्राप्त होतें व त्यांची आज्ञा पत्नी, पुत्र, मित्र व चाकर-नोकर सर्व मस्तकावर धारण करतात त्यामुळें त्यांचें सर्व आयुष्य आनन्दांत व्यतीत होतें.

# सव्वीसावें पर्व.

[ अपराजिता व सुमित्रांना शुभस्वप्नें पडतात. दशरथ राजा दोघींना तुम्हाला पराक्रमी पुत्र होतील असें स्वप्नांचें फल सांगतो.]

अपराजिता नृपाची प्रथमा पत्नी निशान्तें-समयांत ।
गज सिंह चन्द्र सूर्या पाही स्वप्नीं नि जाहली मुदित ॥ १ ॥
प्रात:कालीं जिनपति-पद-पूजन करुनि भक्तिभावानें ।
गेली निजपतिसन्निध नमून त्याच्या पदास विनयानें ॥ २ ॥
जोडून हात दोन्ही कांहींसें नम्र वदन होऊन ।
स्वप्नें कथिलीं सावध पतीस दृष्टक्रमास अनुसरुन ॥ ३ ॥
स्वप्नफलांचा ज्ञाता वदला दशरथ तिला प्रिये ऐक ।
होईल विक्रमीसुत बाह्यान्तरशत्रु-नाशनीं एक ॥ ४ ॥
झाला प्रमोद तिजला प्रफुल्ल मुखकमल होय साध्वीचें ।
गेली स्वप्नांसादीं उदरीं हो गर्भवृद्धि सतत तिचे ॥ ५ ॥
प्रतिदिवशीं निजपतिसह पूजन साध्वी करी जिनेशाचें ।
कांन्ति मुखावरि झळके मन झालें गेह विपुल शान्तीचें ॥ ६ ॥
राणी दुजी सुमित्रा अतिसुन्दर-रूपधारिणी होती ।
पाही ती हि स्वप्ना पश्चिम-रात्रींत विपुल पुण्यवती ॥ ७ ॥
कमलें मुखीं जयांच्या उदरीं स्वच्छ नि सुगन्ध जल ज्यांत ।
ऐशा घटें मृगेन्द्रो श्रीकीर्ति स्नान घालिती सतत ॥ ८ ॥
सूर्यासमान भासे ज्याचा करवृन्द दश दिशीं पसरे ।
नाना मणि जडलेले पाही स्वप्नांत चक्ररत्न फिरे ॥ ९ ॥
अतितुङ्ग पर्वताच्या शिखरीं आरूढ जी स्वयं झाली ।
पाही विशाल पृथ्वी सकानना जी मनांत दृढ धाली ॥ १० ॥
स्वप्नें यापरि पाहुनि ऐकुनि मङ्गलरवास ती राणी ।
जागृत होउनि बोले दशरथ भूपास मधुरशी वाणी ॥ ११ ॥

---

१ पहाटेच्या वेळीं. २ ज्यां स्वप्नें पडलीं त्या क्रमानें. ३ दूर करणारे म्हणजे मोह शत्रु, कामक्रोधादिक अन्तरंग शत्रु. ४ घर. ५ सिंहाला. ६ किरण समूह. ७ वनासहित पृथ्वी.

नाथा एशीं स्वप्नें निशावसानांत पाहिलीं सुफलें ।
सांगा मला तयांचीं स्वज्ञानानें[1] प्रसन्न-विगतमलें ॥ १२ ॥
अरिविध्वंसक सुत तुज होइल युगमुख्य विपुल तेजाचा ।
आदेश[2] सर्व भूप स्वशिरीं धरितील सर्वदा ज्याचा ॥ १३ ॥
स्वप्नफल-श्रवणानें राणीचें हृदय जाहलें हृष्ट ।
गेली निजसौधीं ती मुष्टिस्थित[3] पाहते जगत्स्पष्ट ॥ १४ ॥

[ रामादिक पुत्रांचा जन्मोत्सव. ]

नवमास पूर्ण होतां राणी अपराजिता सुता प्रसवे ।
कान्ति विशाल जयाची पूर्वा पूर्णेन्दु[4] जेवि ती पावे ॥ १५ ॥
पुत्रोत्पत्ति-सुवार्ता-कथका भृत्या विशाल धनराशी ।
हर्षे दिला जयानें दिसला तो जणु जनास पूर्ण शशी ॥ १६ ॥
सगळ्या बन्धुजनांसह सुतजन्मोत्सव करी विशाल नृप ।
दुःखी जन न मिळाला झाला सन्तोष ज्या नसे माप ॥ १७ ॥
बालार्क-तेज ज्याचें विशाल वक्षःस्थला रमा स्पर्शी ।
पद्ममुखा पद्माक्षा पुत्रा दे पद्मनाम भूप वशी ॥ १८ ॥
राणी सती सुमित्रा पुत्रा प्रसवे विशाल कान्तिधरा ।
कान्त्यादि-सुगुणधारी वैडूर्या[5] जेवि जन्म देइ धरा[6] ॥ १९ ॥
ज्येष्ठ-सुताचा जैसा जन्मोत्सव साजरा नृपें केला ।
लघु-सुत जन्मोत्सवही केला हृदयांत भूप बहु धाला ॥ २० ॥
पाहून सुलक्षणमय देहा, 'लक्ष्मण' सुनाम नृपति वदे ।
उत्पात[6] शत्रुदेशीं झाले ते अरिसनास खेदा दे ॥ २१ ॥

[ राम-लक्ष्मणांच्या शारीरिक व आत्मिक-गुणांचें वर्णन. ]

नीलमणि-श्यामल[7] वपु कान्तितरङ्गीं तरङ्गतें ज्याचें ।
ऐसा लक्ष्मण वाटे क्रीडास्थान त्रिखण्ड-लक्ष्मीचें ॥ २२ ॥
ओठ जयाचे सुन्दर लालचुटुक पोवळे जसे दिसती ।
हात नि पाय तयाचे रक्ताब्जासम[8] मनोज्ञ[9] बहु गमती ॥ २३ ॥
लोण्यासम देहाचा कोमलसा स्पर्श गन्ध चित्त हरी ।
त्यांची बालक्रीडा सौख्य कुणाच्या मनास नच वितरी ॥ २४ ॥

---

१ निर्दोष ज्ञानानें. २ आज्ञा. ३ जणु मुठींत धरलेलें. ४ पूर्णचन्द्र. ५ इन्द्रनीलमण्याला. ६ पृथ्वी. ७ काळसर. ८ तांबड्या कमलाप्रमाणें. ९ सुंदर.

पूर्वानेकभवांचा घेउनि सहवास उभय अवतरले ।
अन्योन्य-प्रेमाचा जणु ते आदर्श[1] तेधवा गमले ॥ २५ ॥
बोलत असतां वाटे जणु वदनांतुनि सुधाप्रवाह निघे ।
बघतां मुखप्रभेनें करिति जना व्याप्त भासतें वेगें ॥ २६ ॥
आनन्द आणि वाटे प्रसाद[2] हे मूर्तिमन्त जनतेस ।
शुक्लेन्दुतुल्य वाढुनि सक्रम ते प्राप्त होति युवतेस[3] ॥ २७ ॥
विजय त्रिपृष्ट जैसे बलभद्र नि कृष्ण जाहले प्रथम ।
तत्सदृश कार्य पाहुनि कुमार बलकृष्ण[4] वाटती युग्म ॥ २८ ॥
दशरथ-राणी तिसरी नांव जिचें केकया असें होतें ।
झाला पुत्र तियेला ' भरत ' असें नांव ठेविलें त्यातें ॥ २९ ॥
दिव्यस्वरूप त्याचें झाला तो भाग्यवन्त जनमान्य ।
म्हणती विद्वज्जन जणु चक्री हा भरत अवतरे धन्य ॥ ३० ॥
दशरथ राणी चौथी नाम जिचें सुप्रभा असें होतें ।
झाला सुपुत्र तिजला जो धरि शत्रुघ्न योग्य नामातें ॥ ३१ ॥
दशरथपुत्रचतुष्टय पूर्वादि-दिशासमुद्र जणु चार ।
सामादि नृपतिनय वा राज्यरमाप्राप्तिचें शुभ द्वार ॥ ३२ ॥
गजदन्त-पर्वतांनीं मेरु जसा भूतलांत बहु शोभे ।
या चार कुमारांनीं शोभा दशरथ नृपास बहु लाभे ॥ ३३ ॥
विद्याग्रहणोचितवय पुत्राचें बघुनि योग्य गुरु शोधीं ।
दशरथ-भूपवराची व्याकुलतायुक्त जाहली शुभधी[5] ॥ ३४ ॥
काम्पिल्यक-नगरामधिं भार्गवगोत्रज शिखी सुनामाचा ।
द्विज एक इषु तयाची भार्या अमृतासमान वचनाचा ॥ ३५ ॥
पुत्र तयांना होता ऐरी ज्याचें सुनाम ठेविलें ।
उद्धट अतिशय होता लाडांचें प्राप्त कटुक फल झालें ॥ ३६ ॥
मारी ठोकी भांडे इतरांच्या बालका शिव्या देई ।
ऐशा दुष्टाचरणें जननीजनकास दुःख बहु होई ॥ ३७ ॥
कंटाळून तयांनीं हाकालुनि लाविलें घरांतून ।
दुःखी होउनि गेला राजगृहीं[6] वस्त्रयुग्म नेसून ॥ ३८ ॥

---

१ आरसा. २ प्रसन्नता. ३ तरुणपणास. ४ बलभद्र व नारायण.
५ चांगली बुद्धि. ६ राजगृह नामक नगरांत.

धन-विद्याधर्मांचा संग्रह करणें असे निजाधीन ।
प्राय:सिद्धि तयांची परदेशीं होति वदति विबुधजन ॥ ३९ ॥
तेथें द्विज वैवस्वत असे धनुर्वेद-निपुण त्या जवळी ।
ऐरी जाउनि झाला शिष्य सदा तत्पदाम्बुजांत अलि[1] ॥ ४० ॥
वैवस्वतगुरु शिकवी राजसुतादिक अनेक-शिष्यगणा ।
विद्या धानुष्कांची[2] मिळवी हा ऐरि तींत चतुरपणा ॥ ४१ ॥
नृपसुत मत्सर करिती अपुल्या जनकास कळविलें त्यांनीं ।
ऐरी नामक झाला वैदेशिक शिष्य निपुणतम कोणी ॥ ४२ ॥
नृप रुष्ट जाहला बहु वार्ता वैवस्वतास ही कळली ।
ऐरीस बोलला गुरु दाखिव तूं मूर्खता नृपाजवळी ॥ ४३ ॥
आला नृपाल घेई शस्त्रपरीक्षा बने तदा मूढ ।
ऐरी समजुनि आली त्याची भूपास अज्ञता गाढ ॥ ४४ ॥
वैवस्वतें स्वकन्या दिली तयाला तिच्यासवें आला ।
रात्रीं पळून तेथुनि ऐरी दशरथ नृपाल-नगराला ॥ ४५ ॥

[ ऐरिगुरुपासून रामादिकांचें शस्त्रास्त्र-शिक्षण. ]

येऊन दशरथाच्या सन्निध शस्त्रास्त्र-चतुरता तेणें ।
केली प्रगट बघुनि ती राजा सन्तोष पावला स्वमनें ॥ ४६ ॥
शस्त्रास्त्रांचें कौशल झालें रामादिकीं तदा प्रगट ।
निर्मल सरांत जैसें चन्द्राचें बिम्ब होतसे स्पष्ट ॥ ४७ ॥
अन्य-कलाज्ञानें ही झालीं तत्काल तेधवा व्यक्त ।
आवरण दूर होतां मणिगण दिसतात जेवि लखलखित ॥ ४८ ॥
यापरि अपुले झाले पारंगत पुत्र सर्वशास्त्रांत ।
पाहुनि नृपाल झाला दशरथ हर्षित अतीव हृदयांत ॥ ४९ ॥
त्या ऐरीगुरुजींचा वस्त्रालंकार विपुल देऊन ।
आदर भूपें केला ज्याचें होइ न कदापि विस्मरण ॥ ५० ॥
ज्ञानप्राप्ति कुणाला होतां उज्ज्वल विकास हो त्याचा ।
स्फटिकीं रविकर शिरतां उज्ज्वलता-लाभ हो तया साचा ॥ ५१ ॥
कोठें समता होते कोठें तीही विनाश झणि पावे ।
कर्माच्या वैषम्यें बोधा विविधत्व कां न लाभावें ॥ ५२ ॥

---

१ गुरुच्या चरणकमलांत भृंगा. २ धनुष्य धारण करणाऱ्याची.

अन्यपदार्थीं रविकर घुसतां समता तयास ये साची।
ते घूकनेत्र संगत होतां त्या अन्धकारता जाची ॥ ५३ ॥
राम नि लक्ष्मण यांचें देहीं सामर्थ्य दिव्यसें होतें।
मुष्टिप्रहारमात्रें आद्रिशिलाचूर्ण करित होते ते ॥ ५४ ॥
शस्त्राभ्यासस्थानीं जेव्हां चापास बाण जोडून।
वेधास सिद्ध होती कांपे जणु भीतिनें तदा तपन ॥ ५५ ॥
ते निजबाहुबलातें अखिल मानिति तृणासमान मनीं।
कौतुकविपयचि मानुनि शस्त्रास्त्रबलास दाविताते जनीं ॥ ५६ ॥
शस्त्रास्त्रकौशलासह भुजबल पाहुनि अतुल्य तनयांचें।
देवासुरास देखिल अजय्य आपण असे गणी साचे ॥ ५७ ॥
पूर्वार्जितसुकृतानें रामादिक दशरथास सुत झाले।
जिनदास पुण्य मिळविति त्यांचें होतेंचि सर्वदैव भलें ॥ ५८ ॥
पुण्योपार्जन केलें मिळते आदेशवश तया जाया।
सुत मित्र भृत्य त्याच्या करिती सानन्द सर्वदा हृदया ॥ ५९ ॥

इति श्रीरविषेणाचार्यविरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे दशरथस्य रामादिचतुःपुत्रोत्पत्त्यभिधानं नाम षड्विंशतितमं पर्व ॥ २६ ॥

---

१ घुबडाच्या डोळ्यांत सूर्यकिरण शिरले असतां त्याला अंधारच वाटतो. २ सूर्य. ३ अनुपम. ४ कोणाकडून न जिंकिला जाणारा. ५ मानीत असे. ६ आज्ञेंत राहणारी. ७ नोकर.

## सत्तावीसाव्या पर्वातील कथेचा सारांश–

मिथिला-नगरांत जनकराजा आपल्या विदेहा नामक राणीसह राज्य करीत होता. राणी गर्भवती झाली तेव्हां तिच्या प्रसूतीची एक देव पूर्वजन्माच्या वैरामुळें वाट पाहत होता. याविषयींची कथा अशी आहे—

चन्द्रपुरी नगरीचा राजा चक्रध्वज प्रजांचें उत्तम पालन करीत होता. त्याची राणी मनस्विनी व कन्या चित्तोत्सवा, राजाच्या पुरोहिताच्या मुलाचें नांव पिङ्गल राजकन्या चित्तोत्सवा व पिङ्गल हे दोघे गुरुगृहीं शिक्षण घेत असत. त्या उभयतांच्या मनांत प्रेम उत्पन्न झालें व शिकणें त्यांनीं सोडून दिलें.

एके दिवशीं पिङ्गल राजकन्येला घेऊन दूर देशीं निघून गेला. विदग्ध नामक नगराबाहेर एका झोपडींत ते दोघे राहत असत. विद्येच्या अभावीं राजकन्येचें रक्षण करण्यास तो समर्थ झाला नाहीं.

या नगराचा राजा कुण्डलमण्डित वनविहार करण्यासाठीं गांवाच्या बाहेर आला. त्याला चित्तोत्सवा दिसली. तिच्या सौंदर्यानें तो मोहित झाला. त्यानें एक दूती तिच्याकडे पाठविली. तिनें तिचें मन वळविलें व ती त्याच्याकडे गेली.

पिंगल जेव्हां बाहेरून झोपडींत गेला तेव्हां ती त्याला दिसली नाहीं. शेवटीं राजाकडे जाऊन तो ब्राह्मण 'राजन्, माझी बायको कोणी हरण करून नेली आहे तिचा शोध करून आणून दे' असें म्हणाला. राजा म्हणाला, 'ब्राह्मणा तूं काळजी सोडून दे. लौकरच आम्ही तिचा शोध करितो.' राजाच्या कांहीं मित्रांनीं म्हटलें ब्राह्मणा, "आम्ही तुझी बायको पोदनपुराकडे जाणाऱ्या आर्यिकांच्या संघांत पाहिली यास्तव तूं पोदनपुराकडे जा" असें म्हटल्याबरोबर तो पोदनपुराकडे गेला. एका जिनमंदिरांत आर्यिकांचा समूह त्यानें पाहिला पण त्यांत त्याची बायको दिसली नाहीं. पुनः परत तेथून राजाकडे तो आला तेव्हां राजानें नोकराकडून धक्के मारवून त्याला हाकून दिलें.

यानंतर अनेक ठिकाणीं त्यानें तिचा शोध केला. ती मिळाली नाहीं. शेवटीं तो आर्यगुप्ताचार्यांकडे आला व मला धर्माचें स्वरूप सांगा अशी विनंति केली. धर्मस्वरूप ऐकून तो विरक्त झाला व त्यानें जैन मुनिदीक्षा घेतली. तीव्र तप केलें पण त्याच्या मनांतून चित्तोत्सवेचे विचार नाहींसे झाले नाहींत. आयुष्यान्तीं मरून तो भवनवासी महाकाल नामक देव झाला.

त्यानें अवधिज्ञानानें कुण्डलमण्डित विदेहा राणीच्या गर्भांत आहे असें जाणलें. व राणी प्रसूत होण्याची तो वाट पाहूं लागला.

इकडे कुण्डलमण्डित चित्तोत्सवेबरोबर आनन्दानें राहूं लागला. कुण्डलमण्डिताचा राज्यप्रदेश दुर्गम पर्वतांनीं व्याप्त होता. व तो वारंवार अनरण्य राजाच्या प्रदेशांत जाऊन त्याच्या प्रजांना त्रास देत असे. एकेवेळीं कुण्डलमण्डित चित्तोत्सवेबरोबर झोपला असतां अनरण्य राजाच्या बालचन्द्र नामक सेनापतीनें छापा घालून त्याला पकडलें. त्याचें राज्य व सैन्य घेऊन त्याला त्यानें हाकलून दिलें. अनरण्य राजाची चिन्ता मिटली.

कुण्डलमण्डित दुःखी होऊन भटकत एका जैनाचार्यांकडे गेला. त्यांच्या उपदेशानें त्यानें मद्य—मांसादिकांचा त्याग करून शुद्ध आहार घेण्याचा नियम घेतला. त्याचा मामा मोठा प्रबळ राजा होता. त्याचेकडे जाऊन त्याच्या साहाय्यानें मी माझें राज्य परत मिळवीन असें त्याला वाटत होतें. व तो त्याच्याकडे निघाला असतां वाटेंत अनेक रोग उत्पन्न होऊन मरण पावला. व तो विदेहा राणीच्या गर्भांत आला.

पुढें विदेहा राणी प्रसूत झाली. तिला मुलगा व मुलगी अशीं दोन अपत्यें झालीं. या मुलानें— मागच्या जन्मींच्या कुण्डलमण्डितानें पिङ्गलाची बायको हरली होती. असा हा मुलगा जन्मल्याबरोबर महाकालानें त्याला हरून आकाशांत नेलें व त्याच्या अवयवांचे तुकडे करून समुद्रांत फेकण्याचा विचार करीत असतां त्याला वाटलें आपण मागील जन्मीं मुनि होतों. तेव्हां व्रत देखील तोडलें नाहीं व आतां या मुलाला मारावयास आपण सज्ज होणें हें मुळींच योग्य होणार नाहीं असा विचार करून त्यानें त्या बालकाच्या कानांत अतिशय तेजस्वी रत्नकुण्डलें घातलीं. अंगावर उत्तम वस्त्रभूषणें घालून त्याला त्यानें लघुपर्ण विद्येच्या द्वारें आकाशांतून खालीं सोडलें,

रथनुपूरनगराचा अधिपति चन्द्रगति राजानें आकाशांतून खालीं उतरणाऱ्या बालकास पाहिलें. त्यानें त्या बालकाला आपल्या ओंजळींत घेतलें व राणी पुष्पावतीकडे जाऊन तुला झोपींत असतांना मुलगा झाला असें त्यानें सांगितलें. याप्रमाणें तो बालक शुक्लपक्षस्थ चन्द्राप्रमाणें राजाच्या घरीं वाढला व थोर झाला.

इकडे विदेहा राणी शोक करूं लागली. जनकानें पुत्रहरणाची वार्ता दशरथाला कळविली. त्यानेंही पुष्कळ शोध केला पण तो कोठें सांपडला नाहीं. सीता शुक्लपक्षस्थ चन्द्रकलेप्रमाणें वाढू लागली.

जनकाच्या मनांत ही आपली कन्या दशरथपुत्र रामचन्द्राला द्यावी असा विचार आला व राणीसही तो कळविला तिला आनन्द झाला.

जे मन वचन कायेनें जिनभक्ति करतात त्या जिनदासांना स्वर्गलक्ष्मी व मोक्षलक्ष्मीची प्राप्ति होते. यापुढील कथा पुढील पर्वांत वाचावी.

---

# सत्तावीसावें पर्व.

हे श्रेणिक तुज आतां कथितों मी ऐक जनकसम्बन्ध ।
सावध मन तूं ठेवी सुकृतांचा ज्यामुळें घडे बन्ध ॥ १ ॥
राणी जनकनृपाची नांव विदेहा जिचें असे सुगुणी ।
सौंदर्याची खाणी[1] मधुर जिची कोकिलेसमा वाणी ॥ २ ॥

( भामंडलाच्या पूर्वभवाचा शत्रु असलेल्या देवानें विदेहाच्या प्रसूतीची वाट कां पाहिली ? )

गर्भवती ती असतां प्रसूत होईल केधवा वाट ।
पाहे पूर्व-भवाचें सुर वैर धरून हृदयिं बहु दाट ॥ ३ ॥
चक्रपुरी-नगरीमधि पूर्वीं भूपाल एक राज्य करी ।
चक्रध्वज नांवाचा प्रजाजनांचें समस्त दुःख हरी ॥ ४ ॥
भार्या तयास होती मनस्विनी जी सदा दयार्द्र मनीं ।
चित्तोत्सवा तयांना कन्या झाली सुरेख रूपखनी ॥ ५ ॥
गुरुगृहिं शिकावयाला प्रतिदिवशीं रम्य जातसे बाला ।
पिङ्गल पुरोहिताचा पुत्रहि येई शिकावयास कला ॥ ६ ॥
अन्योन्य प्रेमाचा पाझर वाहे सदा मनांतून ।
विद्यालाभ न झाला कामाकुल जाहलें तदीय-मन ॥ ७ ॥
एकाग्र चित्त ज्यांचें त्यांना विद्या नि धर्मलाभ घडे ।
नारीप्रेमाकुल मन विद्याध्ययनीं कदापि नैव जडे ॥ ८ ॥
चित्तोत्सवेस गेला घेउनि पिङ्गल सुदूर देशास ।
करुनि प्रमादें-दोषा[2] मोह हरी जेवि जीव-सुगतीस ॥ ९ ॥
नृप-कन्याहरणानें झाला आनन्द पिङ्गलास जरी ।
अन्तरिं दुःखी झाला दरिद्रतेनें न सौख्य येई करीं ॥ १० ॥
राहे विदग्ध नगराबाहेर रचून झोपडी एक ।
विद्याभावीं तिजला समर्थ रक्षावयास नच देख ॥ ११ ॥

---

१ सौंदर्याची खाण. २ मोह जसा प्रमाद दोष उत्पन्न करून जीवाची सुगति नष्ट करितो त्याप्रमाणें माता-पित्याची असावधानता पाहून पिंगलानें चित्तोत्सवेला हरण करून नेलें.

राजा कुण्डलमण्डित सुत होता तो प्रकाशसिंहाचा ।
प्रवरावलि तन्माता जणु तो पायाचि दोप-गेहाचा ॥ १२ ॥
एके दिनिं तो आला तत्पुरपति वन-विहार करण्यास ।
चित्तोत्सवेस पाही रूपें हरि ती तदीय-हृदयास ॥ १३ ॥
[ चित्तोत्सवा पिंगलाचा त्याग करून कुण्डलमंडिताकडे जाते.]
झाला कामाकुल तो दूती येऊन तन्मना वळवी ।
गेली नृपाकडे ती कामानल हा अकार्य-धूमा वी ॥ १४ ॥
रमला तिच्यासवें तो कुवेरसुत[2] उर्वशींत जेवि रमे ।
पिङ्गल दुःखी झाला शिरिं झाला वज्रपात त्यास गमे ॥ १५ ॥
हरिली माझी भार्या राजन् कोणी तियेस तूं शोध ।
वदला नृप तव भार्या शोधिन विप्रा करूं नको खेद ॥ १६ ॥
कोणी तयास वदला भार्या तव आर्यिकाव्रजीं[3] दिसली ।
जा तिजला आणाया ती पोदनपुरपथाकडे गेली ॥ १७ ॥
खचरवेगें[4] धावत पिङ्गल पोदनपुराकडे गेला ।
पाहे जिनालयीं तो तेथें आर्यासमूह ही दिसला ॥ १८ ॥
परि त्याची नच दिसली भार्या चित्तोत्सवा तया डोळां ।
तेव्हां त्याला वाटे झाले सत्प्राण[5] पांच गळि गोळा ॥ १९ ॥
पुनरपि तेथुनि येउनि हुडकुनि भार्या मला नृपाला दे ।
ऐसें वदतां भृत्यें हाकाली शीघ्र धरुनिया खांदे ॥ २० ॥
भार्याविरह तयाच्या जाळी देहा दिनीं नि रात्रींही ।
सुखसाधनें जलादिक सगळीं तीं दुःखकरचि तो पाही ॥ २१ ॥
कमलें सरोवरांतिल जणु त्या दावाग्नितुल्यशीं[6] दिसलीं ।
सरिता-सरोवरादिक मकरादिक-जन्तुनींच भरलेलीं ॥ २२ ॥
यापरि गांवें नगरें सरोवरें सर्व पर्वतीं फिरला ।
आचार्य आर्यगुप्ता संनिध जाऊन नम्र तो वदला ॥ २३ ॥
धर्मस्वरूप सांगुनि दीक्षानुग्रह करून तारावें ।
संसार-सागरांतुनि करितों ऐशी विनन्ति मी भावें[7] ॥ २४ ॥

१ उत्पन्न करितो. २ नलकूवर. ३ आर्यिकांच्या समूहांत. ४ खेचराच्या वेगानें. ५ मन, वचन, शरीर, श्वासोच्छ्वास व आयु पांच प्राण. ६ वनाग्निप्रमाणें. ७ मनःपूर्वक.

धर्मस्वरूप ऐकुनि त्याला वैराग्य जाहलें थोर ।
जिनशासनप्रशंसा[1] करून तो शान्त जाहला फार ॥ २५ ॥

[ मुनिदीक्षा घेतलेला पिङ्गल मरणोत्तर असुर देव झाला. ]

“ हें जिनशासन रविसम अज्ञानतमास सारितें दूर ।
पापविनाशक याचा करितो स्वीकार तोचि नर चतुर ॥ २६ ॥ ”
विरहाग्नीनें झाला जो दग्ध अशा मदीय-देहास ।
हें जिनशासन निववील हरील हें पापहेतु मोहास ॥ २७ ॥
संसारभीति वाटुनि पिङ्गल सोडून सकल सङ्गास ।
नग्न श्रमण जहाला तृणसम मानी सदैव अङ्गास ॥ २८ ॥
पर्वत-नदी-श्मशानीं निर्भय होऊन तो विहार करी ।
तप तीव्र करित असतां हृदयें चित्तोत्सवा विचार वरी ॥ २९ ॥
युवतिविचारें त्यापरि तीव्रतपें अर्धदग्ध-तरु-तुल्य[2] ।
झाला पिङ्गल मुनि तो गेलें नच तन्मनांतलें शल्य ॥ ३० ॥
आयुष्यान्तीं पावे पिङ्गल-मुनि मरण जाहला असुर ।
नाम महाकाल असे त्याचें प्रगटे तिथें हि संस्कार ॥ ३१ ॥
भवनीं अवधिज्ञानें धर्मफलोत्पत्ति जाणली त्यानें ।
चित्तोत्सवा हि कोठें झाली उत्पन्न जाणिलें स्वमनें ॥ ३२ ॥
कुण्डलमण्डित कोठें झाला उत्पन्न दुष्ट विरहजली ।
ज्यानें मजला फेकुनि दिलें जसा मत्स्य शुष्क भूमितली ॥ ३३ ॥
जनक-नृपाची भार्या असे विदेहा तिच्या सुगर्भात ।
कुण्डलमण्डित आला इतरहि ये जीव तेधवा त्वरित ॥ ३४ ॥
झाली प्रसूत म्हणजे कुण्डलमण्डित शिशूस मारावें ।
ऐशा करुनि विचारा पाही तज्जन्मकाल दुर्भावें ॥ ३५ ॥

( राज्यच्युत कुण्डलमण्डित जैनाचार्याजवळ मद्य-मांसांचा त्याग करितो. )

इकडे कुण्डलमण्डित दुर्गमदुर्ग-प्रदेशि[3] राहून ।
अनरण्यभूपतीच्या राज्यांत करी सदैव आक्रमण ॥ ३६ ॥

---

१ जिनधर्माची स्तुति. २ अर्धे जळलेल्या झाडाप्रमाणें. ३ प्रवेश करण्यास कठिण असा डोंगराळ प्रदेशांत.

पकडू शके न त्याला अनरण्य नृपाल खिन्न मनिं झाला ।
चिन्ता तयास जाळी सेनापति[1] वालचन्द्र त्या वदला ॥ ३७ ॥
नाथा ! खिन्न न व्हावें जिंकून अवश्य वश करीन खला ।
ऐसें वदून गेला तत्सदनीं गुप्त घालितो घाला ॥ ३८ ॥
चित्तोत्सवेस घेउनि निजला असतां स्वकीय-सदनांत ।
पकडी मृगास जैसे बांधी त्याला चमूपति त्वरित ॥ ३९ ॥
राज्य नि सैन्य तयाचें घेऊन दिलें तया हकालून ।
सेनापति अनरण्या[2] समीप येई मनीं प्रमोदून ॥ ४० ॥
यापरि सेनापतिनें अनरण्य नृपास करुनि निश्चिन्त ।
केलें सुखी तया तो त्रिवर्गसेवेंत जाहला निरत ॥ ४१ ॥
केवल शरीरधारी कुण्डलमण्डित वनून पदचारी[3] ।
पश्चात्तापें पीडित होउनि पृथ्वीवरी विहार करी ॥ ४२ ॥
दुःखी अतिशय झाला होउनि भवभीत सूरिपदिं आला ।
सांगा मज धर्माचें स्वरूप आचार्य वोलती त्याला ॥ ४३ ॥
" दुःखी दीन दरिद्री बन्धुजनें रहित रोगपीडित जे ।
बहुधा त्यांच्या हृदयीं धर्माचें प्रेम उद्भवें ताजें " ॥ ४४ ॥
दीक्षा मज घेण्याची शक्ति नसे मी परिग्रहासक्त ।
माझ्यासाठीं कांहीं नाहीं का धर्म हे कृपाकान्त[4] ॥ ४५ ॥
आहार भय नि मैथुन परिग्रहाची मनांत अभिलाषा ।
प्रवळ तिनें सांचविलें अघ मी सांगा उपाय तन्नाशा ॥ ४६ ॥
" पापांची मनिं निन्दा पश्चात्ताप नि गुरूस तत्कथन ।
प्राणिदया पापांचा त्याग तया वदति धर्म आर्यजन " ॥ ४७ ॥
" हिंसेवांचुनि नुपजे जीवांचा ज्यांत घात घडतोच ।
मांस कदापि न भक्षी इच्छिसि जरि तूं सुधर्म मनिं साच " ॥ ४८ ॥
" जे मृत्युभीत जीवा मारुनि तन्मांस उदरिं भरितात ।
ते क्रूर पाप मानव मरून जातात खचित नरकांत " ॥ ४९ ॥
" मस्तक-मुण्डन केलें तीर्थजलस्नान करुनि साधु जरी ।
झाला नि मांस भक्षी नरकीं अघ त्यास दुःख वहु वितरी " ॥ ५० ॥

---

१ सेनापति. २ दशरथ राजाच्या पित्याचें नांव. ३ पायीं चालणारा. ४ हे दयानाथ.

जो मांस भक्षितो नर त्यानें माता पिता नि पुत्रास ।
मित्रां नि बान्धवांना भक्षियलें नरकिं भोगि तो त्रास ॥ ५१ ॥
" नर मांस भक्षितो जो स्वबान्धवांनाच भक्षि तो जाण ।
पूर्वी अनेकजन्मीं स्वबन्धु ते होति हें मनीं आण " ॥ ५२ ॥
" जो पक्षिमत्स्य-हरिणा मारुनि तन्मांस भक्षितो क्रूर ।
लुटुनि धना मारि जनां नरकीं तो दुःख भोगितो फार " ॥ ५३ ॥
ऐकुनि गुरूपदेशा कुण्डलमण्डित वदे तया विनयें ।
नाथ ! अणुव्रतधारी जीवाच्या सुगति केंचि सन्निध[1] ये ॥ ५४ ॥
सम्यग्दृष्टि दृढव्रतधारी जो मांसभक्षणा न करी ।
पुण्य विशिष्ट तयाला लाभे जें देइ सुगति सुखकारी ॥ ५५ ॥
उपवासादिक न करी असे दरिद्री परन्तु धीमन्त[2] ।
मांसत्यागी त्याच्या करिं राहे सुगति वदति जन सन्त ॥ ५६ ॥
प्रिय जिनशासन वाटे अणुव्रती तेवि शीलसम्पन्न ।
प्राणी तो मरणोत्तर भोगी स्वर्गीय सुखद अमृतान्न ॥ ५७ ॥
उत्तम अशी अहिंसा धर्माचें हेंचि मूळ जिन वदती ।
अत्यन्त विमलशी ती मांसनिवृत्ता[3] मिळे, न अन्या ती ॥ ५८ ॥
चित्त दयालु जयाचें म्लेंच्छ असो मांग वा असो कोणी ।
मधुमांस-त्यागी तो पापापासून मुक्त होय क्षणी ॥ ५९ ॥
मधुमांसत्यागानें पापापासून मुक्त होऊन ।
सञ्चितपुण्यें होतो उत्तम नर वा सुराङ्गनारमण[4] ॥ ६० ॥
सम्यग्दृष्टि प्राणी होऊन अणुव्रती मरेल जरी ।
त्या विविध भोग मिळती स्वर्गी देवेशसंपदेस वरी ॥ ६१ ॥
यापरि कुण्डलमण्डित सूर्युपदेशा धरून असमर्थ ।
धारण करावयाला अणुव्रतें बोलला निजस्वार्थ ॥ ६२ ॥
मी मन्दभाग्य आहे अणुव्रतें मजशि वाटती कठिण ।
श्रद्धा जिनगुर्वागमिं[5] ठेवुनि वागेन खचित आमरण ॥ ६३ ॥
मी मधुमांसा त्यागुनि सेवीन विभो विशुद्ध आहारा ।
ऐसें वदून वन्दुनि गुरूस जोडून शीर्षि उभय करां ॥ ६४ ॥

---

१ जवळ. २ शहाणा विवेकी. ३ मांसाचा त्याग करणाऱ्याला. ४ स्वर्गीय देवींचा पति. ५ जिनेश्वर, निर्ग्रन्थ मुनि व जिनशास्त्र.

तेथून तो निघाला मनांत लागे करूं विचार असा ।
जिंकीन शत्रुवर्गा राज्य रमेला करीन मी स्ववशा ॥ ६५ ॥
आहे पराक्रमी मम मामा त्याच्याकडेचि जाईन ।
तत्साहाय्यें पुनरपि राज्यश्रीपति अवश्य होईन ॥ ६६ ॥
ऐशी धरून आशा जाता मार्गांत तो बहु श्रमला ।
नानाविध रोगांनीं पीडित होऊन तत्क्षणीं मेला ॥ ६७ ॥
जनकनृपाची राणी असे विदेहा तिच्या सुगर्भांत ।
कुण्डलमण्डित आला जैसा जलबिन्दु शुक्तिपुटकांत[1] ॥ ६८ ॥
पिङ्गल तपोबलानें असुर बने नाम ज्या महाकाल ।
जाणी अवधिज्ञानें सुधर्मफल लाभलें मला विपुल ॥ ६९ ॥
कुण्डलमण्डितभूपें माझी चित्तोत्सवा खलें हरिली ।
उत्पन्न कुठें झाली माझी प्राणप्रिया असे पहिली ॥ ७० ॥
अथवा त्या दुष्टेचें नांवहि घेणें मला नको वाटे ।
जन्मे कुण्डल कोठें ज्याच्याशीं वैर मन्मनीं दाटे ॥ ७१ ॥
या समयीं गर्भाचा विनाश करण्या समर्थ मी आहे ।
होय विदेहाबाधा करणें हें कार्य योग्य मम नोहे ॥ ७२ ॥
होईल जन्म त्याचा जेव्हां त्याला हरून मारीन ।
प्रसवाच्या कालाची आतां मी वाट बघत राहीन ॥ ७३ ॥
होऊन पूर्ववैरें अत्यन्त क्रुद्ध चोळितो हात ।
भुवया चढवी रोषें आपटुनी पाय वाजवी दांत ॥ ७४ ॥
धावे न दुःख कोणा देतां इतरा स्वतःकडे येतें ।
लागे विलम्ब यद्यपि फल त्याचें कटुक नैव तें चुकतें ॥ ७५ ॥
नवमासान्तीं प्रसवे सुखें विदेहा सुता नि तनयेस ।
देवें हरिलें पुत्रा स्थान न ज्याच्या मनांत सुदयेस ॥ ७६ ॥

( महाकालनें बालकाला पर्णलघुविद्येच्या द्वारें आकाशांतून खालीं सोडलें. )

मी आपटून याला दगडावरि ठार मारितों आतां ।
रक्तें दिग्बलि देउनि सानन्द करीन मी निजस्वान्ता[2] ॥ ७७ ॥

---

१ शिंपल्याच्या जोडींत. २ दुष्टानें.

या परि विचार करुनि प्रथम मनीं तो स्वतःस धिक्कारी ।
ऐशा अविवेकानें होइन मी खचित दीर्घसंसारी ॥ ७८ ॥
जिनदीक्षा मी घेउनि सर्वारम्भास सोडिलें होतें ।
हृदयीं दयेस ठेवुनि पूर्वीं गवता हि पीडिलें नव्हतें ॥ ७९ ॥
मी सद्गुरुप्रसादें निर्मल जिनधर्म पाळिला होता ।
तेणेंचि देवपद मज लाभे मी पाप केवि करूं आतां ॥ ८० ॥
स्वल्पहि पातक केलें संचित होऊन विपुल फल देतें ।
तें संसारीं बुडवी देई जीवास तीव्र-दुःख-शतें ॥ ८१ ॥
हृदयीं दया विराजे ज्याच्या निर्दोष भावना असती ।
त्या सुगतिरत्न लाभे ऐसें वदतात आगमज्ञयति ॥ ८२ ॥
यापरि विचार येतां हृदय तयाचें दयारसें द्रवलें ।
वस्त्रालङ्कारांनीं करगत-बालकशरीर भूषविलें ॥ ८३ ॥
पसरे कान्ति जयांची सुन्दरशी रत्नकुण्डलें दोन ।
बालककर्णीं घाली बघती त्याचे अतृप्तसे नयन ॥ ८४ ॥
दलल[२]घु नामें विद्या शिशूंत योजून त्या नभांतून ।
सोडुनि सुखप्रदेशीं गेला निजसदनिं मुदित होऊन ॥ ८५ ॥

( चन्द्रगति विद्याधर राजाचें येथें बालकाचें पालन-पोषण होतें. )

विधु[४]गति नामक खगपति बसला होता निजोपवनसौधीं ।
येइ नभांतुनि तारा जणु निशि तल्लोचनास जो रोधी ॥ ८६ ॥
नक्षत्रपु[५]ञ्ज किंवा लोळ विजेचा अमन्दगति येई ।
ऐसा वितर्क खगपति हृदयीं उत्पन्न तत्क्षणीं होई ॥ ८७ ॥
अतिशय समीप येतां वस्त्रालंकारयुक्त बाल दिसे ।
घेई निजकरयुगलें प्रसन्नता यन्मुखावरी विलसे ॥ ८८ ॥
पुष्पवती राणीच्या समीप जाऊन बालका देदी ।
हर्षें तिजला वदला प्रसूत झालीस ऊठ गे देवी ॥ ८९ ॥
झोपेंतून उठे ती आश्चर्यें पाहि सुभग बालास ।
कोण्या भाग्यवतीचा वदली स्पर्शून मृदुल गालास ॥ ९० ॥

---

१ देवपूजा, गुरुपालना, दान देणें या विषयांचा विचार. २ शास्त्रज्ञ मुनि. ३ या विद्येचा प्रवेश ज्याच्यांत होतो तो पदार्थ पर्वताखालीं दडून होऊन वर्षानंतर येतो त्याला बाधा पोहोंचत नाहीं. ४ चन्द्रगति. ५ तारांचा समूह.

आहे तुझाचि हा गे भाग्यवती नच दुजी तुझ्यासम गे ।
घेई करयुगलानें पाही याला प्रसन्न अनुरागें[1] ॥ ९१ ॥
कानांत कुण्डलें जीं रत्नांचीं दीप्तिवन्त दिसतात ।
या नरलोकीं यांचा संभव नच वाटतें मला खचित ॥ ९२ ॥
पुष्पवतीपति[2] बदला आकाशांतून बाल अवतरला ।
पाहुनि हर्षितनयनें याला स्वकराञ्जलींत[3] मी धरिला ॥ ९३ ॥
सुकुल-प्रसूत[4] वाटे देहीं याच्या सुलक्षणें दिसतीं ।
आयासाविण लाभे घेई या मोद धरुनि गे सुदंति[5] ॥ ९४ ॥
घेउनि सुन्दर बाला पुष्पवती जाइ सूतिसदनांत[6] ।
राणीस पुत्र झाला वार्ता पसरे समस्त नगरांत ॥ ९५ ॥
जन्मोत्सव रथनूपुर-नगरीं सर्व प्रजाजनें केला ।
प्रतिगृहिं गुड्या नि तोरण रंगावलि नर्तनादि बहु लीला ॥ ९६ ॥
परि मिथिला नगरीमधिं शोक विदेहा करी महाराणी ।
कुररीवाणी हरिला सुत मज आणून शीघ्र द्या कोणी ॥ ९७ ॥
मम पुत्रा नेतांना झडले नाहींत केविं कर त्याचे ।
निर्दय पाषाणानें बनले मन वाटतें असें साचें ॥ ९८ ॥
हरिला मम सूर्यासम सुत सन्ध्येसम सुता गमे राहे ।
निर्दय दैव असे हा शोक विदेहा असा करी पाहे ॥ ९९ ॥
शुभलक्षणें नराचीं देहीं पाहुनि तुझ्या मला मोद ।
झाला न तोंचि दैवें हाय दिला तीव्रसा शिशो खेद ॥ १०० ॥
पुत्रास हरुनि नेतां मजला मारून टाकिलें कां न ।
असतां शोक विदेहा करीत तिज जनक[7] बोलला वचन ॥ १०१ ॥
शोक प्रिये नको करु जिवन्त आहे कुठें तरी तनय ।
हुडकुनि आणीन तया शोकानें रहित गे करी हृदय ॥ १०२ ॥

( जनक राजानें दशरथ राजाला आपल्या पुत्राचें हरण कोणी दुष्टानें केल्याचें वृत्त कळविलें. व त्यानेंही पृथ्वीवर अनेक ठिकाणीं शोध केला. परंतु तो व्यर्थ झाला. )

---

१ हर्षयुक्तप्रेमानें. २ चन्द्रगति राजा. ३ स्वतःच्या हातांच्या ओंजळींत. ४ उत्तम कुलांत जन्मलेला. ५ सुंदर दांत असलेल्या प्रिये. ६ प्रसूतिगृहांत. ७ जनक राजा.

जनकें देऊनि पत्रें पाठविले बहु नृपाकडे दूत ।
निजमित्र दशरथासहि कळवी हृद्दाहकारि[1] हें वृत्त ॥ १०३ ॥
उभयें प्रयत्न केला शोधायाचा धरेवरी सतत ।
परि नच आढळला तो वाटे त्यांच्या मनास बहु खंत ॥ १०२ ॥
हळुं हळुं शोक जहाला कमी कमी बन्धु जाहले स्वस्थ ।
ऐसा कोणी नव्हता शोकानें जाहला न जो त्रस्त ॥ १०५ ॥
शुक्लेन्दुकला जैसी वाढे सीता क्रमें क्रमें वाढे ।
अद्भुत रूप तियेचें शोक कमी व्हावयास हेतु घडे ॥ १०६ ॥
उत्तम धान्य जियेमधिं पिकतें सीता अशा जमिनीस ।
वदती बुध वैदेही धरिते सीता अशा सुनामास ॥ १०७ ॥
शीलादिक जे सद्गुण धान्यें उत्तम हिच्यांत पिकतील ।
सीता सुनाम सार्थक हिचें असें बुध न कोण बोलेल ॥ १०८ ॥
चन्द्रासम मुख सुन्दर कोमल-पल्लवसमान कर दोन ।
मस्तकिं वैडूर्यासम कृष्ण तिचे केश शोभती छान ॥ १०९ ॥
भुवया नेत्रयुगावर वक्रधनुष्यासमान दिसतात ।
कंबर सिंहकटीसम[2] मनुजाचें हृदय लोभवी त्वरित ॥ ११० ॥
अतिमृदु बाहु तियेचे सुमनमालेसम मनास मोहविती ।
बकुलसम गन्ध सुन्दर वदनाचे श्वास अलिस[3] लोभविती ॥ १११ ॥
सोडून बालभावा आली यौवनदशेंत ती सीता ।
सुन्दर रतिसम शोभे किंवा वाटे जनास हरिकान्ता[4] ॥ ११२ ॥
कुचयुग पुष्ट तियेचे दोन सुधाकुम्भ जेवि हरिती मना ।
शंखासम कण्ठ तिचा करी तिरस्कृत सदैव पिकगाना[5] ॥ ११३ ॥
ती कमलाक्षी सीता रतिदेवी जेवि कामदेवास ।
दशरथपुत्रा रामा योग्यचि जो सकल सद्गुणावास ॥ ११४ ॥
ऐसा विचार आला श्रीजनकाच्या मनांत सुखकन्द ।
कळवि विदेहेस यदा झाला तिजला तदा परानन्द ॥ ११५ ॥
मन वचन काय यांनीं करिती जिनभक्ति भव्य जिनदास ।
ते रामासम होती ज्यांच्या मुखिं खेळतो सदा हास ॥ ११६ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे सीताभामण्डलोत्पत्त्यभिधानं नाम सप्तविंशतितमं पर्व ॥ २७ ॥

---

१ हृदयांत दुःख उत्पन्न करणारी हकिकत. २ सिंहाच्या कटीप्रमाणें. ३ भुंग्यास. ४ लक्ष्मी. ५ कोकिळांच्या गायनास.

# अठ्ठावीसाव्या पर्वांतील कथासार.

जनक राजाच्या राज्यांत कपोत, काम्बोज, शुक, माकन्द बर्बर आदि जातींचे म्लेच्छ मोठ्या सैन्यासह घुसले. अहिंसा सद्गुण त्यांना ठाऊकच नव्हता. या सर्वांच्यावर हुकमत चालविणारा अन्तरङ्गतम नांवाचा म्लेच्छ राजा होता. त्याची राजधानी मयूरपुर होती. या सर्वांनीं जनकाच्या प्रजाजनांना फार त्रास दिला.

जनक त्यांच्याशीं लढून त्यांना पिटाळून लावण्यास असमर्थ होता म्हणून त्यानें पत्र देऊन एक दूत दशरथ राजाकडे पाठविला. पत्रांत पुढील मजकुर होता.

" म्लेच्छांच्या आगमनानें सर्व सदाचार नष्ट झाला आहे. त्यांनीं जिनमंदिरें विध्वस्त केलीं आहेत. प्रजेचा नाश झाला तर आमचें जगणें काय उपयोगाचें? मुनिधर्म व श्रावकधर्म येथें नष्ट होण्याच्या अवस्थेत आहे. यास्तव मित्रा, दशरथा, माझी विनंति ध्यानांत घे व जितकें लौकर येतां येईल तितकें लौकर आपल्या मोठ्या सैन्यासह ये व आपण हें म्लेच्छापासून आलेलें संकट नाहींसें करूं."

जनकाचें पत्र वाचून राजा दशरथ दुःखी झाला. तत्काल त्यानें सैन्याला सज्ज होण्याची आज्ञा दिली. इतक्यांत रामचंद्र आपल्या पित्याकडें आले व मी व लक्ष्मण दोघेजण युद्धास जातो म्हणून आग्रह धरिला व सैन्यासह ते जनकाच्या राज्यांत येऊन पोहोंचले.

युद्धास सुरवात झाली. रामचंद्र व लक्ष्मण शत्रुसैन्यावर तुटून पडले. दोघांच्या अपूर्व पराक्रमापुढें शत्रु टिकाव धरूं शकले नाहींत. सर्व म्लेच्छ सैन्य पळत सुटलें. सह्य व विन्ध्य या पर्वताच्या दऱ्याखोऱ्यांत ते राहिले.

रामचन्द्र व लक्ष्मणाचा अपूर्व पराक्रम पाहून जनक राजाला फार सन्तोष वाटला. जनकाच्या देशावर आलेलें फार मोठें संकट रामचन्द्रानें नाहींसें केलें. पुनः प्रजेचीं धार्मिक व व्यावहारिक कार्यें सुरळित चालू झालीं. अशारीतीनें सर्व प्रजा सुखी झाली.

जनकानें आपली कन्या सीता रामचन्द्राला द्यावी असा आपल्या मनांत निश्चय केला.

अशुभकर्मांच्या उदयानें दुःख होतें. व शुभकर्मांच्या उदयानें सुख होतें म्हणून जिनेश्वराचे दास असलेल्या भव्य श्रावकांनीं धर्मांत प्रेम ठेवलें म्हणजे सांसारिक दुःखें नाहींशी होऊन सूर्याचें किरणांनीं जसें जग प्रकाशित होतें तसा त्यांच्या आत्म्यांत प्रकाश पडेल व ते धन्य होतील.

---

# अट्ठावीसावें पर्व

( जनक राज्यांत अनार्यांचा प्रवेश. )

जनकाच्या राज्यामधिं कपोत कम्बोज शुक नि माकन्द ।
या जातीचे घुसले अनार्य[1] ज्या हिंसनीं महानन्द ॥ १ ॥
वर्बर देशांतिल जे वर्बर नामक अनार्य ते घुसले ।
ज्यांच्या मनीं अहिंसा अचौर्य सत्यादि सुगुण नित्य सले ॥ २ ॥
यमनगरासम होतें मयूरपुर त्यांत अन्तरंगतम ।
राजा नान्दत होता अनार्य ज्याच्या मनांत न प्रशम[2] ॥ ३ ॥
आले अनार्य बहुविध जनकाचा देश घेरिला त्यांनीं ।
पीडा आर्यजनांना दिलीं तयें घोर कष्ट होय मनीं ॥ ४ ॥
दैत्यासमान जणु त्या सर्व अनार्यास रोधण्याकरितां ।
दशरथ मित्रा लिहिलें जनकानें पत्र वृत्त हें पढतां ॥ ५ ॥
यावें शीघ्र सहाय्या गेला तें पत्र दूत घेऊन ।
नमुनि तयाच्या चरणा देई तो त्यास आदरें करुन ॥ ६ ॥
आसनिं दूता बसवी वेष्टन काढून पत्र तो वाची ।
कळलें वृत्त तयाला करी तयारी ससैन्य जायाची ॥ ७ ॥

( जनकराजाच्या पत्राचा अभिप्राय. )

राजन् ! विनंति आहे माझी तुजला विनम्रभावानें ।
छळली जात असे मम जनता मित्रा अनार्य-दुष्टगणें ॥ ८ ॥
या म्लेच्छांनीं केले सगळे विध्वस्तसे सदाचार ।
गेले वर्ण लयाला झाला चोहीकडे अनाचार ॥ ९ ॥
झाला जरी प्रजेचा विनाश जगणें वृथाचि मग अमुचें ।
साधु श्रावक गोधन यांचें रक्षणचि हें असे साचें ॥ १० ॥
श्रावक अतिभक्तीनें करिती जिनपूजनादि-कार्यास ।
यव आदिक बीजांनीं यजिती जें खचित योग्य आर्यास ॥ ११ ॥
संगत्यागी मुनिवर ज्यांना आकाश हेंचि वस्त्र असे ।
आत्मध्यानीं तत्पर मोक्षाच्या साधनांत जें विलसे ॥ १२ ॥

---

१ म्लेच्छ.  २ शान्ति.

जिनमंदिरादिकामधिं उत्सव अभिषेक आदि जें कार्य ।
केलें जातें ज्याला म्हणती सद्धर्म सर्व जन आर्य ॥ १३ ॥
केलें जरी सुरक्षण प्रजाजनांचें तरीच रक्षित हें ।
होईल अन्यथा[१] नच विचार याचा मनांत तूं पाहे ॥ १४ ॥
बहुकोप-भूप रक्षी प्रेमानें जो समस्त भूमीस ।
परचक्र[२]-पराजित तो होत नसे जाय तो न खेदास ॥ १५ ॥
राजा करी प्रजेचें रक्षण धर्मार्थकाम-मोक्षास ।
मिळवी तेव्हां जाणी प्रजा सदा अन्यथा न ती त्यास ॥ १६ ॥
नृपबाहुबलच्छाया[३] मिळे जिला ती प्रजा सुखी होते ।
चतुराश्रम[४] बुध चिन्तुनि निजस्वरूपास बोलती ज्ञाते ॥ १७ ॥
ज्या भूपतिप्रदेशीं यतिजन राहून सुतप करितात ।
पुण्यांश ते सहावा देती राजास सुज्ञ वदतात ॥ १८ ॥
यास्तव साधु श्रावक गोधन रक्षावयास झडकरि ये ।
मित्रा ! विपुलचमूसह[५] विज्ञप्ति अशी तुला असे विनयें ॥ १९ ॥
दूत हि वदला आपण मित्रा संकटिं सहाय करण्यास ।
यावें शीघ्र अनार्या पळवून हरा सुमित्रहृच्छल्यास[६] ॥ २० ॥
कुलदेवता स्मृतीनें हरी जसें कष्ट तेवि दूर करा ।
जनकनृपाचें राजन् अपुल्यासम मित्र त्यास नच दुसरा ॥ २१ ॥
या दुष्टांनीं केले जनकनृपाच्या समस्त-राज्यांत ।
जिनमंदिरें विनाशुनि जिनमूर्तिध्वंसनें अनर्थशत ॥ २२ ॥
धन-धान्य-वस्त्रभूषण-भार्यादिक हरुनि सकल जनतेचे ।
पीडा पापी देती धर्मध्वंसचि तया सदैव रुचे ॥ २३ ॥
यास्तव आपण येउनि ससैन्य तत्सङ्कटास शीघ्र हरा ।
त्याच्या प्रजाजनांना सुखवुनि निश्चित सुमित्र कार्य करा ॥ २४ ॥
यापरि दशरथ ऐकुनि यात्राभेरीस वाजवी रोपें ।
सज्जन सज्जनरक्षण-कार्यीं करितिल विलम्बना[७] कैसें ॥ २५ ॥

---

१ नाहींतर. २ शत्रुसैन्याकडून पराभव. ३ राजाच्या भुजबल[illegible].
४ ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व भिक्षुक असे चार आश्रम. ५ विशाल सैन्यासह.
६ उत्तम मित्राच्या हृदयांतलें दुःख. ७ उशीर.

श्रीराम दशरथाला वदला म्लेच्छ-क्षयार्थ जरि गमन ।
आपण कराल ताता सानुजजन[1] हा करील कां शयन ? ॥ २६ ॥
असमर्थ राम आहे आला ऐसा विचार मनिं काय ? ।
इक्ष्वाकु-वंशि जन्मे जो विक्रमहीन तो नसे तनय ॥ २७ ॥
व्हावें प्रसन्न ताता म्लेच्छच्छेदार्थ आपुला तनय ।
आहे समर्थ आज्ञा द्यावी आणीन मी अवश्य जय ॥ २८ ॥
यापरि वोलुनि वचना पित्राज्ञा राम मिळवि झणि जाया ।
घेरी म्लेच्छां सैन्यें दवडी तो वेळ अल्पहि न वाया ॥ २९ ॥
(राम-लक्ष्मणांच्या पराक्रमानें म्लेच्छ दहा दिशांना पळून गेले.)
रोषान्ध म्लेच्छांचें सैन्य लढे गाजवी महाशौर्य ।
करि अन्ध शस्त्रवृन्दें सोडी परि राम सैन्य नच धैर्य ॥ ३० ॥
रणनाटकभेरीसम करी टणत्कार राम दोरीचा ।
सज्ज धनुष्य करी तो वदनीं उपहास दावितो साचा ॥ ३१ ॥
भ्रभङ्गहि न करीं तो स्थिर भूवरि सुरजनास[2] जणु वाटे ।
परि त्याच्या हृदयामधि अपारसा तीव्र-वीररस दाटे ॥ ३२ ॥
व्याध जसा वधि हरिणा त्यापरि हा राम विपुलसैन्यास ।
अस्त्रांनीं विद्ध करी ऐसें हें कर्म साध्य नान्यास ॥ ३३ ॥
जनक वराक[3] असे हा त्याचें हें सैन्य मशक-तुल्य असे ।
साहाय्यार्थ समागत सैन्यांतहि फक्त दीनताचि वसे ॥ ३४ ॥
परि हे नभस्तलाला आच्छादुनि येति वाण कोठून ।
गरुडासम[4] भय वाटुनि अन्योन्या म्लेच्छ बोलती वचन ॥ ३५ ॥
होऊन कुपित[5] विस्मित धनुराकर्षण[6] करील ते येती ।
रामासंनिध राजे म्लेच्छांचे बाणवर्षणा करिती ॥ ३६ ॥
राम बहु-शीघ्रवेधी[7] दृढघाती[8] शरभतुल्य शौर्य करी ।
मारीं म्लेच्छा गजसम पळती उरती न तेधवा समरीं ॥ ३७ ॥
जाती दहा दिशांना काक जसे घावरून ते पळती ।
जनक स्वस्थ जहाला त्याची रामांत वाढली प्रीति ॥ ३८ ॥

---

१ धाकट्या भावासह हा राम झोपेल काय ? २ देव. ३ दीन.
४ चिलटासारखें. ५ रागावलेले व आश्चर्ययुक्त झालेले. ६ धनुष्य ताणीत.
७ लौकर विद्ध करणारा. ८ मजबूत प्रहार करणारा.

झाली तदागमानें जनकाला तेधवा वरप्राप्ति ।
जयलाभ हि त्या युगपत् तन्मुखि पसरे प्रसन्नता-कान्ति ॥ ३९ ॥
ते पळत सर्व असतां लक्ष्मण त्यांना धरावया धावे ।
अतिशय-भय-भावानें दिग्ज्ञानें तया न जाहलें ठावें ॥ ४० ॥
सन्तत शरधारेची वृष्टि तयावरि करून बहु दूर ।
पळवी लक्ष्मण नृप परि आन्तरतम जो असे महाशूर ॥ ४१ ॥
त्यानें धरून धैर्या स्वसैन्य तत्काल सकल थाम्बविलें ।
लक्ष्मणिं शरवर्षण करि धनुष्य शतखण्ड तत्क्षणीं केलें ॥ ४२ ॥
विरथहि केलें तेव्हां धनुष्य दुसरें करांत घेऊन ।
आरोहण अन्यरथीं लक्ष्मण करि कुपित हृदयिं होऊन ॥ ४३ ॥
झालें रण उभयांचें पुनरपि ये राम लक्ष्मणासाठीं ।
घेऊन तीक्ष्ण खड्गा म्लेच्छ नृपाच्याच लागला पाठीं ॥ ४४ ॥
जाळी अग्नि वनाला राम तसा भासला तया समरीं ।
सर्व म्लेच्छा पळवी कषायबल जेवि जैन साधु हरी ॥ ४५ ॥
गिरिसह्य विन्ध्य यांच्या गेले ते म्लेच्छ सर्व सोडून ।
राहती दरी-गुहामधिं दुःखानें कन्दमूल सेवून ॥ ४६ ॥
नन्तर राम सलक्ष्मण जनका स्थिर करुनि धीरभावानें ।
गेला स्वपुरा दशरथपद वन्दी स्पर्श करुनि नम्रपणें ॥ ४७ ॥
झाला आनन्द जिला विस्मित मानस जिचें असे झालें ।
शोभे पृथिवी सगळी कृतयुग जणु आज वैभवें आलें ॥ ४८ ॥
धर्मार्थ-काम तत्पर पुरुषांनीं भूमि शोभली सारी ।
शोभे नक्षत्रें नभ हिमनाशें जेवि सकल अधिकारी ॥ ४९ ॥
हें रामशौर्य पाहुनि दुहिता जी लोकसुन्दरी सीता ।
जनकें प्रसन्न होउनि दिली मनें त्यास सकलसुगुणरता ॥ ५० ॥
जीवीं जगिं कर्मोदय वियोग संयोग हेतु होतात ।
दुःख सुखें जन भोगिति तन्नाशें होति मुक्तिसंयुक्त ॥ ५१ ॥
श्रीराम वीर झाला भुवनीं प्रख्यात सकल जनमान्य ।
जिनदास सद्गुणांनीं रवि किरणांनीं जसा गमे धन्य ॥ ५२ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास [illegible]
पद्यानुवादे म्लेच्छपराजयसंकीर्तनं नाम अष्टाविंशतितमं पर्व ॥ २८ ॥

---

१ दिशांची माहिती. २ क्रोध, मान, माया, लोभ [illegible] सैन्य. ३ सर्व वितळून गेल्यानें. ४ कन्या. ५ सर्व सद्गुणांत तत्पर असलेली सद्गुणी. ६ [illegible].

## एकोणतिसाव्या पर्वांतील कथेचा सारांश.

रामचन्द्र व लक्ष्मण यांच्या शौर्याची कीर्ति ऐकून नारदांना आनंद वाटला व ते नेहमी तिचें वर्णन करूं लागले. श्रीरामचन्द्रांना जनक राजा आपली कन्या सीता देणार आहेत हें वृत्त ऐकून तर तिला पाहण्याची तीव्र इच्छा त्यांच्या मनांत उद्भवली व ते मिथिलापुरीस आले. राजाच्या कन्येच्या घरीं त्यांनीं प्रवेश केला. सीता त्यांच्या दृष्टीस पडली. तिला पाहून ते अतिशय आनंदित झाले. नारदाच्या जटा नि डोळे पिंगट होते. पोट डेऱ्याप्रमाणें मोठें होतें. कंबरेला लंगोटी होती. बाकीचे सर्व अवयव बारीक होते. अशा त्यांना पाहून भिऊन सीतेनें किंकाळी फोडली. ती थरथर कांपू लागली. पायापासून मस्तकापर्यन्त तिच्या अंगावर रोमांच उत्पन्न झाले. तत्काल दासी धावून आल्या. कोणीं त्यांचा गळा पकडला, कोणी जटा व कोणी हात पकडले. नारदाचें शरीर भीतीनें थरथरूं लागलें. तत्काल तेथें शस्त्रधारी शिपाईही हाणा, मारा, ठोका असें म्हणतच आले.

त्यांच्या हातून कसें तरी निसटून नारद आकाशमार्गानें कैलास पर्वतावर जाऊन तेथें थांबले. भीतीनें त्यांना दरदरून घाम आला होता. कसें तरी आपण सुटलों म्हणून त्यांनीं श्वास सोडला. व क्रोधानें हिला संकटांत टाकलें पाहिजे याचा विचार त्यांच्या मनांत आला. त्यांनीं तिचें सुंदर स्वरूप वस्त्रावर रेखाटलें व तो चित्रपट त्यांनीं चन्द्रगति राजाच्या उद्यानांतल्या क्रीडामंदिरांत ठेवलें. व तेथून स्वारी कोठें तरी निघून गेली.

थोड्यावेळानें राजाचा पुत्र भामण्डल तेथें आला. त्याला तें अत्यंत सुंदर चित्र दिसलें तें पाहून तो अगदीं लुब्ध झाला. त्याला हिची प्राप्ति केव्हां होईल असें सतत वाटूं लागलें. झोप घेणें, जेवणें, क्रीडा करणें इत्यादि व्यवहार त्यानें त्यागले. तो मौन धारण करून बसला. केव्हां जमीनीवर लोळे, केव्हां हंसे, केव्हां उठून पळे अशा पिशाचग्रस्ताप्रमाणें चेष्टा करूं लागला. तेव्हां याच्या मनांत कामविकार उत्पन्न झाला असें त्याच्या मित्रांनीं ओळखलें.

दोन-चार दिवसांनीं नारदांची स्वारी तेथें आली. त्यांना भामंडलाच्या मित्रांनीं चित्रपटांतील स्त्रीची हकीकत विचारली. त्यांनीं जनक राजाची कन्या सीतेचा तो चित्रपट आहे असें सांगितलें. ही सीता भामंडलास अतिशय आवडेल म्हणून तिचें चित्र मी लिहिलें आहे असें सांगून ते निघून गेले. मित्रांनीं सर्व हकीकत राजा चन्द्रगति व राणी पुष्पवती यांना सांगितली. आपल्या पुत्राची कठिण अवस्था पाहून त्यांना वाईट वाटलें व तिच्याशी आपल्या मुलाचा विवाह कोणत्या उपायानें करतां येईल याचा राजा व राणी विचार करूं लागले.

त्यांनीं आपला चपलगति नांवाचा विद्याधर नोकर मिथिलेकडे पाठविला. त्यानीं त्याला जनक राजाला युक्तीनें आपल्या गांवीं रथनूपुरांत घेऊन येण्याचें कार्य सोपविलें— तो विद्याधर अतिशय सुंदर घोड्याचें रूप धारण करून गांवांत गेला. असला सुंदर घोडा पाहून राजानें त्याला तबेल्यांत बांधून ठेवण्यास व त्याचें उत्तम रीतीनें रक्षण पोषण करण्यास नोकरांना सांगितलें.

एके दिवशीं राजाकडे कांहीं नोकर आले व म्हणाले राजन् जंगलांत आम्हीं एक मोठा हत्ती पकडून ठेविला आहे तो आपण पाहावयास चला. राजानें बरें म्हटलें व तो त्याच घोड्यावर बसून जंगलांत गेला व हत्तीला पाहून तो हत्ती तुम्हीं गावांत आणा असें सांगून पुनः घोड्यावर बसून राजा नगराकडे निघाला. घोडा थोडेसें अंतर चालून एकदम आकाशांत उडून आकाशमार्गानें अत्यंत वेगानें जाऊं लागला. थोड्याच वेळांत अनेक पर्वत, नद्या, गांवें, शहरें ओलांडून रथनूपुर नगराच्या बाहेर एका वृक्षाखालून जात असतां त्या वृक्षाच्या फांदीस राजानें दोन्हीं हातांनीं पकडलें व तो फांदीवर बसला.

विद्याधरानें घोड्याचें रूप टाकलें. तो आपल्या राजाकडे— चंद्रगतिकडे गेला व सर्व हकीकत त्यानें त्याला कळविली. इकडे राजा जनक झाडावरून खालीं उतरला. त्याला एक सुंदर व मोठें जिनमंदिर दिसलें. तेथें त्यानें आदिजिनेंद्रांची अतिशय सुंदर प्रसन्न मुद्रेची मोठी मूर्ति पाहिली. मोठ्या भक्तीनें स्तुति नमस्कार करून तो आनंदानें मंडपांत बसला. इतक्यांत चन्द्रगति राजा आपल्या परिवारासह तेथें आला. जिनस्तुति-वंदनादिक करून मण्डपांत येऊन त्यानें राजा जनकाला नमस्कार करून त्याचा परिचय करून घेतला. नंतर त्यानें जनकाला माझ्या पुत्राला आपली कन्या सीता द्यावी अशी विनंति केली.

राजा म्हणाला राजन्, माझ्या राज्यांत अनेक म्लेच्छ राजे आपल्या सैन्यासह आले व माझ्या प्रजेला छळून त्यांनीं लुटालूट केली. त्यावेळीं दशरथ राजाचे पुत्र रामचंद्र व लक्ष्मण सैन्यासह येऊन अतिशय शौर्यानें लढले. त्यांना त्यांनीं फार दूर सह्य विन्ध्यादि पर्वताकडे पिटाळून लाविलें. याप्रमाणें फार मोठें संकट दूर केल्यामुळें रामचंद्राला माझी मुलगी सीता देण्याचा संकल्प केला आहे– तो मी प्राण गेला तरी बदलणार नाहीं.

हें ऐकून चन्द्रगति राजाच्या मंत्र्यांनीं म्हटलें "राजन्, आमच्या येथें वज्रावर्त व सागरावर्त या नांवाचीं दोन धनुष्यें आहेत. त्यांना जर दोरी चढवून रामचंद्र तीं सज्य करील तर तूं आपली कन्या त्याला दे व जर तो असें करण्याला समर्थ झाला नाहीं तर आम्ही तुझ्या कन्येचें हरण करून तिचा भामंडलाशीं विवाह करूं." हें त्याचें म्हणणें जनकानें मान्य केलें. यानंतर तें मंत्रिमंडळ व जनक राजा मिथिलेला आले.

मिथिला नगरीच्या बाहेर राजा जनकानें मोठा स्वयंवर-मंडप बनविला. व विद्याधर दूतांना पाठवून अनेक राजांना स्वयंवरासाठीं आमंत्रणें दिलीं. राजे आपल्या परिवारासह वैभवासह आले. मंडपांत मञ्चकावर विराजमान झाले.

राजा दशरथ आपल्या राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न या चार पुत्रासह स्वयंवर-मंडपांत येऊन बसला. मंडपाच्या मध्यभागीं तीं दोन दिव्य धनुष्यें आणून ठेविलीं होती.

राजा जनक, राणी विदेहा व कन्या सीता आपल्या मैत्रिणीसह मंडपांत आल्यानंतर 'बहुश्रुत' कंचुकीनें सर्व राजांची माहिती सांगितली. व नंतर मध्यभागीं स्थापन केलेल्या दोन धनुष्यांना सज्य करणाऱ्या राजाच्या गळ्यांत सीता वरमाला घालील असें जाहीर केलें..

राजांना हें कार्य आपण लीलेनें करूं असें वाटलें. पण जेव्हां तें धनुष्य सज्य करावयास आले त्यावेळीं त्याच्यांतून प्रचंड ज्वाला व फूत्कार निघू लागले. त्यामुळें कित्येक राजे मागें सरून आपल्या स्थानीं कष्टानें आले, कित्येक मूर्च्छित झाले व कित्येक फूत्कारानें उडून जाऊन पडले. शेवटीं रामचंद्र जवळ आले तेव्हां वज्रावर्त धनुष्य गुरूच्या पुढें शिष्य जसा नम्र होतो त्याप्रमाणें शांत झालें व रामचंद्रांनीं तें सज्य केलें. सीतेनें त्यावेळीं सलज्ज होऊन वरमाला त्यांच्या गळ्यांत घातली.

लक्ष्मणानेंही सागरावर्त धनुष्य सज्य केलें तेव्हां चन्द्रवर्धन विद्याधर राजानें अठरा कन्या त्याला दिल्या.

हें अद्भुत कार्य पाहून भरताच्या मनांत खिन्नता उत्पन्न झाली. त्याच्या मुखाची कांति फिक्की दिसू लागली. त्यानें असा विचार केला "राम व लक्ष्मण व मी एका कुलांत जन्मलों. दशरथ राजा आम्हा तिघांचाही पिता परंतु यांनीं अद्भुत कार्य करून दाखविलें. मला तें करतां आलें नाहीं. माझें पुण्यकर्मच कमी. मी उत्तम कार्यें केली नाहींत मग मला उत्तम फल कसें मिळेल? अथवा परक्याचें वैभव, उत्कर्ष पाहून स्वतः खिन्न होणें योग्य नाहीं. असो असा विचार तो करीत असतां भरताच्या मातेनें त्याच्या मुखावरील भाव ओळखला. हा विरक्त होऊन निघून जाईल असा विचार करून तिनें दशरथ राजाला ही गोष्ट सांगितली. जनकाच्या भावाचें कनक असें नांव होतें व त्याच्या मुलीचें नांव हेमाभा– किंवा कनकप्रभा असें होतें. त्यानें आपली मुलगी भरताला दिली. मोठ्या थाटानें तिघांचा विवाह झाला. दशरथ व जनक राजांनीं सर्व राजांना वस्त्रालंकारांनीं आदर करून आपआपल्या नगरांना पाठविलें.

रामचन्द्र, लक्ष्मण, भरत, दशरथ हे सर्व अयोध्येला येऊन आनंदानें सुखोपभोग घेत राहिले. जे भव्य जिनदास होऊन दानादिक कर्तव्यांनीं पुण्य मिळवितात त्यांना रामचन्द्रादिकाप्रमाणें– ऐश्वर्यादिक प्राप्त होतें व ते सुखी होतात.

———•———

# एकोणतीसावें पर्व

पसरे राम-पराक्रमयश तें ऐकून नारदा मोद ।
वाटे रामकथेविण त्याच्या चित्तास होय बहु खेद ॥ १ ॥

( सीतेचें सौंदर्य पाहण्यासाठीं नारदाचें मिथिलेला आगमन. )

रामास जनकभूपति सीता देईल वृत्त ऐकून ।
तद्रूपदर्शनास्तव नारद मिथिलापुरीस करि गमन ॥ २ ॥
मानुनि कौतुक बहु मनिं कन्यासदनीं प्रवेश शीघ्र करी ।
सीतारूपा पाहुनि हृदय तयाचें महाप्रमोद वरी ॥ ३ ॥

( नारदाचें रूप पाहून सीता किंकाळी फोडते. )

केश नि डोळे पिंगट पोट जयाचें दिसे विशाल जना ।
दण्ड-कमण्डलु-छत्रा करीं धरी उग्रता दिसे वदनीं[1] ॥ ४ ॥
भार जटांचा मस्तकिं लंगोटी कटितटीं[2] जयास असे ।
कृशता देहावयवीं भीषण नारद असा तियेस दिसे ॥ ५ ॥
जणु मूर्तिमन्त पुढती भय माझ्या ठाकलें उभें वाटे ।
थर थर शरीर कांपे आपदशीर्षान्त[3] दाटले काटे ॥ ६ ॥
किंकाळी ती फोडुनि गर्भागारीं महाभयें शिरली ।
धावुनि ये दासीगण घेरी तो नारदास त्या काळीं ॥ ७ ॥
कोणीं कंठीं धरिला कोणी शेंडीस घालती हात ।
कोणी करयुग धरिती कंप सुटे नारदीयदेहांत[4] ॥ ८ ॥
तत्काल शस्त्रधारी यमदूतासम कराल[5] नर आले ।
पकडा मारा ठोका क्रूर असे शब्द ते मुखें वदले ॥ ९ ॥
घाबरलेला नारद कैसें तरि सुटुनि संकटांतून ।
तेथून नभो-मार्गें कैलासनगावरी[6] करी गमन ॥ १० ॥
केला विचार चित्तीं झालें मम आज हें पुनर्जनन ।
ज्वालाकुलखगसम[7] मम सुटका जणु हो दवानलांतून[8] ॥ ११ ॥

---

१ तोंडांत. २ कंबरेंत. ३ पायापासून डोक्यापर्यन्त. ४ नारदाच्या. ५ भयंकर. ६ पर्वतावर. ७ अग्नीच्या ज्वालांनीं होरपळलेल्या पक्ष्याप्रमाणें. ८ वनांतील अग्नींतून.

कम्प वपूचा झाला कमी पुसे घाम तो कपाळाचा ।
बांधी जटासमूहा दीर्घोष्णश्वास सोडि तें साचा ॥ १२ ॥
कोपें चिन्ती हृदयीं वलून तो हालवी स्वशीर्षास ।
सीतारूपा पाहुनि पडलों या संकटीं अनायास ॥ १३ ॥
या कन्येला आतां छलीन शोधून मी उपायास ।
मी नारद नांवाचा करीन मी निश्चयें अपायास ॥ १४ ॥
यापरि मनांत चिन्तुनि तेथुन रथनूपुरास येऊन ।
उपवनि वसून सीतारूप पटीं तो लिहीतसे छान ॥ १५ ॥
ठेवून चन्द्रगतिच्या क्रीडासदनांत तो सुखें गेला ।
जिनवन्दनादिकार्यीं कांहीं दिनिं पुण्यसंचयीं रमला ॥ १६ ॥
इकडे चन्द्रगतीचा भामण्डल पुत्र येइ उद्यानीं ।
मित्रजनासह तेथें चित्रपटा पाहि विस्मयें नयनीं ॥ १७ ॥
सर्वावयवीं सुन्दर बघून तें चित्र मित्र नयनांचें ।
अत्यन्त लुब्ध झाला सुचित्र नेत्रापुढें सदा नाचें ॥ १८ ॥
चित्रगत-स्त्री पाहुनि तिचेंचि चिन्तन मनांत सतत करी ।
निद्रा न त्यास लाभे अन्नीं पानीं प्रमोद मन न धरी ॥ १९ ॥
मौनचि धरून राही हलुनि उठे तेवि भूमिवरि लोळे ।
कामें ग्रस्त जहाला पडून शयनीं नि शीघ्र उठुनि पळे ॥ २० ॥
ही कामदशा आहे ऐसे जन चतुर मित्रही वदले ।
चित्रपट यास कारण नारद ठेवून या स्थळीं गेले ॥ २१ ॥

(चित्रपटांतील स्त्रीचें कथानक नारद सांगतात.)

येतां नारद तेथें बसवुनि आसनिं नि तत्पदा नमुनि ।
कन्या कोण कुणाची सुमित्र वदले वदे तदा हसुनि ॥ २२ ॥
भूवरि मिथिला-नगरी राज्य तिथें जनक नाम नृपति करी ।
राणी तया विदेहा सौन्दर्यें भूषवित चित्त हरी ॥ २३ ॥
या उभयांना झाली सीता बाला [illegible] ।
हा चित्रपट तिचेचा काढिलें तुम्हांस सफल हें रूप ॥ २४ ॥

१ पीडा. २ बरोबर. ३ [illegible]
४ भूषणस्वरूप.

यापरि बोलुनि वदले नारद भामण्डलास वा पुत्र ।
सुलभ प्राप्ति इयेची तिजला तूं सर्वदा असे पात्र ॥ २५ ॥
यापरि परिचय बोलुनि गेले नारद निजेष्ट आवासा ।
स्मरशरपीडित होउनि भामण्डल भोगि तीव्र-दीनदशा ॥ २६ ॥
हें स्त्रीरत्न मिळे जरि जगेन मी नान्यथा असे मानी ।
कष्टें निजगृहिं जाई सांगे न पित्या तथापि तो मानी ॥ २७ ॥
मित्रें कथिली वार्ता जेव्हां धावूनि येइ चन्द्रगती ।
पाहुनि निजभार्येसह पुत्रदशा हृदयिं होय खिन्नमति ॥ २८ ॥
आर्ये ! अनुपम असतां खगकन्या परमसुन्दरा इच्छी ।
भूगोचर-भूपाची उणीव भासे मला विवेकाची ॥ २९ ॥
त्याच्या सदनीं जाउनि कन्येची याचना तया करणें ।
योग्य न मज हें वाटे गमतें त्याहून उचित मज मरणें ॥ ३० ॥
देईन न निजकन्या ऐसें तो जरि वदेल आम्हांस ।
मुखकान्ति मलिन होइल होइल आयास तीव्र हृदयास ॥ ३१ ॥
परि कोणत्या उपायें कन्येचा जनक जनकनृप येथें ।
आणावा न सुचें मज कान्ते ! वद उचितशा उपायातें ॥ ३२ ॥
( चपलवेग विद्याधर घोड्याचें रूप धारण करून मिथिलेला येतो. )
निजभृत्य चपलवेगा हें कार्य करावयास सांगावें ।
कन्यापितृगृहिं जाइल उल्लंघुनि तो अनेक शत गावें ॥ ३३ ॥
आज्ञादानें प्रमुदित हृदयीं तो चपल चपलगति झाला ।
हयवेष करुनि धारण येई तो शीघ्र चतुर मिथिलेला ॥ ३४ ॥
गाई महिषी घोडे दिसतां तो जाय शीघ्र धावून ।
चावे लाथा हाणी झाला भयभीत सकल मनुजगण ॥ ३५ ॥
कोलाहल प्रजेचा जाणुनि नृपजनक अश्व पाहाया ।
नगराबाहिर आला बघतां भय हर्ष होय तद्धृदया ॥ ३६ ॥
आवर्तादिक पाहुनि सुलक्षणें मोद नृपतिमनिं झाला ।
आला कोठुनि हय हा शोध करा भूप तेधवा वदला ॥ ३७ ॥

---

१ योग्य. २ आपल्या आवडत्या ठिकाणीं. ३ अभिमानी. ४ कन्येच्या बापाच्या घरीं. ५ घोड्याचें रूप. ६ भोवरा आदिक चिन्हें.

ब्राह्मण कांहीं वदले घोडा पृथ्वीवरील हा नाहीं ।
तव शुभदैवें आला स्वीकारी यास दोष नच कांहीं ॥ ३८ ॥
सूर्यरथीं ही ऐसा घोडा नाहीं असें मना वाटे ।
विधिनें तुझ्याचसाठीं रचिला संशय न भासतो कोठें ॥ ३९ ॥
ऐकून द्विजवचना तुरङ्ग नेला स्वमन्दिरीं मोदें ।
सेवा करिती नोकर मासान्तीं एक दूत ये नि वदे ॥ ४० ॥
राजन् वनांत एके ठायीं गिरिसम विशाल गज एक ।
पकडून ठेविलेला आहे बघतांचि होय हृदयिं सुख ॥ ४१ ॥
आनन्दुनि नृप बैसुनि अश्वावरि गज बघावया गेला ।
पाहुनि आणायास्तव नगराप्रति सेवकास तो वदला ॥ ४२ ॥
बैसुनि पुनरपि अश्वावरी निघे जावया स्वनगरास ।
नभिं उंच उडे हय तो वाटे आश्चर्य सकल सुजनास ॥ ४३ ॥
पर्वत देश नदी वन नगरें लंघून दूर बहु जाई ।
हें दृश्य बघुनि जनतामनांत साश्चर्यदुःख बहु होई ॥ ४४ ॥
नच दूर एक पाही उच्चप्रासाद[1] जनक त्या समयीं ।
एका महाद्रुमाची दृढशाखा करयुगें धरी पाही ॥ ४५ ॥

( जिनमन्दिरांत प्रवेश करून जनक जिनभगवान् वंदन करितो. )

नन्तर उतरे खालीं विश्रामास्तव बसे शिलेवरती ।
साश्चर्य खिन्न होउनि चाले तेथूनही पुढें नृपति ॥ ४६ ॥
अति उंच गोपुरासह सुवर्ण तट तोरणें मनोज्ञ[2] वपे ।
फल-पुष्प-समृद्ध-द्रुम-लतादि लंघून त्या स्थलास निघे ॥ ४७ ॥
उच्चप्रासादाच्या सभोंवती सौध मण्डलाकार[3] ।
पाही अनेक भूपति विस्मय वाटे तदीयमनिं फार ॥ ४८ ॥
उजव्या करांत घेउनि खड्ग रिपु गोपुरांत नृप धीर ।
पाही सुरम्य सौधा त्रिभुवनवैभव ज्यांत भरपूर ॥ ४९ ॥
स्वर्गांतुनि जणु खालीं आलें हें सुरविमान या ठायीं ।
किंवा पातालांतुनि धरणप्रासाद येइ या समयीं ॥ ५० ॥

---

१ उंच मोठें जिनमंदिर. २ मोठ्या लाटांनी भरून पाही. ३ सुंदर.
२ गोलाकाराचे.

अश्वें हरून मजला केला उपकार फार मनिं वाटे ।
मज लाधलें न असतें अपूर्व वघण्यास भाग्य कां कोठें ॥ ५१ ॥
यापरि करुनि विचारा केला जिनमन्दिरीं प्रवेश तयें ।
पूर्णेन्दुसुन्दरमुखा वघून वन्दी जिनेश्वरा विनयें ॥ ५२ ॥
भक्तिप्रसन्नहृदयें करुनि गुणस्तुति पुनः पुन्हा वन्दी ।
अम्वुजकलिकाकृतिधर[1] करून करयुग नि होय आनन्दी ॥ ५३ ॥
खग चपलवेग इकडे अश्वाकारा त्यजून खड्गकर ।
होउनि निजप्रभुकडे आला वोले नमून वहु चतुर ॥ ५४ ॥
जनकास आणिलें मी वसला तो श्रीजिनेन्द्रसौधांत ।
स्तुति करित जिनवराची जावें आपण विभो ! तिथें त्वरित ॥ ५५ ॥
जनकागमना जाणुनि झाला श्रीचन्द्रगति मनीं मुदित ।
अष्टद्रव्यें घेउनि निघे खगेश स्वपरिजनें युक्त ॥ ५६ ॥
नानावाद्यांचा ध्वनि ऐकुनि मिथिलेश सभय मनिं झाला ।
वहुविध-विमानवृन्दें जिनसदननभः-प्रदेश[2] गजवजला ॥ ५७ ॥
पाहुनि विमानवृन्दा हा विजयार्ध-प्रदेश मज वाटे ।
ऐसें ज्ञान तयाला होतां तच्चित्त विस्मयें दाटे ॥ ५८ ॥
विभवें समृद्ध पाहुनि हा खगपति विपुल कान्तिमान् भासे ।
हा मुख्य या जनांचा सर्वांत खुलून मन्मनास दिसे ॥ ५९ ॥

( चन्द्रगति व जनक यांचें भाषण. )

यापरि विचार असतां करीत ये मन्दिरांत चन्द्रगति ।
वन्दुनि जिनपदपद्मा तद्गुण कवनांत लीन हो सुमति ॥ ६० ॥
अङ्कावरी[3] प्रियेसम मधुस्वरा[4] स्थापिली तयें वीणा ।
गान करी वहु भावें जिनगुणगण-चिन्तनांत लीनमना ॥ ६१ ॥
त्रिभुवनवरदा वन्दन करा जिनेन्द्रा सदैव वृषभास[5] ।
पावेल भवभवींचें पातक जें दुःखदायि नाशास ॥ ६२ ॥
सर्व सुरासुर पूजिति ज्याच्या चरणा अनन्यशरणास[6] ।
मीं वंदितों तयाला मम मिटवायास जन्म-मरणास ॥ ६३ ॥

---

१ कमळाच्या कळीच्या आकाराला धारण करणारें. २ जिनमंदिरांतील आकाश प्रदेश. ३ मांडीवर. ४ मधुर झंकार करणारी. ५ आदिनाथ जिनेन्द्रास. ६ ज्याच्यासारखा दुसरा रक्षक नाहीं.

यापरि गाउनि जिनगुण वसला असतां प्रसन्न चित्तानें ।
श्रीचन्द्रगति खगेश्वर करी नमस्कार जनक विनयानें ॥ ६४ ॥
होऊन नम्र वदला चन्द्रायण, भूपतीस कोठून ।
आपण येथें केलें येणें सांगाल काय भो सुजन ॥ ६५ ॥
मित्रा ! शुभाक्षरें वद हर्षित करितील जीं स्वनामाचीं ।
परिचय होउनि जन्मे स्नेह जया भीति नच विरामाची ॥ ६६ ॥
मी मिथिलानगरीपति माझें श्रीजनक हें असे नाम ।
मायाहयहृत होतां दिसलें मजला अपूर्व हें धाम ॥ ६७ ॥
यापरि जनकें वदतां झाला उभयास अन्तरीं मोद ।
अन्योन्य-नमस्कारें वात्सल्य व्यक्त करिति ते विबुध ॥ ६८ ॥
कुशलप्रश्नानन्तर जनक-नृपालास चन्द्रगति बोले ।
पुण्योदय मम मोठा दर्शन भवदीय ज्यामुळें झालें ॥ ६९ ॥
जनकनृपाला ! तुजला सुन्दर शुभलक्षणी असे बाला ।
मज वृत्त ऐकतां हें प्रमोद नानाजनाननें झाला ॥ ७० ॥
" भामण्डल नांवाचा मजला सत्पुत्र विक्रमी सुगुणी ।
द्यावी तयास बाला मी कर जोडून बोलतो वाणी " ॥ ७१ ॥
" मित्रा वचन तुझें हें अयोग्य आहे असें वदे कोण ।
दशरथ-तनया रामा द्याया संकल्प मम असे जाण " ॥ ७२ ॥
कारण त्याचें कथितों असंख्यसे म्लेच्छ शिरुनि मम देशीं ।
छळिती बहु प्रजेला करुणाघनराम शौर्यगुणराशि ॥ ७३ ॥
निजबन्धु-लक्ष्मणासह आला धावून युद्ध घनघोर ।
करुनि म्लेच्छांचा तो पिटाळिला क्रूर दूर बहुपूर ॥ ७४ ॥
ते म्लेच्छ सर्व रामें न जिंकिले जरि पराक्रमें गेले ।
असतें भूमण्डल हें म्लेच्छांनी व्याप्त तेधवा झालें ॥ ७५ ॥
अविवेकी ते होते विषसम दारुण तदीक्षण होतें ।
श्रावकधर्म लयाला गेला असतां न साधुही उरते ॥ ७६ ॥
या राम-लक्ष्मणांच्या पराक्रमें इन्द्रतुल्य करि राज्य ।
दशरथनृपाल संप्रति सुजनगणी [illegible] ॥ ७७ ॥

---

१ नावाची. २ नानाजन बोलतात [illegible]. ३ [illegible]. ४ [illegible]
५ आवडे. ६ अनेकांच्या बोलण्याने. ७ [illegible].

प्रत्युपकार करावा रामावरि कोणता अशी चिन्ता ।
उत्पन्न हृदयिं झाली माझ्या जेणें प्रमोद हो सन्ता ॥ ७८ ॥
नवयौवना शुभाङ्गी दुहिता सीता तयास देऊन ।
उपकार-मुक्त व्हावें जावें चिन्तासमुद्रही तरुन ॥ ७९ ॥
सङ्कल्प मी तयाला देण्याचा खगनृपाल दृढ केला ।
बदलेन कदापि न मी प्राणहि सोडून वपुंस[1] जरि गेला ॥ ८० ॥

( चन्द्रगतीच्या परिवाराचें व जनकाचें अन्योन्य भाषण. )

जनका खगपरिवारें म्हटलें तव बुद्धि शोभना नाहीं ।
क्षुद्र म्लेच्छ पराजय करणें सोपें असे नृपा पाही ॥ ८१ ॥
बालक विषफल घेतें सोडुनि आम्रादि-सुफल अविवेकी ।
यापरि तव आग्रह हा स्वभाव तव भो अतीव अतिरेकी[2] ॥ ८२ ॥
देवासम विद्याधर करिति नभोगमन दुःख नच ठावें ।
हें क्षुद्र भूमिगोचर यांनीं दुःखींच चूर नित व्हावें ॥ ८३ ॥
जनक खगांना वदला क्षारसमुद्रें तहान नच भागे ।
परि वापीमधुरजलें शमते ती स्मरण हें करी वेगें ॥ ८४ ॥
अंधार निबिड पसरे मोठा परि लोककार्य-रोधक तो ।
अल्पहि दीप असे जरि जनकार्याला सहायकर होतो ॥ ८५ ॥
गजवृन्द असंख्य असे ज्याच्या गण्डांतुनी[3] मद स्रवतो ।
केशरिकिशोरकाच्या[4] विक्रमकार्यास कां करूं शकतो ॥ ८६ ॥
यापरि जनक नृपाचें भाषण ऐकून कुपित खग झाले ।
भूगोचरभूपांची निन्दा ते क्षुब्धचित्त बहु वदले ॥ ८७ ॥
या भूमिगोचरांना विद्यामाहात्म्य लाभलें नाहीं ।
हे शोचनीय[5] असती शौर्यें विभवेंहि हीन ते पाही ॥ ८८ ॥
पशु आणि भूमिगोचर-जनांत आम्हांस भेद नच वाटे ।
करितोस तूं प्रशंसा त्यांची अज्ञान तव मनीं दाटे ॥ ८९ ॥
निन्दाभाषण ऐकुनि वदला नृप खगनृपालपरिवारा ।
भूगोचरीच आहे वृषभजिनाचा सुवंश अवधारा ॥ ९० ॥

---

१ शरीरास. २ फार ताणून धरणारा. ३ गालांतून. ४ सिंहाचा बच्चा. ५ निंद्य, शोक करण्यास योग्य.

लोकत्रयपूज्य असे तीर्थंकर भूमिगोचरी असती ।
चक्री बल नारायण कदापि नच खगकुलांत हे होती ॥ ९१ ॥
कल्याणपञ्चकाची प्राप्ति न विद्याधरा कदा झाली ।
ती अवनीतलिं निश्चित होते वदते असेच विबुधाली ॥ ९२ ॥
इक्ष्वाकुकुलीं झाले पट्खण्डाधिपति ज्या महारत्नें ।
झालीं प्राप्त चतुर्दश खगकुलिं हीं नैव होति शतयत्नें ॥ ९३ ॥
इन्द्रेंहि कीर्ति ज्यांचीं स्वसभीं कथिलीं असा असे कोण ।
विद्याधरनृप बोला कां मुख आतां वरें धरी मौन ॥ ९४ ॥
इक्ष्वाकुवंशिं झाला दशरथ अनरण्य-मङ्गला-तनय ।
त्यास दिशांसम भार्या चार जयें स्थापिला असे सुनय ॥ ९५ ॥
पद्मालिङ्गित ज्याचा देह असे नाम पद्म शुभ ज्याचें ।
ज्या रामचन्द्र वदती मी कन्यारत्न त्या दिलें साचें ॥ ९६ ॥
लक्ष्मण बंधु जयाचा शरीर ज्याचें घने रमासदन ।
पळती शत्रु जयाचे रण सोडुनि पाहतां धनुर्बाण ॥ ९७ ॥
करिति विहार नभांतुनि म्हणुनि खग श्रेष्ठ उचित नच बोल ।
काकहि नभ उल्लंघिति जगीं असे सद्गुणा खरें मोल ॥ ९८ ॥
यापरि वदतां जनकें विद्याधर जाहले निरुत्तर ते ।
चन्द्रगतीचे वदले मन्त्री जे राजनीतिचे ज्ञाते ॥ ९९ ॥
भूमिपते ! ऐकावें असे धनुर्युग्म आमुच्या सदनीं ।
वज्रावर्त समुद्रावर्त सुनामें गमें न अन्यजनीं ॥ १०० ॥
देव तयांचे करिती रक्षण त्या सज्य रामलक्ष्मण हे ।
करितील देइ सीता तूं रामा वचन मान्य करि पाहें ॥ १०१ ॥
वज्रावर्तधनुष्या सज्य करायास राम असमर्थ ।
होतां सीता यावी कुमार भामण्डलास हा अर्थ ॥ १०२ ॥
जनकें सुमान्य केलें वाक्य नि तें पाहिलें धनुर्युग्म ।
सज्य कराया कठिणचि चिन्तेनें तत्क्षणीं मन [illegible] ॥ १०३ ॥

---

१ विद्वानांचा समूह. २ सुदर्शनचक्र, दण्ड, [illegible] रत्नें. ३ पूर्वादि दिशाप्रमाणें चार. ४ [illegible] घर. ५ दोरी लावून [illegible]. ६ अभिप्राय [ ध्यानांत घ्यावा. ] ७ घर.

यानन्तर ते करिती खग जिनपूजन नि तद्गुणस्तोत्र ।
घेउनि धनुर्युगातें निघती वन्दुनि जिनास सुपवित्र ॥ १०४ ॥
जनकासह ते आले मिथिला-नगरीसमीप बाहेर ।
स्वप्रासादीं भूपहि चिन्तेचा यन्मनांत बहु पूर ॥ १०५ ॥
उभय धनुष्यें ठेवुनि आयुधशाळेंत खचरजन सारे ।
मिथिलापुरबाह्यस्थलिं राहति मदराशि[1] यन्मनांत शिरे ॥ १०६ ॥
खिन्नमनानें जनकें केलें भोजन सचिन्त होऊन ।
म्हटलें तयें प्रियेला मद्वचनाचें करी सखे ! श्रवण[2] ॥ १०७ ॥

( जनक विदेहेला चिन्तेचें कारण सांगतो. )

मायाश्वानें मजला हरून विजयार्धपर्वतीं नेलें ।
चन्द्रायण खगभूपति हर्षें स्वमनोगतार्थ मज बोले ॥ १०८ ॥
माझा सुपुत्र आहे भामण्डल दे सुता तुझी सीता ।
रत्न-सुवर्णाचा हा होवो संयोग मान्य जो सन्ता ॥ १०९ ॥
वदलों मित्रा, रामा द्याया संकल्प मी मनें केला ।
यास्तव वचन तुझें हें धरितें आकाशपुष्पसम लीला[3] ॥ ११० ॥
वदला विद्यारक्षित धनुष्य करि राम सज्य देहबलें ।
दे तूं तयास सीता भोगो तो पूर्वजन्मपुण्यफलें ॥ १११ ॥
परि अन्यथा घडे जरि द्यावी भामण्डलास तूं सीता ।
तद्वचन मान्य केलें म्हणून हृदयास जाळिते चिन्ता ॥ ११२ ॥
इन्द्रहि करूं शकेल न धनुष्य ते सज्य म्हणुनि भीति मनीं ।
सीताहरणाची मज वाटे चिन्ता सदा दिवारजनीं ॥ ११३ ॥
वीस दिनांची कथिली मर्यादा मज खगेशचन्द्रानें[4] ।
कार्य असे बहु गुरुतर[5] पडेल हें पार केवि मी नेणें ॥ ११४ ॥
जनकें अनेक देशीं खगवार्ताहर[6] अनेक पाठविले ।
रचिला वरमण्डप बहु सुन्दर ज्या बघुनि सुरहि विस्मयले[7] ॥ ११५ ॥
आले अनेक राजे वैभव परिवार विपुल घेऊन ।
मञ्चावरि ते बसले जनकसुता वरिल आपणा म्हणुन ॥ ११६ ॥

---

१ गर्वसमूह. २ भाषण ऐक. ३ आकाशाच्या फुलाप्रमाणें शोभा धारण करतें अर्थात् तें व्यर्थ आहे. ४ चन्द्रगति विद्याधरराजानें. ५ अतिशय कठिण. ६ विद्याधर दूत. ७ आश्चर्ययुक्त बनले.

वरमण्डपांत आले जनक नि जननी नि सुन्दरी सीता ।
शोभे सखीयुता ती तारायुत चन्द्रकोर जणु कान्तां ॥ ११७ ॥

( स्वयंवर मंडपांत सीता आल्यावर कंचुकी तिला
आलेल्या राजांची माहिती सांगतो. )

राहून उभा वदला सुबहुश्रुत कञ्चुकी 'शुभे सीते, ।
आले हे नृप बहुविध सुन्दर नाना धरून वेषांतें ॥ ११८ ॥
दशरथभूपाचा हा पहिला सुत रामचन्द्र, हा दुसरा ।
लक्ष्मण, भरत नि तिसरा चौथा शत्रुघ्न हा दिसे हंसरा ॥ ११९ ॥
या चार सुतासह हा दशरथ भूपाल मञ्चकीं बसला ।
तव जनकाचा आहे सुमित्र देहेंचि भिन्न जो दिसला ॥ १२० ॥
हा हरिवाहन भूपति, नृपाल हा चित्ररथ सुविख्यात ।
हा संजय जयभूपति मंदर भूपाल भूप हा कान्त ॥ १२१ ॥
हे सर्व भूप धैर्यें वीर्यें विभवें विशुद्धवंशानें ।
चन्द्रासम रूपानें खुलती दानें यशें उदारमनें ॥ १२२ ॥
इक्ष्वाकुवंश याचा हरिवंशीं जन्म जाहला याचा ।
हा कुरुवंशा भूषवी आहे हा भूप भोजवंशाचा ॥ १२३ ॥
केलें वर्णन यापरि हें कन्ये गे त्वदर्थ तें ध्यानीं ।
ठेवावें गे पुनरपि कथितों तें सर्व घेइ तूं स्वमनीं ॥ १२४ ॥
वज्रावर्त असे हें धनुष्य जोडील यास जो बाण ।
त्याच नृपाला कन्ये वरमालेनें सुशोभवी जाण ॥ १२५ ॥
तेव्हां बहुविध भूपति अनेक नृपपुत्र हर्षले हृदयीं ।
अनुपम रूपवती ही जाया होईल आपुली पाहीं ॥ १२६ ॥
दोरी लावुनि बाणें भूषित करणें नसेचि हें कठिण ।
लीलामात्रें करितों सुकार्य हें यांत मी असे निपुण ॥ १२७ ॥
ऐसा गर्व मनामधिं होउनि उत्सुक सर्व ते झाले ।
परि चापाच्या तेजें गर्वा वैफल्य तत्क्षणीं आलें ॥ १२८ ॥

( धनुष्याजवळ जातांना राजांची झालेली दुर्दशा. )

भूपाल राजसुत वा जो चापाजवळ जाय नेटानें ।
अग्निज्वाला भीषण सोडी फूत्कार तें भयंकरपणें ॥ १२९ ॥

---

१ सुन्दर. २ स्पर्धेनें.

त्याच्या असह्य तेजें डोळे झांकून येति परतोन।
कित्येक भूप वदती कार्य न कोणी करूं शके कठिण ॥ १३० ॥
थर थर शरीर कांपे वहुतांचें खिन्न भूवरी पडती।
झाले मूर्च्छित कांहीं तच्छ्‌वासें पर्णतुल्य[1] नभिं उडती ॥ १३१ ॥
सर्पासमान त्याचा प्रचण्ड-फूत्कार-शब्द ऐकून।
पळती कित्येक भयें कितिकांचें वोवडें बने वचन ॥ १३२ ॥
स्तम्भित झाले कांहीं कष्टें परतुनि निजासनीं वसती।
प्रेक्षक कांहीं पाहुनि दुःस्थिति त्यांची मनांत बहु हसती ॥ १३३ ॥
कोणी तदा म्हणाले भूपालांच्या वधार्थ ही माया[2]।
रचिली क्रूरमनानें आम्हां ऐशी नकोचि ही जाया ॥ १३४ ॥
ऐसा काम नको हा पाळून ब्रह्मचर्य शेष दिन।
आम्ही मुनिप्रमाणें वागू करुनि व्यतीत पूजु जिन ॥ १३५ ॥
यापरि नृपदुरवस्था[3] बघुनि श्रीरामचंद्र धीरमनें।
चापासमीप गेले गुरु येतां शिष्यतुल्य शान्त बने ॥ १३६ ॥
घेउनि धनुष्य निजकरिं त्यावरच्या वेष्टना करी दूर।
दोरी लावुनि करितां नम्र करी शब्द जलदगम्भीर[4] ॥ १३७ ॥
मेघरवभ्रान्तीनें करिती केकारवा मुदें मोर।
पसरुनि पंखपिसारा सुनृत्य करितात लोचना मधुर ॥ १३८ ॥
तो चाप तदा केला चक्रासम वांकवून रामानें।
सूर्यासम तो शोभे प्रातःकालीन[5] सौम्य धामानें ॥ १३९ ॥
दोरीच्या टंकारें केल्या वधिरित तयें दिशा दाहीं।
नभिं सुर नाचति हर्षे केली सुमवृष्टि सुरभि तैं त्याहीं ॥ १४० ॥
करिं सुममाला घेउनि आली सीता सुनम्र होऊन।
शोभे राम तियेनें रतिसह वाटे जना दुजा मदन ॥ १४१ ॥
घाली गळ्यांत त्याच्या सुममाला मधुकटाक्ष फेंकून।
करतालध्वनि[6] केला सर्वजनें हृदयिं मुदित होऊन ॥ १४२ ॥
दोरी काढुनि पुनरपि पूर्वस्थलिं चाप ठेविला रामें।
स्वस्थानीं सीतेसह वसले गेलें तदा गुणारामें[7] ॥ १४३ ॥

---

१ पानासारखे. २ इन्द्रजाल. ३ राजांची दुःखयुक्त अवस्था. ४ मेघाप्रमाणें गम्भीर. ५ सकाळच्या. ६ टाळ्यांचा आवाज. ७ गुणानीं मन हरणाऱ्या रामानें.

रामुखास बघाया सीतेचें हृदय होय सोत्कण्ठ ।
लज्जाजलांत परि तें बुडलें होतें अगाध आकण्ठ ॥ १४४ ॥
दुसरें धनुष्य ज्याचें बुध कथिती नांव सागरावर्त ।
लक्ष्मण अधिज्य करि तें उठती जनमानसीं भयावर्त ॥ १४५ ॥
शर जोडाया इच्छी वदले तेव्हां तयास खग वीर ।
जोडूं नको कुमारा होईल अनर्थ जीवगणिं फार ॥ १४६ ॥
बोलून असें करिती त्याच्यावरि कुसुमवृष्टि बहु मोदें ।
हें पौरुष उभयांचें कोणाच्या मानसा न विस्मय दे ॥ १४७ ॥
अन्यासाध्य अशा या कार्या लक्ष्मण करून विनयानें ।
रामासमीप बैसे कुतुकें उभयास बघति जननयनें ॥ १४८ ॥
त्या लक्ष्मण वीराला विद्याधर-चन्द्रवर्धनें अठरा ।
कन्या अर्पण केल्या रतिसम सुन्दर कलागर्भी चतुरा ॥ १४९ ॥
चन्द्रगतीला कथिला जाऊन खगें समस्तवृत्तान्त ।
जो ऐकतां तयाचें चिन्तांनीं व्याप्त जाहलें स्वान्त ॥ १५० ॥
वरमण्डपांत घडल्या अद्भुतकार्या बघून भरत मनीं ।
अत्यन्त खिन्न झाला तेजोहीनत्व येइ तद्वदनीं ॥ १५१ ॥
" यांचें आणिक माझें कुल एक पिताहि एक जरि आहे ।
अद्भुतकार्य तयांचें नच माझें मन्दकर्म मम पाहे " ॥ १५२ ॥
" अथवा पाहुनि लक्ष्मी परक्याची खिन्न मी न मनिं व्हावें ।
उत्तम केलि न कर्मे फल मजला केविं मधुर लाभावें " ॥ १५३ ॥
" जी पद्मकोमलाङ्गी साक्षाल्लक्ष्मी जनास जणु भासे ।
पत्नी प्राप्त जहाली रामा पुरुपुण्य जो सदा विलसे " ॥ १५४ ॥

( भरताचा सुप्रभा राजकन्येशीं विवाह. )

कैकेयीनें परि हें जाणुनि दशरथनृपास सांगितलें ।
नाथा ! भरताचें मुख शोकानें म्लानसें मला दिसलें ॥ १५५ ॥
ऐसें कार्य करावें जेणें तन्मन विरक्त नच व्हावें ।
खिन्नत्व न वाढावें वदनामध्यें प्रसन्नता यावें ॥ १५६ ॥

---

१ गळ्यापर्यन्त. २ भीतीचे भोंवरे. ३ मन. ४ [illegible]
५ कमलाप्रमाणें कोमल अंगाची. ६ ज्याचें पुण्य मोठें आहे असा.

आहे जनक भ्राता कनक जयाला शुभाभिधान[1] असे ।
कन्या भरता त्याची द्यावी यन्नाम हेमभा विलसे ।। १५७ ।।

दशरथभूपें कथिलें कनकनृपा मान्य त्यास तें झालें ।
कन्या-स्वयंवराचें विधान दुसरें दिनींच घोषविलें ।। १५८ ।।

आले पुनरपि राजे बसले ते योग्य मञ्चकीं सकल ।
शोभे भरत तयामधिं उडुगणिं[2] राकाशशी[3] जसा अमल ।। १५९ ।।

घेउनि वरमाला करिं कनकसुता हेमभा सभीं आली ।
वरिलें भरतास तिनें वरमालेनें सुभूषवून गळीं ।। १६० ।।

झाला विरक्त जो मनिं पुनरपि अनुरक्त[4] जाहला भरत ।
विषम असा कर्मोदय करि जीवा विविधभावनांत रत ।। १६१ ।।

जेणें जैसें केलें कर्म तसें फल तयास मिळतेंच ।
'कोद्रव पेरुनि साळी न मिळे' म्हण ही असे सदा साच ।। १६२ ।।

ध्वजतोरणादिकांनीं स्वर्गपुरी जणु दिसे दुजी मिथिला ।
घोट्यापर्यन्त फुलें अंथरुनी राजमार्ग शोभविला ।। १६३ ।।

कर्णमनोहर नानावाद्यध्वनि दशदिशांत दुमदुमला ।
याचक तृप्त जहाले धन द्या कोणी असें वदे न मला ।। १६४ ।।

श्रीराम वीर लक्ष्मण भरतांचा शुभविवाह मिथिलेंत ।
सीतादिक-कन्यासह झाला यद्वर्णनीं न कवि शक्त ।। १६५ ।।

जे नृप विवाह बघण्या आग्रह वश राहिले तया उभयें ।
वस्त्रालङ्कारांनीं आदरिलें जनक-दशरथें विनयें ।। १६६ ।।

नन्तर ते निजनगरा वधूवराभीष्ट[5] सतत चिन्तून ।
गेले यापरि झाला विवाह निर्विघ्न मोदसम्पन्न ।। १६७ ।।

ते पुत्रत्रय अपुल्या प्रासादीं सौख्यभोगनिर्मग्न ।
राहति सुकीर्तिशाली बुद्धि जयांची सुधर्मसंलग्न[6] ।। १६८ ।।

शुभकर्मफला जाणुनि व्हावें जिनदास सतत भव्यांनीं ।
दानादिक सत्कार्यीं लावावी बुद्धि देह निजवाणी ।। १६९ ।।

---

१ चांगलें नांव. २ नक्षत्रसमूहांत. ३ पौर्णिमा-चन्द्र. ४ प्रेमयुक्त.
५ वधू व वराचें कल्याण. ६ जिनधर्मांत लीन झालेली.

अशुभत्याग करावा विद्वज्जनमान्यकार्यरुचि ठेवा ।
व्हा तेजस्वी रविसम करा सदा पंचपरमगुरुसेवा[1] ॥ १७० ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे राम-लक्ष्मण-भरतविवाहवर्णनं नाम एकोनत्रिंशतितमं पर्व ॥ २९ ॥

---

१ अर्हत्, सिद्ध, आचार्य, उपाध्याय व साधु यांना पंचपरमगुरु म्हणतात, हे आत्महिताचा सर्वांना मार्ग सांगतात.

## तीसाव्या पर्वांतील कथासार.

आषाढशुक्ल अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत आठ दिवस महेन्द्रोदय उद्यानांतील जिनमंदिरांत दशरथ महाराजांनीं आपल्या पुत्रपत्नी आदि परिवारासह जिनेश्वराचा महाभिषेक मोठ्या वैभवानें केला.

यानंतर त्यांच्या कौसल्या, कैकेयी आदि पत्नी जिनेश्वरांना वन्दून आपल्या महालांकडे गेल्या. चौथी पत्नी सुप्रभाही आपल्या महालाकडे गेली. थोड्या वेळानें तिघींच्या दासींनी जिनगन्धोदक आणिलें तें तिघींनीं आपल्या मस्तकावर भक्तीनें धारण करून त्याला वन्दन केलें. पण चौथ्या राणीला तें न मिळाल्यामुळें ती खिन्न झाली. स्वतःला ती अल्पपुण्यवती समजून जीविताचा त्याग करावयाला उद्युक्त झाली. तिनें भाण्डाऱ्याला बोलावून म्हटलें जर माझ्यावर तुझी भक्ति असेल तर मला विष आणून देशील. असें म्हणून त्याला विष आणण्यासाठीं तिनें पाठवून दिलें व स्वतः आपण पलंगावर जाऊन निजली.

थोड्या वेळानें दशरथ महाराज आले. आपल्या तीन राण्या आनंदानें बोलत बसलेल्या दिसल्या. चौथी सुप्रभा दिसली नाहीं म्हणून त्यांनीं तिच्या महालांत प्रवेश केला व ते पलंगावर बसले. इतक्यांत भांडारी तेथें येऊन बाईसाहेब विष आणिलें आहे हें घ्या असें म्हणाला, व विष ठेवून निघून गेला.

दशरथ महाराजांना पाहिल्याबरोबर राणी उठून बसली. राजेसाहेबांनीं 'प्रिये, तूं विष कां मागविलेंस ? तुला राग कां आला ? जीविताचा तुला तिटकारा कां वाटत आहे ? तुझा कोणी अपमान केला कां ? सांग ' असें प्रेमानें म्हटलें.

सुप्रभा म्हणाली महाराज, आपण सर्व राण्याकडे गंधोदक पाठविलें. पण मला मिळालें नाहीं म्हणून मनाला अतिशय वाईट वाटलें म्हणून मी भांडाऱ्याला विष आणावयास सांगितलें.

इतक्यांत बाईसाहेब हें गंधोदक घ्या, असें म्हणत [illegible] वृद्ध कञ्चुकी तेथें आला. कौसल्या आदि राण्यांनीं म्हटलें सुप्रभे, महाराजांचें तुझ्यावर आमच्यापेक्षां अधिक प्रेम आहे. कारण वृद्ध कञ्चुकीच्याद्वारें त्यांनीं तुझ्याकडे गंधोदक पाठविलें व तूं मात्र भलतीच कल्पना करून जीविताचा नाश करून घेण्याचा विचार मनांत आणिला आहेस. असें बोलून तिचा कोप त्यांनीं शान्त केला. तिनें मस्तकावर गन्धोदक धारण केलें व ती आनंदित झाली.

दशरथ महाराज रागावून कञ्चुकीला म्हणाले दुष्टा! कां इतका उशीर लावलास? त्याचें कारण सांग नाहीं तर तुला मी आज कडक शिक्षा करीन. महाराजांच्या या भाषणानें कंचुकी घाबरून गुडघे टेकून नमस्कार करून म्हणाला "प्रभो, मी अतिशय वृद्ध झालों आहे. शरीरांत मांस राहिलें नाहीं. शरीर सुरकुतलें आहे. त्यांतील हाडें क्रमानें मोजतां येतील असें तें बनलें आहे. तोंडांत एकही दांत राहिला नाहीं. अडखळत व बोबडे असे शब्द बाहेर पडतात. दोन-चार शब्द बोलतों नाहीं तोंच तोंडांतून सारखे श्वास भात्याप्रमाणें बाहेर पडतात. डोळे मंद झाले आहेत."

"तरुणपणीं माझे हात सोंडेप्रमाणें व मांड्या हत्तींना बांधण्याच्या खांबाप्रमाणें होत्या. छाती वेशीच्या दाराप्रमाणें रुंद होती. तरुणपणीं मी पायांनीं पर्वत शिखरावर अनायासें चढून जात असें. आतां त्या सामर्थ्याचा शतांशही राहिला नाहीं. [illegible] शरीर नम्र धनुष्याप्रमाणें वांकलें आहे. माझा उत्साह सर्व [illegible] झाला. [illegible] मात्र उत्तरोत्तर वाढत आहे."

"वंशक्रमानें मी सेवक असल्यामुळें आपली सेवा [illegible] करीत राहावें असें मनाला वाटतें. म्हणून आपल्या चरणांची सेवा या दीनदशेंत करीत आहे. [illegible] प्रसन्न व्हावें. उशीर होण्याचें कारण ही माझी वृद्धावस्था आहे."

कञ्चुकीचें भाषण ऐकून राजा आपल्या [illegible] विचार करूं लागला. हा जें बोलला तें अक्षरशः खरें आहे. [illegible] पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें नाश पावणारें आहे. [illegible] कांहीं काळ सुन्दर वाटतो. पण हें [illegible] शरीरसुखाला बळी पडून अनेक [illegible] कटाक्षाप्रमाणें पळतें आहे. या सुखाला [illegible] व त्यांनाच खऱ्या आत्मसुखाची प्राप्ति होते. [illegible] तुरुंग तोडून केव्हां मुक्त होईन तो दिवस मी धन्य समजेन.

पुत्राला राज्य देऊन यति होणें हें आमच्या कुलाचें व्रत आहे. तें जेव्हां मला लाभेल तो दिवस सुदिन होय. अशा विचारांत कांहीं काल गेल्यानंतर एकदां सर्वभूतहित आचार्य संघासह 'महेन्द्रोदय' उद्यानांत आले. महाराजांना आनन्द झाला त्यांनीं सर्व प्रजाजनांना कळविलें व स्वतः पुत्रकलत्रादि-परिवारासह दर्शनाला गेले. आचार्योंच्या चरणावर पुष्पाञ्जलि अर्पण करून हात जोडून त्यांनीं केलेला धर्मोपदेश त्यांनीं शान्ततेनें ऐकला. त्यांच्या उपदेशांत तत्त्वविवेचन, प्रथमानु-योगादिक चार अनुयोग, सोळा कुलकर, त्रेसष्ट शलाका पुण्यपुरुषांचें विवेचन होतें. हें ऐकून पुनः वन्दन करून दशरथ महाराज आपल्या प्रासादांत गेले. याप्रमाणें कांहीं काल त्यांचा सुखांत गेला.

# तिसावें पर्व.

[ अष्टाह्निकपर्वांत दशरथ राजानें पुत्रादिपरिवारासह जिनेश्वराचें महापूजन केलें. ]

आषाढ-शुक्लपक्षीं शुभाष्टमीप्रभृति-पौर्णिमावधि ते ।
दिन आठ त्यास वदती नन्दीश्वरपर्व साधुगणराजे ॥ १ ॥
आष्टाह्निकहि तयाला वदति महोत्सव समस्त भव्यजन ।
जिनमंदिरीं जिनाचा करितात महाभिषेकविधि मिळुन ॥ २ ॥

पूजन अष्टद्रव्यें करिती जिनगुणगणास गाऊन ।
यापरि भक्तिभरानें करिती सुविशाल पुण्यसंचयनें ॥ ३ ॥
कार्तिक-फाल्गुन-निर्मलपक्षीं यापरिच आठदिनिं सुजन ।
वर्षांत तीन वेळां येतो हा पर्व वदति साधुगण ॥ ४ ॥
दशरथभूपें केला पुत्रकलत्रांसवें नि सचिवजनें ।
आषाढाष्टाह्निकविधि जिनगुणभजनांत सततलीनमनें ॥ ५ ॥

नन्दीश्वरसद्द्वीपीं इन्द्र जसा सुरसमाज घेऊन ।
जिनवरमहिमा करितो दशरथनृप जिनगृहांत मोदून ॥ ६ ॥
पूजुनि जिनास राण्या गेल्या स्वगृहास पाठवी भूप ।
जिनगन्धोदक दासीकरवीं जें हरण करितसे पाप ॥ ७ ॥
जें शान्तिहेतु होतें होतें जें अतिपवित्र राण्यांनीं ।
निजमस्तकिं तें धारण केलें वन्दून [illegible] ॥ ८ ॥
देऊन पुरुषकञ्चुकिकरांत तें सुप्रभेकडे प्रेषी ।
राजा हृदय जयाचें होतें [illegible] ॥ ९ ॥

[ गन्धोदक [illegible]
[illegible]. ]

---

१ आषाढ कार्तिक व फाल्गुन [illegible]
जिनपूजा सर्व श्रावक मिळून करतात [illegible]
[illegible]. ३ [illegible]. ४ [illegible].

प्राप्त न लौकर झालें म्हणुनि तिला शोक कोप हो प्रगट ।
यांना पाठविलें तें नच मजला शान्तिवारि[1] हा कष्ट ! ॥ १० ॥
यामधिं नरपतिदोष न केलें मी अल्पपुण्य परजन्मीं ।
अपमान म्हणुनि झाला अन्या कवणा न दोष देतें मी ॥ ११ ॥
पुण्यवती या असती असती या श्लाघ्य परमभाग्यवती ।
जिनगन्धोदक ज्यांना प्रेमानें पूत[2] पाठवी नृपति ॥ १२ ॥
अपमानदग्ध माझ्या हृदयाचा ताप मरण शान्त करी ।
करुनि विचार असा मनिं महिषी बोलावि शीघ्र भाण्डारी ॥ १३ ॥
भक्ति तुझी माझ्यावरि दे आणुनि शीघ्र भक्षणास विष ।
वदुनि पडे शय्येवरिं जियेस वाटे स्वजीवनीं[3] द्वेष ॥ १४ ॥
भूपति आला पाही प्रिया तिघी सुप्रभा तया न दिसे ।
गेला सौधांत तिच्या प्रेम जयाच्या मनीं नितान्त वसे ॥ १५ ॥
खिन्नमनें पडलेली पाहुनि शय्येवरि प्रिया राणी ।
विष देवि ! आणिलें मी घ्या हे सेवक वदे तिला वाणी ॥ १६ ॥
ऐकुनि शब्द तयाचा देवि, प्रारम्भिलें तुवा काय ? ।
मज शीघ्र शीघ्र सांगे मरणाची पाहतेस कां सोय ॥ १७ ॥
पाहुनि भूपा उठली लाजुनि शय्येवरून ती राणी ।
धरुनि तिचा कर बसवी निजाङ्कि[4] मधुरा तिला वदे वाणी ॥ १८ ॥
कां कोप तुला आला निस्पृहता केवि जीवनीं आली ।
कां तूं मरणा इच्छिसि तव वदनीं कान्ति कां दिसे काली[5] ॥ १९ ॥
दुःखांत दुःख मोठें मरणाचें इच्छिसी किमर्थ तया ।
वद कोणी दुःख दिलें करीन तें दूर सोड मौननया[6] ॥ २० ॥
समजे जिनेन्द्रमत तुज सदसद्गति-कारणेंहि[7] परि कोपा ।
कां धरिशी गे हृदयीं तिमिरासम सोड शीघ्र या तापा ॥ २१ ॥
प्राणप्रिया नृपाला वदली ती सुप्रभा मला देवी ।
कां शान्तिवारि न मिळे मिळतें अन्या मला न तें केवि ॥ २२ ॥

---

१ शान्ति देणारें जिनगन्धोदक. २ पवित्र. ३ स्वतःच्या जगण्यांत. ४ आपल्या मांडीवर. ५ काळी. ६ मौनाची पद्धति रीत. ७ सुगति व दुर्गतीचीं कारणें.

ऐसें सांगत असतां येउन तो कञ्चुकी तिला वदला ।
जिनगन्धोदक घ्यावें पाठविलें नृपवरें पवित्र तुला ॥ २३ ॥
राण्या तिघीहि आल्या कोपा सोडी प्रसन्नता धरि गे ।
या श्रेष्ठ कञ्चुकीनें गन्धोदक आणिलें शिरीं तें घे ॥ २४ ॥
भूपस्नेह तुझ्यावरि आम्हापेक्षाहि अधिकतर वाटे ।
ऐसें असतां तव मनिं कोपाचा पूर कां घरें दाटे ॥ २५ ॥
यापरि सवतींनींही बोलुनि केला प्रशान्त कोप तिचा ।
घेई जिनगन्धोदक वदनीं झळके प्रसादगुण साचा ॥ २६ ॥
नृप रागावुनि वदला दुष्टा हे कञ्चुका ! विलम्ब तुला ।
कां झाला वद त्याचें कारण तूं पात्र असशि शिक्षेला ॥ २७ ॥
या रोषभाषणानें झालें कञ्चुकिमनीं भय प्रबल ।
थर थर शरीर कांपे निघति मुखांतून बोबडे बोल ॥ २८ ॥
गुडघे टेकुनि भूवरि भालावरि हात दोन जोडून ।
नमुनि नृपाला वदला ऐकावें नाथ दीन मम वचन ॥ २९ ॥

[ तरुणदशा व वृद्धदशा यांचें वर्णन. ]

अत्यन्त वृद्ध झालों लव ही नच मांस राहि देहांत ।
सुरकुतल्या चर्मामधिं मोजुनि घ्या सकल अस्थिसंघात ॥ ३० ॥
जीर्ण जरेनें झाला देह शिरांचेंच हें असे जाळें ।
कवलित केलें जाइल आज-उद्यां या अवश्य हें काळें ॥ ३१ ॥
न निघे मम वदनांतुनि वाणी अस्खलित आज भूपाल ।
पाऊल भूमिवरती अडखळतें दृष्टि जाहली विकल ॥ ३२ ॥
पूर्वी यौवनकालीं सोंडेसम हात पुष्ट मम होते ।
गजबन्धस्तम्भासम मांड्यांची पुष्टि दृष्टि मोहविते ॥ ३३ ॥
छाती विस्तृत होती जणु देवीचें विशालसें द्वार ।
लङ्घितसे चरणांनीं शैलाचें उच्च विषमसें शिखर ॥ ३४ ॥
काठी करि घेउनि ही पदनिक्षेपांत कांपती चरण ।
ऐशी स्थिति मम झाली वृद्धावस्थेंत भूपते ! जाण ॥ ३५ ॥
स्वामिन् गेला आहे मम [illegible] ।
हा देह यष्टि घेउनि [illegible] ॥ ३६ ॥

१ हातांचा स्नायू. २ नसा. ३ [illegible]. ४ [illegible]. ५ [illegible].

गेले पडून सगळे दांत नि हें तोण्ड बोळकें झालें ।
अस्पष्ट शब्द निघती पुनरपि बालत्व वपुस जणु आलें ॥ ३७ ॥
उत्साह सर्व गेला लयास आलस्य वाढलें आहे ।
वाढे श्वास प्रतिदिनिं जणु भाता देह जाहला पाहे ॥ ३८ ॥
देहास नाथ ! आतां समर्थ धारण करावया नच मी ।
इन्द्रियगण कार्य-क्षम नच मम ऐशी दशा दिसे स्वामी ॥ ३९ ॥
परि अपुल्या चरणाची सेवा सोडू नये असें वाटे ।
वंशक्रमें सुसेवक सेवा सोडून जाउ मी कोठें ॥ ४० ॥
पक्वफलासम माझें शरीर यमभक्ष्य[1] जाहलें आहे ।
सेवा चुकेल अपुली भय हेंचि मनास वाटतें पाहे ॥ ४१ ॥
ऐशी स्थिति मम पाहुनि कोपाश्रय मन करूं नका अपुलें ।
स्थान कृपेचें होवो प्रसन्न कमलासमान मुख फुललें ॥ ४२ ॥
कञ्चुकिवचना ऐकुनि डाव्या ठेवुनि करावरी गाल ।
राजा चित्तीं चिन्ती याचें हें सत्य वाटती बोल ॥ ४३ ॥
निःसार देह आहे पाण्याचा बुडबुडा असार जसा ।
तरुणपणा हा गमतो सन्ध्याकालीन-जलद-विभ्रमसा[2] ॥ ४४ ॥
चञ्चलविजेप्रमाणें देह विनाशी परन्तु मानव हे ।
करितात दुःखसाधन त्यासाठीं पापकार्य नित पाहे ॥ ४५ ॥
भोगोपभोग-सुख हें अतिमत्त-स्त्रीकटाक्षतुल्य असे ।
हें फसवितें जनांना यामध्यें दुःख-हेतुताचि वसे ॥ ४६ ॥
विषयाधीन नि दुर्लभ आहे नश्वर म्हणून सौख्य न हें ।
लम्पटजनास वाटे सुखकर परि दुःखरूप हें पाहे ॥ ४७ ॥
विषया विषसम पाहुनि ज्यांना आत्मप्रबोध मनिं झाला ।
ते पुण्यवन्त सज्जन निजस्वरूपांत वरिति सुखलीला ॥ ४८ ॥
विषयांना त्यागुनि मी स्नेहाचा हा तुरुंग तोडून ।
मोक्षसुखाला कारण जिनेन्द्रतप केधवा वरें वरिन ॥ ४९ ॥
देउनि सुतास लक्ष्मी विरक्त होउनि तपोवनीं गमन ।
हें अमुचें वंशव्रत जेव्हां लाभेल तो खरा सुदिन ॥ ५० ॥

---

१ यमाकडून खाल्लें जाण्यास योग्य. २ सायंकालच्या मेघाच्या शोभेप्रमाणें.

यापरि विचार राजा दशरथ करि काललब्धि-लाभानें ।
आसक्ति शिथिल झाली भोगीं वैराग्य तो वरी स्वमनें ॥ ५१ ॥
प्राप्तव्य जें जयाला जेणें जितुकें तयास तें तितुकें ।
मिळतें हीनाधिकता नियमिं न जन या करूं शके कुतुकें ॥ ५२ ॥
यापरि गेला कांहीं काल असा सर्वभूतहित आले ।
आचार्य शिष्यगणवृत साकेतापुरिं विशाल निजलीलें ॥ ५३ ॥
त्या ज्ञान मनःपर्यय होतें चौथें मुनीश्वरा आर्या ।
रक्षिति पित्याप्रमाणे सङ्घा निर्दोषशी तपश्चर्या ॥ ५४ ॥

[ 'महेन्द्रोदय' बगीच्यांत संघासहित भूतहितार्यांचा चातुर्मासांत निवास. ]

'महेन्द्रोदय' नांवाच्या शुद्धस्थानीं मुनीश्वर ।
आत्मतुल्य दक्ष शिष्यें राहिले ते गतज्वर ॥ ५५ ॥
सम निर्मल विस्तीर्ण रम्य ऐशा शिलातलीं ।
सर्वभूतहितार्यांची शान्तशी मूर्ति शोभली ॥ ५६ ॥
ते सूर्यासम तेजस्वी गंभीर प्रियदर्शन ।
वर्षायोगार्थ बसुनी करिती कर्मकन्दन ॥ ५७ ॥
पावसाळा सुरू झाला प्रवासिजन दुःखद ।
गर्जनें तर्जिती सूर्या मेघ पातकतोयद ॥ ५८ ॥
नाना नियम घेऊन धर्माचरण तत्पर ।
झाले शिष्य मुनीन्द्रांचे तरी ध्यानी सदा स्थिर ॥ ५[illegible] ॥
देवपूजादि-षट्कर्मी झाले श्रावक तत्पर ।
वर्षाकाल असा गेला धर्माचारांत सत्वर ॥ ६० ॥
एकेदिनीं दशरथें भेरी वाजविली पुरी ।
मुनीन्द्रवन्दना जाऊं हृष्ट होऊन अन्तरी ॥ ६१ ॥
राजाज्ञा ऐकतां झाली प्रजा आनन्दनिर्भर ।
राजद्वारी जना झाली दर्शनोत्सुक सादर ॥ ६२ ॥

१ [illegible]. २ [illegible]. ३ [illegible] महिने एकै ठिकाणी [illegible]. ४ [illegible].
५ दौंडी पिटविली.

स्नानें पवित्र होऊन पूजिला जिननायक ।
नृपें दशरथें मोदें अनन्तगुणदायक ॥ ६३ ॥
भार्या सुपुत्र सामन्त प्रजाजन समन्वित ।
'महेन्द्रोदय' उद्यानीं गेला होऊन हर्षित ॥ ६४ ॥
सर्वभूतहिताचार्या पाहून कुसुमाञ्जलि ।
अर्पी नृप पदां वन्दी जोडून स्वकराञ्जलि ॥ ६५ ॥
देऊन धर्मवृद्धीचा आशीर्वाद नृपाप्रति ।
धर्मस्वरूप कथिलें देई जें सुखसन्तति ॥ ६६ ॥
जीवादि-सप्ततत्त्वांचीं[3] कथिलीं लक्षणें तया ।
मुनीश्वरें नृपालास द्रव्यपर्ययसन्नया ॥ ६७ ॥
प्रथमादिक[4] जे भेद, सम्यग्ज्ञानीं जिनेश्वरें ।
वर्णिले चार कथिलें रूप त्यांचें तया खरें ॥ ६८ ॥
युगें कृतादिकालांचे भेद, सोळा कुलंकरें[5] ।
त्रेसष्ट पुण्यपुरुष-चरितें जीं हितंकर ॥ ६९ ॥
इक्ष्वाकादिक-वंशांचें ऐकून शुभवर्णन ।
आनन्दित नृपालाचें जाहलें तेधवा मन ॥ ७० ॥
मुनीश्वरास वन्दून पुत्रभार्यादिकासह ।
गेला भूपाल नगरीं करी नित्यादि[6] सन्मह ॥ ७१ ॥
भोगी प्रियासवें सौख्य प्रजांचें करि रक्षण ।
गेला त्याचा असा काल जाहले तुष्ट सज्जन ॥ ७२ ॥
उठून भव्य जे चित्तीं सकाळीं चिन्तिती जिना ।
त्यांचें कल्याण होऊन शान्ति लाभेल तन्मना ॥ ७३ ॥
मी श्रावक असे माझा अहिंसा धर्म उत्तम ।
विचार जो करी त्याचें मन होतेंचि निस्तम[7] ॥ ७४ ॥

---

१ युक्त सहित, २ पुष्पांची ओंजळ. ३ जीवादिक तत्त्वाचें वर्णन द्रव्यार्थिक व पर्यायार्थिक अशा दोन नयांनीं केलें. ४ प्रथमानुयोग, करणानुयोग, चरणानुयोग, व द्रव्यानुयोग असे सम्यग्ज्ञानाचे चार भेद. ५ प्रतिश्रुति वगैरे चौदा कुलकर वृषभनाथ पंधरावे व भरतचक्री सोळावा असे सोळा कुलकर. ६ नित्यमह, अष्टाह्निकमह, चतुर्मुखमह, कल्पद्रुम व इन्द्रध्वज असे जिनपूजेचे पांच भेद. ७ अज्ञानानें रहित.

अहिंसादि व्रतें माझीं हितकारक तीं सदा ।
पाळीन हींच आहेत माझी उत्तम संपदा ॥ ७५ ॥
भवार्णवांत ताराया मला देव जिनेश्वर ।
समर्थ आहे निर्दोष त्यागीन न हितङ्कर ॥ ७६ ॥
असा विचार हृदयीं करुन शयना त्यजी ।
स्नानानें शुद्ध होऊन जो श्रावक जिना यजी ॥ ७७ ॥
जिनदासास त्या लाभे जिनेशासम उज्ज्वल ।
स्वरूप शुद्ध आत्म्याचें राहील नित निर्मल ॥ ७८ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे दशरथवैराग्यसर्वभूतहितागमाभिधानं नाम त्रिंशत्तमं पर्व ॥ ३० ॥

---

## एकतिसाव्या पर्वांतील कथेचा सारांश.

शरदृतूचें आगमन झाल्यानें सज्जनांच्या मनाप्रमाणें नद्या, तळीं, व विहिरींचें पाणी स्वच्छ झालें. जमिनीवर कोठेंही चिखल राहिला नाहीं. व आकाश स्वच्छ झालें. आतां इन्द्रधनुष्याची शोभा धारण करणारे मेघ कोठेंही दिसत नव्हते. चोहीकडे स्वच्छता होती. पण भामण्डलाचें मन अद्यापि निर्मल झालें नव्हतें. सीतेचा सारखा निदिध्यास त्याचें मन करीत होतें. तो आपल्या पित्याकडे येऊन 'बाबा' माझा सीतेबरोबर विवाह केव्हां करणार आहांत मला सांगा. मी हें दुःख किती सहन करावें ? असें म्हणाला. त्यावेळीं कांहीं विद्याधरांनीं सांगितलें कीं, भामण्डला, सीतेचा विवाह रामाबरोबर होऊन बरेच दिवस झाले. रामानें वज्रावर्त धनुष्य वाकविण्याचा पण ही जिंकिला. त्यामुळें रामाबरोबर तिचा विवाह जनकराजानें केला. आतां तिचा नाद तूं सोड व तिच्यापेक्षां अधिक सुन्दर अशा अनेक विद्याधर कन्याबरोबर तुझा विवाह तुझे पिता करून देतील.

हें त्यांचें भाषण ऐकल्याबरोबर भामण्डल रागावला व तो म्हणाला मी त्या क्षुद्र रामाबरोबर लढून त्याचा पराजय करून सीतेला घेऊन येईन व तिच्याशीं लग्न करीन. असें म्हणून तो तत्काल विमानांत बसून आयोध्येकडे निघाला. विमान वेगानें चालू लागलें. त्यानें लौकर विजयार्धाचा प्रदेश उल्लंघून भूमीवरच्या देशांत प्रवेश केला. नंतर तो मागच्या भवांत ज्या देशावर राज्य करीत होता त्या देशाच्या विदग्ध-नगराजवळ आला. त्याला तो सर्व भाग आपण केव्हांतरी पूर्वी पाहिला आहे असें वाटू लागलें. पण निश्चित कालाचें स्मरण होईना— विचार करूं लागल्यावर त्याला जातिस्मरण झालें. तेव्हां त्याला सीतेविषयीं केलेल्या चिन्तनाची लाज वाटू लागली. असें चिन्तन नीच कुलांतील पुरुषही करणार नाहीं— तें मी केलें. मला धिक्कार असो. मी व सीता विदेहा राणीच्या गर्भांत होतो व आम्ही दोघे आवळे-जावळे होऊन जन्मलों आहोत. सीता माझी बहीण व मी तिचा भाऊ आहे. मी पूर्वजन्मीं कुण्डलमंडित नांवाचा राजा होतो. या स्मरणानंतर त्याचें हृदय कंपित होऊन तो मूर्च्छित झाला. चन्द्रगतीच्या प्रधानांनीं त्या मूर्च्छित अवस्थेंत त्याला

परत चन्द्रगतीजवळ आणिलें. शीतोपचारांनीं त्याची मूर्च्छा दूर झाल्यावर राजानें त्याला बाळा, तुला मूर्च्छा कां आली त्याचें कारण सांग असें म्हटल्यावर त्यानें थोडक्यांत आपल्या पूर्वभवाची माहिती सांगितली. 'मी कुण्डलमण्डित राजा होतों. मी पूर्वी पिङ्गल ब्राह्मणाची पत्नी हरण करून आणिली व त्याला माझ्या देशांतून हाकालून दिलें. त्याचें मन अत्यंत खिन्न झालें. त्यानें एका साधूजवळ दीक्षा घेतली. तप केलें व मरून तो देव झाला.

इकडे मी अनरण्य राजाच्या प्रजेला नेहमीं छळीत असें. त्यामुळें तो अतिशय रागावला. त्याच्या बालचन्द्र नामक सेनापतिनें अकस्मात रात्रीं गुप्तपणें येऊन महालांत कांहीं सैन्यासह प्रवेशून मला पकडलें. माझें सर्व सैन्य, राज्य व धन त्यानें घेतलें व मला सोडून दिलें. मी राज्यहीन होऊन भटकूं लागलों व एका जैन मुनिसंघाकडे गेलों. मुनींच्या उपदेशानें माझें मन पवित्र झालें व मी मद्य-मांसाहार करणार नाहीं, शुद्ध अन्न सेवन करीन असें व्रत घेऊन तें पाळिलें. पुनः आपल्या मामाच्या साहाय्यानें आपलें राज्य मिळवावें अशी इच्छा मनांत उत्पन्न होऊन आपल्या मामाकडे जावयास निघालों. वाटेंत अनेक रोगांनीं माझें शरीर व्याप्त झाल्यामुळें शान्तचित्तानें मरण पावलों व मी विदेहा राणीच्या गर्भांत आलों. त्याचवेळीं दुसराही जीव स्त्रीत्व घेऊन तिच्या गर्भांत आला.

मी नऊ महिन्यांनीं जन्मल्यावर माझा शत्रु असलेल्या देवानें— [illegible] मला मारून टाकण्यासाठीं हरण करून आकाशांत नेलें. पण त्याच्या मनांत दया उत्पन्न झाली. त्यानें माझ्या कानांत तेजस्वी रत्नकुण्डलें घालून पर्णलघु विद्येनें युक्त करून मला आकाशांतून सोडून दिलें. बाबा, आपण त्यावेळीं मला घेतलें व पुष्पवती राणीजवळ दिलें. माझें आपण पुत्र मानून पालन-पोषण केलें. हा माझा पूर्वेतिहास आहे.

यानंतर माझी ही पूर्वजन्म कथा ऐकून [illegible] होऊन सर्वभूतहितआचार्यांजवळ दीक्षा घेतली. [illegible] 'महेन्द्रोदय' उद्यानांत होते. आपण त्यांच्याकडे [illegible]. आपल्या दीक्षेच्या समारंभ मी मोठ्या थाटानें केला. [illegible] नगराची रचना केली. [illegible] देवो 'जनकराजाच्या वैभवशाली पुत्रांत पुत्र [illegible]' [illegible] झाली. प्रजाजनही [illegible].

सीतेच्या मनांत भावाचा स्नेह उत्पन्न होऊन ती रडूं लागली. रामचन्द्रांनीं तिची समजूत काढून शोकरहित करण्याचा प्रयत्न करण्यांत रात्र समाप्त झाली. प्रातःकालीं भूतहितआचार्यांचें दर्शन घेण्यासाठीं दशरथ महाराज आपल्या सर्व स्त्रिया रामादिपुत्र व सीता यांच्यासह आले. त्यांनीं माझ्या पित्याचा चन्द्रगतिचा दीक्षाविधि पाहिला. चन्द्रगतिला दीक्षा घेण्याचें कारण काय घडलें असा प्रश्न विचारल्यावर त्यांनीं माझी पूर्वजन्माची सर्व हकीकत सांगितली.

यानंतर भामण्डल आचार्यांना म्हणाला 'प्रभो, माझ्यावर चन्द्रगतीचा स्नेह कां उत्पन्न झाला याचें कारण मला सांगा. तेव्हां आचार्यांनीं याप्रमाणें सांगितलें.

पूर्वी 'दारुग्राम' नामक गांवांत विमुचि नामक ब्राह्मण, पत्नी अनुकोशा, पुत्र अतिभूति, पुत्रवधू सरसा, यांच्या समवेत सुखानें राहत असे. एकेवेळीं परदेशांतील 'कयान' नांवाचा ब्राह्मण आपल्या 'ऊरी' नामक मातेसह विमुचि ब्राह्मणाच्या घरीं आला. तो विमुचि ब्राह्मणाच्या सर्व कुटुंबावर फार प्रेम दाखवित असे त्यामुळें त्याच्याविषयीं फार विश्वास उत्पन्न झाला. एकदा त्यानें विमुचि ब्राह्मणाचें जमिनींत पुरलेलें धन व त्याची सून 'सरसा' यांना घेऊन पलायन केलें. आपली पत्नी पळून गेलेली पाहून अतिभूति अतिशय दुःखी होऊन निघून गेला. विमुचि ब्राह्मण परदेशीं धनिक लोक पुष्कळ दक्षिणा देतात म्हणून लोभानें गेलेला होता. त्याला ही हकीकत समजल्यावर तो दुःखी होऊन परत आला. आपल्या पत्नीची पुत्र, धन व सून गेल्यामुळें अतिशय दुःखद स्थिति झालेली पाहून फारच दुःखी झाला. त्यानें पुत्राचा व सुनेचा शोध करण्यासाठीं 'दारुग्राम' सोडलें. बरोबर आपली पत्नी व कयान ब्राह्मणाची माता ऊरी यांना घेतलें. अनेक गावांत जाऊन पुत्र व सुनेचा शोध केला पण कोठेंही ते न भेटल्यामुळें ते सर्वच विरक्त झाले व एका अवधिज्ञानी जैनाचार्या-जवळ त्यांनीं दीक्षा घेतली. विमुचि साधु झाला व अनुकोशा आणि ऊरी या आर्यिका झाल्या. तिघानींही पुष्कळ वर्षे तप केलें व आयुष्यान्तीं समाधिमरणानें स्वर्गांत देव-देवीपद त्यानीं प्राप्त करून घेतलें. देवसुखाचा अनुभव घेऊन तेथून च्युत होऊन विमुचि ब्राह्मण 'चन्द्रगति' विद्याधर झाला. अनुकोशा त्याची पत्नी 'पुष्पवती' झाली. व 'ऊरी' ही जनक राजाची राणी विदेहा झाली.

इकडे अतिभूतिआदिक हिंसामतांत तत्पर झाले त्यामुळें कुगतींत ते फिरूं लागले. सरसा ही हरिणी होऊन जन्मलीं व वाघाच्या भयानें पळून ती जंगलांत पेटलेल्या आगींत मरण पावली व 'मनस्विनी' राणीची चित्तोत्सवा कन्या झाली.

# एकतिसावें पर्व.

निर्मल तलवारीसम झालें आकाश नीलरंगाचें ।
दृष्टीस मेघ न पडे दशदिग्वदनीं प्रसन्नता नाचे ॥ १ ॥
साधूंच्या हृदयासम जल झालें स्वच्छ कूप-सरितांचें ।
शारदसमयीं होय प्रगट तडागांत हास्य कमलांचें ॥ २ ॥
चिखल न भूमीवरती इन्द्रधनुष्य न नभीं कुठेंहि दिसे ।
शुभ्राभ्रखण्ड कोठें भासे विद्युद्विलास त्यांत नसे ॥ ३ ॥
ऐशा समयीं चिन्तन भामण्डल करित राहि सीतेचें ।
उद्विग्नहृदय होउनि पुढें पित्याच्या असें वदे साचें ॥ ४ ॥

[ सीता व रामाचा विवाह झाला ही वार्ता ऐकून
भामंडल त्यांच्याबरोबर युद्ध करण्यास निघाला. ]

बावा विवाह माझा सीतेसह केधवा वरें करिता ।
सोसूं दुःख किती मी दिवसावधि मी न सोसवे आतां ॥ ५ ॥
यापरि त्याच्या वचना ऐकुनि बुध खिन्न जाहले हृदयीं ।
सत्यार्थ त्यास सांगे खग एक विचार करुनि त्यासमयीं ॥ ६ ॥
वज्रावर्त धनुष्या दोरी चढवून नम्र तें केलें ।
रामें सीता वरिली त्वद्धृदयेप्सित[1] तयाकडे गेलें ॥ ७ ॥
आशा सोड तियेची तिजहुनि सुन्दर अनेक खगकन्या ।
तुजला वरुनि कुमारा स्वतःस त्या मानितील बहु धन्या ॥ ८ ॥
भालीं जें जें लिहिलें तैसेंचि घडे न अन्यथा होतें ।
करुनि विचार कुमारा ! शान्त करी बा स्वकीय हृदयातें ॥ ९ ॥
वार्ता श्रवुनि अशी ही कुमार हृदयांत कुपित बहु झाला ।
ते क्षुद्र भूमिगोचर वृक्षाचा सत्त्वहीन जणु पाला ॥ १० ॥
त्यांना जिंकायातें खेचरजना वेळ कोणता लागे ।
मी एकटाहि जिंकुनि सीतेला शीघ्र आणितो वेगें ॥ ११ ॥

---

१ तुझ्या हृदयानें इच्छिलेलें.

झाला विद्याधरकुलिं जन्म वृथा अन्यथा मला वाटे ।
त्यांना सहन न करितों सगळे काढून टाकितों कांटे ॥ १२ ॥
बोलुनि कुमार यापरि उंच विमानें नभांत तो गेला ।
नगरग्रामवनादिक भूमीचा भाग तैं तया दिसला ॥ १३ ॥
वेगें विदग्धविषयीं स्वपूर्व-नगरासमीप तो आला ।
हा भूप्रदेश वाटे परिचित उमजे न केंधवा मजला ॥ १४ ॥
चिन्ता हृदयीं होतां जातिस्मरणें कुमार तो साजे ।
'कुण्डलमण्डित' नामक होतो मी भूप पूर्वभवि समजे ॥ १५ ॥
मूर्च्छित झाला सचिवें चन्द्रगतीच्या समीप आणियलें ।
चन्दनशीत-जलानें त्याचा तन्मूर्च्छाध्वंसनास क्षणि केलें ॥ १६ ॥
नीचहि जन मनिं ऐसें नच चिन्तिति हाय चिन्तिलें मीं तें ।
उभय हि राहुनि जननीकुक्षीं लज्जा न मन्मना नमतें ॥ १७ ॥
शोकें पीडित ऐशा बसवुनि मांडीवरी कुमारास ।
जनक तयाला वदला मूर्च्छेचा हेतु सांग आम्हांस ॥ १८ ॥

[ भामण्डल पूर्वजन्म सांगतो. ]

पूर्वी विदग्धनगरीं कुण्डलमण्डित नृपाल मी होतों ।
'युद्धप्रियता' होता प्रसिद्ध गुण मम नभस्स्पृगति तो ॥ १९ ॥
मी द्विजभार्या हरिली कपटें झालें द्विजास बहु दुःख ।
हाकलून दिलें त्या झालें त्याचें अतीव [illegible] दुःख ॥ २० ॥
अनरण्यवसुपतिनें माझें स्वैरत्व-हरण तें केलें ।
मीं तनुशेष जहालों जिनमुनिसंपात गमन मम झालें ॥ २१ ॥
त्रैलोक्य पूज्य भगवज्जिनेश्वराचें पवित्र मनि स्मरलें ।
मम मन असांस भोजन नाम व्रत मी सदैव आचरिलें ॥ २२ ॥
जिनशासनमाहात्म्यें असुनि हि पापी न [illegible] मजला ।
प्राप्त जहाली तेणें माझ्या हृदयास मोद [illegible] ॥ २३ ॥
भोजन अमांससेवन होतें माझें [illegible] ।
मृत मी तेणें मरतां शीघ्र विदेहोदरांत [illegible] ॥ २४ ॥

---

१ आलिंगिला. २ [illegible] ३ [illegible]
४ राज्यभ्रष्ट होऊन फक्त शरीरानें मी उरलों. ५ [illegible]
[illegible] ६ [illegible]

दुसराहि जीव आला उदरिं तिच्या स्त्रीत्व लाभलें त्यास ।
मज जन्मतांचि हरिलें यापरि तूं तात जाण इतिहास ॥ २५ ॥
अतिदूर नभीं नेलें मांस गिधाडें तसें मला कोणीं ।
हननाच्या[1] संकल्पें हृदयिं दयोद्भव तदीय होय झणी ॥ २६ ॥
कर्णयुगीं कुण्डलयुग माझ्या घालून सोडिलें मजला ।
आकाशांतुनि खालीं भूषविलें तात मी त्वदीयकुला ॥ २७ ॥
देऊन तात विद्या केलें विद्याधरेश तूं मजला ।
यापरि बोलुनि थांबे कुमार विस्मय जनांस बहु झाला ॥ २८ ॥
संसार विचित्र असे पूर्ण असा बोध तन्मनीं ठसला ।
वैराग्यरसानें तैं ताताचा हृत्प्रदेश पाणवला ॥ २९ ॥
श्रीसर्वभूत-हितगुरु नगर अयोध्या महेन्द्र उद्यानीं ।
होते तेथें जाउनि वन्दी मत्तात्त त्या शुभध्यानी ॥ ३० ॥

[ चन्द्रगति विद्याधर राजा भूतहितगुरुजवळ दीक्षा घेतो. ]

मत्तात्त त्यास बोल गृहवास विरक्त आज होऊन ।
घेउनि जिनदीक्षा मी करावया इच्छितो तपश्चरण ॥ ३१ ॥
आहे तुझी सदिच्छा घे जिनदीक्षा प्रमादें[2] सोडून ।
वदले सद्गुरु ताता होते सङ्घांत जे महाश्रमण ॥ ३२ ॥
महिमा मी बहु केली भावें त्यासमयिं तातदीक्षेची ।
नारी मधुररवानें गाती हो गर्जना सुवाद्यांची ॥ ३३ ॥
" वैभवशाली होवो जनकनृपाचा सुपुत्र जयवन्त ।
विश्रान्ति घेति ज्याच्या ठायीं सद्गुण न ज्या असे अन्त " ॥ ३४ ॥
जतकर्णकुहरिं[3] जातां निद्रा त्यांची समस्त दूर सरे ।
यापरि भाटगणांचा ध्वनि प्रतिध्वनिमिषें नभीं पसरे ॥ ३५ ॥
तो ध्वनि कानीं पडला रात्रीं बहुवार जाहली जागी ।
सगळी प्रजा नि सीता चिन्तिति कोठून येइ मधुरा गी[4] ॥ ३६ ॥
हा जनक कोण ज्याचा सुपुत्र होवो जगांत जयवन्त ।
भाटध्वनि ऐकुनि हो भ्रातृस्मरणांत लीन तत्स्वान्त[5] ॥ ३७ ॥

---

१ मारण्याच्या विचारानें. २ आळस, रागद्वेष. ३ कानांच्या छिद्रांत. ४ ध्वनि. ५ सीतेचें मन.

भ्राता कनक जयाचा ऐसा माझा पिता असे जनक ।
नन्दैन हरिला असुरें यत्स्मरणें हृदयिं होय बहु शोक ॥ ३८ ॥
भ्रातृस्नेहाकुलता येतां सीता रडे सशब्द तदा ।
अभिराम राम वदला प्रिये असा शोक होय सर्व वृथा ॥ ३९ ॥
जे गेले जे मेले जे हरिले इष्टमित्र विबुधगण ।
शोक तयाचा करिति न कदापि तत्प्राप्ति होय नच जाण ॥ ४० ॥
जे अज्ञ आणि कातर त्यांच्या हृदयास शोक पीडा दे ।
शूर शहाणे नर जे पीडित होति न कदापि ते खेदें ॥ ४१ ॥
यापरि राम नि सीता बोलत असतां समाप्त होय निशा ।
मंगलगीता वदले भाट स्वमनीं धरून बहु तोषा ॥ ४२ ॥
दशरथनृप पुत्रासह निजभार्यासह निघे प्रसन्नमनें ।
नगरा-बाहिर येतां विद्याधरसैन्य पाहि तो नयनें ॥ ४३ ॥
इन्द्रपुरासम निर्मित पुर ध्वजा-तोरणादि शोभांनीं ।
सुन्दर रत्नगृहांनीं पाहुनि भूपाल तोषला स्वमनीं ॥ ४४ ॥
यानन्तर उद्यानीं मुनिवृन्दें गुणगुरुस पाहून ।
नमुनि तयांच्या चरणा स्तुतिपूजा तो करी प्रसन्नमन ॥ ४५ ॥
सूर्योदयिं दीक्षाविधि चन्द्रगतीचा बघे प्रमोदून ।
उचितस्थानीं बैसुनि दशरथनृप [illegible] जन ॥ ४६ ॥

[ कांहीं लोकांनीं सम्यग्दर्शन [illegible] ]

पितृदीक्षाविधि पाहुनि भामण्डल [illegible] ।
विद्याधरवर्गासह एके बाजुस [illegible] ॥ ४७ ॥
खेचर भूचर मुनिवर गुरुसन्निध [illegible] ।
विनयें ऐकुनि सगळे हृदयान्तरि [illegible] ॥ ४८ ॥
संशयविहीन होउनि सम्यग्दर्शन [illegible]
झाले कृतार्थ कांहीं अणुव्रत [illegible]

[ चन्द्रगतीच्या दीक्षेचें [illegible]
[illegible] ]

१ पुत्र. २ [illegible] ३ [illegible]
[illegible] ६ [illegible]

ऐकुनि हितोपदेशा दशरथ वदला गुरो मला बोला ।
श्रीचन्द्रगति-खगेश्वर-दीक्षेचा हेतु कोण हो झाला ॥ ५० ॥
अपुल्या सहोदराला उत्सुक जाणावयास वैदेही ।
होऊन भक्तिविनयें चित्त श्रवणास आपुलें वाही ॥ ५१ ॥
यतिवर वदले राजन्, स्वार्जितकर्में[1] विचित्रता येते ।
जीवीं ती ऐके बा मुमुक्षुजीवास जी हितो[2] होते ॥ ५२ ॥
संसारीं बहु फिरला हा दुःखित जीव कर्मवातानें ।
प्रेरित होउनि चन्द्रा[3] द्युतिमण्डल[4] लाभला अयत्नानें ॥ ५३ ॥
पुष्पवतीला अर्पुनि पुत्रस्नेहें तयास वाढविलें ।
युवतां[5] प्राप्त जहाली वपूस सौन्दर्य कामसम[6] आलें ॥ ५४ ॥
स्त्रीचित्रदर्शनानें कामदशा विविध जाहल्या प्राप्त ।
तत्प्राप्ति केवि होइल अशा विचारें अतीव हो त्रस्त ॥ ५५ ॥
कृत्रिम अश्वद्वारें मिथिलापति शीघ्र जनक आणविला ।
प्राप्त न सीता झाली भोगी तो विरहदुःखसन्ततिला ॥ ५६ ॥
विद्यावलगर्वानें हरण करायास सज्ज होऊन ।
वसुनि विमानांत निघे पूर्वभवाचें तयास हो स्मरण ॥ ५७ ॥
मूर्च्छित होतां पुनरपि आप्तजनें निजगृहा तया नेलें ।
पूर्वभवाचें सगळें निजताताला स्वरूप सांगितलें ॥ ५८ ॥
भरतीं विदग्धनगरीं कुण्डलमण्डित नृपाल मी होतों ।
हरिली पिङ्गलजाया जणु पाप्यांचाच मुकुटमणि गमतों ॥ ५९ ॥
अनरण्य-नृपालाच्या सेनापति शूर बालचन्द्रानें ।
मम राज्य हरण केलें झालों मी देशहीन दीनपणें ॥ ६० ॥
भूमण्डलांत फिरलों मुनिवर्यांच्या समीप जाऊन ।
मांसत्यागव्रत मी धरिलें हृदयांत पूर्ण आमरण ॥ ६१ ॥
धर्मध्यानीं तत्पर राहुनि कालुष्यरहित होऊन ।
मेलों जनकविदेहागर्भी केलें तदैव अवतरण ॥ ६२ ॥
इकडे पिंगल आला निजगृहिं पाही न जो स्वभार्येस ।
अत्यन्त खिन्न झाला हृदयीं धरि तो सुतीव्र दुःखास ॥ ६३ ॥

---

१ स्वतः मिळविलेल्या कर्मांनीं. २ हितकर. ३ चन्द्रगतीला. ४ भामण्डल. ५ तरुणपणा. ६ मदनासारखें.

गेलिस कोठें सुन्दरि, मुखचन्द्र तुझा दिसेल मज कोठें ।
ऐसें बोलत फिरला ग्राम-नदी-गिरितटीं न ती भेटे ॥ ६४ ॥
विरहाग्निदग्ध होउनि झाला मुनिवर तपांत बहु लीन ।
उत्कण्ठा न तियेची तिळमात्रहि मन्द हो मनांतून ॥ ६५ ॥
आयुष्यान्तीं झाला पिङ्गल तो असुर मनिं विचार करी ।
सम्यक्त्वरहित कान्ता तिर्यग्योनींत जन्म काय धरी ॥ ६६ ॥
किंवा निष्कपटी ती बाला नारीभवांत अवतरली ।
स्मरुनि जिना मृतिसमयीं किंवा ती देवपर्ययीं गेली ॥ ६७ ॥
यापरि विचार करितां निश्चय त्याच्या मनांत उद्भवला ।
जनकविदेहागर्भी आली म्हणुनि प्रमोद बहु झाला ॥ ६८ ॥
कुण्डलमण्डित अरि मम जन्म कुठें पावला प्रकोपानें ।
करितां विचार ऐसा समजे त्याला स्वकीयबोधानें ॥ ६९ ॥
तोहि विदेहागर्भी आला आहे असें तया समजे ।
ध्यानीं प्रसूतिकाला ठेवी [illegible] हृदयिं सजे ॥ ७० ॥
होतां प्रसूत राणी हरण करी बालकास [illegible] ।
बालास दैवयोगें अन्तःकरणांत शान्त होऊन ॥ ७१ ॥
तूं दीर्घकाल वा जग ऐसें बोलुन [illegible] ।
लघु सोडि त्या नभांतुनि सुर तो [illegible] ॥ ७२ ॥
पितृकल्पा चन्द्रगते! पतनाच्या मज करांत घेऊन ।
पुष्पवतीच्या संनिध दिलें मला [illegible] ॥ ७३ ॥
झालें तुझ्या प्रसादें विद्याधरपद परन्तु मम माता ।
राणी असे विदेहा जनक असे [illegible] ॥ ७४ ॥
सीता ही मम भगिनी सहोदरी [illegible] ।
वांदे भामण्डल मग [illegible] ॥ ७५ ॥
होउनि विरक्त खगपति चन्द्रागति [illegible] ।
भामण्डलास झाला दीक्षित [illegible] ॥ ७६ ॥
जो जन्में मृति त्याला पुनरपि [illegible] ।
यापरि भव भय होतें चन्द्रागति [illegible] ॥ ७७ ॥

१ कैलासपर्वत. २ [illegible] सारखा. ५ [illegible]

माता आणि पिता तव वत्स वियोगें सशोक आहेत ।
नेत्रोत्सव दे त्यांना सौख्योदधिलाभ[1] होउ दे त्वरित ॥ ७८ ॥
चन्द्रायणादिकांचा माझ्यावरि कां असे वदा स्नेह ।
'श्रीभूतहित' मुनीश्वर हरण करावा मदीय हा मोह ॥ ७९ ॥
माता-पिता तुझे हे पूर्वभवीचे असे मनीं आण ।
तत्कथन ऐक जेणें संदेहाचें घडे निराकरण ॥ ८० ॥
[ सर्वभूतहितआचार्य चन्द्रायणादिकाचें पूर्वभववर्णन करितात.]
दारुग्रामीं विमुचि ब्राह्मण भार्या तयास अनुकोशा ।
अतिभूति पुत्र उभया पुत्रवधू जीस बोलती सुरसा ॥ ८१ ॥
ऊरी जयास माता कयान नामें कुविप्र येइ घरीं ।
भूगतधना नि सरसा स्नेहातें दर्शवून उभय हरी ॥ ८२ ॥
अतिभूति बहुत झाला दुःखी भूमण्डलीं करी भ्रमण ।
स्त्रीच्या आणि धनाच्या हरणें वेडें बनें तदीयमन ॥ ८३ ॥
देशान्तरिं बहु देती द्विजास धन-दक्षिणा सुभक्तगण ।
ती मिळवाया विमुचि ब्राह्मण नानास्थलीं करी भ्रमण ॥ ८४ ॥
धन हरिलें सरसेला पळवुनि नेलें कयानविप्रानें ।
पुत्रहि निघून गेला श्रवण करी वृत्त हें द्विज श्रवणें[2] ॥ ८५ ॥
घाबरला तो हृदयीं आला स्वगृहाकडे त्वरा करुन ।
पाही अनुकोशेला करि जी अतिजीर्ण वस्त्र-परिधान ॥ ८६ ॥
सान्त्वन करुनि तियेचें तिजला ऊरीस ही सवें घेई ।
अन्वेषण[3] पुत्राचें करण्या ग्रामादिकास तो जाई ॥ ८७ ॥
नच पुत्र भेटला त्या परि अवधिज्ञाननेत्रसूरीचें[4] ।
दर्शन तयास झालें विरक्त झालें तदीयमन साचें ॥ ८८ ॥
संसारस्थिति दुःखद जाणुनि मनिं विमुचि जाहला श्रमण[5] ।
ऊरीसह अनुकोशा करि हृदयें आर्यिकाव्रतग्रहण ॥ ८९ ॥
करुनि शुभध्याना त्रिकं[6] निःसङ्ग[7] समाधिमरण साधून ।
स्वर्गीं सुरसुख भोगी सुरास जेथें जरारुजादिक[8] न ॥ ९० ॥

---

१ सुखसमुद्राचा लाभ. २ कानांनीं. ३ शोध. ४ अवधिज्ञानरूपी डोळा आहे अशा दिगंबराचार्यांचें. ५ मुनि. ६ तिघेजण. ७ परिग्रहांनीं रहित. ८ वृद्धावस्था रोग वगैरे.

अतिभूति आदि रमले हिंसा यादांत संयमद्वेषी ।
रौद्रध्यानीं तत्पर गेले कुगर्तीत सर्वदा दोषी ॥ ९१ ॥

सरसा हरिणी झाली व्याघ्रभयें यूथ देह सोडून ।
दावानलांत पडली दिलें तयें सर्व सोडुनि प्राण ॥ ९२ ॥

सुन्दर मनस्विनीच्या उदरीं चित्तोत्सवा सुता झाली ।
अघकर्मप्रशमानें दुःखाश्रु न वाहिले जिच्या गालीं ॥ ९३ ॥

मरुनि कयान द्विजही झालासे उंट मरण पावून ।
धूमध्वजसुत पिङ्गल झाला नच व्याप्त अक्षरज्ञान ॥ ९४ ॥

अतिभूति हंस झाला ताराक्षसरोवरांत अतिदीन ।
बहिरिससाणा पकडी तयास त्याच्या मनांत करुणा न ॥ ९५ ॥

पडला जिनमंदिरिं तो ऐके श्रीमज्जिनेश्वर-स्तवन ।
झाला मरून किंनर दशवर्षसहस्र आयुपरिमाण ॥ ९६ ॥

तें संपतां तयाचें कुण्डलमण्डित नृपाल तो झाला ।
चित्तोत्सवेस हरिलें तद्गनिर्मोक्षोद्यमीन नित रमला ॥ ९७ ॥

मरुनि विदेहा-गर्भी भणिलें भामण्डलाख्य सुत झाला ।
यापरि मुनिवच ऐकुनि तो जनकात्मज मनांत [illegible] धाला ॥ ९८ ॥

जो विभुचि पूर्वजन्मीं भोगुनि सुरसौख्य चन्द्रगति झाला ।
अनुकोशा जी झाली पुष्पवती स्वर्गसौख्य [illegible] ॥ ९९ ॥

उरी दीप विदेहा राणी झाली प्रथित जनकाची ।
यापरि वृत्तश्रवणें झाली साश्चर्य वृत्ति सुजनांची ॥ १०० ॥

भामण्डलभव ऐकुनि दशरथभूपाल मुदित मनि झाला ।
प्रेमें भेटुनि त्याला जणु तो रोमाञ्चकञ्चुका ल्याला ॥ १०१ ॥

[ [illegible] ]

सीतादर्शि [illegible] ।
मोदाश्रु लोचनांतुनि [illegible] ॥ १०२ ॥

धन्यो ! प्रसन्न झाले [illegible] ।
चिरविरहान [illegible] ॥ १०३ ॥

१ कुण्डलमण्डित. २ [illegible] ३ [illegible]

बोलून असें उठली सीता प्रेमें स्वबाहु पसरून ।
भामण्डलास भेटे सुखार्णवीं[1] उभय जाहले लीन ॥ १०४ ॥
प्रेमालिङ्गन देउनि करून आपण तयासवें राम ।
झाला सुखी सलक्ष्मण लाभे सर्वास सौख्य अविराम[2] ॥ १०५ ॥
नन्तर खेचर भूचर वन्दून मुनीश्वरास सानन्द ।
स्वस्थानाप्रति गेले गमला दिन तो तयास सुखकन्द ॥ १०६ ॥

[ दशरथ महाराजाचें पत्र वाचून जनकाचें पत्नीसह
अयोध्येस आगमन.]

भामण्डलाबरोबर सुविचारा करुन पाठवी दूत ।
दशरथ, गगनें गेला लेख दिला जनक जाहला मुदित ॥ १०७ ॥
इकडे भूपें नेलें स्वपुरीं भामण्डला खगासहित ।
सुन्दरसौधीं स्थापुनि आतिथ्य[3] करी करून त्या मुदित ॥ १०८ ॥
उत्सव केला मोठा केलें सन्तुष्ट याचका दानें ।
दारिद्र्य नष्ट केलें समृद्ध झाले समस्त विभवानें ॥ १०९ ॥
वाचून मित्रपत्रा पुत्रागमनें प्रमोद बहु झाला ।
जनका निवेदकां[4] जणु समजुनि निजपुत्र भेटला त्याला ॥ ११० ॥
आनन्दमग्न होउनि वस्त्रालङ्कार सकल देऊन ।
हर्षित केलें दूता मानी नृप धन्य आजचा सुदिन ॥ १११ ॥
आला पुरीं प्रियेसह अपुला घेउनि समस्तपरिवार ।
बसुनि विमानीं पाहुनि निजात्मजा तोषला मनीं फार ॥ ११२ ॥
आलिङ्गुनि दृढ पुत्रा नेत्रजलें सिंचिली तयें धरणी ।
मोदोद्रेकें[6] माता मूर्च्छित झाली बघून सुत नयनीं ॥ ११३ ॥
मूर्च्छा समाप्त होतां यापरि ती बोलली स्वपुत्रास ।
तुज जन्मतांचि हरिलें खलासुरें[7] जाहला बहु त्रास ॥ ११४ ॥
तव दर्शनचिन्तेच्या अनलें[8] हा देह बहुत होरपळे ।
परि आज दर्शनानें चिरविरहक्लेश[9] सर्व दूर पळे ॥ ११५ ॥

---

१ सुखसमुद्रांत. २ अखण्ड. ३ पाहुणचार. ४ वार्ता सांगणाऱ्याला. ५ हकिकत सांगणाऱ्यास. ६ अतिशय आनन्दानें ७ दुष्ट असुरदेवानें. ८ चिन्तेच्या अग्नीनें. ९ दीर्घवियोग दुःख.

पुष्पवती धन्य असे तव शिशुलीलो बघून मोद तिला ।
झाला मृदुलस्पर्शे पावे ती नित्य सौख्य सन्ततिला ॥ ११६ ॥
बालकुमारदशांचें दर्शन नेत्रद्वया तिच्या सुखवी ।
तदभाव हाय माझ्या देहा दिनरात्र या सदा सुकवी ॥ ११७ ॥
जिनशासनदेवीसम पाही निश्चलपणें विदेहा ती ।
भामण्डलास तेणें जणु आलें पुत्रसुख तिच्या हातीं ॥ ११८ ॥
निजसकलबन्धुसंगममुदितमना मासमात्र तो राही ।
भामण्डल रामाला सीताप्रेमें असे वदे पाही ॥ ११९ ॥
हे अभिरामा रामा, सीतेला तूंच एक शरण असे ।
होतां विरह तुझा ही मत्स्य जलाविण [illegible] केंवि वसे ॥ १२० ॥
स्नेहें भेटुनि वदला सीतेला भगिनि. खिन्नता सोड ।
भेटेन मी पुनः गे स्वतःस पतिसेवनांत नित जोड ॥ १२१ ॥
माता भेटुनि वदली सासुश्वशुरादि वृद्ध जे जननी ।
आदर नित्य तयांचा करितां भेटेल सौख्यसम्पत्ति ॥ १२२ ॥
पतिभक्ति हृदयिं ठेवी पतिचित्ता अनुसरून तूं वाग ।
त्याचा तेणें होइल बाळे, तुजवरि सदैव अनुराग ॥ १२३ ॥
पाहून परिजनाला उचितादर करित तूं सदा जा गे ।
सर्वप्रशंसनीया लाभेल दशा तुला सदा वेगें ॥ १२४ ॥
कनक तुझा गे चुलता त्याला जनकासमान तूं मान ।
उपदेश नित्य ठेवी हृदयीं तूं करुनि नम्र निज मान ॥ १२५ ॥
[ कनकाला राज्य देऊन जनकाचें [illegible] ]
सर्व प्रजाजनांना आमंत्रुनि [illegible] ।
स्थापियलें कनकावरि नृपत्व [illegible] ॥ १२६ ॥
नन्तर माता-पितरां भामण्डल [illegible] ।
नेला आनन्दानें रथी [illegible] ॥ १२७ ॥
आराधन धर्मादि करितो विद्याधरेन्द्र [illegible] ।
सुरदुर्लभ [illegible] ॥ १२८ ॥

---

१ [illegible] २ [illegible] ३ [illegible]
[illegible]
६ [illegible] ७ [illegible]

बलनारायणपदही होतां जिनदास तें तया मिळतें ।
रामें नि लक्ष्मणानें मेळविलें हें करून पुण्यशतें ॥ १२९ ॥

निर्मल चित्त जयाचें भामण्डलबन्धुयोग जो ऐके ।
त्या इष्टयोग लाभे जिनदासा सौख्य कोण हें रोके ॥ १३० ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे भामण्डलसमागमाभिधानं नाम एकत्रिंशत्तमं पर्व ॥ ३१ ॥

एके दिवशीं रत्नमालीनें वज्राक्ष नामक राजाबरोबर युद्ध करण्यासाठीं मोठें सैन्य घेऊन प्रयाण केलें. दोघेही राजे लढण्यास उद्युक्त झाले. त्यावेळीं एक देव रत्नमालीकडे येऊन 'राजन्, माझे हिताचे चार शब्द ऐकून घे व नंतर युद्ध कर' असें म्हणाला. राजानेंही त्याचा उपदेश ऐकला. देवानें म्हटलें 'राजन्, तूं पूर्वभवांत या भारतांतील गांधार नामक नगरांत 'भूति' नांवाचा पापकार्य करणारा मांसभक्षक राजा होतास. एकेवेळीं कमलगर्भ नामक मुनिराजांनीं उपदेश करून मांसापासून तुला निवृत्त केलें. या मांसत्यागव्रतानें तुला देवायूचा बन्ध झाला. पण उपमन्यु पुरोहितानें तुला पुनः मांसभक्षी बनविलें त्यामुळें तुझ्या बद्ध झालेल्या देवायूचा नाश झाला. एके वेळीं शत्रूंनीं हल्ला करून राजा भूति व पुरोहित या उभयतांना मारून टाकिलें. पुरोहित मरून हत्ती झाला भूतिराजाच्या पुत्रानें त्याला वश केलें. एका युद्धांत तो हत्ती मारला गेला. तो मरून त्याच राजाचा 'अरिसूदन' नामक पुत्र झाला. त्यानें एकदा मांसत्यागाचा ज्यांनीं उपदेश केला होता त्या कमलगर्भ मुनींना पाहिलें. त्याला आपल्या पूर्वजन्माचें स्मरण झालें. त्यामुळें विरक्त होऊन त्याच्याजवळ दीक्षा घेतली व तप करून 'शतार' स्वर्गांत तो देव झाला.

इकडे भूतिराजा मरण पावून मन्द नामक भयंकर वनांत हरिण झाला. वनांतील अग्नींत सांपडून मेला व 'कलिज' नामक मनुष्य झाला. त्या जन्मांत पुष्कळ पापें करून 'शर्करा' नामक दुसऱ्या नरकांत जन्मला. शतार स्वर्गांत जन्मलेल्या पुरोहित देवानें स्नेहानें नरकांत जाऊन नारकी झालेल्या तुला उपदेश केला नंतर तूं नारकीय आयु समाप्त झाल्यावर मरून आतां 'रत्नमाली' नामक राजा झाला आहेस. यास्तव हें दुर्गति देणारें युद्ध तूं करूं नकोस ! देवाचें भाषण ऐकून राजा रत्नमाली आपल्या गांवीं आला. त्यानें सूर्यजयाला राज्य दिलें व तिलकसुन्दर मुनिजवळ दीक्षा घेतली. तप केलें व स्वर्गांत तो देव झाला.

सूर्यजयानेंही कांहीं वर्षे राज्य केलें व तिलकसुन्दर मुनिराजाजवळ दीक्षा घेऊन तप केलें व दहाव्या महाशुक्रस्वर्गांत तो देव झाला. तेथील आयुष्य संपल्यावर तूं अनरण्य राजाचा पुत्र दशरथ झाला आहेस. नन्दिवर्धनाचा पिता नन्दिघोष हा ग्रैवेयकांत अहमिन्द्र झालेला होता. त्याचें तेथील आयुष्य संपल्यावर तो सर्वभूतहित झाला आहे. अर्थात् मीच पूर्वभवांत नन्दिघोष होतो. व उपमन्यु व भूति हे दोघेजण मरून तुझे मित्र जनक व कनक झाले आहेत. याप्रमाणें राजन् तुझ्या पूर्वभवाबरोबर जनकादिकांच्या पूर्वभवाचाही मी उल्लेख केला आहे.

आपलें पूर्वभव ऐकून दशरथ राजा आपल्या घरीं गेला पण त्याचें वैराग्य वाढू लागलें. त्यानें सचिवांना बोलावून मला दीक्षा घ्यावयाची आहे व रामाला राज्याभिषेक करावयाचा आहे असें त्यानें कळविलें. ही वार्ता दशरथाच्या सर्व स्त्रियांना कळली. त्या सर्व दशरथाकडे येऊन त्याला आपण दीक्षा घेऊ नयें म्हणून डोळ्यांत पाणी आणून विनवणी करूं लागल्या. आपला वियोग आम्हाला असह्य दुःख देईल असें म्हणू लागल्या. भरताला ही वार्ता समजली तो म्हणाला– जर वडिलांना वैराग्य झालें आहे तर त्यांनी तत्काल वनमार्ग स्वीकारावा. रामचंद्राला राज्याभिषेक करून -नंतर दीक्षा घेण्यासाठीं जाण्याचा विचार करावयास नको.– मी मात्र कोणाला न विचारता दीक्षा घेण्यासाठीं निघून जाईन. असें म्हणून तो निघून जाण्याची तयारी करीत आहे असें पाहून कैकेई चिन्ताक्रान्त झाली. आतां मला पतीचा व पुत्राचाही वियोग होणार. कोणता उपाय करावा कांहीं सुचत नाहीं असें ती मनांत चिन्तन करीत आहे.– तोंच तिला एक उपाय सुचला. ‘आपणांस पूर्वी महाराजांनीं वर देण्याचें कबूल केलें आहे. तो वर आतां आपण त्यांना मागावा असें मनांत ठरवून ती महाराजाकडे आली व म्हणाली महाराज, जिनदीक्षा धारण करणें कठिण असतें. आपलें इन्द्रतुल्य भोग भोगण्यांत आयुष्य व्यतीत झालें आहे म्हणून हा विचार सोडून द्यावा.– दशरथ महाराज म्हणाले माझ्या ठिकाणीं सामर्थ्य आहे म्हणून मला ती कष्टप्रद वाटत नाहीं. तुला काय इष्ट वाटतें तें मागून घे आतां विलंब लावू नकोस.

महाराजांचें हें भाषण ऐकून व खालीं तोंड घालून माझ्या भरताला आपण राज्य द्यावें असें ती म्हणाली. महाराजांनीं उदारपणानें म्हटलें ‘ मी तुला वर दिला आहे. मी असत्य बोलणार नाहीं. वर मागून तूं मला आज ऋणरहित केलें आहेस. मी भरताला राज्य देतो. त्याला राज्य देणें हा प्रसंगही गोड आहे.’ असें बोलत त्यांनीं तत्काल रामचंद्र व लक्ष्मण यांना बोलावून त्यांना असें म्हटलें– “ रामचंद्रा तूं माझा वडीलपुत्र आहेस. राज्यभार धारण करण्यास सर्वथा योग्य आहेस पण कैकेईनें मला युद्धाचेवेळीं सारथ्यकर्म करून मोठें साहाय्य केलें होतें व मी प्रसन्न होऊन तिला वर देण्याचें कबूल केलें होतें. तिनें यावेळीं भरतास राज्य द्यावें असें म्हटलें. मी जर त्याला राज्य दिलें नाहीं तर तो विरक्त होऊन दीक्षा घेऊन जाईल. व पुत्र-शोक असह्य होऊन ही प्राणत्याग करील. व मी असत्यभाषी म्हणून माझी अपकीर्ति पसरेल म्हणून अपकीर्तिच्या भयानें मी त्याला राज्य देत आहे. यांत मी ज्येष्ठ पुत्र अशा तुला वगळून धाकट्या भरताला राज्य देत आहे. हें मी सीमोल्लंघन करीत

आहे व त्यामुळें माझ्या मनाला फार वेदना होत आहेत. मी हा सगळा प्रकार तुझ्यापुढें स्पष्ट मांडला आहे."

महाराजांचें भाषण ऐकून रामचंद्रांनीं विनयानें महाराजांच्या चरणाकडे दृष्टि ठेवून असें म्हटलें– "महाराज, आपण सत्यास मिठी मारली आहे त्यामुळें मला अत्यानंद झाला आहे. आपली अपकीर्ति होत असेल तर मला इन्द्राचें वैभव कोणीं दिलें तरी तें मला नको आहे. पित्याच्या कीर्तिला अल्पही धक्का ज्यानें लागेल असें कार्य जो करीत नाहीं तोच सुपुत्र समजावा." असें बोलून रामचन्द्र महाराजाविषयीं आदर व्यक्त करीत आहेत अशावेळीं भरत तेथें आला व मी दीक्षा घेऊन भवनाश करण्यास वनांत जातो असें म्हणाला व तो निघालाही. इतक्यांत महाराजांनीं त्याला अडवून आपल्या मांडीवर बसविलें. व तूं राज्य कर मी तप करण्यास जातो असें म्हणाले. भरता तुझें वय अद्यापि कोवळें आहे. तूं मनुष्यजन्माचीं सुखें अनुभवून नंतर वृद्धावस्थेंत दीक्षा घे. भरत म्हणाला बाबा, यम बालक, तरुण हा भेद मानीत नाहीं तो त्यांचा नाश करितो. यास्तव मला आपण आडवूं नका.

भरता, प्रथमतः गृहस्थधर्म उत्तम प्रकारें पाळून नंतर मुनि होणें योग्य आहे हें ध्यानांत घे. बाबा, गृहस्थ पुष्कळ पाप करून नरकांत जातात यास्तव हा गृहस्थधर्म मला नको. मला संसाराचें भय वाटतें. यास्तव मला हें राज्य नको. भरत आपला आग्रह सोडीत नाहीं असें पाहून दशरथ महाराजांनीं मी कैकेयीस पूर्वी वर माग म्हटलें होतें व तो वर यावेळीं तिनें मागितला. माझ्या पुत्राला भरताला राज्य द्यावें असें तिनें म्हटलें व मी तुला राज्य दिलें आहे. माझ्या सत्य-प्रतिज्ञेला तूं बाधा आणूं नयेस. तूं दीक्षा घेशील तर तुझ्या कोमलांगी मातेला क्लेश होईल. ती आर्तध्यानानें मरून संसारवनांत फिरेल.

महाराजांच्या भाषणाला रामचंद्रांनींही पुष्टि दिली. "पित्याची आज्ञा पाळणें हें पुत्राचें कर्तव्य आहे यास्तव त्यांच्या आज्ञेचें उल्लंघन करूं नकोस. तूं आनंदानें राज्य कर व मी लांब जाऊन पर्वताचा तट किंवा नदीच्या किनाऱ्यावर राहीन. तुझ्या राज्याला माझ्याकडून केव्हांहीं बाधा होणार नाहीं." असें बोलून व महाराजांच्या चरणांना वन्दून रामचन्द्र जेव्हां निघाले तेव्हां दशरथ महाराज मूर्च्छा येऊन पडले. कौसल्याही बेभान झाली. सर्वांना– मित्र, राजे, सचिव, परिवार यांना भेटून रामचन्द्र निघाले. मी जेथें राज्य स्थापीन तेथें मी तुला अवश्य नेईन असें मातेला सांगून सीतेलाही तूं येथें प्रसन्न हृदयानें रहा असें म्हटलें. तिनें नाथ, आपण जिथें

जाल तिथें मी आपल्या सावलीप्रमाणें येणारच. मी येथें राहणार नाहीं. असें म्हणून सासरा-सासु आदिक वृद्धांना वन्दून सीता रामचन्द्राबरोबर निघाली. रामचन्द्र जात आहेत हें पाहून लक्ष्मणही त्यांच्यावरील अपार स्नेहानें त्यांच्याबरोबर निघाला.

पतिला सीता अनुसरत आहे हें पाहून सर्व नगर-स्त्रियांनीं सीतेनें पतिव्रतेचा जो धडा आमच्यापुढें ठेविला आहे तो आम्ही गिरवू म्हणून तिच्याविषयीं त्यांनीं आपली पूज्यबुद्धि व्यक्त केली.

रामचन्द्र, सीता व लक्ष्मण हे तिघे श्रीअरनाथ जिनमंदिरांत गेले. त्यावेळीं सूर्यास्त झाला होता. रामचन्द्राच्या सर्व माता त्या मंदिरात रामचन्द्राला भेटावयास गेल्या. त्याला पाहून त्यांना आनंद वाटला. नंतर त्या आपल्या पतीकडे– दशरथ महाराजाकडे आल्या व रामाला राज्य द्या म्हणजे आपल्या इक्ष्वाकु वंशाची नांव शोकसमुद्रांत बुडणार नाहीं. त्यांचें भाषण ऐकून दशरथ महाराज म्हणाले देवीनो, मी आतां साम्यभाव धरला आहे. सर्वांना सुख लाभो, कोणालाही दुःख न होवो अशी मी भावना भावित आहे. माझा आत्मा माझ्या स्वरूपांत आतां रमला आहे तुम्हीं त्यांना परत आणा व त्यांच्या अभ्युदयांत आजन्म सुख माना.

आतां मी रागद्वेष सोडून जैन मुनिराजाचें चारित्र धारण करणार आहे. मी आतां जिनभक्त होऊन सर्व कुभावनांचा त्याग करीत आहे. व मुक्तिरमा अनुरक्त करण्यासाठीं जिनदीक्षा घेणार आहे. असा माझा निश्चय मी आपणांस कळवित आहे. याप्रमाणें आपले विचार व्यक्त करून दशरथ महाराज विरक्त झाले.

# बत्तीसावें पर्व.

( सर्वभूतहितआचार्य दशरथ राजाचे पूर्व भव सांगतात. )

श्रीभूतहितमुनीशें द्युतिमण्डलवृत्त जें असें कथिलें ।
ऐकुनि तें मम सांगा भव दशरथ नृपतिनें तया म्हटलें ॥ १ ॥

मुनिवर्या नच ठावा भव माझा एकही मला देवा ।
सर्व मला ते सांगा करितो युष्मत्पदाब्जयुगसेवा[1] ॥ २ ॥

श्रीसर्वभूतहित मुनि वदले राजन् समस्त सांगेन ।
तूं ऐक शान्तचित्तें करितें तें वा भवाब्धिचें मथन[2] ॥ ३ ॥

हा जीवराशि आहे अनन्त न क्षय कदापि हो याचा ।
दृष्टान्त यास सिकता[3]-नभ-चन्द्रादित्य[4] किरणगण साचा ॥ ४ ॥

जीव अनादि नि वर्जित अन्तें सचराचर-त्रिलोकांत ।
निजकर्मसमूहावृत[5] योनिगणीं भ्रमण सतत करितात ॥ ५ ॥

जगिं सिद्धजीव झाले, होतिल, आहेत होत, हें जाण ।
अन्त न काला आहे जिनधर्मानेंचि सत्य हें कथन ॥ ६ ॥

मिथ्यात्वपापकर्में जीवा सन्देह सर्वदा राहे ।
जिनधर्मरहित त्याला श्रद्धानाचा न लेशही पाहे ॥ ७ ॥

श्रद्धारहिता धर्म न धर्मफलें त्या कुठून मिळतील ।
सम्यक्त्वरहित-जीवा दुःखचि लाभेल सत्य जिनबोल ॥ ८ ॥

भावन नाम श्रेष्ठी सेनपुरीं जणु असे महात्मा तो ।
जो भक्त मुनिजनांचा आधारस्तम्भ सज्जनां गमतो ॥ ९ ॥

त्या दीपिका सुभार्या आर्या जी पतिमनोनुकूल सदा ।
वागे गेही गृहिणीरत्न अशी कोप ये न तीस कदा ॥ १० ॥

या उभयांच्या कन्या रत्नाच्या येइ पोटिं जन्मास ।
खाणींत गारगोटी 'उपास्ति' जी धरि विरुद्ध नामास ॥ ११ ॥

---

१ आपल्या दोन पदकमलांची सेवा. २ मंथन. ३ वाळू. ४ सूर्य.
५ आच्छादलेले.

मिथ्याभिमानपूर्णा साधुजनीं द्वेष मानसीं वाही ।
निन्दा करी तयांची सुभावना यन्मनीं न केव्हांही ॥ १२ ॥
अन्न सुपात्रिं न देई दात्या अनुमति कदापि नच वाही ।
दात्या विरोध यत्नें करून सज्जनमनास ती दाही ॥ १३ ॥
इत्यादि दोष होते ठायिं तिच्या ती कुधर्मसंस्कारें ।
पावून मरण फिरली दीर्घ भवामधिं सुतीव्र दुःखभरें ॥ १४ ॥
अल्प अशा सुकृतानें[1] 'उपास्ति' मिळवून पुरुषपर्याया ।
चन्द्रपुरीं 'धारण' नर पत्नी त्या नयनसुन्दरी आर्या ॥ १५ ॥
त्यानें निर्मलभावें दान सुपात्रा अनेकदा दिधलें ।
उत्तरकुरु-भूमध्यें लाभे त्या कल्पतरुज[2]-सौख्य भलें ॥ १६ ॥
तेथून च्युत होउन पुष्कल-नगरांत नन्दिघोषाचा ।
वसुधेठायीं झाला सुपुत्र तो नन्दिवर्धनाख्येचा[3] ॥ १७ ॥
वैराग्य नंदिघोषा होतां तो नन्दिवर्धना देई ।
निजराज्यभार त्याचें सौख्य मिळे त्यास सर्वदा पाही ॥ १८ ॥
वन्दुनि यशोधरांना घेई तो नन्दिघोष दीक्षेस ।
तप करुनि शुचि[4] विचारें साधी तो श्रमण अमरसौख्यास ॥ १९ ॥
नृपनन्दिवर्धनानें पञ्चनमस्कारलीन होऊन ।
गृहिधर्म पाळियेला मना प्रजापालनांत ठेवून ॥ २० ॥
तो पूर्वकोटिवर्षें राज्या भोगुनि समाधिमरणानें ।
स्वर्गीं पञ्चम[5] गेला भोगी सुरसुख सदा जिनस्मरणें ॥ २१ ॥
होऊन च्युत तेथुनि सुरगिरिच्या पश्चिमीं विदेहांत ।
विजयार्ध-पर्वतावरि शशिसमरमणीय चन्द्रनगरांत ॥ २२ ॥
नृपरत्नमालि-विद्युल्लतोदरीं पुत्र जाहला अमर ।
सूर्यञ्जय नामा तें पावे नृपनीतिचतुर बहु शूर ॥ २३ ॥
एके दिनीं महाबल मणिमाली विपुल सैन्य घेऊन ।
सिंहपुरास निघाला वज्राक्षावरि अतीव कोपून ॥ २४ ॥
युद्धास सज्ज झाले उभयहि भूपाल तोंच सुर एक ।
येउनि नभांत बोले मणिमालिन् वृत्तपूर्व[6] तव ऐक ॥ २५ ॥

---

१ पुण्यानें. २ कल्पवृक्षापासून उत्पन्न झालेले. ३ नन्दिवर्धन नांवाचा.
४ पवित्र. ५ ब्रह्मस्वर्गांत. ६ पूर्वभव कथा.

भरतक्षेत्रीं होता गान्धारी-नगरिं मांसभक्षि नर ।
पापप्रवृत्त ज्याचें 'भूति' असे नाम जो अधर्मपर ॥ २६ ॥
मुनि 'कमलगर्भ' यांचा ऐकुनि उपदेश सोडिलें मांस ।
भूतिनृपें तो झाला व्रतिक नि धर्मात लावि हृदयास ॥ २७ ॥
या शुभ परिणामांनीं स्वर्गी आयुष्य पंच पल्यांचें ।
बांधियलें भूतीनें असतें जें सुखद जाहलें साचें ॥ २८ ॥
उपमन्यु नाम ज्याचें पुरोहितें त्या करुनि उपदेश ।
हिंसातत्पर केलें पुनरपि तो सतत सेवि मांसास ॥ २९ ॥
तेणें विनष्ट झाला दिव्यायुर्बन्ध सकल हा त्याचा ।
पापोदेश विषसम दुर्गति दुःखास हेतु हो साचा ॥ ३० ॥
एके समयीं येउनि शत्रुंनीं ठार मारिलें उभया ।
मरुनि पुरोहित झाला गज वश केलें नृपें वनांत तया ॥ ३१ ॥
तो गज युद्धीं मेला झाला सुत 'भूरिपुत्र' नृपतीचा ।
अरिसूदन नांवाचा यथार्थ नामाहि जाहला साचा ॥ ३२ ॥
पाहून कमलगर्भ श्रमणा त्या पूर्वजन्म आठवले ।
दीक्षा घेउनि सुतपें मरुनि शतारांत देवपद आलें ॥ ३३ ॥
तो भूति नृपति झाला मरून मृग दीन भयद मन्द वनीं ।
दावानलांत मेला 'कलिंज' नामक मनुष्य हो अवनीं ॥ ३४ ॥
बहुविध तेथें पापें करून मेलास तूं दुज्या[1] नरकीं ।
दुःखें बहु अनुभवलीं ज्यांना उपमा मिळे न या लोकीं ॥ ३५ ॥
नरकांतहि मी स्नेहें येउनि हितदेशना तुला केली ।
तेथुनि येथें जन्मुनि तूं भूपति जाहलास मणिमाली ॥ ३६ ॥
मांसत्यागव्रत तूं करून रे भग्न भूति-नृपजन्मीं ।
बहु कष्ट भोगिले वा हें चित्तीं आण सांगतों तुज मी ॥ ३७ ॥
तैसेंचि शत्रुनगरीं जाळुनि बहु पापसंचया न करी ।
नातरि नरक-समुद्रीं देतिल तुज कष्ट नारकी-मकरी[2] ॥ ३८ ॥
ऐकुनि वचन सुराचें समरव्यावृत्त[3] होय मणिमाली ।
सूर्यजयपुत्राचे राज्यरमाहार[4] अर्पिला सुगलीं ॥ ३९ ॥

---

१ दुसऱ्या शर्कराप्रभा नामक नरकांत. २ नारकी ह्याच मगरी. ३ युद्धापासून परतला. ४ राज्यलक्ष्मीचा हार.

जाऊन 'तिलकसुन्दर' सूरिवराजवळ घेइ नृप दीक्षा ।
सूर्यजयहि जहाला उद्यत जाळावयास भवकक्षा[1] ॥ ४० ॥
सूर्यञ्जय मुनि साधुनि आयुष्यान्तीं समाधिमरणास ।
दशमस्वर्गी[2] जन्मे या भविं दशरथ नृपाल झालास ॥ ४१ ॥
वटबीज सूक्ष्म देतें जन्म जसें वटतरूस सुविशाल ।
झाली प्रतिभविं उन्नति दशरथभूपा तिला नसे मोल ॥ ४२ ॥
जो नन्दिवर्धन पिता होते ज्या नन्दिघोष हें नाम ।
तीव्रतपानें ज्याला लाभे ग्रैवेयकाख्य शुभ धाम ॥ ४३ ॥
तेथून च्युत होउनि झालों मी श्रमण सर्वभूतहित ।
ऐसे मम भव ऐकुनि हो तूं श्रीमज्जिनेन्द्रधर्म-रत ॥ ४४ ॥
जो भूति नि उपमन्युहि ते झाले जनक कनक तव मित्र ।
पूर्वभवोद्भव-पुण्यें संसारीं जाण मधुर हें चित्र ॥ ४५ ॥
हा आपुला नि पर हा संसारीं नच असे सदा कोण ।
पापें पुण्यें होती अरि मित्र भवांत जीव हे जाण ॥ ४६ ॥
भववर्णन ऐकुनि हें दशरथ संशयविहीन होऊन ।
मुनिपदिं नम्र जहाला इच्छी व्हायास संयमीं लीन ॥ ४७ ॥
आदरभावें वन्दुनि गुरुचरणा जावया नृपाल निघे ।
स्वगृहा निजपरिवारें, निजस्वरूपास जो सदैव बघे ॥ ४८ ॥
स्वगृहीं जाउनि दशरथ विरक्तहृदयें विचार हाचि करी ।
रामास राज्य द्यावें घ्यावें दीक्षेस सकल पाप हरी ॥ ४९ ॥
पाळावयास आहे निजानुजासह समस्त वसुधेस[3] ।
राम समर्थ स्वर्गी अमरासह जेवि इन्द्र सुसुधेस ॥ ५० ॥
मुक्तिश्रीवरणेच्छा दशरथहृदयांत होय सविशेष ।
मोह लयाला गेला राज्याचा मानि त्यास भवपाश ॥ ५१ ॥

(दशरथ राजा आपला दीक्षा घेण्याचा निश्चय

मन्त्रिजनाला कळवितो.)

दण्डधराला[4] कथिलें बोलावुनि आण सर्वमन्त्रिगणा ।
तो गेला आत्मसमा द्वारीं योजून भद्र अन्यजना ॥ ५२ ॥

---

१ संसाररूपी जंगल. २ महाशुक्रस्वर्गात. ३ पृथ्वीस. ४ द्वारपालाला.

उचितस्थानीं बसले करुनि नमस्कार सर्व सचिवजन ।
आज्ञा नाथ वदावी वदले होऊन नम्र ते वचन ॥ ५३ ॥
राजा दशरथ बोले संसारविरक्त चित्त मम झालें ।
दीक्षा घेउनि नाशुनि संसारा मी करीन हित अपुलें ॥ ५४ ॥
भूतहित-श्रमणाच्या उपदेशें प्राप्त जाहलें मजला ।
सम्यग्दर्शन आहे मुक्तीचा मार्ग आगमीं कथिला ॥ ५५ ॥
या भवनदींत असती असंख्यसे जन्म भोवरे भयद ।
मोहाच्या चिखलानें भरली ही हो जना कशी सुखद ॥ ५६ ॥
नाना कुतर्क असती मकर गिळाया जनास जे टपले ।
नाना दुःखें लहरीं सांपडतां जीव ज्यांत घावरले ॥ ५७ ॥
मिथ्यात्वजलें भरली कुधर्मवेगें जनास वाहविते ।
दुःखद-नरकसमुद्रा अन्तीं जाऊन ही वघा मिळते ॥ ५८ ॥
स्मरण हिचें मज होतां कम्पित होतें समस्त मम गात्र[1] ।
जाया तरून हिजला जिनदीक्षा हीच मज गमे पात्रं[2] ॥ ५९ ॥
राम असे पहिला सुत आहे तो राज्यरक्षणीं दक्ष ।
अभिषेक करा त्याचा नन्तर सेवीन मी सुखें कक्ष[3] ॥ ६० ॥
यापरि निश्चय ऐकुनि भूपाचा सचिव खिन्न मनिं झाले ।
दुःखें बघती खालीं अश्रूंनीं नेत्र जाहले ओले ॥ ६१ ॥
प्रियपति निर्ग्रन्थव्रत घ्याया उद्युक्त जाहला आहे ।
वार्ता कळतां राज्ञी-नयनांतुनि अश्रुपूर वहु वाहे ॥ ६२ ॥
आल्या तेथें धावत नाथा आपण वना नका जाऊ ।
वदल्या आम्ही तुमच्या वियोगदुःखा कसें वरें साहू ॥ ६३ ॥

( भरताचें वैराग्य चिन्तन. )

भरता वार्ता कळतां होउनि तो भवविरक्त मनिं चिन्ती ।
दीक्षेस तात इच्छिति सुराज्य चिन्ता किमर्थ हे करिती ॥ ६४ ॥
मी नच पुसेन कोणा जाईन तपोवनांत मी त्वरित ।
संसार-दुःखनाशक राहीन मुनिव्रतांत मी निरत ॥ ६५ ॥
हा रोगगेह[4] आहे देह दिसे जरी वरून वहुकान्त[5] ।
रक्तादिमलें भरला नुमजे याचा घडे कदा अन्त ॥ ६६ ॥

१ शरीर. २ नाव. ३ वन. ४ रोगांचें घर. ५ सुन्दर.

बान्धव बन्धा कारण निजकर्मफलास भोगिती सगळे ।
विफल स्नेह तयावरि समजे त्याचेंचि सर्व कर्म गळे ॥ ६७ ॥
मोहान्ध जन्तु होउनि भववृक्षव्याप्त-दु:खविपिनांत ।
हा एकटाचि फिरतो कैसें होइल कळे न हें सान्त ॥ ६८ ॥
ही हालचाल पाहुनि भरताची खिन्न केकया झाली ।
पतिपुत्रवियोगाची कैशी दु:खद दशा मला आली ॥ ६९ ॥
प्राणप्रिय पति आणिक गुणसुन्दर भरतपुत्र उभयांचें ।
दीक्षेपासुनि वारण केवि करावें उपाय नैव सुचे ॥ ७० ॥
यापरि करीत असतां चिन्ता झालें तिला वरस्मरण ।
वदली पतिसंनिध ती द्या मजला आज नाथ वरदान ॥ ७१ ॥
दशरथ वदला तिजला प्रिये तुझ्या जें मनांत इष्ट वसे ।
तें माग तुला देइन वचनविघाताख्य[2] पाप करिन कसें ॥ ७२ ॥

( केकया भरताला राज्य द्यावें असा वर मागते. )

ऐकुनि वचना वदली केला अपराध कोणता अपुला ।
आम्हां सोडुनि जाता विचार निष्ठुर असा कसा सुचला ॥ ७३ ॥
जीवित जसें झषांचें[3] असे जलाधीन तेवि ललनांचें ।
निजपत्यधीन आम्हां जाता सोडून केवि हृ साचें ॥ ७४ ॥
अतिशय दुर्धर ऐशी मुनिदीक्षा ही जिनेश्वरें कथिली ।
आश्रय तिचाच घ्याया नाथा मति आपणा कशी सुचली ॥ ७५ ॥
देवेन्द्रयोग्य भोगा सेवुनि आसक्त देह हा अपुला ।
धारण करील कैशी दीक्षा ही कठिण नाथ मज बोला ॥ ७६ ॥
कान्ते सामर्थ्य जिथें दीक्षा तेथें न होय कष्टकरी ।
इष्ट तुझें जें वदगे सांगाया तें विलम्ब तूं न करी ॥ ७७ ॥
ऐकून भूपभाषण करुनि अधोवदन केकया वदली ।
द्या मम पुत्रा नाथा राज्यश्री मी विनन्ति ही केली ॥ ७८ ॥
भूप उदारपणानें वदला कां यांत लाज वाटावी ।
वर मी तुला दिला गे असत्य भाषा मला नसे ठावी ॥ ७९ ॥
ऋणरहित आज केलें मजला तूं शोक गे प्रिये सोड ।
भरतास राज्य देणें प्रसङ्ग हाही असे सखे गोड ॥ ८० ॥

१ जंगलांत. २ वचन मोडण्याचें. ३ माशांचें.

लक्ष्मणसहिता रामा बोलावुनि आण दण्डधर[1] आतां ।
ऐसें नृपाल वदला वाढे ज्याची शुभा विरक्ति-लता[2] ॥ ८१ ॥
राम नि लक्ष्मण आले विनयें वंदून तातपादास ।
कर जोडून उभे ते प्रभुपुढती राहती जसे दास ॥ ८२ ॥

( वत्सा रामचन्द्रा मी भरतास राज्य दिलें आहे
कारण मला वचन पाळावयाचें आहे. )

वत्सा, केलें पूर्वी साहाय्य रणांत भरत-मातेनें ।
तेणें तिज मी वदलों वर माग असें बहु-प्रसन्न-मनें ॥ ८३ ॥
ठेव असो वर माझा प्रियतम तव हृदयकोषें[3]-सदनांत ।
मागेन तेधवा द्या वदली ती स्मित धरून वदनांत ॥ ८४ ॥
भरतास राज्य द्यावें आतां ती बोलली मला रामा ।
देईन त्या न जरि मी जाइन दुःखद अशा अधोधामा[4] ॥ ८५ ॥
भरत हि विरक्त होउनि दीक्षा घेउन वनांत जाईल ।
ही सुतशोकें तेव्हां विह्वल होऊन जीव देईल ॥ ८६ ॥
माझी असत्यभाषी म्हणून लोकीं अकीर्ति पसरेल ।
भरतास राज्य यास्तव दिलें असे हेतु जाण हा मूल ॥ ८७ ॥
ज्येष्ठसुताला वगळुनि लघुतनया राज्यदान करणें हें ।
सीमोल्लङ्घन आहे माझ्या हृदयास कार्य हें दाहें ॥ ८८ ॥
भरता राज्य दिल्यावरि जाशिल कोठें सलक्ष्मणा रामा ।
उत्तमतेजोधारक सत्यादिक-सकल-सुगुण-विश्रामा ॥ ८९ ॥
हृदयीं या कार्यानें होतें अत्यन्त तीव्र दुःख मला ।
जें सत्य तेंचि सगळें पिता तुझा हा तुझ्यापुढें वदला ॥ ९० ॥

( रामचंद्राचें विनययुक्त व राज्यापेक्षानिरपेक्ष भाषण. )

उत्तम विनया रक्षुनि तातपदीं शान्त दृष्टि ठेवून ।
प्रीतिजलांनीं भरला तडाग जणु राम बोलला वचन ॥ ९१ ॥
सत्यास मिठी मारुनि अमुची चिन्ता न तात मनिं ठेवा ।
होतां अकीर्ति अपुली नको मला इन्द्रतुल्य धन ठेवा ॥ ९२ ॥

---

१ चोपदार. २ वैराग्यरूपी वेल. ३ मन हेंच खजिना ठेवण्याचे घर.
४ नरकास.

अल्पहि कष्ट जयानें होइल पितरास कार्य जो त्यागी।
सत्पुत्र तोचि समजा पितृचरणीं सुजन तोचि अनुरागी ॥ ९३ ॥
करितो पवित्र जनका शोकापासून दूर जो ठेवी।
तोचि सुपुत्र वदावा ऐसें वदतात आगमज्ञ कवि ॥ ९४ ॥
यापरि बोलत असतां श्रीराम सभेस मोद बहु झाला।
भवनाश करायास्तव वनिं जातो भरत बोलला बोला ॥ ९५ ॥

(भरत दीक्षा घेण्यासाठीं निघाला असतां दशरथनृपानें
त्याला अडविलें त्यावेळीं त्यांचीं झालेलीं भाषणें.)

तडक निघे तों दशरथ कर त्याचा धरुनि त्यास रोधून।
वसवी स्वाङ्कावरती बोले जाऊ नकोस लंघून ॥ ९६ ॥
तूं राज्य करी वत्सा सुतप कराया वनांत मी जातो।
ताता राज्य नको मज दीक्षा घेउनि भवास मीं हरितो ॥ ९७ ॥
तूं तरुण कोवळें वय सुख भोगी सार मनुज-जन्माचें।
वृद्धापकाल होतां दीक्षा घेउनि तपा करी साचें ॥ ९८ ॥
भरत वदे भो ताता मजला टाकू नकाचि मोहांत।
बाला वा तरुणा वा पाहि न यम करुनि टाकितो अन्त ॥ ९९ ॥
भरता, गृहाश्रमामधिं सुजन महापुण्यसंचया करिती।
लोभी बनून खलजन पापांच्या पर्वता शिरीं घेती ॥ १०० ॥
ताता इन्द्रियलंपट कामक्रोधादिपूर्ण जो असतो।
ऐसा गृहस्थ मुक्त न होतो भवसागरांत तो फिरतो ॥ १०१ ॥
वत्सा जे मुनि होती होतात न सर्व जाण ते मुक्त।
यास्तव घरांत राहुनि धर्माचरणांत होइ वा निरत ॥ १०२ ॥
पूज्य पिताजी निश्चित धर्माचरणें हि मुक्त हो न गृही।
परि भाग्यवन्त मिळवी मुनि मुक्तिरमेस पूर्ण निर्मोही ॥ १०३ ॥
लाभे अनुक्रमानें मोक्ष गृहस्था मला न तो रुचतो।
कां शलभांच्या[1] वेगें सांगावें गरुड केधवा पळतो ॥ १०४ ॥
कामज्वाला देहीं ज्याच्या करि दाह सुजन वा कुजन।
रसनाधमाङ्गकार्यें[2] करि तीं त्या लाभतो न सौख्यकण ॥ १०५ ॥

१ दिव्यासभोंवती फिरणारा किडा. २ जीभ व स्पर्शनेन्द्रिय यांच्या कार्यांनीं.

या कामानलिं पडतां भोगाचें तूप वाढतो अधिक ।
अधिकचि दाहक होतो लम्पटजन जळुनि होतसे खाक ॥ १०६ ॥
भोगून भोग नश्वर अतृप्तिकारक पुनः पुनः जीव ।
पापें दुर्गतिदुःखें भोगिति लाभे तया न सौख्यलव ॥ १०७ ॥
मी जन्मभीरु आहे करीन तप मुक्ति-हेतु वनिं भावें ।
अनुमति द्यावी ताता विरक्त मम मन वनाकडे धावें ॥ १०८ ॥
मिळतें मोक्षाचें सुख गेहीं का त्यागिता तया ताता ।
राहा आपण ही गृहिं तपोऽर्थ कां इच्छिता अरण्यपंथा[1] ॥१०९॥
जो दुःखांतुनि तारी जो अनुमति तप करावया देई ।
त्यालाच तात वदती ताता या तातलक्षणा पाही ॥ ११० ॥
माता-पिता नि वनिता भगिनी भाऊ नि मित्र जीवितही ।
त्यागून जीव सकला भवान्तरीं तात जातसे पाही ॥ १११ ॥
चिरकाल भोग भोगुनि देवांचे तृप्ति त्यास नच लाभे ।
मानवभवभोगांनीं तृप्ति तयाच्या मनांत नच शोभे ॥ ११२ ॥

( भरता, तुझ्या मातेला सर्व नृपासमक्ष मी वर दिला आहे
यास्तव तूं राज्यपालन कर. )

ऐकुनि वचन सुताचें दशरथमन होय तेधवा तुष्ट[2] ।
तुज धन्यवाद देतो भरता तूं भव्यमानवश्रेष्ठ ॥ ११३ ॥
पुत्रप्रीतीनें जी केली मी प्रार्थना तिचा भङ्ग ।
वत्सा करूं नको वा जणु विनयाचीच मूर्ति तूं साङ्ग[3] ॥ ११४ ॥
जीवित संशय असतां रणिं तव सारथ्यकर्म[4] मातेचें ।
पाहून तुष्ट झालों वरयाचन मानिलें तिचें साचें ॥ ११५ ॥
नृपसाक्षिक तिजला वर झालों देऊन आज ऋणरहित ।
राज्य दिलें मी तुजला तेणें सन्तुष्ट जाहलें चित्त ॥ ११६ ॥
वत्सा तूं निष्कण्टक इन्द्रासम राज्यरक्षणास करी ।
सत्यप्रतिज्ञ माझें यश पसरो धवल[5] सर्वभूमिवरी ॥ ११७ ॥
जरि तूं दीक्षा घेशिल होईल क्लेश केकयेस मनीं ।
मृद्वङ्गी[6] ही शोकें फिरेल वा मरुनि घोर कुगतिवनीं ॥ ११८ ॥

---

१ वनाच्या मार्गाला. २ संतुष्ट आनन्दित. ३ सर्वावयवांनी पूर्ण.
४ सारथ्याचें काम. ५ पांढरें. ६ कोमल अवयवांची.

पाडी न शोकसागरिं माता-पितरास जें शुभाचारें ।
तेंच अपत्य वदावें अपत्यलक्षण असेंचि जाण खरें ॥ ११९ ॥

( राज्यपालन करण्याचा आग्रह रामचंद्र भरताला करितात.)

श्रीरामचन्द्र भरतस्कन्धीं कोमल करास ठेवून ।
स्निग्धावलोकनानें वदले त्या जलदमधुररव-वचन[1] ॥ १२० ॥
जें तातांनीं कथिलें तसें कथाया समर्थ कोण असे ।
वत्सा, सागरमणि जे सरोवरांतून जन्मतील कसे ? ॥ १२१ ॥
बन्धो, तप करण्याला योग्य असे समयिं या न वय आहे ।
करि राज्यभारधारण वनो यशें शुभ्र सर्व भूतल हें ॥ १२२ ॥
शोकें संतप्त अशी पावें जरि मरण केकया माता ।
तूं भाग्यवन्त असतां तनय तिचा योग्य वाटतें चित्ता ? ॥ १२३ ॥
ताताचें सत्यव्रत पालनकार्यांत आमुच्या देहा ।
त्यागावयास आम्ही होऊं उद्युक्त न धरु मनिं मोहा ॥ १२४ ॥
तूं राज्य स्वीकारुनि सत्यव्रतपालनीं सहायक हो ।
पित्राज्ञाधारकता गुण तव लोकीं प्रसिद्धितां[2] लाहो ॥ १२५ ॥
तूं राज्य भरत सुन्दर येथें राहुनि करी प्रमोदानें ।
राहीन गिरि-नदीतटिं वनिं वा जेथें न कोण मज जाणें ॥ १२६ ॥
त्यागून सर्व भोगा आतां राहीन मी प्रवासांत ।
राज्यीं तुझ्या उपद्रव करीन मी नच कदापि गुणकान्त ॥ १२७ ॥
भवभय सोडुनि दे वा ताताज्ञा तूं धरी शिरीं प्रेमें ।
न्यायपरायण होउनि राज्य करी नीतिच्या सदा नियमें ॥ १२८ ॥
इक्ष्वाकुनृपकुलाला भूषित करि तूं गुणालया[3] भरता ।
ग्रहकुलें[4] भूषित करितो चन्द्र जया रोहिणी असे कान्ता ॥ १२९ ॥
ऐसें बोलुनि भरता भूमीस स्पर्श मस्तकें करुन ।
रामें दशरथचरणा केलें भावें सलक्ष्मणें नमन ॥ १३० ॥
नन्तर करिं धनु घेउनि जातो अन्यस्थलास मी आतां ।
वन्दुनि मातेस वदे पुनरपि वन्दून एकदा ताता ॥ १३१ ॥

---

१ मेघाच्या मधुर गर्जनेप्रमाणें भाषण. २ प्रसिद्धि मिळवो. ३ गुणांचें घर असलेला. ४ बुधादिग्रहसमूह.

झाला नृपाल मूर्च्छित झाली अपराजिताहि बेभान ।
पुनरपि सावध होउनि वदली रामास दीनसें वचन ॥ १३२ ॥
नाना मनोरथांनीं पुत्रा तूं प्राप्त जाहलास मला ।
जाऊ नकोस सोडुनि अन्धा यष्टीसमान वा मृदुला ॥ १३३ ॥
दीक्षा घेउनि जाइल पिता तुझा तूंहि त्यागितोस मला ।
पतिपुत्रवर्जिता मी सहन करूं केवि विरहदुःखकुला[1] ॥ १३४ ॥
तो मातृभक्त वदला राम तिला शोक सोड गे माते ।
माझें हृदय तुझ्या या दुःखा पाहून खिन्न बहु होतें ॥ १३५ ॥

( मी जेथें राज्य स्थापीन तेथें मी तुला नेईन असें
रामाचें मातेला वचन देणें. )

दक्षिणदिशिं योग्यस्थलिं पाहुनि आश्रय अवश्य मी नेतो ।
संशय मनिं नच घेई सत्पुत्र कृतघ्न काय गे होतो ॥ १३६ ॥
राज्य दिलें भरताला देउनि मातेस उचित वर तातें ।
या वार्तेनें केला स्पर्श न तव काय जननि कानातें ॥ १३७ ॥
विन्ध्याद्रि, मलयपर्वत, समुद्रतटिं वा प्रशस्त पाहून ।
स्थान तुला मी नेइन नाहीं होणार अन्यथा वचन ॥ १३८ ॥
रवि-सन्निध चन्द्राची कान्ति जशी मलिन मन्दता धरिते ।
भरतादेश नि वैभव असतां मी जवळ विफलता वरिते ॥ १३९ ॥
तव मुखदर्शन जीवन मम तदभावीं न तेंहि राहील ।
येते तुझ्याबरोबर वत्सा तूं असशि बा दयाशील ॥ १४० ॥
जी स्त्री कुलीन तिजला पिता नि पति तेवि तनय आधार ।
जनक यमातिथि[2] मम पति दीक्षोत्सुक सुत हि जाइ बहु दूर ॥ १४१ ॥
आधार जीविताचा तूंच मला आज एक आहेस ।
तूंही सोडुनि जाशी सोसूं मी केवि दुःखराशीस ॥ १४२ ॥
राम वदे पाषाणें आहे अत्यन्त कर्कशा भूमि ।
तव पद अतिशय कोमल माते, तुजला म्हणून नेइन मी ॥ १४३ ॥
मी एकटाचि वास्तव नियमें निश्चित करून सुस्थान ।
शिबिकादिक-यानानें नेइन तुजला कदापि न त्यजिन ॥ १४४ ॥

---

१ दुःखसमूह. २ यमाचा पाहुणा झाला, मेला.

मातें स्पर्शुनि तव पद वदतों नेईन मी तुला खचित ।
यास्तव आतां सोडी चरण तुझे पूज्य गे मला सतत ॥ १४५ ॥
मूर्च्छारहित पित्याला वंदून तसेंच इतर मातृजना ।
श्रीराम निघे सान्त्वन करुनि तयांचें सदा अखिन्न मना ॥ १४६ ॥
भावा आप्ता भेटुनि तयासवें मधुर मधुर बोलून ।
आला निजसौधामधिं वदला सीतामुखास चुम्बून ॥ १४७ ॥

( सीता व लक्ष्मणासह रामाचें वनगमन. )

जातो पुरान्तरा मी राहा येथें प्रसन्न हृदयानें ।
नाथा, जेथें आपण राहिन तेथेंच इतर नच जाणें ॥ १४८ ॥
सचिवगणा भूपांना परिवर्गा आदरें विचारून ।
प्रेमें प्रियमित्रांना नयनजलें मुख यदीय बहु खिन्न ॥ १४९ ॥
सुन्दर घोडे हत्ती नयनें सुस्निग्ध सकल पाहून ।
पितृसदनांतुनि पडला बाहेर वनाकडे करी गमन ॥ १५० ॥
वन्दून सासऱ्याला सासूला नम्र जानकी मोदें ।
रामा अनुसरली हें सुजनांच्या हृदय हाय तापा दे ॥ १५१ ॥
अनुसरतें इन्द्राला शची जशी जानकी शुभा रामा ।
उद्यमिनरा रमा[1] वा सुनम्र सीता समस्त गुणसीमा ॥ १५२ ॥
गमनोद्यत रामाला पाहून स्नेहयुक्त लक्ष्मण ही ।
अनुसरला धनु घेउनि पित्रन्यायांत[2] कोप जो वाही ॥ १५३ ॥
स्वार्थासक्त असे ही जननी श्रीकेकया पित्यास हिनें ।
अन्यायीं रत केलें स्त्रीसक्ति[3] नरास वेढि दोषगणें ॥ १५४ ॥
हा ज्येष्ठ बन्धु माझा राम असे सकलपुरुषवृन्दांत ।
श्रेष्ठ नि निर्मलहृदयी मुनिहि तसा नाढळे शुचिस्वान्त ॥ १५५ ॥
जितुके दुर्जन लोकीं देइन सगळ्यास मी हकालून ।
भरतास बलात्कारें राज्यश्रीनें करीन मी हीन ॥ १५६ ॥
बदलून टाकितों मी राज्यावस्था समस्त पूर्वीची ।
राज्यश्रीच्युत भरता करितो हरितो प्रसन्नता त्याची ॥ १५७ ॥
पुनरपि लक्ष्मी उत्सुक होईल वरावयास रामास ।
अन्याय नाश होतां प्रमोद होइल मदीयहृदयास ॥ १५८ ॥

---

१ लक्ष्मी. २ बापानें केलेला अन्याय. ३ स्त्रीवर आसक्त होणें.

क्रोधाधीन मनाला करणें हें युक्त केधवा हि नसे ।
दीक्षित-मुनिवर्यांतहि कोपें मोहान्धता-निवास दिसे ॥ १५९ ॥
अथवा यापरि करणें विचार हृदयें मला न योग्य गमे ।
जाणोत तात आदिक योग्यायोग्यत्व चित्त मम न रमे ॥ १६० ॥
तनयें निजपितयाची अखण्डशशिशुभ्रकीर्ति राखावी ।
अनुवृत्ति ज्येष्ठाची सन्मार्गी लघु नरें न सोडावी ॥ १६१ ॥
शमवून कोप यापरि धनुष्य निजकरिं धरून तो वीर ।
माता-पितरा-वृद्धा वन्दुनि रामासवें निघे चतुर ॥ १६२ ॥
सीता पतिसह जाते पाहुनि हें दृश्य सर्वपुरनारी ।
वदल्या दृष्टान्त असे पतिव्रता ही पतिव्रताचारीं ॥ १६३ ॥
'ही परमधन्य सीता विनयवती जी पतीस अनुसरते ।
वागे हिच्याप्रमाणें कुलवधुया मान्य ती सती होते' ॥ १६४ ॥
'शोकम्लानमुखी जी त्यागुनि लक्ष्मण अशा स्वमतेला ।
पाहा बन्धुप्रेमें उद्यत झाला वनास जायाला' ॥ १६५ ॥
'राज्याभिषेक ज्याचा निश्चित होणार तो वना गेला ।
भरता राज्य मिळालें ही कर्माची विचित्रशी लीला ॥ १६६ ॥
'दीक्षा इच्छित होता भरत तयाच्या गळीं पडे राज्य ।
इच्छाविरुद्ध लाभे जन हो भोगावयास व्हा सज्ज' ॥ १६७ ॥
जन पुरवासी सगळे उत्सुक झाले वनास जायास ।
नगरी शून्य जहाली जी होती सकल उत्सवावास ॥ १६८ ॥
प्रत्येक गृहद्वारीं होइल राज्याभिषेक म्हणुनि जनें ।
पुष्पें अंथरलीं तीं शोकजलीं तरत होति पूर्णपणें ॥ १६९ ॥
येऊन भक्तिभारें रामाचे चरण नमिति पौरगण ।
जाऊ नका वनामधिं नयनीं आणून वदति अश्रुकण ॥ १७० ॥
होऊन भक्तिवश ते जाउ नका म्हणुनि धरिति पद्मपद[1] ।
त्यांना निवारण्याला रामा वाटे पुनः पुनः खेद ॥ १७१ ॥
ऐशी दुःस्थिति बघणें नको असा मनिं विचार येऊन ।
सूर्य सहस्रपदांनीं[2] अस्ताचलशिखरिं शीघ्र करि गमन ॥ १७२ ॥

---

१ रामाचे पाय. २ हजार पायांनीं दु. अर्थ– हजार किरणांनीं.

सन्ध्या हि खिन्न होउनि सहस्रकररविस तूर्ण अनुसरली ।
दाशरथी रामाच्या मागुनि सीता सती जशी गेली ॥ १७३ ॥
ज्ञानध्वंसक ऐशा अंधारानें समस्त जगतास ।
आच्छादिलें पदार्थां काळेपण ये तदा समस्तास ॥ १७४ ॥
सीता राम नि लक्ष्मण रात्रीं अरनाथ-मंदिरीं आले ।
पाहुनि जिनेन्द्र-वदना हृदयीं त्रिक तें प्रसन्न बहु झालें ॥ १७५ ॥
तिसऱ्या द्वारीं बसल्या रोधियलें द्वाररक्षकें पौरं[१] ।
मोहें मोक्षेच्छु जसें रोधियले जाति जे कुदृष्टि नर ॥ १७६ ॥
भुजयुगल लांब ज्याचे श्रीवत्साङ्कित उरःस्थलें शोभे ।
संपूर्णचन्द्रमुख जें बघतां ज्या सौख्य शान्तिचें लाभे ॥ १७७ ॥
मणिपीठस्थ असे जें विकसित-कमलासमान नयनाचें ।
अरजिनबिम्बा वन्दुनि झालें सानन्द चित्त बहु त्याचें ॥ १७८ ॥
राम नि लक्ष्मण सीता निवास यांचा अरेशसदनांत ।
जाणुनि माता आल्या झाल्या त्या बघुनि मुदित हृदयांत ॥ १७९ ॥
पुत्रास भेटल्या त्या तन्नेत्रांतून अश्रुजल वाहे ।
पाहुनि पुत्तः पुनः ही लोचनयुगलीं अतृप्तता राहे ॥ १८० ॥
नन्तर दशरथभूपाकडे वळे चित्त जेधवा त्यांचें ।
आल्या प्रियाकडे त्या पति-पुत्र प्रेम ज्यां असे साचें ॥ १८१ ॥
वदल्या प्रियपतिला त्या बुडेल इक्ष्वाकुवंश ही नाव ।
शोकमहार्णवि[२] नाथा राहिल धारण कराल तरि नांव ॥ १८२ ॥
आणा लक्ष्मणरामा बोलावुनि परत द्या तया राज्य ।
वाढेल विपुल वैभव पसरेल जगांत कीर्ति ही प्राज्य[३] ॥ १८३ ॥
दशरथ वदे प्रियांनो रागादिविकारयुक्त विश्व असे ।
माझ्या इच्छेला तें प्रमाणता द्यावया न इच्छितसे ॥ १८४ ॥
सर्व प्राण्यां लाभो सौख्यचि कोणास दुःख नच होवो ।
जन्मजरामरणत्रय-राक्षस कोणा कदापि नच खावो ॥ १८५ ॥
ऐशी माझी इच्छा आहे मी साम्यभाव मनिं धरिला ।
हर्षविषाद न वाटे निजस्वरूपांत जीव मम रमला ॥ १८६ ॥

१ नगरवासी लोक. २ महासागरांत. ३ उत्कृष्ट.

परि नानाकर्मोदय होतां होतात विविधसे भाव ।
संसारी जीवांचे त्यांचा सर्वज्ञ जाणती ठाव ॥ १८७ ॥
जीवित, सुख, धन, दर्शन इष्टाचें सतत लाभतें जीवा ।
तृप्ति न तयास होते अतृप्तता हेतु होय जीवभवा[1] ॥ १८८ ॥
आयुष्यक्षय होतां जातो देहास जीव सोडून ।
फलरहित वृक्ष होतां जैसें त्यजिती तयास पक्षिगण ॥ १८९ ॥
आहांत सुसुतयुक्ता आणा जाऊन परत तनययुगा ।
पुत्राभ्युदया पाहुनि आजीवितें[2] विविध सौख्यगण भोगा ॥ १९० ॥
राज्या त्यागुनि झालों पापापासून पूर्ण सुविरक्त ।
संसारभीत होउनि आतां पाळीन जैनमुनिचरित ॥ १९१ ॥
यापरि निश्चय अपुला कळवून उदास भावनेंत रत ।
दशरथ नरपति झाला रागद्वेषादि-भावना-विरत ॥ १९२ ॥
सगळ्या कुभावनांचा करून जो त्याग साम्यभावांत[3] ।
जिनदास निरत होतो त्यावरि होतेचि मुक्ति अनुरक्त ॥ १९३ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे दशरथप्रव्रज्याभिधानं नाम द्वात्रिंशत्तमं पर्व ॥ ३२ ॥

---

१ जीवाच्या संसाराला. २ जगाल तोपर्यन्त. ३ रागद्वेषरहित सर्व पदार्थांपासून विरक्त अशा आत्मशान्ति देणाऱ्या भावनेंत.

# तेहतिसाव्या पर्वांतील कथेचा सार.

श्रीअरनाथ जिनमंदिरांत रामचन्द्र, लक्ष्मण व सीता यांनीं प्रवेश केला व तेथें ते अर्धरात्रीपर्यन्त राहिले. त्यावेळीं सर्व लोक झोपले होते. रात्र शान्त व निस्तब्ध झालेली होती. अशावेळीं अरप्रभूंना नमस्कार करून हे तिघे जिनमंदिरांतून बाहेर पडले. ते साकेता-नगरापासून दोन कोस लांब गेले. तेव्हां उजाडले होतें व त्यांना भेटण्यासाठीं कांहीं सरदार व मित्र आले. ते भेटून गेल्यावर ते पुढें चालू लागले. धान्यानें भरलेली शेतें, कमलांनीं सुंदर दिसणारीं सरोवरें व मोठे वृक्ष पाहत ते चालत असतां त्यांना परिश्रम जाणवला नाहीं.

वाटेंत लागलेल्या गावांतील लोक त्यांना भेटून ते फलपुष्पादिक भेट म्हणून देत असत. याप्रमाणें त्यांचा गांवोगांवीं चांगला आदर होत असे. बरोबर आलेल्या लोकांना "प्रजाजनहो, तुमचें भरत पुत्राप्रमाणें रक्षण करील तुम्ही कांहीं काळजी करूं नका. आतां परत जा" असें म्हणून त्यांनीं त्यांना परत पाठविलें.

यानंतर ते 'शर्वरी' नदींतून पुढें गेले. रामचन्द्रानीं सीतेला आपल्या दोन्ही हातावर घेतलें व नदींतून जात असतां रामचंद्राच्या हस्तकमलांत ती लक्ष्मीप्रमाणें शोभली. वनांतून जात असतांना जेथें जेथें जिनमंदिर दिसे तेथें तेथें जिनेश्वरांना वंदन करून ते पुढें जात असत. वनांत स्वाध्याय करणाऱ्या यतींना ते वंदन करीत असत. याप्रमाणें आनंदानें ते प्रवास करूं लागले.

कांहीं सामन्तांनीं त्यांचें वनवासवृत्त भरताला सांगितलें. तें ऐकून त्याच्या मनाला दुःख झालें.

रामचन्द्र, सीता व लक्ष्मणासह वनांत गेल्यावर दशरथ महाराजांनीं भरताचा राज्याभिषेक केला व स्वतः सर्वभूतहितगुरूजवळ जाऊन दीक्षा घेतली. तपांत ते मन लावीत. परंतु रामचन्द्राच्या वियोगानें त्यांच्या परिणामांत मधून मधून कलुषितपणा उत्पन्न होई. हा स्नेह संसार वाढविण्यास कारण आहे असें जाणून तो हृदयांतून काढून टाकण्यासाठीं अनित्यादि बारा अनुप्रेक्षांचें त्यांनीं खूप चिन्तन केलें. "पूर्वी असंख्यजन्मांत मला स्त्री-पुत्रांची प्राप्ति झाली ते सर्व कोठें गेले ? मूर्खा त्याविषयीं

तुला मोह वाटत नाहीं तर आता तूं कां ऐरें मोहित व्हावेस ? तूं या मोहापासून स्वतःला दूर ठेव. हे स्त्रीपुत्रादिक तुझें स्वरूप नव्हे. रत्नत्रयधर्म तुझें स्वरूप आहे तें तुला प्राप्त झालें आहे. तूं पुत्रादिकांच्या आर्तध्यानाचा त्याग कर व आपल्या आत्मस्वरूपाचा विचार कर." याप्रमाणें चिन्तनानें त्यांच्या आत्म्याला समाधान लाभलें. स्वतःच्या तपांत दृढता यावी म्हणून शत्रूंच्या देशांत ते विहार करूं लागले व शीत, उष्ण, भूक, तहान इत्यादि २२ प्रकारचे परीषह त्यांनीं सहन केले.

इकडे पति व पुत्रांच्या वियोगानें अपराजिता व सुमित्रा या राम व लक्ष्मणाच्या माता अतिशय दुःखी झाल्या. त्यांच्या डोळ्यांतून सतत अश्रु वाहू लागले. त्याचें दुःख पाहून कैकेयीला दया आली. ती भरताला म्हणाली वत्सा, तूं आपल्या भावांना बोलावून आण त्यांच्याशिवाय तुला हें राज्य सुखाचें होणार नाहीं. ते आले म्हणजे त्यांच्यासह तूं राज्य कर. वेगानें वाऱ्याला जिंकणाऱ्या घोड्यावर बसून तूं लौकर भेटावयास जा. 'मी ही तुझ्या पाठोपाठ येतेच' असें म्हणून तिनें त्याच्या मदतीला हजार घोडेस्वार पाठविले.

सहा दिवस सतत प्रवास करून रामचन्द्र, लक्ष्मण व सीता जेथें होते त्या वनांत भरत आला. रामचन्द्राच्या चरणांना नमस्कार करून माझी विनंति ऐक असें म्हणून तो म्हणाला 'बन्धो, ही राज्याची पीडा माझ्यामागें कां लाविलीस ? तूं याचा स्वीकार कर. मला हें तिळमात्रही आवडत नाहीं. बन्धो, तुझ्या विरहानें मला जीवित व्यर्थ वाटत आहे. बन्धो, लक्ष्मणा व वहिनी तुम्ही सर्व अयोध्येला चला. बन्धो रामचन्द्रा, तूं सिंहासनावर बैस, मी तुझ्या मस्तकावर छत्र धरीन, शत्रुघ्न चामरें वारील व लक्ष्मण मंत्री होईल. माझ्या मातेचें मन पश्चात्तापानें दग्ध झालें आहे. तीही लौकरच तुला बोलावण्यासाठीं येणार आहे." असें भरत बोलत आहे तोंच कैकेयी तेथें आली व म्हणाली "रामा, लक्ष्मणासह शीघ्र चल व अयोध्येचा राजा हो. तूं विद्वान् आहेस, भरताला उपदेश करीत जा. तुझ्यावांचून मला अयोध्या जंगलसारखी भयंकर वाटत आहे. माझी स्त्री-बुद्धि क्षुद्र आहे. तिकडे लक्ष देऊ नकोस."

रामचन्द्र म्हणाले "माते, क्षत्रिय एकदांच बोलत असतात. ते आपलें वचन परत घेत नसतात. पित्याच्या सत्य वचनानें आपण सर्व बांधलें गेलेलें आहोत. जर मी अन्यथा वागेन तर इक्ष्वाकुवंशाला कलंक लागेल." असें बोलून भरताचा रामानें सर्व राजासमक्ष राज्याभिषेक केला. मधुर बोलून व कैकेयीला वन्दन करून त्यानें तिची क्षमा मागितली. व भरताला "पित्याप्रमाणें प्रजेचें रक्षण कर तूं धार्मिक आहेस

तुझ्या राज्यांत प्रजा तुष्ट व पुष्ट होईल." असें बोलून भरत व कैकेयीला अयोध्येस पाठविलें. भरत राज्य-पालन करूं लागला, पण त्याच्या मनांतून शोक गेला नाहीं.

एके वेळीं द्युति नामक आचार्य आपल्या संघासह अयोध्येंत आले. त्याची धर्मसुधा भरतानें कर्णपात्रानें प्राशन केली. मी जेव्हां राजा रामचन्द्रांना पाहीन तेव्हां मुनिव्रत धारण करीन त्यानें असा नियम घेतला. यानंतर द्युति आचार्यांनीं भरताला याप्रमाणें सांगितलें– "भरता, मुक्तिपदाची तुला इच्छा असेल तर तूं गृहस्थधर्माचें निरतिचार पालन कर. गृहस्थधर्म मुनिधर्माचा धाकटा भाऊ आहे. हा धर्म रत्नत्रय धन देतो म्हणून सावधान राहून याचें पालन कर. तूं अहिंसाणुव्रताचें पालन कर, सत्य बोल, न्यायानें प्रजासंरक्षण कर. परस्त्रीसेवन करूं नकोस. अदत्त-परस्वामिक धन घेऊं नकोस. लोभाचा त्याग कर. प्रतिदिवशीं जिनेश्वराचा पंचामृतांनीं अभिषेक करून अष्टद्रव्यांनी पूजन कर. सत्पात्रांना आहारादिक दानें दे. रात्रिभोजनाचा त्याग कर. याप्रमाणें वागणारा गृहस्थ आरंभ करणारा असूनही सुख देणाऱ्या गतींतच जन्म घेतो. जिनमंदिर बांधून त्यांत जो जिनबिंबाची प्रतिष्ठा करून स्थापना करितो त्याला अगणित पुण्यलाभ होतो. अशारीतीनें धर्मार्जन करणाऱ्या श्रावकाला संसारसमुद्र तरून मोक्षनगराला जातां येतें."

"जिनाचें स्मरणानें एक उपवासाचें फल मिळतें, जिनदर्शनाच्या विचारानें दोन उपवासांचें, जिनदर्शनाला जाण्याच्या विचारानें तीन उपवासांचें, गमनाला सुरवात केल्यास चार उपवासांचें, मार्गांत जाण्यानें पांच उपवासांचें, अर्धामार्ग चालून गेल्यावर पंधरा उपवासांचें, जिनमंदिराचें अवलोकन झाल्यावर मासोपवासांचें, जिनमंदिराचें अङ्गणांत प्रवेश केल्यावर सहा महिन्यांच्या उपवासांचें, जिनमंदिराच्या-द्वारीं आल्यावर वर्षोपवासांचें, प्रदक्षिणा घातल्यानें शंभर वर्षांचे, जिनमुनि दर्शनानें हजार वर्षांचे व जिनगुणस्तुति केल्यानें अनन्तवर्षांच्या उपवासांचें फल प्राप्त होतें. जिनभक्ति करणाराला मोक्षप्राप्ति होते. धर्मरूपी औषधाचें सेवन न केल्यामुळें जीवांना संसाररोग पीडा देत आहे." हा उपदेश ऐकून भरत गृहस्थधर्मांत तत्पर झाला.

मी जर राज्यमद धारण केला तर पापबन्धानें मरून दुर्गतींत फिरेन यास्तव मुनिधर्माला शरण जाईन. याप्रमाणें धर्माचें स्वरूप ऐकून भरत राजा स्वगृहीं गेला. व धर्माचरणांत लीन झाला.

जे जिनाचे दास होतात, जिनाचें पूजन करून अणुव्रतांचें निर्दोष पालन करितात. ते भव्य श्रमण-मुनि होऊन अन्तीं निश्चयानें मुक्त होतात.

# तेहतिसावें पर्व.

[ अर्ध्या रात्रीं अरजिनमंदिरांतून राम, लक्ष्मण व सीता यांचें दक्षिणेकडे प्रयाण. ]

अरजिनमन्दिरिं राहुनि अर्ध्या रात्रीं उठून ते सज्ज ।
झाले चिलखत चढवुनि करिं धनु घेऊन मानसीं प्राज्ञ्य[1] ॥ १ ॥
झोपेंत लोक होते निःशब्द नि शान्त समय[2] तो होता ।
वन्दुनि जिना निघाले राम नि लक्ष्मण करून मधि सीता ॥ २ ॥
पुरपश्चिमेस वळले नन्तर दक्षिणपथावलम्ब्यानें[3] ।
दक्षिणदिशीं निघाले सावध होऊन शान्तचित्तानें ॥ ३ ॥
साकेतापुर सोडुन गेले ते दोन कोस चालून ।
तेथें त्या भेटाया आले सामन्त आणि मित्रगण ॥ ४ ॥
मन्दगतीनें चाले माता सीता म्हणून भेटाया ।
आलों आम्ही रामा उपकृति[4] करिते अशी तुझी जाया ॥ ५ ॥
मार्गीं धान्य-क्षेत्रें[5] सरोवरें कमलफुल्लें[6] उच्चतरु ।
पाहत जाई त्रिक ते प्रमोद ज्यांच्या दिसे मुखांत गुरु[7] ॥ ६ ॥
मार्गीं ग्रामपुरांतिल जनता येउनि फलादिकें करिती ।
सुखकर आदर त्यांचा स्वदर्शनें तन्मनास ते हरिती ॥ ७ ॥
जाणुनि त्यांचा निश्चय गेले कित्येक भूप परत गृहीं ।
लज्जाभयविनयांनीं अनुसरती सुजन त्या त्रिका कांहीं ॥ ८ ॥
यापरि पदयात्रेनें गेले ते शर्वरीनदी-कांठीं ।
अनुयायांना वदले अमुच्या लागू नका तुम्ही पाठीं ॥ ९ ॥
आम्हा प्रमोद वाटे जावें आतां तुम्ही सुखें परत ।
प्रेमें तुम्ही अमुच्या आला आहात येथपर्यन्त ॥ १० ॥
भरत असे सर्वांचा स्वामी तातासमान रक्षील ।
निर्भय होउनि नान्दा त्याच्यासम नच दुजा दयाशील ॥ ११ ॥

---

१ मनांत धैर्यशाली. २ पहाटेचा वेळ. ३ मार्गाला स्वीकारून. ४ उपकार. ५ धान्यांनीं भरलेलीं शेतें. ६ कमलें ज्यांत फुललीं आहेत. ७ मोठा.

आम्हास तूंच नाथा रक्षक राहो तुझें कृपाछत्र।
त्यागू नकोस आम्हां आम्ही करुणानिधे[1] तुझे पुत्र ॥ १२ ॥
सिंह-व्याघ्रें भरल्या वनांत आम्ही तुझ्यासवें राहू।
स्वर्गासम वन भासे तूं अमुचा इन्द्र म्हणुनि तुज वाहूं[2] ॥ १३ ॥
भद्रांनो, परतावें सुख लाभो आपणा सदा काळीं।
आज्ञा तिलकासम ही माझी धारण करा तुम्ही भालीं ॥ १४ ॥
निरपेक्ष असें बोलुनि नदीस लंघून उभय ते गेले।
करतलिं घेउनि सीता रामें निजभुजबलें तिला नेलें ॥ १५ ॥
शतदलपद्मगृहामधिं शोभे लक्ष्मी दिसे तशी सीता।
श्रीरामहस्तपद्मस्थिता[3] वसे जींत परमनिर्भयता ॥ १६ ॥
गेले स्वगृहा सज्जन कांहीं परतून खिन्न होऊन।
दीक्षित होउनि कांहीं सुज्ञें केलें शुभार्थ निजजनन[4] ॥ १७ ॥
हे शूर वीर वैभवशाली असतां दशा अशी झाली।
करिती वनीं प्रवासा रात्रीं करिती निवास तरुखालीं ॥ १८ ॥
जात वनांतुनि असतां स्वाध्यायीं रत यतीस पाहून।
करिती तत्पद वन्दन हृदयीं अतिभक्ति-भाव ठेवून ॥ १९ ॥
कोठें जिनेन्द्रमन्दिरिं निवास त्यांचा घडे निशाकालीं।
वन्दुनि जिनवरचन्द्रा नाशिति ते पूर्वजन्मपापाली[5] ॥ २० ॥
सुन्दरपर्वतशिखरीं वनीं सरोवरतटीं नदीकांठीं।
जिनसदनें बहु होतीं भव्यांच्या पुण्यसंचयासाठीं ॥ २१ ॥
करितां प्रयाण मार्गीं सूरिश्रीसत्यकेतु त्या दिसले।
नाथा! भवार्णवांतुनि तारावें रामचन्द्र त्या वदले ॥ २२ ॥
सूरिवरें त्या म्हटलें ‘तथास्तु’ तें वचन ऐकतां सकलां।
संसारांतुनि तरलों वाटुनि हृदयीं प्रमोद बहु झाला ॥ २३ ॥
साकेतापुरिं जाउनि वदले सामन्त भरतराजास।
वनवास-वृत्त ऐकुनि भरताच्या दुःख होय हृदयास ॥ २४ ॥

[ दशरथ राजानें भरतास राज्य दिलें व दीक्षा घेतली पण
रामवियोगाचे विचार त्याच्या मनीं येत असत. ]

---

१ दयेचा साठा. २ बोलावू, मानू. ३ श्रीरामाच्या हातरूपी कमलांत असलेली. ४ आपला जन्म. ५ पापसमूह.

इकडे दशरथ भरता करून राज्याभिषेक गृह सोडी ।
किञ्चित् रामवियोगजदुःखाची परि तुटे न पदवेडी ॥ २५ ॥
सान्त्वन करुनिहि शोकें अन्तःपुर करि विलाप त्या त्यजुन ।
दशरथनृपाल गेला दीक्षोत्सुक वनिं उदास होऊन ॥ २६ ॥
श्रीसर्वभूतहितगुरुपद पूजुनि मुनिपदास तो याची ।
आत्मसुखास्तव नाथा हा मोह प्रबल मन्मना जाची ॥ २७ ॥
एकविहाराचें मनिं चिन्तन असतां, वियोग रामाचा ।
कलुषित[1] करी तयाला भवदुःखा स्नेह वाढवी साचा ॥ २८ ॥

[ दशरथ-मुनिराजांचें अनित्यादि बारा अनुप्रेक्षांचें चिंतन. ]

एके वेळीं मुनिवर दशरथ एकाग्रचिन्तनांत रत ।
भवदुःख-हेतु आहे स्नेहचि मम कर्म बांधितो सतत ॥ २९ ॥
पूर्वी असंख्यजन्मीं स्त्री-पुत्रादिक असंख्य जे झाले ।
ते सर्व कुठें गेले कां तव आतांच मूढ मन बनलें ॥ ३० ॥
नानाविधभोगामधिं जीवा आसक्त फार झालास ।
तेणें नरकामध्यें झाला तूं प्राप्त दुःखदाहास ॥ ३१ ॥
पशुपर्यायामध्यें अन्योन्यां भक्षिलेस वा जीवा ।
तूं भोगिलीस दुःखें तुजला रे लाभलाचि न विसावा ॥ ३२ ॥
संगीत ऐकिलें तूं वीणादिक मधुरवानुसारी जें ।
चित्तविदारण-कारण रडणें ही ज्यांत दुःखबीज रुजे ॥ ३३ ॥
स्वर्गी सुराङ्गनांच्या नेत्रमनोहर अशा स्तनावरुन ।
फिरवून हात झालें स्पर्शेन्द्रिय तेवि हर्षयुक्त मन ॥ ३४ ॥
नानाविधपापांनीं नरकीं जीवा असह्य दुःख तुला ।
सन्तप्तलोह-नारी-स्पर्शें झालें जगीं न त्यास तुला[2] ॥ ३५ ॥
मानवभवांत पुण्यें सुगन्धि-बलवीर्य-दान-दक्ष असे ।
मधुरान्न करुनि सेवन रे सुख बहु मानिलेस रसनेवशें[3] ॥ ३६ ॥
रसनालम्पट[4] होउनि जें येथें पाप विपुल सांठविलें ।
ताम्रादिक-रसपानें[5] नरकीं तद्दुःख रडत भोगियलें ॥ ३७ ॥

१ त्याला मोहयुक्त करी. २ उपमा. ३ जिभेच्या वश होऊन. ४ जीभ.
५ तांबे कथिल वगैरेचा रस पिऊन.

रूप मनोहर पाहुनि नयनानन्दांत दंग मी झालों ।
केलें न आत्महित मी भयकर रूपास बघुनि मी मेलों ॥ ३८ ॥
पुष्पादिगन्ध सेवुनि भृङ्गासम चित्त मत्त मम झालें ।
दुर्गन्धदुःख नरकी पापें मज हाय भोगणें आलें ॥ ३९ ॥
मन चोरिलें जयांनीं सुन्दर आलिंगिल्या अशा तरुणी ।
लीला-विलास-सौख्यें भोगून अतृप्तताचि येइ मनीं ॥ ४० ॥
जें हुंगलें बघितलें जें श्रविलें[1] स्पर्शिलें न तें काय ।
आस्वादिलें न जीवें कर्मांचा दास जो जगीं होय ॥ ४१ ॥
पृथ्वी पाणी वारा अग्नि न जो देहरूप मम झाला ।
संसारीं मी फिरलों या रूपानें अनन्तशावेळां ॥ ४२ ॥
माता पिता नि भगिनी पत्नी सुतबन्धु आदिरूपानें ।
जो सम्बद्ध न झाला लोकत्रयिं जीव नच असा असणें ॥ ४३ ॥
हे देहभोग असती अनित्य नच रक्षितात जीवास ।
दुःखें भोगित फिरलों माझा सुटला न कर्म-सहवास ॥ ४४ ॥
पञ्चेन्द्रिययुत देहापासुनि माझें स्वरूप भिन्न असे ।
अपवित्र देह, शुचि मी यापरि माझ्यांत भिन्नताचि वसे ॥ ४५ ॥
रागद्वेषां त्यागुनि करीन संवरं[2] नवीनकर्मांचा ।
टाकून पूर्वकर्में बनेन मी निर्जरा[3]स्वरूपाचा ॥ ४६ ॥
जग हें विचित्र आहे रत्नत्रयलाभ सुलभ हा नाहीं ।
जिनकथित धर्म मजला कष्टानें प्राप्त जाहला पाही ॥ ४७ ॥
यापरि करून चिन्तन आर्तध्यानास दशरथें दूर ।
केलें तेणें निर्मल परिणामांचा सदा बने पूर ॥ ४८ ॥
आर्तध्याना नाशुनि धर्मध्यानांत लीन मुनि राही ।
शत्रूंच्या देशामधि विहरून परीषहास[4] तो साही ॥ ४९ ॥

[ भरताची आपणच प्रजापालन करावें अशी रामाला प्रार्थना.]

पतिपुत्र-वियोगानें राणी अपराजिता सुमित्रा या ।
झाल्या दुःखी अतिशय पाहुनि ये केकयामनांत दया ॥ ५० ॥

---

१ ऐकिलें. २ कर्म आत्म्यांत येऊ न देणें तो संवर. ३ पूर्वी बान्धलेलें कर्म थोडें थोडें निघून जाणें ती निर्जरा. ४ भूक-तहान, थंडी, ऊन इत्यादिक २२ प्रकारच्या पीडांना परीषह म्हणतात.

नेत्रांत सतत त्यांच्या पाहुनि अश्रुप्रवाह भरतास ।
विषसम दारुण वाटे राज्यरमा देइ त्या सदा त्रास ॥ ५१ ॥
राजे नम्र जयाला राज्य तुला प्राप्त जाहलें भरता ।
परि राम-लक्ष्मणाविण रमा तुझ्यामधिं कदापि हो न रता ॥ ५२ ॥
त्यांच्याविण राज्य वृथा, लाभ सुखाचा तुला न होईल ।
विरहें त्यांच्या माता भरता हा! शोकदग्ध[1] मरतील ॥ ५३ ॥
यास्तव त्यांना भेटुनि आणी वा शीघ्र भरत राज्यांत ।
त्यासह राज्य-रमेचें पालन करि कार्य हें करी त्वरित ॥ ५४ ॥
पवनंजय[2] अश्वावरि बसून जा शीघ्र मी ही येईन ।
अनुसरुनि मातृवचना अश्वसहस्रासवें करी गमन ॥ ५५ ॥
रामापासुनि आले परत अशा सज्जनास घेऊन ।
मार्गीं जना विचारुनि पुढें पुढें भरत तो करी गमन ॥ ५६ ॥
आम्ही अमुक-स्थानीं त्यांना हे भूप पाहिलें आहे ।
ऐसें कळतां उत्सुक होउनि तो त्वरित जातसे पाहे ॥ ५७ ॥
सतत सहा दिवसांचा प्रवास भरतें करून पाहियलें ।
लक्ष्मण सीता रामा तेणें त्याचें प्रसन्न मन झालें ॥ ५८ ॥
घोड्यावरून उतरुनि गेला रामासमीप भरत मुदें ।
भेटुनि तत्पद वन्दुनि झाला मूर्च्छित परन्तु नच खेदें ॥ ५९ ॥
सावध होउनि मस्तकिं करयुग कमलासमान ठेवून ।
रामास भरत वदला बन्धो विज्ञप्ति मम करी श्रवण ॥ ६० ॥
ही राज्याची पीडा श्रीरामा लाविलीस कां मागें ।
घे परत राज्य अपुलें कथितों उत्कट अशा मनोरागें[3] ॥ ६१ ॥
बन्धो तव विरहानें तिळमात्र हि राज्य नावडे मजला ।
इतुकेंच नव्हे जीवित वृथा गमे भारभूत जणु भूला ॥ ६२ ॥
बन्धो वहिनी लक्ष्मण साकेतापुरिं पुनः हि परतून ।
जाऊ करी प्रजेचें पालन मजवरि असो प्रसन्न मन ॥ ६३ ॥
होईन छत्रधर मी चामर मोदें अरिघ्न[4] वारील ।
लक्ष्मण मंत्री होउनि तव हृदयाला प्रसन्न ठेवील ॥ ६४ ॥

---

१ शोकानें होरपळलेल्या. २ वेगानें वाऱ्याला जिंकणारा. ३ मनःपूर्वक प्रेमानें. ४ शत्रुघ्न.

पश्चात्तापें माझ्या जननीचें हृदय दग्ध होत असे ।
दिन जननीयुग्मांचा[1] व्यतीत शोकाशिवाय होत नसे ॥ ६५ ॥
ऐसें भाषण असतां करीत नृप भरत केकया आली ।
बोलावण्यास रामा राज्यश्रीची जणू दुजी[2] आली ॥ ६६ ॥

[ कैकेयीही रामाला राजा हो म्हणते तेव्हां रामाचें तिला प्रत्युत्तर. ]

ती राम-लक्ष्मणांना भेटून मनांत खिन्न होऊन ।
वदली रामा चल वा सानुज करि राज्य ऐक मद्वचन ॥ ६७ ॥
तुजवांचुनि मज सगळें शून्य अशा काननासमान गमे ।
येई मज जणु खाया माझें कोठेंहि चित्त नैव रमे ॥ ६८ ॥
भरता उपदेशित जा तूं वा आहेस परम विद्वान् ।
स्त्रीबुद्धि क्षुद्रा मम अकार्य[3] माझें करी बुधा सहन ॥ ६९ ॥
श्रीराम वदे माते, क्षत्रिय जन वदति एकदा वचन ।
ते अन्यथा न वदती नच करिती कार्य अन्यथा सुजन ॥ ७० ॥
जें सत्य तात वदले मी तूं त्या भरत बान्धले गेलों ।
तें पाळीन सदा मी करीन नच अन्यथा जरी मेलों ॥ ७१ ॥
जरि करिन अन्यथा मी तातयशाला कलङ्क लागेल ।
पसरेल अयश भूवरि बनेल इक्ष्वाकुवंश हा समल[4] ॥ ७२ ॥
भरता वत्सा मानू नकोस मनिं खेद, मोद मानून ।
करि राज्य अयोध्येचें उल्लंघू वा नकोस मद्वचन ॥ ७३ ॥
बोलून असें केला भरता राज्याभिषेक रामानें ।
नृपसाक्षिक तो झाला सुधन्य हो राम निजसुचरितानें[5] ॥ ७४ ॥
वन्दून केकयीला क्षमा तिची मधुर शब्द बोलून ।
मागितली रामानें प्रेमें भरतास तेवि भेटून ॥ ७५ ॥
भरतें नि केकयेनें सीतेसह राम-लक्ष्मणीं प्रेम ।
करुनि प्रगट अयोध्या-नगरा केलें प्रयाण सुखधाम ॥ ७६ ॥
बाप जसें पुत्राचें करि पालन भरत धर्मरत भूप ।
प्रेमें निजप्रजेचें नान्दे सुख तुष्टि पुष्टि अनुरूप ॥ ७७ ॥

---

१ कौसल्या व सुमित्रा या दोन मातांचा. २ मैत्रीण. ३ अयोग्य कार्य. ४ दोषयुक्त. ५ स्वतःच्या उत्तम आचरणानें.

पाळीत राज्य असतां हृदयिं तयाच्या प्रमोद नच वाटे ।
मनिं शोकशल्य असतां लाभेल जगीं प्रसन्नता कोठें ॥ ७८ ॥
करि तो जिनेन्द्र-वन्दन भोगेच्छा मन्द जेधवा वरितो ।
करि धर्मश्रवणाला तेव्हां सन्तोषपूर्ण तो होतो ॥ ७९ ॥

[ द्युतिसूरींचा राजा भरताला धर्मोपदेश. ]

मोठ्या निजसंघासह आले द्युतिसूरि जेधवा नगरीं ।
स्वपरागमपारग ज्या वन्दाया भरत हृदयिं हर्ष धरी ॥ ८० ॥
वन्दूनि देशनामृत प्याला नृप भरत कर्णपात्रानें[1] ।
घेईन मुनिव्रत मी बघेन रामास जेधवा नयनें ॥ ८१ ॥
यापरि नियमा घेउनि बसला द्युतिसूरिजवळि विनयानें ।
वदले ते भूपाला सुज्ञा तूं ऐक सावधान मनें ॥ ८२ ॥

[ ज्याला मुनि व्हावयाची इच्छा आहे त्यानें गृहस्थधर्माचें
निरतिचार पालन केलें पाहिजे. ]

मुनिपद तूं इच्छिसि जरि गृहिधर्मा पाळ निरतिचारपणें[2] ।
वागेल नित्य यापरि मुनिपद लाभेल त्यास सुलभपणें ॥ ८३ ॥
करिन पुढें मी सत्तप ऐसें जो बोलतो न आचरि तें ।
तो आळशी प्रमादी त्याचें जगणें अवश्य होय रितें[3] ॥ ८४ ॥
मुनिधर्माचा आहे भरता गृहिधर्म धाकटा भाऊ ।
रत्नत्रय-धन देतो प्रमाद[4] यामधिं नकोस तूं ठेवूं ॥ ८५ ॥
रत्नांच्या द्वीपाला जातो मानव कुणी सुदैवानें ।
जें रत्न त्यांस मिळतें तेणें संपन्न होय बहुत धनें ॥ ८६ ॥
नियमद्वीपीं शासन चालें सद्धर्म चक्रवर्तीचें ।
जो नियम घेतला तो सुफला देतोचि हें असे साचें ॥ ८७ ॥
घेऊन अहिंसा-मणि जो भावें पूजितो जिनेशास ।
स्वर्गी तो नर जन्मुनि पावे अणिमादि-विपुल-विभवास ॥ ८८ ॥
मानव सत्य वदे जो जिनास पूजी सुपुष्पहारांनीं ।
तो मान्यवचन होतो त्याच्या सुयशेंचि शोभते अवनी[5] ॥ ८९ ॥

---

१ कानरूपी पात्रानें. २ दोषरहित. ३ निष्फल. ४ गैरसावधपणा.
५ पृथ्वी.

न दिलें धन नच घेई जिनवन्दनिं हर्षयुक्त जो होई ।
होतो रत्नाधीश्वर[1] तद्यश किन्नरसमूह नित गाई ॥ ९० ॥
जो जिनभक्त परस्त्रीरतिपासुनि दूर सर्वदा राही ।
नरनारीनयनांना आकर्षक सुभगता[2] तया पाही ॥ ९१ ॥
जो श्रीजिनास पूजी जो मर्यादा परिग्रहांत करी ।
तो लोकमान्य-मानव विशाल लाभास सर्वदैव वरी ॥ ९२ ॥
आहारदानपुण्यें मिळतात सुभोग्य वस्तु त्या सकल ।
गेला जरी विदेशीं कदापि होतो सुखें न तो विकल ॥ ९३ ॥
जो अभयदान देतो होतो भयरहित मनुज तो जाण ।
येतात संकटें जरि निरुपद्रव होतसेंचि कल्याण ॥ ९४ ॥
सम्यग्ज्ञान सुपात्रीं देणारा सर्वदा सुखी होतो ।
सर्वकलापारगता येते संसार तरुनि तो जातो ॥ ९५ ॥
सम्यग्दृष्टि करी नर आहारत्याग जो निशाकालीं ।
सर्वारम्भी असुनि हि शुभगति लाभे तयास सुखवाली ॥ ९६ ॥
जो वंदितो जिनेन्द्रा भक्तिभरानें नर त्रिकालांत[3] ।
पुण्यप्रचुर तयाला लाभे होऊन सकल पापान्त ॥ ९७ ॥
जो श्रीजिनेश्वराचें भूभव-जलभव[4]-सुगन्धिकुसुमांनीं ।
पूजन करि तो विहरे पुष्पकयानें सुखें सदा भुवनीं ॥ ९८ ॥
वाहून भावपुष्पें[5] जिनपतिपदपूजनास जो करितो ।
तो लोकपूज्य होतो सुन्दरजनिं अग्रगण्य तो होतो ॥ ९९ ॥
जो जिनपदद्वयाच्या पुढें समर्पून धूप पूजील ।
तो भक्त स्वर्गामधिं सुगन्धदेही सुरेश होईल ॥ १०० ॥
शुभभावानें दीपक लावून जिनालया प्रकाशील ।
होउनि उज्ज्वल देहीं मुक्तिरमाकर करांत घेईल ॥ १०१ ॥
छत्रध्वजा पताका चामर दर्पण अशा पदार्थांनीं ।
भूषवि जो जिनगेहा शोभे नर तो सुरांत दिनरजनीं ॥ १०२ ॥

---

१ सुदर्शनचक्रादिक चौदा रत्नांचा स्वामी चक्रवर्ती. २ सौंदर्य. ३ सकाळीं, दोनप्रहरीं व संध्याकाळीं. ४ जमीनीवर व पाण्यांत उत्पन्न झालेल्या सुगंधी पुष्पांनीं. ५ जिनेश्वराच्या गुणावर जी प्रीति हींच फुलें त्यांनीं.

जो जिनवपूस लावी गन्धविलेपन महादरें भक्त ।
त्याच्या सुगन्ध देहावरि होति सुराङ्गना सदा रक्त ॥ १०३ ॥
अभिषेक जिनपतीचा सुगन्धसलिलें करून भक्तजन ।
जेथें जेथें जन्मे तेथें त्या स्नापितात विबुधगण[1] ॥ १०४ ॥
करितो जिनेश्वराचा जो नर अभिषेक दुग्धधारांनीं ।
जन्मे शुभ्रविमानीं ज्याच्या द्युति खेळते सदा वदनीं ॥ १०५ ॥
करि जो दधिकुम्भांनीं जिनाभिषेकास भक्त तो भुवनीं ।
दधिशुभ्र स्वर्गामधिं होय सुरोत्तम सुवन्द्य देवगणीं ॥ १०६ ॥
करि अभिषेक जिनाचा श्रावक जो भक्ति धरुनि हृदयिं घृतें ।
स्वर्गीं विमानपति तो होतो कान्तिद्युतिप्रभावशतें ॥ १०७ ॥
अभिषेचनप्रभावें अनन्तवीर्याद्यनेक नृपतीस ।
इन्द्राभिषेक झाला वघा पुराणांत जिनवरोक्तीस ॥ १०८ ॥
वलि उपहार जयाला भेट असें वदति ती जिनेशगृहा ।
देणारा श्रावकजन विभवारोग्येंचि शोभतो पाहा ॥ १०९ ॥
गायन-नर्तन-वादन करुनि महोत्सव जिनालयांत जन ।
मिळविति परमोत्सव ते होतां स्वर्गांत जेधवा जनन[2] ॥ ११० ॥
जिनविम्ब नि जिनमन्दिर निर्मी जो भक्ति धरुनि हृदयांत ।
अगणित सुकृत[3] तयाला लाभे तद्वर्णनीं न कवि शक्त[4] ॥ १११ ॥
ज्ञान व्रत तपदानें मिळविति जे पुण्य भाग्यवन्त नर ।
तें वर्णाया आम्हां अल्पज्ञांना नसेचि अधिकार ॥ ११२ ॥
ऐशीं कामें श्रावक करुनि स्वर्गांत सौख्य भोगून ।
येथें चक्र्यादिकपद मिळवुनि होतात मुक्तिवररमण ॥ ११३ ॥
यापरि धर्मार्जन जे करिती भवसागरास लंघून ।
जाती त्यांचें होतें त्रैलोक्याग्रीं सदा प्रतिष्ठान ॥ ११४ ॥
स्मरण जिनाचें होतां सुजना एकोपवास-फल लाभे ।
दर्शनविचार येतां उपवासद्वयफलें तदा शोभे ॥ ११५ ॥
गमनविचारें जीवा उपवासत्रयसुपुण्य ये पदरीं ।
उपवासचतुष्काचें फल लाभे सत्य गमनिं अवधारी ॥ ११६ ॥

---

१ देवसमूह. २ जन्म. ३ पुण्य. ४ समर्थ.

मार्गात गमन होतां लाभे पञ्चोपवासफल जीवा।
अर्धपथीं तो पावे मानव पक्षोपवासफलभावा ॥ ११७॥
जिनमन्दिरावलोकन होतां मासोपवास फलमिळतें ।
अंगणिं येतां लाभे षण्मासांचें नि पाप ही गळतें ॥ ११८ ॥
द्वारीं फल वर्षाचें वर्षशताचें प्रदक्षिणा फल हें ।
जिनमुखदर्शन होतां वर्षसहस्रोपवास-फल पाहें ॥ ११९॥
जिनसद्गुणस्तुतीनें अनन्त उपवास-सुफल त्या लाभे ।
जिनभक्तिहून दुसरें जगांत सत्कार्य जाण नच शोभे ॥ १२० ॥
जिनभक्ति मनें करतां भरता, सम्पूर्ण कर्म कीं गळतें ।
तेणें भक्तजनाला मोक्षाचें सौख्य सर्वदा मिळतें ॥ १२१ ॥
यापरि गुरुवदनांतुनि ऐकुनि उपदेश भरत भक्तिभरें ।
वन्दुनि तत्पद घेई गृहिधर्मा प्रेम यन्मनांत खरें ॥ १२२ ॥
धर्मज्ञ जो बहुश्रुत विनयी श्रद्धालु भरत साधुजना ।
देई प्रतिदिनिं दानें वन्दुनि त्यांच्या सुपादपद्मवना ॥ १२३॥
सम्यग्दर्शन हृदयीं धरून रत्नासमान राज्य करी ।
व्रतशीलदानपूजा या गृहिधर्मास सर्वदैव वरी ॥ १२४ ॥

[ राज्यपालन करीत असतांही भरत आत्मचिन्तनास विसरला नाहीं. ]

त्याचा प्रताप पसरे गुणानुरागहि समस्त जगतांत ।
धर्मार्थकामसेवन करी यथाकाल साधुभक्तिरत ॥ १२५॥
अत्यन्त सुन्दराङ्गी भार्या त्याच्या शताहुनी अधिक ।
आसक्त न मन त्याचें ठेवी तो वश सदैव त्या युवक ॥ १२६ ॥
केव्हां मी जिनदीक्षा घेऊन करीन घोर सुतपास ।
सकलग्रन्थत्यागें, केव्हां तोडीन कठिन भवपाश ॥ १२७ ॥
" ते धन्य भूतलावरि मानव सोडून सकलसङ्गास ।
सुतपें नाशुनि कर्मा झाले जे मुक्त त्यजुनि अङ्गास " ॥ १२८ ॥
सर्व विनश्वर दिसतें तथापि भवदुःखमग्न झालों मी ।
सगळे सोडुन जातिल येइल माझ्या न एकही कामीं ॥ १२९ ॥

---

१ पंधरा उपवास. २ सहा महिन्यांचे. ३ पुष्कळ ऐकलेला अर्थात् उत्तम विद्वान्. ४ धन-धान्यादिक सर्व परिग्रहांच्या त्यागानें.

बन्धुसमूहीं असतां कोणास यम स्वमन्दिरा नेतो ।
जलशूलविषाग्न्यादिकहेतूंनीं मृत्यु त्यास जगिं येतो ॥ १३० ॥
नानाविधमरणांनीं मरून दुःखें सहस्रजन भोगी ।
धर्मौषध नच सेवी झाला हा म्हणुनि जीव भवरोगी[1] ॥ १३१ ॥
हें राज्य पाप कारण मजला हा ! घोर नरकिं नेईल ।
कपटादिकप्रयोगें पशुपर्यायास हेतु होईल ॥ १३२ ॥
जिनधर्म मज मिळूनहि राज्यमदें पापबन्ध होऊन ।
हा मी फिरेन दुर्भवि मुनिधर्मचि एकटा मला शरण ॥ १३३ ॥
यापरि चिन्ता सन्तत दुष्कर्मध्वंसहेतु[2] त्यांत वसे ।
निर्ग्रन्थकथातत्पर-भरता[3] रविचन्द्र नच कदापि दिसे ॥ १३४ ॥
जिनदास भरतसम जे जिनास पूजिति अणुव्रतां भजती ।
ते श्रमण भव्य होउनि मुक्तिसुखा प्राप्त निश्चयें होती ॥ १३५ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे दशरथ-राम-भरतानां प्रव्रज्यावनराज्यप्रस्थानाभिधानं नाम त्रयस्त्रिंशत्तमं पर्व ॥ ३३ ॥

---

१ संसार-रोगांनीं ग्रस्त झालेला. २ अशुभकर्मांचा नाश करण्यास कारण असलेली. ३ परिग्रहरहितमुनिवर्यांच्या कथाश्रवणांत तत्पर झालेल्या भरताला.

# चौतिसाव्या पर्वांतील कथेचा सारांश.

श्रीरामचंद्र, लक्ष्मण व सीता हे वनांतील रम्य प्रदेश पाहत विहार करूं लागले. वनांतील वृक्षांचीं मधुर फळें व नद्यांचें थंड आणि गोड-पाणी पिऊन ते चालू लागले. रात्रीं एका विशाल झाडाच्याखालीं पानांची शय्या करून ते झोपत असत. याप्रमाणें विहार करीत ते चित्रकूट पर्वतावर आले. तेथें कांहीं दिवस राहून ते अवन्ति देशांत आले.

सीता चालून थकल्यामुळें तिच्यासह एका वडाच्या झाडाखालीं विसावा घेण्या-साठीं तिघे बसून ते गोष्टी बोलू लागले. रामचंद्रांनीं सभोंवती नजर फेकून लक्ष्मणाला म्हटलें वत्सा, हा सगळा प्रदेश उजाड झालेला दिसत आहे. शेतांत पिकें उभीं आहेत. पण त्यांचें संरक्षण करणारे कोणी दिसत नाहींत. हे बगीचे, हे उसाचे मळे कसे हिरवेगार दिसतात. पण माणसें कोठेंच आढळून येत नाहींत. आपण वाटेंतून येत असतां कोठें उडीद, तांदूळ, मूग वगैरे सांडलेले दिसले. कोठें सूप, चटई, घागर, करण्डे पडलेले दिसले. अशी दुरावस्था या देशाची कां झाली हें समजत नाहीं. एखाद्या उंच झाडावर चढून कोणी मनुष्य येत आहे कां पाहा बरें !

रामचंद्रांनीं असें म्हटल्यावर लक्ष्मण एका उंच झाडावर चढून पाहूं लागला. त्याला लांब अंतरावर असलेलें एक गांव दिसलें, पण तेंही निर्मनुष्यच आहे असें आढळून आलें. पण दुरून कोणीतरी येत आहे असें जेव्हां दिसलें तेव्हां तो रामचंद्रास म्हणाला कोणीतरी आपल्याकडेच येत आहे असें मला दिसलें. तेव्हां मी त्याला घेऊन येतों असें बोलून तो झाडावरून उतरला व त्याकडे चालला. थोड्यावेळानें त्या मनुष्याकडे पोहोंचून त्यानें त्याला थांबविलें व विचारलें कीं– भल्या माणसा, हा देश उजाड कां दिसत आहे? तूं इतका कां शुष्क झाला आहेस हें सांग. मनांत भय बाळगूं नकोस. माझे वडीलबन्धु एका वडाच्या झाडाखालीं आपल्या पत्नीसह बसले आहेत तिकडे चल. त्यांना हा देश उजाड कां झाला हें जाणून घ्यायची तीव्र उत्कंठा आहे. असें सांगून त्याला लक्ष्मणानें रामचंद्राकडे आणिलें. त्यांना नमस्कार करून त्या आगंत मनुष्यानें स्वतःचे 'सीरगुप्त' हें नांव सांगून याप्रमाणें हकीकत सांगितली.

उज्जयिनी नगरींत सिंहोदर राजा राज्य करीत आहे. वज्रकर्ण हा त्याचा प्रिय सामंत होता. एके दिवशीं तो सामंत शिकार करण्यासाठीं एका वनांत गेला. तेथें त्याला एका दिगंबर जैन साधूंचें दर्शन झालें. साधूंनें हिंसा करणें, शिकार करणें हें पाप उत्पन्न करणारें व कुगतींत फिरविणारें आहे असें सांगून सर्व प्राण्यांविषयीं त्याच्या मनांत दया उत्पन्न केली. प्राण्यावर जो दया करतो तो साधु किंवा तो गृहस्थच आपलें हित करूं शकतो. निरपराध, दीन, अनाथ अशा प्राण्यांना जो मारतो तो स्वहिताचा नाश करून घेतो याचा विचार कर व शिकार करणें, यज्ञांत प्राणी मारणें, देवतेपुढें प्राण्यांना बलि देणें हें अत्यन्त अयोग्य कार्य आहे असें समज. असा मुनीश्वराचा उपदेश ऐकून वज्रकर्ण सामंतानें गृहस्थाचीं पांच अणुव्रतें धारण केलीं. प्रतिदिवशीं मी साधूंना आहार देईन व नंतर भोजन करीन असा नियम घेतला. याचप्रमाणें जिनदेव, साधु व जैनशास्त्राशिवाय इतरांना मी वन्दन करणार नाहीं असा नियम घेतला. व मुनींना— प्रीतिवर्धन आचार्यांना वंदन करून स्वगृहीं जाऊन त्याप्रमाणें तो वागूं लागला.

सिंहोदर राजाच्या दरबारीं गेल्यावर त्याला जर मी नमस्कार करीन तर माझी प्रतिज्ञा नष्ट होईल. व नमस्कार न केला तर त्याचा कोप आपल्यावर ओढून घ्यावा लागेल असा विचार वज्रकर्णाच्या मनांत आला. तेव्हां प्रतिज्ञेचें रक्षण करण्यासाठीं त्यानें आपल्या उजव्या हातांत मुनिसुव्रत जिनाची आकृति कोरलेली आंगठी घातली व दरबारांत गेल्यावर सिंहोदराला नमस्कार करण्याच्या मिषानें तो प्रभूच्या आकृतीला नमस्कार करून सेवकाचाराचें पालन करूं लागला.

पण एके वेळीं एका दुष्टानें सिंहोदराच्या कानावर खरा प्रकार घातला त्यामुळें तो अतिशय रागावला व त्याला कपटयुक्तीनें मारण्याचा विचार त्यानें आपल्या मनांत ठरविला. रात्रीं सिंहोदर राजानें ही हकीकत आपल्या राणीला सांगितली. त्यावेळीं विद्युदंग नांवाचा एक चोर राजाच्या येथें राणीच्या कानांतील कुण्डलें चोरून नेण्यासाठीं आला होता. त्यानें ही सर्व हकीकत ऐकिली व ही गुप्त हकीकत कळवून वज्रकर्णाचे प्राण आपण वाचवावेत असा त्यानें विचार केला व तत्काल तेथून निघून दशाङ्गपुराकडे चालता झाला.

वज्रकर्णही कांहीं घोडेस्वारासह उज्जयिनीकडे निघाला असतां वाटेंत भेटून सर्व हकीकत विद्युदंगानें सांगितली. तुला ही हकीकत कशी समजली असें विचारल्यावर त्यानें सांगितलें कीं, कामलता वेश्येवर माझें अत्यंत प्रेम आहे. व तिनें मला सिंहोदर

राजाच्या पत्नीच्या कानांतील कुण्डलें मला आणून दिली तर माझें तुमच्यावर पूर्वी-प्रमाणें प्रेम राहील असें म्हटलें. तिचें प्रेम आपल्यावर राहावें म्हणून गुप्तरूपानें राजवाड्यांत प्रवेश केला तेव्हां राजानें राणीला सांगितलेलें मी सर्व ऐकलें व चोरी न करितां आपले प्राण रक्षावेंत म्हणून आपल्याकडे आलों आहें. असें सांगितल्यावर विद्युदंगाला बरोबर घेऊन वज्रकर्ण आपल्या नगराला– दशाङ्गपुराला गेला.

सिंहोदराला आपला बेत फसला असें गुप्तचराकडून समजलें तेव्हां त्यानें बरेच सैनिक पाठवून वज्रकर्णाच्या देशाचा विध्वंस केला. व स्वतः निवडक सैन्य घेऊन दशाङ्गपुराला त्यानें घेरा घातला आहे. युद्धांत सैन्याचा नाश होईल म्हणून प्रथमतः त्यानें वज्रकर्णाकडे दूत पाठविला. दूतानें त्याला असें सांगितलें– "तूं माझ्याशीं मायाचार केला आहेस मला नमस्कार न करतां तूं जिनेश्वर, गुरु व शास्त्राला नमस्कार करितोस. माझ्या देशांत राहून व माझा नोकर असूनही मला नमस्कार करीत नाहींस. जर तूं नमस्कार येऊन केला नाहींस तर तुला पकडून ठार मारीन." हें दूताचें भाषण ऐकून वज्रकर्णानें आपला दूत सिंहोदराकडे पाठवून त्याच्याद्वारें आपला अभिप्राय त्यानें याप्रमाणें कळविला– प्रभो, "माझे सर्वस्व मी द्यायला तयार आहे. मी व माझी पत्नी अर्थात् आम्हा उभयतांना धर्माचरण करण्यासाठीं मोकळीक द्यावी. व मी जी प्रतिज्ञा घेतली आहे ती प्राण गेला तरी मोडावयाला तयार नाहीं. माझ्या देहाचा स्वामी मी आहे. त्यावर आपली सत्ता मी चालू देणार नाहीं." दूताचें हें भाषण ऐकून सिंहोदर अतिशय रागावला. त्यानें त्यामुळें देशाचा विध्वंस केला आहे. याप्रमाणें सीरगुप्तानें सर्व हकीकत सांगितली व तो तेथून पुढें जाण्याला निघाला असतां रामचन्द्रांना त्याच्या दीनपणाची कीव आली व त्यांनीं त्याला रत्नजडित सुवर्णमाला दिली. ती घेऊन व रामचन्द्रांना नमस्कार करून तो आपल्या गांवीं निघून गेला.

यानंतर रामचंद्रादिक तिघे दशांग-नगराच्या बाहेरील चन्द्रप्रभ जिनाच्या मंदिरांत आले. चन्द्रप्रभ तीर्थंकरांना नमस्कार करून ते हर्षित झाले. जेवण आणण्या-साठीं लक्ष्मण नगरांत आला असतां त्याला सिंहोदर राजाच्या सैनिकांनीं अडविलें. त्यांना अवमानून तो वज्रकर्ण राजाकडे पोचला वज्रकर्ण राजाचे नोकर लक्ष्मणाचें प्रभावशाली शरीर पाहून हे भद्र, आपण कोण? आपलें नांव काय व कशासाठीं आपण आला असें विनयानें विचारलें. लक्ष्मणानें अन्नेच्छा कळविली. तेव्हां त्यांनीं त्याला वज्रकर्णाकडे आणिलें. राजानें त्याचें सुन्दर शरीर पाहून हा कोणी उच्चकुलीन

असावा असें जाणून जवळ बोलावून घेऊन आपली इच्छा काय आहे सांगा, मी पुरवीन असें आदरानें म्हटलें. लक्ष्मणानें मी जेवणासाठीं आलों आहे असें म्हटल्यावर राजानें म्हटलें महाराज, माझ्यासाठीं जेवण तयार झालें आहे आपण दोघेंही जेऊ, उठा. लक्ष्मणानें मी येथें जेवणार नाहीं. गावाबाहेरील जिनमंदिरांत माझे वडील बन्धु पत्नीसह आले आहेत आम्ही तिघे मिळून जेवणार आहोत असें म्हटल्यावर राजानें त्याला पुष्कळसें अन्न दिलें. व तें घेऊन तो जिनमंदिरांत गेला. तेथें तिघेजण भोजन करून आनन्दित झाले.

जेवण झाल्यानंतर रामचंद्रांनीं लक्ष्मणाला म्हटलें– वत्सा लक्ष्मणा, आपणाला वाटसरानें वज्रकर्ण अणुव्रतधारक व अतिथिसत्कार करणारा दृढ प्रतिज्ञ आहे असें सांगितलें तें सत्यच आहे असें आपला आदर केल्यावरुन सिद्ध झालें आहे. सिंहोदर दुष्ट आहे व तो त्याला व्यर्थ छळीत आहे. भरत राजा नवीनच गादीवर बसल्यामुळें सिंहोदराला वश करणें शक्य होणार नाहीं म्हणून आपण हें कार्य आतां केलें पाहिजे यास्तव तूं सिंहोदराकडे जावून त्याला बान्धून टाक व वज्रकर्णाला संकटमुक्त कर. सिंहोदराकडे गेल्यावर त्याच्याशीं काय भाषण करावें वगैरे मी सांगण्याची तुला आवश्यकता नाहीं. तुला प्रसंगीं कसें वागावें व कसें बोलावें हें समजतें म्हणून तूं आतां लौकर त्यांचेकडे जा.

लक्ष्मण बरें म्हणून आपल्या भावापासून निघाला व गांवामध्यें आला सिंहोदराच्या सैनिकानीं आडवून तुम्हाला कोठें जावयाचें आहे ? तुम्ही कोण आहांत असें विचारल्यावर 'मी भरत राजाचा दूत आहे व सिंहोदर राजाकडे मला त्यानें पाठविलें आहे'. असें कळविल्यावर सैनिकानें त्याला सिंहोदराकडे आणिलें. राजा सिंहोदराला नमस्कार न करतां लक्ष्मणानें, 'मी भरताचा दूत आहे तूं वज्रकर्णाला अपराधावांचून छळीत आहेस त्याला सोडून त्याच्याशी मित्रभावनेनें वाग. भरताची आज्ञा उल्लंघिलीस तर तुझा तो नाश करील.'

सिंहोदरानें उत्तर दिलें मी त्याचा मालक आहे व तो माझा सेवक आहे. त्याला मी शिक्षा करीन. त्याला मी नम्र करीन. या कार्यांत तिसऱ्या व्यक्तीला सांगण्याची आवश्यकता नाहीं. लक्ष्मणानें म्हटलें "वज्रकर्ण अपराधी नाहीं त्याच्यांत तिळमात्रही दोष नाहीं. तो सदाचारी आहे यास्तव तूं त्याच्यावर क्षमा केली पाहिजेस." हें लक्ष्मण भाषण ऐकून सिंहोदर राजाला कोप आला. तो म्हणाला तूं येथून चालता हो, तुझें सांगणें मला मान्य नाहीं. लक्ष्मणही रागावला व वज्रकर्णाबरोबर तुला सन्धि

करावा लागेल– तूं भल्या विचारानें सन्धि कर नाहींतर तूं मरणाला तयार हो. ” असें लक्ष्मणाचें बोलणें ऐकून सिंहोदरानें आपल्या सैनिकांना याला ठार करा अशी आज्ञा केल्याबरोबर ते सैनिक त्याच्यावर धावून आले. लक्ष्मणानें अत्यंत चपलतेनें त्यांना धरून सभेंत आपटलें. पुष्कळांना लाथा-बुक्क्यांचा प्रसाद दिला. कित्येकांची शेंडी धरून त्यांची टक्कर आपसांत त्यानें केली. त्यामुळें सिंहाला पाहून कोल्हे जसे पळून जातात, तसे ते सैनिक पळून घरीं जाऊन लपून बसले.

राजा सिंहोदरानें आपल्या नवीन सैनिकांना घेऊन त्याला घेरिलें. हें पाहून लक्ष्मणानें तत्काल त्यांनाही पिटाळून लाविलें. व हत्तीला बांधण्याचा खांब उपटून हातांत घेऊन तो त्याच्यावर हातांत दण्ड घेऊन धावत असलेल्या भयंकर यमाप्रमाणें दिसला. गदेप्रमाणें तो खांब फिरवून त्यानें वीरांना बडविण्यास सुरुवात केली. व ते पांगल्याबरोबर सिंहोदराच्या हत्तीच्या दांतावर चढून त्यानें सिंहोदराला आवळून बांधलें व त्याला तो रामचंद्राकडे घेऊन चालला. त्यावेळीं त्याच्या राण्या येऊन म्हणाल्या– हे वीरा, आम्हाला पतिभिक्षा द्या, आमच्या पतीचे प्राण वाचवा. लक्ष्मणानें रागानें म्हटलें याला मी पुढें जें झाड दिसत आहे तेथें नेऊन त्याला त्या झाडावर लोंबविणार आहे. असें म्हणतांच त्या घाबरून आम्हाला मारून टाका, पण आपण आमच्या पतीला सोडा. त्यानें म्हटलें मी तुमच्या पतीला मारणार नाहीं. मी त्याला चन्द्रप्रभ जिनमंदिरांत नेतो असें म्हणून त्याला रामचन्द्रापुढें आणून उभे केलें.

श्रीरामचन्द्राला पाहून राजा सिंहोदरानें थर थर कांपत नमस्कार केला. व म्हटलें– हे पुरुषपुङ्गवा, आपण कोण आहांत हें मला माहीत नाहीं. पण मी अपराधी आहे असें कबूल करितो व वज्रकर्णाशीं मित्रता करून आजन्म आपल्या चरणांची सेवा करीन. सिंहोदराच्या स्त्रियाही दीनवाणीनें आम्हास पतिभिक्षा द्या, असें म्हणूं लागल्या.

रामचन्द्रांनीं “ राजा वज्रकर्णाला आम्ही येथें बोलावितों व तो जसें सांगेल तसें कबूल कर. तुझें जीवन आतां त्याच्या हातांत आहे. ” असें म्हटल्यावर कांहीं सज्जनांनीं राजा वज्रकर्णाला तेथें बोलावून आणिलें. राजानें प्रथम श्रीचन्द्रप्रभ जिनेश्वराला वन्दन केलें व नंतर विनयानें राम-लक्ष्मणांना व सीतेला कुशल विचारलें. रामचन्द्र म्हणाले भद्रा वज्रकर्णा ‘ तुझें कुशल असलें म्हणजे आमचें सर्वांचें कुशल आहेच असें समज. ’ मेरुपर्वताप्रमाणें तुझें सम्यग्दर्शन निश्चल आहे हें पाहून मला मोठा आनन्द झाला. मला पाहूनही तुझें मस्तक नम्र झालें नाहीं व तुझी शान्तवृत्ति पाहून मला हर्ष वाटत आहे.

वज्रकर्ण म्हणाला रामचन्द्रा, तूं माझा धर्मबन्धु आहेस. तुझें जर येथें आगमन घडतें ना तर आज माझें संकट टळलें नसतें. आज मला लक्ष्मणासारखा दुर्लभ मित्र मिळाला म्हणून विशेष आनंद वाटत आहे. गवतालाही दुःख देऊं नये अशी माझी भावना आहे. यास्तव माझा स्वामी असलेल्या या सिंहोदर राजाला बंधनमुक्त करा. लक्ष्मणानें बंधमुक्त करून म्हटलें "आणखीही कोणती इच्छा असल्यास सांग तीही मी पूर्ण करीन." असें बोलून उभय राजांचे हात एकमेकांच्या हातांत देऊन शपथपूर्वक त्यांना लक्ष्मणानें अन्योन्याचे मित्र बनविलें. विद्युदंगाला सेनापति केलें. राजा सिंहोदरानें वज्रकर्णाला आपल्या नगरीचा अर्धा हिस्सा दिला.

वज्रकर्णानें आपल्या अत्यंत सुन्दर आठ कन्याबरोबर लक्ष्मणांचा विवाह केला. सिंहोदरादिक राजांनींही आपल्या अनेक कन्या लक्ष्मणाला दिल्या. रामचंद्र म्हणाले आम्ही सध्या वनवासी आहोत. मलयपर्वत किंवा दक्षिण समुद्राकडे जाऊन राज्यस्थापन करून आमच्या मातांना जेव्हां अयोध्येहून आणण्याला परत येऊं त्यावेळीं तुमच्या कन्यांचाही लक्ष्मण स्वीकार करील. रामचंद्र व सीता यांचाही वस्त्रादिकांनीं वज्रकर्ण व सिंहोदर यांनीं चांगला आदर केला. यानंतर एके रात्रीं रामचंद्रादिक चन्द्रप्रभ मंदिरांतून वनवासाला निघून गेले. लक्ष्मणाला दिलेल्या कन्या शीलव्रत पाळीत पितृगृहीं राहिल्या.

---

# चौतिसावें पर्व.

इकडे राम नि लक्ष्मण सीता रम्य प्रदेश पाहून ।
करिती निवास तरुतलिं होय तयाचें वहु प्रसन्न मन ॥ १ ॥
मधुर फलावलि भक्षुनि वृक्षांची मधुर शीत सरितांचें ।
जल पिउनि गमन करिती निद्रा पर्णावरी तयास रुचे ॥ २ ॥
यापरि विहरत आले त्रिक तें श्रीचित्रकूटगिरिवरती ।
केला निवास त्यांनीं तेथें वहु दिवस करुनि शैलरति ॥ ३ ॥
तेथून ते निघाले भूतलभूषण अवन्ति देशास ।
धनधान्य पूर्ण होता रत्नसुवर्णें जसा नृपति कोश ॥ ४ ॥
मार्गपरिश्रम होतां सीतेचा तो हरावयासाठीं ।
एका वटद्रुमाच्या खालीं बैसून बोलती गोष्टी ॥ ५ ॥
फेकून दृष्टि रामें चोहिकडे लक्ष्मणास तैं म्हटलें ।
कोणाच्या भीतीनें प्रदेश उद्ध्वस्त वाटते झाले ॥ ६ ॥
हीं शेतें या वागा इक्षुक्षेत्रें अशुष्क दिसतात ।
परि या स्थाना मानव गेले सोडून वाटतें त्वरित ॥ ७ ॥
दिसती नूतन येथें खळीं नि उद्ध्वस्त होय हा प्रान्त ।
वत्सा ! जाणुनि घ्यावा वाटे चित्तास सकल वृत्तान्त ॥ ८ ॥
कोठें पथांत पडले उडीद तान्दूळ मूग दिसतात ।
कोठें सुपें करण्डे घट चटई आदि वस्तुही वहुत ॥ ९ ॥
देश असे वहु मोठा परि मानव यांत एकही न दिसे ।
दुरवस्थेचें कारण वदेल ऐसा इथें न कोण वसे ॥ १० ॥
वत्सा ! लक्ष्मण एका तरुवरि उत्तुङ्ग चढुनि वघ कोणी ।
येत असे कां इकडे घडल्या वृत्ता समस्त जो जाणी ॥ ११ ॥
वदला चढूनि लक्ष्मण दिसती येथून वहुत दूर घरें ।
जिनसदनें जनवर्जित तेणें हृदयांत खिन्नताचि भरे ॥ १२ ॥

---

१ पानावर. २ पर्वतावर स्नेह. ३ उसांचे मळे. ४ हिरवेगार.
५ रस्त्यांत. ६ वाईट दशा.

गेला असे प्रजागण निजपरिवारास सर्व घेऊन ।
म्लेच्छजनें वा पीडित झाला हा देश हृदय ये भरुन ॥ १३ ॥
परि पुरुष एक इकडे येत असे वाटतो मला भास ।
आकृति चञ्चल दिसते निश्चित बोलूं शके न वचनास ॥ १४ ॥
येईल जवळ जेव्हां तेव्हां निश्चय वदेन मी आर्ये[1] ।
थांबुनि वदला लक्ष्मण होइल परिपूर्ण आपुलें कार्य ॥ १५ ॥
आला समीप जेव्हां लक्ष्मण त्या वीर थाम्बवून वदे ।
विध्वस्त देश झाला पाहुनि माझ्या मनास खेदा दे ॥ १६ ॥
तूं चाललास कोठें कारण मजला भल्या नरा सांग ।
दे न भया आश्रय मनिं कां इतुका दिससि सांग शुष्कांङ्ग[2] ॥ १७ ॥

(सीरगुप्ति रामचन्द्रांना वज्रकर्णाचें वृत्त व देश उजाड होण्याचें कारण सांगतो.)

माझ्या वडील भावाकडेचि अथवा तुला नरा नेतो ।
निजपत्नीसह बसला वटतरुखालीं इथून तो दिसतो ॥ १८ ॥
रामा समीप जातां पुरुषें केला तया नमस्कार ।
छायेखालीं बसवुनि वदे तया राम गुणगणाधार ॥ १९ ॥
आलास भद्रें[3] कोठुनि नांव तुझें काय बोल साचार ।
अञ्जलि जोडुनि वदला येथुनि मद्ग्राम नाथ ! बहु दूर ॥ २० ॥
मी सीरगुप्ति नामें असे कुटुम्बी[4] नि देश हा ध्वस्त ।
कैसा झाला त्याचें कथितो जें दीर्घ जाहलें वृत्त[5] ॥ २१ ॥
उज्जयिनी-नगरीमधिं सिंहोदरनाम भूप राज्य करी ।
ज्याचा प्रताप मोठा गाती सानन्द नित्य सुरनारी ॥ २२ ॥
आज्ञाधारक त्याचा भूप श्रीवज्रकर्ण नांवाचा ।
दशपुर-नगरस्वामी ज्याची सत्य नि सदैव दृढ वाचा ॥ २३ ॥
अत्यंत साहसी जो प्रिय जो सिंहोदरास बहु होता ।
त्रैलोक्यनाथ-जिनपति-चरणयुगालाचि जो सदा नमिता ॥ २४ ॥
बाह्याभ्यन्तर[6]-संगत्यागी-मुनिपदिं अनन्य भक्त असे ।
याहुनि जो इतरांना केव्हांही वन्दना करीत नसे ॥ २५ ॥

---

१ हे पूज्य बन्धो. २ सुकलेल्या देहाचा. ३ भल्या माणसा. ४ शेतकरी. ५ हकीकत. ६ धन-धान्यादि व रागद्वेषादि बाह्याभ्यन्तर परिग्रह.

मुनिवर कृपा जहाली तेणें सम्यक्त्व त्यास जें लाभे ।
कीर्ति तयाची झाली हिरा जसा कोन्दणांत बहु शोभे ॥ २६ ॥
मुनिवर कृपा जहाली केव्हां कैशी तयास हें सांग ।
जेणें सम्यग्दर्शन झालें त्याचें अतीव पुष्टाङ्ग[1] ॥ २७ ॥
हा प्रश्न लक्ष्मणानें रामाभिप्राय हृदयिं जाणून ।
केला उत्तरिं त्याचें मनुजें केलें असें तदा कथन ॥ २८ ॥
दशपुरनगरापासुनि समीप जें क्रूर-पशुगणें भरलें ।
होतें वन निविड तमें जणु प्रवेशास सूर्यकर भ्याले ॥ २९ ॥
तो वज्रकर्ण गेला शिकार करण्या वनांत एकदिनीं ।
क्रूरप्रवृत्ति ज्याची करुणा लेशहि नसे यदीयमनीं ॥ ३० ॥
अतिशय इन्द्रियलम्पट सदा सदाचाररहित बहुलोभी ।
सूक्ष्मात्मतत्त्वनास्तिक परलोकाची मनांत ज्यास न भी[2] ॥ ३१ ॥
फिरतां वनांत दिसले त्याला मुनिराज शमदमें युक्त ।
प्रासुक[3]शिलेवरी जे बसलेले आत्मचिन्तनीं निरत ॥ ३२ ॥
सिंहासमान निर्भय होते गरुडासमान निःशङ्क ।
सम ते मानित होते कोणी श्रीमन्त वा कुणी रङ्क ॥ ३३ ॥
अश्वारूढनृपानें पाहून विचारिलें तया श्रमणा ।
येथें बसून करिता काय वरें ऐक हे नृपा तरुणा ॥ ३४ ॥
जें शेकडोंहि जन्मीं आत्म्याचें हित न मी असें केलें ।
तें मी करीत आहे त्यासाठीं सर्व संगही त्यजिले ॥ ३५ ॥
राजा हसून वदला अशा अवस्थेंत हो न आत्महित ।
पञ्चेन्द्रियविषयांच्या सेवेनें तेंचि होय अनुभूत[4] ॥ ३६ ॥
दुःखी मजला दिसतां चिह्न सुखाचें न कोणतेंहि दिसे ।
आत्महिताचें साधन करितों मी वचन पूर्ण फोल असे ॥ ३७ ॥
नाहीं वस्त्र शरीरीं स्नानालङ्काररहित हें दिसतें ।
भोजन परगृहिं कधितरि आत्म्याचें हित कसें वरें घडतें ? ॥ ३८ ॥
भोगांत लुब्ध पाहुनि दयालु मुनिवर वदे नृपालास ।
आशा-पाशां[5] तोडी आत्महिता तोचि जोडितो खास ॥ ३९ ॥

१ निःशंकितादि आठ अंगांनीं पुष्ट. २ भीति. ३ निर्जन्तुक पाषाणावर.
४ सुखाचा अनुभव येतो. ५ आशापाश तोडणें.

आत्महित हो न त्याचें इन्द्रियविषयांत लुब्ध जे होती ।
आशा वाढे ज्यांची ते नर संसारसागरिं फिरती ॥ ४० ॥

( वज्रकर्णा ! हिंसा ही संसारांत फिरविणारी आहे म्हणून
तिचा तूं त्याग कर असा मुनि उपदेश करितात. )

प्राणिसहस्रा वधिशी राजन्, करिशी अनर्थ हा घोर ।
पडशील भयद नरकीं करिल तुझा कोण सांग उद्धार ॥ ४१ ॥
जे तुजसमान लम्पट विषयीं होऊन पाप आचरिती ।
कैसें ते आत्म्याचें हित साधिति दुःखकर्दमीं बुडती ॥ ४२ ॥
इन्द्रियसुख हें आहे किम्पाकफलासमान तूं त्यास ।
प्रतिदिनिं सेवुनि कैसें आत्महितीं स्ववश करिशि चित्तास ॥ ४३ ॥
प्राण्यावरि जो करितो दया गृही तेंवि साधु विमलमना ।
तोचि स्वहिता साधी अन्यां नच साध्य जाण हे तरुणा[1] ॥ ४४ ॥
पञ्चमहाव्रत-पालन करितो जो साधु आत्महितकारी ।
किंवा अणुव्रती जन अन्यां दुःखचि मनांत अवधारी ॥ ४५ ॥
यज्ञासाठीं पशुवध करून बहु पुण्यसंचयें स्वहित ।
साधीन भावना ही मनुजाला नेइ घोर नरकांत ॥ ४६ ॥
जे निरपराध दीन नि अनाथ ऐसे वनांतले प्राणी ।
मारी त्यांना जो नर जाण स्वहितास निश्चयें हाणी ॥ ४७ ॥
जे वनतृणास भक्षिति पिऊन वनजल विहार करिति वनीं ।
पूर्वभवाच्या पापें झाले आहेत विपुल दुःखखनि ॥ ४८ ॥
भयभीत चित्त ज्यांचें रात्रीं ही झोप येइ नच ज्यांना ।
कुलज-सदाचारिजनें वधणें ऐशा न योग्य हरिणगणा ॥ ४९ ॥
आत्महिता जरि इच्छिशि राजन्, हिंसा शिकार ही सोड ।
कायें वाचें नि मनें लाभेल तुला सदैव सुख गोड ॥ ५० ॥
यापरि आत्महिताचा ऐकुनि उपदेश नम्र नृप झाला ।
घोड्यावरून उतरुनि लावी मुनिपदरजास[2] निजभाला[3] ॥ ५१ ॥
संगत्यागी या मुनिवर्यें हितमार्ग सत्य दाखविला ।
परहिततत्पर ऐसे मुनिवर हरितात भव्यपापमला ॥ ५२ ॥

---

१ हे तरुणा राजा. २ मुनींच्या पायांच्या धूळीला. ३ आपल्या कपाळाला.

( वज्रकर्ण अणुव्रतें धारण करून जिनेश्वर व निर्ग्रन्थमुनि
यांच्याशिवाय इतरांना नमस्कार करणार नाहीं
असा नियम घेतो. )

मी या गृहाश्रमामधिं अतृप्त आहे म्हणून तत्त्याग[1] ।
करण्या असमर्थ असें धारण करितों अणुव्रतीं योग ॥ ५३ ॥
त्रसजीवांची हिंसा त्यागीन तनें मनें नि वचनानें ।
पञ्चक अणुव्रतांचें करितों धारण अतीव तोषानें ॥ ५४ ॥
श्रीप्रीतिवर्धनाभिध-मुनिवर्यांच्या पदास वन्दून ।
वज्रश्रवणें वरिलीं अणुव्रतें पांच खचित सुखसदन ॥ ५५ ॥
जिनभक्ति गाढ निपजुनि मुनिपदयुग्मास साक्ष ठेवून ।
नृप नियम घे असा कीं, नमन जिनाविण कदापि अन्या न ॥ ५६ ॥
निर्ग्रन्थमुनिवरांना वन्दन माझें कदापि इतरां न ।
ऐशा नियमा पाळिन राहिल देहांत जोवरि प्राण ॥ ५७ ॥
वज्रश्रवणा नृपते ! चरिताचे दोन भेद आहेत ।
पहिला सागार[2] असे निरगार[3] दुज्या जिनेश म्हणतात ॥ ५८ ॥
सग्रन्थ-गृहस्थांचें सागार, असङ्ग साधुवर्यांचें ।
निरगारचरित ऐसे चरिताचे दोन भेद आर्यांचे ॥ ५९ ॥
दुष्कर मुनिचारित्रा जाणून अणुव्रतांत दृढ राहे ।
श्रीवज्रकर्णभूपति जिनधर्मा निधिसमान नित पाहे ॥ ६० ॥
याचा स्वभाव पूर्वी अत्यन्तकठोर-वृत्तिचा होता ।
परि मुन्युपदेशानें प्रशान्तभावास आदरी आतां ॥ ६१ ॥
बदल असा मुनि पाहुनि झाले सानन्द चित्त तेथून ।
अन्यत्र वनीं गेले निजस्वरूपांत होति रममाण ॥ ६२ ॥
इकडे स्वगृहीं जाउनि सत्पात्रीं दान भूप देऊन ।
भोजन करि नियमानें पाळी यापरि उपासकाचरण[4] ॥ ६३ ॥
सिंहोदरराजाचा सेवक मी त्यास नम्र होऊन ।
करिन नमस्कार ज़री विनाश पावेल मत्प्रतिज्ञान ॥ ६४ ॥

---

१ गृहस्थधर्माचा त्याग करून मुनिधर्म धारण करण्याला मी असमर्थ आहे. २ गृहस्थाचें. ३ गृहरहित मुनीचें. ४ श्रावकाचा आचार.

( सिंहोदरराजाचा विनय करण्यासाठीं वज्रकर्ण राजा
मुनिसुव्रत जिनाची आकृति आंगठींत कोरुन त्या
आकृतीला नमस्कार करीत असे. )

कैसें मी वागावें चिन्ता ऐसी मनांत उद्भवली ।
सुव्रतजिनबिम्बाची सोन्याची आंगठी तयें रचिली ॥ ६५ ॥
उजव्या हस्ताङ्गुष्ठीं घालून तिला करी नमस्कार ।
सिंहोदर-विनय करी पाळी यापरि सुसेवकाचार ॥ ६६ ॥

( कोणी दुष्टानें सिंहोदराला खरा प्रकार कळविला त्यामुळें
त्यानें वज्रकर्णाचा नाश करण्याचा विचार केला. )

एकेवेळीं वदला सिंहोदरभूपतीस खल कोणी ।
श्रीवज्रकर्ण सेवक करि न नमस्कार आपुल्या चरणीं ॥ ६७ ॥
सत्यकथा ती कथिली खलें यदा भूप कोपला फार ।
झाला वधार्थ उद्यत अविवेकिजनां सुचें न सुविचार ॥ ६८ ॥
कपटें बोलावुनि त्या मारावें वज्रकर्ण भृत्यांस[1] ।
करितो नमन न मजला आहे हा दुष्ट अविनयावास[2] ॥ ६९ ॥
बोलावण्यास गेला भृत्य श्रीवज्रकर्ण भूपास ।
सरळ मना भेटाया निघेचि तत्काल दुष्ट सापास ॥ ७० ॥
भृत्यास पाठवी तो अत्यन्त प्रेम शुद्ध दाखवुन ।
देऊन लेख त्यासह वाटावें भूप हर्षसम्पन्न ॥ ७१ ॥
घेउनि शम्भर सैनिक अश्वारूढ स्वकीय होऊन ।
जाया उद्यत झाला परि एक युवा वदे असें वचन ॥ ७२ ॥

( विद्युदङ्ग वाटेंत भेटून वज्रकर्णाला सिंहोदराचा
विचार कळवितो. )

भोग नि देहापासुनि झालास नृपाल काय निर्विण्ण ।
तरि जा मरण्यास्तव तूं मारिल तो तिळहि यांत संशय न ॥ ७३ ॥
झाला सिंहोदर तो तव वध करण्यास आज उद्युक्त ।
उज्जयिनीला जाऊं नकोस आहेचि यांत तव घात ॥ ७४ ॥
सिंहोदरमन केलें कलुषित कोणी तरी खलें जाण ।
हे वज्रकर्ण तेणें तव घ्याया सज्ज जाहला प्राण ॥ ७५ ॥

---

१ नोकराला. २ उद्धतपणाचें घर.

आहेस कोण तरुणा काय तुझें नांव सर्व सांग मला ।
कळलें कसें तुला हें जाणूं मी वृत्त इच्छितों अमला ॥ ७६ ॥
तो युवक वज्रकर्णा वदला मन्नाम विद्युदंग असे ।
वाणी[1] अवन्ति-नगरीं व्यापारास्तव तुझ्या नृपाल वसे ॥ ७७ ॥
कामलता वेश्येला पाहुनि मी भूप कामवश झालों ।
एके दिवशीं संगम होतां अत्यंत लुब्ध मी बनलों ॥ ७८ ॥
व्यापार करुनि पुष्कळ जनकें जें द्रव्य मिळविलें होतें ।
षण्मासांतचि वेश्यासेवनकार्यांत नष्ट केलें तें ॥ ७९ ॥
कमलांत भृंग जैसा तिच्यांत आसक्त नाथ ! झालों मी ।
सिंहोदरराजाच्या गेलों चौर्यार्थ तेधवा धामीं ॥ ८० ॥
राणी तयास वदली नाथा, कां आज झोप येई न ।
चिन्ता कसली हृदयां हृदयेशा मज करा तिचें कथन ॥ ८१ ॥
मज वज्रकर्ण करि नच नमना तो शत्रुतुल्य मज वाटे ।
त्याला जरी न मारिन सुख मज लाभेल तेधवा कोठें ॥ ८२ ॥
अपमान यांत माझा वाटे निद्रा मना नि नयनास ।
रमवील केवि जोंवरि शत्रूचा मी करीन नच नाश ॥ ८३ ॥
हें सिंहोदर-भाषण वज्राघातासमान[2] ऐकून ।
कुण्डलहरणाची मति तत्काल दिली नृपाल सोडून ॥ ८४ ॥
धर्मी तत्पर ज्याचें मन जो मुनिसेवनांत लीन असे ।
त्या तुजला मी कथिली वार्ता हितभावना मनांत वसे ॥ ८५ ॥
तुजला मारायास्तव आज्ञा सिंहोदरें असे केली ।
सरदार सज्ज झाले क्रौर्य[3] जयांच्या मनांत करि केली[4] ॥ ८६ ॥
हे धर्मवत्सला, तूं भूपा जाऊ नकोस भेटाया ।
धर्मोद्योतनकारण[5] जातील प्राण सर्व तव वाया ॥ ८७ ॥
राजन्, हें धूळीचें आकाशीं उंच जातसे पटल[6] ।
तेणें निःसंशय तूं येत असे जाण दुष्ट शत्रुबल[7] ॥ ८८ ॥
घेऊन विद्युदंगा परते श्रीवज्रकर्ण नगरास ।
अपुल्या सामन्ता तो योजी पुररक्षणांत सविशेष ॥ ८९ ॥

१ व्यापारी. २ विजेच्या धक्क्याप्रमाणें. ३ दुष्टपणा. ४ क्रीडा-खेळ. ५ धर्माची प्रभावना करण्यास कारण. ६ समूह, लोट. ७ सैन्य.

नगरीं प्रविष्ट झाला वार्ता ऐकून कुपित होऊन ।
सिंहोदर स्वयं ये प्रचण्ड सेना स्वकीय घेऊन ॥ ९० ॥
घेउनि नगरा लढतां होइल बहु सैन्य नाश जाणून ।
वज्रश्रवणासन्निध पाठविला दूत राजनयनिपुण[1] ॥ ९१ ॥

( सिंहोदरदूताचें भाषण व त्यास वज्रकर्णाचें उत्तर. )

तो वज्रश्रवणाला वदला जिनशासनांत होऊन ।
तूं लीन महागर्वे माझा केलास घोर अपमान ॥ ९२ ॥
माझ्या देशीं राहुनि मला नमस्कार करित नाहींस ।
जिनगुरुशास्त्रा नमिशी तूं मायाशील[2] दुष्ट आहेस ॥ ९३ ॥
येउनि माझ्या सन्निध माझ्या चरणा करी नमस्कार ।
नाहीं तर मी तुजला पकडुनि दुष्टा करीन रे ठार ॥ ९४ ॥
भाषण हें दूताचें ऐकुनि निजदूत शीघ्र पाठविला ।
सिंहोदरास जाउनि निजविभुचा भाव सर्व जाणविला ॥ ९५ ॥
घे नगर, सैन्य, कोष हि घे नाथा देश, विभव मम सार ।
पत्नीसह धर्माचें आचरणा दे मला खुलें द्वार ॥ ९६ ॥
केली असे प्रतिज्ञा मी मेलों तरिहि ती न सोडीन ।
माझ्या देहाचा मी स्वामी त्याचा नसेचि तूं कोण ॥ ९७ ॥
यापरि वचन श्रवुनिहि सिंहोदर नृप न सोडि कोपास ।
नगरा रोधून करी तो तेव्हां सर्वदेशविध्वंस ॥ ९८ ॥
झाला विषय[3] असा कां उजाड तद्धेतु मी तुला कथिला ।
जातो शून्यग्रामीं गृहोपयोगी पदार्थ घेण्याला ॥ ९९ ॥
खल सिंहोदर भूपें तेथें जाळून टाकिलीं सदनें ।
मम झोपडी हि जळली रचिली होती अतीव जी यत्नें ॥ १०० ॥
लपवून सूप थाळी घटादि ज्या वस्तु ठेविल्या त्यांना ।
आणावयास जातो इतरहि मिळतील वस्तु मज नाना ॥ १०१ ॥
गृहिणीनें[4] आणाया सांगितल्या म्हणुनि मी प्रभो जातो ।
दर्शन देवा झालें हितकर तुमचें सुदैव मम गणतो ॥ १०२ ॥
यापरि पथिका पाहुनि दुःखित रामें तयास करुणेनें ।
मणिजडित हेममाला दिली नि ती घेतली तयें अधनें ॥ १०३ ॥

---

१ राजनीति चतुर. २ कपट स्वभावाचा. ३ देश. ४ पत्नीनें.

प्रणिपात करुनि रामा गेला सांगून वृत्त हें सगळें ।
स्वस्थानास दरिद्री यन्नेत्रांतून अश्रुपूर गळे ॥ १०४ ॥
नन्तर म्हटलें रामें जाऊं लक्ष्मण दशाङ्गनगरास ।
सीतेस तृषा लागे शमवूं तेथें क्षुधादिबाधेस ॥ १०५ ॥
बोलुनि नगरासन्निध चन्द्रप्रभ जिनगृहांत ते गेले ।
वन्दून चन्द्रनाथा सीता लक्ष्मण नि राम मनिं धाले ॥ १०६ ॥

( वज्रकर्णानें आदरानें दिलेलें मधुरान्न राम, सीता व लक्ष्मणांनीं सेवन केलें. )

लक्ष्मण करिं धनु घेउनि भोजन आणावयास नगरांत ।
गेला आडविलें त्या सिंहोदर-सैनिकें तदा त्वरित ॥ १०७ ॥
परि त्यांना अवमानुनि गेला लक्ष्मण दशाङ्गनगरांत ।
श्रीवज्रकर्ण जेथें तेथें तो पोचला सुखें त्वरित ॥ १०८ ॥
भृत्य तयाचे वदले भद्रा तूं कोण कुठुनि आलास ।
आगमनहेतु वद वा अन्नेच्छा कळविली तयें त्यास ॥ १०९ ॥
श्रीवज्रकर्ण त्याचें मुख सुन्दर बघुनि बोलला बोल ।
माझ्या समीप यावें इच्छा पुरवीन आपुली सकल ॥ ११० ॥
वदला स्वजना माझ्यासाठीं जें अन्न शिजविलें आहे ।
वाढा आदरपूर्वक याला जेवो यथेच्छ हा पाहे ॥ १११ ॥
येथें जेवीन न मी वडील भावाकडेचि नेईन ।
तें जेववीन त्यातें शेषान्ना मी नृपाल सेवीन ॥ ११२ ॥
तें मान्य करुनि भूपें दिलें तया विपुल अन्नपानास ।
घेउनि लक्ष्मण गेला सेवुनि झाला प्रमोद सकलास ॥ ११३ ॥
हा वज्रकर्ण आहे मनुज भला परिचयाविणें त्यानें ।
आदर करून आम्हां अन्न दिलें वदुनि मधुरशीं वचनें ॥ ११४ ॥
तो साधु अणुव्रतधर कथिलें पथिकें नि सत्य तें आहे ।
नाहीं तर अतिथींचा आदर करणें न साध्य इतरा हें ॥ ११५ ॥
हा शुद्धात्मा आहे भवपीडाहरजिनेशचरणींच ।
वन्दन करितो इतरां करितो नच वचन हें असे साच ॥ ११६ ॥

---

१ रत्नजडित सोन्याची माला. २ भूक तहान आदिक पीडेला. ३ संसार-दुःख हरणारा.

(वज्रकर्णाला संकटमुक्त कर अशी लक्ष्मणाला रामाची आज्ञा.)
शत्रु तयाला छळितो व्यर्थ असे आमुचें तरी जनन ।
संकटमुक्त करी या लक्ष्मण, सिंहोदरास चान्वून ॥ ११७ ॥
खल सिंहोदर याला अपराधाविण छळावया आला ।
भरत न सोडवि यातें नूतन राजा न साध्य हें त्याला ॥ ११८ ॥
या सज्जनास अन्य न रक्षक सिंहोदराकडे जाच ।
मुक्त कराया लावी अपराधी कोण हें कथी साच ॥ ११९ ॥
सिंहोदरा वदावें काय असें सांगणें नको तुजला ।
प्रज्ञेसह[1] जन्म तुझा धरी महारत्न सहजकान्तीला[2] ॥ १२० ॥
आज्ञा शिरिं रामाची लक्ष्मण धारण करून मोदानें ।
न करीं धरुन धनुष्या गेला तो वीर नम्रवेषानें ॥ १२१ ॥
संरक्षकपुरुषानें विचारिलें प्रभु असे तुझा कोण ।
नृप भरत मम स्वामी त्याचा मी दूत सत्य हें जाण ॥ १२२ ॥
शिबिरा लंघुनि गेला सिंहोदरनृपसभेंत लक्ष्मण तो ।
मी भरतदूत आलों तव मन या मित्रभावनेंत रतो ॥ १२३ ॥
सोडून वैर मानी वज्रश्रवणास तूं सखा अपुला ।
भरताज्ञोल्लङ्घन हें अवश्य देइल तुला विनाशफला ॥ १२४ ॥

( सिंहोदर व लक्ष्मण यांची उत्तर-प्रत्युत्तरें. )

कर्कशहृदयी वदला सिंहोदर जो सगर्व भृत्य असे ।
स्वामी नम्र तयाला करील जरि वैर त्यांत केंवि वसे ॥ १२५ ॥
हा वज्रकर्ण आहे मानी कपटी नि मित्रनिन्दकही ।
विनयाचार तयाला नच ठावा गर्व मनिं सदा वाही ॥ १२६ ॥
दमनोपायें सोडिल वरील दोषास अन्यथा नाहीं ।
तूं स्वस्थ बसुनि दूता नयनें गंमत घडेल ती पाही ॥ १२७ ॥
लक्ष्मीधर त्या वदला हितकर त्याचा असे सदाचार ।
दोषाची कणिकाहि न त्यांत वसे तूं करी क्षमा थोर ॥ १२८ ॥
या लक्ष्मण-वचनानें सिंहोदरहृदयिं उद्भवे क्रोध ।
येथून चालता हो वाटे न मला पसन्त तव बोध[4] ॥ १२९ ॥

---

१ प्रज्ञा— त्रिकालांना ग्रहण करणारी बुद्धि. २ आपल्याबरोबर उत्पन्न झालेल्या कान्तीला. ४ उपदेश.

तूं कोशलापतीचा[1] उद्धत आहेस दूत तव देह ।
पाषाणांनीं रचिला वाटे मजला न यांत सन्देह ॥ १३० ॥
दिसती देशांत तुझ्या सर्व तुझ्यासारखेच दूतजन ।
बघतां दाबून शितें भाताचें होतसे जसें ज्ञान ॥ १३१ ॥
यापरि वदतां आला थोडासा लक्ष्मणा तदा राग ।
वदला मी तें आलों करावयाचें न कार्य वा सांग ॥ १३२ ॥
आतां स्पष्टचि वदतों तयार तूं जरि न सन्धिकार्यास ।
मरणास सज्ज हो वा सोडित नाहीं तुला अनार्यास ॥ १३३ ॥
यापरि लक्ष्मण-भाषण ऐकून क्षुब्ध जाहले वीर ।
वदले या दुष्टाला तरवारींनीं करा चला ठार ॥ १३४ ॥

( लक्ष्मणाचें सिंहोदराच्या वीरांवरोवर युद्ध. )

अत्यंत चपलतेनें पकडुनि त्यांना सभेंत आपटिलें ।
चरणें करमुष्टींनीं ठोकुनि सर्वांस अर्धमृत केलें ॥ १३५ ॥
शेंडी धरून केली टक्कर अन्योन्य मस्तकें त्यानें ।
व्याकुल होउनि भट ते गेले तेथून पळत भीतीनें ॥ १३६ ॥
सिंहा पाहुनि कोल्हे पळून जातात तेवि भट गेले ।
थरकांप हो शरीरीं स्वगृहीं जाउन दडूनि ते वसले ॥ १३७ ॥
मेघश्यामि[2] गजावरि सिंहोदर वसुनि त्या स्थलीं आला ।
होउनि सधैर्य भटगण लक्ष्मण वीरास वेढिता झाला ॥ १३८ ॥
वारा प्रचण्ड जैसा टाकी विसकटुनि पर्णराशीस ।
तो एकटाहि लक्ष्मण पळवी पुनरपि समस्त सुभटास ॥ १३९ ॥
उपडून गजस्तम्भा करांत घेउनि लढावयास रिघे ।
तेव्हां लक्ष्मण भासे घेउनि करिं दण्ड यम रणांत निघे ॥ १४० ॥
हुङ्कार शब्द ऐकुनि वीरकरांतील शस्त्रगणाहि गळे ।
भीरुजनांच्या वपुंतुनि तत्काल प्राण कां न शीघ्र पळे ॥ १४१ ॥
श्रीवज्रकर्ण पाही गोपुर[3]शिखरावरून त्या वीरा ।
वदला अद्भुत बलवान् याच्यासम नच जगीं दिसे दुसरा ॥ १४२ ॥

---

१ अयोध्यापति भरताचा. २ मेघाप्रमाणें काळया. ३ वेशीच्या शिखरावरून.

फिरवी स्तम्भ गदेसम सिंहोदरराजवल पळे तेणें ।
छत्रध्वजरथ मोडी फोडी गजराजमस्तका जेणें ॥ १४३ ॥
कोणी तरि सुर आहे विद्याधर वा दिसे कुणी प्रबल ।
शक्ति नसे अन्याची आला खायास काल वा सबल ॥ १४४ ॥
गजदन्तावरि देउनि पद हा गजमस्तकावरी चढला ।
सिंहोदरास कण्ठीं वान्धुनि नेतांचि यम जसा गमला ॥ १४५ ॥
निजवश करून बैला करुनि पुढें नेतसे जसें कोणी ।
सिंहोदरास नेई ज्याचे पाठीस बांधिले पाणि[1] ॥ १४६ ॥

( सिंहोदरस्त्रियांना मी याला मारणार नाही आपण दुःखी होऊ नका असें लक्ष्मण म्हणाला. )

लक्ष्मणचरणीं मस्तक ठेउनि सिंहोदरस्त्रिया वदती ।
अमुच्या पतीस सोडा द्या पतिभिक्षा अशी तुम्हा विनति ॥ १४७ ॥
हा वृक्षवृन्द दिसतो तेथें नेऊन यास लोंबवितों ।
फल दुष्टाचरणाचें सुनिश्चयें आज यास चाखवितों ॥ १४८ ॥
वदतां लक्ष्मण ऐसें देवा आम्हांस टाक मारून ।
परि पतिजीवन देई देई आम्हांस हें चुडेदान ॥ १४९ ॥
व्हावें प्रसन्न देवा, अमुचें हें दुःख दूर सारावें ।
पुरुषश्रेष्ठा, तुमचें स्त्रीजनिं मानस दयार्द्रे[3] नित व्हावें ॥ १५० ॥
सोडून यास देइन जाऊन पुढें नका करूं खेदा ।
याला न ठार मारिन नाहीं देणार यास मी बाधा[4] ॥ १५१ ॥
यापरि बोलुनि नेलें श्रीचन्द्रप्रभजिनेन्द्र-सदनांत ।
सिंहोदरास जेथें होते श्रीराम जानकीकान्त[5] ॥ १५२ ॥

( सिंहोदर राजा रामचन्द्रास नमस्कार करितो व त्याच्या स्त्रिया त्याला पतिभिक्षा मागतात. )

लक्ष्मण पद्मा[6] वदला अरि हा श्रीवज्रकर्णभूपाचा ।
सिंहोदर मी येथें आणियला आपुल्यापुढें साचा ॥ १५३ ॥
मस्तकिं ठेउनि करयुग सिंहोदरनृप करी नमस्कार ।
श्रीरामचन्द्र चरणा थर थर कांपे तदीयवपु फार ॥ १५४ ॥

---

१ यम. २. हात. ३ दयेनें ओलें. ४ दुःख. ५ सीतापति.
६ रामचंद्राला.

आहेस कोण हें नच मज ठावें पुरुषपुङ्गवा[2] परि मी।
आहे महापराधी आज्ञा पाळीन मी तुझी स्वामी ॥ १५५ ॥
मजला राज्य नको ह वज्रश्रवणास सर्व देईन।
तव चरणाची सेवा देवा आजन्म मी सुखें करिन ॥ १५६ ॥
सिंहोदरस्त्रियाही करुनि नमस्कार रामचरणास।
पतिभिक्षेतें याचुनि करिती त्या दीन करुण रुदनास ॥ १५७ ॥
करि करुणा आम्हावरि हे देवि, स्त्रीत्व तव वसे ठायीं।
म्हणुनि असें सीतेच्या ललना[3] त्या नम्र जाहल्या पायीं ॥ १५८ ॥
श्रीरामचन्द्रवाणी मेघनिनादा[4]समान गंभीर।
झाली प्रकट मुखांतुनि करुणेचें जी खरीच माहेर ॥ १५९ ॥
सिंहोदरभूपाला! वदेल जें वज्रकर्ण तेंचि करी।
श्रीरामचन्द्र वदले जीवन तव राहिलें तदीयकरीं ॥ १६० ॥
परहितकर-संतांनीं वज्रश्रवणास शीघ्र आणविलें।
येउनि जिनपदपद्मद्वय कर जोडून आदरें नमिलें ॥ १६१ ॥
विनयें भ्रातृयुगाचें आरोग्य विचारिलें तयें आधीं।
सीतेचें तदनन्तर होता तो वज्रकर्ण सत्यसुधी[5] ॥ १६२ ॥
हे भद्र वज्रकर्णा तव कुशलें आमुचें सदा कुशल।
यापरि राघव वदला त्याला अमृतासमानसे बोल ॥ १६३ ॥
त्या समयीं तो आला थोडेसें सैन्य पदरिं घेऊन।
श्रीविद्युदंग तेथें प्रणिपात करी त्रिकास हर्षून ॥ १६४ ॥

(रामचन्द्रांनीं वज्रकर्णाच्या विशिष्टसम्यक्त्वाची
स्तुति केली व त्याचें अभिनन्दन केलें.)

कुमताकम्पित मति तव वज्रश्रवणा प्रहर्ष देइ मला।
प्रलयसमीराकम्पित[6] मज जणु वाटे सुमेरुगिरिचूला ॥ १६५ ॥
मजला पाहूनहि तव मस्तक नत जाहलें नसे सहसा।
तव शान्तवृत्ति पाहुनि मनुजा आनन्द होय नैव कसा? ॥ १६६ ॥
त्रिजगद्वन्द्य जिनेन्द्रा ज्याचें मस्तक सदा प्रणाम करी।
तें श्रेष्ठतुङ्ग मस्तक अन्यपदीं केवि नम्रतेस वरी ॥ १६७ ॥

---

१ त्याचें– सिंहोदराचें शरीर. २ नरश्रेष्ठा. ३ स्त्रिया. ४ ढगांच्या शब्दाप्रमाणें. ५ सुबुद्धियुक्त. ६ प्रलयाच्या वाऱ्यानेंही न हालणारी. ८ शिखराग्र.

पुष्पांतिल मकरन्दस्वादीं जो लुब्ध जाहला भुंगा ।
तो स्पर्शीहि करण्याला होइल कां सज्ज गर्दभा सांगा ॥ १६८ ॥
अत्यन्त शुद्धतत्त्वीं श्रद्धा हे वज्रकर्ण तव आहे ।
धर्मानुरक्त तव मन विशिष्ट सम्यक्त्व त्यांत नित राहे ॥ १६९ ॥
तूं धन्य बुद्धिवन्ता तुझ्यांत आसन्नभव्यता शोभे ।
चन्द्राहुनि निर्मल तव यश हें लोकत्रयांत सतत उभे ॥ १७० ॥
हा विद्युदंग आहे मित्र तुझा भव्य करि तुझी सेवा ।
सुखदुःखांत सहायक तुझ्यांत ठेवी सदैव दृढभावा ॥ १७१ ॥
यापरि सद्गुणवर्णन ऐकुनि नृपवज्रकर्ण लाजेनें ।
खालीं करून वदना बोले रामास परमविनयानें ॥ १७२ ॥
या घोरसङ्कटांतुनि केलें श्रीराम तूं मला मुक्त ।
तूं परमबन्धु माझा सधर्महित[2] साधण्यांत अनुरक्त ॥ १७३ ॥
फिरला नसतां रामा जरि माझ्यावरुनि तव कृपाहस्त ।
पालन मम नियमाचें झालें नसते प्रभो दयायुक्त ॥ १७४ ॥
ऐसें बोलत असतां लक्ष्मण वदला महानुभावा[3] हे ।
जें रुचतें तुज वद तें मिळवुनि देईन शीघ्र मी पाहे ॥ १७५ ॥
श्रीवज्रकर्ण वदला अतिदुर्लभ मित्र तूं मला लाभे ।
दुर्लभ दुसरें नाहीं यदलाभे[4] मम न जीव वा शोभे ॥ १७६ ॥
परि मी हें तुज कथितों आहे मी परमजिनमतांत रत ।
दुःख न तृणाहि द्यावें इच्छा नांदे अशी मनीं सतत ॥ १७७ ॥

( मित्रा लक्ष्मणा माझ्या मालकाला तूं बन्धनांतून
मुक्त करावें अशी माझी इच्छा आहे. )

यास्तव सिंहोदरनृप जो माझा बांधिला असे स्वामी ।
मुक्त तयास करावें इच्छा ऐशी मनांत धरितों मी ॥ १७८ ॥
श्रीवज्रकर्ण यापरि वदतां सुजनें प्रशंसिला गेला ।
द्वेषिजनींहि शुभेच्छा मनिं तूं भूषण गमेचि भूमितला ॥ १७९ ॥
अपकारिजनीं करि जो दया तया सुजन सुज्ञ वदतात ।
उपकारि-जनीं करणें प्रेमा वैशिष्ट्य काय हो यांत ॥ १८० ॥

---

१ उत्कट प्रेम. २ समानधर्मीय बंधूचें हित. ३ मोठी प्रभावना करणारा. ४ ज्याची प्राप्ति न झाली असतां.

वदला लक्ष्मण सुजना तव हृदयांतुनि दया नदी जन्मे ।
इच्छा पूर्ण तुझी मी करितो मद्धृदयसदनिं[1] हर्ष रमे ॥ १८१ ॥
सिंहोदरास केलें मुक्त तयें उभयिं सख्यही घडलें ।
अन्योन्यकरग्रहणें शपथग्रहणेंहि मित्र ते बनले ॥ १८२ ॥
सिंहोदरें सुमित्रप्रेमें श्रीवज्रकर्णभूपास ।
उज्जयिनीचा अर्धा अंश दिला मनिं धरून हर्षास ॥ १८३ ॥
हरिले अमूल्य जे जे पदार्थ रत्नादि ते तयास दिले ।
हे देतां सिंहोदरनेत्रीं मोदाश्रु[2] तेधवा दिसले ॥ १८४ ॥
जो विद्युदंग त्याला सेनापतिपद दिलें प्रमोदानें ।
भक्ति तयाची होती वज्रश्रवणावरी अनन्यमनें ॥ १८५ ॥
राम नि लक्ष्मण सीता यांना वस्त्रादि वस्तु देऊन ।
वज्रश्रवणें केला आदर हृदयांत भक्ति ठेवून ॥ १८६ ॥
सुन्दर सुराङ्गनासम सुता दिल्या आठ लक्ष्मणास तयें ।
ज्याच्या हृदयसरोवरिं वीररसाचा अखण्ड पाझर ये ॥ १८७ ॥
सिंहोदरादिकांनीं रतिसम सुन्दर अशा अनेक सुता ।
लक्ष्मण वीरास दिल्या जणु ज्या लावण्य वाहिनीसरिता[3] ॥ १८८ ॥
लक्ष्मणवीरें म्हटलें आम्ही आहोत आज वनवासी ।
स्वस्थानलाभ होतां नेइन तुमचा सुखें सुताराशि[4] ॥ १८९ ॥
श्रीरामचन्द्र वदले आम्हा न स्थान भरतराज्यांत ।
मलयाचल-तटिं जाऊ किंवा दक्षिण समुद्रनिकटांत ॥ १९० ॥
स्थिर तेथें झाल्यावरि येऊ आणावयास जननींना ।
तेव्हां तुमच्या कन्या नेऊ ऐसें मनीं तुम्ही जाणा ॥ १९१ ॥
ऐसें भाषण होता कन्याहृदयास खिन्नता वाटे ।
तद्वदनमलिन झालें हिमें[5] जसें म्लान पद्मवन होतें ॥ १९२ ॥
प्राणा धारण करु जरि वियोग जाळील सतत हृदयास ।
इकडे व्याघ्र नि तिकडे पर्वततट हाय सर्वथा त्रास ॥ १९३ ॥
यापरि विचार येतां पितृसदनावास हा असे उचित ।
वाटे त्यांच्या हृदया झाल्या त्या शीलपालनांत रत ॥ १९४ ॥

---

१ माझ्या मनरूपी घरांत. २ आनन्दाश्रु. ३ सौन्दर्यजल धारण करणाऱ्या जणु नद्या. ४ कन्यासमूह. ५ थंड वाऱ्यानें.

माता-पितरा आणुनि राहे तो विद्युदंग सौख्यांत ।
श्रीवज्रश्रवणाचें प्रेम जयावरि अखण्ड दिनरात ॥ १९५ ॥
इकडे अर्ध्यारात्रीं राघव लक्ष्मण नि जानकी सुदती ।
चन्द्रप्रभास वन्दुनि अन्यस्थानास ते सुधी जाती ॥ १९६ ॥
चैत्यालय प्रभातीं जेव्हां सुजनास शून्य तें दिसलें ।
झाला खेद तयांना स्वकार्यकरणांत चित्त नच रसलें ॥ १९७ ॥
वाढे प्रीति प्रतिदिनिं सिंहोदरवज्रकर्णयुगलांत ।
मैत्रीसम्बन्धाची समृद्धि झाली तयांत दिनरात ॥ १९८ ॥
सीता राम नि लक्ष्मण यांचें वनिं गमन पूर्ववत् चाले ।
मधुरफलांचा चाखुनि रस वनिं त्यांचें प्रसन्न मन झालें ॥ १९९ ॥
कोठें सरोवरांच्या तटीं कुठें उपवनीं निवास असे ।
कोठें पर्वतशिखरीं विहरति ते त्रिक सदा प्रसन्न रसें ॥ २०० ॥
करिती क्रीडा कोठें करिती कोठें कथा-विनोदास ।
जिनपूजा-स्तुति कोठें करून ते होति सतत जिनदास ॥ २०१ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे वज्रकर्णोपाख्यानं नाम चतुस्त्रिंशत्तमं पर्व ॥ ३४ ॥

# पस्तीसाव्या पर्वातील कथासार.

श्रीराम व सीता कूबर-नगराच्या जवळ असलेल्या वनांत विसावा घेण्यासाठीं एका झाडाखालीं प्रसन्नचित्तानें बसले होते. लक्ष्मण पाणी पिण्यासाठीं एका सरोवराकडे आला होता. सरोवराच्या सभोंवती वेलींनीं वेष्टिलेले वृक्ष पाहून त्याला आनन्द झाला. त्याचवेळीं कल्याणमाल नामक राजपुत्र त्या सरोवराकडे आला. राजपुत्र मदनापेक्षाही सुन्दर होता. त्यानें लक्ष्मणाला पाहिलें. लक्ष्मणाच्या सौन्दर्यानें कल्याणमाल मोहित झाला. त्यानें आपल्या नोकराला त्याच्याकडे पाठविलें. तो हात जोडून विनयानें त्याला म्हणाला "हे भद्र, या नगराचा राजपुत्र आपल्या मैत्रीची अपेक्षा धरून आपणास बोलावित आहे. माझ्याबरोबर आपण चलावें. आपल्या येण्यानें त्याच्या मनाला आनंद होईल."

बरें आहे. चल असें म्हणून लक्ष्मण त्याच्याबरोबर निघाला. त्याला पाहून कल्याणमालनें 'मित्राचें स्वागत असो' असें म्हणून आपल्या हातानें त्याचा हात धरून त्यानें त्याला तंबूंत नेलें व एका आसनावर दोघे बसले.

मित्रा, तूं कोण? कोठून आलास? व तुझें नांव काय असें त्यानें विचारलें व तुझ्या दर्शनानें मला फार आनंद वाटला असें कल्याणमालनें म्हटलें.

लक्ष्मणानें म्हटलें मित्रा, माझे वडीलबन्धु येथील जवळच्या वनांत सपत्नीक बसले आहेत. त्यांना अन्न देऊन मी येईन व नंतर माझी कथा सांगेन.

तत्काल नोकरांना आज्ञा करून कल्याणमालनें दूध, दहीं, भात, लाडू, पुऱ्या, चटण्या व भाज्या मागविल्या व द्वाररक्षकाला वनांत जाऊन या माझ्या मित्राच्या सपत्नीक वडील भावाला बोलावून आण असें सांगितलें. द्वारपालनें त्याप्रमाणें त्याच्या मित्राच्या सपत्नीक भावाला बोलावून आणिलें.

सीतेसह आलेले रामचन्द्र ज्योत्स्नेसह आलेल्या चन्द्राप्रमाणें शोभले. त्यांचें स्वागत राजपुत्रानें उठून केलें. उभयतांना प्रसन्नतेनें दोन आसनावर त्यानें बसविलें. व आपण माझ्याकडे भोजन करा अशी आग्रहानें विनंति केली.

स्नानादिक आटोपून रामचन्द्र, सीता व लक्ष्मण राजपुत्रासह भोजनास बसले. भोजन झाल्यानंतर आनन्दानें आसनावर बसल्यावर 'माझ्या पित्याकडून दूत आला आहे मी पांच मिनिटांत परत येतों असें सांगून कल्याणमाल राजपुत्र दुसऱ्या तंबूंत गेला व त्यानें कन्यावेष धारण करून पुनः पूर्वीच्या तंबूंत प्रवेश केला. त्या कन्येला पाहात असतां जणू स्वर्गांतली उर्वशी स्वर्लो आली आहे असें रामादिकांना वाटलें. ती राजकन्या लाजून सीतेजवळ जाऊन बसली.

कन्येचें अपूर्व रूप पाहून लक्ष्मणाला तिची अभिलाषा उत्पन्न झाली. निर्मळ मनाच्या रामचन्द्रांनीं तिला विचारलें कन्ये, असे विविध वेष धारण करण्याचें काय प्रयोजन आहे? सांग बरें? रामचन्द्रांच्या प्रश्नाला उत्तर देतेवेळीं बुरखा थोडासा पुढें ओढून तिनें म्हटलें— हे पुरुषश्रेष्ठा, मी कांहींही लपवून न ठेवतां माझी सत्यकथा आपणास सांगते ती आपण ऐकावी.

या कूबरनगरीचा वालखिल्य नामक राजा माझा पिता होता. माझ्या आईचें नांव पृथ्वीदेवी आहे. तिच्या गर्भांत मी आल्ये त्यावेळीं माझ्या पित्यानें एका म्लेन्छ राजाबरोबर युद्ध झालें. त्यानें पित्याचा पराभव करून व त्याला कैद करून आपल्या राजधानीस नेलें. सिंहोदर राजा त्या म्लेच्छराजाचा स्वामी आहे. सिंहोदर राजानें आमच्या प्रधानजीला सांगितलें कीं, राणीला पुत्र झाला तर त्याला गादीवर बसवू. पुढें माझी माता प्रसवली. मी जन्मल्ये. परंतु सचिवानें व राणीनें मुलगा झाला म्हणून प्रसिद्ध केलें व जन्मल्यापासून मला मुलाचा वेष देऊन वाढविलें. मी कन्या आहे हें माता व सचिव आणि मी या तिघाशिवाय इतरांना माहीतच नाहीं. माझें नांव कल्याणमाल असें ठेवलें गेलें. आमच्या राज्यांत जें कराचें उत्पन्न होतें तें सर्व म्लेच्छ राजाच घेतो म्हणून आमचें जीवन मोठें दुःखाचें बनलें आहे. जरी सिंहोदर म्लेच्छराजाचा स्वामी आहे तरी तोही शासन करण्यास समर्थ नाहीं.

याप्रमाणें आपलें वृत्त सांगून कल्याणमाला रडूं लागली. तेव्हां रामचन्द्रांनीं मधुर शब्दांनीं तिचें सान्त्वन केलें. सीतादेवीनें तिला दयार्द्र होऊन मांडीवर घेतलें व लक्ष्मणानें म्हटलें— सुन्दरी, चिन्ता करू नकोस. लौकरच तुझा पिता बन्धनमुक्त झालेला पाहशील. कांहीं दिवस पुरुषवेषांत राहूनच तूं राज्य कर. मी तुझ्या पित्याला अवश्य सोडवून आणीन. या सर्वांच्या आश्वासनानें तिचें मनःसमाधान झालें.

नंतर हे तिघे तीन दिवस राहून रात्रीच्यावेळीं तेथून कोणाला न समजेल अशारीतीनें निघून गेले. कल्याणमाला पुरुषवेषांत राहून आपल्या पित्याच्या सुटकेची वाट पाहू लागली.

हे तिघेजण नर्मदा नदी उल्लंघून विन्ध्यपर्वताच्या गहन वनांत आले. तेव्हां समोरून म्लेच्छ सैन्य येत आहे असें त्यांना दिसलें. राम-लक्ष्मणांनीं आपलीं धनुष्यें सज्ज करून जेव्हां बाणांची वृष्टि केली तेव्हां तें सैन्य पळून गेलें व आपल्या राजाला ही वार्ता कळविली. तेव्हां स्वतः म्लेच्छ राजा कांहीं निवडक सैन्य घेवून लढण्यास आला. त्यांचीहीं या दोन अद्वितीय वीरांनीं दाणादाण केली. शेवटीं म्लेच्छ राजा शरण आला व आपली कथा त्यानें याप्रमाणें सांगितली. "कौशाम्बीनगरींत 'विश्वानल' नामक एक शुचिर्भूत ब्राह्मण आपल्या प्रतिसन्ध्या नामक पत्नीसह आनन्दानें राहत असतां या उभयापासून माझा जन्म जाहला. माझें त्यांनीं रौद्रभूति असें नांव ठेविलें. माझ्या ठिकाणीं एकही सद्गुण नव्हता. जुगार खेळणें, शिकार करणें, चोरी करणें या कामांत माझा हात धरणारा कोणी नव्हता. सर्व सदाचारापासून मी भ्रष्ट झालों होतों. एकेवेळीं मी चोरी करतांना पकडला गेलों. मला फांशी देण्यासाठीं नेत असतां एका जैन साधूला दया आली व त्यानें मला सोडविलें. नंतर मी कौशाम्बी देशाचा त्याग केला व म्लेच्छ आणि भिल्लांचा राजा झालों. मला कोणीही राजा जिंकू शकत नव्हता. पण आज मला आपलें दर्शन झालें मी धन्य झालो. हे प्रभो, आपण मला योग्य कार्य सांगा व तें मी करावयास तयार आहे."

हें त्याचें भाषण ऐकून रामचन्द्र त्यास म्हणाले तूं बालखिल्य राजाला पकडून नेऊन कैदेंत टाकलें आहेस त्याला सोडवून त्याचें राज्य त्यांच्या ताब्यांत दे व त्याचा तूं सचिव होऊन राज्यसंरक्षण कर नाहींतर तुला आम्ही ठार मारल्याशिवाय राहणार नाहीं. रौद्रभूतीनें बालखिल्याला सोडून देण्याचें कबूल केलें. त्यानें त्याला कैदेंतून मुक्त केलें. स्नान घालून नवीन वस्त्रांनीं भूषित केलें, व रथांत बसवून राम-लक्ष्मणाकडे आणलें. बालखिल्यानें उतरून राम-लक्ष्मणांना नमस्कार केला. यानंतर कूबर-नगरांत बालखिल्याला रौद्रभूतीनें आणिलें. कल्याणमाला व पृथ्वीदेवीनें राजाचें स्वागत केलें. सिंहोदर वगैरे राजांनींही स्नेह व्यक्त केला. रौद्रभूति त्याचा सचिव बनला. त्यानें आपले सर्व दुर्गुण त्यागले. याप्रमाणें कल्याणमालेचें व बालखिल्याचें सर्व दुःख राम-लक्ष्मणांनीं नाहींसें केलें व ते पुढें विहार करूं लागले.

# पस्तीसावें पर्व.

यापरि विहरत आले कूवर-नगरासमीप एक वनीं ।
घेत विसावा वसले सीता राम प्रसन्न जे स्वमनीं ॥ १ ॥

लक्ष्मण जलपानास्तव गेला सुन्दर सरोवराजवळी ।
वल्लीवेष्टित पाहुनि तरुराजी[1] तो प्रसन्न होय वली ॥ २ ॥

[ कल्याणमाल राजपुत्र व लक्ष्मण या उभयांची भेट. ]

कल्याणमाल नामक कूवरनगरेश एक राजसुत ।
आला रूप जयाचें कामाचें विस्मयी करी चित्त ॥ ३ ॥

त्यानें सरोवराच्या तटावरी लक्ष्मणास पाहियलें ।
त्याच्या सुन्दररूपें राजसुतस्वान्त[2] मोहयुत झालें ॥ ४ ॥

कल्याणमाल-किङ्कर लक्ष्मणवीरासमीप येऊन ।
विनयें करयुग जोडुनि वदला यापरि तयास मधुवचन ॥ ५ ॥

या नगरीचा नृपसुत मित्रत्वाचा धरून अभिलाप ।
बोलावितो चलावें द्यावा चित्तास त्याचिया तोष ॥ ६ ॥

तव वचन मान्य आहे ऐसें बोलून त्यासवें गेला ।
पाहून लक्ष्मणाला 'स्वागत तव' भूप-पुत्र त्या वदला ॥ ७ ॥
कोमलकरें तयाचा धरून कर त्यास वस्त्रसदनांत[3] ।
नेलें आसनिं एक्या वसले ते उभय देवसम कान्त[4] ॥ ८ ॥

कल्याणमाल वदला मित्रा तूं कोण कुठुनि आलास ।
सांग मला तव सुकथा तव दर्शन मोद वितरि हृदयास ॥ ९ ॥

[ कल्याणमालाच्या नोकरानें राम व सीता उभयतांना बोलावून आणलें. ]

मज्ज्येष्ठबन्धु येथें निवास करितो वनांत दुःखानें ।
देऊन अन्न त्यातें कथीन माझी कथा प्रमोदानें ॥ १० ॥

वदतां ऐसें लक्ष्मण दूध दही भात वरण लाडु पुरी ।
चटण्या भाज्या आदिक नृपसुत तत्काल आणवी स्वघरीं ॥ ११ ॥

---

१ वृक्षपङ्क्ति. २ राजपुत्राचें मन. ३ वस्त्राचें घर-तंबू. ४ मनोहर.

तो द्वाररक्षकाला वदला यांच्या वडील भावास ।
वनिं जाउनि बोलावुनि आणी वा शीघ्र यांन नायास ॥ १२ ॥
जैशी आज्ञा देवा बोलून असें वनांत तो गेला ।
वृत्त निवेदुनि सगळें स्त्रीसह त्या शीघ्र आणिता झाला ॥ १३ ॥
जणु चन्द्र ज्योत्स्नेसह[1] आले सीतेसवें तिथें राम ।
स्वागत करून नृपसुत उभयास करी प्रणाम अभिराम[2] ॥ १४ ॥
वसले उत्तम आसनिं सीताराम प्रसन्नभावानें ।
नृपसुतभोजन येथें करा असें विनवि त्यास नम्रपणें ॥ १५ ॥
सुस्नान-भोजनादिक कार्यें होतां समस्त सानन्द ।
राम नि लक्ष्मण सीता वसले असतां त्रिवर्ग सुखकन्द ॥ १६ ॥

[ कल्याणमालानें स्त्रीवेष धारण केला व आपली सर्व सत्यकथा सांगितली. ]

दूत पित्याचा आला जाउनि येतोंचि पांच निमिषांत ।
बोलुनि सन्निध सदनीं जाउनि करि वदल तो स्ववेषांत ॥ १७ ॥
आला कन्यावेषें स्वर्गाहुनि उर्वशीच जणु आली ।
रामादिकास वाटे त्यांची झाली प्रफुल्ल चित्तकळी ॥ १८ ॥
सीतेसमीप वसली लज्जेनें नम्रवदन होऊन ।
तद्रूप बघुनि सुन्दर झाले रामादि विस्मयाधीनें[3] ॥ १९ ॥
कामें विह्वल लक्ष्मण निश्चल नयनें तिच्याकडे पाहे ।
प्राप्ति हिची होइल कां विचारचक्रांत फिरत तो राहे ॥ २० ॥
निर्मलबुद्धि जयाची ऐसा श्रीराम बोलला तिजला ।
कां विविध वेष घेशी कारण सांगे असेल जें मजला ॥ २१ ॥
बुरखा आणून पुढें कन्येनें सर्व वृत्त सांगितलें ।
पुरुषश्रेष्ठा रामा ! कांहींही यांत हो नसे लपलें ॥ २२ ॥
या कूबर-नगरीचा होता नृप वालखिल्य नांवाचा ।
लोकप्रिय तो होता मुनिवत् बोले सदैव हितवाचा ॥ २३ ॥
पृथ्वी त्याची राणी झाली ज्यासमयिं गर्भभारवती ।
म्लेच्छनृपानें जिंकुनि युद्धीं नेलें तया निजप्रान्तीं ॥ २४ ॥

---

१ चन्द्राच्या प्रकाशाला ज्योत्स्ना म्हणतात. २ सुन्दर. ३ आश्चर्याचे स्वाधीन-आश्चर्यचकित.

सिंहोदर तत्स्वामी वदला गर्भी असेल जरि पुत्र ।
तो राज्य चालवाया होईल अवश्य तेथचा पात्र ॥ २५ ॥
परि मी कन्या झाल्ये दुर्दैवानें तथापि सचिवानें ।
राणीस पुत्र झाला प्रसिद्ध केलें असें सुभावानें ॥ २६ ॥
कल्याणमाल माझें जननीनें नांव ठेविलें विफल[1] ।
माता नि सचिव उभयचि मी कन्या जाणतात नच सकल ॥ २७ ॥
माझा पिता सुदुःखित पडला कैदेंत सोडवू न शके ।
सिंहोदर राजाही आहे असमर्थ सुज्ञ वदति निके ॥ २८ ॥
उत्पन्न होतसे जो घेतो म्लेच्छेश राज्यकर आम्ही ।
कष्टें जगतों माझा पिता कदा केवि मुक्त हो स्वामी ॥ २९ ॥
माझी माता झाली चन्द्रकलेसम कृशा वियोगानें ।
दुःखी अतिशय ऐसें कथिलें मी आपणास रडगाणें ॥ ३० ॥
यापरि कथून अपुला वृत्तान्त म्लानवदन होऊन ।
रडती झाली कन्या दुःखाचा पूर ये उचंवळुन ॥ ३१ ॥
अत्यन्त मधुर बोलुनि केलें श्रीराघवें समाधान ।
अंकीं घेउनि सीता वदन पुसे मनिं दयार्द्र होऊन ॥ ३२ ॥
बोले लक्ष्मण सुन्दरि, सोडी गे शोक धरुनि नरवेष ।
कांहीं दिनिं राज्य करी तव इच्छेला मिळेल परिपोष[2] ॥ ३३ ॥
वाट बघे धैर्यानें आणिन मी सोडवून तव जनका ।
शान्त करी मन अपुलें सोडुनि दे तूं मनांतली शङ्का ॥ ३४ ॥
यापरि वदतां बाला जणु झाला मुक्त आपुला तात ।
मानी चित्त तियेचें झालें सानन्द वदन बहुकान्त[3] ॥ ३५ ॥
तेथें त्रिवर्ग राहुनि दिनत्रयावधि सुखें निशासमयीं ।
अविदित निघून गेले बाला झाली सशोक बहु हृदयीं ॥ ३६ ॥

[ रामादिकत्रिक विन्ध्याटवींत आले. ]

कष्टें शोक निवारुनि येउनि कूवर-पुरांत ती राही ।
दीनमना नरवेषें पितृमोचनकाल[4] सर्वदा पाही ॥ ३७ ॥

---

१ व्यर्थ. २ पुष्टि, इच्छा पूर्ण होईल. ३ सुन्दर तेजस्वी.
४ बापाला म्लेच्छ राजाच्या कैदेंतून सोडविण्याचा काल.

कल्याणमालिकेच्या विनयें रूपेंहि मुदितसे त्रिक ते ।
मेकलनदीस[1] आले पक्षिरवें स्वागतास जी करिते ॥ ३८ ॥
क्रीडा करून तेथें तटवृक्षफलें यथेच्छ सेवून ।
नाना देशां विहरुनि आले विन्ध्याटवींत जी गहन ॥ ३९ ॥
तरुगण वल्लीवेष्टित वनितालिङ्गित नरासमान दिसे ।
पुष्पितवृक्षलतांनीं नन्दनवन या स्थळीं वसे भासे ॥ ४० ॥
कोठें वनानलानें जळला वनदेश रुक्ष भयद दिसे ।
दुष्पुत्रकलङ्कितशा वंशासम शोभतो नि विफल वसे ॥ ४१ ॥
ते 'कर्णिकार' नामक वनान्तरीं पोचले तदा सीता ।
वदली येथें होइल भाण्डण वाटे असेंचि मत्स्वान्ता[2] ॥ ४२ ॥
कां कीं कण्टकवृक्षीं डावे बाजूस ओरडे काक ।
सूर्याकडे करुनि मुख देई जणु संकटास हा हाक ॥ ४३ ॥
क्षीरतरूवरि बसला दुसरा जो मधुर कावळा बोले ।
हा विजयलाभ सुचवी घ्यावें ध्यानांत राघवा अपुलें ॥ ४४ ॥
यास्तव येथें घ्यावा नाथा विश्राम अल्पकालाचा ।
नन्तर गेलों असतां मिटेल हो समय खचित कलहाचा ॥ ४५ ॥
कां कीं जय जरि होइल तथापि सुन्दर न वाटतो मजला ।
ऐसें वदतां तरुतलिं वसून तो अल्पकाल घालविला ॥ ४६ ॥
नन्तर पुढें निघाले तथापि तैसेंचि शकुन जे घडले ।
अवगणुनि जानकीच्या वचना ते अल्पसें पुढें गेले ॥ १४७ ॥

[ म्लेच्छाबरोबर युद्ध म्लेच्छराजा शरण येऊन
आपली हकीकत सांगतो. ]

येत असे म्लेच्छांचें पुढती पाहून सैन्य नच भ्याले ।
श्रीराम-लक्ष्मणांनीं पिटाळिलें परि दुजें तिथें आलें ॥ ४८ ॥
वर्षाकालीं जैसें मेघ नभीं शीघ्र जमुनि येतात ।
तें म्लेच्छसैन्य आलें तैशी युद्धास होय सुरवात ॥ ४९ ॥
श्रीराम-लक्ष्मणांच्या अमोघशरवृष्टिनें[3] अतित्रस्त ।
होऊन सैन्य कळवी निजप्रभूला समस्त तें वृत्त ॥ ५० ॥

१ नर्मदा. २ माझ्या मनाला. ३ व्यर्थ न जाणाऱ्या बाणांच्या वृष्टीनें.

होऊन कुपित अतिशय घेउनि दारुण धनुष्य हस्तांत ।
आला सशस्त्र मोठें घेउनि तो सैन्य समरभूमींत ॥ ५१ ॥
काकोनद नांवाचे विख्यात म्लेच्छ मांसभक्षक ते ।
घेरियलें सर्वदिशीं त्यांनीं श्रीलक्ष्मणा नि रामातें ॥ ५२ ॥
होऊन कुपित लक्ष्मण दोरी चापास शीघ्र जोडून ।
टङ्कार करी जेव्हां कम्पित झालें तदा समस्त वन ॥ ५३ ॥
जीव वनस्थ भयानें होऊन क्षुभित धावती वेगें ।
जिकडे तिकडे जाती दुंकुनि ही पाहती न ते मागें ॥ ५४ ॥
जोडून धनुस बाणा जेव्हां उद्युक्त त्यास सोडाया ।
अन्धासम ती झाली म्लेच्छचमू[1] नच समर्थ ती जाया ॥ ५५ ॥
पाहुनि दशा तिची ही म्लेच्छांचा नृप मनांत बहु भ्याला ।
उतरून रथावरुनी करयुग जोडून वन्दिता झाला ॥ ५६ ॥
वदला कौशाम्बीपुरिं ' विश्वानल ' नाम विप्र शुचि[2] होता ।
प्रतिसन्ध्या त्या जाया जी मानी प्राणतुल्यसा भर्ता ॥ ५७ ॥
या रौद्रभूति होता उभयांना पुत्र पातकांत रत ।
शस्त्रद्यूतकलांचा ज्ञाता चौर्यादि[3]चतुर विख्यात ॥ ५८ ॥
चोरी करीत असतां पकडुनि शूळावरी तया द्याया ।
नेतांना साधूनें सोडविलें ज्याचिया मनांत दया ॥ ५९ ॥
काकोनदजातीच्या म्लेच्छांचा सज्जनास जो काल ।
देशा त्यागुनि गेला झाला प्रभु येउनी वनांत खल ॥ ६० ॥
सर्वसदाचाराहुनि झालों मी भ्रष्ट पशुसमान सदा ।
कोणीही राजा नच मजला जिंकावया समर्थ कदा ॥ ६१ ॥
दर्शनमात्रें आपण केलें मज वश्य आपुला दास ।
मी धन्य आज झालों दिसलें नृश्रेष्ठयुग्म हें ज्यास ॥ ६२ ॥
मज योग्य कार्य सांगा शासन शिरिं आपुलें धरीन सदा ।
किंवा पावनपंडित[4] ! निजशिरिं धरु काय पादुकाहि वदा ॥ ६३ ॥
हा विन्ध्यशैल आहे नानानिधि-पूर्ण तो तुम्ही घ्यावा ।
मजला दास करावें आश्रय दीनास निजपदीं द्यावा ॥ ६४ ॥

---

१ म्लेच्छसैन्य. २ पवित्र. ३ चोरी, शिकार आदि कार्यांत कुशल.
४ पवित्र करून घेणाऱ्यांत चतुर.

[ रौद्रभूति म्लेच्छराजानें बालखिल्यास राज्यावर स्थापून तो त्याचा प्रधान झाला. ]

यापरि भाषण ऐकुनि त्याचें राघव असें तया बोले ।
तूं वालखिल्यभूपा कारागृहिं बद्ध वा असे केलें ॥ ६५ ॥
करुनि विवन्धन[1] त्याला सन्मानें शीघ्र या स्थलीं आण ।
तूं म्लेच्छसंग सोडुनि हितकर याचाच सचिव हो जाण ॥ ६६ ॥
करिशील कार्य हें जर तुजला लाभेल शान्ति चिरकाल ।
मारीन अन्यथा मी मन्निश्चय नच कधींहि बदलेल ॥ ६७ ॥
मी कार्य करिन नाथा, अवश्य हें म्हणुनि नमुनि चरणास ।
तो रुद्रभूति गेला विमुक्त[2] केलें नि वालखिल्यास ॥ ६८ ॥
घालुनि सुस्नान तया जेवाया मधुर अन्न देऊन ।
करुनि अलङ्कृत वस्त्रें, नेई तो सुरथिं त्यास बसवून ॥ ६९ ॥
बहुमान असा करितां वाटे आश्चर्य त्याचिया हृदया ।
दुःखद करील याहुनि दशा नसे याचिया मनांत दया ॥ ७० ॥
हा म्लेच्छशत्रु मोठा कां करितो मम अपूर्व सन्मान ।
हा दुष्ट आज वाटे माझे घेईल निश्चयें प्राण ॥ ७१ ॥
जात रथानें असतां विचार त्याच्या मनांत उद्भवले ।
सहसा राघव लक्ष्मण दिसतां तच्चित्त मुदित बहु झालें ॥ ७२ ॥
उतरुनि रथावरुनि तो करी नमस्कार रामचरणास ।
पुण्यप्रभाव अपुला वन्धाचा सर्वथा करी नाश ॥ ७३ ॥
वदला अपुल्या पुण्यें कारागृहवास[3] जाय विलयास ।
सज्जनदर्शन होतां प्रमोद होतो उरे न आयास ॥ ७४ ॥
विश्वानलाङ्गजाला[4] राम करी सचिव वालखिल्याचा ।
सज्जन बनला त्यागुनि तो संग म्लेच्छ आणि भिल्लांचा ॥ ७५ ॥
पाठविलें श्रीरामें कूवरनगरास वालखिल्यास ।
रुद्रविभूतिहि गेला झाला सर्वांस परम सन्तोष ॥ ७६ ॥

[ वालखिल्यराजाचा सिंहोदरादि राजांनीं सन्मान केला. ]

स्वागत करावयाला आली कल्याणमालिका कन्या ।
पृथ्वीराणीहि मुदें स्वतःस त्या मानु लागल्या धन्या ॥ ७७ ॥

---

१ बंधमुक्त. २ सोडलें. ३ कैदखान्यांत राहणें. ४ रौद्रभूतीला.

केला नृपपदयुग्मा उभयें अत्यादरें नमस्कार ।
आले निजनगरामधिं सुजनें केला नृपालसत्कार ॥ ७८ ॥
सिंहोदरादि-राजे विस्मित कन्यागुणास पाहून ।
झाले नि वालखिल्यासह मैत्रीभाव मुदित जोडून ॥ ७९ ॥
श्रीरौद्रभूति झाला वश जेव्हां वालखिल्यभूपास ।
सिंहोदरादिराजे भीतीनें स्नेह दाविती त्यास ॥ ८० ॥

उपजातिवृत्त.

श्रीराघवाच्या वरुनि कृपेस । श्रीरौद्रभूती वरि वैभवास ॥
शरत्सहायें रवि जेवि शोभे । होऊनि मन्त्री चमके विलोभें ॥ ८१ ॥

अनुष्टुप्.

कल्याणमालचरित असे आश्चर्यकारक ।
लक्ष्मणावरि यत्स्नेह झाला दुःखौघनाशक ॥ ८२ ॥
पुंवेषें राज्य रक्षून चातुर्य वरि दाखवी ।
कथा तियेची वदला जिनदास जना कवि ॥ ८३ ॥

इति श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे वालखिल्योपाख्यानं नाम पंचत्रिंशत्तमं पर्व ॥ ३५ ॥

---

१ कल्याणमाला व पृथ्वीराणी या दोघींनीं. २ निर्लोभपणानें.

## छत्तिसाव्या पर्वांतील कथेचा सारांश.

देव जसे नन्दनवनांत विहार करितात तसे हे रामादिक तिघजण पर्वत, सरोवर व वनांत विहार करीत करीत खळखळ वाहणाऱ्या तापी नदीकडे आले. तिची शोभा पाहून त्यांच्या मनाला आनंद वाटला. तेथूनही पुढें विहार करीत असतां एका रूक्ष व निर्जल प्रदेशांत ते आले. ऊनही कडक पडलें होतें व त्यामुळें सीतेचा कण्ठ तहानेनें सुकून गेला होता. ती मार्गपरिश्रमानेंही थकलेली होतीच. एका विशाल वृक्षाचे तळीं तिघेही बसले. सीता म्हणाली नाथ, मला अतिशय तहान लागली आहे. पाणी तर येथें कोठें दिसत नाहीं.

रामचन्द्र म्हणाले ' देवी, जवळच हें गांव दिसतें आपण तेथें जाऊं तुला तेथें थंड पाणी प्यावयास मिळेल.' असें म्हणून तत्काल ते गांवाकडे निघाले.

अरुण हें गांवाचें नांव होतें. गावांत शेतकरी राहत होते ते सर्व धनसमृद्ध होते. त्याच गांवात एक कपिल नांवाचा ब्राह्मण राहत होता. त्याचा रागीट स्वभाव होता. त्याच्या घरीं पाणी मिळेल म्हणून तिघांनीं प्रवेश केला. ब्राह्मणाच्या बायकोनें त्यांचें स्वागत करून सीतेला मधुर थंड पाणी प्यावयाला दिलें. तें पिऊन तिला प्रसन्नता वाटू लागली.

इतक्यांत कपिल ब्राह्मण डोक्यावर लांकडांचा भारा घेऊन घरांत आला. त्यांना पाहून त्याला राग आला. तो कठोर शब्द बोलून त्यांचा अपमान करूं लागला. त्याच्या भाषणानें लक्ष्मणाला फार राग आला. त्यानें त्याचे पाय धरले व गर गर फिरविलें. आतां तो त्याला आपटणार इतक्यांत रामचन्द्रांनीं त्याला त्या कार्यापासून परावृत्त केलें. ते म्हणाले लक्ष्मणा हा ब्राह्मण जिवंत प्रेताप्रमाणें आहे. त्याला मारून तुला काय मिळणार आहे ? सोडून दे. शूर पुरुषानें ' मुनि, ब्राह्मण, गाय, बालक, वृद्ध व स्त्री हे अपराधी असले तरीही त्यांना मारूं नये. असें बोलून त्या ब्राह्मणाला सोडविलें व जेथें आपला अपमान होतो तेथें राहू नये असें म्हणून तत्काल त्या गांवातून ते वनांत आले.

त्यावेळीं आकाशांत मेघ जमा झाले व पाऊस पडूं लागला. हे तिघेही पावसानें भिजले व एका वडाच्या झाडाखालीं जाऊन बसले. त्या झाडावर राहणारा इभकर्ण नामक देव या तेजस्वी व्यक्तींना पाहून भ्याला व आपल्या 'विनायक' नामक स्वामीकडे येऊन म्हणाला स्वर्गाहून कोणी अतितेजस्वी देव माझ्या निवासस्थानीं आले आहेत व मला त्यांना पाहून भय वाटतें. हें त्याचें भाषण ऐकून त्याला हसू आलें. व त्यानें अवधिज्ञानानें राम व लक्ष्मण हे बलभद्र व नारायणपदाचे धारक आहेत असें जाणलें व त्यांची आपण सेवा करावी म्हणून ते झोपल्यावर रात्रीं त्यानें जंगलांत सुंदर नगराची रचना केली. सकाळीं त्या तिघांना जाग आली तेव्हां आपण एका मोठ्या प्रासादांत रत्नजडित पलंगावर झोपलों आहोत असें त्यांना आढळून आलें. आपला महाल अनेक मजल्यांचा आहे व अयोध्येंत जसे- मन्त्री, योद्धे, शिपाई, हत्ती, घोडे होते तसे सर्व येथेंही आहेत असें त्यांना दिसलें. अनेक प्रासाद, जिनमंदिरें, पाण्यानें भरलेलीं सरोवरें, बगीचे त्या नगरांत त्यांना दिसले. अशा त्या नगरांत ते तिघे आनंदानें राहिले.

इकडे समिधा गोळा करण्यासाठीं त्या वनांत कपिल आला. त्याला तेथें सुंदर गांव दिसल्यामुळें आश्चर्य वाटलें. येथें पूर्वी हरिण चरत होते व आज येथें अत्यन्त सुंदर गांव दिसत आहे. मला भ्रांति किंवा पित्तोद्रेक तर झाला नाहीं ना ?

अथवा सत्पुरुषाच्या शुभकर्माच्या उदयानें हें नगर निर्माण झालें असेल असा विचार करून तो त्या नगराजवळ गेला. तेथें त्याला एक स्त्री दिसली. तिला त्यानें त्या नगरीचें नांव विचारलें. तिनें त्या नगराचें नांव रामपुरी असें सांगितलें. हिच्या पूर्वदिशेला एक सुंदर जिनमन्दिर आहे. जे अणुव्रतें पाळतात, जिनदेवावर श्रद्धा ठेवतात, सामायिक करितात त्यांना येथें प्रवेश मिळतो व रामचन्द्र त्या व्यक्तीचा आदर करून पुष्कळ धन देतो. याप्रमाणें तिच्याकडून माहिती मिळाल्यावर तो 'चारित्रशूर' नामक मुनिवर्याकडे गेला व वन्दन करून मला जिनधर्माची माहिती सांगा असें म्हणाला. त्यांनीं देव, गुरु, शास्त्र यांची माहिती करून दिली. जिनधर्माचा आचार व तत्त्वज्ञानाचें वर्णन केलें. हें सर्व ऐकून त्याला मोठा आनन्द वाटला. त्यानें जैनधर्माचा स्वीकार केला व नंतर घरीं जाऊन आपल्या पत्नीला- सुशर्मेला ही सर्व हकीकत सांगून तिलाही जैनधर्मावर श्रद्धायुक्त केलें.

नंतर एके दिवशीं कपिलानें आपल्या खांद्यावर आपल्या लहान मुलाला घेतलें व त्याच्या पत्नीनें हातांत फुलांचा करण्डक घेतला व ते रामनगरीजवळ आले.

त्यांची परीक्षा पाहण्यासाठीं यक्षांनीं वाटेंत सर्पाचें व वेताळांचें रूप घेतलें. पण न भितां त्यांनीं जिननामस्मरण करीत नगरांत प्रवेश केला. जिनमंदिरांत जावून त्यांनीं प्रथमतः त्रिकालतीर्थंकरांची स्तुति केली. व नंतर रामचंद्राच्या प्रासादाकडे निघाले.

जेव्हां प्रासादाजवळ ते दोघे आले त्यावेळीं लक्ष्मण कपिलाच्या दृष्टीस पडला. कपिल घाबरला. त्याचें शरीर थरथर कांपू लागलें व तो तेथून आपल्या पत्नीला सोडून पळू लागला असतां "ब्राह्मणा, भिऊ नकोस. तूं खुशाल ये. मी तुला मारणार नाहीं. असें आश्वासन मिळाल्यावर तो आपल्या पत्नीसह रामचंद्राकडे आला. रामचन्द्राला पुष्पांजलि अर्पून 'स्वस्त्यस्तु' असा आशीर्वाद दिला. रामचन्द्रांनीं दिलेल्या आसनावर ते दोघे बसले. नन्तर रामचन्द्रांनीं 'कपिला, पूर्वी आमचा अपमान केलास व आज आमची स्तुति करीत आहेस यावेळीं तुझ्या मनांत कोणती चिन्ता आहे सांग' असें म्हटलें.

'रामा तुझें महत्त्व पूर्वी भस्माच्छादित अग्निप्रमाणें कळलें नाहीं म्हणून मी अज्ञानानें तुझा अपमान केला. व आतां तूं महापुरुष आहेस, सद्गुणी आहेस असें समजलें म्हणून मी स्तुति करीत आहे.' 'हे श्रीराम, जगांत थंडीच्या दिवसांत सूर्याचा जसा लोक आदर करितात तसा धनवंतांचा आदर करितात. लोक धनवंताला मान देतात व निर्धनमित्राचाही त्याग करितात. कारण त्याच्यापासून स्वार्थलाभ होत नाहीं.' 'राजा रामचन्द्रा, पण जें न्यायानें मिळविलें जातें त्यालाच धन म्हणावें. ज्यांत दयागुण आहे त्यालाच धर्म म्हणावें.' मद्य मांस व मधाचा जींत त्याग आहे तीच दया होय. पुनः दुसरें असें पाहा कीं, लोकांचे स्वभाव विचित्र असतात म्हणून वन्द्यहि सज्जन अपमानित होत असतात. राजन्, तूं वन्द्य असतांही माझ्याकडून अपमानित झालास याला मी एक उदाहरण सांगतो.

सनत्कुमारचक्रवर्ती अत्यंत सुन्दर होता. त्याचें रूप पाहण्यासाठीं स्वर्गाहून देवहि येत असत. पण त्यानें मुनिपद धारण केल्यावर त्याचा दुर्जनांनीं पुष्कळ वेळां अपमान केला. त्याला पुष्कळ वेळां आहारही मिळाला नाहीं.

भाजीपाला विकून पोट भरणाऱ्या एका श्राविकेनें नवधा भक्तीनें आदर करून आहार दिला तेव्हां तिच्या घरांत देवांनीं पंचाश्चर्य वृष्टि केली.

राजन्, मी पूर्वी निर्भाग्य उद्धत होतो म्हणून तुझा अपमान मी केला. हा अपराध मजकडून घडला आहे. व हें शल्य माझ्या मनाला सतत टोंचत राहील.

असें म्हणून तो कपिल ब्राह्मण व त्याची पत्नी दोघे रडूं लागली. तेव्हां उभयतांचें समाधान रामचन्द्र व सीता यांनीं केलें. यानंतर रामचन्द्रांनीं त्यांना स्नान करवून वस्त्रालंकारांनीं भूषित केलें. व पुष्कळ धनराशि दिला. उत्तम पक्वान्नांचें जेवण घालून त्यांनें त्या दंपतीला घरीं पाठविलें.

कपिल ब्राह्मण श्रीमंत झाला. जैनधर्माप्रमाणें वागूं लागला. इतर ब्राह्मणांनींही जैनधर्म धारण केला. कांहीं कालपर्यन्त ऐश्वर्याचा उपभोग घेऊन कपिल विरक्त झाला. आपलें सर्व वैभव त्यानें पुत्रासह भार्येच्या आधीन केलें. व आनन्दमति मुनीच्या शिष्याजवळ त्यानें दीक्षा घेतली. उत्तम चारित्र पाळून तो आत्मध्यानांत तत्पर झाला. त्यानें गुण व शीलांची प्राप्ति करून घेतली.

याप्रमाणें हें कपिलमुनीश्वराचें चरित जे जिनभक्त भव्य वाचतील किंवा ऐकतील त्यांना सहस्रउपवासांचें फल मिळेल. हें कपिलचरित्र वाचल्यानें पाठकांच्या व श्रोत्यांच्या मनांत विवेक उत्पन्न होईल. मिथ्यात्वाचा त्याग होऊन सम्यग्दर्शन व अणुव्रतें ग्रहण करण्यास ते उद्युक्त होतील. त्यामुळें त्यांचें आत्महित अवश्य होईल.

# छत्तिसावें पर्व.

[ कपिल ब्राह्मण रामादिकांचा अपमान करितो. ]

देव जसें नन्दनवनिं विहार करितात हृष्टहृदयानें ।
तैसें त्रिक हें विहरे शैल-सरोवर-वनीं विनोदानें ॥ १ ॥

अतिशय सुन्दर ऐशा आले देशांत मदनसुन्दर हे ।
तापी जेथें वाहे कलनादें[1] जी जनास जणु वाहे ॥ २ ॥

तेथून पुढें आले एका निर्जल वनांत ज्यावेळीं ।
मार्गश्रम वहु झाला सीतेच्या शोषं[2] फार होय गळीं ॥ ३ ॥

भवशतपीडित इच्छी भव्य जसा श्रीजिनेश-धर्मास ।
तीव्रतृषाकुल[3] इच्छी नाथा मम जीव शीतनीरास ॥ ४ ॥

यापरि बोलुनि वसली सीता एका विशालवृक्षतलीं ।
श्रीराम तिला वदले गे देवि ग्राम हा असे जवळीं ॥ ५ ॥

गावांत शीघ्र जाऊ तेथें प्याया मिळेल सुजल तुला ।
देवि श्रमपरिहारें होइल तव तोषपोषं[4] हृदयाला ॥ ६ ॥

यापरि हळु हळु आले तिच्यासवें अरुण नामक ग्रामीं ।
राहत होते जेथें शेतकरी विपुलसे धनस्वामी ॥ ७ ॥

राहत होता तेथें कोपिद्विज एक कपिल नांवाचा ।
बैसुनि तदग्निसदनीं करिति श्रम दूर अल्पसा साचा ॥ ८ ॥

तद्भार्येनें प्याया सीतेला शीत मधुर नीर दिलें ।
प्राशन करून तेव्हां हृदय तियेचें प्रसन्नसें झालें ॥ ९ ॥

इतुक्यांत द्विज आला शीर्षावरि काष्ठभार घेऊन ।
मन दावानल ज्याचें निघे मुखांतुनि कठोरसें वचन ॥ १० ॥

कोपें भाळीं चढल्या भुवया तो प्रश्न वायकोस करी ।
कां घेतलेस यांना दुष्टे! तूं बोल आंत गे स्वघरीं ॥ ११ ॥

---

१ मधुरशब्दांनीं. २ शुष्कता. ३ तीव्रतहानेनें दुःखी.
४ आनन्दाची पुष्टता.

ऐकुनि कठोर भाषा अनेक जमले तिथें चवेलोक ।
बान्धून टाकितों मी तुजला गोसम घरांत निःशङ्क[1] ॥ १२ ॥
निर्लज्ज धीट हे जन शिरून मम अग्निहोत्रगेहास ।
स्पर्शुनि अपूत[2] करिती मारुनि मी घालवीन सर्वास ॥ १३ ॥
ऐकुनि सीता वदली श्रीरामा आर्यपुत्र या गेहीं ।
येणें अपमानास्पद झालें खल हा दिसे मला गेही[3] ॥ १४ ॥
पुष्पफलांनीं भरल्या तरुनीं सुन्दर निवास विपिनांत ।
करणें बरें खलांच्या येणें योग्य न कदापि सदनांत ॥ १५ ॥
क्रीडा करिती जेथें मृग त्या वनि राहणें बरें वाटे ।
परि खलवचनें येथें विंधिति हृदयास तीव्र जणु कांटे ॥ १६ ॥

[ कोपानें लक्ष्मणानें ब्राह्मणाला पाय धरून गरगर फिरविलें व आपटून मारणार, तोंच रामचंद्रांनीं त्याला त्यापासून सोडविलें. ]

श्रीरामादिजनांचें अमरासमरूप बघुनि मुदित जन ।
वदले तुझ्या घरीं हे आले आहेत देव तूं जाण ॥ १७ ॥
तूं भाग्यवान् खरोखर असतां निन्दा करून कां त्यांची ।
हाकालुनि देशी ही रीति खलांची नसेचि सुजनांची ॥ १८ ॥
रागावुनि लोकावर त्यांची निर्भर्त्सना[4] तयें केली ।
अविवेकी चिडलेला वाही द्विज त्यास गालिलाखोली[5] ॥ १९ ॥
श्वान गजाला पाहुनि भुंके श्रीराघवादिकां द्विज तो ।
व्हा चालते घरांतुनि माझ्या अपशब्द तेंचि बडबडतो ॥ २० ॥
वाक्ताडनें[6] जहाला लक्ष्मण अतिकुपित तो धरी त्यास ।
गरगर फिरवी रामें रोधियलें स्वानुजास[7] अदयास ॥ २१ ॥
हे लक्ष्मणा असे हा क्षुद्र ब्राह्मण जिवन्तसें प्रेत ।
मारुनि मिळेल याला काय बरें सोड सोड रे त्वरित ॥ २२ ॥
मुनि, विप्र, गाय, बालक, वृद्ध, स्त्री, पशु सदोष असतांही ।
शूरें नच मारावें ऐसें नीतिज्ञ बोलती पाही ॥ २३ ॥

---

१ निर्भयपणें. २ अपवित्र. ३ गृहस्थ. ४ निन्दा, खरडपट्टी. ५ शिव्या. ६ अपशब्दांच्या मारानें. ७ आपल्या धाकट्या भावास– लक्ष्मणाला.

ऐसें बोलुनि विप्रा सोडविलें राघवें दयालुपणें ।
त्यागुनि विप्रकुटीरा[1] निघती त्रय ते तिथून धैर्यमनें ॥ २४ ॥

[ दुर्जनापासून दूर राहणें हिताचें आहे. ]

संसर्ग हा खलांचा दुर्वाक्यश्रवण-हेतु[2] होऊन ।
विकृति मनीं तो करितो त्यजिति महापुरुष निश्चयें जाण ॥ २५ ॥
झाडाखालीं दुर्गम वनांत करणें निवास योग्य असे ।
सोडुनि सर्व परिग्रह विहार करण्यांत पूज्यताचि वसे ॥ २६ ॥
परगृहिं अपमानानें कदापि राहूं नये महापुरुषें ।
आहार त्यागुनि वनिं मरणें हें श्रेष्ठ सर्वथैव असे ॥ २७ ॥
पर्वतगुहेंत राहूं नदीतटीं स्वैरसा विहार करूं ।
खलगृहिं निवास न करूं मानून मनांत मोद विपिनिं मरूं ॥ २८ ॥
ऐसा करून निश्चय हृदयीं त्यजिला त्रिकें खलग्राम ।
वनमार्गाचा आश्रय केला झाला नि तोचि सुखधाम ॥ २९ ॥
आकाश कृष्ण झालें जलदें घनकाल जाहला प्राप्त ।
वदलें स्वगर्जनें नभ राहा सज्जन तुम्ही स्वसदनांत ॥ ३० ॥
पाऊस पडुनि भिजले सीता सौमित्रि राम विपिनांत ।
केला वटवृक्षाच्या तळीं तिघांनीं निवास दिनरात ॥ ३१ ॥
त्या वृक्षावरि राहत होता इभकर्ण नाम गणदेव ।
तो तत्तेजें भ्याला स्वस्वामिसमीप कळवि निजभाव ॥ ३२ ॥
नाथा, आले कोणी स्वर्गाहुनि सुर मदीयवासास ।
तेज तयांचें भिववी आलों मी सर्व हें कथायास ॥ ३३ ॥
ऐकुनि इभकर्णाचें भाषण आलें विनायकास हसें ।
तो सुर निजदेवीसह येतां वटतरुसमीप त्यास दिसे ॥ ३४ ॥
श्रीरामचन्द्र लक्ष्मण सीता हें त्रिक बघून मोद मनीं ।
वत्सलता ही उपजे अवधीनें[3] सर्ववृत्त तो जाणी ॥ ३५ ॥

( विनायकसुरानें राम व लक्ष्मणासाठीं विशाल नगररचना केली. )

हे रामचन्द्र लक्ष्मण बलनारायणपदांत आहेत ।
यांच्यासाठीं रचिली पुरी तयें जी विशाल सौधयुत ॥ ३६ ॥

---

१ ब्राह्मणाच्या झोपडीला. २ मनाला घरें पाडणारीं वाक्यें ऐकण्यास कारण होऊन. ३ अवधिनामक ज्ञानानें.

प्रातःकालीं त्यांना प्रभातगायनरवास ऐकून ।
झाला प्रबोध[1] दिसलें अपुलें सौधांत जाहलें शयन ॥ ३७ ॥
मणिमयमञ्चक[2] दिसला बहुभूमिक[3] रम्य सौध तेजाळ ।
आज्ञाधारक सेवक तथापि चित्ता न वाटलें नवल ॥ ३८ ॥
वैभवशाली नगरीं हर्षे अमरासमान राहियले ।
यक्षें या नगरीचें ' रामपुरी ' हें सुनाम ठेवियलें ॥ ३९ ॥
मन्त्री, शूर शिपायी, हय, गज, पुरजन जसे अयोध्येंत ।
होते तैसेंच इथें अन्तर जाणू शके न नरचित्त ॥ ४० ॥
इकडे तो कपिलद्विज घेऊन विळा वनस्थलीं गेला ।
समिधेसाठीं फिरतां पाही तो रम्य रामनगरीला ॥ ४१ ॥
नानाविध रंगाची ध्वजावली वायुनें सदा फडके ।
ऐसे अनेक दिसती सौध इथें नगर या स्थलांत निके ॥ ४२ ॥
आहे बहु मध्यस्थलिं कैलासासम अतीव उत्तुंग ।
प्रासाद छत्र ज्यावरि शोभे रम्यध्वजें नि धवलाङ्ग[4] ॥ ४३ ॥
पूर्वी येथें होता तृणभक्षण करित फिरत हरिणगण ।
दर्भ नि समिधा घेउनि जात असे मी अनेकदा इथुन ॥ ४४ ॥
नानाविध-रत्नांची कान्ति जयांतून निघुनि नभ शोभे ।
ऐसे प्रासाद इथें दिसती नयनास सर्वदैव उभे ॥ ४५ ॥
रम्य जलें भरलेलीं सरोवरें शोभतीं इथें बहुत ।
उद्यानें तरुवल्लीशोभित वाहे सुगन्धसा वात ॥ ४६ ॥
हें सर्व इथें पूर्वी नगरीवैभव न पाहिलें नयनें ।
परि आज दिसत आहे जनता येथें उदार बहुत धनें ॥ ४७ ॥
हत्ती, घोडे, गायी, म्हशी इथें विपुल आज दिसतात ।
घण्टादिकवाद्यांनीं दहा दिशा बधिर नित्य होतात ॥ ४८ ॥
नगरी ही स्वर्गाहुनि येथें अवतीर्ण जाहली काय ? ।
किंवा पातालांतुनि विस्मय माझ्या मनास बहु होय ॥ ४९ ॥
किंवा सत्पुरुषाच्या शुभकर्माच्या विशाल उदयानें ।
रचना ही नगराची झाली चिन्तन असे मदीय मनें ॥ ५० ॥

---

१ जाग्रतावस्था. २ रत्नखचित पलङ्ग. ३ अनेक मजल्यांचा.
४ शुभ्र अवयवांचा.

मी स्वप्न पाहतों हें किंवा माया[1] असे सुराची ही ।
गन्धर्व नगर किंवा पित्तोद्रेकें असे दिसे कांहीं ॥ ५१ ॥
इतुक्यांत एक नारी नानालङ्कारधारिणी दिसली ।
जाऊन जवळ विप्रें विचारिलें कोण ही पुरी कसली ॥ ५२ ॥
( देवाङ्गनेनें नगरी कोणाची या प्रश्नाचें सविस्तर उत्तर दिलें.)
ही नगरी रामाची लक्ष्मण ज्या विक्रमी असे भ्राता ।
भार्या असे जयाला रूपखनी शीलधारिणी सीता ॥ ५३ ॥
जी पूर्व वेस आहे या नगरीची तिच्यासमीप असे ।
श्रीजिनमन्दिर सुन्दर जें मन्दरगिरिसमान उंच दिसे ॥ ५४ ॥
इन्द्र जयांना वंदिति अशा जिनांच्या अनेक आहेत ।
प्रतिमा शान्ति जयांची मोक्षाचा मार्ग दाविते सतत ॥ ५५ ॥
जो सामायिक मानव करून करि नमन जिनवरा भावें ।
श्रद्धा जिनपदिं ठेवी प्रवेश तो या पुरीमध्ये पावें ॥ ५६ ॥
धारण अणुव्रता जो करि गुणशीलास पाळितो त्यास ।
श्रीरामभूप देई इच्छित तो होय आदरावास[2] ॥ ५७ ॥
अमृतासमान ऐकुनि वचन तिचें मोद होय विप्रास ।
प्रेमें सांगितलें मज धनलाभाच्या हिनें उपायास ॥ ५८ ॥
चारित्रशूर नामक मुनिवर्यांच्या पदास वन्दून ।
वदला उपासकाच्या आचारांचें गुरो, करा कथन ॥ ५९ ॥
ठेवुनि मनीं धनाशा सद्धर्माचें स्वरूप तो ऐके ।
परिणामशुद्धि होतां जाणी परमार्थरूप जें न सुकें ॥ ६० ॥
नाथा, समजे मजला सद्धर्माचें यथार्थ जें रूप ।
तव सदुपदेश ऐकुनि समजें मज पुण्य आणि जें पाप ॥ ६१ ॥
तृषितास जल मिळावें छाया तप्तास जेवि लाभावी ।
जिनशासन मज लाभे अधमा दुर्लभ सुमुक्तिसौख्या वी ॥ ६२ ॥
क्षुधिता अन्न मिळावें रोग्या उत्कृष्ट अगद[3] लाभावें ।
जिनधर्म लाभला मज जातो मी त्यास शरण सद्भावें ॥ ६३ ॥
कुपथास लागलेल्या मनुजाला जेवि सुपथ लाभावा ।
बुडत्यास सागरामधिं नावेचा लाभ सन्मुने व्हावा ॥ ६४ ॥

---

१ विक्रिया– इन्द्रजाल. २ आदराचें स्थान. ३ औषध.

लाभे मुनीश्वरा मज सुकृपा तुमची अपूर्वसुकृतानें ।
मी आज धन्य झालों जिनधर्माच्या अनन्य-लाभानें ॥ ६५ ॥
हे सन्मुने त्रिलोकीं तुजसम नाहीं दुजा मला वाटे ।
त्वद्दर्शित[1] या मार्गी पीडित करिति न जनास भवकांटे[2] ॥ ६६ ॥
यापरि बोलुनि वन्दन करून चारित्रशूरचरणास ।
करुनि प्रदक्षिणात्रय गेला द्विज तो स्वकीय-सदनास ॥ ६७ ॥
आनन्दानें वदला भार्येला मी प्रिये महाश्चर्य ।
गुरुवदनें ऐकियलें तें तुजला सुखद सांगतो कार्य ॥ ६८ ॥
तें ऐकिलें तुझ्या नच तातें अथवा न ताततातानें ।
कथनाधिक्य कशाला न ऐकिलें आद्यवंशपुरुषानें ॥ ६९ ॥
हें आर्ये पाहियलें जें अद्भुत मी वनांत नयनांनीं ।
सुगुरूच्या उपदेशें विस्मय त्याचा न वाटला स्वमनीं ॥ ७० ॥
हे नाथ, मला सांगा जें अद्भुत पाहिलें नि ऐकियलें ।
विनयें विचारिते मी सांगा आश्चर्य जें तुम्हा दिसलें ॥ ७१ ॥

( कपिल आपल्या पत्नीला जिनधर्माचें स्वरूप सांगतो. )

समिधा आणायास्तव गेलों मीं काननीं मला दिसली ।
नगरी निजशोभेनें स्वर्गपुरीलाहि हसत असलेली ॥ ७२ ॥
त्या नगरीच्या संनिध होती नारी उभी बघून तिला ।
वदलों पुरी कुणाची बाई गे सांग सत्य वृत्त मला ॥ ७३ ॥
वदली ती रामाची देतो तो श्रावकास राम धन ।
ऐकून तिच्या वचना प्रमोद पावे तदा मदीय[3]-मन ॥ ७४ ॥
नन्तर गेलों एका मुनिसंनिध मी विचारिलें त्यास ।
धर्मस्वरूप सांगा झालों तुमचा अनन्य मी दास ॥ ७५ ॥
ऐकुनि जिनधर्माचें स्वरूप मिथ्यात्वतप्त मम जीव ।
सन्तुष्ट शान्त झाला श्रीजिनधर्मांत रंगला भाव ॥ ७६ ॥
अवलम्बून जयाला सर्व परिग्रह मुनीश सोडून ।
मुक्त्यङ्गनाभिलाषा धरून करितात सुतप बहु गहन ॥ ७७ ॥
अर्हद्धर्म मिळाला मला महानिधिसम प्रिये आज ।
जिनधर्मबाह्य हे जन सङ्क्लेशें दुःख भोगिती सहज ॥ ७८ ॥

---

१ तूं दाखविलेल्या. २ संसार-रूपकांटे. ३ माझें.

मुनिकथित धर्म सगळा त्यानें अपुल्या प्रियेस सांगितला ।
स्वीकारिला तियेनें उभयांचा त्यांत जीव बहु रमला ॥ ७९ ॥
विषफल इच्छी त्याला मिळे रसायन शरीरहितकारी ।
दैवनियोगें आम्हां अर्हद्धर्मांत होय सुरुचि वरी ॥ ८० ॥
कोणी अज्ञानी जन करगत रत्नास देइ फेकून ।
आम्ही जैनमुनींचा केला पूर्वी अतीव अपमान ॥ ८१ ॥
उपवासखिन्न ऐशा नग्न मुनींना निषेधिलें आम्ही ।
भोजनसमयीं इतरा आहार दिला असें घडे मोहीं ॥ ८२ ॥
सर्व सुरासुर वन्दिति जिनेश्वरा त्यजुनि पूजिलें इतरां ।
मिथ्यात्वाविण लोकीं पीडाकारी असा न अरि दुसरा ॥ ८३ ॥
धर्म अहिंसा निर्मल सोडुनि हिंसेस हाय सेवियलें ।
अज्ञानानें आम्ही विषफल बालासमान भक्षियलें ॥ ८४ ॥
नृमणिद्वीपा[1] जाउनि विद्वन्निर्णीतधर्मरत्नास ।
त्यागुनि करांत धरिलें आम्ही मोहें कुधर्मकाचेस ॥ ८५ ॥
जिह्वालम्पट होउनि करिती भोजन दिवा नि रात्रींही ।
ऐशास अन्न देउनि पूजियलें अहह मोहलीला ही ॥ ८६ ॥
जो अन्न देत नाहीं प्राप्त सुपात्रास अतिथिकालांत ।
पूजुनि दुर्मतिमानव सुधर्म त्याच्या पडे न पदरांत ॥ ८७ ॥
नाहीं स्पृहा जयाला उत्सव तिथि वर्जिले जयें भ्रमणें ।
गृह वर्जिलें जयानें म्हटलें त्या अतिथि जैनवाणीनें ॥ ८८ ॥
पात्र जयाच्या नच करिं नसे परिग्रह जयास लवभरही ।
करपुट[2]भोजी तो मुनि तारी संसारसागरीं पाही ॥ ८९ ॥
निर्मोही निजदेहीं ज्यांच्या हृदयास लोभ न स्पर्शी ।
मुक्तिरमा त्या वरित्ये त्यांना म्हणतात सुजन परमर्षि ॥ ९० ॥
यापरि कथिलें कपिलें भार्येला सुस्वरूप सुगुरूचें ।
ती सद्दृष्टि जहाली झालें श्रद्धान तें तिचें साचें ॥ ९१ ॥
नेलें सद्गुरुसंनिध तिनें नमस्कार तत्पदा केला ।
घेई अणुव्रतें तीं हृदयास तिच्या प्रमोद बहु झाला ॥ ९२ ॥

---

१ मनुष्य हा रत्नद्वीप. २ हाताच्या ओंजळींत दिलेलें अन्न जेवणारा.

जिनशासनांत झाला अतिशय अनुरक्त कपिल पाहून ।
अत्यन्त द्वेपीही द्विज झाले तेधवा प्रशान्त मन ॥ ९३ ॥
मुनिसुव्रतनाथाचें अतिदृढ शासन मनांत चिन्तून ।
कांहीं सुबुद्धि विप्र श्रावक तैं बोलले असें वचन ॥ ९४ ॥
अभिमानानें झाली अमुची अतिताठ मान वर पाहे ।
कर्मभरें गुरु झालें मन प्रमादी[1] न तें हिता लाहे ॥ ९५ ॥
आम्हा जिनेन्द्रमत हें पूर्वी अज्ञात तेवि अप्राप्त ।
परि मोठ्या कष्टानें झालें आम्हास आज तें प्राप्त ॥ ९६ ॥
आहे जिनेन्द्रशासन निर्मल[2] हें ब्रह्म रहित मायेनें ।
हें शेंकडो भवांनीं लाभे आम्हां महासुदैवानें ॥ ९७ ॥
मन हें ऋत्विज आहे जणु शुक्लध्यान पेटला अग्नि ।
या कर्मरूपसमिधा भावघृतें भस्म करिति जैनमुनि ॥ ९८ ॥
यापरि करुनि विचारा मन झालें हें भवांत उद्विग्न ।
ऐसें सकल परिग्रहविरक्त ते द्विजचि जाहले श्रमण ॥ ९९ ॥
सागारधर्मतत्पर कपिलश्रावक वदे स्वभार्येस ।
जाऊ रामपुरीला पाहू या रामचन्द्र आर्यास ॥ १०० ॥

( कपिल पत्नीसह जिनमंदिरांत जातो. )

दारिद्र्यनाश करण्या उपाय याहुनि दिसे न अन्य मला ।
रामनृपाल मनामधिं दयार्द्र तत्कीर्ति शुभ्र विगतमला[2] ॥ १०१ ॥
गे ऊठ घे करण्डा पुष्पांचा बालकास मी स्कन्धीं[3] ।
घेतों ऐसें बोलुनि जाती ते हृदयिं धरुनि शुद्धा धी[4] ॥ १०२ ॥
असतां जात तयांना मार्गी अत्युग्र सर्प आढळले ।
दाढांनीं मुख भीतिद ज्यांचें वेताळ ते पथीं दिसले ॥ १०३ ॥
यापरि वस्तु भयंकर दिसल्या परि भीतिनें न हृदय चळे ।
स्तुति ते जिनेश्वराची करिति जियें भीति दूर शीघ्र पळे ॥ १०४ ॥
“ त्रैलोक्यवन्द्य देवा मन-वच-कायें जिना नमस्कार ।
भवपङ्क[5] तरुनि गेले भक्तजना मुक्तिसौख्य दातार ” ॥ १०५ ॥

---

१ अज्ञानी, असावध. २ दोषरहित. ३ खांद्यावर. ४ निर्मलबुद्धि. ५ संसाररूपी चिखल.

स्तुति यापरि ते करिती पाहुनि जिनभक्ति थोर ते त्यांची ।
यक्ष प्रशान्त झाले निर्भयशी होय वृत्ति सुजनांची ॥ १०६ ॥

( दोघे जिनस्तुति करितात. )

जिनमंदिरांत करिती प्रवेश 'निसही' त्रिवार बोलून ।
देती प्रदक्षिणा ते जन्मजरामरण करिति ज्या चूर्ण ॥ १०७ ॥
"दुर्गतिदुःखा प्रसवे ऐसा लौकिक कुमार्ग सोडून ।
चिरकालानें आलों जिनेश्वरा आज मी तुला शरण" ॥ १०८ ॥
"जे चोवीस जिनेश्वर झाले भरतांत भूतकाळांत ।
होतील पुढें त्यांना नमितों जोडून दोन मी हात" ॥ १०९ ॥
"उत्सर्पिण्यवसर्पिणिकालीं जे भूत भावि तीर्थकर ।
झाले होतिल त्यांना माझा आहे सदा नमस्कार" ॥ ११० ॥
"भरत नि ऐरावत जीं क्षेत्रें आहेत पांच पांच अशीं ।
तेथील जिनवरांना वन्दन माझें करून चित्त वशी" ॥ १११ ॥
"पंच विदेहक्षेत्रीं जे असती विहरमाण तीर्थकर ।
त्यांना वन्दन करितों अनन्त ज्यांच्यांत सुगुणभाण्डार" ॥ ११२ ॥
"संसारसमुद्रांतुनि नेती तारून सकल भव्यास ।
त्या सर्व मी जिनांना नमितों जे सकल सद्गुणावास" ॥ ११३ ॥
"श्रीमुनिसुव्रतनाथा भगवन्ता वन्दना असे माझी ।
निर्मलशासन ज्याचें भक्ति वसो तत्पदांत मम साची" ॥ ११४ ॥
यापरि करुनि स्तुति ते उभयहि भावें जिनास वन्दून ।
यक्षानुज्ञा घेउनि निघती रामा बघावया सुजन ॥ ११५ ॥

( लक्ष्मणास पाहून पळणारा कपिल त्याच्या आश्वासनवचनानें परत येतो. )

मार्गी अनेक सुन्दर वाडे पत्नीस दाखवीत निघे ।
श्रीराम-प्रासादीं येउनि तो लक्ष्मणास सुज्ञ बघे ॥ ११६ ॥
थर थर कम्प तनूला सुटला शब्द न निघे मुखांतून ।
स्तम्भित जणु पद झाले भीतीनें वदन जाहलें म्लान ॥ ११७ ॥
नाना-कटुशब्दांनीं केलें नी व्यथित चित्त बहु यांचें ।
फल त्याचें यासमयीं मिळेल वाटे असें मना साचें ॥ ११८ ॥

---

१ खिळलेले.

आतां काय करूं मी कोठें जाऊं कुठें लपूं नुमजे ।
रक्षक कोण इथें मज हें चिन्ताबीज तन्मनांत रुजे[1] ॥ ११९ ॥
पाहुनि मजला जर हा कपिल ब्राह्मण म्हणून जाणील ।
क्रोधी बनून माझें तत्काल प्राणहरण हा करिल ॥ १२० ॥
यापरि विचार येतां हृदयीं तो ब्राह्मणीस सोडून ।
धांवत सुटला असतां लक्ष्मण त्याच्याकडे बघे वळुन ॥ १२१ ॥
वदला विप्रा, भय नच येथें जाऊं नकोस रे पळुन ।
विश्वासुनि तो ब्राह्मण आला तेथें पुनःहि परतून ॥ १२२ ॥
तो शुभ्रवस्त्रधारी निर्भय होऊन जवळ जाऊन ।
पुष्पाञ्जलीस अर्पुनि वदला 'स्वस्त्यस्तु' मधुरसें वचन ॥ १२३ ॥
निजपत्नीसह बसला जें आसन त्या दिलें बसायास ।
श्रीराम-लक्ष्मणांना स्तविलें त्यानें धरून विनयास ॥ १२४ ॥
श्रीराम त्यास वदला अमुचा अपमान करुन कां आतां ।
करिशी आदर वद वा तव हृदयीं कोणती वसे चिन्ता ॥ १२५ ॥
रामा महिमा आहे गुप्त तुझा तेधवा न हें कळलें ।
भस्माच्छादित विस्तव मोहें[2] तैसें अकार्य वा घडलें ॥ १२६ ॥
(जग धनाची पूजा करितें ज्ञानाची नाहीं किंवा सदाचाराचीही नाहीं.)
हे श्रीरामा नाथा धनवान् नर पूजिला जगीं[3] जातो ।
जैसें हिमकालामधिं सूर्याला सकल मर्त्य आदरितो ॥ १२७ ॥
जो धनवान् नर त्याला मानिति जन देव निर्धना सुहृदा[4] ।
त्यजिती त्याच्यापासुनि होतो न स्वार्थलाभ जाण कदा ॥ १२८ ॥
ज्याच्या जवळ असे धन टिमकी त्याचीच मित्र वाजविती ।
बान्धव तयास असती पुरुष नि पंडित तयास जन वदती ॥ १२९ ॥
अधना कोण पुसेना मित्र सहोदरहि त्यास त्यजितात ।
परि धनिकाचे इतरहि होऊन स्वजन मान देतात ॥ १३० ॥
त्यालाचि धन वदावें धर्में न्यायेंचि मिळविलें आहे ।
धर्महि तोच वदावा प्राणिदया ज्यांत वर्णिली पाहे ॥ १३१ ॥
निर्मल दया तियेला वदती जी मांसभक्षणें रहित ।
जी मद्यपानविरहित मधुसेवन[5] जींत जाहलें त्यक्त ॥ १३२ ॥

---

१ अंकुरलें. २ अजाणपणानें. ३ माणूस. ४ मित्रीला. ५ मध.

राजन् प्रकृति नरांच्या विचित्र असतात हें मनीं आण ।
यास्तव वन्द्यहि सज्जन अपमानित होति वदति मुनि जैन ॥ १३३ ॥
तूं वन्द्य असुनि राजन्, अपमानित जाहलास मजकडुन ।
पूर्वोदाहरणा मी कथितों तूं ऐक शान्त करुनि मन ॥ १३४ ॥

( सनत्कुमार चक्रवर्तीचें उदाहरण कपिल ब्राह्मण सांगतो.)

होउनि गेला पूर्वी चक्रेश सनत्कुमार नांवाचा ।
ज्याचें रूप बघाया येत असे सुर-समूह ही साचा ॥ १३५ ॥
मुनिपद धारण केलें असतां अपमान दुर्जनें केला ।
आचारज्ञा त्याला आहारहि लाभला न बहुवेळां ॥ १३६ ॥
भाजी विकून होती करीत उपजीविका[2] अशी कोणी ।
स्त्री श्राविका तियेनें आहार दिला समादरा करुनि ॥ १३७ ॥
आश्चर्यपञ्चकाची वृष्टि तिच्या सदनिं जाहली थोर ।
अपमान करिति दुर्जन करिती सम्मान सुज्ञ सुजन नर ॥ १३८ ॥
निर्भाग्य नि उद्धत मी केला अपमान तेधवा तुमचा ।
अद्यापि चित्त जळतें मी मदभिप्राय सांगतों साचा ॥ १३९ ॥
यापरि बोलुनि तो द्विज पश्चात्तापें रडे तदा द्रवला ।
श्रीराम जानकीही द्विजास वदले नि ती सुशर्मेला ॥ १४० ॥

( रामचन्द्र कपिलाचा शोक नाहींसा करितात व वस्त्रालंकारांनीं
दंपतीचा आदर करून धनराशि देतात. )

विप्रा, नको रडूं बा परिचय नसल्यामुळें असें घडलें ।
आहेस तूं विवेकी चरित तुझें सर्वथा असेचि भलें ॥ १४१ ॥
यापरि सान्त्वन त्याचें करून अपुल्या अनेकभृत्यांनीं ।
त्या विप्रदम्पतीला घाली तो स्नान कनककलशांनीं ॥ १४२ ॥
नानाविध पक्वान्नें प्रीतीनें वाढवून तोषविलें ।
वस्त्रें रत्नाभरणें उभयास तयें अतीव शोभविलें ॥ १४३ ॥
नन्तर पुष्कळ देउनि धनराशि तया स्वकीय सदनास ।
पाठविलें श्रीरामें प्रकटविलें वत्सल[3]स्वभावास ॥ १४४ ॥

१ स्वभाव. २ पोट भरणें. ३ प्रेमळपणास.

विस्मित करिती लोकां ऐशा भोगोपभोग-वस्तूंनीं ।
श्रीमन्त कपिल झाला तथापि वाहे सशल्यताचि मनीं ॥ १४५ ॥
तो कपिल विद्ध झाला सन्मानशरें नि चावले त्यास ।
गुणसर्प त्यामुळें तो हृदयामधिं जाहला बहूदास ॥ १४६ ॥
लाभे कुबेरवैभव मजला श्रीरामनृपतिकरुणेनें ।
परि मी असे दुरात्मा झालों दुःखी न रामचिन्तेनें ॥ १४७ ॥
मी झोपडींत होतो राहत रन्ध्रें असंख्य होति जिला ।
काकमलें मलिना जी शेणाचा स्पर्शही नसे झाला ॥ १४८ ॥
रामप्रसाद होतां प्रासादीं राहिलों सुखें आज ।
धेनुसहस्रें शोभित भासे येथें उणें न कांहिं मज ॥ १४९ ॥
परि मी त्या भ्रातृयुगा दोपाविण परुषवचन बोलून ।
अपमानित बहु केलें जाइ न तें शल्य मन्मनांतून ॥ १५० ॥
कडक उन्हानें पीडित ध्याया विश्रान्ति मद्‌गृहीं आले ।
सीतादेवीसह परि हा ! मी वाक्‌ताडनें तया छळिलें ॥ १५१ ॥
तें शल्य शिरुनि माझ्या हृदयाला घोर वेदना देतें ।
तोवरि राहिल जोवरि मुनिदीक्षालाभ जाहला नच तें ॥ १५२ ॥
( कपिल विरक्त होऊन आनन्दमति मुनीच्या शिष्याजवळ दीक्षा घेतो.)
वैराग्यवृत्ति जाणुनि आला धांवून आप्त-परिवार ।
डोळ्यांत अश्रु आणुनि करिती त्याचा तदा प्रतीकार ॥ १५३ ॥
तो मग्न शोकसागरिं बघुनि शिवोत्सुक वदे तया कपिल ।
हा शोक सज्जनांनों आर्तध्यानास होतसे मूल ॥ १५४ ॥
ज्याच्या मनोरथांच्या उंच उड्या स्वजन ! बघुनि मूढजन ।
फसती तत्स्नेहामधिं त्याचें कुगतींत होतसे भ्रमण ॥ १५५ ॥
भार्या मूर्च्छित बघुनिहि भवभयधारी त्यजून तो जाय ।
त्यागून बन्धुलोकां दीक्षेची पाहिली तयें सोय ॥ १५६ ॥
शुभ्र हजारों गायी धनधान्यसमृद्धसें महासदन ।
दासी दासां त्यागुनि करि निःस्पृह तो वनाकडे गमन ॥ १५७ ॥

१ श्रीरामाचा मी अपमान केला या विचाराचा काटा. २ अतिशय खिन्न. ३ हजारो गायींनीं शोभलेला. ४ राम व लक्ष्मण या दोन भावांना. ५ कठोर शब्द. ६ निंद्य भाषणानें ताडन करून. ७ मोक्षप्राप्ति करून घेण्यांत उत्कंठित.

सर्वस्वासह तनया तो भार्याधीन करुनि वनिं गेला ।
आनन्दमतिमुनीच्या शिष्यासंनिध महाव्रती झाला ॥ १५८ ॥
निजगुरुसंनिध राहुनि पाळी चारित्र कपिलमुनि थोर ।
आत्मध्यानीं तत्पर करि गुणशीलार्णवांत सुविहार ॥ १५९ ॥
यापरि कपिलमुनीचें चरित्र जिनदास नम्र वाचेल ।
ऐकेल वा तयाला उपवाससहस्रसुफल लाभेल ॥ १६० ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे कपिलोपाख्यानं नाम षट्त्रिंशत्तमं पर्व ॥ ३६ ॥

## सदतीसाव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

जेव्हां वर्षाऋतु संपला तेव्हां रामचन्द्र, सीता व लक्ष्मणासह रामपुरीहून पुढें जाण्यास सज्ज झाले तेव्हां यक्षानें "प्रभो, आजपर्यन्त आपली सेवा केली तिच्यांत कांहीं चूक झाली असेल तर आपण मला क्षमा करावी. आपणाशीं बोलतांना मजकडून कांहीं मर्यादातिक्रम झाला असल्यास त्याविषयींही मी आपली क्षमा मागतो" असें म्हटलें.

प्रभु रामचन्द्र म्हणाले– 'यक्षा, तूं आमचा जो आदर केला आहेस त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. तुझ्या आदरानें आमचें मन प्रसन्न झालें आहे.'

यानंतर यक्षानें रामचन्द्रांना 'स्वयंप्रभ' नामक तेजस्वी रत्नहार दिला. लक्ष्मणाला सूर्यकिरणापेक्षाही अधिक तेजस्वी दोन रत्नकुण्डलें दिलीं. व सीतादेवीला अतिशय दैदीप्यमान चूडामणिबरोबर मधुर शब्द करणारी वीणा दिली. व सर्वांना नमस्कार करून तो यक्ष स्वस्थलीं गेला.

पुनः पूर्वीप्रमाणें हे तिघे विहार करीत अनेक नगर-ग्रामादिकांस उल्लंघून कांही दिवसांनीं विजयपुर नगराजवळ एका वनांत आले. तेव्हां याप्रमाणें घटना घडली.

विजयपुरच्या राजाचें नांव पृथ्वीधर, राणी इन्द्राणी व कन्या वनमाला. हीं अत्यन्त सुन्दर होती. हिनें लक्ष्मणाचे गुण, पराक्रम व रूपाचें वर्णन पुष्कळवेळां ऐकलें असल्यामुळें त्याच्याशींच माझा विवाह व्हावा असें तिला वाटत होतें. पण दशरथ राजानें भरताला राज्य दिलें व स्वतः दीक्षा घेऊन वनांत तो तप करण्यास निघून गेला. व रामचन्द्र, लक्ष्मण आणि सीता वनवासास निघून गेले. यामुळें तिला फारच वाईट वाटलें. पृथ्वीधर राजालाही आपल्या मुलीचें लग्न लक्ष्मणाबरोबरच व्हावें

असें वाटत असे. पण मध्येंच असा प्रसंग उद्भवल्यामुळें त्यानें 'इन्द्रपुरीच्या राजाच्या मुलाला ज्याचें नांव 'सुन्दर' हें होतें त्याला देण्याचा विचार केला. ही गोष्ट वनमालेला समजली. तेव्हां ती अगदींच खिन्न झाली. मी 'सुन्दर' राजपुत्राला वरणार नाहीं असा तिनें निश्चय केला. आतां जगण्यांत कांहीं रस नाहीं. आपण आत्महत्या करावी असें तिनें ठरविलें. व तिनें बापाला कळविलें कीं, 'बाबा, मला आज रात्रीं वनांत वनदेवीचें पूजन करावयास जावयाचें आहे आपण अनुमति द्यावी.' तिच्या वडिलानें संमति दिली. तिच्या रक्षणासाठीं कांहीं रक्षकही तिच्याबरोबर दिले. आपल्या कांहीं मैत्रिणीसह वनमाला वनांत गेली. तेथें वनदेवीची तिनें पूजा केली. यानंतर त्या वनांतच तिच्या मैत्रिणी व रक्षक हे निःशंकपणें झोपले असतां वनमाला तेथून त्या वनांत आत्महत्या करण्यासाठीं निघाली.

कर्मधर्मसंयोगानें त्याच दिवशीं सूर्यास्तसमयीं त्या वनांत रामचन्द्र, सीता व लक्ष्मण आले. व एका वडाच्या झाडाखालीं त्यांनीं निवास केला. लक्ष्मण त्या वनाचें सौंदर्य पाहण्यासाठीं निघाला होता. त्याला ही वनमाला दुरून दिसली. ही कन्या एकटी का आली असावी असा मनांत तो विचार करूं लागला. तिच्या शरीराच्या सुगन्धानें तो वनप्रदेश सुगंधित झालेला होता. दुरूनच त्यानें थोडेसें न्याहाळून पाहिलें तेव्हां तिच्या मुखावर खिन्नता पसरली आहे असें त्याला दिसलें. व ही राजकन्या आत्महत्या करण्यास वनांत आली असावी असें त्याला वाटू लागलें. तीही हळू हळू एका झाडाखालीं आली त्याच्या फांदीवर तिनें फासाची रचना केली. व नंतर ती 'हे वनदेवतांनो, आपणांस मी नमस्कार करते. जर या वनांत श्रीलक्ष्मण येतील तर त्यांना वनमालेनें आपणांतच मन अनुरक्त ठेवून आपली प्राप्ति याजन्मीं होणें शक्य नाहीं पण पुढच्या जन्मीं ती होवो असा अभिलाष ठेवून गळफासानें प्राण त्यागले असें सांगा' असें बोलून ती फांदीवर चढून फासा गळयाला लावणार इतक्यांत लक्ष्मणानें धांवत येऊन तिला मिठी मारली. 'हा मी लक्ष्मण आलों आहे पाहा' असें म्हणून तो फासा त्यानें तत्काल काढून घेतला. डोळे उघडून पाहिल्या-बरोबर तिला आढळून आलें कीं, ज्याचे रूपादिक जसें ऐकिले होते तसेंच यांच्या-ठिकाणीं दिसतात व हा लक्ष्मणच आहे अशी खात्री झाली.

इतक्यांत रामचन्द्रांनीं 'बाळा लक्ष्मणा' कोठें आहेस लौकर ये म्हणून हाक मारिली. तत्काल हा मी आलों असें म्हणून लक्ष्मण वनमालेसह पुढें येऊन उभा राहिला. सीतेनें हंसून आनन्दानें म्हटलें 'नाथ, हा पाहा रोहिणीसह चन्द्र आपल्या-

पुढें उभा राहिला आहे.' वनमालेनें लाजून बुरखा तोंडापुढें ओढून घेऊन रामचन्द्र व सीता यांच्या चरणांना नमस्कार केला. हें मधुर मीलन पाहून रामचन्द्रांना आनंद वाटला व ते तिघे रात्रीं मधुर कथा सांगत बसले.

इकडे कांहीं वेळानें वनमालेच्या मैत्रिणी जागृत झाल्या तोंच त्यांची दृष्टि वनमालेच्या शयनाकडे गेली. तें शून्य आहे असें पाहून त्या घाबरून रडू लागल्या. रक्षकवर्गही गडबडून उठला व इकडे तिकडे राजकन्येचा शोध करू लागला. कांहीं रक्षक रामचन्द्रादिक जेथें होते तेथें जाऊन पोहोंचले. त्यांना वनमाला सीतादेवीजवळ बसलेली दिसली. ते तेथून धांवतच राजाकडे गेले व राम, लक्ष्मण व सीता हे आपल्या नगराच्याजवळील वनांत आले आहेत आणि 'वनमाला राजे' सीतादेवी-जवळ बसल्या आहेत. ही वार्ता त्यांनीं सांगितली.

राजानें राणीला हें वृत्त सांगितलें. उभयतांना अत्यानन्द झाला. नंतर त्यांनीं प्रातःकालीं उत्तम वस्त्रें; अलंकार व पुष्पहार घेऊन रामचन्द्रादिकांकडे परिवारासह प्रयाण केलें. नाना प्रकारच्या वाद्यघोषासह जाऊन त्यांचा चांगला आदर केला. वनांतच स्नानभोजनादिक क्रिया करून त्यांना वाद्यें वाजवित विजयपुरांत आणिलें. अतिशय आदर करून त्यांना आपल्या मोठ्या प्रासादांत ठेवून घेतलें. त्यावेळीं जी घटना घडली तिचें वर्णन पुढील पर्वांत करूं.

# सदतीसावें पर्व.

[ वर्षाऋतूची समाप्ति, रामादिकाचें पुनः वनगमन व यक्षानें सर्वांचें केलेलें गौरव. ]

जेव्हां समाप्त झाला वर्षाऋतु रामचन्द्र तेथून ।
जायास सज्ज झाले येउनि यक्षेश[1] बोलला वचन ॥ १ ॥
स्वामिन्, आपण येथुनि जाया उद्युक्त जाहला आज ।
मजला क्षमा करावी चुकलें मजकडुनि कोणतें काज ॥ २ ॥
बोलत असतां कांहीं घडला माझ्याकडून जरि दोष ।
त्याची क्षमा करावी आपण आहा प्रभो क्षमाकोष ॥ ३ ॥
पीनभुजा[2] यक्षवरा, अमुचा आदर अपार जो केला ।
इतर तसा न शके करूं माझा आत्मा प्रसन्न वहु झाला ॥ ४ ॥
नन्तर यक्षें रामा दिला ' स्वयम्प्रभ ' अमूल्य मणिहार ।
श्रीलक्ष्मणास कुण्डलयुगल दिलें दिव्य सूर्यतुल्य करें[3] ॥ ५ ॥
पसरे कान्ति जयाची चूडामणि जानकीस देऊन ।
वीणाहि मधुरनादा नन्तर वन्दून यक्ष करि गमन ॥ ६ ॥
बलदेवहि त्यानन्तर सीतेसह लक्ष्मणास घेऊन ।
स्वच्छन्दानें विहरत गेले ग्रामादिकास लङ्घून ॥ ७ ॥
एके दिनिं ते आले विजयपुराजवळ अस्तसमयास ।
एका वटवृक्षतलीं केला होऊन मुदित आवास ॥ ८ ॥

[ विजयपुरेश पृथ्वीधर राजाची कन्या वनमाला लक्ष्मणाची प्राप्ति न झाल्यामुळें गलपाशानें प्राणत्याग करण्यास वनांत जाते. ]

राजा विजयपुराचा पृथ्वीधर जो प्रसिद्ध विमलयशें ।
इन्द्राणी त्या राणी निजरूपें जी रतीस सतत हसे ॥ ९ ॥
झाली तनया उभया वनमाला सुन्दरींत मुकुटमणि ।
लक्ष्मणगुणा नि रूपा ऐकुनि वहु मुदित होय ती तरुणी ॥ १० ॥

---

१ विनायक नामक देव. २ पुष्ट बाहु ज्याचे असा. ३ किरणांनें.

दशरथनृपाल भरता देउनि निजराज्य मुनि वनीं झाला ।
वचनावनार्थ लक्ष्मणसीतेसह रामही वनीं गेला ॥ ११ ॥
तेणें इन्द्रपुरीच्या नृपपुत्रा 'सुन्दरास' वनमाला ।
द्यावी ऐसा भूपें निश्चय पृथ्वीधरें मनीं केला ॥ १२ ॥
निजजनकाचा निर्णय वनमालेच्या मनास नच रुचला ।
स्वप्राणत्यागाचा विचार तन्मानसामध्यें सुचला ॥ १३ ॥
वस्त्र गळ्याला बान्धुनि वृक्षावरि चढुनि लोंबकळणें हा ।
सुन्दर मरणोपाय स्पर्श पराचा न उचित परि देहा ॥ १४ ॥
कांहीं तरि कार्याचें निमित्त काढुनि वनांत जाईन ।
आजचि विघ्नविवर्जित रात्रौ मरणास खचित सेवीन ॥ १५ ॥
अस्तास शीघ्र जाउनि रजनीला पाठवून दे रवे ।
करिते विज्ञप्ति अशी वन्दुनि बाला तुझ्या पदां भावें ॥ १६ ॥
जा रजनीला कळवी दुःखांतुनि मुक्त ही करी बाला ।
वर्षासम दिन वाटे आतां या जीवनांत रस नुरला ॥ १७ ॥
यापरि निर्णय हृदयीं करून उपवासयुक्त राहून ।
पित्रनुमोदें रात्रौ वनदेवीपूजनार्थ करि गमन ॥ १८ ॥
उत्तमरथांत बैसुनि सखीसवें वैभवें वनीं गेली ।
सीता-लक्ष्मण-रामें दैवें[1] भूषित वनस्थली[2] केली ॥ १९ ॥
वनदेवीचें पूजन वनमालेनें सखीसवें केलें ।
रक्षक आणि सखीजन रात्रौ निःशङ्कसुप्त[3] वनिं झाले ॥ २० ॥
ऐशासमयीं निर्भय वनमाला वनमृगीसमान[4] निघे ।
निःशब्दपदक्षेपणें[5] करीत मार्गे पुनः वळून बघे ॥ २१ ॥
मृदुलसमीरण वाहे वनमालादेहगन्ध तैं पसरे ।
परमसुगन्धित तेणें लक्ष्मण मोदें तया दिशेस सरे ॥ २२ ॥
असतां जात तयाला चन्द्रकलातुल्य रम्य मूर्ति दिसे ।
कोणी कुलीन कन्या विहरे लक्ष्मणमनांत तर्क वसे ॥ २३ ॥
दिसतें म्लान हिचें मुख शोकानें आत्मघात करण्यास ।
आली वनांत वाटे गुप्त बघावें तदीयचरितास ॥ २४ ॥

---

१ हे नशीब. २ वनाचा प्रदेश. ३ झोपले. ४ वनांतल्या हरिणीसारखी. ५ आवाज न होऊ देता पावलें टाकणें.

यापरि चिन्तुनि वटतरुखालीं निःशब्द गुप्त लपुनि वसे ।
आली तिथेच कन्या स्तननम्रा[1] चन्द्रतुल्य वदन दिसे ॥ २५ ॥
पाश तिनें वस्त्राचा करून म्हटलें अतीव मधुररवें[2] ।
वटतरुनिवासिनी ज्या सुदेवता नति तयास मम भावें ॥ २६ ॥
माझ्यावरी अनुग्रह करून लक्ष्मण कुमार येईल ।
जेव्हां वनस्थलीं या निरोप सांगा तया तुम्ही विमल ॥ २७ ॥
तव विरहें वनमाला वाला ठेवुनि तुझ्यांत सतत मन ।
पाशें वेष्टून गळा पावे या वटतरूवरी मरण ॥ २८ ॥
हें आम्ही करुणावह पाहियलें दृश्य लक्ष्मणा नयनें ।
या जन्मीं तूं पति नच अन्यभवीं हो अशी विनंति मनें ॥ २९ ॥

[ लक्ष्मण गलपाश काढून घेतो. ]

यापरि बोलुनि शाखेवरि ती पाशास अर्पि ज्या समयीं ।
प्रेमें लक्ष्मण तिजला अलिङ्गुनि आपुल्या धरी हृदयीं ॥ ३० ॥
वदला प्रिये गळ्याला लावित होतीस पाश कां वद गे ।
हा लक्ष्मण तुज सन्निध असे उभा पाहि त्यास अनुरागें ॥ ३१ ॥
यापरि बोलुनि लक्ष्मण काढुनि घेई गळ्यांतला पाश ।
अर्धोन्मीलितनयनें[3] पाही लक्ष्मणकुमार-रूपास ॥ ३२ ॥
जैसें रूप तयाचें श्रवणमनें[4] जाणिलें तसेंच दिसे ।
भेटे मजला दैवें ज्याच्या हृदयीं दया असाप वसे ॥ ३३ ॥
इतक्यांत राम जागृत होउनि नाहीं कुमार पाहून ।
होता येथें पूर्वी आतां केलें तयें कुठें गमन ॥ ३४ ॥
हाक तयाला मारा ऐसें सीता तया तदा बोले ।
कानीं पडतां ती तें उभयहि रामासमीप ते गेले ॥ ३५ ॥
झाला निशार्ध[5] तेव्हां आला उदयास चन्द्र अस्पष्ट ।
कमलसुगंधित वारा शीतल वाहे हरावया कष्ट ॥ ३६ ॥
पल्लवकोमल करयुग जोडुनि वस्त्रावृताङ्गि[6] वनमाला ।
श्रीराम नि सीतेच्या चरणद्वन्द्वीं करी प्रणामाला ॥ ३७ ॥

---

१ स्तनांनीं किंचित् वाकलेली. २ मधुर शब्दांनीं. ३ अर्धे उघडलेल्या डोळ्यांनीं. ४ कानांनीं व मनानें. ५ रात्रीचा अर्धा भाग. ६ वस्त्रानें झाकलें आहे अंग जिचें.

होउनि सलज्ज तेव्हां राहति रामासमीप उभय उभे ।
वदली सीता 'नाथा, चन्द्रासह रोहिणी इथें शोभे' ॥ ३८ ॥
सीता-रामांच्या मनिं जोडी पाहून मोद वहु झाला ।
गेली उडून निद्रा गोष्टींना वहर तेधवा आला ॥ ३९ ॥
इकडे वनमालेच्या जागृत होऊन मैत्रिणी वघती ।
शय्या वनमालेची शून्य दिसे त्रस्त होति त्या चित्तीं ॥ ४० ॥
डोळ्यांत अश्रु आले सर्व सखीवर्ग घावरून रडे ।
रक्षक होउनि जागे गेले हुडकावयास चोहिकडे ॥ ४१ ॥

[ रक्षकांनीं रामचंद्रादिक वनांत आले आहेत हें वृत्त पृथ्वीधरराजाला सांगितलें.]

कांहींना वनमाला, लक्ष्मण, सीता नि रामचन्द्र असे ।
दिसले वटवृक्षतळीं बोलत आहेत अमरमिथुन[1] जसे ॥ ४२ ॥
त्यांनीं जाउनि इतरां कथिलें गेले समस्त भूपास ।
पृथ्वीधरास वदले झाली नृप पूर्ण आज तव आसे[2] ॥ ४३ ॥
नाथा, यत्नावांचुनि निधि आला प्रगट आज नगरांत ।
मेघाविण गगनांतुनि झाली जलवृष्टि समज जनतांत[3] ॥ ४४ ॥
अथवा वीजावांचुनि उद्भवलें धान्य विविध शेतांत ।
जामाता[4] तव लक्ष्मण वनमालेसह समीप विपिनांत ॥ ४५ ॥
श्रीरामचन्द्र, सीता, इन्द्र तथा शचिसमान दिसतात ।
त्यांचें स्वागत करण्या निर्णय करि नृपति निजजनासहित ॥ ४६ ॥
आला विचार तन्मनिं झालें कल्याण आज तनयेचें ।
हृदयिं मनोरथ येतां झालें सम्प्राप्त सुफल मज साचें ॥ ४७ ॥
'जगिं सर्वंचि जीवांना इष्टसमागम नि सुधन सुकृतानें[5] ।
होतें प्राप्त जयानें सुख जें वर्णू शके न वचनानें' ॥ ४८ ॥
'जें इष्ट योजनांच्या शतान्तरीं दूर तेंहि तत्काल ।
पुण्येंचि पुण्यवन्ता मिळतें संशय तयांत निर्मूल' ॥ ४९ ॥
'जे पुण्यरहित मानव इष्ट[6] तयांच्या करांत जरि आलें ।
जातें पळून तेथुनि दुःखांचे सोशितात शतभाले' ॥ ५० ॥

---

१ देवांची जोडपीं. २ इच्छा. ३ हे लोकपिला. ४ जांवई. ५ पुण्यानें. ६ धनादिक आवडते पदार्थ.

'जे पुण्यवन्त असती पर्वतशिखरीं वनीं समुद्रांत ।
चौरारिसर्पमार्गीं लाभे त्या इष्ट वस्तु दिनरात' ॥ ५१ ॥
यापरि विचार हृदयीं करून भार्येस सर्व वृत्तान्त ।
उठवून भूप सांगे ज्याच्या मावे न तोष हृदयांत ॥ ५२ ॥
स्वप्नचि वाटे तिजला म्हणून निर्णय करून घ्यायास ।
वारंवार विचारी राणी पावून परमतोषास ॥ ५३ ॥
कळतां सत्य सुवार्ता झाली मूर्च्छित अतीव हर्षभरें ।
शीतोपचार करितां राणी ती सौख्यसागरांत शिरे ॥ ५४ ॥

[ राजा व राणी परिवारासह वनांत जाऊन रामचन्द्रादिकांना विजयपुरांत मोठ्या वैभवानें आणतात. ]

वसुनि गजावरि राजा सूर्योदयसमयिं सर्वपरिवारें ।
श्रीराम-लक्ष्मणांचें स्वागत करण्यास जाय हर्षभरें ॥ ५५ ॥
वनमालेची माता पुत्रासह वसुनि पालखींत निघे ।
मोदाश्रुपूर्ण-नयनें जाउनि वनिं जावयास शीघ्र वघे ॥ ५६ ॥
राजाज्ञेनें सुन्दर वस्त्रें अनुलेपनें नि सुमहार ।
घेऊन भृत्य गेले श्रीमद्रामादिकार्थ आहेर ॥ ५७ ॥
कमलप्रफुल्लवदना पाहुनि रामास भूप उतरून ।
गेला समीप झाला प्रमुदित रामादिकास भेटून ॥ ५८ ॥
राणी इन्द्राणी ही कुशलप्रश्ना करून सीतेस ।
भेटे हर्षें झाला उभयांच्या हृदयिं पूर्ण परितोष ॥ ५९ ॥
वीणामृदंगभेरी यांचा रव दशदिशांत दुमदुमला ।
जणु अन्योन्य दिशांनीं परस्परालाप आदरें केला ॥ ६० ॥
स्नानाशनादि[१] कार्यें झालीं तेथें वनांत सकलांचीं ।
नन्तर पुरगमनास्तव होय तयारी समस्त लोकांची ॥ ६१ ॥
श्रीरामचन्द्र लक्ष्मण सीता होऊन हे गजारूढ ।
आले नगरामध्यें प्रजाजनीं मोद जाहला प्रौढ ॥ ६२ ॥
पृथ्वीधरभूपानें वहुदिन ठेवून राजसदनांत ।
रामादिकास केला आदर तो सर्व वर्णनातीत ॥ ६३ ॥

१ स्नान-भोजन वगैरे.

यापरि महापुरुष हे पूर्वभवीं विपुलसुकृतसंचयनें[1] ।
होउनि वनवासी ही होति सुखी सत्यविक्रमादि-गुणें ॥ ६४ ॥
सूर्याचे कर जैसे स्फटिकाश्रय[2] लाभतां अतिस्फुरती ।
जिनदास पुण्यपुरुषा जाति तिथें होय सौख्यसंप्राप्ति ॥ ६५ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे वनमालाभिधानं नाम सप्तत्रिंशत्तमं पर्व ॥ ३७ ॥

१ विशालपुण्यसंचय केल्यानें. २ स्फटिकशिलेचा आधार.

# अडतीसाव्या पर्वांतील कथासार.

एके दिवशीं पृथ्वीधर राजाच्या सभागृहांत उच्च मंचकावर पृथ्वीधर राजा, रामचन्द्र, लक्ष्मण वगैरे बसले होते. त्यावेळीं तेथें एक दूत आला. त्यानें राजाला व राम-लक्ष्मणांना नमस्कार करून राजा पृथ्वीधराच्या हातांत एक पत्र दिलें. तें राजानें संधिविग्रह जाणणाऱ्या सचिवाच्या स्वाधीन केलें.

सचिवानें तें पूर्ण वाचलें. व राजापुढें त्यांतील अभिप्राय यथार्थ सांगितला. तो याप्रमाणें :— नंद्यावर्त नगरांत अतिवीर्य राजा राज्य करीत आहे. त्यानें आपल्या प्रजेला सुखी केलें आहे. त्याची आज्ञा सर्व राजे मानतात. त्यानें आपलें कुशल कळविलें असून हे महीधर राजन् तो आपलेंही कुशल इच्छित आहे.

यानंतर त्यानें आपणास आज्ञा केली आहे कीं, आपण आपलें सैन्य घेऊन त्याला मदत करण्यासाठीं यावें. कारण त्याचें भरताबरोबर युद्ध होणार आहे. अनेक देशांचे राजे त्याला मदत करण्यासाठीं सैन्यासह नंद्यावर्त नगराकडे आलेले आहेत.

पत्राचा अभिप्राय ऐकून राजा महीधर त्यावर कांहीं बोलला नाहीं. पण लक्ष्मणानें दूताला म्हटलें— दूता, भरताबरोबर युद्ध करण्याचा विचार तुझ्या राजानें कां केला आहे तो सांग बरें ? दूत म्हणाला अतिवीर्य राजाला अनेक राजे वश झाले आहेत. ते त्याची आज्ञा मानतात पण भरतराजा त्याची आज्ञा मानित नाहीं. यास्तव त्यानें ती मानावी म्हणून एक दूत राजा अतिवीर्यानें भरताकडे पाठविला. त्यानें अतिवीर्याचा अभिप्राय कळविल्याबरोबर शत्रुघ्नाला मोठा राग आला. व आम्ही त्याची आज्ञा मान्य करणार नाहीं व आम्ही त्याच्याबरोबर लढून त्याला परास्त करूं असें म्हणून दूताचा अपमान करून त्याला हाकालून दिलें. भरतालाही दूताच्या भाषणानें राग आला होताच.

नंतर भरत, शत्रुघ्न व प्रधानमंडळ यांनीं एकान्तस्थानीं विचार करून युद्ध करण्याचें ठरविलें. भरतानेंही अनेक राजांना पत्रें लिहून मदत करण्यास बोलाविलें आहे. मिथिलानगरच्या राजानें— कनकानें आपल्या सैनिकासह भरताला मदत केली आहे. सिंहोदर, वज्रकर्ण, रौद्रभूति वगैरे अनेक राजांचें सैन्य भरताकडे साहाय्यार्थ आलें आहे व या मोठ्या सैन्यासह राजा भरतानें नंद्यावर्त नगरीकडे प्रयाण केलें आहे.

आपल्या दूताचा अपमान करून त्याला हाकालून दिल्यामुळें अतिवीर्य राजाला अतिशय राग आला असून त्यानें भरताचा समाचार घेण्याचें ठरविलें आहे व त्याच्याकडेहि अनेक राजे सैन्यासह मदतीस आले आहेत.

हें सर्व ऐकून घेऊन रामचन्द्रांनीं महीधर राजाला नेत्रानें खुणाविलें. खुणेचा अभिप्राय जाणून राजानें दूताला सांगितलें कीं, दूता तुझ्या राजाच्या आज्ञेप्रमाणें आम्ही लौकरच युद्धांत मदत करण्यासाठीं येतो असें सांग व तूं आतां खुशाल परत जा.

राजा महीधरानें मदत करण्याचें कबूल केलें ही हकीकत दूतानें जाऊन राजाला कळविली. त्यामुळें राजा अतिवीर्य आनंदित झाला. दूत निघून गेल्यावर महीधर राजानें रामचन्द्राला सांगितलें कीं— रामचन्द्रा, मी माझ्या पुत्रासह व प्रधानमंडळासह तुला मदत करण्यास तयार आहे. असें आश्वासन मिळाल्याबरोबर रामचंद्र-लक्ष्मणांनीं महीधर राजाचें निवडक सैन्य व त्याचे पुत्र बरोबर घेऊन नंद्यावर्त नगराकडे प्रयाण केलें. कांहीं दिवसांनीं नगराजवळ पोचल्यावर मार्गांत त्यांनीं एके ठिकाणीं मुक्काम केला. व राम, लक्ष्मण व सीता तेथें विचार करूं लागले— त्यावेळीं सीतेनें म्हटलें कीं, नाथा सूर्य तळपत असतां नक्षत्रें पृथ्वीला प्रकाश देण्यास असमर्थ असतात तसें आपणापुढें मी माझा अभिप्राय सांगण्यास असमर्थ आहे. तथापि हिताच्या इच्छेनें दोन शब्द मी बोलते ते आपण ऐकून घ्यावेत. "अतिवीर्य राजा प्रबल व क्रूर आहे. त्याच्याजवळचें सैन्यसामर्थ्य फार मोठें आहे. भरताकडून तो जिंकला जाणें शक्य नाहीं असें मला वाटतें. यास्तव त्याला जिंकण्यासाठीं चांगला विचार करून उपाय ठरवावा. अविचारानें कार्य करण्यांत यश मिळणें संशयावह असतें. आपण व लक्ष्मण या दोघांना असाध्य असें कांहीं नाहीं तथापि सुविचारानें कांहीं उपाय ठरवावा असें माझें नम्र सांगणें आहे."

यानंतर लक्ष्मणानें भाषण केलें. तो म्हणाला— माते, तूं व्यर्थ चिन्ता करीत आहेस. माझ्यापुढें तो अतिवीर्य राजा क्षुद्र व अणुवीर्य आहे. मी त्याला युद्धांत

सहज ठार मारीन. उद्या सूर्यास्ताच्यापूर्वी मी त्याला ठार मारीन असें निश्चित सांगतों. महीधर राजाच्या पुत्रांनींही प्रतिध्वनीप्रमाणें लक्ष्मणाप्रमाणेंच आपलें मत सांगितलें.

यानंतर सर्वांना थांबवून रामचन्द्र याप्रमाणें म्हणाले— बाळा लक्ष्मणा, सीता जें बोलली त्याचाच खुलासा मी तुम्हा सर्वांना सांगतों. तो ऐका. अतिवीर्याचें सैन्य-सामर्थ्य फार मोठें आहे. भरताचें तसें नाहीं. अतिवीर्याजवळ हत्तीचें सैन्य आहे भरताजवळ तें फार कमी आहे. भरताचें सैन्यांत घोडेस्वार पुष्कळ आहेत पण हत्तीच्या सैन्यापुढें तें टिकाव मुळीच धरणार नाहीं. भरताचें सामर्थ्य अतिवीर्याच्या दहाव्या हिश्शाएवढेंहि नाहीं. जर भरताचा पराजय झाला तर रघुकुलाला मोठा कलंक लागेल. मानी शत्रुघ्न व मानी भरत संधि करावयाला बिलकुल तयार होणार नाहींत. तसेंच शत्रुघ्नानें दुसरा एक घोटाळा करून ठेवल्यामुळें अतिवीर्य अतिशय रागावलेला आहे. अर्थात् एका गाढ अंधकाऱ्यारात्रीं शत्रुघ्न व रौद्रभूति हे दोघे थोडेसें सैन्य घेऊन अतिवीर्याच्या सैन्यावर चालून गेले. त्यांनीं अतिवीर्याचे पुष्कळ हत्ती, घोडे व वीर मारून टाकिले आहेत. त्यामुळें अतिवीर्याच्या मनांत सूडबुद्धि उत्पन्न झाली आहे. भरतही दण्डोपायासच पसंत करीत आहे. अन्य उपायाचा तो स्वीकार करणार नाहीं. व लक्ष्मणा तुझ्या मनांत तूं कोणता उपाय अतिवीर्याला वश करण्यासाठीं ठरविला आहेस हें समजत नाहीं. भरतहि येथें ससैन्य आला आहे. तेव्हां आपण प्रगट व्हावें हेंहि मला योग्य वाटत नाहीं. ज्याप्रमाणें लोक झोपेंत असतां मेघ जमून वृष्टि करून निघून जातात. तसें आपण गुप्त राहून हें कार्य करून येथून निघून जावें असें मला वाटतें. असें बोलून रामचंद्र स्वस्थ बसले. त्यावेळीं त्यांच्या मनांत एक उपाय सुचला. तो दुसरे दिवशीं करण्याचें त्यांनीं ठरविलें. त्यांनीं ती रात्र सावध राहून व्यतीत केली.

दुसरा दिवस उजाडला. एका जिनमंदिरांत रामचन्द्रादिक गेले. तेथें 'वरधर्मा' नामक मुख्य आर्यिका होती. 'सीतादेवी'ला आर्यिकेजवळ राहण्यास सांगून रामचंद्र, लक्ष्मण व महीधर राजाचे पुत्र या सर्वांनीं नर्तकींचा वेष धारण केला. गावांत— नंद्यावर्त नगरांत प्रवेश करीत असतांना सर्व स्त्रीपुरुषांनीं त्यांना पाहिलें. सर्वांच्या नेत्र व मनाला त्या नर्तकींनीं आकर्षून घेतलें होतें. त्या सर्व नर्तकी राजवाड्याच्या दरवाजांत गेल्या व त्यांनीं चोविस तीर्थंकरांची स्तुति म्हणावयास सुरुवात केली. जणु स्वर्गांतल्या रम्भादिक अप्सरा गाणें म्हणत आहेत असें सर्वांना वाटू लागलें. यानंतर राजवाड्यांतील राजसभेंत जेथें अनेक राजे, अतिवीर्य व त्याचे

अनेक वीर बसलेलें होते. मुख्य नर्तकीनें अत्यंत मधुरकण्ठानें महापुरुषांच्या चरित्रावर गायन, नर्तन करावयाला सुरुवात केली. बाकीच्या नर्तकींचें नृत्यही आकर्षक होतें. नृत्य पाहणाऱ्या राजांनीं आपल्या अंगावरील अलंकार हर्षित होऊन नर्तकींना दिले. थोडावेळपर्यंत महापुरुषांचें चरित्र गाऊन नंतर मुख्य नर्तकीनें भरताची स्तुति व अतिवीर्याची निंदा करावयाला सुरवात केली. 'हे अतिवीर्या, तूं कोल्ह्यासारखा व भरत सिंहासारखा आहे. तूं आपला नाश करून घेण्यासाठीं त्याला कोपविलें आहेस. विनयानें तूं त्याला शरण जा, म्हणजे तो प्रसन्न होईल. अतिवीर्या तूं शलभासारखा आहेस व भरत दिव्यासारखा आहे. त्याच्यावर आक्रमण करून मरण पावूं नकोस. आकाशांत चंद्रावांचून तारा जशा शोभारहित दिसतात तशा तुझ्या स्त्रिया तूं भरताकडून मारला गेल्यावर शोभारहित– विधवा होतील. तूं सापासारखा व भरत गरुडासारखा आहे. यास्तव तूं युद्धाच्या भानगडींत पडूं नकोस."

इत्यादि निंदावचनें त्याला असह्य वाटलीं. त्यानें म्यानांतून तरवार काढली व या नर्तकीचे तुकडे करावे असें मनांत ठरविलें. इतक्यांत त्या मुख्य नर्तकीनें एकदम सिंहासनावर उडी मारून त्याच्या मस्तकावरील मुकूट फेकून दिला. त्याच्या हातांतली तरवार हिसकावून घेतली. आणि त्याची शेंडी हातानें गच्च पकडली. व मोठ्यानें गर्जना करून माझ्यापुढें जो येईल त्याचे मी या तरवारीनें खांडोळी करीन. तिचा तो चंडिकेसारखा भयंकर आकार पाहून सर्व राजे गार झाले. तुम्हाला जर जीवित प्रिय असेल तर तुम्ही भरताला शरण जा, असें म्हणून सर्व नर्तकींनीं भरत राजाचा जयजयकार केला. ज्याच्या नर्तकी इतक्या शूर आहेत तर तो भरत व त्याचे योद्धे किती पराक्रमी असतील असा विचार करून सर्व राजे थंड झाले. यानंतर रामचंद्रांनीं नर्तकीचा वेष सोडून त्याला आवळून बांधून जिनमंदिराकडे नेलें. तेथें रामचंद्रानीं जिनेश्वर व आर्यिकांना वंदन करून लक्ष्मणाच्या स्वाधीन अतिवीर्य राजाला केलें. लक्ष्मण यमाप्रमाणें खवळून त्याला मारावयास उद्युक्त झालेला पाहून सीतादेवीला दया उत्पन्न झाली. ती म्हणाली– "बाळा लक्ष्मणा, याला मारूं नकोस. याचे केस तूं आवळून धरिलेस ते सोडून दे. 'अशुभकर्माच्या उदयानें जीवाला आपत्ति प्राप्त होते हें जाणून शुभबुद्धिवन्तानीं मनांत दया धारण करावी. हा सामान्य मनुष्य नाहीं. याच्या चरणाची हजारो राजे पूजा करितात. याला तूं बंधनमुक्त कर. आतां ह्याच्या मनांत विकृति उत्पन्न होणार नाहीं." असें सीतेनें म्हटल्यावर लक्ष्मणानें बंधमुक्त केलें.

रामचंद्र अतिवीर्याला म्हणाले– " राजन्, हें शहर आतां भरताच्या अधीन झालें आहे तथापि तूं भरताची आज्ञा मान्य करून पूर्वीप्रमाणें राज्य कर." अतिवीर्य म्हणाला– प्रभो, मला हिमाचलापासून समुद्रापर्यंत सर्व पृथ्वी जिंकावी अशी इच्छा होती पण आतां ती राहिली नाहीं. आज माझा मान व माझें यश जळून खाक झालें आहे. माझें पूर्वभवाचें अशुभकर्म उदयास आलें आहे. पण त्यामुळें माझ्या-ठिकाणीं राज्यविरक्ति उत्पन्न झाली हें मी चांगलेंच समजतो. असें बोलून अतिवीर्य राजा 'श्रुतधर' नामक मुनीश्वराकडे जाऊन त्यानें सर्व परिग्रहांचा त्याग केला. रागद्वेष मनांतलें काढून टाकिले. आपल्या शुद्ध स्वरूपांत तत्पर राहू लागला. विहार करीत असतां जेथें सूर्यास्त होई तेथेंच राहून सर्व रात्र आत्मध्यानांत व्यतीत करीत असे. अन्तःकरणांतून भय नाहींसें झालें होतें. विषयेच्छा नाहींशा झाल्या होत्या. चारित्रांत तिळमात्रहि दोष राहिला नव्हता. तीव्र तपानें शरीर कृश झालें होतें पण आत्मा मात्र ज्ञानादिगुणांनीं पुष्ट होत होता. अशा अतिवीर्य मुनीश्वरास आम्ही वन्दन करितो.

या अतिवीर्ययतीश्वरांचें चरित्र जो जिनभक्त वाचतो, गातो ऐकतो व सांगतो तो भव्यांचा मुकुटमणि होतो.

---

# अडतीसावें पर्व.

[ अतिवीर्य राजाचा दूत महीधर राजाकडे येतो. ]

एकेदिनिं पृथ्वीधर सभालयीं उच्च मञ्चकावरती ।
श्रीराम-लक्ष्मणासह वसतां ये दूत तेथ शीघ्रगती ॥ १ ॥

करुनि नमस्कृति भूपा श्रीरामा तेवि लक्ष्मणास मुदें ।
देइ महीधरनृपकरिं वार्ताहर लेखपत्र पथखेदें ॥ २ ॥

तें पत्र सन्धिविग्रहवेदी[1] सचिवें समग्र वाचून ।
भूपापुढें तयाचें केलें तेणें यथार्थसें कथन ॥ ३ ॥

नन्द्यावर्तपुरामधिं नामें अतिवीर्यभूप राज्य करी ।
ज्याची आज्ञा स्वशिरीं मालेसम भूपवर्ग सतत धरी ॥ ४ ॥

ज्यानें प्रजागणाला केलें अनुरक्त निजगुणें सतत ।
ज्याचा पराक्रमानलें[2] अरिवृन्दाचें सदा करी अहित ॥ ५ ॥

कुशलप्रश्न विचारुनि विजयपुरीचा प्रसिद्ध भूपाल ।
नाम महीधर ज्याचें शौर्य जयाचें अरीस जणु काल ॥ ६ ॥

तो तूं अङ्कित असशी आज्ञा माझी तुला अशी आहे ।
सैन्यासह ये झडकरि मदत तुझी प्रीतिहेतु मम पाहे ॥ ७ ॥

मागध आदिक राजे अनेक आले तयास घेऊन ।
भरता जिंकायाला निश्चय माझा असे मनीं जाण ॥ ८ ॥

वाट तुझी मी बघतों शेतकरी जेवि मेघवर्षाची[3] ।
येणें होतां होइल वृद्धि तयें मम अतीव हर्षाची ॥ ९ ॥

यापरि वाचत होता पृथ्वीधर बोल बोलला नैव ।
परि रामानुज लक्ष्मण बोले हृदयस्थ आपुला भाव ॥ १० ॥

[ अतिवीर्य राजा भरताचा द्वेष कां करितो ?
या लक्ष्मणप्रश्नास दूताचें उत्तर. ]

---

१ संधि व फूट कशी करावी हें जाणणारा मंत्री. २ शौर्यरूपी अग्नि.
३ ढगाच्या पावसाची.

अतिवीर्यभूप करितो भरताचा सांग कां वरें द्वेष ।
इच्छा श्रवणाची मज घडे नि देते महान् मला क्लेश ॥ ११ ॥
दूत वदे तो आहे नृपेश अतिवीर्य शक्रतुल्य[1] बली ।
नृपमृग तयास भीति स्वस्थानिंहि झोप त्या न येइ मुळीं ॥ १२ ॥
पृथ्वी समुद्रवसना[2] पाळी आज्ञा जशी प्रिया गृहिणी ।
नच उल्लंघी आज्ञा त्याची या भूतलावरी कोणी ॥ १३ ॥
हे भरता, येउनि हो तूं माझा दास वा वनीं गमन ।
करि अन्यथा तुला नच होइल समरांत कोणि ही शरण ॥ १४ ॥
ऐसें जाउनि कथिलें श्रुतमतिदूतें तदा मनीं कोप ।
येई शत्रुघ्नाच्या वदला तो धरुनि तीव्र सन्ताप ॥ १५ ॥
टाकुनि सचिवावरती राज्याचा भार भरत दिग्विजया ।
जाइल कुमानवांना करील वश सहन करि न तो अनया ॥ १६ ॥
यापरि त्याचें भाषण योग्य न होतें परन्तु बडबडला ।
जैसा गजास बघुनि स्वर खर[3] कर्कश करून ओरडला ॥ १७ ॥
वचन असें हें त्याचें भावि तयाच्या मृतीस सूचवितें ।
वा संनिपातवातासमान घातास कां न दाखवितें ॥ १८ ॥
होउनि विरक्त गेला जनक जयाचा स्वराज्य देऊन ।
राजाधिराज झालों ऐसें जणु सांगतें तदीय मन ॥ १९ ॥
जरि जनकरूप विस्तव मुक्तीच्छा धरुनि होय शान्त मनीं ।
त्याचा स्फुलिंग हा मी जाळीन कुशत्रुरूपघोरवनीं[4] ॥ २० ॥
गजरक्तानें झाल्या लाल जयाच्या सटा असा सिंह ।
झाला शान्त तयाचा शिशु नष्ट करील रे गजव्यूह[5] ॥ २१ ॥
यापरि बोलुनि हसला तेजाचें स्थान तीव्र शत्रुघ्न ।
दिसला वेळूंचा जणु भीषणसा अग्नि अङ्गसंलग्न[6] ॥ २२ ॥
वदला द्या हाकालुनि या दूता अर्धचन्द्र देऊन ।
तत्काल द्या पिटाळुन दिलें तदा सैनिकें सभेंतून ॥ २३ ॥
दुर्वचनांनीं झालें दूताचें मन अतीवसें खिन्न ।
गेला निघून तेथुन धूळीनें अंग जाहलें मलिन ॥ २४ ॥

---

१ इन्द्रासारखा. २ समुद्ररूपी वस्त्र जिला आहे अशी. ३ गाढव. ४ वनाला. ५ हत्तींचा समुदाय. ६ शरीरासभोंवतीं लपटलेला.

शत्रुघ्नासह झाला भरतहि सक्रोध दूतवाक्यांनीं ।
सचिवासह ते बसले उभयहि जाउन विमर्शनस्थांनीं[1] ॥ २५ ॥
केला विचार निश्चित युद्धाचा धाडिले नृपा दूत ।
भूपति अनेक आले प्रेम जयांचें अतीव भरतांत ॥ २६ ॥
घेऊन सैन्य मोठें मिथिलापति कनकभूप भरतास ।
भेटावया निघाले सिंहोदर आदि भूपशत त्यास ॥ २७ ॥
यापरि अनेक भूपति-सैन्यासह भरत कुपित होऊन ।
नन्द्यावर्तास निघे जो न्यायपथांत सर्वदा लीन ॥ २८ ॥
दूततिरस्कारानें झाला अतिवीर्यही मनिं क्षुभित ।
जैसा प्रचण्डपवनें समुद्र दिसतो महोग्ररूपांत[2] ॥ २९ ॥
तेव्हां वनमालेच्या पित्यास संज्ञा करून राम वदे ।
अतिवीर्य-कार्य भरताविषयीं माझ्या मना न खेदा दे ॥ ३० ॥
जाणून खूण दूता नृपति महीधर अवश्य येईन ।
ऐसें वदला तेव्हां करि अतिवीर्याकडे सुखें गमन ॥ ३१ ॥
अतिवीर्य प्रबल असे कपटें त्यावरि करीन मी गमन ।
यापरि वदतां वदला श्रीराम स्पष्ट हें तया वचन ॥ ३२ ॥
कोणास न समजावें गुप्तपणानेंच कार्य हें व्हावें ।
ऐसी इच्छा अमुची आहे हे भूप मानसीं घ्यावें ॥ ३३ ॥
श्रीरामा तूं राही येथेंचि सुयुक्ति सांग कार्याची ।
पुत्र-निजामात्यासह मदत तुला मी करीन भो साची ॥ ३४ ॥

[ पृथ्वीधर राजाच्या पुत्रांना बरोबर घेऊन राम-लक्ष्मणांचें अतिवीर्यावर आक्रमण. ]

या अतिवीर्य अरीच्या नाशार्थ करून यत्न मी थोर ।
साधीन कार्य सगळे निःसंशय तूं मनांत अवधार ॥ ३५ ॥
श्रीराम लक्ष्मणासह महीधराचे सुपुत्र घेऊन ।
अत्यल्पसारें[3] सेनेसह शत्रुपुराकडे करी गमन ॥ ३६ ॥
नगरासमीप केला मार्गी त्यांनीं निवास सानन्द ।
राम नि लक्ष्मण सीता विमर्श करिती न ज्या गमे खेद ॥ ३७ ॥

---

१ मन्त्रशाळेंत. २ अतिशय भयंकर रूपांत. ३ अतिशय थोडी पण बलवान् अशी सेना.

[ सीतादेवी आपला विचार सांगते. ]

सीता वदली नाथा नाहीं अधिकार आपणा पुढती ।
तळपत दिनकर असतां नभांत तारा प्रकाश नच देती ॥ ३८ ॥
धरुनि हितेच्छा हृदयीं कार्यदिशा मी तथापि सांगेन ।
वंशलतेपासुनिही[1] मणि होतां त्यास घेति जगिं सुजन ॥ ३९ ॥
अतिवीर्य प्रबल असे अपार त्याच्यासमीप सैन्य वसे ।
भरतें त्या वश करणें शान्तें क्रूरास जेवि कठिण दिसे ॥ ४० ॥
म्हणुनि तया जिंकाया उपायचिन्ता अवश्य ठरवावी ।
अविचारें कृति करितां संशय सिद्धींत होय वदति कवि ॥ ४१ ॥
लोकत्रयींहि नाहीं असाध्यसें कार्य आपणा उभयां ।
नाथा, तथापि करणें सुविचारें तेंचि उचित या समया ॥ ४२ ॥

[ लक्ष्मणाचे विचार. ]

वदला लक्ष्मण माते, व्यर्थचि चिन्ता मनांत धरितेस ।
अणुवीर्याला मारिन रणांत लवही न संशयावास ॥ ४३ ॥
श्रीरामपदरजानें[2] ज्याचें मस्तक पवित्र हें झालें ।
इन्द्रहि ठाके पुढती माझ्या त्याचें कदापि हो न भलें ॥ ४४ ॥
सूर्यास्ताच्यापूर्वी मी लीलेनें तयास मारीन ।
अतिवीर्य तो कदापि न जननि, तया क्षुद्रवीर्य तूं मान ॥ ४५ ॥
पुत्रहि महीधराचे वदले लक्ष्मणसमान वचनास ।
वाटे प्रतिध्वनिच जणु उमटे पर्वतगुहेंत अविशेष ॥ ४६ ॥

[ रामचन्द्राचे विचार. ]

सर्वांस[4] निवारुनि त्या भ्रूभंगें राम लक्ष्मणा वदला ।
ऐके वत्सा वदली देवी वाटे विचारणीय मला ॥ ४७ ॥
आशय वचनांत तिच्या होता तो स्पष्ट सांगतों आतां ।
अविनयभयें न केलें विवरण त्याचें तिनें रमाकान्ता[3] ॥ ४८ ॥
अतिवीर्य बलोद्धत बहु समरीं भरतें न शक्य जिंकाया ।
जाणें त्यावर चालुनि अयशा कारण नि होय तें वाया ॥ ४९ ॥
अतिवीर्याचा होय न अंश दहावाहि भरत विनिपातें ।
होय तयाचा समरीं वनानला गज न करुं शके शान्त ॥ ५० ॥

---

१ वेळूची वेल. २ पायांच्या धूळीनें. ३ लक्ष्मीपते लक्ष्मणा. ४ नाश.

जननाश यांत होइल निश्चय विजयी न कष्ट बहु पाहे ।
व्हाया विरोध हेतु न पक्षद्वय म्हणुनि हेयें हें आहे ॥ ५१ ॥
गजबलसमृद्ध आहे अतिवीर्य नि भरत तुरगबल आहे ।
समबलता भरतीं नच हानि तयाचीच हें मनीं वाहे ॥ ५२ ॥
अतिवीर्यें वश केलें भरता रघुगोत्रसुयश विलयास ।
जाईल कुलकलंकहि उपजेल पडेल ही महायास ॥ ५३ ॥
मानी शत्रुघ्न असे सन्धि कराया न सज्ज होईल ।
बालक अविवेकी बहु अनर्थ सारे करून बैसेल ॥ ५४ ॥
गाढान्धकार रात्रीं घेउनि साहाय्य रौद्रभूतीचें ।
शत्रुघ्नानें केला विनाश जाऊन शिबिरिं शत्रूचें ॥ ५५ ॥
पुष्कळ हत्ती, घोडे, वीरहि मारून टाकिले उभयें[2] ।
क्षुब्ध अतिवीर्य झाला वार्ता कानावरी न कां ही ये ॥ ५६ ॥
अत्यन्त खवळला हा अतिवीर्य नि सूड्बुद्धि मनिं उपजे ।
सावध अतिशय होउनि कोपें युद्धास सर्वथैव सजे ॥ ५७ ॥
दण्डोपाया त्यागुनि अन्योपायास भरत नच मानी ।
बहुबुद्धिमान् असूनहि शत्रुघ्न जसा तसाच हा मानी[3] ॥ ५८ ॥
हे लक्ष्मणा, उपायें कवण्या तूं आज सज्ज आहेस ।
अतिवीर्या जिंकाया याचा लागे न थांग आम्हास ॥ ५९ ॥
भरतहि येथें आहे परि होणें प्रगट उचित नच भासे ।
गुप्तचि राहुनि करणें वश अतिवीर्या उपाय अन्य नसे ॥ ६० ॥
आहेस लक्ष्मणा तूं सूर्या पाडावया नभांतून ।
भूवरि समर्थ संशयलवहि न माझें कधींहि धरि सुमन ॥ ६१ ॥
राहुनि अज्ञातचि जे करिती जनकार्य मान्य लोकांत ।
होति जसें जल वर्षुनि अन्यस्थानास मेघ जातात ॥ ६२ ॥
यापरि विचार करितां सहसा मति रामहृदयिं उद्भवली ।
अतिवीर्यग्रहणाची तेणें चित्तीं प्रसन्नता आली ॥ ६३ ॥
रामें स्वजनासह ती रात्र सुखें निष्प्रमाद[4] होऊन ।
घालविली अन्यदिनीं त्याला दिसलें विशाल जिनसदन ॥ ६४ ॥

१ त्याज्य. २ शत्रुघ्नानें व रौद्रभूतीनें. ३ गर्वयुक्त. ४ असावधानतारहित.

[ रामचंद्र, लक्ष्मण व पृथ्वीधरराजाचे पुत्र नर्तकीवेष धारण करून अतिवीर्य राजाच्या सभागृहांत प्रवेश करून नृत्य करितात.]

जाउनि जिनेश्वराला वन्दन आर्याजिनासही केलें ।
वरधर्मागणिनीकरिं सीतादेवीस शीघ्र अर्पियलें ॥ ६५ ॥
श्रीरामें स्त्रीवेषा धरिलें श्रीलक्ष्मणादिकस्वजनें ।
असतां जात पथामधिं नरनारी पाहतात एकमनें[1] ॥ ६६ ॥
सर्वांच्या नेत्रमना हरून त्या येति राजसदनांत ।
द्वारासमीप होती चोवीस जिनेन्द्रगायनीं निरत ॥ ६७ ॥
विषय महापुरुषाचा घेउनि मधुरस्वरांत त्या गाती ।
तें[2] ऐकतांचि रम्भादिक जणु गातात वाटतें चित्तीं ॥ ६८ ॥
सुन्दर अङ्गाभिनयें हरिलें अतिवीर्यभूप चित्तास ।
मुख्यस्त्रीनें नयनें नानाविध करुनि हावभावास ॥ ६९ ॥
ज्या ज्या करी प्रदेशीं नर्तन नारी सभेंतले वीर ।
बघती एकाग्रमनें विसरुनि जातात आपणा चतुर ॥ ७० ॥
पाहून नर्तकीचें अपूर्वसें नृत्य भूषणें देती ।
निरलंकार जहाले भूपाल परन्तु मुदित मनिं होती ॥ ७१ ॥
देवहि पाहुनि नृत्या होतिल वश काय अन्य मनुजकथा ।
ज्यांनीं न पाहिलें तें जन्म तयें मानिलें स्वकीय वृथा ॥ ७२ ॥
संक्षेपानें गाउनि वृषभजिनेन्द्रादि-मधुर-चरितास ।
गायन-नर्तन-वादनयोगें करि लुब्ध ती समस्तास ॥ ७३ ॥

[ मुख्यनर्तकी अतिवीर्याची निंदा व भरताची स्तुति करतें त्यामुळें तो रागावून तिला मारण्याचा विचार करतो. ]

नन्तर अतिवीर्याची निन्दा वरवर्णिनी[3] करी चतुरा ।
जी ऐकतां तयांच्या कोपाचा खूप वर चढे पारा ॥ ७४ ॥
तूं कोल्ह्यासम असशी भरत मृगेन्द्रासमान[4] वा आहे ।
स्वविनाशास्तव मूर्खा ! कोपविलें तूं तयास वहु पाहे ॥ ७५ ॥
विनयें समीप जाउनि भरताचें तूं करी प्रसन्न मन ।
प्रियजीवित जरि तुजला नातरि मारील भरत निष्करुण ॥ ७६ ॥

---

१ एकाग्रचित्त होऊन. २ गाणें. ३ सुन्दर स्त्री. ४ सिंहासारखा.

झाला विशुद्धवंशीं राण्यांचा जन्म ज्या तुला प्रिय रे ।
तुज मारितांचि भरतें होतिल त्या सकल खचित विधवा रे ॥ ७७ ॥
चन्द्रें विरहित गगनीं शोभा तारागणास येइ कशी ।
तव मरणें गतशोभा होतिल नारी म्हणून होचि वंशी ॥ ७८ ॥
सोडून मान जाई तूं भरताला करी नमस्कार ।
अशुभध्यानापासुनि निजहृदया सर्वथा करी दूर ॥ ७९ ॥
नच वागशील यापरि नराधमा, तव विनाश होईल ।
भरतास शरण जा तूं तो करुणा झणि तुझ्यावरी करिल ॥ ८० ॥
भरत असे गरुडासम तूं सर्पासम मरूं नकोस वृथा ।
दीपासम भरत असे होइल शलभासमान तव कुकथा ॥ ८१ ॥
निन्दा अतिवीर्याची करी प्रशंसा नि भरतराजाची ।
ऐकुनि अतिवीर्यमना स्वकीयनिन्दा अतीव ती जाची ॥ ८२ ॥
अतिलाल नेत्र झाले भुवया भालावरी[२] रुपा चढवी ।
हातांत खड्ग घेउनि नटीस मारून शीघ्र टाकावी ॥ ८३ ॥
[ नर्तकीनें उडी मारून अतिवीर्याची तरवार हिसकावून घेतली व
त्याची शेंडी हातांत धरून ती इतर राजांना असें म्हणाली— ]
यापरि विचार पाहुनि वेगें नृत्याङ्गना उडी मारी ।
खड्ग करांतील घेउनि शेंडी त्याची करांत सुदृढ धरी ॥ ८४ ॥
खड्ग करें वर उचलुनि पाहुनि वदली समस्त राजगणा ।
येईल पुढें येथें होइल मत्खड्गवध्य हें जाणा ॥ ८५ ॥
तुम्हास जीवित प्रिय असेल अतिवीर्यपक्ष सोडून ।
जा भरताच्या चरणा करा नमस्कार हात जोडून ॥ ८६ ॥
अवतार चंडिकेचा पाहुनि झाले समस्त नृप गार ।
खड्ग कटीचा[३] उपसुनि धावे मारावयास केवि कर ॥ ८७ ॥
दशरथवंशनभामधिं जननयना मोद जो सदा देतो ।
तो भरतचन्द्र विजयी गुणकिरणांनीं प्रकाशयुत होतो ॥ ८८ ॥
लक्ष्मीकुमुदिनी[४] ज्याची विकासा वरिते सदा ।
अरिसूर्य न ज्या बाधी हें आश्चर्य न कां वदा ॥ ८९ ॥

---

१ भरतास वश हो. २ कपाळावर. ३ कंबरेची तरवार. ४ रात्रीं विकसणाऱ्या कमलांची वेली.

आश्चर्य फार वाटे जणु घडलें इन्द्रजाल हें मोठें ।
लोकमुखें प्रगटे स्वर दृश्य असें पाहिलें नसें कोठें ॥ ९० ॥
स्तुतिपाठककन्याही ज्याच्या विक्रम असा जरी करिती ।
अमरेन्द्रासंहि जिंकिल भरताची शक्ति जीस नैव मिति[1] ॥ ९१ ॥
नन्तर करिवरि वैसुनि अतिवीर्य नृपास सुदृढ वान्धून ।
घेउनि सर्व निघाला राघव परिवारसहित तेथून ॥ ९२ ॥

[ जिनमंदिरांत येऊंन अतिवीर्याला रामानें लक्ष्मणाच्या स्वाधीन केलें. ]

उतरून करिवराहुनि जाउनि जिनमंदिरांत पूजि जिना ।
जयजयकारें वन्दुनि जिनचरणीं लीन तो करी स्वमना ॥ ९३ ॥
वरधर्मार्यिचरणां नमून अतिवीर्य-भूपतीस करी ।
स्वाधीन लक्ष्मणाच्या जो यमसा शत्रुवर्गसंहारी ॥ ९४ ॥
मारावयास झाला लक्ष्मण उद्युक्त तेधवा सीता ।
वदली वत्सा वीरा याच्या तूं करूं नकोस रे घाता[2] ॥ ९५ ॥
होऊं नकोस निष्ठुर केस तयाचे धरूं नकोस दृढ ।
हो सौम्य वत्स हृदयीं दे आलिङ्गन दयेस तूं गाढ ॥ ९६ ॥
अशुभ अशा कर्माच्या उदयें आपत्ति येतसे जीवा ।
शुभमति मानव त्याच्यावरि धरिती आर्द्रशा[3] मनोभावा ॥ ९७ ॥
याच्या चरणां पूजिति सहस्र राजे असे न हा क्षुद्र ।
यास्तव मुक्त करी या ऐसें मी सांगते तुला भद्र ॥ ९८ ॥
झाला असे सुवश हा विकार आतां न यांत होईल ।
अतिशय कुलीन नृप हा मर्यादा नच कदापि लंघील ॥ ९९ ॥
ऐशा सीतावचनां ऐकुनि शिरिं करयुगास ठेवून ।
वदला जननि तुझें गे मान्य मला सर्वदा असे वचन ॥ १०० ॥
केलें अतिवीर्याला मुक्त तयें तैं विरक्त होऊन ।
श्रीरामाची केली स्तुति तेणें आदरा मनीं वरुन ॥ १०१ ॥

[ श्रीराम व अतिवीर्य यांचें अन्योन्य मधुर भाषण. ]

हे श्रीरामा केलें विस्मय-कारक असे तुवा कार्य ।
अप्राप्तपूर्व[4] तेणें प्रगटे माझ्या मनांत मति आर्य ॥ १०२ ॥

---

१ माप. २ नाशास. ३ दयायुक्त. ४ पूर्वी प्राप्त न झालेली अशी.

मुकुटें हारें विरहित पाहुनि त्या रामचित्त विरघळलें ।
वदला तो त्या राजन् दीनत्वा पात्र तव न चित्त भलें ॥ १०३ ॥
सोडू नकोस धैर्या विपत्ति सम्पत्ति येति जातात ।
भरती नि हानि सागरिं उभयहि नसतात त्या तटाकांत ॥ १०४ ॥
नन्द्यावर्तपुरी जरि भरताची जाहली तथापि वश ।
होऊन तूं रहा या लाभे तुजला समस्त पूर्व यश ॥ १०५ ॥
अतिवीर्य वदे रामा आतां राज्यीं मला स्पृहा नाहीं ।
त्याचें फल मज लाभे अन्यत्र प्रेम मम वळे पाही ॥ १०६ ॥
हिमसागरान्त पृथिवी जिंकावी ही मनांतली आशा ।
परि आज नष्ट झाली लागे मानास अनलें तेवि यशा ॥ १०७ ॥
निजमान नष्ट झाला आतां माझ्यांत सार नच राही ।
पौरुष असतां इतरां प्रणाम रामा कसा करूं पाही ॥ १०८ ॥
पट्खण्ड भूमि केली वश ज्यांनीं तेहि तृप्त नच झाले ।
मी ग्रामपंचकानें तृप्त न होईन आज हें कळलें ॥ १०९ ॥
पूर्वभवीचें माझें आलें उदयास अशुभ जें कर्म ।
केला अपमान तयें त्यानें जाळून टाकिलें मर्म ॥ ११० ॥
निःसार चित्त झालें मानवता साररहित मम झाली ।
सर्वसुरासहि छळतें उरला माझा जगांत नच वाली ॥ १११ ॥
संसारभीरु माझें झालें मन आज पूर्ण सुविरक्त ।
तें कार्य करिन आतां जेणें होईन निश्चयें मुक्त ॥ ११२ ॥

[ अतिवीर्य मुनि होऊन उत्तम चारित्र पाळून निजस्वरूपांत तत्पर होतो. ]

यापरि बोलुनि मागुनि रामास नि लक्ष्मणा क्षमा गेला ।
श्रुतिधर-मुनिवरसन्निध दीक्षा घेऊन पूर्ण यति झाला ॥ ११३ ॥
रागद्वेष परिग्रह सोडुनि झाला निजात्मरूपरत ।
सूर्यास्त जेथ होई रात्रौ राही तिथेंचि भयमुक्त ॥ ११४ ॥
क्रूर श्वापद जेथें विहरति ऐशा वनांत गिरिविवरीं ।
अतिवीर्य राहि मुनिवर जेथें गिरितुंग गज विदारि हरि ॥ ११५ ॥

---

१ तळ्यांत. २ आत्मस्वरूपाची प्राप्ति करून घेण्यांत. ३ हिमवान्-पर्वतापासून समुद्रापर्यंत. ४ अग्नि. ५ हृदय.

जो विषयाशावश नच पाळी जो निरतिचार चारित्र ।
तीव्रतपें कृश नमितों मी अतिवीर्या मुनीस सुपवित्र ॥ ११६ ॥
अतिवीर्ययतिवराचें चरित्र जो वाचितो नि जो श्रवणीं ।
करितो गातो होतो तो श्रीजिनदास भव्यमुकुटमणि ॥ ११७ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे अतिवीर्यनिष्क्रमणाभिधानं नाम अष्टत्रिंशत्तमं पर्व ॥ ३८ ॥

# एकोणचाळीसाव्या पर्वातील कथेचा सार.

श्रीरामचन्द्रांनीं अतिवीर्य राजाच्या पुत्राला– विजयरथाला राज्यावर बसविलें. त्यामुळें उपकृत झालेल्या विजयरथानें मोठ्या हर्षानें आपली बहीण 'रतिमाला' लक्ष्मणाला दिली.

यानंतर रामचन्द्र, सीता व लक्ष्मण यांनीं जिनमंदिरांत अतिशय भक्तीनें जिनपूजा केली. व तेथून निघून ते पुनः विजयनगराला आले.

अतिवीर्य राजाला एका नर्तकीनें सभेंत बान्धून टाकिलें म्हणून विरक्त होऊन त्यानें दीक्षा घेतली ही वार्ता शत्रुघ्नाला समजली. तो त्याचा उपहास करून हंसू लागला. तेव्हां भरतानें असा उपहास करणें योग्य नाहीं म्हणून त्याचा निषेध केला.

विषयकषायांना त्यागून तो शान्त व जितेन्द्रिय अर्थात् आम्हाला वंद्य झाला आहे म्हणून तुझें हंसणें मला पसन्त वाटत नाहीं असें भरतानें त्याला म्हटलें. अतिवीर्याच्या गुणांची स्तुति करीत असतां त्याचवेळीं अतिवीर्याचा पुत्र विजयरथ भरताला नजराणा देण्यासाठीं आला. भूषणभूषितकन्या, धनकोश, दास-दासी इत्यादि नजराण्यांतून भरतानें रतिमालेची वडील बहीण विजयसुन्दरीचा फक्त स्वीकार केला व बाकी सर्व त्यानें परत दिलें.

अतिवीर्य मुनिवर्यांना वन्दन करण्यासाठीं भरत मोठ्या परिवारासह निघाला. मार्गीं विचारीत तो एका पर्वतावर आला. तेथें "ज्याला रोषतोष नाहीं, ज्याचें निष्परिग्रही शरीर मोक्षमार्गाचें जणु कथन करीत आहे अशा शान्तदान्त अतिवीर्य-मुनीश्वरांना" भरतानें भक्तीनें वंदन केलें. अष्टद्रव्यांनीं त्यांचे चरण पूजून त्यांच्या गुणांची स्तुति केली. "प्रभो, आपण मनुष्यजन्माचें फल जो संयम तो धारण करून स्वतःला भूषित केलें आहे. आम्हीं मात्र दीन आहोत. हें फल आम्हीं धारण करूं शकत नाहीं. प्रभो, आपणाविषयीं आम्हीं दुर्विचार धारण केले यामुळें आम्हाला वाईट वाटत आहे आपण क्षमा करावी." याप्रमाणें बोलून व वन्दन करून पुनः अश्वावर आरूढ होऊन भरत अयोध्येस गेला. वाटेंत अतिवीर्याला नर्तकीनें जिंकणें शक्य नाहीं. जिनशासन देवींनींच त्याला वश केलें असेल कारण असें सामर्थ्य नर्तकींत असणें शक्य नाहीं असा विचार त्याच्या मनांत आला.

विजयनगरांत कांहीं दिवस राहून जेव्हां इष्टस्थानीं जाण्यासाठीं रामचन्द्र, लक्ष्मण व सीता निघाले. त्यावेळीं 'मीही येणार असा हट्ट वनमालेनें धरला. लक्ष्मण म्हणाला– "वनमाले, मी इष्ट ठिकाणीं माझ्या वडील बन्धूनां ठेवून तुला नेण्यासाठीं परत येईन. न आलों तर मिथ्यात्व्यांना जी गति प्राप्त होते ती मला प्राप्त होईल. त्या गतींत मी जाईन." अशा प्रकारच्या शपथांवरही तिचा विश्वास बसला नाहीं. ती म्हणाली "नाथ, 'रात्रीं भोजन करणाऱ्यांना जें पाप लागतें तें पातक मी परत येऊन तुला नेलें नाहीं तर मला लागेल' अशी शपथ आपण घेत असाल तर मी आपला हट्ट सोडून पितृगृहीं राहीन. नाहींतर मी येईन." लक्ष्मणानें तिला पसन्त असलेली शपथ घेतली.

नंतर ते तिघे एकेदिवशीं अर्धी रात्र संपल्यावर कोणाला न कळवितां नगरांतून बाहेर पडले. प्रातःकालीं जेव्हां ही वार्ता समजली तेव्हां सर्व नागरिक अतिशय खिन्न झाले. वनमालेला लक्ष्मणाचा विरह फार दुःखद झाला. तिनें सौभाग्यसूचक अलंकारा शिवाय बाकीचे सर्व अलंकार त्यागले. ती शीलव्रताचें संरक्षण करीत पितृगृहीं राहिली.

रामचन्द्रादिक विहार करीत करीत क्षेमाञ्जलि नगराजवळील वनांत उतरले. लक्ष्मण गांवाची शोभा पाहावी म्हणून त्याच्या वेशींत शिरत असतांना 'जो राजानें फेकलेली शक्ति धारण करील तो जितपद्मा राजकन्येला वरील' असें एका मनुष्यानें उच्चारलेलें वाक्य त्याच्या कानीं पडलें. लक्ष्मणानें विनयानें त्या मनुष्याला विचारिलें 'ही जितपद्मा कोण आहे व शक्ति कोणता राजा फेकणार' याचा खुलासा आपण करावा. त्या मनुष्यानें म्हटलें– "भद्र या नगराचें नांव क्षेमाञ्जलि आहे. येथील राजाचें नांव शत्रुन्दम आहे. व त्याला पद्मेला लक्ष्मीला सौन्दर्यानें जिंकणारी 'जितपद्मा' नांवाची एक सुन्दर कन्या आहे. राजानें फेकलेली शक्ति जो झेलील त्याला ही कन्या राजा देणार आहे." अशी हकीकत ऐकून लक्ष्मणाला राजानें फेकलेली शक्ति आपण झेलू असें वाटलें व तो राजद्वाराजवळ आला. त्यानें द्वारपालाला मला राजाला भेटावयाचें आहे असें आंत कळव असें म्हटलें. त्यानें कळविल्यावर त्याला आंत पाठव असें राजानें म्हटलें व द्वारपालानें आंत सोडलें.

पुष्टबाहूच्या तेजस्वी लक्ष्मणाला पाहून राजानें त्याचें स्वागत करून आपण कोण व कोठें जात आहांत असें विचारलें. लक्ष्मण म्हणाला मी भरत राजाचा मान्य-संबन्धीजन आहे. व राजन्, आपल्या कन्येचा मान हरण करण्यासाठीं आलों आहे. राजानें म्हटलें– हे भद्र पुरुषा, मी फेकिलेली शक्ति जो मनुष्य हातांत धारण करितो

तोच माझ्या कन्येचा अभिमान नष्ट करील. लक्ष्मण म्हणाला राजन्, आपण एकच शक्ति कां फेकतां. ती तर मी सहज झेलीन. आपण पांच शक्ति जरी फेकल्या तरी त्याही सहज झेलून मी माझें सामर्थ्य प्रगट करीन.

याला स्वतःच्या शक्तीचा फार गर्व आहे तो आपण नष्ट करूं असा विचार करून राजानें पहिली शक्ति फेकली ती त्यानें आपल्या उजव्या हातानें झेलली. दुसरी शक्ति डाव्या हातानें पकडली. तिसरी उजव्या बगलेंत, चौथी डाव्या बगलेंत आणि पांचवी शक्ति त्यानें दांतांनीं धरिली. गरुडाला पाकोळी धरण्यांत जसा कांहींच श्रम वाटत नाहीं तसें या शक्ति धरतांना लक्ष्मणाला कांहींच श्रम वाटले नाहींत.

हें सर्व जितपद्मेनें पाहिलें. तिला फार आनंद वाटला व तिनें त्याच्या गळ्यांत माला घातली व खालीं दृष्टि लावून ती नम्रतेनें उभी राहिली.

राजा शत्रुन्दम म्हणाला– 'हे भद्र, आपली शक्ति अलौकिक आहे. आतां आपण माझ्या कन्येचें पाणिग्रहण करावें. माझी विनंति मान्य करावी.' लक्ष्मण म्हणाला– राजन्, माझे ज्येष्ठ बन्धु या नगराजवळील वनांत आहेत त्यांना आपण याविषयीं विचारा त्यांची अनुमति मिळाली म्हणजे मी हिचा स्वीकार करीन.

यानंतर जितपद्मा व लक्ष्मणास घेऊन परिवारासह राजा रामचंद्रांना भेटण्यास वनांत गेला. मोठ्या थाटानें रामचंद्र, सीता व लक्ष्मण यांना त्यानें नगरांत मिरवत आणिलें.

जितपद्मेबरोबर लक्ष्मणाचा विवाह झाल्यावर कांही दिवस हे तिघेजण शत्रुन्दम राजाच्या राजवाड्यांत राहिले. त्यांनीं तेथें स्वर्गीय सुखासारख्या सुखाचा अनुभव घेतला.

एके दिवशीं तेथून पुढें जाण्याचा विचार आपसांत त्यांनीं ठरविला. लक्ष्मणानें वनमालेप्रमाणें जितपद्मेचें समाधान केलें. व तो रामचंद्र सीता यांच्याबरोबर इष्टस्थानीं कोणाला न समजू देता निघून गेला. जेव्हां सकाळीं ते हे नगर सोडून गेले आहेत असें आढळून आलें तेव्हां सर्व लोकाना दुःख झालें. लक्ष्मणाचा वियोग जितपद्मेला फार दुःखद झाला. पण पुनः आगमन होईल म्हणून तो तिनें सहन केला.

पुण्योदय असला म्हणजे भोगाचे पदार्थ मानव कोठें जरी गेला तरी त्याची पाठ सोडीत नाहींत. पुण्यमहिमा अपार आहे असें जाणून भव्यांनीं जिनभक्ति करावी म्हणजे ते सांसारिक दुःखापासून दूर राहतील.

# एकोणचाळीसावें पर्व.

अतिवीर्याच्या तनया विजयरथा राजनीतिचतुरास ।
रामें तत्पितृराज्यीं[1] स्थापन केलें करून भक्तिवश ॥ १ ॥
त्यानें भगिनी अपुली रतिमाला लक्ष्मणास आनन्दें ।
रति-तुल्य-सुन्दराङ्गी दिली जिच्या प्रेम नित्य मनिं नांदे ॥ २ ॥
लक्ष्मण वरून तिजला लक्ष्मीसम हृदयिं सर्वदा मानी ।
श्रीराम-लक्ष्मणांच्या मानिति आनन्द सुजन गुणगानीं ॥ ३ ॥

( रामचन्द्रादिक पुनः विजयपुरास येतात. )

विस्मयदायक-पूजा करुनि श्रीमज्जिनेन्द्रदेवाची ।
लक्ष्मण सीतादेवीसह जी पापास्रवास[2] वहु जाची ॥ ४ ॥
श्रीरामचन्द्र आले विजयस्थानास विजय मिळवून ।
झालें प्रसन्न त्यांचें मन युद्धाचा प्रसङ्ग निरसून ॥ ५ ॥
अतिवीर्यास नटीनें सभेंत केलें निवद्ध म्हणुनि तयें ।
श्रीजिनदीक्षा घेउनि सत्तप केलें विरक्तशा हृदयें ॥ ६ ॥
वार्ता कर्णीं पडतां शत्रुघ्ना हास्य येइ उपहासें ।
भरतें निषेधिलें तें कार्य तुझें उचित नैव निन्द्य दिसे ॥ ७ ॥

( भरत अतिवीर्याची स्तुति करतो. )

अतिवीर्य धन्य झाला विषयकषायास सोडिलें त्यानें ।
तो शान्तदान्त[3] झाला योग्य न मज वाटतें तुझें हंसणें ॥ ८ ॥
देवासहि दुर्लभ जो प्रभाव तो प्राप्त होय सुतपानें ।
होता जो अरि आम्हां झाला तो आज वन्द्य विनयानें ॥ ९ ॥
यापरि अतिवीर्याची स्तुति असतां करित भरत विजयरथ ।
अतिवीर्यपुत्र आला केलें त्या नमन धरुनि विनयपथ ॥ १० ॥
नानाभूषणभूषित-कन्या, धनकोश, सारसैन्य असे ।
अर्पण करावयाला भरताला आणिलें तयें सुरसें ॥ ११ ॥

---

१ त्याच्या पित्याच्या राज्यावर– अतिवीर्याच्या राज्यावर. २ पापाच्या [आस्रवा]स. ३ जितेन्द्रिय.

त्यांतून एक कन्या स्वीकारुनि सर्व त्यास परत दिलें ।
जे जे सज्जन असती त्यांचे असतात सर्व मार्ग भले ॥ १२ ॥
रतिमालेची भगिनी वडील जी विजयसुन्दरी नामें ।
भरता विजयरथानें दिली असे प्रेमसन्धिच्या कामें ॥ १३ ॥

( अतिवीर्य मुनींना वंदून भरत त्यांची स्तुति करितो. )

बहुवेगवंत घोडे घेउनि मनिं भरत भक्तिभावें भरें[1] ।
अतिवीर्यमुनीन्द्रपदा वंदाया येइ पापकर्महरें ॥ १४ ॥
कोठें महामुनीश्वर अतिवीर्य असे असें विचारीत ।
आला एका गिरिवरि भक्ताची ही असे खरी रीत ॥ १५ ॥
पाषाण विषम ज्याचे ऐशा गेला चढून गिरिवरती ।
पाहे यति अतिवीर्या होती अत्यन्त शान्त यन्मूर्ति[2] ॥ १६ ॥
नच रोषतोष ज्याला प्रशान्त यत्काय मुक्तिमार्ग कथी ।
बसला शिलातलावरि ज्याची नासाग्रें[3] दृष्टि आत्मरथीं ॥ १७ ॥
सिंहासमान निर्भय बघून त्या भक्त भरत नमन करी ।
पूजी अष्टद्रव्यें तद्गुणगानस्तुतीस विस्तारी ॥ १८ ॥
आपणचि शूर नाथा जिनदीक्षा परमदुर्धरा धरिली ।
परमार्थनिपुण आपण विषयातुरता[4] समस्त ही हरिली ॥ १९ ॥
झाला विशुद्धवंशीं जन्म जयाचा असे महापुरुष ।
संसारदेहभोगीं विरक्त होऊन वर्जिती रोष ॥ २० ॥
येउनि मनुष्यजन्मीं इच्छावें सुफल तें तुला लाभे ।
नाथा तदलाभानें[5] दीनात्मा नैव आमुचा शोभे ॥ २१ ॥
जे दुर्विचार हृदयीं झाले उत्पन्न आपणाविषयीं ।
आम्हा क्षमा करावी नति अमुची नित्य आपुल्या पायीं ॥ २२ ॥
यापरि बोलुनि भरत प्रदक्षिणा त्यास तीन देऊन ।
वन्दन करून उतरे हर्षित होऊन पर्वतावरुन ॥ २३ ॥
अश्वावरि आरोहण करून सामन्तशतसुवेष्टित तो ।
भरत अयोध्यानगरीं गेला ज्याच्या मुनीन्द्र मनिं वसतो ॥ २४ ॥

---

१ अतिशयभक्तीनें. २ ज्यांचें शान्त शरीर. ३ नाकाच्या शेंड्यावर.
४ विषयांत लुब्धता. ५ सुफलाची प्राप्ति न झाल्यानें.

ज्यांनीं अतिवीर्य-नृपा वश केलें चतुर नर्तकी कोण ।
कोडें न उलगडें हें झालें विस्मित अतीव भरतमन ॥ २५ ॥
शक्ति न ऐशी स्त्रीगणिं जिनशासनदेवताच असतील ।
त्यांनींच कार्य केलें इतरां नच हें सुसाध्य होईल ॥ २६ ॥
यापरि भरतनृपाच्या मनांत नगरप्रवेश-समयांत ।
आले विचार तेणें झाला अत्यन्त विस्मयाक्रान्त ॥ २७ ॥
राहे सुखें अयोध्यापुरींत नृप विजयसुन्दरीसहित ।
जय जैसा हास्तिनपुरिं नान्दत होता सुलोचनेंत रत ॥ २८ ॥

( मीही तुमच्याबरोबर येते असा वनमालेनें हट्ट धरिला तेव्हां मी कांहीं दिवसांनीं तुला घेऊन जाईन व न घेऊन जाईन तर मला रात्रीं जेवणाऱ्याइतकें पातक लागेल असें लक्ष्मणानें म्हटल्याबरोबर तिनें त्याच्याबरोबर जाण्याचा हट्ट सोडला. )

राम नि लक्ष्मण सीता पृथ्वीधरनृपतिनगरिं राहून ।
कांहिं दिनावधिनन्तर इष्टस्थानार्थ करिति जैं गमन ॥ २९ ॥
श्रीलक्ष्मणास वदली वनमाला अश्रु नयनिं आणून ।
सोडून मला जाता योग्य दिसे काय आपुलें गमन ॥ ३० ॥
मरणेच्छेनें असतां जात वनीं रक्षिलें कशास मला ।
येणार आपणासह तुमच्या चरणांत जीव मम रमला ॥ ३१ ॥
लक्ष्मण तिजला वदला मातु नको तूं विषाद हृदयांत ।
येऊन तुला घेऊन भद्रे जाईन अल्पसमयांत ॥ ३२ ॥
मी जर परत न येइन सम्यग्दर्शन[१]विहीन कुगतीस ।
जाईन मान हृदयीं तथापि विश्वास येइ नच तीस ॥ ३३ ॥
अभिमानदग्ध नर जे जे मुनिनिन्दा मनांत करितात ।
तत्पापानें होइन लिप्त सखे ! मी न येइ जरि परत ॥ ३४ ॥
आम्हा रक्षायाचें आहे पितृवाक्य म्हणुनि वनिं आलों ।
दक्षिणसमुद्रतीरीं जातां होऊ मनांत बहु धालों ॥ ३५ ॥
पाहून रम्यसें स्थल मलयाद्रीच्या समीप सुगृह करूं ।
आम्ही नन्तर येउनि अवश्य तव विरहवेदनेस हरूं ॥ ३६ ॥
वनमाला परि वदली या शपथा मजसि मान्य नाहींत ।
येणार मी तुम्हासह येण्यांतचि वाटतें मला सुहित ॥ ३७ ॥

---

१ सम्यक्त्वानें रहित.

वदला लक्ष्मण पुनरपि भद्रे तूं सांगशील ती शपथ ।
आहे तयार घेण्या माझा रोधू नकोस गे सुपथ ॥ ३८ ॥
निशि भोजन जे करिती त्यांना लागेल पाप जें त्याची ।
वाहाल शपथ आपण मानिन भवदागतीस[1] मी साची ॥ ३९ ॥
मी रात्रिभोजकांच्या पापें होईन लिप्त सुन्दरि गे ।
जरि परत न मी येइन सम्मति जाण्यास देइ मज वेगें ॥ ४० ॥
यापरि करून भापण वनमालेच्या प्रसन्न करुनि मना ।
श्रीरामाच्या सन्निध लक्ष्मण मानून मोद करि गमना ॥ ४१ ॥
रात्रौ रामादिक ते नागरजन[2] सर्व झोपले असतां ।
गेले कुणा न समजे जिननाम स्मरण करुनि तैं जातां ॥ ४२ ॥
प्रातःकालीं पुरजन रहित तयें नगर आपुलें पाही ।
शोक तया वहु झाला समजे जणु नष्ट जाहलें कांहीं ॥ ४३ ॥
लक्ष्मणविरहित पाहुनि घर झाली शोकखिन्न वनमाला ।
सौभाग्यसूचकाविण[3] घाली न गळ्यांत अन्य मणिमाला ॥ ४४ ॥
इकडे जनविस्मय कररामादिक हा त्रिवर्ग भूवरती ।
विहरत आनन्दानें होता सन्तोप ज्याचिया चित्तीं ॥ ४५ ॥
पाहून लोक त्यांना आले खालीं विहार करण्यास ।
हे देव हरिति रूपें समजे अमुच्या सुनेत्रहृदयास ॥ ४६ ॥

( रामादिकांना पाहून लोक त्यांच्याविषयीं धन्योद्गार
काढीत असत. )

पुण्यधन कोण, माता कोण, पिता ज्यांचिया घरीं झाला ।
या पुरुपपुंगवांचा धन्यपणा सर्वदा तया आला ॥ ४७ ॥
ही स्त्रीही धन्य असे भार्या झाली असे जयाचीही ।
यापरि लोकोक्ति अशी त्यांच्या कानीं पडे सदा पाही ॥ ४८ ॥
आले कोठुनि हे जन सुन्दर कोणाकडेस वा जाती ।
ते धन्य जाहले वा होतिल याच्यांत लवहि न भ्रान्ति ॥ ४९ ॥
पाहायाहि असे जन पुण्याविण लाभती न ध्या ध्यानीं ।
तें पुण्य मिळवि जो नर शोभे तो भाग्यवन्त सुजनगणीं ॥ ५० ॥

---

१ आपलें परत येणें. २ नगरवासी लोक. ३ सौभाग्यवतीपणाचे अलंकाराशिवाय.

यापरि सुजनालापा[1] ऐकत जाती अनेक नगरांत ।
ते शुद्धचित्त मानव विकार ज्यांच्या नसे विहारांत ॥ ५१ ॥

( रामादिक क्षेमाञ्जलिनगरांत येतात. तेथें शत्रुन्दमराजानें फेकलेल्या
पांच शक्तींना जिंकून लक्ष्मण जितपद्मा राजकन्येला वरतो. )

पर्यटनें[2] करित आले क्षेमाञ्जलि नाम पुरवराजवळ ।
उद्यानांत नि तेथुनि लक्ष्मण गांवांत ये महाचपल ॥ ५२ ॥
ज्याच्या गळ्यांत माला अंगावरि पीतवस्त्र खुलुनि दिसे ।
तो लक्ष्मण ये नगरीं विनय जयाच्या महान् मनांत वसे ॥ ५३ ॥
वेशींतुनि येतांना कोणाचा शब्द येइ तत्कर्णीं ।
जो शक्ति नृवर साही जितपद्मेचा धरील तो पाणी[3] ॥ ५४ ॥
मी स्वर्गराज्य देइन ऐसें स्वप्नांत नृपति बोलेल ।
इहलोकनाश होतां स्वर्गाचें राज्य कोण पावेल ॥ ५५ ॥
सम्पूर्ण वस्तुनिर्वहीं[4] प्रियजीवित सर्वदैव जीवास ।
त्याच्यासाठीं सगळें प्रिय त्याविण येइ कोण कामास ॥ ५६ ॥
ऐकुनि वचन तयाचें लक्ष्मण विनयें तया नरास पुसे ।
कोण असे जितपद्मा मज सांगा त्यांतलें रहस्य कसें ॥ ५७ ॥
या नगरीचा राजा शत्रुन्दम नाम हें असें त्याचें ।
'जितपद्मा' तत्कन्या जिंकी पद्मेस रूप खचित तिचें ॥ ५८ ॥
यौवनसम्पन्न असे बाला सगळ्या कलांत ती निपुण ।
पुंद्वेषिणी असे परि पुरुष तिला आवडे कसा कोण ॥ ५९ ॥
पुल्लिंग शब्द जो जो न वदे ती केधवाहि वदनानें ।
सर्व व्यवहार हिचा पुरुषार्थानें विहीनसा जाणें ॥ ६० ॥
हा जो प्रासाद पुढें कैलासासम दिसे महाधवल ।
तेथें राहतसे ती जिंकायाला नसे कुणांत बल ॥ ६१ ॥
शत्रुन्दमें नृपानें शक्ति करांतील फेकलेली जी ।
ग्रहण करील नरोत्तम त्या होइल ही वरावया राजी ॥ ६२ ॥
लक्ष्मीधर हें ऐकुनि कोपमदाश्चर्य-भावनावन्त[5] ।
या कार्यीं लावावें शरीर वाणी नि आपुलें स्वान्त[6] ॥ ६३ ॥

---

१ सज्जनांचें भाषण. २ प्रवास. ३ हात. ४ समूहांत. ५ रोष, गर्व व आश्चर्य या विकारांनीं युक्त. ६ मन.

यापरि करुनि विचारा लक्ष्मण आला नृपालया पुढती ।
नृपदर्शनार्थ आलों द्वास्था वार्ता कथी तयाला ती ॥ ६४ ॥
द्वारीं अन्या योजुनि जाउनि वार्ता अशी तयें कथिली ।
राजन् बघावयाला विभूति कोणी तुला असे आली ॥ ६५ ॥
कमलासमनयनाचा नीलोत्पलतुल्यकान्ति यदेहीं ।
सौम्य प्रभावशाली द्वारीं मानव उभा असे पाही ॥ ६६ ॥
नृप सचिववदन पाहुनि वदला घेऊन ये तया येथें ।
अपुली आज्ञा जैशी बोलुनि गेला महानरा पुढतें ॥ ६७ ॥
स्वामिन्, प्रवेश अपुला मान्य असे नृपतिदर्शना जावें ।
वदतां रक्षक गेला लक्ष्मण त्या भूप बोलला यावें ॥ ६८ ॥
चन्द्रा समुद्र बघतां वाढे त्यापरि सभेस बहु मोद ।
सुन्दर गम्भीर नरा बघतां भूपास हो महाह्लाद ॥ ६९ ॥
पुष्टभुजाचा भासुर पाहुनि किञ्चित् नृपास भय वाटे ।
तो शत्रुन्दम वदला आपण हो कोण जातसा कोठें ॥ ७० ॥
वदला लक्ष्मण आहे भरतनृपाचा सुमान्य मानव मी ।
आलों तव कन्येचा मान हरायास व्हावया स्वामी ॥ ७१ ॥
कन्या दुष्ट-गर्वीही अद्यापि अभग्नमानशृङ्गा ही ।
तूं पोषिलीस राजन् दुःखद सर्वा जनास परि पाही ॥ ७२ ॥

( शत्रुन्दम राजा म्हणाला कीं सोडलेली शक्ति जो वीर आपल्या हातांत धरील तो जितपद्मेच्या अभिमानाचा नाश करील. तेव्हां लक्ष्मण म्हणाला: एकच शक्ति काय पण पांचही शक्ति मी धरीन असें म्हणून त्यानें पांच शक्ति धरिल्या. )

मी शक्ति सोडिली जी निःशङ्क धरी करांत जो वीर ।
कन्या-जितपद्मेच्या अभिमानाला करील तो चूर ॥ ७३ ॥
लक्ष्मण वदला राजन् एकचि कां पांच शक्ति तूं सोड ।
झेलून शक्तिपञ्चक निजशक्ति प्रगट करिन मी गूढ ॥ ७४ ॥

---

१ देवडीवरच्या रक्षक द्वारपाल. २ माहात्म्यशाली. ३ निळ्या कमला-सारखी कान्ति ज्याच्या देहांत आहे तो. ४ तेजस्वी. ५ आदरणीय. ६ पांचांचा समूह.

गर्वोद्धत उभयांचा विवाद ऐकून येइ जितपद्मा ।
पाहून लक्ष्मणाला झाली नृद्वेषरहित निश्छद्मा[1] ॥ ७५ ॥
खूण तियेनें केली या कार्याहुनि निवृत्त व्हायास ।
भय मनिं धरूं नको गे संज्ञेनें कळवि तोहि मग तीस ॥ ७६ ॥
राजन् भय नच धरितां सोडी माझ्यावरी तुझी शक्ति ।
क्षत[2] मी नच होइन भो माझ्या होइल शक्तिची व्यक्ति ॥ ७७ ॥
रागावुनि भूपानें परिकर वान्धून लक्ष्मणावरती ।
अग्निसमा शक्तीला फेकाया शीघ्र घेतलें हातीं ॥ ७८ ॥
भुवया चढवुनि वदला इच्छिसि मरणास हो तयार नरा ।
ऐसें म्हणून फेकी शत्रुन्दमभूप शक्ति हे चतुरा ॥ ७९ ॥
परि उजव्या हातानें लीलेनें वीर तो तिला घेई ।
पाकोळी धरण्याला गरुडाला श्रम कसा बरें होई ॥ ८० ॥
डाव्या हातें दुसरी, तिसरी, चौथीहि दोन काखांनीं ।
पंचम[3] धरि दन्ताग्रें मृगेन्द्र पेशी[4] जसा धरी वदनीं ॥ ८१ ॥
यापरि अद्भुत पाहुनि लक्ष्मीधरशक्ति शक्ति धरण्यांत ।
सुमवृष्टि सुरें केली वादन-नर्तन नि गान-तानांत ॥ ८२ ॥
आतां शत्रुन्दमनृप पाही मम शक्ति जेधवा वदला ।
लक्ष्मण सभाजनांना महाभयें घाम तेधवा आला ॥ ८३ ॥
लक्ष्मीचें क्रीडागृह लक्ष्मण वक्षःस्थलास पाहून ।
विस्मित भूप जहाला अक्षत करि आपुलें अधो वदन ॥ ८४ ॥
गालीं पडे स्मिताची जिच्या खळी मधुर येइ जितपद्मा ।
घालून मान खालीं निजरूपें जी खरीच जितपद्मा[5] ॥ ८५ ॥

( जितपद्मेनें लक्ष्मणाला वरिलें. )

लक्ष्मणरूपें चरितें झाली आकृष्ट म्हणुनि जी आली ।
त्याच्यासमीप शोभे इन्द्रासन्निध जशी शची गमली ॥ ८६ ॥
स्पर्शें कम्पित झालें मन त्याचें जें न केधवाहि रणीं ।
कण्ठीं माला घाली त्याच्या लावून दृष्टि ती चरणीं ॥ ८७ ॥

---

१ सरळ विचाराची. २ जखमी. ३ पांचवी. ४ मांसाचा तुकडा.
५ जिनें लक्ष्मीला जिंकिलें आहे अशी.

शत्रुन्दमास झाला लक्ष्मणकार्यें अतीव आनन्द ।
तो भेटला तयाला लक्ष्मण वाटे तयास सुखकन्द ॥ ८८ ॥
ज्यानें मदार्द्रगण्डा प्रचण्ड रणिं जिंकिलें गजेन्द्रगणा ।
त्या मजला हे भद्रा ! जिंकियलें तूं अजिक्य वीरजनां ॥ ८९ ॥
ज्यानें वन्यगजांना केलें जिंकून सुवश लीलेनें ।
त्या मजला तूं जिंकुनि केलें पददास आज एकमनें ॥ ९० ॥
शक्ति अपूर्व अशी तव रूपा अनुरूप सर्व सुगुण तुझें ।
उद्धतता नच लवही नसें अलंकार मानिशी ओझें ॥ ९१ ॥
यापरि राजा बोलत असतां लक्ष्मण अधोमुखी झाला ।
लज्जावश जणु सोडुनि सभेस अन्यत्र वा असे गेला ॥ ९२ ॥
जितपद्मेचा आपण कर घ्यावा निजकरांत सुख लाभो ।
इच्छा पूर्ण करावी उत्कट मद्भाव सुजन वदलों भो ॥ ९३ ॥

( माझ्या वडील भावाच्या आज्ञेप्रमाणें मी वागतो. त्याला आपण हें वृत्त कळवावें असें लक्ष्मण म्हणाला. )

यापरि शत्रुन्दमनृप वदतां लक्ष्मण तया असें बोले ।
या नगराच्या निकट ज्येष्ठ भ्राता तया वदाचि भलें ॥ ९४ ॥
नन्तर शत्रुन्दमनृप जितपद्मा लक्ष्मणास घेऊन ।
आला सदार[२]रामासन्निध हृदयांत मुदित होऊन ॥ ९५ ॥
क्षुब्ध समुद्रारवसा[३] रथचक्रध्वनि दुरून ऐकून ।
आकाशीं धूलीचा गेलेला उंच लोट पाहून ॥ ९६ ॥
सीता वदली नाथा कलहाचा हेतु लक्ष्मणें केला ।
आतां सज्य धनुष्या करून व्हावें तयार युद्धाला ॥ ९७ ॥
परि येइ मधुर गाणें कानीं मंगल मना प्रमोदकर[४] ।
आला सुवासिनींचा वृन्द पुढें आरतीसुयुक्तकर ॥ ९८ ॥
नर्तन करीत कांहीं नारीगण त्या स्थला मुदें आला ।
पाहून राम-सीताहृदयीं मोदाब्धिपूर उद्भवला ॥ ९९ ॥
लक्ष्मण जितपद्मेसह उतरून रथावरून ये खालीं ।
सीता-रामा वंदी त्यांची पदधूलि लाविली भालीं ॥ १०० ॥

---

१ रानटी हत्तींना. २ पत्नीसहित अशा रामाजवळ. ३ गर्जनेप्रमाणें. ४ आनंद देणारें.

होउनि सलज्ज लक्ष्मण विनयें रामासमीप राहि उभा ।
सीतेसमीप राही जितपद्मा ये अपूर्वशी शोभा ॥ १०१ ॥
शत्रुन्दमादिकांनीं रामपदा नमन आदरें केलें ।
त्याच्यासमीप येउनि सगळे ते मोदपूर्णसे वसले ॥ १०२ ॥
कुशलप्रश्न विचारुनि अन्योन्यांना प्रमोद बहु झाला ।
नगरीं येण्यासाठीं भूपति विनवी प्रसन्न रामाला ॥ १०३ ॥
लक्ष्मणसीतेसह [१]तैं रथांत आरूढ वैभवें झाला ।
नगरीं प्रवेश सिरवत सर्वांनीं हृष्टमानसें केला ॥ १०४ ॥
शत्रुन्दम-राजाच्या विशालसौधीं त्रिवर्ग राहून ।
सुख भोगिलें तयांनीं स्वर्गसुखाहून जें नसे ऊनें[२] ॥ १०५ ॥

( जितपद्मेनें बरोबर येण्याचा आग्रह केला असतां लक्ष्मणानें
तिचें समाधान केलें व तो रामासह वनवासार्थ गेला. )

तेथुनि जातेसमयीं वदली लक्ष्मीधरास जितपद्मा ।
भीता वियोगदुःखें न्यावें मज बोलली गतच्छद्मा[३] ॥ १०६ ॥
प्रियवाक्यें लक्ष्मीधर वनमालेसम तियेस बोलून ।
सीता-रामासह वनिं अर्ध्यारात्रीं करीतसे गमन ॥ १०७ ॥
पौरजनांसहि[४] झाला वियोग दुःखद तदा त्रिवर्गाचा ।
सहन स्वमनें केला वर्णू शकली तयास नच वाचा ॥ १०८ ॥
प्राग्जन्मपुण्य त्यांना जेथें जाती सुखांत ठेवी तें ।
सर्वर्तु-सौख्य देउनि संसारीं सतत तें प्रमोदवितें ॥ १०९ ॥
मिष्टान्नादिक अनुपम दुर्लभसें तेंहि त्यामुळें मिळतें ।
परि पुण्यहीन मनुजा पदोपदीं पीडितात दुःखशतें ॥ ११० ॥
भोगाशीं मम नाहीं कांहींहीं कार्य नष्ट होवोत ।
यापरि करिती द्वेषी निन्दा त्यांची सदा त्रिलोकांत ॥ १११ ॥
गेला पर्वतशिखरीं परि तेथेंही तयासवें जाती ।
जिनदास पुण्यमहिमा अपार आहे असें जना कथिती ॥ ११२ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत
पद्यानुवादे जितपद्मोपाख्यानं नामोनचत्वारिंशत्तमं पर्व ॥ ३९ ॥

---

१ रामचन्द्र. २ कमी. ३ कपटानें रहित. ४ पुरवासी लोकांना.

## चाळीसाव्या पर्वाच्या कथेचा सारांश.

क्षेमाञ्जलि नगरांतून रामचन्द्र, लक्ष्मण व सीता आपलें प्रयाण कोणाला समजू न देतां अर्ध्यारात्रीं निघून गेले. वाटेंत कोठें वेलीचें सुन्दर कोवळें लाल पान दिसलें म्हणजे तें रामचन्द्र सीतेच्या कानावर ठेवित असत. कोठें कोठें वेली एकमेकींत गुंतून आपोआप झोका तयार झालेला असे त्यावर सीतेला बसवून ते तिला झोका देतांना गाणें म्हणत असत.

कोठें पळसांची रांग फुललेली दिसे तेव्हां जणु वनांत अग्नि पेटल्याप्रमाणें भास होई. कोठें तमालवृक्षांची खूप गर्दी झालेली असल्यामुळें त्यांच्या काळ्यापानांनीं अंधार या ठिकाणीं येऊन राहिल्याप्रमाणें वाटे.

याप्रमाणें या तिघांनीं अनेक गांवें, नगरें, वनें उल्लंघिली व हे 'वंशस्थल' नगराच्या जवळ आले. या नगराच्या जवळच एक विशाल 'वंशधर' नामक पर्वत होता. त्याच्या शिखरावर मेघ सदा विश्रांति घेत असत. पर्वतावरून पाण्याचे शुभ्र झरे खालीं पडत होते. त्यांच्या मिषानें तो पर्वत हंसत स्वागत करीत आहे असें रामादिकांना वाटलें.

वंशस्थल नगराजवळ तिघेजण येत असतां नगरांतून लोक पळत चाललेले त्यांना दिसले. कां हे पळतात असें एका मनुष्याला थांबवून रामचन्द्रांनीं विचारलें— तो मनुष्य म्हणाला हे महापुरुषा, आज तीन दिवस झाले. या पर्वतावर संध्याकाळ-पासून सूर्योदयापर्यंत फार मोठा आवाज होतो. त्या आवाजानें सर्व लोकांना भय वाटतें व ते पळत सुटतात. चार कोसपर्यंत तो आवाज ऐकू येतो. त्या आवाजानें पृथ्वी थर थर कांपते. झाडें उन्मळून पडतात. कानांत ते शब्द पडतांच वज्राघात झाल्याप्रमाणें दुःख होतें म्हणून आम्हीं रात्रीं पळून जाऊन दूर वनांत राहतो व दिवसा पुनः येऊन या गावांत राहतों.

ही त्यानें सांगितलेली वार्ता ऐकून सीता म्हणाली– नाथ, आपणही या लोकाबरोबर जाऊन राहू. विनाकारण आपला जीव धोक्यांत कां घालवा? रामचन्द्र व लक्ष्मण म्हणाले. तूं या लोकाबरोबर जाऊन सकाळीं येथें ये म्हणजे आमची भेट होईल पण आम्ही मात्र येणार नाहीं. या पर्वतावर कोणाचा प्रचण्ड आवाज होतो याचा शोध आम्ही करणार आहोत. सीता म्हणाली तुम्हां दोघांचा हा आग्रह खेकड्याच्या पकडीसारखा न सुटणारा आहे. रामचंद्र म्हणाले– देवी, हे लोक भेकड आहेत. हे जावोत. आमच्याबरोबर तूं चल, धैर्य धर, असें म्हणून पुढें रामचन्द्र, त्यांच्यामागून सीता व तिच्यामागें राहून लक्ष्मण चालू लागले. थकवा वाटू लागला म्हणजे राम व लक्ष्मण तिचा हात धरून नेत असत. याप्रमाणें चालून पर्वताच्या उंच शिखरावर तिघे पोहोंचले.

तेथें सागराप्रमाणें गंभीर व पर्वताप्रमाणें निश्चल ध्यानमग्न दोन मुनीश्वरांना त्यांनीं पाहिलें. ते अगदीं तरुण होते. पूर्ण दिगम्बर होते व आत्मा आणि देह अन्योन्य भिन्नस्वरूपांचे आहेत असें चिन्तन करीत होते. धन, पुत्र व पत्नी यांच्या मोहानें संसारभ्रमण होतें व मोह त्यागला म्हणजे अक्षयमोक्ष सुखाची प्राप्ति होते असें चिंतन ते करीत होते. या तिघांनीं त्यांच्या चरणांना नमस्कार केला. त्यांच्या मनांत भक्ति उत्पन्न झाली व तिघे त्यांच्या चरणाजवळ बसले.

त्यावेळीं काळेकुट्ट सर्प फूत्कार करीत आले व त्यांनीं मुनींच्या देहाला वेढून टाकिलें. त्यांच्या लाल डोळयांतून विष बाहेर पडत होतें. मोठे, विषारी व अनेक रंगाचे विंचू आपली नांगी वर करून मुनीच्या देहावर चढू लागले. हें दृश्य पाहून सीतादेवीला भीति वाटली व तिनें रामचंद्राला मिठी मारली. राम व लक्ष्मणांनीं धनुष्याच्या टोकानीं सर्पांचे वेटाळे काढून दूर केले, विंचू दूर केले. नंतर झऱ्याच्या पाण्यानें सीतादेवीनें मुनिचरण धुतले. वनांतील फुलांनीं तिघांनीं पूजा केली.

रामचंद्रांनीं भक्तीनें वीणावादन केलें. लक्ष्मण गाणें गाऊ लागला व सीतेनें सुंदर नृत्य केलें. नंतर थोड्या वेळानें जणु उपसर्गाच्या भीतीनें सूर्य अस्त पावला. चोहीकडे अंधार पसरू लागला. आकाशांत काळेकुट्ट असंख्य ढग जमले. प्रचण्ड आवाज होऊ लागला. राक्षस व पिशाच नृत्य करू लागले. प्रचंड आवाजानें पर्वताच्या शिला धाड धाड आवाज करीत कोसळू लागल्या. सीतेला भय वाटू लागलें. रामचंद्र म्हणाले– देवी, भिऊ नकोस मुनीश्वरांचे चरण घट्ट धरून बैस. आम्ही हा होत असलेला उपसर्ग दूर करतों पाहा. असें म्हणून आपल्या दिव्य धनुष्याला दोरी

लावून त्यांचा टंकार दोघेजण करूं लागले. तो प्रचण्ड टङ्कार ऐकून तो 'वह्निप्रभ' देव– हा बल व नारायणांच्या धनुष्याचा टंकार आहे असें जाणून भयानें तेथून पळून गेला. राक्षस, पिशाच, दगड, विजांचा चमचमाट हीं सर्व विक्रिया नाहींशी झाली. आकाश निर्मळ झालें. चंद्राचा आल्हाद देणारा प्रकाश सर्वत्र पसरला. त्या प्रकाशानें तो सर्व पर्वत व त्याच्या दऱ्या वगैरे प्रदेश शुभ्र दिसू लागले. त्याचवेळीं आत्म-चिंतनांत निमग्न असलेल्या त्या दोन मुनीश्वरांना केवलज्ञानलक्ष्मीनें आलिंगन दिलें.

अनेक वाहनांत बसून चारनिकायांचे देव व विद्याधरादिक मुनीश्वरांच्या केवलज्ञानाची पूजा करण्यास व त्यांचा धर्मोपदेश ऐकण्यास आले. इंद्रांनीं रचलेल्या रत्नजडित अमूल्य सिंहासनावर ते मुनियुग्म बसलें होतें.

राम व लक्ष्मणांनीं त्यांना वंदन करून हे भगवंता, आपणा दोघांना कोणी व कां उपसर्ग केला? हें आम्हास सांगावें. मुनिद्वयांनीं याप्रमाणें आपलें पूर्वभवचरित सांगितलें:—

पद्मपुरनगरांत विजयशैल नामक राजाचा अमृतस्वर नामक दूत राहत होता. त्याच्या पत्नीचें नांव उपयोगा. या दंपतीला उदित व मुदित नांवाचे दोन पुत्र होते. त्या दोघांचा विवाह झाला होता. अमृतस्वराच्या मित्राचें 'वसुभूति' नांव होतें. हा वरून प्रेम दाखवित असे पण मनांत त्याचा नाश करण्याची वाट पाहत असे कारण अमृतस्वराची पत्नी त्याच्यावर आसक्त झालेली होती.

एकेवेळीं कांहीं राजकार्यास्तव 'अमृतस्वर' परगांवीं जाण्यास निघाला. वसुभूतिही त्याच्याबरोबर गेला. वाटेंत त्याला ठार करून परत आला व मला मित्रानें परत पाठविलें म्हणून मी आलों व मित्रही लौकरच येईल असें त्यानें लोकांना सांगितलें.

रात्रीं उपयोगेला तो भेटला व तुझ्या प्रेमासाठीं मी अमृतस्वराला ठार मारून आलों आहे असें म्हणाला. ती म्हणाली फार चांगलें केलें. माझ्या दोन पुत्रांनाही मारून टाका म्हणजे आपल्या सुखांत कोणताही अडथळा राहणार नाहीं. हें ती सांगत असतां उदिताच्या बायकोनें गुप्तरीतीनें ऐकून उदिताला सावध राहण्यास सांगितलें. वसुभूतीनेंच आपल्या पित्याला मारलें आहे असें मुदिताला निश्चयानें वाटत होतें म्हणून त्यानें त्याला तरवारीनें ठार मारिलें व त्याच्या रक्तानें माखलेली तरवार मुदितानें उदिताला दाखविली. वसुभूति मरण पावून म्लेच्छ झाला.

इकडे एकेवेळीं पद्मिनीनगराच्या बगीच्यांत मतिवर्धनसूरि आपल्या संघासह आले. त्यांच्या दर्शनासाठीं राजा विजयशैल व उदित आणि मुदित गेले. आचार्यांनीं केलेल्या धर्मोपदेशानें राजाला व उदित-मुदित यांनाही वैराग्य झालें. तिघांनीं मुनि-दीक्षा घेतली. दोघा बंधूंनीं तपश्चरण केलें व सम्मेदशिखरांची वंदना करण्यासाठीं ते निघाले. रस्ता चुकून एका घोर जंगलांत ते गेले. तेथें वसुभूतीचा जीव म्लेच्छ झालेला होता. त्यानें या दोन मुनींना पाहिलें. त्याच्या मनांत अतिशय क्रोध आला. व तो त्या मुनियुगाला मारण्यासाठीं त्यांच्या अंगावर धांवला. दोघा मुनींनीं आपल्या मनाला रत्नत्रयांत स्थिर केलें. त्यांनीं देहावराचा मोह त्यागिला. आत्मचिंतनांत ते निमग्न झाले. त्यांना मारण्यासाठीं धांवून जात असतां म्लेच्छांचा सेनापति तेथें आला व त्यानें मुनींचें रक्षण केलें. येथें रामचंद्रांनीं केवलींना प्रश्न विचारला. प्रभो, सेनापतीनें मुनिद्वयाचें कां रक्षण केलें? केवलींनी रामाच्या प्रश्नाचें उत्तर असें दिलें:—

यक्षस्थान नामक गांवांत सुरप व कर्षक नांवाचे दोघे बंधु राहत होते. एकदां एका पारध्यानें एका पक्ष्याला जाळयांत पकडून आणिलें. सुरप व कर्षकांनीं त्या पारध्याला कांहीं पैसे दिले व त्यापासून तो पक्षी घेतला व त्याला जाळयांतून काढून आकाशांत सोडून दिलें. अशारीतीनें ज्याला अभयदान मिळालें तो पक्षी सेनापति झाला. सुरप व कर्षक हे दोघे मरून उदित व मुदित नामक बंधु झाले व वसुभूति हा म्लेच्छ होऊन जन्मला.

इकडे उपसर्ग दूर झाल्यावर त्यांनीं सम्मेदादि सर्व सिद्धक्षेत्रांची वंदना केली. आमरण रत्नत्रयाचें निर्दोष पालन केलें. व समाधि साधून ते दोन मुनिबन्धु स्वर्गांत जन्मले.

वसुभूति जो म्लेच्छ झालेला होता तो नानाकुयोनिमध्यें जन्मून दुःखें भोगू लागला. एकेवेळीं त्याला कांहीं शुभकर्मानें मनुष्यभव मिळाला. त्यावेळीं त्यानें कुतप केलें. मरून तो ज्योतिर्लोकांत अग्निकेतु नामक देव झाला.

या भरतक्षेत्रांतील अरिष्टपुरनगराच्या प्रियव्रत राजाला कनकाभा व पद्मावती या दोन राण्या होत्या. जे दोन मुनि स्वर्गांत जन्मलेले होते. त्यांचें तेथील आयुष्य समाप्त झाल्यावर ते पद्मावती राणीला दोन पुत्र झाले. त्यांचीं नांवें राजानें रत्नरथ व चित्ररथ अशीं ठेविलीं. व अग्निकेतु ज्योतिष्कदेव मरण पावून कनकाभा राणीच्या गर्भांत आला. नऊ महिन्यांनीं जन्मल्यावर राजा प्रियव्रतानें त्याचें 'अनुन्धर' असें

नांव ठेविलें. हे तिघे राजपुत्र तरुण झाल्यावर प्रियव्रतानें त्यांना राज्य दिलें व त्यानें सहा दिवसांची सल्लेखना धारण करून समाधिमरणानें प्राणत्याग केला. स्वर्गांत त्याला देवपद प्राप्त झालें.

रत्नरथाचा श्रीप्रभा नामक राजकन्येबरोबर विवाह झाला. पण अनुन्धराच्या मनांत तिच्याविषयीं अभिलाष उत्पन्न झाला. त्यामुळें त्या उभयांत वितुष्ट उत्पन्न झालें. पुनः अनुन्धरानें रत्नरथाच्या राज्यांत घुसून कांहीं गांवेंहि ताब्यांत घेतलीं. त्यामुळें रत्नरथ व चित्ररथांना अतिशय राग आला. या दोघांनीं अनुन्धराबरोबर घोरयुद्ध केलें. अनुन्धराचा पराजय झाला. पूर्वभवाचें वैर, घोर पराजय आणि तीव्र अपमान झाल्यामुळें तो मिथ्यातपस्वी झाला व जटा वाढवून पञ्चाग्नितपश्चरण करूं लागला.

रत्नरथ व चित्ररथांनीं न्यायानें राज्यपालन केलें. दीर्घकालपर्यंत सांसारिकसुखें भोगिलीं. विरक्ति मनांत उत्पन्न झाल्यावर त्यांनीं पुत्रांना राज्य दिलें. व जैन-साधुपासून दीक्षा घेऊन खूप तपश्चरण केलें. समाधिमरणानें ते स्वर्गांत उत्तम देव झाले. तेथें सागरावधिवर्षे दिव्यसुखांचा अनुभव घेऊन शांततेनें मरण पावून कोठें जन्मले हे रामा आतां तूं एकाग्रतेनें ऐक :—

सिद्धार्थनगरीच्या राजाच्या क्षेमंकराच्या अत्यंत सुंदर विमला राणीच्या गर्भांत ते दोन देव आले. जन्मल्यावर वडिल पुत्राचें देशभूषण व धाकट्याचें कुलभूषण असें नांव राजानें ठेविलें. हे दोघे अत्यंत सुंदर होते. बालपण संपून विद्याग्रहण करण्याचें वय त्यांचें झालें. तेव्हां 'सागरघोष' नामक गुरूच्या घरीं राजानें त्यांना ठेविलें. गुरु शस्त्रविद्या व शास्त्रविद्येंत निपुण होते. या दोन कुमारांची बुद्धिही तीक्ष्ण होती त्यामुळें यांनीं सर्व विद्यांत प्रावीण्य मिळविलें. विद्या शिकत असतां ते दोघे राजकुमार तिच्यांत इतके तन्मय झाले होते कीं, घरच्या लोकांचीं कांहींच स्मृति राहिली नाहीं. पुष्कळ वर्षांनीं गुरूनें त्या दोघांना राजवाड्यांत आणिलें. आपले पुत्र गुरूजींनीं अतिशय शस्त्रशास्त्रनिपुण केलेले पाहून राजा क्षेमंकराला फार आनंद वाटला. त्यानें गुरुजीचा धन, धान्य, वस्त्रें, रत्नें इत्यादिक देऊन चांगला आदर केला. गुरुजी आनंदित होऊन स्वस्थानीं निघून गेले.

हे दोघे राजकुमार पुरशोभा पाहण्यासाठीं राजवाड्यांतून बाहेर निघाले असतां त्यांना खिडकींत बसलेली एक अत्यंत सुंदर कुमारी दिसली. या दोघांच्या मनांत तिच्या संगमाची अभिलाषा उत्पन्न झाली. व ते दोघे खड्गानें एकमेकाला मारण्या-

साठीं उद्युक्त झाले. इतक्यांत स्तुतिपाठकांचे शब्द त्यांच्या कानीं याप्रमाणें पडले. " राजा क्षेमंकर व राणी विमलादेवी नेहमी वैभवशाली होवोत व ज्यांची ही कमलोत्सवा बहिण आहे असे हे दोन कुमार जयवन्त होवोत." ही स्तुतिपाठकवचनें कानीं पडल्यावरोबर अरेरे आम्ही अत्यंत पापी विचार मनांत आणिले. आम्हाला शतधा धिक्कार असो. अत्यंत नीच मनुष्याच्या मनांतही जे विचार यावयाचे नाहींत असे विचार आम्ही मनांत आणले आम्हाला धिक्कार असो. अशा परिणामांनीं आम्हाला नरकप्राप्ति होईल. आतां सम्यग्ज्ञानानें उत्तम चारित्रांत आपलें आयुष्य व्यतीत केलें पाहिजे असा त्यांनीं विचार ठरविला.

दीक्षा घेण्याचा पुत्रांचा विचार पाहून राजा क्षेमंकर व राणी विमला दोघेही मूर्च्छित झाले. पण या कुमारांनीं मूर्च्छित अवस्थेंतही माता-पित्यांचा त्याग केला. वनांत जाऊन त्यांनीं दीक्षा घेतली. घोरतपश्चरणानें त्यांना आकाशगामित्व प्राप्त झालें.

पुत्रशोकानें दुःखित होऊन क्षेमंकर राजानें अन्नपाण्याचा त्याग केला व मरून तो ' महालोचन ' नामक गरुडेन्द्र झाला.

हे रामा, आम्ही उपसर्ग दूर झाल्यावर शुक्लध्यानानें घातिकर्मांचा नाश करून केवली झालों आहोत. गरुडेशाचें आसन कंपित झाल्यानें अवधिज्ञानानें आम्हाला केवलज्ञान झालें आहे असें जाणून तो येथें आलेला आहे.

अनुन्धरानें पंचाग्नितपश्चरण करीत कौमुदीपुरांत कांहीं शिष्यासह प्रवेश केला. त्या नगरीच्या सुमुखराजावर त्याचा चांगला प्रभाव पडला. त्याची प्रशंसा करीत असलेल्या राजाला स्मरविलासिनी दासी म्हणाली– राजन्, हा ढोंगी साधु आहे. हा जितेन्द्रिय नाहीं. हे तिचे उद्गार ऐकून राजाला राग आला. दासी म्हणाली– राजन्, या साधूला मी माझ्या चरणांना नमस्कार करावयास लावीन. हें दृश्य आपणाला दाखवून आपली खात्री करून देईन. असें म्हणून तिनें आपली कन्या अनुन्धर तपस्व्याकडे पाठविली. तिनें हावभावांनीं त्याचें मन वश केलें. तो तिला आलिङ्गावयास तयार झाला. ती म्हणाली– तपस्वी महाराज, माझ्या मातेपासून माझ्याशीं लग्न करण्यासाठीं परवानगी घ्या व विवाह झाल्यावर आपण कामसुखें भोगू असें म्हणून तिनें त्याला संध्याकाळीं आपल्या घरीं आणलें. तो तिच्या आईच्या ( स्मरविलासिनीच्या ) पायावर डोकें ठेवून कन्येची याचना करूं लागला. राजाला दासीनें आधींच बोलावून एका खोलींत बसविलें होते. तत्काळ राजा तिथें प्रगट झाला व

त्यानें ' अनुन्धर ' तपस्व्याला पाहिलें. त्याला त्यानें रात्रीं कोंडून ठेविलें व प्रातःकालीं गावांतून हाकून लावलें.

अपमानदग्ध होऊन तो या भूतलावर फिरूं लागला. कांहीं दिवसांनीं मरून तो पुनः कुयोनींत सागरावधिवर्षें फिरला.

पुनः एकदां नरभव त्याला प्राप्त झाला. तो मातेच्या गर्भांत असतां पिता परदेशीं निघून गेला. कुमारावस्थेंत त्याच्या मातेस म्लेच्छांनीं पळविलें. यानंतर तो कुतपस्वी होऊन ज्योतिर्लोकांत ' वह्निप्रभ ' नामक देव झाला.

मुनिसुव्रततीर्थांत अनंतवीर्य नामक केवली होऊन गेले. त्यांनीं मुनिसुव्रत-नाथाचें जिनशासन आपल्या उपदेशानें अतिशय दृढ केलें होतें. त्यांना शिष्यानें प्रश्न विचारला कीं, हे नाथ, आपल्यासारखा जिनशासनवृद्धि करणारा कोणी केवली होईल काय ? अनंतवीर्य केवली म्हणाले मी मुक्त झाल्यावर ' देशभूषण व कुलभूषण ' मुनि होऊन केवली होतील व त्यांच्यापासून हें जिनशासन अतिशय प्रभावशाली होईल. हें केवलिवचन या वह्निप्रभानें त्यांच्या समवसरणांत ऐकिलें व तें मिथ्या करण्याचा प्रयत्न केला अर्थात् आम्हाला उपसर्ग केला. हे रामचंद्रा तो तूं नाहींसा केलास रामचंद्रा, तूं मोक्षगामी आहेस हें जाणून तो पळून गेला व आम्हाला घाति-कर्मक्षयानें केवलज्ञान झालें. वैर करणें हें कुगतींत जीवाला दुःख देतें. व भवांत त्यानें फार फिरावें लागतें हें जाणून तें त्यागावें. व भव्यजनांनीं, संसारभयभीत व्हावें. याप्रमाणें केवलिद्वयाच्या मुखांतून अमृताप्रमाणें मिष्टवाणी ऐकून सर्वांना आनंद झाला.

त्यावेळीं केवलियुगाच्या चरणांना वंदून गरुडेश महालोचनदेव रामचंद्रांना म्हणाला कीं, रघुकुलतिलका, तूं उपसर्ग दूर करून माझ्या पुत्राचें प्रातिहार्य– वैभव वाढविलेंस म्हणून मला आनंद वाटत आहे. तूं माझ्यापासून कांहीं वर मागून घे. मनांत याचनाखेद मानू नकोस. यानंतर रामचंद्रांनीं क्षणभर विचार केला व नंतर म्हटलें देवा, आमच्या संकटप्रसंगीं आमचें तुला स्मरण व्हावें एवढें मी मागत आहे. म्हणजे जी आम्ही मुनिसेवा केली ती सफल झाली असें मानू. व मुनिगणाचें मनांत चिन्तन करूं.

या केवलिद्वयाच्या भवाचें श्रवण करून कांहीं भव्यमुनि बनले व कांहींनीं अणुव्रतें ग्रहण केलीं.

या देशभूषण व कुलभूषण मुनींचें जो जिनदासभव्य पवित्र चरित्र सांगतो व ऐकतो त्याचें पुण्य वाढेल व पाप सुकून जाईल.

# चाळीसावें पर्व.

क्षेमाञ्जलिनगरामधिं अविदित ऐसे निघून तीनजण ।
नगरग्रामवनादि-स्थलीं क्रमें विहरले महानिपुण ॥ १ ॥
कोठें लाल नि सुन्दर कोमल घेऊन पान वेलीचें ।
सीतेच्या कानावरि ठेवी श्रीराम जें रुचें साचें ॥ २ ॥
गुन्तून एकमेकीं वेलींचा ज्या वनीं बने झोका ।
बसवून जानकीला देती श्रीराम गावुनी झोका ॥ ३ ॥
कोठें वृक्षसमूहीं तरुतलिं वैसून सांगतात कथा ।
नानाप्रसङ्ग येती जेणें ते दावितात चतुरपथा ॥ ४ ॥
मार्गांत जात असतां सीता श्रीराघवा असे बोले ।
ही वल्ली या तरुला आलिङ्गुनि सुमवती विशेष खुले ॥ ५ ॥
नाथा, पलाश पुष्पें गजबजला सर्वथा दिसे लाल ।
हा तरुतमाल अपुल्या पानें परिसर किती करी काल ॥ ६ ॥
यापरि वर्णित असतां सीतेचा मुखसुगन्ध दरवळला ।
भृङ्गें तन्मुख होतां पीडित रामें निवारिलें त्याला ॥ ७ ॥
मार्गे क्रमीत जाती सीतेसह ते अनेक देशांत ।
आले वंशस्थलपुरिं वृत्ति जयांची सदा असे शान्त ॥ ८ ॥
या नगराच्या संनिध शैल असे ‘ वंशधर ’ सुनामाचा ।
जो निबिडवंशजालें शोभे प्रिय होय बहुत रामाचा ॥ ९ ॥
उंच जयाचीं शिखरें मेघांनीं शोभतात दिनरात ।
निर्झर शुभ्रतुषारें सुजन स्वागत करून हसतात ॥ १० ॥
वंशस्थलनगरांतुनि भीतीनें पळत चालल्या लोकां ।
रामें विचारिलें त्या कोणापासून जाहला धोका ॥ ११ ॥

[ वंशस्थलनगरांतून पळत असलेल्या लोकांपैकीं एकानें कारण सांगितलें. ]

रामा मानव वदला रात्रौ शिखरीं प्रचण्डरव होतो ।
दिन तीन आज झाले तेणें पुरजन-समूह हा पळतो ॥ १२ ॥

म्हणतात वृद्धदेखिल हा अश्रुतपूर्व भयदरव आहे ।
कोणाचा उमजे नच बुधमति दिङ्मूढ जाहली पाहे ॥ १३ ॥
थर थर कांपे पृथिवी सर्वदिशा बधिर होति त्यासमयीं ।
फुटतीं सरोवरें ही पडती तरु उन्मळून जणु पाही ॥ १४ ॥
कानीं ध्वनि हा पडतां वज्रें आघात होति जणु वाटे ।
राक्षस येउनि आतां वधील आम्हांस भीति मनिं दाटे ॥ १५ ॥
यास्तव आम्ही रजनीसमयीं येथून पळुनि दूर वनीं ।
जातों प्रात:कालीं पुनरपि येऊन राहतों स्थानीं ॥ १६ ॥
येथुनि योजन अन्तर जातां अन्योन्य वचन ऐकु शके ।
निर्भय होउनि राहे जीवनजल अन्यथा अवश्य सुकें ॥ १७ ॥
ऐकुनि वचन तयाचें सीता श्रीराम-लक्ष्मणा वदली ।
जाति महाजन जेथें राहू तेथें सुखेंचि भूमितलीं ॥ १८ ॥
जाणून देशकाला नयंज्ञ[1] निजपौरुषास गाजविति ।
विजयश्री त्या वरिते होय कदापि न तया विपत्प्राप्ति ॥ १९ ॥
तेव्हां हंसून वदले उभयहि तुज भीति वाटते थोर ।
जा या लोकांसह तूं आम्ही नच येउ हाचि निर्धार[2] ॥ २० ॥
या लोकासह येइ आम्हां हुडकावयास गिरिवरि या ।
प्रात:कालीं मोठ्या पाषाणाजवळ देवि, विगतभया ॥ २१ ॥
आम्ही सुन्दरशैलीं ध्वनि कोणाचा महाभयानक हा ।
हें पाहणार आहों निश्चय अमुचा फिरेल नैव पहा ॥ २२ ॥
हे दीनलोक भेकड निर्भय करणें तया महाकठिण ।
अमुच्या सवेंचि चल तूं धरि धैर्या देवि होइ भयहीन ॥ २३ ॥
सीतादेवी वदली आग्रह तुमचा अतीव कठिण असे ।
जशि पकड खेकड्याची त्या नाशाया समर्थ कोण नसे ॥ २४ ॥
देवी वदून यापरि रामातें अनुसरून ती चाले ।
तत्पृष्ठीं[3] लक्ष्मीधर शैलावरि चढुनि ते तिघे गेले ॥ २५ ॥
चढतां शैलावरि त्या थकवा देवीपदास वहु आला ।
ती शैलाच्या शिखरीं शोभे जणु विमल सुभंग इन्दुकला ॥ २६ ॥

---

१ नीति जाणणारे शहाणे लोक. २ निश्चय. ३ सीतेच्या पाठींमागें लक्ष्मण.
४ सुन्दर.

[ आत्मध्यानीं तत्पर अशा मुनियुगलाचें रामादिकांस दर्शन. ]

विस्तीर्ण पर्वताच्या शिखरीं सीता नि राम-लक्ष्मण हे ।
गेले दिसले मुनियुग निजस्वरूपांत पूर्ण रत राहे ॥ २७ ॥
गंभीर सागरासम निश्चल गिरिवत् दिसे मुखीं तेज ।
देह नि आत्मा भिन्नचि मानी मुनियुग्म मोह हा वर्ज्य ॥ २८ ॥
सुन्दर शरीर ज्यांचें पूर्ण दिगम्बर वयेंहि नवतरुण ।
लावण्य तेज ज्यांच्या शोभे वदनांत कोवळें अरुण[1] ॥ २९ ॥
धन, मित्र, पुत्र, दारा, बान्धव परकीय मम न आहेत ।
मी एक बोधदर्शन-लक्षण वपुहून[2] अन्य मी व्यक्त ॥ ३० ॥
धन-सुतदारामोहें संसारभ्रमण होय जीवास ।
मोहत्यागें लाभे मुक्तिश्रीसदनिं सतत आवास ॥ ३१ ॥
जें जें मोहक दिसतें अनित्य निःसार दुःखदायीच ।
तें तें त्याज्यचि आहे जिनधर्म ग्राह्य एकटा साच ॥ ३२ ॥
मुनियुग्म बघुनि ऐसें भक्तिभरें हात जोडिले त्यांनीं ।
सन्तोष परम झाला करिति नमस्कार त्यांचिया चरणीं ॥ ३३ ॥

[ सर्पादिकांचा उपद्रव दूर करून रामादिकांनीं मुनिचरणांची पूजा व स्तुति केली. ]

फूत्कार करीत आले अञ्जनसम कृष्ण कुटिल[3] सर्प तिथें ।
वेढून मुनिशरीरा गुञ्जारुणनयन ओकिती विष ते ॥ ३४ ॥
नांगी करून वरती चञ्चल भयकर अनेक रंगांचे ।
स्थूल विषारी विंचू मुनिदेहीं लागले फिरूं साचे ॥ ३५ ॥
पाहून परिस्थिति ही राम नि लक्ष्मण मनांत जरि भ्याले ।
स्तब्ध क्षणपर्यन्तचि राहुनि सदुपायचिन्तनीं रमले ॥ ३६ ॥
वाटे सीतेला भय घट्ट मिठी मारिली तिनें रामा ।
सोडून देवि दे भय रक्षक मी तव समर्थ हितकामा[4] ॥ ३७ ॥
जाउनि मुनियुगसन्निध बन्धुद्वय सर्प-वृश्चिकां काढी ।
टोकें स्वधनुष्याच्या देई फेंकून मार्दवें[5] ताडी ॥ ३८ ॥

---

१ लाल. २ शरीराहून. ३ वाकडे. ४ तुझ्या हिताची इच्छा करणारा. ५ मऊपणानें.

सीतेनें यानन्तर यतियुगपद निर्झरोदकें धुतलें ।
गन्ध सुगन्धित लावुनि भक्तिभरें तेधवा तिनें नमिलें ॥ ३९ ॥
वनसुमनें सुमनानें आणुनि जीं लक्ष्मणें दिलीं तिजला ।
भावें मुनिपदिं अर्पुनि तदा तदात्मा प्रसन्न बहु झाला ॥ ४० ॥
सीता, राम नि लक्ष्मण भालावरि दोन हात जोडून ।
वन्दन करिते झाले मुनिपदभक्तींत लीन करुनि मन ॥ ४१ ॥
जणु वल्लभा मनोहर अङ्कीं घेऊन राम वीणेस ।
तारा छेडुनि काढी भक्तीनें बोल मधुर बहु सरस ॥ ४२ ॥
रामाच्या गानाला देई लक्ष्मण सुरेखशी साथ ।
वाटे कोकिलकलरव होत असे कर्णसुखदसा येथ ॥ ४३ ॥
ध्यानीं दृढ योगिजना मस्तक-वाणी-मनें नमस्कार ।
स्थिरधैर्य बघुनि यांचें स्वर्गीय सुनम्र होति सकलसुर ॥ ४४ ॥
उपमा नसे जयाला सर्वोत्तम बाधरहित जें आहे ।
'अरिहन्त' असें अक्षर मिळणें जीवास भाग्यवश पाहे ॥ ४५ ॥
मोहमहापापाणा फोडुनि सुध्यान-लोहदण्डानें ।
धर्माचरणें विरहित विश्व असे दीन जाणिलें ज्ञानें ॥ ४६ ॥
राम नि लक्ष्मीधर हे असतां गायन करीत अतिमधुर ।
सर्वपशूंचींहि मनें झालीं मृदुतर नि एकतानपर ॥ ४७ ॥
नर्तननिपुण सतीनें अभिनयपरिपूर्ण नृत्य सीतेनें ।
जे हावभावभूषित होतें केलें अतीव भक्तीनें ॥ ४८ ॥
निःशब्दपदक्षेपें[1] चञ्चल मांड्या करून ती नाचे ।
लय घेतांना कम्पित झालें कुचयुग्म पीन[2] सीतेचें ॥ ४९ ॥
जणु मन्दर[3]-शैलावर नाचे श्री तेविं नृत्य करि सीता ।
तें गानानुग होतें भक्तीची ज्यांत वाहते सरिता ॥ ५० ॥

[ सूर्यास्त झाल्यावर राक्षसानें मुनींना उपसर्ग केला.
धनुष्यटंकारांनीं राम व लक्ष्मणांनीं तो दूर केला. ]

उपसर्ग जणु भ्यालें अस्ताला सूर्यबिम्ब तें गेलें ।
सूर्यानुसरण तेव्हां सन्ध्येनें एकनिष्ठसें केलें ॥ ५१ ॥

१ आवाज न होतां पावलें टाकण्यानें. २ पुष्ट. ३ मेरुपर्वतावर.

तारागणास झांकी अभ्रासम विपुल गाढ अंधार ।
पसरे दहा दिशामधिं माजे अविवेकराज्य घनघोर ॥ ५२ ॥
ऐशासमयीं झाला प्रचण्डरव जो नभास फोडील ।
झाल्या क्षुब्ध दिशा दश जणु झाला वज्रपात विकराल ॥ ५३ ॥
उसळति विद्युज्ज्वाला नभ मेघें व्याप्त जाहलें घोर ।
व्याकुल होउनि गेला तेव्हां भिउनि प्रकाश बहु दूर ॥ ५४ ॥
आलीं भूतें नाचत दाढांनीं मुख दिसे महाभयद ।
करितीं जिकडे तिकडे नृत्य धडें वाटतो न ज्या खेद ॥ ५५ ॥
काढून लांब जिह्वा राक्षस पीतात रक्त ज्या सुखद ।
प्रेतें फाडुनि खाती पिशाच जें दृश्य वाटतें भयद ॥ ५६ ॥
करिती कठोर राक्षस रव जेणें कम्प पावते भू ही ।
पर्वतशिखरें ढळतीं निघति गुहांतून वाघ, सिंह अहि ॥ ५७ ॥
यापरि होय उपद्रव न जाणती ते यतीश परि दोन ।
कर्मक्षयकर-शुक्लध्यानीं अत्यन्त होति तल्लीन ॥ ५८ ॥
अत्यन्त भीतिदायक पाहुनि हें दृश्य नृत्य सोडून ।
थरथर कांपे सीता रामगळीं पडुनि ती धरी मौन ॥ ५९ ॥
राम वदे हे जानकि, भयहर-यतिचरण धरुनि दृढ बैस ।
दे भय सोडुनि करितों आम्ही आतां उपद्रवध्वंस ॥ ६० ॥
बोलुनि यापरि झाले राम सलक्ष्मण करावया दूर ।
उपसर्ग होति उद्यत घेउनि करिं करिति चापटङ्कार ॥ ६१ ॥
करिती भीषण गर्जन सजल जसे मेघ वज्रपातास ।
बलनारायण समजुनि 'वह्निप्रभ' जाय पळुनि निलयास ॥ ६२ ॥
ज्योतिर्भवनीं गेला सुर तो उपसर्ग जाहला दूर ।
त्याचें सर्व विचेष्टित वन्द पडे नाश पावला तिमिर ॥ ६३ ॥
नभ निर्मल बहु झालें तारावृन्दें विहार चन्द्र करी ।
धवलप्रकाश पसरे झालीं पर्वत वनें नि शुभ्र दरी ॥ ६४ ॥
इच्छुनि निजहित केलें ऐसें हें प्रातिहार्य बन्धुयुगें ।
केवलबोधरमेनें वरिलें मुनिवर्ययुग्म अनुरागें ॥ ६५ ॥

---

१ ढगासारखा. २ दाट व भयंकर ३ सर्प. ४ बनकेट.

नानायानीं वैसुनि आले तेव्हां चतुर्णिकायसुर ।
अतिशय हर्षित होउनि जोडुनि शंसिति तप:फलास कर ॥ ६६ ॥
करुनि प्रदक्षिणान्त्रय केवलिपूजन करून विनयानें ।
अञ्जलि जोडून सर्भी शोभविती अमर ते निजस्थानें ॥ ६७ ॥
केवलबोधोत्पादें[1] आले सुर जेधवा सभास्थानीं ।
दिनरात्रीचा मिटला भेद मुनीन्द्राङ्गदिव्य-कान्तींनीं ॥ ६८ ॥
विद्याधर भूगोचर मानव केवलिसभेंत जाऊन ।
वन्दुनि उचितस्थानीं वसले एकाग्रचित्त होऊन ॥ ६९ ॥
नूतन-केवलि-पूजन करून वन्दून राम-लक्ष्मण हे ।
वलनारायण वसले सीतेसह हृदयिं मोद वहु वाहे ॥ ७० ॥
तत्कालोत्पन्न अशा महार्ह[2]-सिंहासनावरी वसले ।
केवलियुग्मा रामें साञ्जलि होऊन आदरें पुसिलें ॥ ७१ ॥

[ देशभूषण व कुलभूषण मुनि रामाला आपलें पूर्वभवासह
चरित्र सांगतात. ]

हे भगवन्ता उभया कोणी उपसर्ग कां वरें केला ? ।
निर्भयवृत्ति जयांची हितकर परि आपणांस तो झाला ॥ ७२ ॥
युगपन्मुनियुग वदले जाणुनि रामा स्वकीय-चरितास ।
कालत्रयास झाले विषय अशा या समस्त विश्वास ॥ ७३ ॥
पद्मपुरनामनगरीं राजा श्रीविजयशैल नांवाचा ।
श्रीधारिणी तयाला राणी बोले मनोहरा वाचा ॥ ७४ ॥
अमृतस्वर नांवाचा गुणवत्सल[3] कार्यकुशल दूत वसे ।
शास्त्रविशारद लोकव्यवहारीं दक्ष सुरगुरूंस[4] हसे ॥ ७५ ॥
उपयोगा त्या भार्या झाले सुत उभयतांस त्या दोन ।
उदित नि मुदित सुनामें व्यवहारीं पितृसमान ते निपुण ॥ ७६ ॥
राजानें या दूता पाठविलें दूतकार्य करण्यास ।
हा स्वामिभक्त गेला ग्रामान्तरिं मानुनी निदेशास ॥ ७७ ॥

[ अमृतस्वराच्या पत्नींत आसक्त झालेल्या वसुभूतीनें त्याला
ठार मारलें व लोकांना तो लौकरच परत येईल असें सांगितलें. ]

---

१ केवलज्ञानाच्या उत्पत्तीनें. २ अमूल्य. ३ गुणावर प्रेम करणारा.
४ देवांच्या गुरुला— बृहस्पतीला.

वसुभूति मित्र त्याचा उपयोगासक्त त्यासवें गेला ।
मारुनि त्याला खड्गें परतुनि तो पद्मिनीपुरा आला ॥ ७८ ॥
लोकां सांगे मित्रें पाठविलें म्हणुनि परत मी आलों ।
येईल तोहि लौकर तद्विरहें खिन्न मी मनीं झालों ॥ ७९ ॥

[ उपयोगेनें आपल्या दोन पुत्रांनाही मार असें वसुभूतीस सांगितलें. ]

एकान्तीं उपयोगा वदली मम सुतयुगासही मार ।
म्हणजे आपण भोगू आजीवन विघ्नरहित सुखसार ॥ ८० ॥
सासूच्या त्या वचना ऐकियलें गुप्त उदितभार्येनें ।
स्वपतीला सांगितलें सावध राहावयास पूर्णपणें ॥ ८१ ॥

[ मुदितानें वसुभूतीस ठार मारलें व तो म्लेच्छ कुलांत जन्मला. ]

मतिविपर्यी होता संशय आधीच उदितहृदयांत ।
निजपत्नीच्या कथनें झालें तच्चित्त संशयातीत ॥ ८२ ॥
वसुभूतिरक्तरंजित[1] दाखविला खड्ग जेधवा मुदितें ।
आनन्दित तो झाला हर्षे शंसी तयास वचनशतें ॥ ८३ ॥
वसुभूति मरण पावुनि झाला तो म्लेच्छ निर्दयी पापी ।
जो मांसभक्षणीं रत गोमहिषादिक जनावरें कापी ॥ ८४ ॥

[ मतिवर्धनसूरींच्या उपदेशानें राजा विजयशैल व उदित आणि मुदित हे दीक्षा घेऊन विहार करितात. ]

एके वेळीं आले मतिवर्धनसूरि पद्मिनी-नगरीं ।
आली अनुन्धराख्या आर्या आर्यांत मुख्य तीहि पुरीं ॥ ८५ ॥
त्या नगरीचें होतें 'वसन्ततिलकाख्य' रम्य उद्यान ।
तेथें निजसंघासह आले ते उक्तसूरि गुणपूर्ण ॥ ८६ ॥
उद्यानाचे नोकर येउनि राजास बोलले बोल ।
पृष्ठीं व्याघ्र भयङ्कर पुढें गिरीची दरी असे खोल ॥ ८७ ॥
आतां आम्ही जावें कोणाला शरण भूप सांगावें ।
नाशप्रसंग निश्चित सांगा आम्हांस केवि वाचावें ॥ ८८ ॥
सांगा भद्रजनांनो काय असे स्पष्ट जी घडे मात ।
गूढाभिप्रायाचें तुमचें हें वचन नच असे उचित ॥ ८९ ॥

१ वसुभूतीच्या रक्तानें माखलेला.

नाथा, उद्यानामधिं मुनीश्वरांचा समूह बहु झाला ।
जरि रोधिलें तयाला शापें तो करिल दग्ध आम्हाला ॥ ९० ॥
नच रोधिलें तथापि क्रोध तुझा अग्नितुल्यसा गमला ।
यास्तव आम्ही वदलों नृपवर्या वाक्य गूढसें तुजला ॥ ९१ ॥
त्या रोकणें न शक्यचि दिग्वस्त्र महाप्रभावशाली ते ।
देवहि रोकु न शकती वृक्षाचें कोण बोलती पातें ॥ ९२ ॥
भीउ नका भद्रांनों, सोडा चिन्ता तुम्ही वसा स्वस्थ ।
येउनि तेथें करितों सगळें मी कार्य कां वरें त्रस्त ॥ ९३ ॥
नृप जयपर्वत आला अपुला घेऊन सर्व परिवार ।
उद्यानामधिं पाही मुनीश्वरांचा समूह बहु थोर ॥ ९४ ॥
वनधूळीनें मळकट यति कोणी मुनि महोपवासी ही ।
कोणी आत्मध्यानीं कोणी स्वाध्यायनिरतमति राही ॥ ९५ ॥
पाहुनि अशा मुनींना नृपगर्वाङ्कुर जळून झणिं गेला ।
करिवरुनि भूप उतरुनि वन्दुनि त्यांच्या पदांत तो रमला ॥ ९६ ॥
संपूर्ण मानवामधिं आहांत श्रेष्ठ हे मुनीन्द्र खरें ।
परि भोगवर्ग नाहीं निदान याचें मला वदा सूरें ॥ ९७ ॥
मुनिमुख्य त्यास वदले राजन् झाला तुला मतिभ्रम रे ।
देह निज स्थिर आहे परि हा संसार वाढवील वरें? ॥ ९८ ॥
गजकर्णासम[1] चञ्चल जीवित नरता असार ही जाण ।
स्वप्नासंनिभ वैभव असती बान्धव अनित्य तूं मान ॥ ९९ ॥
यास्तव या अतिदुःखद-भोगीं आसक्ति नैव ठेवावी ।
जो ठेवितो तयाचें संसारीं भटकणें असे[2] भावी ॥ १०० ॥
हा गर्भवास आहे नरकासम अशुचि घोर दुर्गन्ध ।
केला निवास तेथें जीवें बहुवार बनुनि मोहान्ध ॥ १०१ ॥
हा देह गेह आहे रोगांचा यावरी नको मोह ।
अशुचि-स्नायु-शिरांनीं वेष्टित जीवासवें करी द्रोह ॥ १०२ ॥
ऐशा या देहावरि करिती जे प्रीति चेतनारहित ।
समजावें संसारीं त्यांचें होइल कदापि नैव हित ॥ १०३ ॥

---

१ हत्तींच्या काळाप्रमाणें. २ पुढेंही तो चतुर्गतींत फिरेल.

राहुनि शरीरगेहीं हे इन्द्रियचोर त्यास लुटतात ।
परलोकाच्या पथिकां गुणरत्नें त्यास केंवि मिळतात ॥ १०४ ॥
हा जीवनाम भूपति राणी त्या कुमति तिजसवें खेळे ।
आक्रमण करुनि त्यावर पीडाया त्यास मृत्यु सतत चळे ॥ १०५ ॥
पञ्चेन्द्रियविषयांच्या मार्गीं मन मत्तगजसमान दिसे ।
वैराग्यरूप-वीरें ज्ञानाङ्कुशवश करून त्यास हसे ॥ १०६ ॥
हे इन्द्रियाश्व यांच्याठायीं जो मोह तोच वेग असे ।
परनारीधान्यामधिं लोभी होऊन धावती हर्षें ॥ १०७ ॥
देह-रथाला कुपथीं पाडुनि उन्मत्त होति हे त्वरित ।
दृढतर-चित्तलगामें आकर्षुनि व्या तयास ताब्यांत ॥ १०८ ॥
जिनदेवा भक्तीनें वन्दुनि हृदयांत तद्गुणस्मरण ।
ठेवा सन्तत जेणें तुमचें भयसागरांत हो तरण ॥ १०९ ॥
तपसंयमशस्त्रांनीं मारुनि मोहारिला करा ठार ।
लोकाग्रनगर मिळवुनि राज्य करा सर्वदा तुम्ही स्वैर ॥ ११० ॥
सूर्युपदेशश्रवणें झालें श्रीविजयशैल-भूपास ।
वैराग्य विभव सोडुनि झाला मुनि सकल सद्गुणावास ॥ १११ ॥
ते उदित मुदित भाऊ तत्समयीं तदुपदेश ऐकून ।
दीक्षा घेउनि भूवरि विहरत करितात सत्तपश्चरण ॥ ११२ ॥
[ पूर्वजन्मीं वसुभूति असलेला म्लेच्छ उदित व मुदित या मुनीश्वरांचा
नाश करण्यास उद्युक्त झाला असतां सेनापतीनें त्यांचें रक्षण केलें. ]
निर्वाणक्षेत्रांची करावया वन्दना मुनिद्वय ते ।
अभिलाष धरुनि निघती ईर्यापथशोधनांत[1] हृदय रतें ॥ ११३ ॥
सम्मेदपर्वताप्रति निघतां पथ चुकुनि घोरवनिं गेलें ।
वसुभूतिचर[2]म्लेच्छें बघतां क्रोधाग्नि तन्मनीं उसळे ॥ ११४ ॥
उद्युक्त मारण्याला झाला तो म्लेच्छ दुरुनि पाहून ।
ज्येष्ठ भ्राता वदला मुदिता आतां चुके न वा मरण ॥ ११५ ॥
रत्नत्रयांत ठेवी स्वमना राहो सदा समाधान ।
दीर्घाभ्याससमृद्ध-क्षमेस आतां करी बरें जतन ॥ ११६ ॥

---

१ चार हात जमीन पाहून सूर्याच्या प्रकाशांत जीवांचें रक्षण करीत गमन करणें.
२ मागच्या जन्मीं वसुभूति ब्राह्मण असलेला.

मुदित वदे या ज्येष्ठा श्रीजिनवचनीं स्थितास भीति नच ।
देहविनाशें होय न आत्म्याचा नाश वचन हें साच ॥ ११७ ॥
वधिले असेल याला झाला हा दोष आपणांकडून ।
रागद्वेषें होतें अकार्यकरणीं प्रवृत्त मनुजमन ॥ ११८ ॥
यापरि उभयहि बोलुनि देहाहार नि कषाय सोडून ।
प्रतिमायोगें झालें निजस्वरूपांत सर्वदा लीन ॥ ११९ ॥
तो म्लेच्छ जवळ येउनि बन्धुयुगा सज्ज मारण्या झाला ।
परि सेनेशें येउनि सुदैवयोगें निवारिलें त्याला ॥ १२० ॥
[ सेनापतीनें या मुनियुगलाचें रक्षण कां केलें या रामप्रश्नाचें उत्तर
केवलीनीं याप्रमाणें दिलें ]
श्रीकेवलिभगवन्ता, श्रीरामानें विचारिलें येथें ।
सैन्येशानें मुनियुग किमर्थ हो रक्षिलें असावें तें ॥ १२१ ॥
श्रीकेवलिवदनांतुनि पूर्वभवाचें स्वरूप कथणारी ।
वाणी मधुर निघाली यापरि सद्भव्यपापसंहारी[1] ॥ १२२ ॥
यक्षस्थानीं ग्रामीं सुरप नि कर्षक सुनामवन्त असे ।
भाऊ नान्दत होते अन्योन्यीं स्नेह सर्वदैव वसे ॥ १२३ ॥
पकडून पारध्यानें पक्षी पाशांत आणिला कोणी ।
बन्धुयुगें धन देउनि नभांत तो सोडिला क्षणी जाणी ॥ १२४ ॥
पक्षी मरून कालें म्लेच्छांचा नृपति जाहला जाण ।
सुरप नि कर्षक झाले मरून ते उदित मुदित मनिं आण ॥ १२५ ॥
त्याचें रक्षण केलें बन्धुयुगें म्हणुनि रक्षि मुनियुग्मा ।
लुब्धक मरून झाला वसुभूति द्विज[2] मनांत सच्छद्मा[3] ॥ १२६ ॥
पूर्वी जैसें केलें कर्म शुभाशुभ तसेंचि फल लाभें ।
संसारसक्तजीवा तेणें अनुरूपशीच गति शोभें ॥ १२७ ॥
यास्तव जीवें करणें सुखास कारण असेंचि कर्म शुभ ।
जो तेंच करी मानव त्याला होतोचि सतत सुखलाभ ॥ १२८ ॥
उपसर्ग दूर होतां सिद्धक्षेत्रास जाय मुनियुग तें ।
जिनवन्दना कराया जेणें मिळतीं विशालसुकृतशतें ॥ १२९ ॥

---

१ उत्तम भव्याच्या पापांचा नाश करणारी. २ ब्राह्मण. ३ कपट धारण करणारा.

यापरि सिद्धक्षेत्रें वन्दुनि रत्नत्रयास पाळून ।
मरुनि समाधिविधीनें घेती ते प्राप्त करुनि सुरसदन ॥ १३० ॥
नाना-कुयोनिमध्यें सोशी वसुभूति सर्वदा कष्ट ।
नरभव मिळतां झाला कुतापसी प्रचुर-बाल-तपयुक्त ॥ १३१ ॥
तेणें मरून झाला ज्योतिःसुर[1] अग्निकेतु नांवाचा ।
सुख भोगुनि तो कोठें जन्मे सांगे मुनीन्द्रयुगवाचा[2] ॥ १३२ ॥

[ अग्निकेतु देव मरून कोठें जन्मला याचें वर्णन.]

आहे भरतक्षेत्रीं अरिष्टपुर पुर नृपाल तेथ वसे ।
नाम 'प्रियव्रत' तया सुगुणें राकाशशीस[3] सुयश हसे ॥ १३३ ॥
जाया तयास होत्या कनकाभा आद्य कनककान्ति धरी ।
पद्मावती द्वितीया अंगीं पद्मासमान कान्ति वरी ॥ १३४ ॥
पद्मावत्युदरामधिं अवतरले दोन अमर विपुलसुखी ।
रत्नरथ चित्ररथ या प्रसवे पुत्रद्वयास चन्द्रमुखी ॥ १३५ ॥
कनकाभा राणीच्या उदरीं ज्योतिष्कदेव अवतरला ।
नाम अनुन्धर त्याचें प्रख्यात महीतलावरी झाला ॥ १३६ ॥
राज्य स्थापुनि पुत्रीं भूपति साधुनि समाधिमरणास ।
षड्दिनमर्यादेनें प्रियव्रता प्राप्त होय सुरवास ॥ १३७ ॥
कोण्या भूपालाची रत्नरथें श्रीप्रभा सुता वरिली ।
तीस अनुन्धर इच्छी झाला उभयीं प्रविष्ट घोरकलि[4] ॥ १३८ ॥
रत्नरथाच्या राज्यीं शिरून तो भूमिहरण करु लागे ।
रत्नरथ चित्ररथ हे त्याशीं लढण्यास येति बहुवेगें ॥ १३९ ॥
केला अनुन्धराचा समरिं पराभव मिळून उभयांनीं ।
दण्डित करून त्याला राज्यरमाविमुख बनविलें त्यांनीं ॥ १४० ॥
तो पूर्वजन्मवैरें, पराभवें तेवि तीव्र अपमानें ।
तापस साधु जहाला सेवी पञ्चाग्निचीं तपश्चरणें ॥ १४१ ॥
इकडे उभयें केलें राज्याच्या रक्षणास सानन्द ।
न्यायें प्रजेस पाळुनि भोगियला दीर्घकाल सुखकन्द ॥ १४२ ॥

---

१ ज्योतिर्वासी देव. २ देशभूषण व कुलभूषणांची वाणी. ३ पौर्णिमा चन्द्राला. ४ भयंकर तण्टा.

झालें वैराग्य तयां निजपुत्रांना स्वराज्य देऊन ।
गेले मुनिवर्यांच्या समीप केलें नि दीक्षणग्रहण[1] ॥ १४३ ॥
निर्ग्रन्थ साधु होउनि करि ती तप घोर ज्यास उपमा न ।
अन्तीं समाधि साधुनि झाले स्वर्गीं सुराङ्गनारमण ॥ १४४ ॥
[ रत्नरथ व चित्ररथ स्वर्गातील आयु संपल्यावर कोण झाले याचें कथन.]
भोगून सौख्य तेथें सुरायु सरतां सुदेह सोडून ।
अवतरले ते कोठें रामा तूं ऐक चित्त देऊन ॥ १४५ ॥
सिद्धार्था नगरीचा क्षेमंकर भूप परमरूपवती ।
राणी त्याला विमला तद्गर्भीं अमर दोन ते येती ॥ १४६ ॥
श्रीदेशभूषण असे पहिल्याला नाम तेवि दुसऱ्याला ।
श्रीकुलभूषण म्हणती रूपानें जिंकितात मदनाला ॥ १४७ ॥
बालपणाला त्यागुनि ते विद्यार्जनवयांत सुत आले ।
खेळगड्यासह त्यांचा नानाविध खेळ निजगृहीं चाले ॥ १४८ ॥
भूपासन्निध आला सागरघोषाख्य एक चतुर नर ।
संपूर्ण शस्त्रशास्त्रीं नृपाल आनन्दला मनीं फार ॥ १४९ ॥
भूपें आश्रय त्याला देउनि म्हटलें मला मुलें दोन ।
शिकवी समग्र विद्या त्वत्तुल्य[2] सुतद्वया करी निपुण ॥ १५० ॥
होते कुमार उभयहि विनयी राहून गुरुगृहीं करिती ।
नानाविधशस्त्रास्त्रीं शास्त्रीं अभ्यास होति चतुरमति ॥ १५१ ॥
विद्याग्रहणीं तत्पर झालेले उभयबन्धु हे स्वजनीं ।
कांहींही नच जाणति ऐशी स्थिति कोण योग्य नच मानी ॥ १५२ ॥
विद्यासमाप्ति होतां कुमार ते आणिले उपाध्यायें ।
बहुवर्षांनीं पाहुनि सुयोग्य गुरु पूजिला तदा विनयें ॥ १५३ ॥
धन-धान्य-वस्त्र-रत्नें देउनि भूपें तयास गौरविलें ।
इच्छितलाभें हर्षित गुर्वन्तःकरण[3] तेधवा झालें ॥ १५४ ॥
अमुच्या लग्नासाठीं सामन्तसुता अनेक जनकानें ।
आणविल्या ही वार्ता ऐकुनि झाले प्रसन्न ते कानें ॥ १५५ ॥
क्रीडेसाठीं जावें या हेतूनें कुमारयुगल निघे ।
पुरशोभा बघतां तें वातयनिं परमसुन्दरीस बघे ॥ १५६ ॥

---

१ जिनदीक्षा घेणें. २ तुझ्यासारखे. ३ गुरु घेऊन.

तत्सङ्गमाभिलाषा उभयांच्याही मनांत उद्भवली ।
अन्योन्यवध कराया खड्गें सति सज्ज तेधवा झाली ॥ १५७ ॥
" श्रीक्षेमंकरभूपति देवी विमला सदैव जयवन्त ।
अमरासमान दोघे कुमार नांदोत सतत गुणवन्त ॥ १५८ ॥
खिडकींत बैसलेली कन्या कमलोत्सवा ही जयवन्त ।
होवो कुमार असती बन्धु जिचे दोन मदनसम कान्त[1] ॥ १५९ ॥
स्तुति ही वन्दिजनांची ऐकुनि कमलोत्सवा असे भगिनी ।
जाणुनि कुमार दोघे विरक्त होऊन चिन्तिती स्वमनीं ॥ १६० ॥
पापी विचार असला केला आम्ही मनांत धिक्कार ।
आम्हा शतदां राहो हा मोहाचा प्रभाव अनिवार ॥ १६१ ॥
संसार हीन आहे, आहे दुःखें सदैव भरलेला ।
ऐशा पापविचारा स्थान न देई कदापि मनुज भला ॥ १६१ ॥
ऐशा परिणामांनीं प्राणी नरकास शीघ्र जाईल ।
हालाहल विष कैसें जीवनदानीं समर्थ होईल ॥ १६३ ॥
आतां सम्यग्ज्ञानें सुचरित्रीं पूर्ण चित्त जोडावें ।
देतात कुगतिदुःखें विचार येतात जे मनीं डावे[2] ॥ १६४ ॥
यापरि करुनि विचारा मूर्च्छित मातापित्यास त्यागून ।
केली ग्रहण कुमारें श्रीजिनदीक्षा वनांत जाऊन ॥ १६५ ॥
तीव्रतपश्चरणानें झाली आकाशगामिनी प्राप्त ।
ऋद्धि श्रमणयुगा त्या जी करि पापास सर्वदा लुप्त ॥ १६६ ॥

[ क्षेमंकर राजा महालोचन नामक देव झाला. ]

सुतशोकतप्त होउनि आहार-जलास भूपति त्यागी ।
गरुडेश देव झाला धीर महालोचनाख्य सुख भोगी ॥ १६७ ॥
उपसर्ग दूर होतां झालें आम्हास केवलज्ञान ।
स्वासनकम्पें[3] जाणुनि अवधीनें तो इथें करी गमन ॥ १६८ ॥

[ अनुन्धर तपस्वी दासीकन्येवर आसक्त झाला म्हणून सुनुलराजानें कौमुदी-पुरांतून हाकालून दिलें. तो मरुन ज्योतिर्वासी वह्निप्रभ देव झाला व त्यानें आम्हाला वैरामुळें उपसर्ग केला. ]

---

१ सुन्दर. २ पापी विचार. ३ स्वतःच्या सिंहासनाच्या चंचलतेनें.

इकडे अनुन्धर करी विहार मिथ्यातपास आचरुन ।
घेऊन शिष्य कांहीं गेला तो कौमुदीपुरा जाण ॥ १६९ ॥
त्या नगरीचा राजा सुमुख तथा रतवती शुभा भार्या ।
शंभर राण्यामध्यें होती अत्यन्त त्या प्रिया आर्या ॥ १७० ॥
होती तयास दासी नांव जिचें 'स्मरविलासिनी' होतें ।
आचार शुभ तियेचा यद्रूप सुराङ्गनेस लाजवितें ॥ १७१ ॥
ती 'साधुदत्त' मुनिवर सन्निध सम्यक्त्वरत्न घेऊन ।
कुगुरु कुशास्त्र कुदेवा मानी जणु निजमनांत जीर्ण तृण ॥ १७२ ॥
नृप सुमुख एकदा तिज वदला हा साधु सर्वसाधुगणीं ।
श्रेष्ठ जितेन्द्रिय आहे समान याच्या नसे दुजा भुवनीं[1] ॥ १७३ ॥
दासी तयास वदली जे ढोंगी साधु सुतप त्या कैचें ।
हे न जितेन्द्रिय असती मिथ्यातप केधवाहि नच साचें ॥ १७४ ॥
ऐकुनि वचन तियेचें भूपाच्या दाटला मनीं कोप ।
होऊन नम्र वदली नाथा हा कोप मज गमे साप ॥ १७५ ॥
या ढोंगी साधूला मच्चरणीं प्रणत खचित करवीन ।
लौकरचि आपणा हें राज्यश्रीनाथ[2] दृश्य दावीन ॥ १७६ ॥
यापरि बोलुनि गेली स्वगृहीं सुन्दर अशा स्वकन्येला ।
शिकवुनि तिनें अनुन्धर साधुकडे प्रेषिलें[3] परीक्षेला ॥ १७७ ॥
ध्यानस्थ तो स्वधामीं बसला असतां समीप तंव गेली ।
ठुमकत ठुमकत चालुनि वातें कम्पित जशी दिसे वेली ॥ १७८ ॥
जणु वायुविवश होउनि गेलें वरि वस्त्र भासवून तिनें ।
कोमल सुन्दर मांड्या दाखविल्या मधुर नयनपातानें ॥ १७९ ॥
दाखवि निजस्तनद्वय केशरकर्दम[4] जयास लावियला ।
गजकुम्भासम[5] पुष्ट नि मृदुल अशी ती करून मधुलीला ॥ १८० ॥
पुष्पग्रहणमिषानें गळल्या वस्त्रास सावरी स्वकरें ।
नाभिप्रदेश दावी केले सुन्दर असे तिनें नखरे ॥ १८१ ॥
ऐशा विलासभावें तिनें तयाच्या मनास वेधियलें ।
आत्मध्याना त्यागुनि वळवी तद्रूपवीक्षणीं डोळे ॥ १८२ ॥

---

१ जगांत २ राज्यलक्ष्मीच्या वल्लभा. ३ पाठविले. ४ केशराची उटी. ५ हत्तीच्या गण्डस्थळासारखे.

वदला तिजला बाळे ! सांग घरें राहत्येस तूं कोठें ।
आलीस रात्रिसमयीं कैसें भय तव मना न कां वाटे ॥ १८३ ॥
ती मधुर मधुर वदली मातेनें मारिलें मला गालीं ।
दोष न कांहीं घडतां सदनांतुनि मजशि हाय हाकाली ॥ १८४ ॥
झाले अनाथ नाथा ! आले चरणास आपुल्या शरण ।
व्हावें तपस्विनी मज वाटे बनलें विरक्त पूर्ण मन ॥ १८५ ॥
लाभेल आपुलें जरि अनुमोदन आज धन्य होईन ।
होउनि तपस्विनी मी अनुग्रहें स्वहित खचित साधीन ॥ १८६ ॥
शुश्रूषा मी तुमची रात्रन्दिन करिन शुद्धहृदयानें ।
इहलोक साध्य होउनि होइल परलोक साध्य मज जेणें ॥ १८७ ॥
पुण्योदयें निधानासम अपुली भेट जाहली आज ।
द्यावी दीक्षा मजला घ्या पावन करुनि शीघ्र मुनिराज ॥ १८८ ॥
यापरि मधुर तियेचें भाषण ऐकून मन तिचें सरल ।
जाणुनि तापस वदला ज्याचें कामाग्निदग्ध वपु सकल ॥ १८९ ॥
भद्रे ! प्रसाद माझा कसला हो तूं प्रसन्न मजवरि गे ।
झालों भक्त तुझा मी पाही मजला सदैव अनुरागें ॥ १९० ॥
बोलुनि ऐसें तो यति आलिंगाया तिला करा पसरी ।
कन्या चतुर तयाला ऐसें बोलून तत्क्षणीं वारी ॥ १९१ ॥
कन्येला विधिवर्जित मुनीश आलिङ्गणें न युक्त दिसे ।
मम मातेस पुसाया चला तुम्ही या गृहांत सतत वसे ॥ १९२ ॥
माझी आई आहे प्रेमळ तुमची जशी असे सुमति ।
तिजला प्रसन्न करितां तुम्हां अर्पील ती मला सुदती ॥ १९३ ॥
यापरि जेव्हां वदली आला तो मूढ अस्तसमयास ।
गेहीं विलासिनीच्या कन्येची तीव्र धरुनि मनिं आस ॥ १९४ ॥
कन्येच्याच विचारीं तन्मय होऊन इन्द्रियें त्याचीं ।
नच अन्य जाणतीं तीं विरहाकुल वृत्ति जाहली साची ॥ १९५ ॥
कामाकुला नराला ऐकु न येतें न हुंगता येतें ।
दिसतें न त्यास कांहीं मन त्याचें लाजतें न तें भीतें ॥ १९६ ॥
येउनि विलासिनीच्या ठेवुनि मस्तक पदावरी याची ।
दे मजला तव कन्या माझ्यावरि तव घडो कृपा साची ॥ १९७ ॥

पूर्वीं सुगुप्त येउनि वसला नृप जाहला तदा प्रगट ।
वान्धून ठेविला तो साधु तयें जो असे व्रतभ्रष्ट ॥ १९८ ॥
प्रात:कालीं त्याचा करून अपमान नृपपुरांतून ।
देइ हकालुनि त्यातें झाला तो मानसीं महाखिन्न ॥ १९९ ॥
अपमानदग्ध होउनि दु:खी तो भूवरी करी भ्रमण ।
कांहिं दिनांनीं मेला झालें नाना कुयोनिमधिं जनन ॥ २०० ॥
कांहीं शुभ कर्मोदय होतां नरजन्म लाभला त्यास ।
गर्भी वाढत असतां गेला सोडुनि पिता स्वदेशास ॥ २०१ ॥
कौमारदशा येतां म्लेच्छें नेलें हरून मातेस ।
वान्धवविरहित होउनि झाला तो प्राप्त परमदु:खास ॥ २०२ ॥
नन्तर झाला तापस साधु करी कुतंप[1] तो अनेकदिनीं ।
ज्योतिर्लोकीं झाला 'वह्निप्रभ' देव पूर्वपुण्यांनीं ॥ २०३ ॥
श्रीमुनिसुव्रततीर्थी अनन्तवीर्याख्य केवली झाले ।
भवतारक भव्यांना त्यांनीं जिनशासनास दृढ केलें ॥ २०४ ॥
शिष्यें विचारिला त्या नाथा अपणासमान होईल ।
या भारतांत कोणी मुनिवर केवलिपदास जो वरिल ॥ २०५ ॥
मी मुक्त जाहल्यावरि केवलिपद देशभूषणा लाभे ।
कुलभूषणाहि तैसें या उभयें आर्यभूमि वहु शोभे ॥ २०६ ॥
यांचा आश्रय घेउनि जन या भवसागरास तरतील ।
त्यावेळीं 'वह्निप्रभ' देवें हें सर्व ऐकिले वोल ॥ २०७ ॥
केवलिवचनाला या असत्य मी करिन भावना धरुन ।
आला शैलीं आम्हां केला उपसर्ग वैर मनिं वरुन ॥ २०८ ॥
रामा चरमशरीरी[2] तुजला पाहून शीघ्र तो गेला ।
येथुन पळून आम्ही वैराचा पूर्वहेतुही कथिला ॥ २०९ ॥
उपसर्ग दूर केला लक्ष्मणसहितें तुवां तदा झालें ।
केवलिपद घातिक्षय होतां आम्हांस अक्षयी[3] आलें ॥ २१० ॥
वैरें या संसारीं होतें वहुदु:ख तेवि कुगतींत ।
गमनागमन निरन्तर ऐकुनि जन व्हा सदैव भवभीत ॥ २११ ॥

---

१ पञ्चाग्नि तप. २ शेवटचें शरीर धारण करणारा. त्याच भवांत मोक्ष प्राप्त करून घेणारा. ३ नाश न पावणारें.

यापरि पवित्र भाषण मधुसम केवलिमुखारविन्दाचें ।
सेवुनि सर्व सुरासुर आनन्दित जाहले मनीं साचे ॥ २१२ ॥

[ रामचन्द्रांना आपण वर मागा असें गरुडेशानें म्हटलें त्यावेळीं संकटप्रसंगीं आमची आठवण आपल्याला व्हावी असें रामचंद्र म्हणाले.]

वन्दुनि केवलिचरणा वदला गरुडेश रामचन्द्रास ।
प्रेमें रघुकुलतिलका मधुराक्षरपूर्ण वाक्यवृन्दास ॥ २१३ ॥
तूं प्रातिहार्य केलें मम पुत्रांचें म्हणून मज मोद ।
झाला अभीष्ट मागे गणी न हृदयांत याचनाखेद ॥ २१४ ॥
क्षणभर करुनि विचारा वदला राघव तयास हे देवा !
संकट येइल जेव्हां तैं स्वमनीं स्मरण आमुचें ठेवा ॥ २१५ ॥
केली मुनिसेवा जी तत्फल आम्हास लाभलें मानू ।
त्वद्दत्तवरा सेवू मुनिगुणगण निजमनांत नित वानू ॥ २१६ ॥
तें मान्य 'महालोचन' देवें केलें अतीव हर्षानें ।
अनुमोदन त्या दिधलें जणु वाद्यांच्या मनोज्ञनादानें ॥ २१७ ॥
मुनिवर-पूर्वभवांच्या श्रवणें संसारभीति वाटून ।
झाले जिनमुनि कोणी केलें कोणी अणुव्रत-ग्रहण ॥ २१८ ॥
देशकुलभूषणांनीं भवदुःखांतून मुक्त होऊन ।
ग्रामपुरादि-स्थानीं भव्यां धर्मोपदेश देऊन ॥ २१९ ॥
आत्महिताचा कथिला रत्नत्रयमार्ग मुक्तिनगरीचा ।
त्या मार्गें जो गेला बनला प्रियकान्त मुक्तिरमणीचा ॥ २२० ॥
देशकुलभूषणांच्या चरिता जो पूत सांगतो ऐके ।
जिनदासाचें वाढे पुण्य सदा पापमात्र खचित सुके ॥ २२१ ॥

इति श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथतनुज जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे देशकुलभूषणोपाख्यानं नामचत्वारिंशत्तमं पर्व ॥ ४० ॥

---

१ महिमा. २ तुम्ही दिलेल्या वराचा स्वीकार करू. ३ मनोहर वाद्ये वाजण्यानें.

# एकेचाळीसावें पर्वांतील कथेचा सारांश.

देशभूषण व कुलभूषण या दोन केवलींनीं रामचंद्र चरमशरीरी-तद्भवमोक्षगामी आहेत असें जेव्हां सांगितलें तेव्हां रामचन्द्राचा लोकांनीं जयजयकार केला.

वंशस्थल नगराच्या सुरप्रभ राजानें आपल्या नगरींत आपण लक्ष्मण व सीतेसहित येऊन राहण्याबद्दल रामचन्द्रांना पुष्कळ आग्रह केला. परंतु 'वंशधर' पर्वताच्या सौन्दर्यानें रामचंद्राचें मन आकृष्ट झाल्यामुळें त्यांनीं पर्वतावरच राहण्याचें निश्चित ठरविलें. राजाचें आमन्त्रण त्यांनीं स्वीकारलें नाहीं.

वंशधर पर्वतावर अनेक उंचस्थानावरून झरे वाहत होते. जागोजागीं अशोक, चम्पक, बकुल, आम्र वगैरे वृक्ष होते. जाई-जुई, कुन्द आदिक पुष्पलता व कमलसरोवरें यांनीं या पर्वताला शोभा आणिली होती. अशा पर्वतावर जिनभक्त रामचन्द्रांनीं अनेक जिनमंदिरें बांधविलीं व ते पुष्कळ दिवस राहिले यामुळें या वंशधरपर्वताचें 'रामगिरि' हें नांव प्रसिद्ध झालें.

यानंतर येथून पुढें प्रयाण करण्याचा विचार लक्ष्मणापुढें रामचंद्रांनीं मांडिला. ते म्हणाले– 'आपण दक्षिणेकडे समुद्रतटावर जाऊन राज्य स्थापावें या उद्देशानें अयोध्या सोडिली आहे व येथेंच आपण राहिलों तर आपले उद्देश्य साध्य होणार नाहींत. यास्तव पुढें आपण प्रवास करणें योग्य आहे.' लक्ष्मणानें रामचंद्राच्या वचनाला अनुमति दिली व ते तिघे तेथून जाण्यास उद्युक्त झाले. सुरप्रभ राजाही त्यांच्याबरोबर स्नेहानें गेला. रामचंद्रांनीं कष्टानें त्याला परत पाठविलें.

अनरण्यराजाचे नातू रामचन्द्र व लक्ष्मण हे सीतेसह अनेक नगरें, गांवें, वनें व देश उल्लंघून 'कर्णरवा' नदीच्या तटावर येऊन पोहोचले होते. या नदीच्या तटावर फळझाडें खूप होतीं. नदीचें पाणीही मधुर होतें. व येथील वनधान्येंही अमृतासारखीं होतीं. लक्ष्मणानें येथें मातीचीं, वेळूचीं व पानांचीं अनेक भांडीं बनविलीं. त्यांचा स्वैपाक करतांना चांगला उपयोग होई.

एके दिवशीं सीतादेवीनें सर्व अन्न शिजविलें होतें. व जेवणाची तयारी ती करीत होती. आकाशाकडे तिचें लक्ष्य गेलें व त्यांतून खालीं उतरणाऱ्या दोन चारण-मुनींना पाहून हर्षानें रामचंद्रास हें वृत्त तिनें कळविलें. जमीनीवर उतरत असतांना राम व सीता यांनीं हात जोडून त्यांना नमस्कार केला. ते दोघे मुनि चार हात जमीन पाहून जवळ आल्यावर दंपतीनें त्यांना तीन प्रदक्षिणा घातल्या. उच्चस्थानीं बसवून त्यांचे पाय धुतले. त्यांचें पूजन केलें. वन्दन केलें. नंतर मन वचन कायेची शुद्धि सांगून शुद्ध आहार दिला. आहाराचे पदार्थ– गाई व म्हशीचें दूध, तूप, पेंडखजूर, आंबे व नारळ हे होते. हावरेपणा सोडून मुनिद्वयानें भोजन केलें. दंपतीच्या आदराला पाहून व पात्राची उत्तमता जाणून देवांनीं पंचाश्चर्यवृष्टि केली. मुनिद्वय मासोपवासी होते व त्यांचा आहार निरंतराय झाला. पात्र आणि दात्यांचें गुणवर्णन देवांनीं अदृश्यरूपानें केलें.

हें सर्व दृश्य एका झाडावर बसलेल्या गिधाडानें पाहिलें. त्याला पूर्वजन्मांचें स्मरण झालें. मी पूर्वजन्मीं हा कल्याणकारक धर्म स्वीकारला होता. मला कांहीं मित्रांनीं पापकार्यांत– अधर्मांत तत्पर केलें. मी सद्गुरूच्या उपदेशास अवमानिलें. तें सर्व दुराचरण स्मरणांत आल्याबरोबर मला अग्नींत पडल्याप्रमाणें दुःख होत आहे.

आतां हे दोन साधुच माझा उद्धार करतील. असा विचार करून तो गिधाड तेथून उडाला व जेथें मुनींचें पादोदक सांडलें होतें तेथें येऊन तें तो पिऊं लागला. त्या पाण्याच्या प्रभावानें त्याचें शरीर रत्नराशिप्रमाणें सुंदर झालें. त्याची चोंच पोवळयाप्रमाणें लालभडक झाली. शरीर सुगंधी झालें. मोर जसा मेघाला पाहून आनन्दाश्रु गाळून नाचतो तसा तो मुनींना पाहून हर्षानें नाचूं लागला.

रामचंद्र मुनिद्वयाला म्हणाले– प्रभो, याचें कुरूपशरीर सुंदर कसें झालें ? हा मांसभक्षी प्राणी आपल्या चरणाजवळ शांत होऊन बसला हें पाहून मला आश्चर्य वाटतें. मुनीश्वरांनीं त्या पक्ष्याची हकीकत सांगावयास सुरवात केली.

हें विस्तीर्ण जंगल दंडक नांवानें प्रसिद्ध झालें आहे. पण पूर्वी या ठिकाणीं दण्डक देश होता. या देशांत कर्णकुण्डला नांवाची राजधानी होती व तेथें 'दण्डक' या नांवाचा राजा राज्य करीत होता. याची राणी मिथ्याधर्माचरणी व एका मिथ्यात्वी तपस्व्यावर आसक्त झालेली होती. राजा राणीच्या वश होऊन त्याच साधूचा भक्त बनला होता.

एके दिवशीं तो नगराबाहेर जात असतां त्याला एक जैनसाधु दिसले. त्यांच्या गळ्यांत त्यानें मेलेला सर्प घातला व तो पुढें निघून गेला. मुनि स्वस्वरूप-चिंतनांत तत्पर झाले. मनांत त्यांच्या कोप उत्पन्न झाला नाहीं. शांतपणानें त्यांनीं उपद्रव सहन केला.

दोन चार दिवसांनीं राजा परत त्या ठिकाणीं आला. त्यावेळीं एक मनुष्य त्यांच्या गळ्यांतून सर्प काढीत होता. मुंग्यांनीं मुनींच्या अंगांत जागोजागीं भोकें पाडलीं होतीं. मुनींचें शरीर कुरूप झालें होतें. राजाला हें पाहून पश्चात्ताप झाला व तो जिनधर्मी बनला. जैनसाधूचा उपद्रव दूर करून त्यांचें तो रक्षण करूं लागला.

राणीवर आसक्त झालेल्या साधूच्या मनांत जैनसाधुविषयीं द्वेष उत्पन्न झाला. त्यानें एका जैनसाधूचें रूप धारण करून त्यानें राणीबरोबर दुराचरण केलें. त्यामुळें राजा अतिशय रागावला व त्यानें सर्व जैनमुनींना घाण्यांत पिळून मारण्याची आज्ञा केली. शेंकडो साधु घाणींत पिळून मारिले. तें शांतपणानें मरून देव झाले. बाहेरून एक साधु गावांत येत असलेला पाहून एका दयाळु गृहस्थानें म्हटलें की, साधो या गांवांत नुकतेच शेंकडो साधु घाण्यांत पिळून राजानें मारविले आहेत. यास्तव तुम्ही गांवांत जाऊ नका. हें वृत्त ऐकल्याबरोबर संघाचें मरण त्या साधूला अतिशय दुःखदायक वाटलें. तो खांबासारखा निश्चल उभा राहिला. त्याचे डोळे लालबुन्द झाले. कोपानें त्याच्या तोंडांतून 'हाय' या शब्दाबरोबर अग्नि बाहेर पडला त्यानें गांव, नगर, वन, देश सर्व व्यापिले. सर्व पदार्थ भस्म केले. देशांतील सर्व माणसें, पक्षी, पशु सर्वांना जाळून भस्म केलें.

फार काल लोटल्यावर वृक्ष, वेली, नद्या, जंगल, पशु-पक्षी, हिंस्र प्राणी यांनीं हा प्रदेश गजबजून गेला. दण्डकराजा मरून संसारांत पुष्कळ फिरला व आतां तो गिधाड झाला आहे. इतकें सांगून पक्ष्याकडे वळून त्यांनीं त्याला सर्व कारणें चांगलीं मिळाली आहेत व तुझें बरें होईल म्हणून आश्वासन दिलें.

दुसऱ्याचा दृष्टांत पाहूनही मनुष्यांनीं आपल्या हिताकडे लक्ष्य द्यावें असें म्हणून मुनियुगलानें आपलेंही चरित्र याप्रमाणें सांगितलें.

वाराणसी नगरींत अचल नांवाचा राजा गिरिदेवी राणीसह राज्य करीत होता. एकेवेळीं त्रिगुतिधारी 'गुण' नांवाचे मुनि आहारार्थ राजवाड्यांत आले. आहार दिल्यानंतर राणीनें आमचा गृहाश्रम सफल होईल कां निष्फल होईल असा प्रश्न

विचारिला. मुनि वचनगुप्ति सोडून म्हणाले— पुत्रि, तुला वंशदीपक असे दोन सुपुत्र होतील. असें सांगून ते निघून गेले. कालांतरानें सुगुप्ति व गुप्त या नांवाचे दोन पुत्र झाले. ते बालपणांतून कुमारावस्था व तरुणावस्थेस क्रमानें प्राप्त झाले. त्यावेळीं एक वैराग्य उत्पन्न होण्यासारखा प्रसंग घडून आला तो याप्रमाणें:— गन्धवती नगरींत सोमपुरोहित राहत होता. त्याला सुकेतु व अग्निकेतु या नांवाचे पुत्र झाले. यांचें एकमेकावर अत्यंत प्रेम होतें. यांचें जेवणें, झोपणें, खेळणें एकमेकांना विसंबून होत नसे. एका अंथरुणावर दोघे झोपत असत. याप्रमाणें काल जात असतां सुकेतूचें लग्न झालें. तेव्हां त्यांच्या मनांत विचार आला कीं, आतां आपल्याला वेगळें झोपावें लागेल. आपल्या भावाचा विरह होईल. तें दुःख मला सहन होणार नाहीं. हा विरह न होण्याचा उपाय मला कोण सांगेल कां? असा विचार करीत असतां त्याला दीक्षा घेण्याची इच्छा झाली. तो सुकेतु अनंतवीर्य मुनिराजाकडे गेला. दीक्षा घेऊन तप करूं लागला.

सुकेतुबंधूच्या विरहानें अग्निकेतूला अतिशय दुःख झालें. त्यानेंही गृहत्याग केला. तो मिथ्यातपस्वी होऊन पञ्चाग्नि तप करूं लागला. सुकेतुमुनि आपल्या भावाला जैनसाधु करावें असा विचार करून त्याच्याकडे जावयाला निघाला असतां अनंतवीर्य आचार्यांनीं पुढील उपाय करण्यास सांगितलें:— जेव्हां तूं आपल्या भावाबरोबर बोलूं लागशील तेव्हां एक गोरी कन्या तीन स्त्रियासह तेथें येईल. त्यांना पाहून तूं आपल्या भावाला 'तुझ्या मतांत दिव्यज्ञान असेल तर या कन्येचें भावी शुभाशुभ सांग' असें बोल. व तो मला हें दिव्यज्ञान नाहीं. तुला असेल तर तूं सांग असें त्यानें म्हटल्यावर तूं त्याला याप्रमाणें सांग:— या वाराणसींत प्रवर नावाच्या श्रीमंत व्यापाऱ्याची ही रुचिरा नांवाची कन्या आहे. ही तिसऱ्या दिवशीं मरण पावून कंबर नामक गावीं ही विलास नामक व्यापाऱ्याचें घरीं शेळी होऊन जन्मेल. पुढें लांडगा तिला मारील व ती म्हैस होईल. तीही मरण पावल्यावर विलासाची कन्या होईल. तिचें नाव विलास विधुरा असे ठेवील. या सर्व गोष्टी अग्निकेतूच्या समक्ष घडल्या. जेव्हां ती कन्या विवाहाला योग्य झाली तेव्हां प्रवरानें तिला मागणी घातली. विवाहाच्यावेळीं अग्निकेतूनें प्रवराला ही तुझी पूर्वी 'रुचिरा' नामक कन्या होती असें सांगितलें व विलासालाही ही गोष्ट त्यानें सांगितली. विधुरेच्या कानावर या गोष्टी आल्या व जातिस्मरण झालें. तिच्या मनांत दीक्षा घेण्याची इच्छा उत्पन्न झाली. प्रवरानें आपला आग्रह सोडला नाहीं. विलासानें मला मुलगी देण्याचें कबूल केलें होतें व आतां तो मला देत नाहीं अशी तक्रार त्यानें आमच्या पित्यापुढें

( अचलराजापुढें ) मांडली. राजानेंही सर्व हकीकत ऐकून विधुरेशीं तूं लग्न करूं नकोस म्हणून योग्य न्याय दिला. त्यामुळें कन्या आर्यिका झाली. अग्निकेतु जैनमुनि झाला. हें सर्व आम्हाला ऐकावयाला मिळाल्यामुळें आम्हा उभयतांना वैराग्य झालें व आम्ही दोघांनीं ( सुगुप्ति व गुप्त ) अनंतवीर्य मुनिजवळ दीक्षा घेतली. तपश्चरणानें आम्हा दोघांना चारणर्द्धि प्राप्त झाली आहे. हें सर्व ऐकून गिधाडाच्या मनांत संसारदुःखापासून भय उत्पन्न झालें. व तो शब्द करूं लागला. मुनीश्वर म्हणाले– "हे गिधाडा, तूं भिऊं नकोस दुःखें नाहींशी करणारीं व्रतें तूं घे. कोण्याही प्राण्याला पीडा देऊं नकोस. खोटें बोलणें, चोरी करणें, दुसऱ्या पक्षाच्या मादीवर प्रेम करणें हें तूं सोडून दे. रात्रीं आहार घेऊं नकोस. रात्रंदिवस मनांत जिननामाचा जप कर. निर्ग्रन्थसाधूची भक्ति कर, उपवासादिक नियमांचें पालन कर. देव, गुरु व शास्त्रावर दृढ श्रद्धा ठेव. याप्रमाणें तूं वाग" हें ऐकून त्यानें मस्तक नम्र करून मुनिद्वयाला वन्दन केलें.

यानंतर रामचन्द्राकडे वळून मुनींनीं म्हटलें कीं, हा तपस्व्याप्रमाणें शान्त झाला आहे. याचा दुष्ट प्राण्यापासून सांभाळ करा. मुनिवचनाला अनुसरून दोघांनीं त्याचा सांभाळ करण्याचें कबूल केलें. यानंतर ते दोघे मुनि आकाशमार्गानें ध्यान करण्यायोग्य स्थानीं गेले.

वनांत गेलेला लक्ष्मण हत्तीवर बसून तेथें आला. त्याला रत्नसुवर्णांची वृष्टि झालेली पाहून आश्चर्य वाटलें. रामचन्द्रांनीं आनंदानें घडलेल्या सर्व प्रसंगांचा खुलासा केला. तो ऐकून तोही आनंदित झाला. दृढ श्रद्धानी व अणुव्रतपालक त्या पक्ष्यानें रामादिकांचा त्याग केला नाहीं. त्याच्या शरीराचे किरण त्याच्या मस्तकावर जटेसारखे पसरत असत म्हणून 'जटायु' ह्या नांवानें तो प्रसिद्ध झाला. रामानें त्याच्या पायांत घुंगरे बांधलीं होतीं. तो केव्हां आपले पंख पसरून ठेक्यानें नृत्य करीत असे. केव्हां हंसाप्रमाणें चालत असे. सीतेबरोबर त्रिकालीं जिनेश्वर, सिद्ध व योगिजनांना वंदन करीत असे. या पक्ष्यावर सीतेचें अपार प्रेम व दया असे. हा पक्षी अमृतासारखी गोड व प्रासुक फळें खात असे. प्रासुक पाणी पीत असे. श्रावकाचा आचार पाळून मनोविचार निर्मल ठेवीत असे. याप्रमाणें जिनाचा दास बनलेल्या त्या पक्ष्याचे दिवस आनंदांत जात होते.

---

# एकेचाळीसावें पर्व.

केवलिवचना ऐकुनि आहे श्रीराम चरमदेही हें ।
जयकार करुनि त्याचा केलें वन्दन तया बहुस्नेहें ॥ १ ॥
वंशस्थल नगरीचा नृप ज्याचें चित्त सरलसें होतें ।
नाम सुरप्रभ ज्याचें आनन्दाचें तयास ये भरतें ॥ २ ॥
सीता लक्ष्मण यासह आदर करि तो उदार रामाचा ।
स्वपुरास न्यावयाचा अभिलाष धरी मनांत तो साचा ॥ ३ ॥
परि पर्वतसौन्दर्यें रामाचें चित्त चोरिलें होतें ।
तेथेंच राहिला तो आमन्त्रण अंगिकारलें नच तें ॥ ४ ॥
नानावृक्षलतांनीं पक्ष्यांच्या विविधरम्य-नादांनीं ।
शीतल सुगन्धिवातें झाला आनन्द विपुल राम-मनीं ॥ ५ ॥
त्या शैलावरि होता वसन्तऋतुचा सदैव रहिवास ।
निर्झरपुष्पफलांनीं हरितो तो रम्य रामहृदयास ॥ ६ ॥
झाडें अशोक-चम्पक वकुलादिक शोभतात या शैलीं ।
जाईजुई नि कमलें कुन्दादिक बहरतात बहुवेली ॥ ७ ॥
या वंशस्थलशैलावरि विधुसम रम्य रामचन्द्रानें ।
जिनमन्दिरें बनविलीं अनेक जिनभक्तिभरितचित्तानें ॥ ८ ॥
ज्या सर्वभव्य नमिती जिनबिम्बें त्यांत पञ्चवर्णांचीं ।
स्थापन केलीं रामें जीं हरितीं भीति जन्ममरणांचीं ॥ ९ ॥
रामें निवास केला येथें बहुकाल या स्थलीं रमला ।
'रामगिरि' या सुनामें प्रसिद्ध हा शैल त्यामुळें झाला ॥ १० ॥
जिनसदनें पङ्क्तींनीं जीं रामें आदरें इथें रचिलीं ।
'श्रीरामगिरि' सुनामें या शैलाला प्रसिद्धिता आली ॥ ११ ॥
लक्ष्मीधरास वदला राघव येथें अनेक दिनवास ।
केला नृपाग्रहानें आतां करूं या पुढें प्रयाणास ॥ १२ ॥
येथें कर्म करी जो परलोकीं त्या नरास फल मिळतें ।
पूर्वी कृतसुकृताचें फल येथें प्राप्त मानवा होतें ॥ १३ ॥

येथें जे दिन गेले सुखभोगीं ते पुनः न येतील ।
येथेंचि राहिलों जर पुढील निजकार्य नष्ट होईल ॥ १४ ॥
जें वेगानें वाहे सरिताजल तें न येइ परतून ।
आयुष्याचे गेले कदापि परतून येति ते दिन न ॥ १५ ॥
कर्णरवासरितेच्या नंतर घनघोर लागतें वन जें ।
त्या वदति दण्डकावन सूर्याचे किरण वघुनि ज्या भाजे ॥ १६ ॥
तेथें नच भरताची आज्ञा चाले म्हणून त्या स्थानीं ।
जाउनि तेथुनि राहू समुद्रतीरावरील निविडवनीं[1] ॥ १७ ॥

( कर्णरवा नदीच्या तटावर रामचंद्रादिकांनीं कांहीं दिवस निवास केला. )

आज्ञा प्रभो जशी तव ती मजला मान्य सर्वथा आहे ।
ऐसें वदतां लक्ष्मण झालें त्रिक जावयास उद्यत हें ॥ १८ ॥
स्नेहें भूप सुरप्रभ कांहीं अन्तर तयास अनुसरला ।
रामें बहुकष्टानें पाठवितां निजपुरास तो आला ॥ १९ ॥
अनरण्याचे नातू देशपुरादिक अनेक लङ्घून ।
कर्णरवातटिं आले आनंदित जाहलें तदीय मन ॥ २० ॥
पांचूसमान हिरवे अशा तृणांनीं सदैव तट शोभे ।
मृदुलस्पर्श तयाचा होतां मनिं अन्य सौख्य होय उभें ॥ २१ ॥
शोभे तिच्या तटावरि सपुष्पफलपल्लवा[2] नि सच्छाया ।
तरुपङ्क्ति अल्पगिरिसम[3] उद्यत विश्रान्तिसौख्य नित द्याया ॥ २२ ॥
हें वन सरिता-सुन्दर पाहुनि तरुतलिं सहर्ष ते वसले ।
क्रीडाजलांत करिती विनोद नाना करून ते हसले ॥ २३ ॥
मृदु मधुर पक्क सुफलें यथेच्छ भक्षून त्या स्थलीं रमले ।
स्वर्गङ्गेवरि आले विहराया देवतुल्य ते दिसले ॥ २४ ॥
मातीचीं वेळूचीं पानांचीं विविध भोजनें[4] केलीं ।
लक्ष्मीधरें सुकुशलें जीं उपयोगांत सर्वदा आलीं ॥ २५ ॥
स्वाद जयांचा सुन्दर अशीं सुगन्धित फलें नि वनधान्यें ।
सीता शिजवी जणु ती वाटत होतीं तयास अमृतान्नें ॥ २६ ॥

---

१ दाट जंगलांत. २ फुलें, फळें व कोमलदलें यांनीं सहित, दाट सावलीनें युक्त. ३ लहान पर्वताप्रमाणें. ४ भांडी.

(सीता व रामचन्द्रांनीं दोन चारणमुनींना भक्तीनें आहार दिला. त्यामुळें पंचाश्चर्यवृष्टि झाली.)

एके दिनीं नभांतुनि भूमीवरि यावयास मुनि दोन ।
उन्नत झाले पाहुनि सीतेचें हर्षयुक्त होय मन ॥ २७ ॥
पहिले सुगुप्तिनामक लघुमुनिचें गुप्त हें असे नाम ।
निर्दोषाचरणानें वाटत होते मनास सुखधाम ॥ २८ ॥
रामास वृत्त कथिलें सीतेनें ते बघा नभांत मुनि ।
भूवरि उतरत असतां त्या वन्दायास जोडिती पाणि ॥ २९ ॥
वदला राघव सीते मुनिदर्शन पापनाशकारी हें ।
भक्तिभरचित्त ज्यांचें तेणें त्या सुकृत अमितसे लाहे ॥ ३० ॥
यापरि बोलत असतां आले मुनियुग्म शान्तसे खालीं ।
लाभ अशांचा होतो ज्यांच्या लिहिलें असेल शुभ भालीं ॥ ३१ ॥
पाहून चारहस्त प्रमाण भूदेश गमन जे करिती ।
अतिशान्तवृत्ति ज्यांची धैर्यादिक सद्गुणास जे वरिती ॥ ३२ ॥
पाहुनि त्यांना उठले पतिपत्नी स्वागता पुढें गेले ।
नमन प्रदक्षिणादिक नवधाविधि आदरें तयें केले ॥ ३३ ॥
अतिशय पवित्र देहें अत्यन्त प्रीतियुक्त हृदयानें ।
आहार दिला उभया उभयें[1] अमृतासमान वचनानें ॥ ३४ ॥
वनमहिषी गायींचें दूध घृतें मिश्र शुद्ध आहार ।
खर्जूर[2] आम्र नारळ दिले तयें अञ्जलींत भरपूर ॥ ३५ ॥
प्रासुकभोजन ऐसें ग्रहण करी हावरेपणारहित ।
मुनियुग्म हृदय ज्याचें सुकृतोदकनिर्झरें[3] सदा सहित ॥ ३६ ॥
यापरि भोजन देउनि सीतेसह राम मुनिपदा सेवी ।
आदरभाव जयांचा कां नच आश्चर्यपञ्चकातें घी ॥ ३७ ॥
होउनि अदृश्य देवें दुन्दुभिताडन नभांत तैं केलें ।
शीतल मन्द सुगन्धित वारे विपिनांतें[4] वाहते झाले ॥ ३८ ॥
झाली वृष्टि नभांतुनि वसुधेवरि[5] पञ्चवर्ण-रत्नांची ।
दिव्यसुगन्धित झाली वृष्टि नभांतून अमरकुसुमांची ॥ ३९ ॥

---

१ सीता व रामानें. २ पेंडखजूर. ३ पुण्यरूपी पाण्याच्या झऱ्यानें. ४ वनांत. ५ पृथ्वीवर.

पात्र नि दाता यांची देवांनीं कीर्ति गायिली स्नेहें ।
सीता-राममनामधिं आनन्द-जलप्रवाह बहु वाहे ॥ ४० ॥
मासोपवासि त्या मुनियुग्माचा विघ्नरहित आहार ।
झाला अलभ्यलाभें हर्ष मनीं दम्पतीस हो थोर ॥ ४१ ॥

( झाडावर बसलेल्या एका गिधाडाला मुनींना पाहून
पूर्वभवाचें याप्रमाणें स्मरण झालें. )

त्याच वनीं वृक्षावरि सहज वसे एक गृध्रखग थोर ।
पाहुनि यतिवर्यांना झाला स्वभवस्मृतींत तो चूर[1] ॥ ४२ ॥
पूर्वी मजला झाला होतां सम्प्राप्त नृभव दुर्दैवें ।
मी अविवेकी बनलों गेलें आयुष्य विफल मम गर्वें ॥ ४३ ॥
आतां पश्चात्तापें जातें मम हृदय हाय करपून ।
पापाचारीं या भवि मी मम होईल केवि कल्याण ॥ ४४ ॥
मानवभवि मम होते बहु मित्र परन्तु पापकार्यांत ।
केलें प्रवृत्त त्यांनीं पडलों मी हाय दुःखजलधींत[2] ॥ ४५ ॥
कांहीं सज्जन पुरुषें सद्धर्मीं प्रेरिलें मला परि मी ।
काचेसमान समजुनि टाकून दिला सुधर्ममणि नामी ॥ ४६ ॥
हा निन्द्यजन्म मजला मिळे करूं कोणत्या उपायास ।
तुमजे आतां पापक्षयास पडतिल अतीव आयास ॥ ४७ ॥
आचरिलीं बहु पापें अवमानुनि सद्गुरूपदेशास ।
मोहान्ध बनुनि सञ्चित केलें मी प्रचुर पापकोशास ॥ ४८ ॥
स्मरण तयाचें होतां उठतो भडका मदीय देहांत ।
दुःखांतुनि काढाया मजला देईल कोण नर हात ॥ ४९ ॥
हें साधुयुग्म सौख्यद आतां मम शरण दुःखहर वाटे ।
तद्दर्शितमार्गानें[3] जाइन मज बोचतील नच कांटे ॥ ५० ॥
पूर्वभवांच्या स्मरणें त्याच्या हृदयास दुःख जरि झालें ।
परि साधुदर्शनानें आनन्दसरोवरांत तें बुडलें ॥ ५१ ॥
भरले नयन तयाचे आनन्दजलें उडुन तेथून ।
मुनियुगसन्निध येउनि करि तो तच्चरणयुगलजलपान ॥ ५२ ॥

---

१ निमग्न– गुंग. २ समुद्रांत. ३ त्यांनीं दाखविलेल्या धर्माचरणानें.

( चारणमुनियुगाचें चरणोदक प्याल्यानें गिधाडाचें शरीर
नानाप्रकारचीं रत्नें जडविल्याप्रमाणें सुंदर दिसू लागलें. )

पादोदकप्रभावें तेजस्वी रत्नराशिसम झाला ।
देह तयाचा नानावर्णें सम्पन्न रुचिरसा दिसला ॥ ५३ ॥
झाले पंख तयाचे सोन्यासम पीतवर्ण लखलखित ।
वैडूर्यासम दिसती पादद्वय नीलकान्तिसंयुक्त ॥ ५४ ॥
चोंच तयाची शोभे विद्रुममणितुल्य लाल रंगाची ।
नानारत्नजडित जणु भासे शोभा तदीय अंगाची ॥ ५५ ॥
सुन्दर वघून अपुला झालेला देह हर्ष त्या झाला ।
मधुरस्वर उच्चारुनि त्यासमयीं नर्तनांत तो रमला ॥ ५६ ॥
मोर जसा मेघागमिं गाळुनि मोदाश्रु नर्तना करितो ।
पसरून दोन पंखां नाचुनि सीतामनास तो हरितो ॥ ५७ ॥
मुनियुग विमल-शिलेवरि वसले असतां नमून तच्चरणा ।
तो खग पुढती वसला विस्मय वाटे वघून राममना ॥ ५८ ॥
रामें मुनिचरणांना कर जोडुनि नमन आदरें केलें ।
म्हटलें या पक्ष्याचें कुरूप वपु रम्य हें कसें झालें ॥ ५९ ॥
अपवित्र मांसभक्षी गिधाड हा शान्त आपुल्या चरणीं ।
होऊन केंवि वसला विस्मय वहु वाटतो मदीयमनीं ॥ ६० ॥

( चारणमुनि गिधाडाचे पूर्वभव व दण्डकवनाची उत्पत्ति
कशी झाली हें सांगतात. )

यतिवर सुगुप्ति वदले रामा हा देश मनुजपरिपूर्ण ।
होता ग्रामपुरादिक होते वहु हा अतीव विस्तीर्ण ॥ ६१ ॥
पुर कर्णकुण्डलाभिध होतें पूर्वीं तिथें वसे भूप ।
दण्डक नाम जयाचें आतां वनला गिधाड हा पाप ॥ ६२ ॥
होता पराक्रमी वहु समरीं केलें परास्त शत्रुगणा ।
आज्ञाधारक झाले वघु शकति न वरि करून ते माना ॥ ६३ ॥
पाणी लोण्यासाठीं मथिलें रघुनन्दना ! तयें मूढें ।
हिंसेमधिं धर्माचें केलें श्रद्धान त्या खलें गाढें ॥ ६४ ॥
राणी तत्पर राहे मिथ्यात्वी-साधुपूजनांत सदा ।
जो साधु मुख्य होता तत्सम्भोगांत मानि तो मोदा ॥ ६५ ॥

होता नृप राणीवश तो ही तद्भक्त जाहला होता ।
चित्तांत स्त्री ज्याच्या सुगुणांची त्या स्थलीं नसे वार्ता ॥ ६६ ॥
नगराबाहिर जातां दिसला राजास एक जैनमुनि ।
भुजयुग खालीं सोडुनि तन्मय जो राहिला निजध्यानीं ॥ ६७ ॥

( दण्डक राजानें मुनीच्या गळ्यांत मृतसर्प घातला. )

त्यानें गळ्यांत त्याच्या मेलेला कृष्ण घातला सर्प ।
स्वध्यानीं स्थिर झाले मनीं न येऊं दिला तयें कोप ॥ ६८ ॥
जोवरि कोणी नाहीं माझ्या काढिल गळ्यांतला साप ।
घोरोपसर्ग सोशिन येऊ देइन मनास नच कम्प ॥ ६९ ॥
करुनि असा मनिं निश्चय सोशि उपद्रव अनेकरात्रींत ।
परतुनि येतां भूपें पाहियला तो मुनीश मतिपूत[1] ॥ ७० ॥
जाऊन जवळ कोणा कण्ठांतिल सर्प काढणाऱ्यास ।
भूपें विचारिलें कीं, करीत आहांत काय कार्यास ॥ ७१ ॥
राजन् ! कोणी मनुजें ध्यानस्थ मुनीशकण्ठि मृतसाप ।
अर्पण केला होता तेणें मुनिरूप होय अपरूप ॥ ७२ ॥
काळें शरीर बनलें छिद्रें देहां असङ्ख्यशीं पडलीं ।
रूप भयङ्कर झालें ओळखणें शक्य होय ज्या न मुळीं ॥ ७३ ॥
तिळमात्रहि समतेचा विघाड ज्याच्या मनांत नच झाला ।
जणु शान्तीचा पुतळा भूपें त्याला प्रणाम तैं केला ॥ ७४ ॥

( दण्डक राजानें मुनीची क्षमा मागितली व तो मुनिभक्त बनून
त्यांचे उपसर्ग निवारित असे.)

त्यानें मुनिवर्याची विनीतभावें[2] क्षमा प्रशंसून ।
मागितली नि तयानें केलें स्वपुरास तेधवा गमन ॥ ७५ ॥
तेव्हांपासुनि झाला निर्ग्रन्थयतीशभक्त भूपाल ।
उपसर्गादिक वारुनि तद्रक्षणिं तो व्यतीत करि काल ॥ ७६ ॥

( राणीच्या जारानें राजाचें मनांत निर्ग्रन्थसाधुविषयीं द्वेष उत्पन्न केला.
त्यामुळें अधिकारी लोकांकडून दि. जैन-मुनींना घाण्यांत पिळून राजानें मारिलें.)

राणीच्या जारानें राजा निर्ग्रन्थभक्त पाहून ।
क्रोधें जाळें रचिलें भूपाचें बदललें पुनः हि मन ॥ ७७ ॥

---

१ ज्याची पवित्र बुद्धि आहे असा. २ नम्रपणानें.

न स्नेह जीवितावरि परदुःख-निवारणांत जें निपुण ।
निर्ग्रन्थरूप ऐसें धरून राणींत होय रममाण ॥ ७८ ॥
हें निन्द्यकर्म जाणुनि जैनश्रमणांत भूप हो रुष्ट ।
सचिवादिकोपदेशें राजा देई तयास बहु कष्ट ॥ ७९ ॥
श्रमणीं द्वेष जयांचा ऐसे जे कोतवाल आदि जन ।
नृप त्या आज्ञा देई यन्त्रीं[1] टाका पिळून मुनि जैन ॥ ८० ॥
आचार्यासह त्यांचा सर्व दिगम्बर-सुशिष्य-समुदाय ।
पापी अधिकाऱ्यांनीं पिळून यन्त्रांत मारिला हाय ! ॥ ८१ ॥
बाहेरून पुरामधिं येणाऱ्या जिनमुनीस पाहून ।
कोणि दयालु-नरानें म्हटलें योग्य न पुरांत तव गमन ॥ ८२ ॥
कां कीं मुनिसंघाला यन्त्रीं भूपें पिळून मारियलें ।
यास्तव अन्यस्थानीं मुने ! तुम्ही गमन पाहिजे केलें ॥ ८३ ॥
धर्माधारशरीरा[2] रक्षायास्तव पुरांत जाउ नका ।
जाल जरी प्राणांना होईल प्राप्त निश्चयें धोका ॥ ८४ ॥

( अत्यन्त क्रोधानें मुनीच्या मुखांतून निघालेल्या अग्नीनें दण्डकराजाचा सर्व देश जाळून भस्म केला. त्याचा कांहींही अवशेष राहिला नाहीं.)

संघाच्या मरणाचें झालें अत्यन्त दुःख त्या श्रमणा ।
स्तम्भासमान निश्चल वाटे तो पावला चि जणु मरणा ॥ ८५ ॥
सावध होतां झाला अत्यन्त क्रुद्ध लालबुन्द मुनि ।
पसरे रक्ताशोकासम त्याचें नेत्रतेज तें गगनीं ॥ ८६ ॥
कोपें तप्त तयाच्या देहीं स्वेदाम्बुबिन्दु उद्भवले ।
त्यामधिं जणु जगताचें प्रतिबिम्ब व्यक्त वाटतें झालें ॥ ८७ ॥
हाकारानें पडला प्रलयानलतुल्य अग्नि बाहेर ।
तेणें वंशवनासम केलें तत्काल दग्ध सर्व पुर ॥ ८८ ॥
अत्यन्त तीव्रतेजें ग्रामपुरारण्य-वृक्षदेशास ।
जाळून भस्म केलें उरला कांहिं न तदीय अवशेष ॥ ८९ ॥
अन्तःपुर नच देशहि न पुरें पर्वत-नदी-वनें प्राणी ।
भस्मचि झाले सगळे रामा झाली अशी दशा जाणी ॥ ९० ॥

---

१ घाण्यांत. २ धर्माचें पालन करणाऱ्या शरीराचें रक्षण करण्यास्तव.

संसारभीत ऐशा श्रमणें चिरकाल सुतप आचरिलें ।
कोपाग्नीनें सगळें विलया नेलें नि अल्पही नुरलें ॥ ९१ ॥
होता दण्डक नामक देश इथें नृपहि त्याच नांवाचा ।
अद्यापि म्हणुनि म्हणती 'दण्डक' हा भूप्रदेश बुध साचा ॥ ९२ ॥
बहुकाल लोटल्यावरि झाली सम्प्राप्त भूस सुन्दरता ।
उत्पन्न वृक्ष झाले पर्वत नानाविधा तशा सरिता ॥ ९३ ॥
सिंह व्याघ्रवृकादिक पक्षी सर्पादि या स्थलीं आले ।
नानाविध वनधान्यें रामा ! हें वन अतीव गजबजलें ॥ ९४ ॥
अद्यापि नांव याचें ऐकुनि मानवमनास भय वाटे ।
इतिहास सकल याचा चिन्तुनि नयनांत अश्रुगण दाटे ॥ ९५ ॥
राजा दण्डक फिरला संसारीं दीर्घदुःख भोगीत ।
झाला गिधाड वनिं या प्रीति करी यावरीच तच्चित्त ॥ ९६ ॥
पाहुनि विशिष्ट आम्हां स्मृति झाली यास पूर्वजन्माची ।
कोठें दण्डकभूपति याला परि पूर्वपाप हें जाची ॥ ९७ ॥
यापरि कटुकर्मांचें फल होतें प्राप्त विरस जाणून ।
धर्मी तत्पर व्हावें पापापासुनि विरक्त होऊन ॥ ९८ ॥
अन्याचा जरि असला बघून दृष्टान्त शान्तिकारण हो ।
अज्ञानपणा अपुला स्मरणीं येतांच दुःख बुध लाहो ॥ ९९ ॥

( चारणमुनि गिधाडपक्ष्याचें सान्त्वन करितात. )

यानन्तर पक्ष्याला वदले मुनिवर भिऊ नकोस खगा ।
सोडून देइ रडणें होणारें अन्यथा न होइल गा ॥ १०० ॥
सन्तोष हृदयिं मानी सोडुनि दे कम्प काळजी त्यागी ।
कोठें अरण्य कोठें सीतेसह राम परम अनुरागी ॥ १०१ ॥
अमुचा सुनियम कोठें घडला कैसा विचित्र संयोग ।
दुःखापासुनि होणें जागृति तव सर्व-कर्म-शुभयोग[1] ॥ १०२ ॥
कर्मे विचित्र असतीं म्हणून दुनिया विचित्र ही आहे ।
मी अनुभविलें श्रविलें पाहियलें कथिन ऐक बापा हें ॥ १०३ ॥

( सुगुप्तिमुनि स्वतःला वैराग्य कसें झालें याची कथा सांगतात. )

---

१ तुझ्या सर्व कर्मांचा शुभ उदय आहे.

पक्ष्या उपदेशाया रामाभिप्राय तेवि जाणून ।
स्वविरक्तीचें वदले कारण मुनिवर सुशान्तिचें सदन ॥ १०४ ॥
विख्यात अचलनामें राजा वाराणसींत राज्य करी ।
गिरिदेवी त्या राणी गुणरत्नालङ्कृतीस[1] सतत वरी ॥ १०५ ॥
'गुण' नांवाचे आले त्रिगुप्तिधारी मुनीन्द्र सदनास ।
आहारार्थ जयांचें सुचरित करि नष्ट सकल दुरितांस[2] ॥ १०६ ॥
भोजन समाप्त होतां चरणां वन्दन करून राणीनें ।
पुत्रोत्पत्तिप्रश्ना विचारिलें त्यास अन्यहेतूनें ॥ १०७ ॥
( प्रभो आमची गृहस्थावस्था सफल होईल कां निष्फल होईल हें सांगा
असा प्रश्न राणीनें विचारिला. मुनीनें त्यास असें उत्तर दिलें. )
होइल नाथा माझा सांगा गृहिं वास सातिशय[3] काय ? ।
किंवा निष्फळ नातरि परमार्थाची बघेन मी सोय ॥ १०८ ॥
ते वचनगुप्ति भेदुनि राणीची भक्ति पाहुनी वदले ।
पुत्रि ! तुला गे होतिल सुपुत्र वंशास दोन दीप भले ॥ १०९ ॥
यापरि वाणी त्यांची ऐकुनि राणी प्रसन्न मनिं झाली ।
कालान्तरिं तिज झाले 'सुगुप्ति गुप्ताख्य' दोन पुत्र वली[4] ॥ ११० ॥
झाले सकलकलांनीं पूर्ण जसा पूर्ण चन्द्र गगनांत ।
त्यागुनि शैशव[5] वरिती कुमार शोभा समस्त अङ्गांत ॥ १११ ॥
ऐशासमयीं घडला प्रसङ्ग जो राम ! तो तुला कथितों ।
जो भवशरीर-भोगाविषयीं मोहास सर्वदा मथितो ॥ ११२ ॥
'गन्धवती' नगरीचा सोमपुरोहित तयास सुत दोन ।
नामें सुकेतु पहिला दुसऱ्याचें अग्निकेतु अभिधान[6] ॥ ११३ ॥
अन्योन्यावरि त्यांचें अत्यन्त प्रेम ज्यास उपमा न ।
भोजनशयन-क्रीडनिं कदापि अन्योन्य ते विसंबति न ॥ ११४ ॥
कालें सुकेतु याचा विवाह झाला तदा विचार मनीं ।
करि तो खिन्न मनानें झोपावें केवि वा पृथक्शयनीं ॥ ११५ ॥
आतां आम्हांमध्यें विरह विवाहें अवश्य उद्भवला ।
साहू दुःख कसें मी उपाय सांगेल काय कोण मला ॥ ११६ ॥

---

१ सम्यग्दर्शनादि गुणरूपी दागिने. २ पापास. ३ पुत्रजन्मानें सफल.
४ समर्थ बलवान्. ५ बाल्यावस्था. ६ नांव.

( सुकेतु दि. जैनमुनि होतो व अग्निकेतु मिथ्यातपस्वी होतो. सुकेतूचे गुरु अग्निकेतु जैनमुनि कोणत्या उपायानें होईल याचा उपाय सांगतात. )

झाला प्रबोध येणें अनन्तवीर्यासमीप तो गेला ।
दीक्षा घेउनि मोदें मुनिमूलगुणांत सतत रत झाला ॥ ११७ ॥
भावाच्या विरहानें झालें अतिदुःख अग्निकेतूस ।
मिथ्यातापस झाला करितो पञ्चाग्नि कुतप सविशेष ॥ ११८ ॥
ऐकून वृत्त जाया जेव्हां इच्छी सुकेतु बोधाया ।
गुरु त्या वदले शिष्या तेथें जाउनि करी उपाया या ॥ ११९ ॥
वाराणसींत जेव्हां गंगाकूलीं[1] विवाद तो करिल ।
त्याला वद सत्यकथा मिथ्यातपविमुख खचित होईल ॥ १२० ॥
तुम्ही बोलत असतां तिसऱ्या प्रहरांत तीन ललनांना ।
घेऊन एक कन्या येईल गोरी विचित्रवस्त्रगणा ॥ १२१ ॥
पाहून तिला वद तूं तुझ्या मतीं ज्ञान दिव्य जरि आहे ।
या कन्येचें भावी सांग शुभाशुभ तुला असे ठावें ॥ १२२ ॥
अज्ञान तो न जाणे वदेल ठावें मला न तूं बोल ।
तेव्हां सांग तयाला यापरि वृत्तान्त सत्यसा सकल ॥ १२३ ॥
वाराणसींत आहे धनिक 'श्रीप्रवर' नामक श्रेष्ठी ।
त्याची दुहिता आहे नामें 'रुचिरा' शुभा जिची दृष्टि ॥ १२४ ॥
परि ती तिसऱ्या दिवशीं कमलमुखी यममुखांत जाईल ।
या यमवाघापासुनि जीवमृगा सांग कोण रक्षील ॥ १२५ ॥
'कंवर' नाम ग्रामीं मातुल राहे 'विलास' नांवाचा ।
प्रवराचा तत्सदनीं शेळी होईल खचित जीव तिचा ॥ १२६ ॥
मारील लांडगा तिज तेव्हां लाभेल जन्म महिषीचा ।
नन्तर विलासकन्या होइल ऐशी मुनीन्द्रवरवाचा ॥ १२७ ॥
सांगेन असें बोलुनि गुरुचरणा तो सुकेतु वन्दून ।
गेला तापससदना कन्या पाहुनि तसें करी कथन ॥ १२८ ॥
सर्वप्रकार घडला हा केतूच्या समक्ष पाहून ।
निश्चय त्याचा झाला प्रमाण वाटे तयास मुनिवचन ॥ १२९ ॥

---

१ गंगेच्या तटावर.

मातुलकन्या विधुरा योग्य यदा जाहली विवाहास ।
प्रवराशीं वाङ्निश्चय झाला आनन्द होय मासास ॥ १३० ॥
येतां विवाहसमय प्रवराला अग्निकेतुनें कथिलें ।
पूर्वभवीं ही होती तव कन्या हें मनांत घेइ भलें ॥ १३१ ॥
विधुरापूर्वभवाचें वर्णन केलें तयें विलासाही ।
ऐकून स्वभवाची स्मृति झाली तेधवा तिला पाही ॥ १३२ ॥
संसारभीति उपजुनि दीक्षेच्छा प्रबल तन्मनीं वाढे ।
घेऊन आर्यिकापद इच्छी हरण्यास कर्म ती गाढें ॥ १३३ ॥
परि तो प्रवरश्रेष्ठी दुरभिप्राया[1] धरून हृदयांत ।
राजसभीं मज मामा कन्या द्याया निषेधितो दुष्ट ॥ १३४ ॥
निर्णय करावयाला प्रार्थी अमुच्या पित्यास तो प्रवर ।
योग्य न विवाह करणें कथी पिता आमुचा तया चतुर ॥ १३५ ॥
कन्येनें आर्यापद धारण केलें नि अग्निकेतूनें ।
श्रमणपदातें झालें उभयांचें सत्य आत्महित तेणें ॥ १३६ ॥
वृत्त असें हें ऐकुनि वैराग्यें हृदयिं घेतलें स्थान ।
अमुच्या अनन्तवीर्यासन्निध तत्काल जाहलों श्रमण ॥ १३७ ॥
मोह जयांच्या हृदयीं वाढे होतात ते दुराचारी ।
तेणें संतत होती दुःखित त्यांना मिळे भवीं न तरी[2] ॥ १३८ ॥
माता-पिता नि मित्रा-मित्र कलत्रादि[3] विविध संसारीं ।
होती विवर्त[4] तेवी सुखदुःखादिक विवर्त अवधारी ॥ १३९ ॥
ऐकून सर्व झाला पक्षी भवदुःखभीत शब्द करी ।
धर्मग्रहणेच्छेनें विहगा[5] ! त्याचें स्वरूप अवधारी ॥ १४० ॥

( सुगुप्तिमुनींचा गिधाडास उपदेश. तो अणुव्रतें ग्रहण करितो. )

आतां भिऊ नको वा, घेई व्रत दुःखसन्ततीस हरी ।
हो तूं प्रशांत कोणा प्राण्या पीडा कदापि नच वितरी ॥ १४१ ॥
खोटें भापण वदणें चोरी करणें अशा अघा सोड ।
भार्या सोड पराची निजनारीमाधिं सदैव रति जोड ॥ १४२ ॥

१ कामविकाराला. २ नाव. ३ बायको, पुत्र आदि. ४ अवस्था.
५ हे पक्ष्या.

पूर्ण ब्रह्मव्रत वा पाळी हृदयीं धरी क्षमाभाव ।
रात्र्याहार त्यागी धरी सदाचार हाचि वा विभव ॥ १४३ ॥
रात्रंदिन हृदयामधिं जिनेन्द्रनामांत चित्त तूं लाव ।
उपवासादिक धारण करून नियमांत ठेव निजभाव ॥ १४४ ॥
तूं अप्रमत्त राहुनि निजात्मरूपांत इन्द्रिया जोड ।
करि निर्ग्रन्थ मुनींची विहगा तूं भक्ति सर्वदा गोड ॥ १४५ ॥
यापरि मुन्युपदेशा ऐकुनि शिर नम्र करुनि कर जोडी ।
मधुर-रवें स्वीकारी पीयूषरसासमान[1] धरि गोडी ॥ १४६ ॥
नम्र श्रावक झाला करील अमुचा विनोद पुष्कळ हा ।
सस्मितें[2] बोलुनि ऐसें स्पर्शी सीता धरून त्या स्नेहा ॥ १४७ ॥
कथिलें साधुयुगानें रक्षण याचें करा तुम्ही आतां ।
आहे तपस्विसम हा यत्प्रकृति[3] अतीव कीं असे शान्ता ॥ १४८ ॥
आहे अरण्य मोठें क्रूर प्राणी सदैव फिरतात ।
सम्यग्दृष्टि असे खग रक्षण याचें करा तुम्ही सतत ॥ १४९ ॥
गुरुवाक्य हृदयिं ठेवुनि सीतेनें अंगिकारिला पक्षी ।
तत्परिपालन-चिन्ता ठेवी गुरुभक्त सतत कमलाक्षी[4] ॥ १५० ॥
निजमृदुल-हस्त सीता त्याच्या अंगावरून फिरवी ती ।
शोभे गरुडाची जणु माता विनता[5] दिसे जनास सती ॥ १५१ ॥
स्तुतिपूर्वक मुनिचरणीं केलें वन्दन तयें पुनः सकलें ।
आशीर्वादा देउनि साधुयुग स्वोचितास्पदा[6] गेलें ॥ १५२ ॥
आकाशांतुनि जातां ते दोघे श्रमण शोभले फार ।
क्षीरसमुद्राचे जणु तरङ्गयुग भासती मनोमधुर ॥ १५३ ॥
त्या समयीं लक्ष्मीधर आला हत्तीवरी बसून तिथें ।
पाही पर्वतसन्निभ सुवर्णमणि-राशि कुतुकयुतचित्तें ॥ १५४ ॥
श्रीरामानें कथिला समस्त वृत्तान्त मुदित होऊन ।
तेणें सौमित्रीचें बनलें अत्यंत सुप्रसन्न मन ॥ १५५ ॥

---

१ अमृतरसासारखी. २ मंद हास्यानें युक्त. ३ ज्याचा स्वभाव.
४ कमळाप्रमाणें डोळे जिचे. ५ गरुडाच्या आईचें 'विनता' असें नांव होतें.
६ मुनिअवस्थेस योग्य अशा गुहादि निर्जन्तु स्थानाकडे.

तो रत्नत्रयपालक पक्षी सीता नि रामचन्द्रास ।
नच सोडी नित पाळी निर्ग्रन्थमुनीन्द्रवचन सविशेष ॥ १५६ ॥
मुन्युपदेशा चिन्तुनि पाळी तो खग अणुव्रतें पांच ।
सीता-लक्ष्मण-रामासह पृथ्वीवरि विहार करि साच ॥ १५७ ॥
भव्यजनांनो पाहा प्रभाव अद्भुत असे सुधर्माचा ।
भाजीच्या पानासम पक्षी झाला सुवर्णवर्णाचा ॥ १५८ ॥
जो मांसभक्षणीं रत दुर्गन्धी किळसयुक्त देहाचा ।
तो काञ्चनकुम्भासम झाला सुंदर सुगंधवासाचा ॥ १५९ ॥
कांहीं अवयव त्याचे अग्निज्वालेसमान दिसतात ।
वैडूर्यासम कांहीं कांहीं पाचेसमान खुलतात ॥ १६० ॥
तो राम-लक्ष्मणाच्या पुढें करी नृत्य पंख पसरून ।
आनन्द होय त्यांना जाति विनोदांत या परीस दिन ॥ १६१ ॥
चन्दन चर्चुनि देहीं त्याच्या घालून घुंगरें पायीं ।
नाचविती तालावर काल विनोदांत यापरी जाई ॥ १६२ ॥
तद्देहाचे पसरति किरणाचे वृन्द जणु जटेसम जे ।
तेणें 'जटायु' ऐसें अन्वर्थक नाम त्यास वहु साजे ॥ १६३ ॥
तो हंसगतिस जिंकी त्याचा विभ्रमविलास पाहून ।
पक्षी अन्यतयाला भीती करि यापरी नभोगमन ॥ १६४ ॥
तीन्ही संध्याकाळीं सीतेसह भक्तियुक्त होऊन ।
तो जिनवरास सिद्धां, योग्यां वन्दी शिरास लववून ॥ १६५ ॥
त्याच्यावरि सीतेची प्रीति नि करुणा अपारशी राहे ।
धर्माच्या वात्सल्यें तद्रक्षणिं सतत काळजी वाहे ॥ १६६ ॥

इन्द्रवज्रावृत्त–

खाई फलें शुद्ध सुधेसमान । प्राशी जला प्रासुक तो अदीन ।
पाळी सदाचार उपासकाचा । विचार त्याचा अतिशुद्ध साचा ॥१६७॥
सीता जिनाचें स्तुतिगीत गाई । श्रीराम त्यातें शुभ ताल देई ।
विहङ्ग नाचे जिनदास[1]भावें । प्रसन्नता ती हृदयीं न मावें ॥ १६८ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे जटायुरुपाख्यानं नाम एकचत्वारिंशत्तमं पर्व ॥ ४१ ॥

---

१ जिनेश्वराच्या चरणाचा दास होऊन.

# बेचाळीसाव्या पर्वाचा कथासंक्षेप.

चारणमुनींना दान दिलें. त्यामुळें राम, सीता व लक्ष्मण सुवर्ण व रत्नांनीं संपन्न बनले. त्यांनीं एक सुंदर सुवर्णरथ तयार केला. त्याला हत्ती जोडून ते रथांत बसून दण्डक वनांत विहार करीत असत.

ते त्या वनांत कोठें एक दिवस राहत असत. तर कोठें एक महिनाभर राहत असत. गळयांत पुष्पहार घालून व पर्वतावरील पाण्याचे झरे पाहत विहार करीत असत. अतिशय उंच झाडें जेथें आहेत अशा प्रदेशांत राहणें त्यांना फार आवडत असे. त्यांच्या मनाला भय म्हणून माहीतच नव्हतें. नवीन नवीन वनविभाग पाहत ते जात असत. पर्वतावरून वाहणाऱ्या झऱ्याचे तुषार आकाशांत मोत्याप्रमाणें चमकत असत. हें पाहून त्यांना फार मौज वाटे.

त्या दण्डकवनांत डाळिंब, कदम्ब, खजूर, आम्र, नारिंग, कवठ वगैरे फळ-झाडें पुष्कळ होतीं. त्यांचीं फळें तोडून लक्ष्मण, राम, सीता, जटायु पक्षी यांना देत असे व स्वतःही खात असे. हे रामचन्द्रादिक वनांत फिरू लागले म्हणजे वनदेव फिरत असल्यासारखें वाटत असे. मंद अशा वायूनें झाडांच्या फांद्या हालत व फुलें गळून पडत तेव्हां जणु हें दण्डकवन या रामादिक पाहुण्यांचें स्वागत करीत आहे असें वाटे.

नदीच्या तटावर मोर, सारस, पोपट, कोकिळ, हंस असे पक्षी मधुर शब्द करून क्रीडा करीत असत व हें दृश्य रामादिकांना आनंदवीत असे.

रथांत बसून रामादिक विहार करीत असतां– सिंह, वाघ, चित्ते वगैरे प्राणी त्यांना पाहत असत पण त्यांच्या प्रभावापुढें ते शांत होत असत. एक वाघ आपलें शेपूट ध्वजाप्रमाणें वर करून पळत असतांना रामचन्द्रांनीं सीतेला तो दाखविला. एक बहिरी ससाणा अष्टापदाच्या तोंडांतला मांसाचा तुकडा घेऊन आकाशांत उडून गेला. कोठें भीतीनें हरिणांचे कळप पळत असलेले रामानें सीतेला दाखविले. कोठें कोठें विशालवृक्ष हत्तीनें टक्कर देऊन पाडलेले त्यांनीं पाहिले. विहारांत अशीं अनेक दृश्यें त्यांना दिसलीं. ते दण्डक नांवाच्या पर्वताजवळ आले.

या पर्वताच्या पायथ्याजवळून 'क्रौञ्चरवा' नामक नदी वाहत असलेली त्यांच्या दृष्टीस पडली. तिचें पात्र लाल व हिरव्या खडकानें युक्त असल्यामुळें तिचें पाणी लाल व शेवाळलेलें दिसे. तिच्या जलांत त्यांनीं खूप अवगाहन केलें. नदी सुंदर असल्यामुळें हिच्या कांठीं त्यांनीं निवास केला.

रामचन्द्र लक्ष्मणास म्हणाले– हें स्थान सुंदर आहे. येथें नगर रचून राहावें. व लक्ष्मणा मी अयोध्येला जाऊन तुझ्या मातेला व माझ्या मातेला घेऊन येतो. तूं येथेंच सीतेचें रक्षण करीत राहा. असें म्हणून त्यांनीं आकाशाकडे पाहिलें. तोंच मेघांनीं सर्व दिशांना व्यापून वृष्टि करण्याला सुरवात केली. सारखी जलवृष्टि ते करू लागले तेव्हां जिनेश्वराच्या जन्मसमयीं सतत रत्नवृष्टि करणाऱ्या देवाप्रमाणें शोभू लागले.

क्षुब्धसमुद्र जसा गर्जना करितो तसे मेघ आकाशांत गर्जना करीत होते. मेघांत विजांचा सतत चमचमाट होत होता व ते अखंडधारेनें जलवृष्टि करीत होते. वेगवान् वाऱ्यानें चंचल होऊन फिरणारे मेघ तारुण्यांत असंयमी मनुष्याच्या चंचल मनाप्रमाणें भासू लागले.

कांहीं मेघ शेतें सोडून पर्वतावर वृष्टि करूं लागले तेव्हां ते मूर्ख धनिक जसे कुपात्रीं दान देतात तसे दिसले.

नद्या जमिनीवरून महाप्रवाह घेऊन धावू लागल्या. जमिनीवर चोहोंकडे दुर्गम चिखल झाला. पाण्याचा वास घेऊन वारे वाहू लागले. व श्रीराम व लक्ष्मणांना या वर्षाकालांत आपल्या मातांना आणण्यासाठीं जाणें योग्य नाहीं असें जणु ते सांगू लागले.

रामचन्द्रही लक्ष्मणास म्हणाले– 'वत्सा, हा वर्षाकाल मातृजनांना आणावयास योग्य नाहीं.' लक्ष्मण म्हणाला– प्रभो, आपली शरत्कालीं आज्ञा झाली म्हणजे मी त्यांना आणावयास जाईन. यानंतर त्यांनीं त्या दण्डकावनांत सुंदर निवास बांधला व ते जिनभक्त नानाप्रकारच्या कथा सांगत आनंदानें राहिले.

---

# बेचाळीसावें पर्व.

अनुष्टुप्–

पात्रदानप्रभावानें सीता, राम नि लक्ष्मण ।
येथेंच रत्नहेमादि-धनें संपन्न होउन ॥ १ ॥

वनीं विहार करिती रथास गज जोडुन ।
करीं जटायुपक्ष्यास घेऊन मनिं मोदुन ॥ २ ॥

रथ त्यांनीं सुवर्णाचा रचिला बहु सुन्दर ।
पाहून ज्यास चकित स्वर्गीचा हो पुरन्दर[1] ॥ ३ ॥

ओढिती गज ज्या चार रथ अन्या सुदुर्लभ ।
पुण्यानें प्राप्त त्या झाला पुण्यें होतें सदा शुभ ॥ ४ ॥

उपजाति–

वनांत कोठें दिन एक वास कोठें सुखानें करितात मास ।
स्वच्छंदतेनें करिती विहार गळ्यांत घालून सुपुष्पहार ॥ ५ ॥

वनांत ते निर्झर पाहतात आजानु[2] ज्यांचे शुभलक्ष्म[3] हात ।
उत्तुंग ऐसे वनवृक्ष जेथें निवास सानन्द घडेचि तेथें ॥ ६ ॥

वसन्ततिलका–

सिंहासमान वनिं निर्भय ते फिरून,
आनन्दती वनविभाग नवे बघून ।
त्यांना तिथें विपुल निर्झर भेटतात,
ज्यांचे तुषार जणु मौक्तिक भासतात ॥ ७ ॥

डाळिम्ब, निम्ब नि कदम्ब तसेच आम्र
नारिंग, चम्पक नि जांभळ कोविदार ।
खर्जूर, ताल नि कपित्थ नि नालिकेर ।
यांची असे प्रसवभूमि[4] जगांत थोर ॥ ८ ॥

---

१ इंद्र. २ गुडघ्यापर्यंत. ३ उत्तम लक्षणांचे. ४ उत्पत्ति स्थान.

झाडें परोपकृति येथ करावयास ।
सानन्द शीर्षि धरिती मधुरा फलास ।
घेऊन लक्ष्मण अनेक फलें तयांचीं ।
सीता नि राम नि जटायुस देइ साचीं ॥ ९ ॥

येथें अनेक तृणधान्यसमूह वाढे ।
सीता करी मधुर अन्न सुगंध गाढें ।
यद्भक्षणें परमतृप्ति तयास लाभे ।
रामादि तेथ वनदेवसमान शोभे ॥ १० ॥

शालिनी–

नानावल्ली शोभती वृक्ष नाना । नानापुष्पें सत्फलें जेथ नाना ।
शाभे यांनीं दण्डका सर्वदैव । आनदानें नांदतो रामदेव ॥ ११ ॥
कांहीं येथें ऊन त्या वाटतें न । वृक्षच्छाया सांद्र भासे न ऊन ।
त्यांचें राही चित्त येथें प्रसन्न । लाभे त्यांना सर्वदा स्वादु अन्न ॥१२॥

आर्या–

मंद अशा वायूनें हलणाऱ्या मृदुलपल्लवांनीं ही ।
अमुच्या आगमतोषें अटवी जणु नृत्य करितसे पाही ॥ १३ ॥
जणु ही झंकारानें भृङ्गांच्या गान गातसे वाटे ।
शुभ्र करी ही हास्या निर्झरणी वाहते जिच्या वाटे ॥ १४ ॥
येथें मयूर सारस शुक कोकिल कुरर हंस मधुररवें ।
क्रीडा करिती अमुच्या मनास हें रमवि दृश्य सुखद नवें ॥ १५ ॥
राजसुते ! तूं येथें कोठुन आलीस ये सुखें राहा ।
ऐसें कोमलशब्दें पक्षी वदतात गे तुला पाहा ॥ १६ ॥
शुभ्र-श्यामारुणशा कमलें भरलीं सरोवरें नेत्रें ।
ही जणु अटवी तुजला पाहे राजीवलोचने[1] ! चित्रें ॥ १७ ॥
सौमनसोद्यानासम वन हें पाहून राम सीतेला ।
अत्यन्त प्रीतीनें यापरि कमलाननेस तो वदला ॥ १८ ॥
वल्ली झुडपें तरु हे या शैलाचे कुटुंब जणु आहे ।
हे कमलाक्षी सीते यांना डोळे भरून तूं पाहे ॥ १९ ॥

---

१ कमलनेत्रे !

वक्षःस्थलिं वकुलाच्या संगत झाली प्रियंगु-लतिका ही ।
दिसते पतिसंगत जणु कांता वैदेहि ! दृश्य हें पाही ॥ २० ॥

जो इन्द्रनीलमणिसम कान्ति धरी सर्प हा मयूरास ।
पाहून भयें शिरतो स्वविलीं वैदेहि येइ मुखिं हास ॥ २१ ॥

जानकि ! रथचक्रध्वनि ऐकुनि सिंहेक्षणे[1] बघे सिंह ।
येऊन निजगुहेंतुनि जांभइ देऊन हा गजव्यूह ॥ २२ ॥

वसन्ततिलक—

त्याला अनेक मृग मारुनि रक्त त्यांचे ।
ज्याचे दिसे मुख भयानक लाल साचें ।
शेपूट शीर्षिं धरि जो ध्वजतुल्य देवि ।
पिङ्गाक्ष[2] वाघ बघ भीति न ज्यास ठावी ॥ २३ ॥

पाहून देवि तव चञ्चललोचनांना ।
लज्जा किती बघ गमे हरिणाङ्गनांना ।
दूर्वा मुखीं धरुनि दीनपणें पहाती ।
यांच्या मुखावरिल होय मलूल कान्ति ॥ २४ ॥

आर्या—

नागरमोथा ज्याच्या मुखीं दिसे बघ वराह हा थोर ।
अङ्ग जयाचें चिखलें भरलें मुद्रा दिसे अति क्रूर ॥ २५ ॥

शालिनी—

चित्ता खेळे आपुल्या हा पिलाशीं ।
आहे ज्याचें अङ्ग की व्रणराशि[3] ।
येथें सीते या वनाच्या प्रदेशीं ।
शोभा देतें ही सदा घासराशि ॥ २६ ॥

उपजाति—

देवी इथें हा वहिरीससाणा लहान आहे परि शूरराणा ।
अष्टापदाच्या वदनांतलें हा घेऊन जाई पललास[4] पाहा ॥ २७ ॥

---

१ सिंहाप्रमाणें डोळे जिचे अशी. २ पिंगट डोळ्याचा. ३ अनेक रंगाचा समूह. ४ मांस.

वसन्ततिलका–

गण्डस्थलांतुनि निघे बहु दानधारा[1] ।
जो कान हालवुनि घेइ सदैव वारा ।
ऐशा गजें उपटिला तरु हा प्रचण्ड ।
शुण्डा गमे मजसि ही जणु वज्रदण्ड ॥ २८ ॥

आर्या–

आहे वशिण्ड मोठें ज्याचें हा बैल पुष्ट किति पाही ।
घेऊन कमलजाला[2] गम्भीरध्वनि करीत गे जाई ॥ २९ ॥

वसन्ततिलका–

कोठें दिसे शिखरपङ्क्ति वनांत उंच ।
कोठें दिसे तृण वनीं जणु पाच साच ।
कोठें दिसे मृगसमूह पळे भयानें ।
येथें विहार करिती रुरु हे सुखानें ॥ ३० ॥
कोठें विशालगज-पातित-वृक्षराजी[3] ।
कोठें अनेक चरती तृण पुष्टवाजी[4] ।
गुंजारवास करिती अलि या स्थलांत ।
येथें कठोर करिती रव काकजात[5] ॥ ३१ ॥

भुजङ्गप्रयात–

प्रिये दण्डकारण्य आहे प्रसिद्ध । जगीं कर्म नानाविधें जेवि सिद्ध ।
इथें शैल विख्यात तो त्याच नांवें । करूं या विहारा इथें मोदभावें ॥ ३२
इथें या नगीं औषधी दीप्त[6] भासे । प्रिये ही दिसे दीपकाच्या विलासें ।
तरूंच्या महादाट पर्णामधून । महायास होई प्रवेशास जाण ॥ ३३ ॥
या दण्डकशैलावरि तरु बहु फलभारनम्र दिसतात ।
नाना वल्ली पुष्पें अपार शोभा तयास देतात ॥ ३४ ॥
कोठें पक्ष्यांचा रव मनोज्ञ होतो मनास मोहवितो ।
यापरि अपूर्व शोभा निजदेहीं शैल हा प्रिये धरितो ॥ ३५ ॥
ही क्रौञ्चरवा नामक नदी असे ख्यात सर्व जगतांत ।
पाणी हिचें प्रिये बहु जैसें प्रिय वाटतें तुझें चरित ॥ ३६ ॥

---

१ मदाची धारा. २ कमलाचें जाळें. ३ हत्तीनें पाडलेली वृक्षपंक्ति. ४ घोडे. ५ कावळ्याचा समूह. ६ प्रकाशणारी, चमकणारी.

कोठें खडक असे बहु लाल हिचें म्हणुनि लाल नीर दिसे ।
कोठें हिरवा तेणें नयनां शेवाळयुक्त तें भासे ॥ ३७ ॥
वदली सीता रामा तरङ्गिणी ही तरङ्गरम्य दिसे ।
हंसादिकपक्ष्यांच्या शब्दें क्रीडावयास सांगतसे ॥ ३८ ॥
सीतावचना ऐकुनि राम नि लक्ष्मण जलावगाहास ।
उतरून रथावरुनी आले सरितासुरम्यतीरास ॥ ३९ ॥
केली त्यांनीं नीरक्रीडा बहुविध मनांत मोदून ।
पक्ष्यांच्याही झाला हृदयाला हर्ष तीस पाहून ॥ ४० ॥
येउनि तीरावरि ते देहावयवास लावितात उटी ।
जी अत्यंत सुगंधी नेसुनि अतिमृदुल रम्यवस्त्र कटीं ॥ ४१ ॥
श्रीराम लक्ष्मणाला वदलें हें स्थान रम्य मज वाटे ।
येथें नगर रचावें राहावें मोद मन्मनीं दाटे ॥ ४२ ॥
येथें बहु वनगाई असती महिषीहि दुग्ध ज्या देती ।
पिउनि विहार करावा. स्वच्छंदें मोद वाटतो चित्तीं ॥ ४३ ॥
हें स्थान गहन आहे आहे इतरां अगम्य येथेंच ।
करणें निवास माझ्या हृदयाला हेंचि मोदकर साच ॥ ४४ ॥
जाऊन अयोध्येला आणी माता तुझी नि माझी ही ।
अथवा जाउनि आणिन सीतारक्षार्थ तूं इथें राही ॥ ४५॥
आतां होइल जलदचि वत्सा ! प्रारम्भ जलदकालास ।
जाणें न योग्य वाटे आणाया पूज्यमातृचरणास ॥ ४६ ॥
ऐसें बोलत असतां झाला प्रारम्भ जलदसमयास ।
मेघागमन जहालें तिमिरें आच्छादिलें दिगास्यांस[1] ॥ ४७ ॥
आकाशास निरन्तर आच्छादुनि मेघ वर्षिती पाणी ।
जिनजननसमयिं जैसें अखण्ड सुर वर्षिती असङ्ख्यमणि ॥ ४८ ॥
क्षुब्धसमुद्रासम नभिं चञ्चल करितात गर्जना मेघ ।
चमचम विजा तयामधिं चमकति वर्षिति अखण्ड नीरौघ[2] ॥ ४९ ॥
जणु उंच शैल नभिं हे फिरती विद्युत्समूह घेऊन ।
वितळुनि जलधारांनीं भूवर पडतात सांगतें नृमन[3] ॥ ५० ॥

---

१ सर्व दिशांच्या मुखांना. २ पाण्याचा समूह. ३ मनुष्याचें मन.

काहीं सवेगपवनें फिरती हे शुभ्र मेघ गगनांत ।
यौवनिं असंयमीचीं फिरतीं चञ्चलमनें जणु सतत ॥ ५१ ॥
सोडुनि शेतें कोणीं शैलीं जलवृष्टि मेघ करितात ।
अविशेषज्ञ धनी नर कुपात्रिं अन्नादि जेवि देतात ॥ ५२ ॥
घेउनि महाप्रवाहा धरणीवरि धावु लागल्या सरिता ।
झाला भूवरि दुर्गम चिखल पडे कोसळून जन जातां ॥ ५३ ॥
घेउनि गन्धजलाचा प्रचण्ड वारे विहार करितात ।
जणु राघवास वदती तुमचें येथून गमन नच युक्त ॥ ५४ ॥
जाणुनि जणु हें रामें म्हटलें लक्ष्मीधरास वत्सा ! हे ।
मातृजना आणाया हा वर्षाकाल उचित नच पाहे ॥ ५५ ॥
स्वामिन् जेव्हां आपण मजला आदेश द्याल जाईन ।
शारदसमयीं गमना करीन आज्ञा प्रमाण मानून ॥ ५६ ॥
यानंतर दण्डकवनिं सुंदरशा आश्रयांत[1] राहून ।
जिनदास विविध सुकथा वदती ते प्रेममग्न होऊन ॥ ५७ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे दण्डकारण्यनिवासाभिधानं नाम द्विचत्वारिंशत्तमं पर्व ॥ ४२ ॥

---

१ निवासस्थानांत.

## त्रेचाळिसाव्या पर्वांतील कथासार.

शरदृतु आला चन्द्राची शोभा वाढली, सरोवरांना कमलांनीं शोभा आली भुंगे त्यांच्या सभोंवती गुंजारव करून मधुप्राशन करूं लागले. सृष्टि अशी सुंदर दिसू लागल्यामुळें लक्ष्मणालाही आनंद झाला. पावसाळ्यांत एकेठिकाणीं बसून राहावें लागल्यामुळें त्याचें मन खिन्न झालें होतें. वनामध्यें इकडे तिकडे फिरून यावें असें त्याला वाटूं लागलें. रामचंद्राची आज्ञा मिळवून स्वारी आश्रमांतून बाहेर पडली. आश्रमापासून थोडें अंतर पुढें गेल्यावर त्याला मधुरवासानें आपल्याकडे आकृष्ट केलें. वास कोण्या दिशेंतून येत आहे हें त्याच्या मनानें व नाकानें हेरलें व त्या दिशेकडे त्याचें पाय वेगानें चालू लागले.

त्या दण्डकारण्यांत खरदूषण व चंद्रनखेचा पुत्र शम्बूक हा सूर्यहासखड्ग प्राप्त करून घेण्यासाठीं बारा वर्षांपासून ब्रह्मचर्यव्रतानें तप करीत होता. एकच अन्न खाण्याचा नियम अखण्डपणें त्यानें पाळला. त्यामुळें सूर्यहासखड्ग आकाशांत अधर असें लोंबकळूं लागलें होतें. आणखी सात दिवस साधकानें त्याला स्पर्श करूं नये असा नियम असल्यामुळें त्यानें त्याला हात लाविला नव्हता. जर साधक या नियमाचा भंग करील तर त्याचें मस्तक त्याच्या धडावरून गळल्याशिवाय राहणार नाहीं. व बारा वर्षांचें तपश्चरण विफल होईल म्हणून तो त्या नियमाचें पालनांत तत्पर होता. पुत्रस्नेहानें त्याठिकाणीं त्याची माता चन्द्रनखा तेथें येत असे. तिनें जेव्हां तो सूर्यहासखड्ग पाहिला तेव्हां तिला आनंद वाटला. ही वार्ता तिनें खरदूषणाला कळविली. व आपले दोन पुत्र शम्बूक व सुन्द हे शत्रुरूपी कांटे नष्ट करू शकतील व आनंदानें राज्य करतील असे मनोरथ वारंवार तिच्या मनांत उत्पन्न होऊ लागले.

तो खड्ग दिव्यसुगन्धित उटीनें माखलेला व दिव्यपुष्पमालांनीं भूषविलेला असल्यामुळें त्याच्या सुगन्धानें आकृष्ट होऊन लक्ष्मण त्याठिकाणीं आला. तो खड्ग पाहून त्यानें हातानें ओढून घेतला. अत्यंत पुण्यशाली लक्ष्मणाला तो अनायासें प्राप्त झाला. त्याच्या धारेची तीक्ष्णता पाहावी अशी इच्छा त्याला झाली व त्यानें वेळूच्या जाळ्यावर त्याचा प्रहार केला. वेळूच्या बेटांत शम्बूक बसला होता. त्या बेटासह त्याचेंही मस्तक तुटलें व तो मरण पावला. लक्ष्मणाला त्याची तीक्ष्णता समजली तो आनंदानें त्या खड्गाला घेऊन रामचंद्राकडे निघाला असतां त्या खड्गाच्या अधिष्ठित देवतांनीं लक्ष्मणाचें तुम्ही आमचे प्रभु आहांत म्हणून आदरानें पूजन केलें व नमस्कार केला. तदनंतर तो रामचंद्राकडे निघाला.

इकडे सीतादेवी अद्यापि लक्ष्मण कां येत नाहीं म्हणून चिंता करीत होती. तिनें जटायूला 'जा व आकाशांतून लक्ष्मण येत आहे का हें पाहा, म्हणून आज्ञा केली.' तो जावयाला निघणार इतक्यांत सीतादेवीनें लक्ष्मण येत असलेला पाहिला. तिनें रामचंद्राला म्हटलें— तो पाहा वत्स लक्ष्मण केशराच्या उटीनें शोभत आहे व इकडे मोठ्या उत्साहानें येत आहे. त्याच्या हातांत कांहींतरी सूर्यासारखें चमकत आहे. थोड्या वेळानें लक्ष्मण आला त्याच्या अंगावर देवतांनीं दिलेलीं वस्त्रभूषणें होतीं. रामचंद्र अतिशय हर्षानें त्याला भेटले.

लक्ष्मणानें सूर्यहास खड्ग कसा प्राप्त झाला व देवतांनीं आपला आदर कां केला वगैरे गोष्टी रामचंद्रांना सांगितल्या व त्यांचा थोडावेळ मोठा आनंदांत व्यतीत झाला.

इकडे शम्बूकाची माता वेळूच्या बेटाकडे आली पण तें तिला विध्वस्त झालेलें दिसलें. जवळ आल्यावर जें तिला दिसलें तें अत्यंत दुःख उत्पन्न करणारें होतें. शम्बूकाचें मस्तक त्याच्या धडावरून वेगळें होऊन पडलें होतें. तें पाहतांच ती अतिशय दुःखी होऊन जमिनीवर मूर्च्छित होऊन पडली. थोड्यावेळानें सावध झाली. ती अतिशय दुःखी झाली. ती म्हणू लागली— तूं कोणाचा शत्रु नव्हतास. बारा वर्षें नियमतत्पर राहून तप केलेस. असें असतां कोण्या दुष्टाचा हात तुला मारावयाला धावला बरें? ज्यानें तुला मारिलें त्या दुष्टाला मी शोधून मारीन. असें म्हणून तें मस्तक तिनें आपल्या मांडीवर घेतलें व ती शोक करूं लागली. त्या शोकाचें परिणमन क्रोधांत झालें. तिनें तें मस्तक खालीं ठेवलें व ती मारणाऱ्याचा शोध करावयास निघाली. राम-लक्ष्मणाच्या निवासस्थानाजवळ आली. त्या अत्यंत

सुंदर दोन पुरुषश्रेष्ठांना पाहिल्याबरोबर तिचा कोपही नाहींसा झाला. व तिच्या मनांत त्यांच्याविषयीं अभिलाषा उत्पन्न झाली. तिनें कन्येचा वेष घेतला व एका पुन्नागवृक्षाच्याखालीं ती रडत बसली. सीतेला तिचें रडणें ऐकून दया उत्पन्न झाली. ती तिच्याजवळ जाऊन तिच्या पाठीवर तिनें हात फिरविला व ती तिला रामाजवळ घेऊन आली. तूं कां बरें रडतेस असें रामचंद्रांनीं विचारलें. तिनें याप्रमाणें सांगितलें "मी अगदींच ल्हान होते तेव्हां माझी आई वारली. मला तिचें स्मरणही नाहीं. पुढें बापाला तिच्या मरणानें अतिशय दुःख झालें व तोही लौकरच देवाच्या दारीं गेला व माझ्या पूर्वजन्माच्या पापानें माझ्या बंधूंनींही आई-बापांचीच वाट धरली. मला संरक्षक कोणीच राहिलें नाही. मी मरणेच्छेनें सिंह, वाघ, लांडग्यांनीं भरलेल्या या वनांत प्रवेश केला. पण त्यांनींही मला मारलें नाहीं. दैवयोगानें निर्मनुष्य अशा या अरण्यांत आपण मला भेटलेले आहांत. मी कन्या आहे व माझा आपण स्वीकार करावा. आतां आपला कांहींहीं परिचय नसतां मी आपणास माझा स्वीकार करा असें म्हणत आहे हें थोडेसें आपणास असभ्यतेचें वाटेल याची मला जाणीव आहे. पण अशा असहाय स्थितींत कोणीही असेंच म्हणेल." असें म्हणून ती थांबली.

त्या दोघांनींही मौनच धारण केल्यामुळें तिनें त्यांचा अभिप्राय ओळखला व ती दीर्घश्वास सोडून व मनांत क्रोध धरून तेथून निघून गेली.

ती गेल्यावर रामचंद्र म्हणाले– ही स्त्री मायावीपणानें बोलत होती. आपण उत्तर दिलें नाहीं हेंच योग्य केलें.

परंतु लक्ष्मणाला तिच्या सौंदर्यानें वेडा बनविलें. ती पुनः दृष्टीस पडेल तर बरें होईल असा मनांत विचार करून तिच्या शोधास निघाला पण ती त्याला भेटली नाहीं. अशा विचारांनीं त्यानें आपलें मन मलिन केलें.

ज्यांना आपलें मन निर्मळ ठेवावयाचें असतें त्यांनीं अशा विचारापासून दूर राहावें. 'मी कोणत्या चांगल्या कार्यांत मनाला लावावें म्हणजे मला सुख मिळेल,' याचा विचार करून जिनभक्त नेहमी विवेक धारण करतात. त्यामुळें त्यांना सगळ्या सद्गुणांची प्राप्ति होते.

---

# त्रेचाळिसावें पर्व.

[ रामचंद्राच्या आज्ञेनें वनांत फिरणारा लक्ष्मण शंबूकाकडे येतो. ]

आला शारदऋतु हा चन्द्राच्या करशरांस[1] घेऊन ।
मेघास शुभ्र बनवी राज्य करी सकल विश्व घेरून ॥ १ ॥

पुष्पें विकसित झालीं हाच अलङ्कार दशदिशा वरिती ।
अत्यन्त शुभ्रतेनें जणु त्या विश्वास पाहुनी हसती ॥ २ ॥

आकाशाङ्गण झालें मेघमलें मुक्त जणु जलें धुतलें ।
सर्वत्र नीलवर्णी तें शशितारागणें अतीव खुलें ॥ ३ ॥

वर्षाकालगजानें धरारमा[2] नीलमेघ-कलशांनी ।
न्हाणून गमन केलें कोठें तरि वीजझूल घेवोनी ॥ ४ ॥

विकसित कमलां पाहुनि अलिगण गुञ्जारवा करूं लागे ।
मकरन्द-मधुस्वादें मधुमत्त-जनासमान तो वागे ॥ ५ ॥

नानाकुसुमसुगन्धा विमलाम्बर[3]धारिणी खुले रजनी ।
जणु चन्द्रतिलक भालीं सुवासिनीतुल्य शोभते गगनीं ॥ ६ ॥

मनुजमना उत्साही प्रसन्न जो करि असा शरत्काल ।
आला झालें लक्ष्मणवीराचें मुदितसें मनःकमल ॥ ७ ॥

ज्येष्ठापासुनि आज्ञा मिळवुनि पाहुनि नभास गमन करी ।
त्या काननीं सुगन्धा हुङ्गुनि तिकडे स्वचित्त तो प्रेरी ॥ ८ ॥

विकसित पुष्पतरूंचा सुगन्ध ज्या वायु आणितो काय ? ।
पुष्पसमूहीं सन्तत झोपे त्या हेतु काय मत्कार्य ॥ ९ ॥

वैदेहीदेहा[5]चा वा रामाचा सुगन्ध हा काय ? ।
किंवा येथें कोणी सुरदेहाचा सुगन्ध आदेय[6] ॥ १० ॥

घ्राणमनोहर ऐसा सुगन्ध आला जया दिशेंतून ।
तिकडे निर्णय घेण्याकरितां लक्ष्मण करी पदें गमन ॥ ११ ॥

---

१ किरणरूप बाण. २ पृथ्वीरूपी लक्ष्मी. ३ निर्मल आकाश; निर्मल वस्त्र. ५ सीताशरीराचा. ६ ग्रहणयोग्य.

खरदूषण-चन्द्रनखा यांचा जो ज्येष्ट पुत्र शम्बूक ।
तो सूर्यहासखड्गा साधाया तप करी इथें शुष्क[1] ॥ १२ ॥
माता-पितरें त्याला निवारिलें परि न ऐकतां आला ।
मृत्युप्रेरित जणु तो येउनि घनवंशजालकीं[2] वसला ॥ १३ ॥
एकचि अन्न प्रतिदिनिं भक्षुनि तो ब्रह्मचर्य पूर्ण धरी ।
इन्द्रियविषयां वर्जुनि येथें राहून खड्ग साध्य करी ॥ १४ ॥
बारा वर्षें त्यानें केलें राहून या स्थलीं सुतप ।
आकाशांतुनि आला राहे परि अधर दिव्य असिरूप ॥ १५ ॥
अवशिष्ट सात दिवसावधि होतां पूर्ण साधकास मिळे ।
तत्पूर्वग्रहणानें साधकदेहावरून कण्ठ गळे ॥ १६ ॥
[ चन्द्रनखेनें शम्बूकाला सूर्यहासखड्ग लौकरच सिद्ध होईल
अशी वार्ता स्वपतीला— खरदूषणाला सांगितली. ]
पुत्रस्नेहें येई चन्द्रनखा त्यास्थलीं तिला दिसला ।
देवाधिष्ठित तो असि हर्षे वृत्तान्त पतिस हा कथिला ॥ १७ ॥
येईल पुत्र अपुला नियमावधि पूर्ण संपल्यावरती ।
मेरुप्रदक्षिणेला करून सानन्द होउनी चित्तीं ॥ १८ ॥
सिद्ध जहाला अपुला नाथ मनोरथ असें मला वाटे ।
शम्बूकसुन्द सुतयुग करोत संपूर्ण भग्न अरि काटे ॥ १९ ॥
[ लक्ष्मणाला तो सूर्यहासखड्ग दिसला. त्यानें तो घेतला. त्याचा तीक्ष्णपणा जाणण्यासाठीं वेळूच्या स्तंभावर त्यानें प्रहार केला. त्यावेळीं शम्बूकाचें मस्तक तुटून पडलें. यानन्तर लक्ष्मण रामचन्द्राकडे आला. ]
इकडे फिरत वनामधिं शम्बूकाच्या तपःस्थलीं आला ।
लक्ष्मण सुगन्धमार्गें पाही त्या दिव्य सूर्यहासाला ॥ २० ॥
तो खड्ग दिव्यगन्धें लिप्त विभूषित सुदिव्यमालांनीं ।
साश्चर्य मोद झाला सौमित्रीच्या तदा बघून मनीं ॥ २१ ॥
शम्बूक-तपःस्थल तें वृक्षलताजाल-तुङ्गपाषाणें ।
वेष्टित दुर्गम होतें त्यामध्यें सुसम रत्नभूमि बने ॥ २२ ॥
पुनरपि वेळूचें वन होतें त्याच्या सुमध्यभागांत ।
ज्यावरि असिरत्नाची कान्ति झळाळे अपूर्व जी शान्त ॥ २३ ॥

१ निष्फल. २ दाट वेळूंच्या जाळींत.

निर्भय होउनि घेई लक्ष्मीधर खड्गरत्न तें स्वकरें ।
चित्त जयाचें भरलें तत्प्राप्तीनें विशाल मोदभरें ॥ २४ ॥
तीक्ष्णपणा जाणावा ऐशी इच्छा मनांत उद्भवली ।
तेणें वंशस्तम्बच्छेदन[1] सौमित्रि शीघ्र करि सुवली ॥ २५ ॥
करिं खड्गरत्न पाहुनि वदल्या सम्पूर्ण देवता त्यास ।
तूं अमुचा प्रभु असशी पूजुनि नमिती तदीय-चरणास ॥ २६ ॥
लक्ष्मण कोठें गेला परत न अद्यापि कां बरें आला ? ।
सीता रामास पुसे अश्रूंनीं धौत करुनि मुख-कमला ॥ २७ ॥
भद्र जटायो पाही संचार करून दूर आकाशीं ।
लक्ष्मणकुमार कोठें आहे येऊन कळव आम्हांशीं ॥ २८ ॥
ऐसें सीतावचना ऐकुनि जाणार तोंच ती वदली ।
कुंकुमलिप्त बघा हो ही लक्ष्मणमूर्ति येत असलेली ॥ २९ ॥
अतितेजस्वी चमके याच्या करिं खड्ग नाथ हा कैसा ।
नानाभूषण-वस्त्रें सिंहानें शैल शोभतो जैसा ॥ ३० ॥
लक्ष्मीधरास यापरि पाहुनि साश्चर्य जाहले राम ।
आनन्दानें जाउनि लक्ष्मण आलिंगिला सुगुणधाम[2] ॥ ३१ ॥
रामें विचारल्यावर सगळा वृत्तान्त लक्ष्मणें कथिला ।
नाना-विचित्र-घटनाकथनीं आनन्दयुक्त तो झाला ॥ ३२ ॥
[ चन्द्रनखा पुत्राचें मस्तक पाहून मूर्च्छित झाली. सावध झाल्यावर शोक करू लागली व क्रोधानें मारणाऱ्याचा नाश करण्यास निघाली.]
प्रतिदिनिं पाहुनि पुत्रा तैसें खड्गास सदनिं जी जाई ।
चन्द्रनखा ती आली त्या दिवशीं एकटी तिथें पाही ॥ ३३ ॥
ती वेळूची जाळी कापुनि जी टाकिली तिला दिसली ।
गेला पुत्र कुठें मम लिहिलें मम आज काय वा भालीं ॥ ३४ ॥
जेथें बसला होता जेथें संसिद्ध खड्ग त्या झालें ।
कापून वंशवन[3] तें त्यानें हा ! चांगलें नसें केलें ॥ ३५ ॥
तत्क्षणिं त्याचें दिसलें तुटलेलें बालसूर्यतुल्य मुख ।
कुण्डलमण्डित[4], धडही झालें हृदया तिच्या महादुःख ॥ ३६ ॥

---

१ वेळूच्या बेटाचें छेदन. २ सद्गुणांचें घर. ३ वेळूचें बेट.
४ कुण्डलानीं शोभणारें.

मूर्च्छित होउनि पडली धरणीवरि अल्पकाल चन्द्रनखा ।
मूर्च्छासखी तिला जणु करुणेनें काय देइ क्षणसुखा ॥ ३७ ॥
सावध होतां दिसलें रम्य असें पुत्रवदन नयनास ।
अतिशोक तिनें केला दुःखद तो जाहला न कोणास ॥ ३८ ॥
डोळ्यांतुनि अश्रूंची झड लागे रुदन ती करी शोकें ।
कुररीखगीप्रमाणें[1] विलाप हृदयास पाडितो भोकें ॥ ३९ ॥
बारा वर्षें आणिक दिन चारहि पाहिलीस तूं वाट ।
झालें सहन त्रिदिन न करुन सुता घेतलास तूं घात ॥ ४० ॥
निष्ठुर यमा तुझा मी केला अपराध कोणता सांग ।
माझ्या पुत्रा मारुनि तूं पाखडलीस कां अशी आग ॥ ४१ ॥
पूर्वभवीं मी हरिला कोणाचा पुत्र म्हणुनि फल त्याचें ।
मजला आज मिळालें असेल कां सांग हे विधे[2] साचें ॥ ४२ ॥
माझ्यापोटीं जन्मुनि झाली दुःस्थिति अशी तुझी बाळा ।
तूं बोल शब्द एकचि हरि माझें दुःख सकल वेल्हाळा ॥ ४३ ॥
हो प्रगट वत्स अपुलें मनोज्ञ तूं रूप मजशि दाखिव रे ।
अशुभ अमङ्गल माया करणें केव्हांहि उचित नैव ठरे ॥ ४४ ॥
वत्सा ! दुर्दैवानें झाला परलोकलाभ तुज आज ।
जें चिन्तिलें तयाच्या उलटचि हें जाहलें कसें काज ॥ ४५ ॥
प्रतिकूल तुझें नव्हतें मातेच्या केधवाहि आचरण ।
आतां विनयें विरहित कां दिसतें हें बरें अनुष्ठान ॥ ४६ ॥
नियमाचरणीं तत्पर निर्दोष नि एकटा बघून तुला ।
भीषण वनांत अरिकर मारायातें कसा बरें शिवला ॥ ४७ ॥
ज्यानें तुजला वधिलें केलें अविचार कार्य हें त्यानें ।
तो खल जाइल कोठें शोधुनि मारीन त्यास खड्गानें ॥ ४८ ॥
यापरि करुनि विलापा घेउनि मांडीवरी स्वतनयास ।
चुम्बन घेइ मुखाचें शोकानें जीस होय आयास ॥ ४९ ॥
तत्काल त्यागिलें त्या क्रोधानें शोक जाय विलयास ।
नयनाश्रु सर्व सुकले सुटला तत्काल कम्प वदनास ॥ ६० ॥

---

१ करकोच्या पक्षाच्या मादीप्रमाणें. २ नशीबा.

क्रोधें चन्द्रनखेनें दांतांनीं ओठ चाविला नेत्र ।
अतिलालवुन्द झाले क्रूर दिसू लागलें तिचें गात्र ॥ ५१ ॥
तेथून ती निघाली पदचिन्हें[1] बघुनि त्या स्थलीं आली ।
पाहून कामसुन्दर तरुणयुगा काममोहिता झाली ॥ ५२ ॥

[ कन्येचें रूप धारण करून तिनें राम व लक्ष्मणास वरण्याची इच्छा प्रगट केली पण त्यांनीं मौन धारण केलें. नंतर ती तेथून निघून गेली.]

तीव्र क्रोध तियेचा गेला विलयास कामें[2] उद्भवला ।
इच्छील तरुण जो मज अभिलाषेनें वरीन मी त्याला ॥ ५३ ॥
चिन्तुनि ऐसें हृदयीं कन्यावेषांत ती तिथें आली ।
पुन्नागवृक्षमूलीं कपटानें रडत ती खला वसली ॥ ५४ ॥
करुणावह कन्येचें रडणें ऐकून रामरमणी ती ।
कर पाठीवर फिरवी वदली सोडून देइ तूं भीति ॥ ५५ ॥
घेउनि करी तिचा कर तिजला रामासमीप आणियलें ।
बोलून मधुर भाषण हृदय तिचें शान्त तेधवा केलें ॥ ५६ ॥
श्रीराम तिला वदले कन्ये तूं एकटी कशी येथें ।
अतिशय दुःखी दिसशी मजला तूं सांग पूर्ववृत्तातें ॥ ५७ ॥
ती कमलाक्षी कन्या गुञ्जारवसदृशमधुर वाणीनें ।
वदली पुरुषश्रेष्ठा करुणकथा ऐक सावधानमनें ॥ ५८ ॥
अतिशय बालपणीं मम माता मेली मला न तें स्मरतें ।
तद्भवशोकें पावे मम जनकाचाही देह पतनातें ॥ ५९ ॥
मम पूर्वजन्मपापें गेला सोडून बन्धुवर्ग मला ।
अत्यन्त खिन्न होउनि दण्डकवनिं या प्रवेश मी केला ॥ ६० ॥
इच्छा मरणाची मज असतांही घोर या वनीं मजला ।
सिंहव्याघ्रवृकांनीं[3] न मारिलें वध अपूर्व अघलीला ॥ ६१ ॥
या निर्मनुष्य विपिनीं आज तुम्ही माणसें मला दिसलीं ।
सरलें पातक माझें माझ्यावरि पुण्यसावली पडली ॥ ६२ ॥
ओळख ज्याची असते तो जन मित्रत्व ठेवि चिरकाल ।
बोलाविल्या विना तो गतलज्ज समीप कां न येईल ॥ ६३ ॥

१ पावलांचे छाप. २ राम व लक्ष्मणाविषयींची कामेच्छा. ३ लांडग्यांनीं.

आदर नच करितांही बोले जो शून्यचित्त पुष्कळसें ।
तो व्यवहारें वर्जित मानव विद्वेषपात्र हो न कसें ॥ ६४ ॥
मीही तशीच आहे स्वीकारी सदय दुःखितेस मला ।
मी साध्वी स्वीकारी अन्याय न यांत लेशही उरला ॥ ६५ ॥
निर्लज्जवचन ऐकुनि अन्योन्यां ते बघून पुरुषवर ।
मौनें स्वस्थचि बसले अयोग्य जाणून अन्तरीं चतुर ॥ ६६ ॥
निःश्वास दीर्घ सोडुन जाते मी जेधवा तिनें म्हटलें ।
आनन्दानें म्हटलें कन्ये ! जा तूं यथेष्ट होउ भलें ॥ ६७ ॥
गेली निघून असतां अशिष्टता स्मरुनि ते तिघे हसले ।
मायाविनी[1] असे ही प्रसङ्ग हा वर्जिला बरें झालें ॥ ६८ ॥
क्रोध मनांतचि ठेवुनि करी त्वरेनें नभांत ती गमन ।
शोकसमाकुल होउनि गेली स्वगृहास खिन्न होऊन ॥ ६९ ॥
इकडे लक्ष्मण झाला सौन्दर्य तिचें बघून हृदयांत ।
विरहव्याकुल पुनरपि इच्छी तद्रूप पाहण्या त्वरित ॥ ७० ॥
उठला चालू लागे अन्वेषण[2] तो तिचें करायास ।
परि ती तया न दिसली झाला पुष्कळ वनभ्रमायास ॥ ७१ ॥
लावण्यरूप यौवनवती कुणाची असेल कन्या ही ।
झाला जन्म तियेचा कोठें माझ्या मनास बहु मोही ॥ ७२ ॥
दर्शन होतांच तिला आलिंगुनि सुखविला न मम जीव ।
ऐशा विचारचक्रें लक्ष्मण मळवी स्वकीय हृद्भाव ॥ ७३ ॥
निर्मल चित्त जयांचें त्यांनीं हें हीन कार्य न करावें ।
सन्तत विवेकभावा धरुनि सुकार्यांत चित्त रमवावें ॥ ७४ ॥
मी कोणत्या सुकार्यीं योजावें हृदय सौख्य केवि मिळे ।
जिनदास धरि विवेका मति त्याची सर्वसद्गुणास फळे ॥ ७५ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे शम्बूकवधाभिधानं नाम त्रिचत्वारिंशत्तमं पर्व ॥ ४३ ॥

---

१ कपटाचारिणी. २ शोध.

## चव्वेचाळीस व पंचेचाळीस या पर्वांतील कथासार.

शम्बूकाच्या मातेनें चन्द्रनखेनें कन्येचें रूप धारण करून माझा स्वीकार करावा. मी कन्या आहे, साध्वी आहे असें म्हणून आपल्याविषयींचा अभिलाष राम-लक्ष्मणाच्या मनांत उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला पण त्यांनीं तिचा स्वीकार न केल्यामुळें ती निराश झाली. पुत्राच्या नाशानें दुःखी झाली व अतिशय रागावुन आकाशमार्गानें गेली व पतीला " दण्डकारण्यांत आलेल्या दोन दुष्ट माणसांनीं शंबूकाला मारून सूर्यहासखड्ग प्राप्त करून घेतला व माझ्यावर बलात्कार करण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें माझें अंग धुळीनें मलिन झालें. अंगावर बोचकारे काढले. पण आपल्या कांहीं पुण्योदयामुळें मी या आपत्तींतून मुक्त होऊन आपल्याकडे येऊ शकलें." असें तिनें सांगितलें. हें तिचें भाषण ऐकून व आपल्या पुत्राला त्यांनीं ठार मारलें हें ऐकून खरदूषण क्रोधानें लाल झाला. तो तत्काल जाऊन त्या दुष्टांच्या नरडीचा घोट घ्यावा अशा विचारानें निघाला पण त्याला सचिवांनीं रोकलें. ते म्हणाले–' राजन्, ज्याला सूर्यहासखड्ग सिद्ध झाला तो मनुष्य सामान्य आहे असें समजू नका याविषयीं आपण विचार करू या :—

त्यावेळीं अनेक सचिवासह त्यानें विचार केला. एका सचिवानें सांगितलें कीं– राजन्, शत्रु मोठा प्रबल आहे पण त्याची उपेक्षा करून स्वस्थ बसणें किंवा विलंब करणें योग्य नाहीं. असें झालें तर तो शत्रु येथून निघून दुसरीकडे जाईल व त्याचा नाश करणें शक्य होणार नाहीं.

दुसरा सचिव म्हणाला– राजन्, अगदींच घाई करणें हेंहि पण योग्य नाहीं. आपण आपल्या सामन्तादिकांना कळवून आपला आप्त असलेल्या त्रिखण्डाधीश रावणालाही कळवून त्यांच्या साहाय्यानें शत्रूशी लढणें योग्य होईल व त्यांत यश मिळेल. याप्रमाणें सल्ला ऐकून खरदूषणानें एक चतुर दूत रावणाकडे पाठविला.

इकडे पुत्राचे सद्गुण आठवून खरदूषण मनांत विचार करू लागला– हे भूमिगोचरी लोक मायारहित–विद्यारहित असतात. यांना जिंकणें आम्हा विद्याधरांना अगदीच सुलभ आहे. यावेळीं इतरांच्या मदतीची अपेक्षा करीत बसणें आपल्या शौर्याला कमीपणा आणणारें आहे. असा विचार करुन तो तत्काल एकटाच शत्रुनाश करण्यासाठीं निघाला. हें पाहून त्याचे चौदाहजार मित्रही त्याच्याबरोबर निघाले. थोड्या वेळांत ते..राम-लक्ष्मण होते त्या स्थानाजवळ आले. त्यांचा तो आवाज कानीं पडल्याबरोबर सीतेनें घाबरून रामाला मिठी मारली. रामचन्द्रांनीं विचार केला कीं– जिनें कन्यारूप घेतलें होतें त्या दुष्टेनें आपल्या पतीला कांही खोटेंनाटें सांगितलें असेल म्हणून असा हा युद्धाचा प्रसंग उद्भवला. असो. सीतेला रामचंद्र म्हणाले– भिऊ नकोस आतां हें सैन्य मी पळवून लावतो असें म्हणून वज्रावर्त धनुष्य त्यांनीं सज्य केलें. अंगांत चिलखत घातलें व ते युद्धाला निघाले. इतक्यांत लक्ष्मणानें हात जोडून म्हटलें– प्रभो, आपण सीतादेवीचें रक्षणासाठीं येथेंच राहावें. मी युद्धास जातो म्हणून सागरावर्त धनुष्य व सूर्यहासखड्ग घेऊन तो युद्धास निघाला. निघतांना 'जर मी कांहीं आपत्तींत पडलों तर सिंहनाद करीन आपण त्यावेळीं मला साहाय्य करण्यासाठीं यावें' असें सांगून तो निघाला. खरदूषणाच्या सैन्यानें त्याला घेरलें. मुद्गर, चक्र, भाला, बाण इत्यादिकांनीं सैन्य त्याच्याबरोबर लढू लागलें. पण एकट्यानें सर्व शस्त्रांचा वर्षाव रोकला व आपले वज्रबाण अखंडपणें सर्वांवर सोडू लागला. त्यामुळें आकाशांत असलेल्या त्या विद्याधरांचीं मस्तकें पटापट खालीं पडूं लागलीं. पुष्कळ घोडे व हत्ती मरण पावले. तें सैन्य आपला भयंकर संहार होत आहे असें पाहून खचलें.

त्याचवेळीं रावण त्या वनांत आला. तेथें सीता त्याला दिसली. तिचें लक्ष्मीपेक्षाही सुंदर रूप पाहून तो बेभान झाला. अशी ही सुंदर स्त्री माझ्यासाठींच ब्रह्मदेवानें निर्माण केली असावी असें त्याला वाटलें. व हिचें हरणाच्या उपायाचा तो विचार करू लागला. त्यानें अवलोकिनी विद्येचें स्मरण केलें. तिनें याप्रमाणें माहिती दिली:— "ज्याला सैन्यानें घेरिलें आहे तो लक्ष्मण– दशरथराजाचा धाकटा मुलगा. आपल्या पत्नीजवळ बसलेला रामचंद्र, लक्ष्मणाचा मोठा भाऊ. या रामाच्या पत्नीचें नांव सीता ही जनकराजाची कन्या. जणु सगळया सद्गुणजलाची ही नदी आहे. हिला हरण करावयाची युक्ति अशी:— तूं सिंहनाद कर– "मी संकटांत पडलों आहे, बंधो, मला साहाय्य करायला ये" असे शब्द ऐकून राम लक्ष्मणाकडे जाईल त्यावेळीं एकट्या असलेल्या सीतेला हरण करून नेण्याचें कार्य अगदीच सोपें होईल. रावण

अगदींच कामांध झालेला होता. व अशारीतीनें हरण केलें असतां कोणी सीतेचें हरण केलें हें कोणालाही समजणार नाहीं व आपल्या कीर्तीला मलिनताही येणार नाहीं. व हा विचार करून त्यानें सिंहनाद केला. रामचंद्र तत्काल लक्ष्मणाकडे जाण्यासाठीं निघाले. त्यांनीं सीतेला सांगितलें कीं– मी लौकरच येतो. तूं घाबरू नकोस धैर्य धर असें म्हणून फुलाच्या समूहांनीं तिला त्यांनीं पूर्ण आच्छादिलें व जटायु पक्ष्याला त्यांनीं असें सांगितलें– ' हे जटायो पक्षिराजा, आम्ही जे आजपर्यंत तुझ्यावर उपकार केले आहेत त्याचें स्मरण करून या भयंकर वनांत सीतेचें रक्षण करण्यांत खूप प्रयत्न कर ' असें सांगून ते लक्ष्मणाकडे वेगानें निघून गेले.

इकडे रावण खालीं उतरला व त्यानें आपल्या दोन बाहूंनीं सीतेला उचललें. प्रभूची पत्नी हरली जात आहे हें जटायुपक्ष्यानें पाहिलें. तो त्याच्या अंगावर त्वेषानें धावला. आपल्या तीक्ष्ण नखाग्रांनीं रावणाचें वक्षःस्थल त्यानें विदीर्ण केलें. आपल्या चोचीनें त्याला तो चावला. पंखांच्या आघातानें त्याचें वस्त्र त्यानें फाडलें. आपलें जेवढें सामर्थ्य होतें तें सर्व त्या बिचाऱ्या कृतज्ञपक्ष्यानें खर्ची घालून सीतेच्या रक्षणाचा प्रयत्न केला. यानें आपल्या कार्यांत विघ्न आणिलेसें पाहून रावण रागावला व त्यानें पक्ष्याला हातांनीं दोन-चार तडाखे मारलें व त्यामुळें तो पक्षी बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. नंतर सीतेला पुष्पक विमानांत बसवून लंकेकडे निघाला.

मला कोणीतरी हरण केलें आहे हें सीतेला समजलें. तिचें अंतःकरण राममय होतें. ती शोक करूं लागली. " ही आपल्या पतीवर एकनिष्ठपणें प्रेम करणारी आहे. हिचें मी व्यर्थ हरण केलें. हिच्या मनांत मला स्थान मिळणार नाहीं. तें कायमचेंच रिक्त राहीलसें वाटतें. व माझ्याविषयीं तिच्या अन्तःकरणांत तिरस्कारच राहील पण आपण प्रयत्न करूं कदाचित् ती अनुकूल होईलही " असें रावणाला वाटूं लागलें.

जी परक्याची स्त्री आपणास अनुकूल नसेल तिचा मी उपभोग घेणार नाहीं असें व्रत मी साधुसमूहाच्यापुढें घेतलें आहे. त्या व्रताचें रक्षण करून हिला प्रसन्न करून घेईन असा विचार करून रावणानें तिला मांडीवरून खालीं ठेविलें.

इकडे सिंहनाद ऐकून रामचंद्र लक्ष्मणाकडे गेले. लक्ष्मणानें– प्रभो, आपण कां बरें इकडे आला. मी तर हें युद्ध जिंकल्यासारखें केलें आहे. रामचंद्र म्हणाले– ' वत्सा, तुझा सिंहनाद ऐकून मी आलों आहे.' मी तर सिंहनाद मुळींच केला नाहीं– असें लक्ष्मण म्हणाला व आपण तत्काल येथून जा, माझ्यावर कसलेंच संकट नाहीं.

रामचंद्र धांवतच स्वस्थानीं आले. पाहतात तों सीता त्यांना तेथें दिसली नाहीं. पुष्कळ ठिकाणीं सीतेला त्यांनीं हुडकलें, पक्षी वृक्ष, पर्वत इत्यादिकांना सीता तुम्ही पाहिली काय म्हणून वेड्यासारखे विचारू लागले व थकून स्वस्थानीं येऊन पडून राहिले.

इकडे खरदूषणाच्या सैन्याबरोबर लक्ष्मण लढत असतां विराधित त्याठिकाणीं येऊन लक्ष्मणाला नमस्कार करून म्हणाला– प्रभो, मी या सैन्याशीं लढून त्याचा फन्ना पाडीन व आपण खरदूषणाबरोबर लढावें. लक्ष्मणानें बरें म्हणून वज्रमय बाण फेकून खरदूषणाचा रथ, छत्र, ध्वज व धनुष्य मोडून टाकिलें. तो जमिनीवर पडला. क्रोधानें धांवत येऊन लक्ष्मणावर तरवारीचा वार केला पण त्यानें तो चुकविला व सूर्यहासखड्गाचा वार खरदूषणावर करून त्याला मारून टाकिलें. खरदूषणाचा सेनापति विराधिताबरोबर लढत असतां लक्ष्मणानें एक बाण त्याच्यावर फेकला तो त्याच्या छातींत घुसून सेनापति जमिनीवर कोसळून मरण पावला.

सर्व सैन्य शरण आलें. तें सैन्य विराधिताच्या स्वाधीन करून लक्ष्मण परत रामचन्द्राकडे आला.

“प्रभो, आपण जमिनीवर कां झोपलेले आहात व आर्या सीतादेवी कोठें आहेत.” असें लक्ष्मणानें विचारलें. रामचंद्र उठून लक्ष्मणाकडे पाहू लागले. तो निर्व्रण आहे हें पाहून त्यांना आनंद वाटला. “सीतेला कोणी हरण करून नेलें समजलें नाहीं. मी तिचा अनेक ठिकाणीं शोध करून थकलों आहे.” लक्ष्मणानें म्हटलें– आतां उदास राहणें उपयोगीं नाहीं. खूप प्रयत्न करूं व सीतामातेचा शोध लावू असें म्हणून म्लान झालेलें रामचंद्राचें मुख लक्ष्मणानें पाणी घेऊन स्वतः हातानें धुतलें.

इतक्यांत विराधित ससैन्य तेथें आला. त्यानें लक्ष्मण व रामचंद्राला प्रणाम केला व या दासाला योग्य कार्य सांगावें हा करावयास तयार आहे. लक्ष्मण म्हणाला– माझ्या ज्येष्ठ बंधूची धर्मपत्नी कोणी दुष्टानें हरण करून नेली आहे तिचा तन-मन-धनानें तुम्ही शोध करावा. तत्काल विराधितानें आपले अनेक सचिव सीतामातेचा शोध करण्यास पाठविले.

रावण सीतेला विमानांतून घेऊन जात असतां ती शोक करीत होती. मला हा दुष्ट नेत आहे. रामा, लक्ष्मणा मला सोडवा असें म्हणत होती. त्यावेळीं अर्कजटीचा पुत्र रत्नजटी आकाशांतून जात होता त्यानें हें शब्द ऐकिले. माझ्या स्वामीची भामंडलाची बहिण सीता हिला हा दुष्ट हरण करून नेत आहे. याचा

आपण प्रतीकार करावा. म्हणून तो रावणाबरोबर लढू लागला. त्यावेळीं याची विद्या हरण केली म्हणजे हा क्षुद्र विद्याधर समुद्रांत पडून मरण पावेल असा विचार करून त्याच्या विद्या त्यानें छेदिल्या त्यावेळीं तो आकाशांतून कोसळून कंबूद्वीपाच्या कंबू नामक पर्वतावर पडला.

विराधिताचे सेवक परत आले. त्यांना शोध लागला नाहीं. ते खिन्न होऊन रामापुढें खालीं मान घालून बसले. रामचंद्रांनीं त्यांच्या मौनावरून ओळखलें. व म्हणाले— आमच्या अशुभकर्माच्या उदयानें सीतेचा शोध लागला नाहीं. यांत तुमचा कांहीं दोष नाहीं.

इकडे विराधितानें ज्याला चार घोडे जुंपले आहेत अशा रथावर राम व लक्ष्मणांना बसवून अलंकारपुराकडे नेलें. तेथें खरदूषणाच्या मुलाबरोबर— सुन्दाबरोबर युद्ध झालें. सुन्द व त्याची आई चन्द्रनखा हे पळून रावणाकडे निघून गेले. मोठ्या थाटानें खरदूषणाच्या प्रासादांत रामचंद्र-लक्ष्मणासह विराधितानें प्रवेश केला. त्या प्रासादांत सुंदर जैनमन्दिर होतें. जिनप्रभूचें शान्त बिम्ब पाहून रामचन्द्राचा शोक थोडासा कमी झाला.

धन, राज्यादिक पदार्थ नाना उपायांनीं जरी लोक मिळवितात तरी ते नाशवंत असल्यामुळें त्यांचा वियोग होऊन जीवाला दुःख प्राप्त होतें. पण अशा पदार्थांचा निर्मोही होऊन जे त्याग करतात त्यांना मोक्षाचें द्वार खुलें होतें. पूर्वजन्माच्या कर्माच्या उदयानें नानाप्रकारच्या आशा उत्पन्न होतात. त्यामुळें परिग्रहावर प्रेम वाढतें. पण जेव्हां जीवाला आत्मज्ञान होतें तेव्हां त्या आशा नाहींशा होतात. हें आत्मज्ञान साधुजनांच्या उपदेशानें जीवाला प्राप्त होतें. ज्या जिनभक्तांना हें आत्मज्ञान होतें त्यांना मुक्तिसुख लाभतें.

# चव्वेचाळीसावें पर्व.

[ खरदूषणाला चन्द्रनखा पुत्रवधाचें व स्वशीलनाशाचा प्रयत्न कोणी दुष्टानें केला तें वृत्त सांगते. ]

शम्बूकाची जननी होतां कामाभिलाष विफल खला ।
सुतशोकयुक्त झाली व्याकुल होउनि करी विलापाला ॥ १ ॥
अपमानदुःख त्यांतचि झालें तत्काल कोप हो प्रगट ।
नेत्राश्रुबिन्दु पडती बोले पति काय जाहले कष्ट ॥ २ ॥
मुख मलिन केवि दिसतें झाला हा केशपाश कां शिथिल ।
अङ्गीं धूळ कशी ही चोळी ही फाटली कशी बोल ॥ ३ ॥
दिसती बोचकरे हे कोठुनि वक्षःस्थलावरी सखये ।
कोणी दुःस्थिति केली धावुनि त्यावरि कसा न गे यम ये ॥ ४ ॥
अष्टम मङ्गल आला कोणावरि मृत्यु धावला आज ।
गिरिशिखरिं कोण झोपे कोणाचें आज सम्पलें काज ॥ ५ ॥
खेळे नर सर्पासह कोण वरें अशुभ दैव कोणाचें ।
आलें उदया सगळें वृत्त मला सांग वल्लभे ! साचें ॥ ६ ॥
रडणें पुरे तुझ्यावरि कोणी केला वदे बलात्कार ।
त्या दुष्टा मी मारिन सिंह गजाला जसा करी ठार ॥ ७ ॥
वदला चन्द्रनखापति खरदूषण कोपयुक्त होऊन ।
मायाविनी वदे ती तेव्हां निजरुदन बन्द ठेवून ॥ ८ ॥
नाथा ! गेले होते वनांत पुत्रास पाहण्याकरितां ।
कापून टाकिलेलें दिसलें सुतमुख कसें करूं आतां ॥ ९ ॥
रक्ताच्या धारांनीं वंशस्थल लालभडक झालेलें ।
दिसलें मजला नाथा खड्गानें छिन्नभिन्न केलेलें ॥ १० ॥
कोणीतरि दुष्टानें झालेला प्रगट दिव्यखड्ग करें ।
घेउनि मारुनि पुत्रा प्रयाण केलें कुवृत्त होंचि खरें ॥ ११ ॥
घेउनि अङ्कावरती सुतमस्तक भाग्यहीन मी रडल्यें ।
तों पुत्रवधक येउनि तेणें मज दृढ करें तदा धरिलें ॥ १२ ॥

मेल्या सोड मला तूं म्हणूनही सोडिलें न मज त्यानें ।
नीचकुलोद्गत कोणी होता जो स्पर्शलुब्धवशतेनें ॥ १३ ॥
दातांनीं नि नखांनीं विदीर्ण केलें शरीर मम तेणें ।
झाली अशी अवस्था उपाय नच चाललाचि अबलपणें ॥ १४ ॥
नाथा पुण्यविशेषें झालें रक्षण मदीयशीलाचें ।
कष्टें धावत आले यापरि हें वृत्त जाहलें साचें ॥ १५ ॥
खचराधीश जियेचा भाऊ इन्द्रें हि ज्या न जिंकियलें ।
आपण पति मम असतां अशा दशेप्रत तथापि मी गेले ॥ १६ ॥
भाषण निजपत्नीचें खरदूषण खगनृपाल ऐकून ।
शोकें क्रोधें झाला क्षुब्ध जसा प्रलयसमयिचा पवन ॥ १७ ॥
अत्यन्त तीव्रवेगें पाही जाऊन मारिल्या तनया ।
ग्रीष्मार्कासम झाला भीषण सोशि न कधींहि जो अनया[1] ॥ १८ ॥
तेथून शीघ्र येउनि निजसौधांत प्रवेश नृपति करी ।
बोलावुनि मन्त्रिगणा विचार चित्तांतला स्वयं वितरी[2] ॥ १९ ॥

[ खरदूषणाची मंत्र्याबरोबर युद्धाविषयीं सल्लामसलत. ]

कोणी सचिव म्हणाला नाथा ! सामान्यशत्रु तो नोहे ।
शम्बूकाला मारुनि केलें दिव्यासिरत्न वश पाहे ॥ २० ॥
न करावी तदुपेक्षा[3] करितां निजनाशहेतु होईल ।
करितां विलंब भूपा ! तो अरि तेथून शीघ्र जाईल ॥ २१ ॥
नन्तर दुसरे वदले नाथा हें कार्य शीघ्र न करावें ।
सामन्तनृपा जमवुनि त्रिखण्डपति-रावणास कळवावें ॥ २२ ॥
ज्या दिव्यरत्न झालें वश तो रिपु नच सुसाध्य समजावा ।
समुदायकार्यकार्यीं कदापि एकें न हात घालावा ॥ २३ ॥
यास्तव नाथा ! लङ्काधिपतिकडे दूत पाठवा एक ।
या वृद्धसचिववचना हृदयीं घेई नृपाल निःशङ्क ॥ २४ ॥
जो कार्यचतुर ऐसा दूत युवा रावणाकडे भूपें ।
पाठविला तो गेला महाजवें[4] मन यदीय नच कांपें ॥ २५ ॥
इकडे पुत्रगुणांना खरदूषण निजमनांत संस्मरुन ।
वदला हे भूगोचर मायेनें रहित खचित तुच्छजन ॥ २६ ॥

---

१ अन्याय. २ दिला-सांगितला. ३ शत्रुकडे दुर्लक्ष करणें. ४ मोठ्या वेगानें.

मम विद्याधर सेना असे समुद्रासमान तरुनि तिला ।
जाया समर्थ नच हे साहाय्या इच्छिणें न योग्य मला ।। २७ ।।
साहाय्य इच्छितें जर अमुचें हें शौर्य त्यास धिक्कार ।
माझा भुज जर इतरां इच्छिल तर तो नसेचि शौर्यकर ।। २८ ।।
ऐसें बोलुनि अतिशय अभिमानें एकटा नभीं गेला ।
चौदाहजार त्याचा मित्रांचा गण तयास अनुसरला ।। २९ ।।
राक्षससैन्याचा तो वाद्यध्वनि येइ मैथिलीकानीं ।
क्षुब्धसमुद्ररवासम भीति तिच्या उद्भवे विशाल मनीं ।। ३० ।।
हें प्राप्त काय झालें बोलुनि रामास ती मिठी मारी ।
कल्पलता आश्लेषा[2] कल्पतरूला जशी दृढा वितरी ।। ३१ ।।
सीते भिऊ नको गे भिऊ नको सान्त्वना अशी रामें ।
देउनि विचार केला विक्रमधैर्याद्यसङ्ख्यगुण-धामें ।। ३२ ।।
दुर्धर हा शब्द असे सिंहाची गर्जना मनास गमे ।
किंवा जलधररव[3] हा अथवा जलनिधि रवा[4] अपार वमे ।। ३३ ।।
वदला प्रिये असे हा ध्वनि सुन्दर राजहंसवृन्दाचा ।
भय हृदयांत धरी नच तिळमात्रहि गे विचार खेदाचा ।। ३४ ।।
अथवा खलपक्षिध्वनि ज्याचें भय वाटतें तुझ्या हृदया ।
झडकरि धनुष्य दे मज नेइन कोलाहलास मी विलया ।। ३५ ।।
इतुक्यांत जवळ आलें नानायुधवृन्द घेउनि स्वकरीं ।
पाही खगवल आलें नभोन्तरीं[5] मेघवृन्दसम भारी ।। ३६ ।।
नन्दीश्वरास जाती जिनबिम्बा वंदण्यास कां देव ।
तेजस्वी बहु दिसती हृदयीं ठेवून भक्तिचा भाव ।। ३७ ।।
छे छे ते नच आला माझ्या स्मरणीं यथार्थसा भाव ।
लक्ष्मण वंशा च्छेदुनि[6] मिळवी असि सूर्यहास ज्या नांव ।। ३८ ।।
त्या सूर्यहास खड्गें साधक मानवहि पावला मरण ।
यास्तव हे मायावी आले वैरी करावयास रण ।। ३९ ।।
मायानिपुण कुशीला[7] त्या स्त्रीनें प्रेरिले असे वीर ।
आले येथें आतां आम्हां होतील खचित असुखकर ।। ४० ।।

---

१ पराक्रम गाजविणारा. २ आलिंगन. ३ मेघगर्जना. ४ गर्जना. ५ आकाशांत. ६ वेळूंना. ७ परपुरुषाभिलाषिणी.

ऐशासमयीं सावध होउनि लढणें उपाय योग्य असे ।
ऐशा करुनि विचारा कवचित[1] होऊन राम सिद्ध वसे ।। ४१ ।।
लक्ष्मण करयुग जोडुनि वदला आपण इथेंचि राहावें ।
आर्यारक्षण करण्यासाठीं पाउल पुढें न टाकावें ।। ४२ ।।

[ युद्धांत संकटाच्या वेळीं मी सिंहनाद करीन त्यावेळीं आपण साहाय्यास यावें असें बोलून लक्ष्मण युद्ध करावयास निघून गेला.]

मी अरिसम्मुख जाउनि लढेन जरि आपदा उभी राहे ।
सिंहनिनादें कळविन येणें आपण न अन्यथा पाहे ।। ४३ ।।
बोलुनि कवचित होउनि घेउनि जाई महायुधास रणा ।
अरिसम्मुख तो राहे उभा लढाया त्यजून हृत्करुणा[2] ।। ४४ ।।
त्या वीरपुरुषपुङ्गव पाहुनि लक्ष्मीधरास ते खचर[3] ।
घेरून पर्वताला मेघ जसे राहिले नभीं सुचिर ।। ४५ ।।
मुद्गर नि चक्र भाला शक्ति शरादिक अनेकशस्त्रांनीं ।
लढली जरि खगसेना रोकी हा त्या स्वबाणनिकरांनीं[4] ।। ४६ ।।
विद्याधरसैन्यानें जीं शस्त्रें फेकिलीं हरीवरती ।
तीं रोकिलीं तयानें कुत्सित इच्छेस जेवि मुनि हरिती ।। ४७ ।।
व्यापून राहती जे वज्रशरा त्यावरी हरि प्रेरी ।
कुण्डलमण्डित पडतीं डोकीं कमलासमान भूमिवरी ।। ४८ ।।
शैलासमान पडले गज घोड्यासकट वीर कोसळले ।
पाहून नाश अपुला विद्याधरसैन्य सर्व तें खचलें ।। ४९ ।।
इतुक्यांत वनीं आला रावण होऊन पुष्पकारूढ ।
शम्बूकवधकराला[5] माराया धरुनि कोप मनिं गाढ ।। ५० ।।

[ रावण पुष्पकविमानांत बसून तेथें आला व सीतेला पाहून तिला हरण्याची बुद्धि त्याला झाली. अवलोकिनी विद्येस त्यानें रामादिकांची माहिती विचारून सिंहनाद केला व सीतेस हरण करून त्यानें तिला लंकेला नेलें.]

राघवभार्या सीता साक्षाल्लक्ष्मीसमान जणु त्यास ।
दिसली नयनमनोहर मोहित झाला तदीयरूपास ।। ५१ ।।

---

१ चिलखत अंगांत घालून. २ मनांतील दयाभाव. ३ विद्याधर. ४ समूहांनीं ५ शम्बूकाचा वध ज्यानें केला त्याला अर्थात् लक्ष्मणाला.

मुख चन्द्रतुल्य सुन्दर अधर जिचें तोंडलें गमे लाल ।
पातळ पोट जियेचें पद्मासम शोभतात मृदुगाल ॥ ५२ ॥
डोळे पद्मदलासम सुवर्णकुम्भासमान कुचयुगल ।
शोभे रेखात्रितयें सुन्दर शंखासमान मृदुलगल ॥ ५३ ॥
सर्वस्त्रीगुण देहीं जिच्या सुखें नान्दती अशी युवती ।
विधिनें मजला वाटे माझ्यासाठींच निर्मिली सुदती ॥ ५४ ॥
पाहत असतां तिजला कोप तयाचा न अल्पही उरला ।
अन्यचि भाव उदेला हृदयाची गति विचित्र आणि चला[1] ॥ ५५ ॥
चिन्ता मनिं उद्भवली जीवन माझें हिच्याविणें विफल ।
लाभे ही न मला जरि वैभव समजेन सर्वही गरल ॥ ५६ ॥
अनुपम आकाराची ललिता नवयौवना हरीन हिला ।
अज्ञात कार्य साधुनि येथुनि जाईन शीघ्र लंकेला ॥ ५७ ॥
हरुनि बलानें नेणें हें कार्य मला अशक्य मुळिंच नसे ।
परि हीं असली कार्यें सुगुप्त करण्यांत सौख्य बहु विलसे ॥ ५८ ॥
माझें शशाङ्कनिर्मल यश तेणें मलिन नैव होईल ।
स्वार्थी असेंचि करिती जन तेणें कार्य होतसें सफल ॥ ५९ ॥
यापरि करुनि विचारा नाम कुलादिक उपाय हरणाचा ।
कामान्ध नीच रावण विचारि अवलोकिनीस तो साचा ॥ ६० ॥
ज्याला बहुखगसैन्यें लढण्यास्तव पूर्ण घेरिलें आहे ।
तो लक्ष्मण समजावा प्रसिद्ध दशरथनृपालसुत पाहे ॥ ६१ ॥
ज्येष्ठ भ्राता त्याचा हा ज्याचें राम-नाम ही सीता ।
भार्या असे तयाची सुगुणजलाची असेच ही सरिता ॥ ६२ ॥
तूं सिंहनाद करि वा लक्ष्मण जाणून संकटीं पडला ।
साहाय्य करायाला जाइल हा राम शीघ्र कीं त्याला ॥ ६३ ॥
नन्तर हरि सीतेला गरुड हरी जेवि मांसपेशीस ।
यापरि कार्या साधुनि घेउनि जा तूं तियेस लंकेस ॥ ६४ ॥
यापरि उपाय ऐकुनि रावण हृदयीं प्रमोद पावून ।
मारिल खरदूषण या उभया ऐसें मनांत चिन्तून ॥ ६५ ॥
हरणोपाय कराया झाला रावण तयार हर्षून ।
कामान्ध नीच हृदयीं विषवदुपायास आचरी अगुण ॥ ६६ ॥

---

१ चंचल.

भीषणयुद्ध जहालें पडला शस्त्रान्धकार बहु घोर ।
रामा रामा सङ्कटिं पडलों येऊन तूर्ण तूं तार ॥ ६७ ॥
ऐशा दशकण्ठाच्या सिंहरवें हो सचिन्त बहु राम ।
लक्ष्मणरव हा आहे द्यावें साहाय्य त्या नि विश्राम ॥ ६८ ॥
सौमित्रीच्या[१] स्नेहें राममनीं हा विचार उद्भवला ।
हे वैदेहि नको भिउ देई आश्रय मनांत धैर्याला ॥ ६९ ॥
पुष्पांच्या बहुवृन्दें आच्छादी पूर्ण जनकदुहितेला ।
श्रीरामचन्द्र वदले ऐसें स्नेहें जटायु विहगाला ॥ ७० ॥
" पक्षिवरा जे आम्ही केले उपकार आठवून मनीं ।
सीतारक्षणकार्यी प्रयत्न करि या विशालभयदवनीं " ॥ ७१ ॥
पक्ष्यांच्या रडण्यांनीं निवारिलें जरि तथापि तो राम ।
अतिशय वेगें गेला प्रवेशला समरिं अनुजहितकाम ॥ ७२ ॥
कामें दग्ध दुरात्मा[२] गेली विलयास धर्ममति ज्याची ।
आला रावण ज्याला विद्येनें माहिती दिली साची ॥ ७३ ॥
गज जेवि कमलिनीला उचली सीतेस बाहुयुगलानें ।
उद्युक्त जाहला तो स्थापाया पुष्पकांत मोदानें ॥ ७४ ॥
भार्या निजप्रभूची हरितो दशकण्ठ बघुनि वेगानें ।
आक्रमण त्यावरी करि जटायु खगराज[३] तीव्ररागानें ॥ ७५ ॥
अपुल्या तीक्ष्णनखाग्रें रावणवक्षःस्थला विदारून ।
तीक्ष्ण अशा चञ्च्वग्रें रक्तांनीं तें करी तदा अरुण[४] ॥ ७६ ॥
पंखांच्या आघातें फाडुनि वस्त्रा करी तया त्रस्त ।
सर्व स्ववला योजी जटायु रक्षार्थ रामपदभक्त ॥ ७७ ॥
इच्छितकार्यामध्यें जटायुनें विघ्न आणिलें म्हणुन ।
ये राग रावणाला हस्तानें ताडितांचि बेभान ॥ ७८ ॥
रावणकठोरहस्ताघातें भूवर जटायु तैं पडला ।
दुःखें करून शब्दा मूर्च्छेला प्राप्त तत्क्षणीं झाला ॥ ७९ ॥
यापरि विघ्ना नाशुनि बसवुनि सीतेस पुष्पकीं चाले ।
सम्पन्न कार्य झालें म्हणून रावण मनांत फार खुले ॥ ८० ॥

---

१ सुमित्रेचा मुलगा लक्ष्मण. २ दुर्गुणी आत्मा. ३ व्रतपालनानें श्रेष्ठ झालेला पक्षी. ४ लाल.

हरिलें मजला कोणी ऐसें जाणून आपणा सीता ।
राममय-रागभावें शोक करी जनकनृपतिची दुहिता ॥ ८१ ॥
ही निजपुरुषासक्ता शोक करी वधुनि रावणास मनीं ।
झाली विरक्तता जणु अल्प वदे आपणास वचनांनीं ॥ ८२ ॥
आणून ठेविलें मी जरी विमानांत नैव माझी ही ।
झाली व्याप्त हिची कीं रामजलानें सदैव हृदयमही ॥ ८३ ॥
राममयप्राणा ही तद्विरहें रुदन करुणसें करिते ।
नाहीं मनांत आश्रय हिच्या मला तें सदैव राहि रितें ॥ ८४ ॥
सज्जनमान्य गुणांना रामांच्या वर्णि ही जरी नारी ।
अत्यन्त शोकयुक्ता मज निज समजे न मानितेचि अरि ॥ ८५ ॥
मी या करस्थखड्गें मूढेला ठार मारितो आतां ।
स्त्रीवधविचार अथवा मान्य न होतात हे मम स्वान्ता[1] ॥ ८६ ॥
रागावल्या नृपाला करणें शीघ्र प्रसन्न शक्य न हें ।
अथवा प्रसन्न भूपापासुनि धनकीर्ति कान्ति हें पाहे ॥ ८७ ॥
किंवा प्रसन्न झाला गुरु त्यापासून लाभ विद्येचा ।
परलोकाचाराचा घडणें तत्काल शक्य नच साचा ॥ ८८ ॥
तैसें खिन्न जहाली नारी करणें प्रसन्न तत्काल ।
शक्य नसे रडणारा हट्टी खाऊविणें जसा बाल ॥ ८९ ॥
रुष्ट जहाली सीता धारण न करी प्रसन्नताभाव ।
शीघ्र परी सेवेनें प्रमुदित होईल ही जसा देव ॥ ९० ॥
जी अप्रसन्न नारी परक्याची भोगणार मी नाहीं ।
साधुगणाग्रीं[2] ऐसें व्रत जें मी घेतलें असे पाही ॥ ९१ ॥
तद्व्रत रक्षुनि हिजला प्रसन्न घेईन करुनि सदुपायें ।
मम वैभवास पाहुनि होइल अनुकूल अनुनयें[3] विनयें ॥ ९२ ॥
यापरि करुनि विचारा खालीं मांडीवरून सीतेला ।
ठेवी रावण त्याचें कुकार्य होईल हेतु मरणाला ॥ ९३ ॥
इकडे शरजलधाराकुल समरीं राघवास पाहून ।
लक्ष्मण वदला आर्या अपुलें येथें किमर्थ आगमन ॥ ९४ ॥

१ मनाला. २ मुनिसमूहाच्या पुढें. ३ प्रार्थनेनें खुशामतीनें.

वन हें विघ्नें भरलें कां सोडुनि मैथिलीस हा ! आला ।
तव सिंहनाद ऐकुनि आलों या राम बोलले वोला ॥ ९५ ॥
लक्ष्मण वदला नाथा ! हें आपण कार्य साधु नच केलें ।
जा शीघ्र परत संकट येथें माझ्यावरी नसे कसलें ॥ ९६ ॥
उत्साहवृद्धि होवो लाभो अरिवरि तुला जय प्रवल ।
ऐसें वदून शंकितचित्तें सीतेसमीप येइ वलें[1] ॥ ९७ ॥

[ सीता न दिसल्यामुळे राम मूर्च्छित होतात. सावध झाल्यावर जटायु त्यांनां आसन्नमरणला दिसतो. त्याच्या कानीं ते पंचनमस्कारमंत्र देतात.]

परि सीता नच दिसली व्याकुलता रामहृदयिं वहु आली ।
सीता सीता बोलुनि मूर्च्छित तो होय पडुनि भूमितलीं ॥ ९८ ॥
सावध होउनि पाहे वृक्षसमूहांत दृष्टि वळवून ।
गेलिस कोठें सीते तरुमागें तूं नको वसू लपुन ॥९९॥
ये शीघ्र सोड कोपा मजला तो देइ विरहसन्तापा ।
तुजविण सौख्य न गमतें तनु माझी पावते पहा कम्पा[2] ॥ १०० ॥
यापरि बोलुनि उठला राघव शोधावया वनीं भ्रमला ।
दुःखें विह्वळणारा जटायु आसन्नमरण[3] त्या दिसला ॥ १०१ ॥
होऊन खिन्न रामें कानीं परमेष्ठिमन्त्र सांगितला ।
तद्गतचित्त प्राणा सोडुनि खगराज सुरपदीं रमला ॥ १०२ ॥

[ विरहानें वेडे झालेले रामचंद्र वृक्षादिकांना सीतेची वार्ता विचारतात.]

शोकार्त रामचन्द्रा सीताविरहाग्नि जाळितो सतत ।
लाभे उपाय नच त्या मूर्च्छेनें व्याप्त होय तच्चित्त ॥ १०३ ॥
झाला पिशाचपीडित-मनुजासम दीन दृष्टि सर्वत्र ।
पाही खालीं-वरती विलपे निःशक्त जाहलें गात्र[4] ॥ १०४ ॥
अवसर पाहुनि कोणी दुष्टें मम मैथिली असे हरिली ।
हा हा ! त्या कुजनानें आत्याची चेतनाचि मम नेली ॥ १०५ ॥
जो दाखवील तिजला सुजन असा कोण मजशि भेटेल ।
तो परमवन्धु ऐसें माझें हें हृदय सतत मानील ॥ १०६ ॥

---

१ राम. २ शरीर थरथर कांपत आहे. ३ ज्याचें मरण जवळ आलें आहे असा. ४ शरीर.

" वृक्षांनो सीतेला चम्पकपुष्पासमान कान्ति जिची ।
जी कमलाक्षी तुम्ही अवलोकिलि काय चन्द्रवदनाची " ॥ १०७ ॥
" नाजुक शिरीषपुष्पासमान आहे जिचें शरीर अशी ।
गेली कोठें बोला असेल दिसली तुम्हास कवणदिशीं " ॥ १०८ ॥
" आनन्दवी मना जी श्वास जिचा पद्मगन्धतुल्य असे ।
स्त्रीगणिं अपूर्व सुन्दर दया जिच्या अन्तरीं सदैव वसे " ॥ १०९ ॥
" आहे स्वभाव भित्रा हरिणीसम जी दिशा सदा पाही ।
मौन वरा न तरूंनो बोला बोला तुम्ही मुखें कांहीं " ॥ ११० ॥
यापरि बोलुनि राघव मूर्च्छित झाला नि भूवरी पडला ।
वसला उठून पुनरपि वेड्यासम हसुनि बहुत बडबडला ॥ १११ ॥
मध्येंच कुपित झाला वज्रावर्ता करांत घेऊन ।
दोरी चढवुनि ओढी काढी टंकार बधिर करि कान ॥ ११२ ॥
नरसिंहसिंहनादें सिंहाच्या हृदयिं भीतिभार भरे ।
स्थिर करुनि कर्ण पळती गजमद गण्डस्थलां[1]तुनी न झरे ॥ ११३ ॥
होऊन खिन्न पुनरपि धनुष्य ठेऊन भूवरी बसला ।
लाभे प्रमादफल[2] मज ऐसें श्रीराम बोलला बोला ॥ ११४ ॥
नरजन्मासम दुर्लभ आतां ही मैथिली मला झाली ।
सागरिं पडल्या रत्नासम मिळण्याचा न योग मम भालीं ॥ ११५ ॥
अतिशयगुणकारकसें वनितामृत मम गळे करांतून ।
पुनरपि लाभ तयाचा होणें मज वाटतें महाकठिण ॥ ११६ ॥
निर्जन या वनिं द्यावा कोणाला दोष मीच अपराधी ।
मत्त्यागक्रोधानें केली जणु का तिनें हि अपरा धी ॥ ११७ ॥
निर्जन वनांत कोणा प्रसन्न मी करुनि शोध लावावा ।
सांगेल कोण ज्याच्या हृदयिं दयेचा असेल ओलावा ॥ ११८ ॥
त्वत्प्राणतुल्य भार्या वघ ही ऐसें मला वदे कोण ।
कोणाचे मम कर्णीं पडेल अमृतासमानसें वचन ॥ ११९ ॥
आहे दयाळु ऐसा कोण नरश्रेष्ठ ही तुझी जाया ।
बघ वा हसून बोले गेलें पातक जिचें असे विलया ॥ १२० ॥

१ हत्तीच्या दोन गालांतून. २ दुर्लक्ष करण्याचें फल.

कान्ताविरहाग्नीनें हृन्मन्दिर जाहलें प्रदीप्त मम ।
वार्ताजलवृष्टीनें[1] आतां त्याचा करील कोण शम ॥ १२१ ॥
यापरि बोलुनि थकला लोचन भूमीकडे तदा लावी ।
कांहीं तरि मनिं चिन्ती स्थिति होइल केवि आपुली भावी ॥ १२२ ॥
इतुक्यांत राघवाच्या कानीं रव येइ चक्रवाकीचा ।
ऐकुनि नेत्र-मनाला लावी तिकडेचि तेवि निजवाचा ॥ १२३ ॥
या गिरिवरि पङ्कजवन[2] असेल गन्धें मनांत जाणून ।
गेली असेल सीता दिसते नयनां मनोहरस्थान ॥ १२४ ॥
गेला उठून तिकडे वदला गिरिराज उच्च पाहून ।
हा पुत्र दशरथाचा पद्म विचारी तुला करी श्रवण ॥ १२५ ॥
" विपुलस्तनभारानें देह जिचा अल्प नम्रसा दिसतो ।
अतिपक्व-तोंडल्यासम ओष्ठें मुखचन्द्रमा जिचा खुलतो ॥ १२६ ॥
हंसासमान चाले पाहुनि कटि सिंह मानसीं झुरतो ।
तूं पाहिलीस माझी प्रिया कुठें प्रश्न हा तुला करितों ॥ १२७ ॥
ते तेच शब्द बोलुनि माझा उपहास कां वरें करिशी ।
निर्झरजलें तुझें मन ओलें वा सत्य सांग जें मजशी " ॥ १२८ ॥
चण्डरवासरितेचा पाहुनि गंभीर वेग घाबरला ।
वदला हिनें प्रियेला आश्रय माझ्या निजोदकांत[3] दिला ॥ १२९ ॥
अत्यन्त जो भुकेला चित्त जयाचें असे महाक्रूर ।
पकडुनि अशा मृगेन्द्रें[4] भरिलें खाऊन आपुलें उदर ॥ १३० ॥
कीं पाहतांच सिंहा भीतीनें प्राण सोडिले काय ? ।
माझ्या प्रियें जहाला अनर्थ मोठा न सोसवे हाय ॥ १३१ ॥
भाऊ लक्ष्मण तोही समरीं संशयदशेंत पडलेला ।
माझी ही स्थिति ऐशी दुर्दैवाचा अपूर्व हा घाला ॥ १३२ ॥
पहिलें दुःख न सरलें तोंचि दुजें दुःख जाहलें प्राप्त ।
हा दुःखार्णव मोठा संसारीं दुःख बोलती आप्त[5] ॥ १३३ ॥
जो लंगडा तयाचा तुटणें पद अडखळूनि खाचेंत ।
पुनरपि पडणें यापरि दुःखांनीं जीव जाहला तप्त ॥ १३४ ॥

---

१ हकीकतरूपी पाण्याच्या वर्षावानें. २ कमलवन. ३ स्वतःच्या पाण्यांत.
४ सिंहानें. ५ सत्यवक्ते जिनेश्वर.

यापरि विचार चित्तीं करून राघव निजाश्रयीं आला ।
अत्यन्त दीन झालें मुख त्याचें भूवरीच तो निजला ॥ १३५ ॥
पूर्वाशुभ-कर्मोदय नानादुःखें महानरां वितरी ।
जाणून भव्यपुरुष स्थिर धर्माचरणिं चित्त नित्य करी ॥ १३६ ॥
भवदुःखापासुनि भय वाटे ज्यांच्या मनास त्या सुजनीं ।
आराधावें श्रीजिनवचनांना चित्तकायवचनांनीं ॥ १३७ ॥
रक्षक ज्यांना नाहीं त्या जीवांनाहि पूर्वशुभकर्म ।
रक्षी दुःखापासुनि पाळी जिनदास सतत जिनधर्म ॥ १३८ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे सीताहरणरामविलापाभिधानं नाम चतुश्चत्वारिंशत्तमं पर्व ॥ ४४ ॥

# पंचेचाळीसावें पर्व.

इकडे विराधनामें चन्द्रोदरसुत लढावया समरीं ।
आला शस्त्रास्त्रासह खरदूषण हा जयास अरि भारी ॥ १ ॥
येथें लढत असे हा वीर महानर अजेय[1] एकाकी ।
विस्मय विराधिताला वाटे चित्तांत हा अलौकिक कीं ॥ २ ॥

( विराधित लक्ष्मणाला नमस्कार करून म्हणाला– प्रभो, मी खरदूषणाच्या सर्व सैन्याबरोबर लढून त्याचा नाश करीन. आपण खरदूषणाबरोबर लढून त्याचा नाश करा असें म्हणून तो सैन्याबरोबर लढू लागला. )

येऊन जवळ त्याच्या जोडुनि कर मस्तकावरी दोन ।
नम्राङ्ग त्यास वदला विनयानें बहु मनांत मोदून[2] ॥ ३ ॥
स्वामिन् ! सेवक अपुला माझी विज्ञप्ति आपुल्या चरणीं ।
आश्रय द्यावा मजला सहचर[3] होईन आपणास रणीं ॥ ४ ॥
मस्तकिं विराधिताच्या लक्ष्मण ठेवून हात त्या वदला ।
वत्सा ! भिऊ नको वा संहारिन मी समस्त शत्रुदला[4] ॥ ५ ॥
सामर्थ्यशालि अरि हा नाथा ! मारून त्यास तूं टाक ।
मी या इतर भटांना पडतील रणीं करून वर नाक ॥ ६ ॥
यापरि बोलुनि केली दूषणसेना समस्त जर्जरशी ।
धावें समरा सोडुनि काक जसे धावती दिशीं देशीं ॥ ७ ॥
उत्साहानें बोले चन्द्रोदरसुत भटां कुठें पळतां ।
देतों दुःख तुम्हांतें आतां मी जे न यम कधीं देतां ॥ ८ ॥
यापरि बोलुनि केली शरधारावृष्टि शत्रुकटकांतें[5] ।
तेणें झाला तत्क्षणिं अरिसैन्याचा समस्त निःपात[6] ॥ ९ ॥

( लक्ष्मणाचें खरदूषणाबरोबर भयंकर युद्ध झालें. खरदूषणाचा वार चुकवून लक्ष्मणानें सूर्यहास खड्गानें खरदूषणाला ठार मारिलें. )

---

१ न जिंकला जाणारा. २ आनन्दून. ३ सेवकाप्रमाणें सहायक.
४ शत्रुसैन्याला. ५ सैन्यांत. ६ नाश.

लक्ष्मण दूषण यांचें झालें घनघोर युद्ध कोपानें ।
जें पाहण्यास जमले होते नभिं सुर नि असुर तोपानें ।। १० ।।
होऊन लाल कोपें खर वदला खरसमान खरवचन[१] ।
दुष्टा माझ्या पुत्रा वधिलें त्वां असशि तूं दयाहीन ।। ११ ।।
निःशीलों[३] तूं माझ्या पत्नीवर हात टाकिलास खला ।
आतां त्याचें तुजला चाखाया लावितों महाकुफला ।। १२ ।।
तीक्ष्णशरें मी नाशुनि तव जीवन पाठवीन नरकास ।
भोगिति दुःखें जेथें अशुभाची धरुनि सतत नर कास ।। १३ ।।
क्षुद्रा अतिनिर्लज्जा परनारीसंगलोलुपा[४] तुजला ।
परलोकाची यात्रा करण्याला पाठवीन आज खला ।। १४ ।।
ऐसें कठोर भाषण लक्ष्मण ऐकून कुपित बहु झाला ।
वदला पाठवितों मी गेला तव पुत्र ज्यास्थलीं तुजला ।। १५ ।।
कां श्वानासम भुंकसि ऐसें बोलून लक्ष्मणें त्याचा ।
रथ, चाप, ध्वज मोडुनि निष्प्रभ केलें दिनेन्दुसम[५] साचा ।। १६ ।।
पडला तेणें भूवरि खरदूषण लाल होय कोपानें ।
घेऊन खड्ग निजकरिं धावें मारावयास वेगानें ।। १७ ।।
लक्ष्मणहि सूर्यहासा घेऊन खरासमीप झणिं आला ।
युद्ध भयानक झालें उभयांचें मोद सुरमनीं झाला ।। १८ ।।
वार तयाचा चुकवुनि कोपें दूषण शिरावरी मारी ।
सौमित्रि सूर्यहासा पाठवि तो शीघ्र मृत्युच्या द्वारीं ।। १९ ।।
निर्जीव कोसळे तो खरदूषण भूवरी जना दिसला ।
चित्रीं लिखितार्कासम[६] दिनेन्दुसम कान्तिहीन वा झाला ।। २० ।।
खरदूषण सेनापति विराधितासह लढावया लागे ।
विरथ कराया इच्छी लक्ष्मणशर तोच तीव्र त्या लागे ।। २१ ।।
तोही पडला भूवरि गेला सोडून जीव देहास ।
अरिसैन्य शरण आलें अर्पी तें सकल त्या विराधास ।। २२ ।।
स्नेहें निघून तेथुनि लक्ष्मण रामासमीप झणिं आला ।
भूमीवरि निजलेला सीताविरहें विषण्णमुख[७] दिसला ।। २३ ।।

---

१ गाढवासारखें. २ तीक्ष्ण भाषण. ३ परस्त्रीलंपटा. ४ परस्त्रीसहवासांत लुब्धा. ५ दिवसां चंद्राप्रमाणें फिका. ६ लिहिलेल्या सूर्यासमान. ७ खिन्न तोंडाचा.

नाथा खिन्न असे कां आर्या सीता कुठें असे गेली ।
उठुनि बसा मज सांगा घडलें तें काय वृत्त त्या काळीं ॥ २४ ॥
श्रीराम उठुनि पाही लक्ष्मण निर्व्रण[1] बघून मनिं मोदे ।
वदला आलिङ्गुनि त्या काय वदू वृत्त खिन्नता तें दे ॥ २५ ॥
हरिली कोणी तुमजे किंवा ती भक्षिली मृगेन्द्रानें ।
शोध तिचा बहु केला थकलों हिण्डून बहुत मी रानें ॥ २६ ॥
नेलीं कीं पातालीं पर्वतशिखरीं नभांत वा कोणी ।
अतिशय भय वाटुनि वा बसली कोठें लपून जशि हरिणी ॥ २७ ॥
क्रोधें लक्ष्मण वदला मनांत होऊन खिन्न रामास ।
कठिण प्रसङ्ग आला तथापि खेदास द्या न अवकाश[2] ॥ २८ ॥
मज निश्चयेंचि वाटे कोणी दैत्येंचि जानकी हरिली ।
संशय तिळमात्रहि नच करयुग ठेवुनि वसूं नका भालीं ॥ २९ ॥
कर्णमनोहर नाना वाक्यें सान्त्वन करून रामाचें ।
निर्मल घेउनि पाणी प्रक्षाली वदन निजकरें त्याचें ॥ ३० ॥

( विराधितानें राम-लक्ष्मणांना नमस्कार केला. लक्ष्मणानें सीतेचा शोध करण्यास विराधितास सांगितलें. त्यानें आपले सर्व सेवक चोहीकडे पाठविलें. शोध करूनही ते निराश होऊन परत आले. )

इतुक्यांत शब्द मोठा ऐकुनि मुख करुनि राम वरि पाही ।
साशङ्क चित्त होउनि आलें सङ्कट पुनः वदे कांहीं ॥ ३१ ॥
भूकम्पशब्द कां हा ? आकाशांतून उद्भवे रव वा ।
कां शत्रुशेष राही त्याचा होणार काय हा धावा ॥ ३२ ॥
वदला श्रीहरि[3] नाथा ! चन्द्रोदरसुत असे विराधित हा ।
उपकृति माझ्यावरि करि धरून मनिं हा अकारणस्नेहा ॥ ३३ ॥
हितकर माझ्या दैवें पाठविला जणु मला सहायास ।
घेउनि महती सेना मनिं नानि न तिळभरीहि आयास ॥ ३४ ॥
चतुरङ्ग सैन्य घेउनि येत असे आपणास भेटाया ।
शब्द असे हा त्याचा येइल तो सङ्कटास टाळाया ॥ ३५ ॥
यापरि बोलत असतां स्वसैन्य घेउनि तिथें विराधित ये ।
बोलुनि जय जय शब्दा प्रणति[4] करी राम-लक्ष्मणा विनयें ॥ ३६ ॥

---

१ जखमेनें रहित. २ स्थान, जागा. ३ लक्ष्मण. ४ नमस्कार.

स्वामी आपण माझें कार्य करायास योग्य सांगावें ।
हा दास करिल सत्वर सुजनें तुमचे सदैव गुण गावे ॥ ३७ ॥
लक्ष्मण वदे तयाला विराधिता ऐक चित्त देऊन ।
मज्ज्येष्ठभ्रात्याची भार्या नेली कुणीं खलें हरुन ॥ ३८ ॥
विरह तियेचा दुःसह झाला नच सहन जीविता त्यजिल ।
भ्राता माझा जरि तो शरणचि मज तेधवा असे अनल[1] ॥ ३९ ॥
बन्धुप्राणावरती अवलंबुनि राहती मम प्राण ।
यास्तव या कार्यामधिं अर्पुनि तन-मन-धना करी यत्न ॥ ४० ॥
ऐकून लक्ष्मणाचें वचन खगप्रभु[2] वदे स्वसचिवांना ।
या पुरुषपुंगवाची भार्या शोधावया करा यत्ना ॥ ४१ ॥
भूतलि वा आकाशीं जलीं स्थलीं गिरिवनीं समस्तदिशीं ।
शोधा तुम्हां देइन इच्छित ऐशी विशाल धनराशि ॥ ४२ ॥
नाना विद्याधर ते होउनि सन्नद्ध कीर्तिवाञ्छेनें ।
गेले दहा दिशांना शोधाया विफलताचि ये जेणें ॥ ४३ ॥
इकडे अर्कजटीचा रत्नजटी-पुत्र खड्ग घेऊन ।
जातां नभांत रुदन-ध्वनि ऐके एकचित्त होऊन ॥ ४४ ॥
हा रामा ! हा लक्ष्मण ! जलधीवरि नभिं दिशेस अनुसरुन ।
ऐकूनि जात असतां पाहि विमानास शीघ्र यद्गमन[3] ॥ ४५ ॥
जाऊन जवळ बघतां दिसली सीता तया करी रुदन ।
जी रामचन्द्रभार्या अकरुण रावण करी जिचें हरण ॥ ४६ ॥
दुष्टा अधमा पाप्या खचरा अपराध करुनि जातोस ।
कोठें थाम्ब जरा तूं हरितो तव जीवनास निःशेष ॥ ४७ ॥
ही रामदेवदारा भामण्डलसोदरी[4] असे सीता ।
सोड हिला झडकरि तूं स्वीकारी नच कदापि मरणपथा ॥ ४८ ॥
ऐकुनि वचन तयाचें रावण युद्धास सज्ज होऊन ।
माराया त्या उठला परि त्याचें करि विचार अपर[5] मन ॥ ४९ ॥
हा क्षुद्रखचर आहे न मारणें हेंचि वाटतें उचित ।
विद्याहरण करावें बुडून जाईल तैं समुद्रांत ॥ ५० ॥

---

१ अग्नि. २ विद्याधरांचा स्वामी. ३ ज्या विमानाचें गमन— जाणें.
४ भामण्डलाची बहिण. ५ दुसरा.

विद्या हरून त्याची केलें त्या रावणें पराभूत ।
उल्का-स्फुलिङ्ग पडतो भूवर तो जाहला तसा पतित ॥ ५१ ॥
फुटली नांव जयाची व्यापारी प्रवल आयुरुदयानें ।
सागर तरून भूवरि येतो आला तसा सुपुण्यानें ॥ ५२ ॥
कम्बुद्वीपीं येउनि चढला तो कंबुपर्वतावरती ।
पाहे सर्व दिशांना दुःखी तो जाहला निजस्वान्तीं ॥ ५३ ॥
गेले विराधिताचे सेवक अन्वेषणास ते परत ।
आले रामापुढती खालीं मुख करुनि वैसले स्वस्थ ॥ ५४ ॥
" जाणुनि तदभिप्राया दीर्घोष्णश्वास सोडुनी वदले ।
केले प्रयत्न आपण परि त्याला फल न अल्पही आलें ॥ ५५ ॥
प्रतिकूल दैव अमुचें स्वच्छन्दें आपुल्या घरीं जावें ।
वडवानलांत पडलें रत्न कसें आपुल्या करीं यावें ॥ ५६ ॥
जें कर्म पूर्वजन्मीं केलें फल तें अवश्य देईल ।
तें अन्यथा कराया समर्थ जगतांत कोण होईल ॥ ५७ ॥
त्यागुनि वन्धुजनांना येउनि मी राहिलों वनांत जरी ।
दैव न मजला सोडी मृगास सोडि न कदापि जेवि हरि[1] ॥ ५८ ॥
धरुनि दुराग्रह लागे माझ्या पाठीस दैव दुष्ट असे ।
देई प्रचण्ड दुःखा याहुनि दुसरें जगीं न दुःख वसे " ॥ ५९ ॥
यापरि दीनपणानें असतां नरपति विलाप जैं करित ।
सान्त्वनकुशल विराधित वदला उपदेशवचन त्या त्वरित ॥ ६० ॥
देव ! विषाद असा हा धारण करणें मनांत योग्य नसे ।
स्वल्पदिनें लाभेलचि भार्या प्रिय आपणास मजसि दिसे ॥ ६१ ॥
देवा, जगांत नाहीं जाणा शोकासमान गरल दुजें ।
स्वाश्रित देहहि नाशी काय कथा अन्यवस्तुविषयी जें ॥ ६२ ॥
धैर्य करावें धारण ज्याला सेविति जगीं महापुरुष ।
आहा विवेकि सुजनीं वाटे आपण मला खरा निकष ॥ ६३ ॥
धैर्यें दिन जो कण्ठीं दुःखविनाशें तयास सुख लाभे ।
राहे कातर मनुजापुढें सदा दुःखरूप भूत उभें ॥ ६४ ॥

---

१ सिंह.

देऊ नका विषादा मनांत आश्रय उदासपण सोडा ।
चालो प्रयत्न सन्तत हाणा आलस्यमस्तकीं जोडा ॥ ६५ ॥
खरदूषणवध झाला झालें कारण महा अनर्थास ।
तन्मित्रहृदयिं होइल हा हेतु प्रवलशा विरोधास ॥ ६६ ॥

( खरदूषणाचे वधानें त्याचे मित्रराजे क्षोभ पावतील म्हणून येथें राहणें दुःखास कारण होईल. यास्तव आपण माझ्या राजधानीला चला. असें म्हणून राम व लक्ष्मणाला विराधितानें अलंकारपत्तनाला नेलें. )

सुग्रीव कुम्भकर्ण त्रिशिरा क्षोभण नि इन्द्रजित् खग हे ।
मित्र तयाचे असती तद्वातें क्षोभ पावती पाहें ॥ ६७ ॥
यास्तव उठून येथुन जाउ अलंकारपत्तनीं राहूं ।
भामण्डलभगिनीची वार्ता तेथें शुभा सुखें पाहूं ॥ ६८ ॥
तें अमुच्या वंशाचें नगर सुविख्यात भूप पातालीं ।
तेथें दुर्गीं राहुनि करु चिन्तन नाथ योग्य तत्कालीं ॥ ६९ ॥
बोलुनि ऐसें रामा सुपुष्टसे चार अश्व सुरथास ।
जोडुनि विराधितानें नेलें निजपत्तनास उभयास ॥ ७० ॥
सम्यक्त्वानें विरहित बोध नि चारित्र शोभती न जसें ।
सीतेविण पुरुषोत्तम उभयहि ते शोभले तदा न तसें ॥ ७१ ॥
चन्द्रोदरसुत घेउनि सेना चतुरंग शीघ्र जाइ पुढें ।
चन्द्रनखासुत वेरी सैन्याचें करुनि त्यास तूर्ण कडे ॥ ७२ ॥
करुनि पराजय समरीं प्रवेश केला विराधितें नगरीं ।
पुरुषोत्तमयुग्मासह हर्ष न मावें तदीय तैं उदरीं ॥ ७३ ॥
तेथें खरदूषणगृहिं सर्वांनीं हर्षयुक्त होऊन ।
केला निवास राहे रामाचें परि उदास सतत मन ॥ ७४ ॥
कान्तासमागमानें वन ही नन्दनवनासमान गमे ।
कान्ताविरहिजनाचें मानस नन्दनवनांतही न रमे ॥ ७५ ॥
परि या गृहप्रदेशीं सुन्दरशा श्रीजिनेन्द्रसदनांत ।
पाहुनि अर्हत्प्रतिमा क्षणभरि हो तप्त राममन शान्त ॥ ७६ ॥
वन्दुनि जिनेन्द्रचन्द्रा पाही श्रीराम एकचित्तानें ।
शान्तस्वरूप त्याचें थोडीशी प्राप्त शान्ति हो तेणें ॥ ७७ ॥

इकडे पिता नि भाऊ यांच्या नाशें सशोकसुन्दानें ।
निजमातेसह केलें प्रयाण लंकेस तीव्र खेदानें ॥ ७८ ॥
धनराज्यादिपरिग्रह नानोपायें जरी नरा मिळती ।
ते नाशवन्त असती दुःखाची प्राप्ति होतसे अन्तीं ॥ ७९ ॥
होतां वियोग त्यांचा तळमळ होते मनांत अनिवार ।
जे त्यागिती तयांना मोक्षाचें-नित्य लाभतें द्वार ॥ ८० ॥
होतां पूर्वभवाचा कर्मोदय जीविं उद्भवे आशा ।
नानाविधसंगांची आत्मज्ञानेंचि पावते नाशा ॥ ८१ ॥
साधूपदेश ऐकुनि जें आत्मज्ञान लाभलें जीवा ।
तें आशेस विनाशी मिळवी जिनदास मुक्तिसुखभावा ॥ ८२ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे सीतावियोगदाहाभिधानं नाम पञ्चचत्वारिंशत्तमं पर्व ॥ ४५ ॥

---

# शेहेचाळीसाव्या पर्वांतील कथेचा संक्षेप.

उत्तम व उंच अशा विमानांत बसून रावण सीतेसह लंकेस जात असतां सीतेला मधुर भाषण बोलून वश करण्याचा त्यानें याप्रमाणें प्रयत्न केला. सीते तूं मला वश हो. जर झाली नाहींस तर कामाच्या पुष्पबाणानीं मी मरण पावल्यानें तुला नरहत्येचें पातक लागेल. हे सुन्दरि तूं रागावलीस तरीही तुझें मुख मला सुन्दरच वाटतें. कारण निसर्ग सुन्दरींच्या सर्व अवस्था रमणीयच असतात.

सीते, मी तुझा सेवक आहे. प्रसन्न होऊन माझ्याकडे पाहिलेस म्हणजे माझे सर्व श्रम नाहींसे होतील. तूं प्रेमळ नजरेनें पाहावयाचें नाकारलेस तरी हरकत नाहीं. पण तुझ्या कोमल चरणांनीं तूं मला आघात केलास तरीही माझें सर्व अंग अनिर्वचनीय आनंदानें मोहरून निघेल. याप्रमाणें बोलत असतां सीता तोंड फिरवून बसली. व याप्रमाणें तिनें कठोर भाषण केलें:— दुष्टा, माझ्या अंगाला स्पर्श करूं नकोस. तूं दूर बैस. अधमा तुझ्या या पापेच्छेनें तुला नरकाची प्राप्ति होईल. परस्त्री ही भस्माच्छादित विस्तवाप्रमाणें असते. तिची इच्छा करून तूं कालत्रयींहीं सुखी होणार नाहींस. परस्त्री ही गळफासाप्रमाणें आहे. हा फास गळ्याभोंवती बांधून नरकांत पडूं नकोस. असें बोलून तिनें त्याला झिडकारलें तरीही त्यानें आपला लघळपणा चालू ठेवलाच. तो हात जोडून तिच्या पाया पडला तथापि मेरुपर्वताप्रमाणें सीतेचें हृदय दृढच राहिलें.

यानंतर लंका जवळ आली. रावणाचें स्वागत करण्यासाठीं सचिव आले होते. ‘गीर्वाणरमण’ नामक उपवनांत सीतेला ठेवून रावण आपल्या महालांत गेला. रावण महाबलवान् आहे पण मी त्याला शरण जाणार नाहीं. मला श्रीरामचन्द्राची कुशल-वार्ता जेव्हां ऐकावयास मिळेल तेव्हांच अन्न व पाणी घेईन अशी तिनें प्रतिज्ञा केली. तो आल्याबरोबर सर्व राण्या खरदूषणवधानें दुःखी होऊन शोक करूं लागल्या.

चन्द्रनखाही तेथें आली. ती म्हणाली– "बन्धो, माझें कपाळ फुटलें. मला वैधव्य-दुःख प्राप्त झालें. पति व पुत्राच्या वधानें मी अत्यंत दुःखी झालें. राज्य नष्ट झालें. तुझा भाचा सुन्द व मी आतां तुझ्या आश्रयाला आलों आहोंत." रावणानें तिचें सान्त्वन याप्रमाणें केलें– बाळे, पूर्वीच्या अशुभ कर्मोदयामुळें जीवाला दुःख प्राप्त होतें व तें भोगण्याशिवाय गत्यंतर नसतें. तूं यावेळीं शोक करणें सोड व जिनचरणाच्या सेवेंत आपलें लक्ष लाव. तूं कांहीं काळजी करूं नकोस मी लवकरच युद्धामध्यें खरदूषणाच्या शत्रूला ठार मारीन. असें बोलून रावण शयनगृहाकडे गेला. पण त्याच्या मनांत सीता कशी वश होईल. कोणता उपाय करावा हा विचार घोळत होता म्हणून त्याला झोप लागली नाहीं.

थोड्यावेळानें मन्दोदरी तेथें आली. मेहुण्याच्या मरणानें दुःखित झाल्यामुळें आपल्या पतीला झोप येत नसेल असें तिला वाटून ती म्हणाली– नाथ, खरदूषण-मरणानें इतके कष्टी आपण होऊ नका. आजपर्यंत आपले अनेक मित्र व आपले पूर्वज युद्धामध्यें मरण पावले पण आपण केव्हांही दुःख केलें नाहीं. आतां आपल्याला इतकें कां दुःख वाटत आहे तें जाणून घ्यावें असें मला वाटतें. हा तिचा प्रश्न ऐकून एक दीर्घ उसासा टाकून रावण बोलला– प्रिये, तूं फार रागावशील म्हणून मला भय वाटतें. मी रागावणार नाहीं अशी शपथ घेऊन सांगशील तर सांगेन अन्यथा नाहीं. तिनें न रागावण्याची शपथ घेतली व रावणानें सांगण्यास सुरुवात केली:— मी सीतेला हरण करून आणिलें आहे. ती अत्यंत सुंदर आहे. ती मला वश होत नाहीं. म्हणून मी अतिशय दुःखी झालो आहे. मन्दोदरी हंसून म्हणाली– नाथ, आपल्याला जी स्त्री इच्छित नाहीं ती खरोखर अतिशय निर्भाग्या आहे असें मी म्हणेन. आपण अत्यंत अभिमानी असूनही आपण तिला इच्छित आहा. त्याअर्थी आपण तिला बलात्कारानें गाढ आलिंगन देऊन वश करूं शकता. म्हणून कष्टी होण्याचें कारण काय? रावण म्हणाला– मी बलात्कार कां करीत नाहीं त्याचें कारण तुला सांगतों ऐक:— हे देवि, मी एकेवेळीं अनन्तवीर्य केवलींच्या सभेंत गेलों होतों. तेथें एका साधूनें म्हटलें– "रावणा, एकही निवृत्ति (व्रत) ज्याला नाहीं तो फुटक्या घागरीप्रमाणें संसारनदींत बुडतो. हें केवलीचें सभास्थान धर्मरत्नद्वीप आहे. येथें आलेल्या भव्यानें व्रतरूपीमणि घेऊन जाणें योग्य आहे." हें त्या साधुवर्याचें भाषण ऐकून सर्व देव, असुर व ऋषि यांच्या समक्ष– "जी परस्त्री मला इच्छीत नाहीं तिच्यावर मी बलात्कार करणार नाहीं" असें व्रत घेतलें. म्हणून सीतेवर बलात्कार करून तिचें ग्रहण मी करणार नाहीं. तेव्हां तूं ती माझ्यावर अनुरक्त होईल असा प्रयत्न

कर. तिनें हें कार्य मी सहज करूं शकेन असा विचार करून तेथून अनेक राण्यासह सीतेकडे प्रयाण केलें. जवळ येऊन ती म्हणाली,– " बाई सीते, अग आज अतिशय आनंदाचा दिवस उजाडला आहे. कारण त्रिखण्डाधीश सुंदर रावण तुझी मनांत अतिशय इच्छा करीत आहेत. तेव्हां तूं त्याच्यावर प्रेम कर. एका दीन दरिद्र्यासाटीं तुझें मन झुरतें हें पाहून तर आम्हाला अतिशय खेद वाटत आहे. त्याची मनांतून आठवणही काढून टाक. व दशाननाच्या प्रेमविलासांत आनंद मानून तूं आम्हा सर्वजणींची व त्रिखण्डाधिपतीची स्वामिनी हो. "

हें मंदोदरीचें भाषण ऐकून सीतेला खेद वाटला. ती म्हणाली– ' मंदोदरी, तूं पतिव्रतामध्यें श्रेष्ठ आहेस व तुझ्या मुखांतून अशी अयोग्य वाणी बाहेर पडावी याचें मला आश्चर्य वाटतें.' असो ' मी तुला निक्षून असें सांगते कीं, मी रावणाला केव्हांही पति मानणार नाहीं. तूं माझ्या शरीराचे तुकडे करून टाकलेस तरी माझा निश्चय बदलणार नाहीं. परपुरुष सनत्कुमार चक्रवर्तीसारखाही सुंदर असला तरी त्याला मी पति मानणार नाहीं. माझ्या हृदयांत पतिचरणाशिवाय कोणासही स्थान मिळणार नाहीं. हें तुम्हा सर्वजणींना बजावून सांगत आहे. तुम्ही सर्वांनीं दिलेला त्रास सोसण्यास माझें मन तयार आहे. '

इतक्यांत रावण तेथें आला व त्याच्या स्त्रिया तेथून निघून गेल्या. पुनः रावणानें म्हटलें कीं, सुंदरि, मी तुझा पदभक्त आहे, माझ्या ठिकाणीं कोणताही कमीपणा नाहीं. शचि जशी इन्द्राची स्वामिनी तशी तूं माझी स्वामिनी हो. माझ्याबरोबर दिव्यभोगांचा उपभोग घे. ही शुभवेळा दवडूं नकोस. सीता म्हणाली– तुझे भोग मला मलासारखे वाटतात. ते तुलाच सूकराप्रमाणें प्रिय होवोत. ज्याचें शील उत्तम आहे त्याला दरिद्रता भूषणाप्रमाणें खुलून दिसते. व अशा दरिद्र्याचे भोगपदार्थ अमृताप्रमाणें आहेत. पवित्र वंशांत जन्मून जो शीलधारणा करितो तोच दिव्यपुरुष होय. शीलरत्न पाळणाराचेंच जीवन सफल आहे. व तोच महापुरुष होय.

रावणानें मनांत विचार केला कीं, ही भय दाखविल्याशिवाय वश होणार नाहीं. म्हणून त्यानें हत्ती, वाघ, सिंह, सर्प, वानर, वेताळ इत्यादिक विक्रिया उत्पन्न करून तिला भय दाखविलें. पण ती त्या भयानें रावणाला शरण गेली नाहीं. रात्रभर असे भीतीचे प्रकार त्यानें दाखविले पण ती रावणास शरण गेली नाहीं.

दुसरा दिवस उजाडला. रावणाकडे बिभीषणादिक खरदूषणाच्या मरणामुळें भेटण्यासाठीं आले. ते दुःखाने मुख खालीं घालून मौनानें बसले. इतक्यांत दया उत्पन्न होईल असें स्त्रीचें रडणें पडद्याच्या पाठीमागून बिभीषणाच्या कानीं पडलें. शब्दांतला कम्प तिचें दुःख व्यक्त करीत होता. तूं कोण आहेस तुझी हकीकत मला सांग असें बिभीषणानें म्हटल्यावर– दयार्द्र होऊन हकीकत विचारणाराला मी माझा भाऊ समजून मी याप्रमाणें हकीकत सांगते ती तूं ऐक:— मी भामण्डलविद्याधर राजाची बहीण आहे. माझे पिताजी मिथिला देशाचे राजे आहेत. मी श्रीरामाची पत्नी व दशरथ राजाची सून आहे. माझें नांव सीता. माझा पति श्रीराम आपल्या भावाला-लक्ष्मणाला युद्धांत साहाय्य करण्यासाठीं गेल्यावर मला रावणानें हरण करून आणिलें आहे. हे बंधो, 'माझ्या वियोगानें माझा पति प्राण सोडण्यापूर्वीच मला माझ्या पतिकडे न्यावें अशी माझी तुला विनंति आहे.' हें भाषण ऐकून बिभीषण रावणाला म्हणाला– बन्धो, ही परस्त्री सर्पिणीप्रमाणें आहे तू हिला कां आणिलेंस? तुला मोहानें घेरलें आहे. बन्धो, तूं मोठा विद्वान् आहेस. हा जळता निखारा आपल्या पदरांत कां बांधून घेतला आहेस. लोखंडाचा गोळा पाण्यांत बुडतो तसा परस्त्रीसेवी नरकांत प्रवेश करितो. बिभीषणाच्या या भाषणाला रावणानें याप्रमाणें उत्तर दिलें:— 'या भूतलांवरील सर्व वस्तु माझ्याच आहेत. यास्तव सीता ही पराची नाहीं. सर्व वस्तूवर माझें स्वामित्व आहे.'

मारीचमंत्र्यानेंहि म्हटलें कीं– प्रभो, आपण मोहाला बळी पडून हें अकार्य केलें आहे. प्रत्येक दिवशीं प्रातःकालीं मनुष्यानें आपल्या हिता-अहिताचा विचार विवेकानें करावा. असा विचार करणारांचें नेहमीं कल्याण होतें. या सर्वांच्या उपदेशाला अवगणून पुष्पक विमानांत सीतेला बसवून रावण सैन्यासह नगरींत मिरवला. आपलें वैभव किती मोठें आहे हें त्यानें जनतेला दाखविलें. व परत येऊन त्यानें सीतेला प्रमद-उद्यानांत ठेविलें. सीतेनें अन्नपाण्याचा त्याग केला होता. अनेक प्रकारची पक्वान्नें व मधुरपेयें दासी तिच्याकडे आणीत पण ती त्यांच्याकडे ढुंकूनही पाहत नसे. दासीनीं तिला वश करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण ती मौन धारण करून चित्राप्रमाणें निश्चल बसली. व तिच्या देहांत, वचनांत व मनांत श्रीराम रात्रंदिवस विराजमान झालेला होता. डोळे उघडून तिनें कोणाकडे पाहिलें नाहीं.

रावणही तिला वश करण्याच्या विचारांत निमग्न झाला. तो उष्ण श्वास सोडून शून्यमनानें इकडे तिकडे पाहत राही. मधेंच कोणाला तरी हाक मारी व काय कार्य

आहे? हा मी आलों असें म्हटल्यावर तो त्याच्यावर रागावत असे. सीतेचें चिन्तन करीत असतां त्याचे डोळे अश्रूंनी भरून येत असत. सीता-सीता म्हणून हाक मारी व सीता येईल म्हणून त्या दिशेकडे उत्कंठेनें पाहत बसे.

अशी त्याची विचित्र परिस्थिति झालेली पाहून बिभीषण व मंत्र्यांनीं लंका-नगरीच्या तटावर अनेक यंत्रें बसवून ती नगरी दुर्गम केली. कांहीं वानरवंशी राजे लक्ष्मणाचा पराक्रम पाहून त्याला वश झाले आहेत असें समजून त्यांच्यावर विश्वास ठेऊ नये असें ठरविलें. सीतेचा शोध लागू नये असा बंदोबस्त त्यांनीं ठेवला.

तिचा शोध नाहीं लागला म्हणजे राम मरण पावेल व लक्ष्मणही त्याच्या वियोगानें मरेल. व असें झालें म्हणजे रावण विराधिताला कडक शासन करील. असा विचार प्रधानादिकांनीं केला.

पण दैवविरहित पौरुष इष्टप्राप्तीस कारण होत नाहीं. दैवानुकूल पौरुष हेंच कार्य सिद्धिस कारण होतें असें जाणून जिनेश्वराच्या वचनावर श्रद्धा ठेवा. जिनपद-कमलाची सेवा करा. अर्थात् जिनदास व्हा म्हणजे तुम्हाला आत्मसुखाचा मेवा खायाला मिळेल.

# शेहेचाळीसावें पर्व.

उत्तमतुङ्ग-विमानीं वसून रावण नभीं करी स्वैर ।
गमन तदा तो शोभे सूर्यासम ज्यास न प्रतीकार[1] ॥ १ ॥

बघुनि म्लान मुखाला सीतेच्या कामतप्त मूढ मनीं ।
कांहीं विचार चिन्तुनि वदला प्रिय मधुरशा तिला वचनीं ॥ २ ॥

[ कामी रावणानें सीतेला अनुनयाचें भाषण करून अनुकूल करण्याचा प्रयत्न केला. पण तो व्यर्थ गेला. ]

मी कामाच्या मृदुतर कुसुमशरें[2] विद्ध पावलों मरण ।
नरहत्येचें पातक लागेल तुला असे मनीं जाण ॥ ३ ॥

मुखकमल सुंदरी तव सकोप परि वाटतें मला मधुर ।
अनिमित्तसुन्दरींच्या सर्व दशा सर्वथैव रम्यतर ॥ ४ ॥

सेवक तुझा असे हा प्रसन्न होऊन त्यास तूं बघ गे ।
तव नयनकान्ति-नीरस्नानें श्रम मम समस्त जाइल गे ॥ ५ ॥

दृष्टि प्रसाद ना तरि मृदुपदपद्में मला शिरीं मार ।
वाटेल धन्यता मज फुलेल मोदें समस्त मम गात्र[3] ॥ ६ ॥

उपवनिं तव पतिच्या गे झालों असतों अशोक तरु जरि मी ।
तव पदपद्माघातें फुललों असतों अनेकदां कामी ॥ ७ ॥

पाही या खिडकींतुनि रविहुनि गेलें विमान उंच दिसे ।
पर्वत, नदी, तडागें, उद्यानें, सकल-भू सदा विलसे ॥ ८ ॥

यापरि रावणभाषण ऐकुनि फिरवून तोंड ती बसली ।
अत्यन्त खिन्न होउनि त्यास कठोराक्षरें असें वदली ॥ ९ ॥

[ सीतेनें रावणास झिडकून टाकणारें भाषण केलें. ]

अधमा माझ्या अङ्गा करूं नको स्पर्श दूर तूं बैस ।
बोलूं नकोस वाणी पुण्यहरी[4] वाढवून दूरितास ॥ १० ॥

पापेच्छा ही खोटी अकीर्तिकर निन्द्य नेइ नरकास ।
लोकविरुद्ध भयास्पद धरिती न कदापि सुजन नर कास ॥ ११ ॥

---

१ अडथळा. २ पुष्पबाणांनीं. ३ शरीर. ४ पुण्याचा नाश करणारी.

भस्माच्छादित अनलासमान परक्या स्त्रियेस इच्छून ।
होशील महादुःखी इहपरलोकांत जाण हे सुजन ॥ १२ ॥
तूं मोहाच्या चिखलीं बुडला आहेस मूढ आकण्ठ ।
परदारासेवेचें पाप करायास दिससि उत्कण्ठ ॥ १३ ॥
परदारेची केवल इच्छाही होय हेतु पापास ।
कण्ठाभोंवति घेऊ नकोस बान्धून नरकपाशास ॥ १४ ॥
यापरि कठोर वचनें सीतेनें रावणास ताडियलें ।
परि कामासक्ताचें प्रेम तिच्यावरिल ऊन[1] नच झालें ॥ १५ ॥
[ सीतेला वश करण्याचे रावण पुनः प्रयत्न करतो पण तेही विफल होतात.]
मी वस्तु दिव्य देउनि सम्मान तुझा सदैव ठेवीन ।
हो वश मजला सीते दास तुझा मी अनन्य होईन ॥ १६ ॥
यापरि भाषण केलें दशाननें वश न होय वैदेही ।
ती स्थिर सतीव्रतामधिं राही तन्मन न होतसे मोही ॥ १७ ॥
जोडून हात दोन्ही ठेउनि भालावरी नमस्कार ।
सीताचरणा रावण करि कामासक्त असुनिही शूर ॥ १८ ॥
यापरि वश करण्याचे उपाय करि विफल सर्व ते झाले ।
दृढ मेरुपर्वतासम सीतेचें हृदय लवहि नच हालें ॥ १९ ॥
लङ्का समीप आली स्वागत केलें विनम्र होऊन ।
सचिवजनें प्रासादीं रावण करि तेधवा मुदें गमन ॥ २० ॥
[ रामचन्द्रांची कुशलवार्ता समजल्यावरच मी अन्नपाणी घेईन अशी सीता-सतीची प्रतिज्ञा. तिला रावणानें 'गीर्वाणरमण' उपवनांत ठेविलें.]
सीता सचिन्त झाली रावण खगपति महान् बली आहे ।
शरण कुणा मी जावें रामवियोगास मम न मन साहे ॥ २१ ॥
श्रीरामकुशल-वार्ता जेव्हां मम कर्णयुगल ऐकेल ।
तेव्हांच अन्नपानीं प्रवृत्ति मम अन्यथा न होईल ॥ २२ ॥
'गीर्वाणरमण' नामक उद्यान स्वर्गतुल्य जें होतें ।
बसवुनि विजनस्थलिं तिज रावण गेला स्वकीय सदनातें ॥ २३ ॥
[ चन्द्रनखेचा शोक शान्त करून रावण शयनगृहीं गेला पण त्याला झोप आली नाहीं. मंदोदरीला रावण झोप न येण्याचें कारण सांगतो.]

---

१ कमी.

रावण येतां झाला अन्तःपुरिं शोक सर्वनारींत ।
खरदूषणवध झाला ऐसें झालें तदा तया विदित[1] ॥ २४ ॥
चन्द्रनखा ये सन्निध पतिपुत्रवधें अतीव जी खिन्न ।
रडली बन्धो ! माझें कपाळ फुटलें नि हृदय हो सुन्न ॥ २५ ॥
गेलें राज्य लयाला भाचा सुन्दहि तुझा इथें आला ।
सर्वस्व नाश झाला आतां आधार तूंच आम्हाला ॥ २६ ॥
बाळे ! नको रडूं गे पूर्वार्जित कर्म तेंचि फल देतें ।
निश्चित सिद्धान्त असे न भोगण्याविण कदापि तें सुटतें ॥ २७ ॥
अत्यल्पशक्तिधारक भूगोचरलोक पति तुझा खचर[2] ।
मृति पूर्वाशुभकर्में पावे होतां तयासवें समर ॥ २८ ॥
जें मी केलें त्याचें न्यायानें फल मला मिळे जाण ।
शोक नको करूं वत्से सेवी तूं वीतरागजिनचरण ॥ २९ ॥
वज्राघातानें ही मरण अकालीं न पावतो जीव ।
मृतिकाल जवळ येतां निश्चित अमृतास येइ विषभाव ॥ ३० ॥
ज्यानें वत्से ! समरीं खरदूषण मारिला तया मीही ।
मारीन भगिनि ! वेगें चिन्ता हृदयीं करूं नको कांहीं ॥ ३१ ॥
यापरि बोलुनि तिजला जिनपूजनिं चित्त लाव तूं अपुलें ।
सांगुनि निजगृहिं गेला परि ज्याचें खेदखिन्न मन झालें ॥ ३२ ॥

[ कोणत्या उपायानें सीता वश होईल याचा विचार मनांत घोळत असल्यामुळें मला झोप येत नाहीं असें रावणानें मंदोदरीला सांगितलें.]

शयनीं पडला रावण किञ्चिन्मात्रहि न झोप त्या येई ।
निश्वास दीर्घ सर्पासमान जणु तो पुनः पुनः घेई ॥ ३३ ॥
दुःखें भूषणवर्जित पतिसंनिध मयसुता[3] तदा आली ।
आदर हृदयीं ठेवुनि पाहुनि तत्खिन्नता तया वदली ॥ ३४ ॥
खरदूषणमरणें का नाथ ! व्याकुल मनीं तुम्ही झाला ।
मोठ्याहि संकटामधिं कदापि वीर न वरी विषादाला ॥ ३५ ॥
पूर्वी अनेकयुद्धीं तुमचे बहुमित्र पावले मरण ।
झाला दूषण मरणें कां इतुकें नाथ ! शोचनाधीन[4] ॥ ३६ ॥

---

१ माहीत. २ आकाशगामी-विद्याधर. ३ मन्दोदरी. ४ शोकाच्या ताब्यांत.

श्रीमाली आदिक जे पूर्वज तुमचे सुरेन्द्रसमरांत।
गेले त्यांच्या शोकें झालें मन नच कदापि सन्तप्त ॥ ३७ ॥
आतां मन कां तुमचें शोकानें युक्त जाहलें इतुकें ।
जिज्ञासा[1] ही माझ्या मनांत उत्पन्न जाहली कुतुकें ॥ ३८ ॥
टाकुनि दीर्घ उसासा रावण वदला तिला प्रिये ऐक ।
सांगेन सर्व तुजला परि कोपाचा तुझ्या गमे धाकें[2] ॥ ३९ ॥
नच कोप करिन नाथा ! वदली मंदोदरी दशग्रीवा ।
घालून शपथ सांगे निजहृदयांतील तेधवा भावा ॥ ४० ॥
सृष्टि अपूर्व असे ही विधिची[3] सीता मला न इच्छील ।
या देहाला माझे सोडुनि गे प्राण सुदति ! जातील ॥ ४१ ॥
लावण्य रूप यौवन, माधुर्य नि हावभाव सुविलास ।
राहून तिच्याठायीं वरिले त्यांनीं कृतार्थभावास[4] ॥ ४२ ॥
मन्दोदरी तयाची ऐशी दुःखद दशा विलोकून ।
हासत वदली नाथा असाध्य याच्यांत वाटतें मज न ॥ ४३ ॥
विस्मयकारक वाटे नाथ जिला इच्छिता न ती इच्छी ।
ती मज पापा वाटे दुर्भाग्या आपणा न ती वांछी ॥ ४४ ॥
अथवा अत्यभिमानी असुनिहि हे नाथ इच्छिता जीस ।
भाग्यवतीचूडामणि तीच जगीं वाटतें न कोणास ? ॥ ४५ ॥
गजशुण्डासम पुष्ट नि केयूरें शोभती अशा थोर ।
आलिंगुनि बाहूंनीं स्त्रीवरि करिता न कां बलात्कार ? ॥ ४६ ॥

[ रावण बलात्कार न करण्याचें कारण याप्रमाणें मंदोदरीला सांगतो.]

सर्वाङ्गसुन्दरीवर करुनि बलात्कार भोगितो न तिला ।
कारण त्याचें कथितों सावध तूं करुनि ऐक हृदयाला ॥ ४७ ॥
हे देवि ! मुनिसभेमधिं अनन्तवीर्यासमीप मी एक ।
केलें ग्रहण व्रत तें मोडिन नच घेतली अशी भाकें[5] ॥ ४८ ॥
एकहि निवृत्ति घेतां ती देते मानवास परमफल ।
त्या भगवन्तें कथिलें ज्याचें सुर वन्दितात पदमूल ॥ ४९ ॥

---

१ जाणण्याची इच्छा. २ भय. ३ ब्रह्मदेवाची. ४ सफलपणास.
५ आण-शपथ.

दुःखें भरल्या कुभवीं प्राणी पापें करून फिरतात ।
पापापासुनि अल्पहि निवृत्ति तारी तया भवाब्धींत ॥ ५० ॥
एकहि निवृत्ति ज्यांच्या हृदयीं उत्पन्न जाहली नाहीं ।
ते नर फुटक्या कलशासम बुडती भवनदीमधें पाही ॥ ५१ ॥
मानव आणिक पशुगणिं अन्तर वदतात तें असें आहे ।
मोक्षा विरक्ति कारण नरगणिं लाभे न पशुगणीं पाहे ॥ ५२ ॥
पापां भव्यजनांनो त्यागा संचित कराचि सुकृतधना ।
म्हणजे जन्मान्धासम फिरणें होईल वन्द कुभववनां ॥ ५३ ॥
यापरि भगवन्ताच्या मुखकमलांतून वचनमकरन्द ।
प्राशन करून कोणी मुनि होउनि चाखिती निजानन्द ॥ ५४ ॥
सागारधर्म कोणी धारण केला निजाल्पशक्तीनें ।
कर्मोदय सम नसतो जीवीं आचारसाम्य नच तेणें ॥ ५५ ॥
एका शान्तमुनीनें मजला पाहून यापरी म्हटलें ।
घेई दशानना वा निजशक्त्यनुसार वृत्त एक भलें ॥ ५६ ॥
तूं धर्ममणिद्वीपीं आला आहेस, रिक्त चित्तकरें ।
जाऊ नकोस असशी ज्ञानी गुणसङ्ग्रहीं महाबुध रे ॥ ५७ ॥
वचन तयाचें ऐकुनि नमून मुनिपुङ्गवास गे देवी ।
देवासुरऋषि यांच्या समक्ष मी बोललों असे भावी ॥ ५८ ॥
जी परनारी मजला न इच्छिते तिजवरी बलात्कार ।
झालों जरि मी दुःखी भगवन्ता नच कदापि करणार ॥ ५९ ॥
हें व्रत अभिमानानें केलें मी ग्रहण कोणती नारी ।
मजला पाहुनि मानें होई प्रतिकूल जेवि सवल अरि ॥ ६० ॥
यास्तव त्या सुमनोहर-नारीचें ग्रहण मी स्वयं न करी ।
राजे वदती एकचि वचन न करिती तयांत वदल परी ॥ ६१ ॥
सीता प्रसन्न होइल माझेवरि तूं असा उपाय करी ।
प्राण न जोंवरि सोडिन तोंवरि कार्यांत तूं यशास वरी ॥ ६२ ॥
गृह अग्निभस्म होतां विहीर खणणें जसें वृथा होय ।
मत्प्राणनाश होतां प्रसन्नता विफलशी नसे काय ॥ ६३ ॥
ऐकुनि वचन पतीचें करुणा मन्दोदरीमनीं आली ।
कार्य स्वल्प असे हें करीन मी सिद्ध शीघ्रसें वदली ॥ ६४ ॥

तदनन्तर ती गेली मयतनया देवरमण उद्यानीं ।
अठरा हजार राण्या आल्या अनुसरुनि तीस तत्स्थानीं ॥ ६५ ॥

[ सीतेला रावणास तूं वश हो म्हणून मन्दोदरी सांगते.
तिचें बोलणें ऐकून सीता तिला उत्तर देते :— ]

सीतेसमीप येउनि वदली मन्दोदरी तिला मोदें ।
सुन्दरि ! हर्षस्थानीं कां कष्टविसि स्वतःस तूं खेदें ॥ ६६ ॥
लाभे जिला दशानन पति ती लोकत्रयांत धन्य असे ।
त्या कामसुन्दराची इच्छा तव मानसांत कां न वसे ? ॥ ६७ ॥
कोणी दीनदरिद्री त्यासाठीं मन तुझें सदा झुरतें ।
सोडुनि दे तत्स्मृति गे दशाननाच्या प्रसन्न हो सुरतें ॥ ६८ ॥
जो राम नि जो लक्ष्मण असोत असतील ते तुझे कोणी ।
कोपेल जरि दशानन त्यांच्या सन्देह जीवितीं जाणी ॥ ६९ ॥
रूपैश्वर्यकलाकुल दशानना मान जीवितस्वामी ।
करि सुरत त्यासवें तूं सोडुनि अभिलाप देई तूं रामीं ॥ ७० ॥
मन्दोदरीस वदली सीता आणून लोचनीं पाणी ।
आहेस तूं सतीमणि निघे मुखांतुनि अशी कशी वाणी ॥ ७१ ॥
तोडी शरीर माझें अथवा तुकडे करून तूं टाक ।
पति रावणा न मानिन कैसाही दाविलास जरि धाक ॥ ७२ ॥
सुन्दर सनत्कुमारासमान पर नर जरी असो त्यास ।
स्वपति कधींहि न मानिन धरीन हृदयीं स्वभर्तृचरणास ॥ ७३ ॥
परनर इन्द्रासम जरि मिळेल त्याला न हृदयिं मम वास ।
नच मम सुटेल निश्चय दिला जरी विविधसा मला त्रास ॥ ७४ ॥
तुम्हां सर्वजणींना निवेदिला मम खरा अभिप्राय ।
तुमचा छळ मी सोशिन वज्रासम कठिण मम गणा हृदय ॥ ७५ ॥

[ माझ्यावर तूं प्रसन्न होऊन माझी तू स्वामिनी हो म्हणून
रावण विनंति करितो ती ऐकून सीता त्याला उत्तर देते :— ]

इतुक्यांत येइ रावण वदला सीतेसमीप जाऊन ।
मी भक्त तुझा सुन्दरि माझ्यावरि तव असो प्रसन्न मन ॥ ७६ ॥

---

१. संभोगानें.

वद कोणत्या पदार्थें हीन असे मी म्हणून पति मजला ।
मानावयास नाहिंस तयार कां जीव हा तुझा रुसला ॥ ७७ ॥
बोलुनि यापरि तिजला स्पर्श करायास जेधवा सजला ।
ती सरुनि दूर बोले पाप्या स्पर्शू नकोस रे मजला ॥ ७८ ॥
तूं सोड देवि सुन्दरि, कोपाला तेवि दुष्ट अभिमाना ।
जैसी शचि इन्द्राची माझी हो स्वामिनी करी करुणा ॥ ७९ ॥
तूं भोग दिव्यभोगा प्रसन्न होऊन नान्द मोदानें ।
कां व्यर्थ कष्ट मानिसि शुभवेला फुकट जाय खेदानें ॥ ८० ॥
सीता वदे कुशीला दिव्य तुझे भोग वाटतात मला ।
मलसम भोग तयांना सूकरसम योग्य तेंचि सकल तुला ॥ ८१ ॥
जो साधुशील आहे दरिद्रता भूषणासमान असे ।
अमृतासमान त्याचे भोग तयामधिंच दिव्यता विलसे ॥ ८२ ॥
ज्यांचा पवित्रवंशीं झालासे जन्म दिव्य तेंचि जन ।
शीलालङ्कृत त्यांना मानी माझें सदैव देव मन ॥ ८३ ॥
शीलें विरहित जीवन इह-परलोकीं न मान्य विबुधास ।
जो शीलरत्न पाळी जीवन त्याचेंचि पूर्ण निर्दोष ॥ ८४ ॥
तूं परनारीलम्पट तव जीवित सकल विफल मज वाटे ।
शीला पाळुनि जगतो जीवन त्याचेंचि सर्वथा मोठें ॥ ८५ ॥
झिडकारतांच यापरि माया भिववावया तिला योजी ।
जेणें भिऊन सीता होइल रतिसौख्य भोगण्या राजी ॥ ८६ ॥
जणु मायाभय वाटुनि रवि निजकिरणां सवेंचि घेऊन ।
अस्तगिरीच्या गह्वरिं शिरला अतिमन्द तेज होऊन ॥ ८७ ॥
सीतावचनें ऐकुनि निजपतिनिर्भर्त्सना सती सकल ।
गेल्या स्वगृहा धांवत करुनि अधोवदन मानसीं विकल ॥ ८८ ॥

[ हत्ती, वाघ, सिंह, सर्प, वानर, वेताळ इत्यादिक मायेनें उत्पन्न करून त्यांच्याद्वारें तिला भिववून स्ववश करण्याचा रावणाचा प्रयत्न विफल झाला.]

मदजल वाहे ज्यांच्या प्रचण्ड गण्डस्थलांतुनी सतत ।
करिती घनसमगर्जन ऐसे गजराज धावले त्वरित ॥ ८९ ॥
पाहुनि त्यांना भ्याली परन्तु गेली न रावणा शरण ।
झाली माया विफला क्रोधें तो जाहला तदा अरुण ॥ ९० ॥

दंष्ट्रा कराल ज्यांच्या डरकाळ्या फोडिती महाक्रूर ।
धावून वाघ येतां साध्वी जाई न शरण जी थोर ॥ ९१ ॥
चञ्चल केसर ज्यांचे नखाङ्कुशें गज विदीर्ण जे करिती ।
ते सिंह येति धावुनि न रावणा शरण जाइ ती सुदती ॥ ९२ ॥
निघती ज्वाला ज्यांच्या डोळ्यांतुनि करिति भयद फूत्कार ।
सर्प प्रचण्ड येतां सीता भ्याली जरी मनीं फार ॥ ९३ ॥
गेली न रावणा ती शरण सतीत्वाभिमान ठेवून ।
यत्नां फल नच आलें हताश तो जाहला मनीं खिन्न ॥ ९४ ॥
आ केलें मुख ज्यांनीं इकडे तिकडे पुनः पुनः उडती ।
दाखविती भय वानर शरण न परि जाय रावणास सती ॥ ९५ ॥
अन्धारासम काळे करिती हुंकार उंच वेताळ ।
ते दाखविती भय परि सीता तेथून काढिते न पळ ॥ ९६ ॥
ती रावणा न गेली शरण सती राहिली व्रतांत दृढ ।
झाला उत्पन्न तिच्या हृदयांत द्वेषरोष बहु गाढ ॥ ९७ ॥
उग्रोपसर्ग केले नानाविध जरि दशाननें तिजला ।
ती त्या शरण न गेली खरी सती भव्य हो हिला बोला ॥ ९८ ॥
उपसर्गभय निशेला वाटुनि तेथुनि निघून जणु गेली ।
वाद्यें जिनेन्द्र-सदनीं भेरीशङ्खादि मधुर दुमदुमलीं ॥ ९९ ॥
मोठ्या प्रासादांचीं द्वारकवाडें खुली तदा झालीं ।
त्यांचीं जणु हीं नेत्रें गतनिद्रजनां प्रफुल्लशीं दिसलीं ॥ १०० ॥
सन्ध्यारञ्जित होउनि पूर्वदिशा शोभली उषःकालीं[1] ।
सूर्यस्वागत करण्या केशर जणु चर्चिलें तिनें भालीं ॥ १०१ ॥
सारुनि निशातमाला चन्द्राला कान्तिहीन बनवून ।
उदयास सूर्य आला तळ्यांत कमलोत्करास[2] खुलवून ॥ १०२ ॥
आला प्रातःकालीं निर्मल सूर्यप्रकाश भूवरती ।
पक्षी नभांत विहरति सर्वांच्या हृदयिं येइ कीं स्फूर्ति ॥ १०३ ॥

[ खरदूषणवधामुळें भेटावयास आलेल्या बिभीषणाला सीतेनें रावणाकडून 'मी हरण केली गेली आहे' असें सांगितलें, त्यावेळीं बिभीषणानें या अकार्याबद्दल रावणाची कानउघाडणी केली. ती याप्रमाणें :— ]

---

१. सकाळीं. २. कमळाच्या समूहास.

आले बिभीषणादि प्रियबान्धव रावणास भेटाया ।
ते खरदूषण शोकें बसले खालीं मुखास घालुनिया ॥ १०४ ॥
न निघे वचन मुखांतुनि अश्रूंनीं चिम्ब जाहले डोळे ।
प्रियजनशोकाग्नीनें हृदय जयाचें अतीव होरपळे ॥ १०५ ॥
इतक्यांत शब्द येई पडद्यामागून करुण रुदनाचा ।
द्रवलें स्त्रीचा जाणुनि मन हा वाटे अपूर्व रव साचा ॥ १०६ ॥
आली अपूर्व[1] कोणी येथें परिचयविहीनशी नारी ।
समजे करुण रडे ही पतिविरहाकुल म्हणून शोक करी ॥ १०७ ॥
शब्दांत कम्प आहे मनांतला दुःखभार तो सांगे ।
वदला साधुविभीषण असशी तूं कोण हें मला वद गे ॥ १०८ ॥
सीता वदली देवा ! माझा तूं कोण बन्धु आहेस ।
मजला वाटे वत्सलभावाचा मनिं तुझ्या असे वास ॥ १०९ ॥
मी भामण्डलभगिनी कन्या मिथिलेशजनकराजाची ।
श्रीरामाची पत्नी दशरथभूपास मी स्नुषा[2] साची ॥ ११० ॥
नाम असे मम सीता साहाय्य करावयास समरांत ।
गेला भर्ता भ्रात्या हरिलें मज रावणें तदा त्वरित ॥ १११ ॥
माझ्या विरहें जोंवरि सोडिल न प्राण राम मज द्यावें ।
नेउनि त्याला बन्धो विनम्र विज्ञप्ति हीच पदिं भावें ॥ ११२ ॥
सीतावदनें ऐकुनि हरणाचें वृत्त कुपित मनिं झाला ।
साधुविभीषण विनयें ज्येष्ठभ्रात्यास रावणा वदला ॥ ११३ ॥
ही सर्पिणीप्रमाणें परनारी भीतिदायिनी आहे ।
कां आणिलें हिला घरिं मोहानें घेरिलें तुला पाहे ॥ ११४ ॥
मी बालबुद्धि आहे तथापि मम भाषणास ऐकावें ।
बन्धो प्रसन्न होउनि मम वचनाला मनांत चिन्तावें ॥ ११५ ॥
बन्धो ! कीर्तिलतांचें जाळें तव पसरलें त्रिभुवनांत ।
परि अयशाचा वणवा जाळो नच हेंच इच्छितों सतत ॥ ११६ ॥
परनारीचा हृदयीं धरणें अभिलाष हानिकर आहे ।
इहपरलोक-विनाशक अकीर्तिकर निन्दनीय तो पाहे ॥ ११७ ॥

१ नवीन. २ सून.

धिक्कार शब्द जेव्हां सन्तापासून निघुनि ये कानीं ।
करवतसम तो कापी धीमन्तांच्या प्रवेश करुनि मनीं ॥ ११८ ॥
बन्धो समस्त विद्यास्वामी आहेस जाणता असती ।
कां हा जळता विस्तव आपल्या पदरांत बान्धुनी घेसी ॥ ११९ ॥
जो पापबुद्धि मानव परनारीसेवनांत रत होतो ।
नरकीं प्रवेश करितो लोहाचा गोल जेवि जलि बुडतो ॥ १२० ॥
[ यानंतर रावणाचें भाषण– त्याचें उत्तर मारीच रावणास असें देतो.]
रावण ऐकुनि वदला भूवरि जी वस्तु सर्व माझीच ।
बन्धो कशी पराची माझें स्वामित्व सर्वदा साच ॥ १२१ ॥
यापरि उन्मत्तासम[1] भाषण ऐकून नीतिसम्पन्न ।
मारीच सचिव वदला अन्तरिं होऊन तन्मदें खिन्न ॥ १२२ ॥
स्वामिन् लोकपरिस्थिति आपण जाणूनही अकार्यास ।
मोहावेशें केलें नच हें शोभे तुम्हास आर्यास ॥ १२३ ॥
" प्रातःकालीं प्रतिदिनिं मनुजें हृदयीं सदा विवेकानें ।
निजहित आहिता ध्यावें त्याचें कल्याण होय नियमानें ॥ १२४ ॥
निरपेक्ष सचिवभाषण रावण ऐकुनि अनादरें उठला ।
पट्टगजावरि बैसुनि घेउनि परिवार वैभवें गेला ॥ १२५ ॥
बसवून पुष्पकाग्रीं सशोक सीतेस सैन्य घेऊन ।
निजवैभवप्रदर्शन करावया तो करी पुरीं भ्रमण ॥ १२६ ॥
भाले खड्ग नि तोमर, छत्रध्वज करिं धरून सैन्य निघे ।
तें अग्रभागिं रावणजयकार करीत पत्तनांत रिघे ॥ १२७ ॥
बसले स्वार जयावरि हालविती मान आपुली सतत ।
खिंकाळून, खुराग्रें उडवुनि भूधूलि नेति गगनांत ॥ १२८ ॥
ऐसे अश्व हजारों रांगेनें चालले बघून तयां ।
जनता स्तविती झाली दशाननाच्या विशाल पुण्यचया ॥ १२९ ॥
चालत असतां वाजे घण्टा ज्यांच्या सदा गळ्यांतील ।
जे मेघासम गर्जति शैलासम जाति जे गज स्थूल ॥ १३० ॥
जे अट्टहास करिती नानाशब्दास जात बडबडती ।
जणु फोडिती नभाला मानव सैनिक सलील ते जाती ॥ १३१ ॥

---

१ धोत्रा खाल्लेल्या माणसाप्रमाणें.

वाद्यें दहादिशांना शब्दांनीं बधिर करित लङ्केत ।
जाई रावण सीतेसवें करी शोकरुदन्न जी सतत ॥ १३२ ॥
यापरि अपुलें दावी वैभव रावण समस्त सीतेला ।
जीर्ण-तृणापेक्षांही तुच्छचि मानी महासती त्याला ॥ १३३ ॥
निष्पापचि स्वभावें सीतेचें चित्त लुब्ध नच झालें ।
पाण्यांत कमल राहुनि अलिप्त होइ न कदापि तें ओलें ॥ १३४ ॥
नानावृक्ष नि वेली पुष्पें सुन्दर सदैव दिसतात ।
ऐशा प्रमदवनामधिं नेलें सीतेस रावणें त्वरित ॥ १३५ ॥
होईल रामदर्शन केव्हां याविण विचार अन्य नसे ।
देहीं, वचनीं, हृदयीं रात्रन्दिन राम हा जिच्या विलसे ॥ १३६ ॥
प्रमदोद्यानीं बसली अशोकतरुतलिं सशोक ही सीता ।
स्वर्गभ्रष्टरमेसम जनकाची वाटली जना दुहिता ॥ १३७ ॥
नानाभूषणवस्त्रें दासी घेऊन मधुरवाणीनें ।
प्रार्थिति तियेस परि नच ढुंकूनहि पाहिलें तिनें नयनें ॥ १३८ ॥
नर्तन, गायन-वादन अमृतासम मधुर-वचनधारांहीं ।
वश करण्या क्षम झाल्या नच दासी विफलता तया येई ॥ १३९ ॥
तो अनुरागी रावण दूती सीतेकडे पुनः प्रेषी ।
स्मरपीडित नर बनतो अविवेकी बोलतात जैनर्षि ॥ १४० ॥
अनुरक्त असे रावण पात्र न तो होय गे अवज्ञेस ।
हो तूं प्रसन्न त्यावरि ऐसें तूं बोल दूति ! सीतेस ॥ १४१ ॥
गेली दूती वदली अनुकूल करावयास जें वचन ।
साफल्य न ये तिजला येउनि केलें तिनें असें कथन ॥ १४२ ॥
आहार न ती घेतें प्राशन करि थेंबभरहि नच पाणी ।
मी रावणास वरितें तद्वदनांतुनि निघेल कां वाणी ॥ १४३ ॥
ती बोलते न शब्दहि बसली कर-चरण हालवी नच ती ।
शोकांत चूर होउनि डोळे उघडून पाहि नच सुदती ॥ १४४ ॥
मधुर सुगंधित अन्नें अमृताहुनि वाढलीं जरी ताटीं ।
स्पर्शहि त्यां नच करि ती साध्वी रामास पाहि हृदयतटीं ॥ १४५ ॥

[ सीता वश होणें शक्यच नाहीं असें दूतीनें सांगितलेलें ऐकून रावण खिन्न होऊन विमनस्कतेनें वेड्यासारखें वागूं लागला.]

यापरि दूतीवचना ऐकुनि चिन्तेंत जाहला चूर ।
उष्णश्वासा टाकी रावण नुमजे उपाय साचार ॥ १४६ ॥
उठला शून्यमनानें पुनरपि जाऊन आसनीं वसला ।
चालू लागे पाहुनि कोणाला परत येइ सदनाला ॥ १४७ ॥
सोंड जसा फिरवी गज रावण अपुल्या करास फिरवून ।
निःशङ्क आपटुनि त्या कम्पित करि कोपयुक्त होऊन ॥ १४८ ॥
हृदयांत विंचलेल्या सीतेला स्मरुनि दैव पौरुषही ।
विफलचि झालें समजुनि अश्रूंनीं सिञ्चिली स्वसौधमही ॥ १४९ ॥
बोलावी कोणा तरीं आलों मी कार्य काय सांगावें ।
ऐसें विचारिल्यावर मौन धरी वा तयास रागावें ॥ १५० ॥
सीता सीता ऐसें बोले मुख वर करून दशकण्ठ ।
येईल असें मानुन बघे तया तो दिशेस सोत्कण्ठ ॥ १५१ ॥
हृदयीं धरून कमला पुनरपि फेकून देतसे त्यास ।
शृङ्गार करुनि बैसे मुख तो वरि करुनि पाहि गगनास ॥ १५२ ॥
हस्तें, छाती बडवी बाहुशिरोभाग तो पुनः बघतो ।
देउनि हुंकारातें शय्या त्यागुनि पुनःहि सेवी तो ॥ १५३ ॥
हातें हाता स्पर्शी ताडन करितो पुनः जमीनीस ।
दीर्घश्वासें कृष्णा पाही अधरास मानिना ईश ॥ १५४ ॥
यापरि सावध होउनि कशी अवस्था मला अशी आली ।
माझें शरीर देखिल धारण करण्यास मी नसेचि बलि[1] ॥ १५५ ॥
दुर्ग नि सागरवासी समस्त विद्याधरादि-भूपास ।
समरांत जिंकिलें मी मुळींच नच वाटला महायास ॥ १५६ ॥
परि मम उपाय थकले, बुद्धि न चाले, प्रलोभनें[2] विफल ।
गलपाशासम सीता घेइल मत्प्राण वाटतें सकल ॥ १५७ ॥
वस्त्राच्या पदरानें घाली वारा स्वकीय हृदयास ।
पुष्पें रचून आकृति पुनरपि तो नेइ शीघ्र विलयास ॥ १५८ ॥
काढुनि तो फलकावरि मनोरमाकृति बघे प्रसन्नमनें ।
डोळ्यांत अश्रु येतां वश हो सीते ! असे म्हणे वदनें ॥ १५९ ॥

---

१ समर्थ.   २ लालूच दाखविणें.

विनय कितीही करितो प्रसन्न मजवरि न कां वरें होशी ।
पुरवीन चन्द्रवदने ! सीते ! मी विविधशा तुझ्या हौशी ॥ १६० ॥

[ सचिवांनों, आतां राजा रावणाच्या हितासाठीं ही लंकानगरी शत्रूला दुष्प्रवेश्य होईल अशी शस्त्रादिकांनीं व यंत्रादिकांनीं सज्ज करा असा बिभीषणाचा आदेश. ]

यापरि चिन्तन असतां करीत रावण बिभीषणें कथिलें ।
सचिवांनो भूपहितासाठीं सदुपाय पाहिजे केलें ॥ १६१ ॥
भाषण बिभीषणाचें ऐकुनि संभिन्नमति वदे चतुर ।
काय वदावें आम्ही कार्याचा नाश जाहला फार ॥ १६२ ॥
श्रीदशवदनप्रभुचा उजवा जणु हात दैवयोगानें ।
तोडून टाकिला तो खरदूषण सूर्यहासखड्गानें ॥ १६३ ॥
नाम विराधित ज्याचे जो कोल्ह्यासारखा दिसे क्षुद्र ।
सिंहासमान बनला विद्याधर शत्रुनाशनीं रुद्र[१] ॥ १६४ ॥
शुभकर्माच्या उदयें समरीं साहाय्य लक्ष्मणास करी ।
हा खग वन्य विराधित असून कोल्ह्यासमान होय हरि[२] ॥ १६५ ॥
चिह्न ध्वजीं कपीचें ज्यांच्या बलवन्त विपुल खगवीर ।
या समरीं वश झाले पाहुनि लक्ष्मीधरास बहु शूर ॥ १६६ ॥
कोमल सर्प शरीरीं हृदयीं दारुण अशा विपास धरी ।
अनुकूल बाह्यरूपें अन्तरिं हे रावणास होति अरि ॥ १६७ ॥
कपिमुकुटधारकांचा नेता पति जो अनङ्गकुसुमेचा ।
वायुसुतें[३] त्या धरिला गमला सुग्रीव पक्ष ज्या साचा ॥ १६८ ॥
पञ्चमुखानें म्हटलें अनादरस्मित करून नन्तर हें ।
खरदूषणवृत्ताचें कथन न उपयोगी वा असे पाहे ॥ १६९ ॥
या वृत्तान्तश्रवणें कोणा नच भीति अयश वा कोणा ।
ऐसीच गति तयांची जे असती शूर समरिं मृति त्यांना ॥ १७० ॥
वातें जलकण कांहीं हरिले सागरिं उणेपणा काय ।
रावणभुजांत बहु बल दूषणनाशें न अल्प तें होय ॥ १७१ ॥
ऐसा विचार करणें हास्यास्पद सर्वथा मला वाटे ।
रावण कोठें सांगा लक्ष्मण आदिक नि वन्यजन[४] कोठें ॥ १७२ ॥

१ भयंकर. २ सिंह. ३ मारुतीनें. ४ वनांत राहणारे.

तो सूर्यह्रासधारी असेल लक्ष्मण इथें न उपयोगी ।
कोण विराधित तृणसम त्याविषयीं आमुचें न मन रोगी ॥ १७३ ॥
सिंहाधिष्ठित-काननिं झाला जो प्रगट अग्नि शैलास ।
जाळी न काय त्याच्या दुःसह होऊन तुङ्ग अङ्गास ॥ १७४ ॥
आहे नांव जयाचें सहस्रमति सचिव तो असें वदला ।
पोकळ अभिमानाचें भाषण उपयुक्त या नसे काळां ॥ १७५ ॥
स्वामिहिताची इच्छा ज्याच्या हृदयांत सतत वास करी ।
त्यानें निरर्थ भाषण करूं नये तें न अहितसंहारी[2] ॥ १७६ ॥
हा क्षुद्र शत्रु आहे म्हणुनि अवज्ञा कधींहि न[1] करावी ।
अनलकण[3] काल मिळतां जाळील जगास हें मनीं ध्यावीं ॥ १७७ ॥
सेना विशाल होती अश्वग्रीवासमीप हें ख्यात[4] ।
परि तुच्छशा त्रिपृष्ठें केला समराङ्गणांत तद्घात ॥ १७८ ॥
यास्तव विलंब न करा दुर्गम लङ्का कराचि चतुरांहीं ।
वसवून घोर यन्त्रें तुङ्ग तटावरि करा सुरक्ष्या[5] ही ॥ १७९ ॥

[ स्वदेशांतील लोकावर प्रजेप्रमाणें प्रेम ठेवा. सीतेचें चांगलें रक्षण करा. सुग्रीवादिकावर प्रेम दाखवून बाहेरच्या रक्षणकार्यांत लक्ष योजा. अशारीतीनें व्यवस्था ठेविली म्हणजे सीतेचा शोध रामास लागणार नाहीं. त्यामुळें तो प्राण सोडील. लक्ष्मणाचीही तीच अवस्था होईल. यानंतर विराधितादिकांचा नाश करणें सहज शक्य होईल असा सचिवांना बिभीषणाचा सल्ला. ]

देशांतिल लोकांचा आदरसत्कार चांगला ठेवा ।
स्वजनासमान वागुनि मिळवा विश्वासवृद्धिचा ठेवा ॥ १८० ॥
हितकर सर्वोपायें प्रजाजनांच्या करा सुरक्षेस ।
राजा रावण जेणें राहील सुखांत सतत सविशेष ॥ १८१ ॥
मधुरप्रिय भाषांनीं दानें सीतामनास ठेवावें ।
सन्तुष्ट जेवि दुग्धें प्रसन्नशी अहिवधूस[6] राखावें ॥ १८२ ॥
सुग्रीवादि-खगांच्या वीरगणा रक्षणादि-कार्यांत ।
लंकानगराबाहिर योजावें प्रेम दर्शवुनि सतत ॥ १८३ ॥

---

१ प्रेमयुक्त. २ अहिताचा-दुःखाचा नाश करणारा. ३ अग्नीचा कण. ४ प्रसिद्ध. ५ उत्तमरीतीनें रक्षण्यास योग्य. ६ सर्पिणीस.

ऐसें करितां त्यांना समजेल न भेद ते स्वकार्यांत ।
तत्पर राहुनि करितिल दशाननीं प्रेम आपुलें व्यक्त ॥ १८४ ॥
यापरि झाली असतां दुर्गमता सर्वराजधानींत ।
जाणील कोण सीता येथें अन्यत्र वा असें व्यक्त ॥ १८५ ॥
लाभ तिचा न च होतां सोडील प्राण निश्चयें राम ।
लक्ष्मणही तन्मरणें अवश्य सेवील कां न यमधाम ॥ १८६ ॥
दीप प्रकाश यांची संगति जैशी अभिन्न-रूपाची ।
लक्ष्मण नि राम यांच्या प्रेमांत असे अभेदता साची ॥ १८७ ॥
यास्तव रामविनाशें होईल विनाश लक्ष्मणाचाही ।
अगतिक होउनि रावणचरणा जाईल शरण वैदेही ॥ १८८ ॥
अपराधसागरामधिं मग्न विराधित करील मग काय ? ।
रावण तेव्हां त्याचा हरील युद्धांत निश्चयें काय ॥ १८९ ॥
सुग्रीव कोण खोटा कोण खरा संशयास उपजवि जें ।
हरण कराया रावण मायेचें कार्य तेधवाचि सजे ॥ १९० ॥
यास्तव लंकानगरी दुर्गम केल्यास सर्व शत्रुगणा ।
रावण समर्थ होइल जिंकाया नच करील तो करुणा ॥ १९१ ॥
यापरि विचार हृदयीं करून बुधगण मनांत मोदून ।
गेले स्वकीयसदनीं कर्तव्यविनिश्चयास ठरवून ॥ १९२ ॥
नन्तर विभीषणानें नगरी-तट यन्त्रसाधनें केला ।
दुर्गम-तर विद्यांनीं तेणें तद्धृदयिं तोष वहु झाला ॥ १९३ ॥
केली कृति चतुरांनीं जिनवाक्या अप्रमाण मानून ।
ती सफल होत नाहीं केला जरि तींत विपुलसा यत्न ॥ १९४ ॥
दैवें विरहित पौरुष इष्टप्राप्तीस हेतु नच होतें ।
यास्तव सदैव पौरुष कार्याचा हेतु वदति विज्ञाते ॥ १९५ ॥
अशुभ असा कर्मोदय येतां हितवचन मानवा न रुचे ।
विपरीत बुद्धि होते जिनवाक्य मना न वाटतें साचें ॥ १९६ ॥
श्रद्धा जिनेशवचनीं ठेवा तत्पादपङ्कजा सेवा ।
व्हा जिनदास मनानें लाभेल तुम्हास आत्मसुखमेवा ॥ १९७ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे मायाप्राकाराभिधानं नाम षट्चत्वारिंशत्तमं पर्व ॥ ४६ ॥

# सत्तेचाळीसाव्या पर्वांतील कथेचा सारांश.

सुतारेच्या विरहामुळें दुःखी झालेला सुग्रीव दण्डकारण्यांत फिरत आला. तेथें खरदूषण व त्याच्या सैन्याबरोबर लक्ष्मणाचें युद्ध झालें होतें. जिकडे तिकडे प्रेतें पडलीं होती. कांहीं राजांची प्रेतें जळत होतीं व त्यांचे आप्त-नातलग शोक करीत होते. येथें युद्ध कां झालें असें सुग्रीवानें एका मनुष्याला विचारलें तेव्हां त्यानें याप्रमाणें युद्धाची हकीकत सांगितली.—

सीतेला रावण हरण करून नेत असतां जटायु पक्ष्यानें कोपानें त्याला अडथळा केला. त्याचें वक्षःस्थल त्यानें नखांनीं ओरबडलें. त्यामुळें रागावून रावणानें हाताचा फटका मारून त्याला जमिनीवर पाडलें. त्यामुळें तो मरण पावला. इकडे युद्धांत खरदूषणाला लक्ष्मणानें सूर्यहास खड्गानें ठार मारिलें व इतर योद्धेही मरण पावले.

खरदूषणाची मृत्यूची वार्ता समजल्यावर सुग्रीव चिन्ताक्रान्त झाला. "मी याला माझ्या दुःखाची वार्ता सांगून याच्या साहाय्यानें दुःखमुक्त होईन असा विचार केला होता, पण तो मरण पावल्यामुळें माझी ही इच्छा धुळीस मिळाली. मी पवनंजयपुत्र मारुतीकडे जाऊन त्याला माझें दुःख सांगेन पण वारंवार त्याच्याकडे जाण्यानें आदर राहात नाहीं म्हणून तिकडे जावेसें वाटत नाहीं."

"रावणाकडे जावून मला माझें रूप धारण करणाऱ्याकडून जें दुःख झालें आहे तें सांगून शत्रूचा काटा त्याच्याकडून काढून टाकावा असें वाटतें. पण पुनः भीति अशी वाटते कीं, खऱ्या-खोट्याचा निर्णय न झाल्यामुळें आम्हा दोघांनाही तो रावण ठार मारील. यास्तव तिकडे जाणेंहि रहित करून ज्यानें खरदूषणाचा नाश केला त्याच्याकडेच जाऊन आपलें दुःख मांडावें. म्हणजे तो माझ्या दुःखाचा नाश करून मला सुखी करील" असा विचार करून सुग्रीवानें एक दूत विराधिताकडे पाठविला. विराधिताला दूतानें तत्काल त्याचा अभिप्राय कळविला तो ऐकून विराधितानें त्याच्या स्वागतार्थ वाद्यें वाजविलीं. लक्ष्मणानें वाद्यें वाजविण्याचें कारण विराधिताला विचारिलें तेव्हां त्यानें याप्रमाणें लक्ष्मणाला सांगितलें:— कपिध्वजांचा राजा सुग्रीव भेटण्यासाठीं आला आहे. त्याच्याबरोबर मोठें सैन्य व रथ आहेत. सूर्यरजा या राजाला वाली व सुग्रीव असे दोन पुत्र. वाली अतिशय शौर्यशाली होता.

त्यानें कधींही रावणाला नमस्कार केला नाहीं. जेव्हां त्याला वैराग्य झालें तेव्हां त्यानें आपल्या धाकट्या भावाला राज्य दिलें व आपल्या पुत्राला– चन्द्ररश्मीला युवराजपद दिलें व तो स्वतः दीक्षा घेऊन कर्मक्षय करून मुक्त झाला.

सुग्रीव किष्किन्धा-नगरींत राज्य करीत आहे. त्याच्या राणीचें नांव सुतारा. या उभयतांना दोन पुत्र अंगद व अङ्ग. याप्रमाणें कथा सांगत असतां तेथें सुग्रीव कांहीं वृद्धजनासह आला. रामचंद्र व लक्ष्मण हे त्याला आदरानें भेटले. वृद्धांनीं रामचंद्रांना सुग्रीवाची हकीकत याप्रमाणें सांगितली:– "हे पद्मराजा, हा सुग्रीव किष्किन्धा नगरीचा गुणी व ऐश्वर्यशाली राजा आहे. पण याला एका दुष्ट विद्याधरानें संकटांत पाडलें आहे. त्यानें सुग्रीवाच्या पत्नीचा मनांत अभिलाष धारण करून वैताली विद्या साधली. त्यामुळें त्याला हुबेहूब सुग्रीवाचें रूप धारण करता येतें. तसें रूप धारण करून सुग्रीव जेव्हां राजधानींत नव्हता तेव्हां आला व अन्तःपुरांत शिरला. त्यावेळीं सुतारा राणीनें त्याला माझ्या पतीची आकृति धरणारा हा तोतया आहे असें जाणिलें. व तिनें सर्वांना हा खरा सुग्रीव नाहीं असें सांगितलेंही. पण तिच्या वचनावर कोणी विश्वास ठेवला नाहीं. इतक्यांत खरा सुग्रीव तेथें आला. त्यानें तोतयाला तूं येथें कां आला आहेस? येथून चालता हो असें म्हटलें. तोतयानेंही तसेंच उत्तर दिलें. प्रधान वगैरे मंडळींनाही खऱ्या-खोट्याचा निर्णय करतां येईना त्यामुळें कांहीं खऱ्या सुग्रीवाकडे झाले व कांहींनीं खोट्या सुग्रीवाची बाजू धरली. सुग्रीवाच्या अंगदपुत्रानें सुग्रीवाची बाजू घेतली. अङ्गानें खोट्या सुग्रीवाची बाजू. किष्किन्धानगरीचा उत्तर भाग खऱ्या सुग्रीवाच्या ताब्यांत व नगरीचा दक्षिण भाग तोतयाच्या ताब्यांत. निम्में सैन्य खऱ्याच्या बाजूला व निम्में खोट्याच्या बाजूला. सुतारा राणीच्या महालांत दोघांनाही प्रवेश करण्याची बन्दी झाली व ही जबाबदारी चन्द्ररश्मीनें आपल्या शिरावर घेतली."

"हे पद्मराजा, या खऱ्या सुग्रीवाविषयींही आमच्या मनांत संशय. पण सुतारा-राणीसाहेबांच्या वचनाला अनुसरून आम्ही याचा पक्ष अंगीकारिला आहे. हे पद्मराजा, माझें संकट रामचन्द्र दूर करतील असें वाटून हा आपणास शरण आला आहे. यास्तव आपण याचें संकट दूर करावें." असें बोलून ते वृद्ध जेव्हां स्वस्थ बसले तेव्हां रामचन्द्र– 'हा माझ्यासारखाच दुःखी आहे असा मनांत विचार करूं लागले. व त्याला म्हणाले– मित्रा सुग्रीवा, मी तुझें दुःख दूर करून तुला सुखी करीन. तूं खरा सुग्रीव किंवा खोटा सुग्रीव असशील तरी मी तुला मित्र मानून तुझें गेलेलें पद तुला पुनः मिळवून देईन. असें मी तुला वचन देतो. अर्थात् तुझ्या शत्रूला मारून मी

तुला तुझें राज्य व सुतारेची प्राप्ति करून देईन. आणि तूंही मला प्राणाहूनही अधिक प्रिय असलेल्या पत्नीची प्राप्ति करून देईन अशी जिनसाक्षीनें प्रतिज्ञा कर असें रामचन्द्र म्हणाले. तेव्हां सुग्रीवानें म्हटलें कीं,– प्रभो मी आपल्या प्रियपत्नींची वार्ता सात दिवसांत जर कळवू शकलों नाहीं तर अग्नींत प्रवेश करून मरून जाईन. अशी सुग्रीवानें प्रतिज्ञा केली. आम्ही दोघेंही परस्परावर स्नेह करून द्रोह करणार नाहीं. असा जिनमंदिरांत त्या उभयतांनीं निश्चय प्रगट केला.

यानंतर राम व लक्ष्मण रथारूढ होऊन सुग्रीवाबरोबर किष्किंधापुरास गेले. खऱ्या सुग्रीवानें खोट्या सुग्रीवाकडे युद्धासाठीं सज्ज होण्याकरितां दूत पाठविला. त्यानें त्याचें म्हणणें ऐकून घेऊन दूताला हाकालून दिलें.

नंतर खोटा सुग्रीव विशाल सेनेसह लढावयाला आला. दोन्हीं सैन्यें लढलीं. दोन्ही बाजूचे बरेच सैनिक मरण पावले. दोघा सुग्रीवांचेंही युद्ध झालें. खोट्या सुग्रीवानें खऱ्या सुग्रीवाच्या डोक्यावर गदाघात केला त्यामुळें खरा सुग्रीव मूर्च्छित होऊन पडला. सुग्रीव मेला असें समजून खोटा सुग्रीव आनंदानें स्वस्थानीं गेला. खऱ्या सुग्रीवाला त्याच्या मित्रांनीं शिबिरांत आणून शीतलजलादिकांनीं सावध केलें.

सावध झाल्यावर खऱ्या सुग्रीवानें रामचन्द्राला विचारलें– प्रभो, आपण त्या खोट्या सुग्रीवाला कां सोडून दिलें? रामचन्द्र म्हणाले– मित्रा, तुम्ही दोघे लढत असतां मला विशेषता दिसली नाहीं. त्यामुळें मी त्याला मारूं शकलों नाहीं. आतां पुनः आम्ही त्याला बोलावतो असें म्हणून त्यांनीं त्याला बोलाविलें. तोही आतां मी सुतारेस अवश्य मिळवीन म्हणून आनन्दानें आला. लक्ष्मणानें त्याला आलिङ्गून दृढ धरलें. रामचन्द्र त्याच्याजवळ गेले. तत्काल वैतालिकी विद्येनें त्याला सोडून तेथून प्रयाण केलें. तो विद्याधर आपल्या स्वरूपांत प्रगट झाला. त्याचें साहसगति हें नांव होतें. सर्व वानरध्वज राजे रागावून त्याच्याबरोबर लढू लागले. पण त्यानें खूप पराक्रम गाजवून त्यांना पळविलें व रामचन्द्रावर तो धांवला. रामचन्द्र सावध होतेच त्यानीं त्याच्यावर खूप बाणवृष्टि करून त्याचें शरीर चाळणीसारखें केलें. शेवटीं तो मरण पावला. सुग्रीवाच्या चन्द्रप्रभादिक तेरा मुली रामचन्द्राच्या गुणावर लुब्ध होऊन त्यांना वरण्यासाठीं आल्या पण रामचन्द्रांचें मन त्यांच्यावर आसक्त झालें नाहीं. पूर्वभवाचा संबंध नसला म्हणजे प्रेम उत्पन्न होत नसतें. असो. हे श्रेणिका, खोट्या सुग्रीवाची याप्रमाणें कथा तुला सांगितली.

# सत्तेचाळीसावें पर्व.

( युद्धकारणकथन. )

कान्ताविरहें दुःखित आला सुग्रीव त्या स्थलीं भ्रमत ।
होऊन युद्ध जेथें जिकडे तिकडे दिसे शवव्रात[1] ॥ १ ॥
कोठें मोडुनि पडले रथ गज जीवितविहीन झालेले ।
झालीं छिन्न शरीरें ज्यांचीं गतजीव वीरही दिसले ॥ २ ॥
कांहीं भूपालांचीं असलेलीं जळतशीं शवें दिसलीं ।
प्रिय माणसें तयांचीं शोकानें रडत तेथ बसलेलीं ॥ ३ ॥
जमले कोल्हे कांहीं प्रेतांच्या भोवतीं तया दिसले ।
कांहीं पक्षी तोडित लचके आहेत हेंहि पाहियलें ॥ ४ ॥
हात कुणाचा तुटला कोणाचा पाय पोट कोणाचे ।
मस्तक तसें कुणाचें दिसलें बीभत्स दृश्य हें साचें ॥ ५ ॥

( सुग्रीवाला युद्धाचें कारण कोणतें घडलें याविषयीं
एका मनुष्यानें हकीकत सांगितली. )

सुग्रीवानें पुसले प्रसंग येथें असा कसा घडला ।
तेव्हां कोणी मनुजें संक्षेपानें तया असा कथिला ॥ ६ ॥
सीतेस हरुनि रावण असतांना नेत विघ्न करि त्याला ।
कोपें जटायुपक्षी विदीर्ण त्याच्या करून हृदयतला ॥ ७ ॥
हातानें त्या फटका रावण मारून पाडि भूमितलां ।
दुःखें करून तळमळ मेला स्वर्गस्थ भोगि सुखलीला ॥ ८ ॥
समरीं मारी लक्ष्मण खरदूषणवरखगास खड्गानें ।
घडला प्रसङ्ग ऐसा कथिला तो जाण सावधानमनें ॥ ९ ॥
खरदूषणमरणाची वार्ता ऐकून जाहली चिन्ता ।
सुग्रीवाला वदला आतां लाभेल केवि मम कान्ता ॥ १० ॥
सांगून दुःख माझें या बलशालीस मुक्त होईन ।
हा आशाद्रुम माझा दुर्दैवकरीन्द्र हा ! करी भग्न ॥ ११ ॥

---

१ मढ्यांचा समूह.

मी अञ्जनासुताला जाउनि मद्दुःख सकल सांगेन ।
मद्रूपधारि-रिपुचें जेणें तो करिल शीघ्र निर्दलन ॥ १२ ॥
करिती प्रयत्न नच जे त्यांना सुखलाभ केंवि होईल ।
दुःखविनाशनकार्यीं बुध वदती मन्त्र हा असे मूल ॥ १३ ॥
वारंवार तयाला जाउनि मी भेटणें नसे उचित ।
करिल अनादर माझा म्हणून भयभीत होय मच्चित्त ॥ १४ ॥
नवचन्द्र वन्द्य होतो प्रतिदिवशीचा न वन्द्य तो होय ।
सन्ततगमनागमनें पावे आदर मनांतला विलय ॥ १५ ॥
आहे महाबली जो नानाविद्याप्रवीण तेजस्वी ।
त्या शरण रावणा मी जाइन मम शान्तिलाभ हो भावी ॥ १६ ॥
अथवा विशेष तुमजुनि कोपें उभयास ठार मारील ।
जाणें शरण तयाला दुःखाचें वदति हेंहि बुध मूल ॥ १७ ॥
अपमान, दान, पुण्य, स्वशूरता, मन्त्र दोष दुर्मित्रा ।
सांगावेत न कधिंही कथितां नर होय दुःखखनि चित्रा ॥ १८ ॥

(सुग्रीवानें स्वदुःखनाशार्थ विराधिताकडे दूत पाठविला.)

खरदूषणास ज्यानें वधिलें समरांत शरण त्या जावें ।
तो शान्ति करिल माझी त्याचें साहाय्य या क्षणीं घ्यावें ॥ १९ ॥
सङ्कट समान ज्यांचें ज्यांच्या इच्छा समान आहेत ।
सद्भावना तयांच्या हृदयीं उत्पन्न शीघ्र होतात ॥ २० ॥
ऐसें मनांत चिन्तुनि पाठविला आदरें तयें दूत ।
गेला विराधिताला सुग्रीवागमन कळवि तो त्वरित ॥ २१ ॥
विस्मय विराधिताला वाटे सन्तोषही मनीं झाला ।
केला विचार त्यानें सेव्यहि सेवा करावया आला ॥ २२ ॥
अथवा महाजनांचा आश्रय लाभे जयास त्या पुरुषा ।
धन, सौख्य, मान मिळती पावे तो उत्तरोत्तरोत्कर्षा ॥ २३ ॥
दुन्दुभि आनन्दानें वाजविला स्वागतार्थ जैं त्यानें ।
लक्ष्मीधरें विराधित विचारिला रव किमर्थ हा करणें ॥ २४ ॥

(विराधित सुग्रीवाचा वृत्तान्त लक्ष्मणाला सांगतो.)

कथिलें नाथ असे हा कपिध्वजांचा पराक्रमी नाथ ।
प्रेमें भेटायास्तव आला घेउनि विशाल सैन्य रथ ॥ २५ ॥

सूर्यरजाचे वाली आणिक सुग्रीव पुत्र हे दोघे ।
ज्यांना अनन्यशरणा राज्यरमा प्रीतिनें सदैव वघे ॥ २६ ॥
वाली ज्येष्ठ भ्राता शीलें शौर्यादि-सद्गुणें शोभे ।
तो रावणा न नमला राही तन्मान-धन सदैव उभें ॥ २७ ॥
एके वेळीं झालें त्याला वैराग्य राज्य देऊन ।
सुग्रीवाला घेउनि जिनदीक्षा तो करी तपश्चरण ॥ २८ ॥
किष्किन्धानगरीमधिं राज्य करी सतत दक्ष राहून ।
ताराराणीमध्यें राही आसक्त विषयसुखमग्न ॥ २९ ॥
अङ्गद या उभयांना झाला सत्पुत्र सद्गुणें नटला ।
जिनधर्माराधकता याचा गुण सज्जना सदा पटला ॥ ३० ॥
यापरि सांगत असतां कथा विराधित तिथें प्रवेश करी ।
सुग्रीव तयें केला आदर त्याचा धरून विनय उरीं ॥ ३१ ॥
लक्ष्मीधरादिकांनीं आलिङ्गुनि त्यास परमहर्षभरें ।
अमृतोपमवचनांनीं तोषविलें तन्मना तदैव खरें ॥ ३२ ॥
वसले सुवर्णपीठावरि जेव्हां सर्व वृद्ध तैं वदले ।
हे पद्मभूप यांचें यथार्थ सुग्रीव नाम सुखद खुलें ॥ ३३ ॥

( वृद्धांनीं खऱ्या व तोतया सुग्रीवाची हकीकत सांगितली. )

किष्किन्धा-नगरीपति भोगी गुणवान्महाबली आहे ।
परि दुष्टखगें कोणीं संकटिं या पाडिलें असे पाहे ॥ ३४ ॥
आकृति याची घेउनि पुर, वल, राज्यासवें सुतारेस ।
घेऊ पाही दुर्मति मायावी लाज ज्यास नच रेस ॥ ३५ ॥
हें वचन पद्म ऐकुनि संमुख होउनि मनांत मानिति ते ।
माझ्यापेक्षां देखिल कष्टी वहु दुःख वाटतें यातें ॥ ३६ ॥
माझ्यासमान दुःखी आहे हा अधिक वा कमी गमतो ।
याचें दुःख करावें दूर कसें प्रश्न हा कसा सुटतो ॥ ३७ ॥
याला दुःख कसें हो झालें सम्प्राप्त हें मला वोला ।
सौमित्रिवचन ऐकुनि जाम्बूनद वोलला अशा वोला ॥ ३८ ॥
राजन् ! दारुणकामें नडला याचें स्वरूप घेऊन ।
मायावी खल शिरला अन्तःपुरिं पाप हृदयिं ठेऊन ॥ ३९ ॥

सचिवगणा हें न कळे स्वजनासहि मूढ जाहले सगळे ।
परि जाणिलें सुतारा-राणीनें म्हणुनि त्याकडे न वळे ॥ ४० ॥
ती स्वजनांना वदली सुग्रीवाकार दुष्ट नर आहे ।
पापें मनांत भरला लक्षण याचें न चांगलें पाहे ॥ ४१ ॥
याचा आदर कोणी करूं नका या वसा असें न म्हणा ।
निर्णय होय न जोंवरि तोंवरि याला खरा असें न गणा ॥ ४२ ॥
निःशङ्क नि गम्भीर नि लीलेनें सहित तोतया शिरला ।
सुग्रीवासम जाउनि त्याच्या सिंहासनावरी बसला ॥ ४३ ॥
वालिनृपानुज आला नन्तर सुग्रीव जेधवां तेथें ।
दिसले स्वजन नि परिजन दुःखानें खिन्नवदन झाले ते ॥ ४४ ॥
हे अमुचे जन सगळे दिसती सर्वत्र खिन्नमुख[1] काय ।
ऐशी स्थिति कां दिसते कां यांचें दग्ध जाहलें हृदय ॥ ४५ ॥
मेरुजिनमन्दिरांना अंगद वन्दावयास गेलेला ।
आला नाहीं लौकर म्हणून चिन्तेंत काय जन पडला ॥ ४६ ॥
किंवा कोणावरती देवी रागावली सुतारा कां ? ।
तेणें सर्वजनांच्या मनांत उत्पन्न होय कां शंका ॥ ४७ ॥
यापरि विचार चित्तीं करून लङ्घुनि अनेक सुद्वारें ।
सौध-प्रवेश करितां पाही स्वसमान नर तिथें विहरे ॥ ४८ ॥
जो दिव्यहारवस्त्रा धारण करि वदन-कमल फुललेलें ।
पाहून त्यास वदला कां तूं आगमन या स्थलीं केलें ॥ ४९ ॥
सुग्रीव तो तयांही[2] रागावुनि त्यासवें करी समर ।
श्रीचन्द्रादिक मन्त्री रोधिति बोलून करुनि हात वर ॥ ५० ॥
वदली तदा सुतारा देहें वचनें बलें समान दिसे ।
हा पुरुष सौध-कलशादिक चिन्हें रहित पति न मम विलसे ॥ ५१ ॥
माझ्या पतिच्या ठायीं सुलक्षणें जीं न तीं इथें दिसतीं ।
घोडा आणिक गाढव यामध्यें आढळेल साम्य किती ॥ ५२ ॥
ऐकुनि तारावचनें तथापि ते त्यास नैव ओळखिती ।
भेद तयांना नुमजे मनास त्यांच्या पडे तदा भ्रान्ति ॥ ५३ ॥

---

१ म्लानमुखाचे.   २ नकली.

मंत्री सर्वचि जमले मतिशाली संशयांत ते पडले ।
वचन सुतारा राणी सांगे परि त्या तयें न मानियलें ॥ ५४ ॥
मद्यप, वेश्या, व्यसनी, बालक अतिवृद्ध तेवि नारीचें ।
वचन प्रमाण वदति न तें विश्वासार्ह केवि हो साचें ॥ ५५ ॥
( मनुष्यानें गोत्रशुद्धि राहण्यासाठीं अंतःपुराचें– स्त्रीचें रक्षण करावें. )
अतिशय दुर्लभ लोकीं गोत्राची शुद्धि मानिती सुजन ।
ती जर नसेल सुन्दर राज्याचेंही कुणा प्रयोजन न ॥ ५६ ॥
शीलादिसुगुण-भूपित निर्मल मिळवून गोत्र मनुजानें ।
अन्तःपुररक्षण हें करणें कर्तव्य खचित एकमनें ॥ ५७ ॥
यापरि अन्तःपुर जे रक्षिति अपकीर्ति न प्रवेश करी ।
या उभयांना भिन्नस्थानीं ठेऊन सर्व दोष हरी ॥ ५८ ॥
कृत्रिम सुग्रीवाला भ्रान्तीनें जनक अङ्गसुत-मानी ।
अङ्गद-सुत सत्याला जननीवचनें प्रमाणता आणी ॥ ५९ ॥
संशय आम्हा वाटे निजनाथाविषयिं जरि असें आहे ।
देवीच्या वचनानें आश्रयिलें यास वचन अमुचें हें ॥ ६० ॥
एकेकाला लाभे सुसैन्य अक्षौहिणी नृपा सात ।
परि आम्हां नच निर्णय हें सारें संशयांतलें वृत्त ॥ ६१ ॥
पुर-दक्षिणभागामधिं कृत्रिम सुग्रीव राहिला आहे ।
सुग्रीव सत्य उत्तरभागीं हा स्थापिला असे पाहे ॥ ६२ ॥
ऐशा समयीं केली वालिसुतें चन्द्ररश्मिनें थोर ।
संरक्षणप्रतिज्ञा नगरा तो पाळितो महाचतुर ॥ ६३ ॥
जाईल जो सुताराभुवनीं यांतून कोणताहि जरी ।
मारीन त्यास खड्गें सुनिश्चयें त्यास घेउनि स्वकरीं ॥ ६४ ॥
सुग्रीव असे दोघे राणीचा तीव्रविरह होऊन ।
दुःखीं निमग्न झाले निर्णय आम्हास देव सुचला न ॥ ६५ ॥
खरदूषणाकडेही गेला सुग्रीव सत्य वहु वेळां ।
पति तो राघवराजन् ! दुःख तयाचें न लवहि हरु शकला ॥ ६६ ॥
पवनञ्जयसुत-मारुतिकडेहि जाऊन सत्य सुग्रीवें ।
सांगितला वहु वेळां स्वदुःख-वृत्तान्त जीवलगभावें ॥ ६७ ॥

---

१ विश्वास ठेवण्यास योग्य.

दु:खित मी बहु झालों प्रसन्न होऊन बान्धवा रक्षी ।
घेऊन रूप माझें मायावी दु:ख देइ मज लक्षी ॥ ६८ ॥
तद्दु:ख वारण्यास्तव किष्किन्धपुरास वातसुत गेला ।
सादृश्य बघुनि उभयीं तोही संशीतिसागरीं पडला ॥ ६९ ॥
उभयांतील न जाणें विशेषता कोणत्यास मी मारूं ।
जरि सत्यनाश झाला कैसें मी पापसागरास तरूं ॥ ७० ॥
करुनि विचार असा मनिं सत्याच्या निर्णया न तो गेला ।
औदास्यभाव ठेवुनि तो मारुततनय नैजपुरिं आला ॥ ७१ ॥
मारुति निघून गेला स्वगृहा सुग्रीव जाहला दु:खी ।
होऊन नष्ट सङ्कट चिन्ती होईन वा न काय सुखी ॥ ७२ ॥
कान्ता-वियोग-सागरिं बुडतो सुग्रीव देइ तूं हात ।
हे रघुनन्दन रामा ना तरि राहील हा न देहांत ॥ ७३ ॥
आहेस परमवत्सल म्हणून हा नाथ शरण तुज आला ।
परदु:खनाशनार्थचि धारण करितात सन्त देहाला ॥ ७४ ॥
राघव हृदयीं चिन्ती दु:खी माझ्यासमान हाहि असे ।
यास्तव मित्र असे मम समशील-व्यसनिं मित्रता विलसे ॥ ७५ ॥
प्रत्युपकार कराया समर्थ सुग्रीव जरि न होईल ।
हा श्रमण राम होउनि मुक्तिरमेला अवश्य साधील ॥ ७६ ॥

( रामचंद्र व सुग्रीव एकमेकाचें कार्य सिद्ध करूं अशी
जिनमंदिरांत जिनेशसाक्षीनें शपथ घेतात. )

यापरि चिन्तुनि रामें सुग्रीवाला तयें दिलें वचन ।
देईन पद तुझें मी शीघ्रचि होऊ नकोस मनिं खिन्न ॥ ७७ ॥
सुग्रीव खरा-खोटा जो तूं असशील मित्र मानून ।
त्वत्तुल्याचें देइन जिंकुनि त्या स्वपद घे असें वचन ॥ ७८ ॥
देईन सुतारेसह राज्य तुला तव अरीस मारून ।
होउनि आनन्दित मग राज्यरमा भोग हो नि सुखमग्न ॥ ७९ ॥
प्राणापेक्षाहि प्रिय सुगुणी सीता मला प्रयत्नानें ।
मिळवुनि देईन अशी करी प्रतिज्ञा जिनेशसाक्षीनें ॥ ८० ॥

---

१ पाहा. २ स्वतःच्या नगरांत.

वार्ता तव प्रियेची दिनसप्तकिं मी जरी न मिळवीन ।
करुनि प्रवेश अनलीं रामा मी खचित भस्म होईन ॥ ८१ ॥
ऐशा वचनश्रवणें रामाच्या परममोद मनिं झाला ।
जैशी शशाङ्ककिरणें प्रफुल्लता येइ कमलवृन्दाला ॥ ८२ ॥
आम्ही परस्परांचा न द्रोह करूं तथा महास्नेहें ।
वागूं श्रीजिनगेहीं निश्चय केला तदा तयें पाहे ॥ ८३ ॥
नन्तर उभय रथावरि होउनि आरूढ राम-लक्ष्मण हे ।
सुग्रीवासह गेले सेविति सामन्तवृन्द ज्या पाहे ॥ ८४ ॥
नगरासमीप जाउनि पाठविला दूत सत्य सुग्रीवें ।
जाऊन तो तयाला वदला युद्धार्थ सज्ज तूं व्हावें ॥ ८५ ॥
ऐकुनि वचन तयाचें तेथून दिलें तयें हकालून ।
आला सुग्रीवाला तेणें कथिलें तदीय नीचपण ॥ ८६ ॥
( किष्किन्धा नगरीजवळ प्रयाण, दूत पाठविणें व दोघा सुग्रीवांचें युद्ध.)
खोटा सुग्रीव रथीं वसून घेउनि विशाल सेनेस ।
युद्धार्थ कुपित आला धरुनि सुताराभिलाष सविशेष ॥ ८७ ॥
दोन्हीं सैन्यें लढलीं गेले वहु वीर लढुनि परलोकीं ।
सुग्रीव उभय लढले कुतुकें[1] तद्युद्ध अमर अवलोकीं ॥ ८८ ॥
तरवार, चक्र, वाणें प्रहार ते करुनि वीर वहु लढले ।
शस्त्रान्धकार केला तिळमात्रहि ते परन्तु न श्रमले ॥ ८९ ॥
खोट्या सुग्रीवानें केला कोपें त्वरें गदाघात ।
सुग्रीवाच्या मस्तकिं मेला समजून जाय नगरांत ॥ ९० ॥
मूर्च्छित होउनि पडल्या सुग्रीवाला तदीयमित्रांनीं ।
केलें सावध आणुनि निजशिबिरीं शीतलोपचारांनीं ॥ ९१ ॥
सावध होउनि वदला पडला असतां जिवन्त करिं चोर ।
नाथा ! सोडियला कां झाला तेणेंचि अधिक शिरजोर ॥ ९२ ॥
नाथा ! तुमचें मिळवुनि साहाय्यहि दुःख मम न हा ! मिटलें ।
दुर्दैव सबल माझें वायातें तीव्र दुःख मज सजलें ॥ ९३ ॥
श्रीरामचन्द्र वदले सुग्रीवा उभय जेधवा लढला ।
नच मज विशेष दिसला त्वत्सम मी त्यामुळें न मारियला ॥ ९४ ॥

---

१ कौतुकानें.

जिनमन्दिरांत तुजला मानियलें मित्र वाहुनी आण ।
आज्ञानानें घडला माझा अपराध हें मनीं आण ॥ ९५ ॥
बोलाविला पुनः ही श्रीरामें तोतया लढायास ।
आला मानी स्वमनीं प्रियेस मिळवीन मी स्वतारेस ॥ ९६ ॥

( खोट्या सुग्रीवाजवळ रामचंद्र गेल्यावर त्याच्या वैताली विद्येनें त्याला सोडलें तेव्हां तो साहसगति नामक विद्याधररूपांत प्रगट झाला. तेव्हां रामानें त्याशीं युद्ध करून ठार मारिलें. )

दृढ आलिङ्गुनि त्याला स्वकरांनीं घट्ट लक्ष्मणें धरिलें ।
खोट्या सुग्रीवाला वधुनि श्रीराम जवळ जैं गेले ॥ ९७ ॥
सोडी तत्काल तया वैताली साधकास शीघ्र पळे ।
सुग्रीवाकृति-साहसगतिचें जें मूलरूप उद्भवलें ॥ ९८ ॥
साहसगतीस पाहुनि सर्व कपिध्वजनृपालगण खवळे ।
कोपें नानाशस्त्रें त्यासह लढण्यास सज्ज ते झाले ॥ ९९ ॥
त्या तेजस्विखगानें विशाल सामर्थ्य दाखवून तया ।
पळवून लाविलें झणि वात जसा उडवि वृक्षपर्णचया[1] ॥ १०० ॥
उद्धतविक्रम तो खग जोडुनि चापास बाण कोपानें ।
आला श्रीरामावरि परि ते होतेच सज्ज चापानें ॥ १०१ ॥
साहसगतिशीं झालें रामाचें समर दीर्घ घनघोर ।
नानाविधयुद्धांनीं प्रमोद रामास जाहला थोर ॥ १०२ ॥
चिररणलीला रामें करून त्यावरि सुतीव्र शर एक ।
फेकुनि चिलखत त्याचें तोडुनि छातींत पाडिलें भोंक ॥ १०३ ॥
यापरि साहसगतिच्या देहाची चाळणी तयें केली ।
खरतरशरवृष्टीनें शंसिति रामास सकल विबुधाली ॥ १०४ ॥
खल साहसगति पडला भूमिवरि प्राणरहित होऊन ।
आश्चर्यचकित-लोकें पाहियला शीघ्र समरिं जाऊन ॥ १०५ ॥
अत्यानन्द जहाला सुग्रीवा राम-लक्ष्मणा स्तविलें ।
वस्त्रालंकारांनीं केला सत्कार पूर्वपुण्य फळे ॥ १०६ ॥
कण्टक नष्ट जहाला नगरी सुन्दर करावयासाठीं ।
आज्ञापी पौरगणा सुगल[2] स्त्रीदर्शनास उत्कण्ठी ॥ १०७ ॥

---

१ झाडाच्या पानाच्या समूहाला.   २ सुग्रीव.

दिसली यदा सुतारा ठेवियलें प्राण सकल जणु तींत ।
अत्यन्त लुब्ध झाला रात्रन्दिन गुंग होय भोगांत ॥ १०८ ॥
श्रीराम-लक्ष्मणादिक भूपति बाहेर रात्र घालवुनी ।
दिवसां पुरीं प्रवेशुनि राहति आनन्दसुन्दरोद्यानीं ॥ १०९ ॥
तेथें जिनेन्द्रमन्दिरिं चन्द्रप्रभजिनवरास पूजून ।
श्रीराम-लक्ष्मणांनीं निवास केला तयास वन्दून ॥ ११० ॥
जिनमन्दिरबाह्यस्थलिं विराधितादिक अनेक-भूपांनीं ।
निजसैन्या स्थापियलें झाले श्रमरहित सकल काय मनीं ॥ १११ ॥
रामगुणस्तुति ऐकुनि वरण्याची मति मनांत ज्या झाली ।
सुग्रीव-सुता तेरा फुलले ज्यांच्या गुलाब जणु गालीं ॥ ११२ ॥
पद्मासमीप आल्या चन्द्राभादि स्वकीयपरिवारें ।
परिवार नमुनि वदला कन्या स्वीकारि नाथ हर्षभरें ॥ ११३ ॥
बसल्या विनम्र होउनि रामाच्या त्यासमीप सुगलसुता ।
लज्जाविनम्रवदना लावण्याच्या सुरम्य जणु सरिता ॥ ११४ ॥
परि राम-हृदय त्यांच्या ठायीं रममाण जाहलें नाहीं ।
सम्बन्ध पूर्वभविचा नसतां न प्रीतिजन्म केव्हांही ॥ ११५ ॥
यापरि भवपरिवर्ती जीवाच्या श्रेणिका दशा असती ।
जिनदासा मी तुजला कथिल्या त्या सर्व ठेवि तूं चित्तीं ॥ ११६ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे विटसुग्रीववधाख्यानं नाम सप्तचत्वारिंशत्तमं पर्व ॥ ४७ ॥

# अठ्ठेचाळीसाव्या पर्वांतील कथेचा सार.

सुग्रीवाच्या तेरा कन्या देवांगनाप्रमाणें सुंदर होत्या. त्यांनीं वीणावादन, गायन आदिकांनीं रामचंद्राच्या मनाला आनंदित करण्याचा प्रयत्न केला पण सीता विरहाचा विसर त्यांच्या मनाला बिलकुल झाला नाहीं. मुनि जसें सिद्धीचें चिन्तन करितात तसें रामचंद्र सीतेचें चिंतन करीत होते. सुंदर लता दिसली कीं, सीतेचें स्मरण त्यांना होत होतें. प्रफुल्ल फुलांत बसलेल्या भुंग्याला पाहून तिच्या डोळयांचें, मोराला पाहून तिच्या केशकलापाचें, अर्धचंद्र दिसला म्हणजे तिच्या सुंदर कपाळाचें व पुष्पगुच्छ पाहून तिच्या पुष्ट-स्तनांचें त्यांना स्मरण होत होतें. याप्रमाणें स्मरण करीत असतां सीतेचा शोध करावयास गेलेला सुग्रीव अद्यापि कां आला नाहीं? कां इतका त्यानें उशीर लावला आहे हें जाणून घ्यावें असें रामचन्द्रांना वाटलें. अतिशय व्याकुळ झाल्यामुळें त्यांच्या डोळयांत पाणी आलें. लक्ष्मणानें हें पाहिलें. त्याला सुग्रीवाविषयीं फार राग आला. त्यानें हातांत तरवार घेतली व तो धांवतच सुग्रीवाकडे जाऊन म्हणाला– "दुष्टा, तुझा मालक पत्नीविरहानें तळमळत आहे व तूं येथें पत्नीच्या सुखांत गुंग झाला आहेस. इतका निर्लज्ज कसा बनलास? जिनमंदिरांत 'जिनेश्वराच्या साक्षीनें मी आपल्या पत्नीचा सात दिवसांत शोध करीन व न करू शकलों तर अग्नीमध्यें पडून भस्म होईन अशी तूं प्रतिज्ञा केली होतीस. तिचें तुला विस्मरण झालें काय? माझ्या बंधूनें खोट्या सुग्रीवाचा जसा नाश केला तसा मी तुझा आतां नाश करितो." असें म्हणून जेव्हां लक्ष्मणानें तरवार म्यानांतून बाहेर काढली तेव्हां सुग्रीव म्हणाला– "प्रभो, हा अपराध माझ्याकडून घडला आहे. आपण मला क्षमा करावी. मी सीतामातेचा स्वतः शोध करावयास निघतों व माझ्या सर्व नोकरांनाही शोध करावयास पाठवितों" असें म्हणून त्यानें आपल्या सर्व नोकरांना बोलावून जलीं, स्थलीं, पातालीं, वन, पर्वत, गावें, शहरें, दुष्ट विद्याधरांचीं स्थानें वगैरे ठिकाणीं शोध करा म्हणून पाठविलें व स्वतःही शोध करण्यास निघाला.

येथें गौतमगणधरांनीं श्रेणिकाला म्हटलें कीं– श्रेणिका, लक्ष्मणानें सुग्रीवाला जशी त्याच्या प्रतिज्ञेची आठवण करून दिली तशीच यक्षदत्ताला त्याच्या मातेचें स्मरण करून देऊन एका मुनीश्वरांनीं त्याला कुशीलापासून रक्षिलें होतें. ती कथा प्रस्तुत प्रकरणीं उपयुक्त असल्यामुळें तुला सांगतों तूं ऐक असें म्हणून याप्रमाणें त्यांनीं सांगितली :–

क्रौंचपुरांत यक्ष नांवाचा राजा होता. राणीचें नांव राजिला होतें. या उभयांना यक्षदत्त नांवाचा पराक्रमी मुलगा होता. एके दिवशीं गांवाच्या एका दरिद्री विभागांत राजपुत्र फिरत गेला असतां त्याला एक सुंदर स्त्री दृष्टीस पडली. तिच्यावर त्याचें मन अनुरक्त झालें. तो रात्रीं तिच्याकडे जावयास निघाला असतां एका अवधिज्ञानी मुनींनीं तिच्याकडे जाणें योग्य नाहीं असें सांगितलें. इतक्यांत आकाशांत वीज चमकली व तिच्या प्रकाशांत त्याला मुनींचें दर्शन झालें.

मुनीकडे जाऊन राजपुत्रानें त्यांना वंदन केलें. व प्रभो, आपण मला कां निषेधिलें ? याचा खुलासा करावा. मुनि म्हणाले– राजपुत्रा, जिच्याकडे तूं जावयाला निघालास ती तुझी माता आहे असें समज. व ती माता कशी हें तुला सांगतों ऐक.

मृत्तिकावती नगरांत कनक नांवाचा व्यापारी होता. त्याच्या पत्नीचें नांव 'धू' व मुलाचें नांव 'बंधुदत्त' होतें. या बंधुदत्ताचा विवाह मित्रवती नामक कन्येशीं झाला. कालांतरानें मित्रवती गर्भवती झाली व तिचा नवरा बंधुदत्त व्यापारासाठीं परदेशीं निघून गेला. इकडे सासू व सासऱ्यानें तिच्याठिकाणीं गर्भाचीं चिन्हें पाहून ती व्यभिचारिणी आहे असें वाटल्यामुळें तिला हाकालून दिलें. ती उत्पलिका दासीसह आपल्या बापाच्या घरीं जाण्यास निघाली असतां वाटेंत दासीला सर्प चावला व ती मरण पावली. शीलच जिला सहाय्यक होतें अशी मित्रवती 'क्रौञ्चपत्तन' नामक नगरांत आली. आपत्तींनीं गांगरून गेल्यामुळें ती वेड्यासारखी झाली. 'स्फीतक' नामक पुजाऱ्याला तिची दुरवस्था पाहून दया उत्पन्न झाली. तो म्हणाला– तूं मला बहिणीसारखी आहेस, माझ्या घरीं राहा. ती त्याच्या घरीं गेल्यावर प्रसूत झाली. तिला सुंदर मुलगा झाला. ती मलवस्त्र धुण्यासाठीं जलाशयावर गेली. इकडे मणिकंबलांत ठेवलेल्या तिच्या मुलाला कुत्र्यानें मणिकंबलासह राजाच्या घरांत नेलें. राजानें राजिलेला तो सुंदर मुलगा दाखविला. त्या दोघांनीं त्याचें चांगलें पालन-पोषण केलें.

इकडे मित्रवती घरीं आली. आपलें मूल नाहींसें झालें असें तिला वाटलें. तिनें फार शोक केला. पुजाऱ्यानें तिला आपल्याच घरांत बहिणीप्रमाणें सांभाळलें. अपकीर्तीच्या भीतीमुळें ती पितृगृहींही गेली नाहीं. शीलव्रत पाळून पूजकाचेच घरीं ती राहिली.

यक्षदत्ता, हीच तुझी माता समज. राजा व राणी हे तुझे पालक आहेत. तूं घरीं जाऊन तुझ्या जन्माबद्दल राजा व राणीला विचार म्हणजे माझ्या वचनाची खात्री वाटेल.

यक्षदत्त घरीं गेला व माझे आई-बाप कोण आहेत हें खरें सांगा नाहीं तर मी या तरवारीनें तुम्हाला ठार मारीन असें म्हणाला. तेव्हां त्यांनीं मणिकंबल त्याच्यापुढें आणून टाकिलें. व तुझी प्राप्ति आम्हाला कशी झाली हें सांगितलें. यानंतर तो आपल्या माता-पित्यांना भेटला. याचप्रमाणें लक्ष्मणानें सुग्रीवाला त्याच्या प्रतिज्ञेचें स्मरण करून देऊन त्याला प्रतिज्ञा पाळावयास लाविली.

सुग्रीवही स्वतः विमानांत बसून शोध करावयास निघाला. कंबुपर्वतावर त्याचें विमान आलें. त्यावर ध्वज रोवलेला त्याला दिसला. विमानांतून उतरून खालीं आल्यावर रत्नजटीची गांठ पडली. आपण कशासाठीं इकडे आलों हें सुग्रीवानें सांगितलें. तें ऐकून रत्नजटीनें रावणानें सीतेचें हरण करून तिला त्यानें लंकेला नेलें. मी त्याच्या कार्यांत अडथळा आणल्यामुळें त्यानें रागावून माझ्या विद्या छेदल्यामुळें मी या पर्वतावर पडलों. आतां तुमची भेट झाल्यामुळें मला फार आनंद झाला. सुग्रीवानें अतिशय हर्षानें त्याला विमानांत बसवून किष्किन्धा नगरीकडे आणिलें. 'रावणानें सीतादेवीला लंकेला नेलें' असें त्यानें रामचंद्रांना सांगितलें. ही वार्ता समजल्यामुळें रामचंद्रांना आनंद वाटला. त्यांनीं आपल्या अंगावरील वस्त्रभूषणें त्याला दिलीं. एवढेंच नव्हे तर 'देवोपगीत' नांवाचें नगर जें त्याच्या शत्रूंनीं बळकावलेलें होतें त्याचें पूर्ण स्वामित्वही त्यांनीं त्याला दिलें.

यानंतर रामचंद्रांनीं येथून लंकानगरी किती दूर आहे असा प्रश्न विचारला. तेव्हां सर्व विद्याधर घाबरले. लक्ष्मण रागावून त्यांना म्हणाला— विद्याधरानों, त्याला तुम्ही मुळींच घाबरू नका. तो रावण शूर नाहीं भ्याड आहे, पापी आहे व नीच आहे. शूर असतां तर त्यानें राजरोसपणानें सीता नेली असती. रामचंद्र म्हणाले— त्याचें मरण जवळ आलें आहे म्हणून ही दुर्बुद्धि त्याला सुचली आहे. त्याला या अकार्याचें कटुफल आम्ही चाखवूं.

जांबूनद म्हणाला— प्रभो, आपण रावणाबरोबर लढण्याचा आग्रह धरणें योग्य नाहीं. त्याचा परिणाम चांगला होणार नाहीं असें मी एक दृष्टांत देऊन सांगतों. आपण तो ऐकून कसें वागावें हें ठरवा म्हणजे आपणांस दुःख होणार नाहीं.

वेणातट नामक नगरांत सर्वरुचि नामक व्यापाऱ्याला विनयदत्त नांवाचा मुलगा होता. विनयदत्ताच्या पत्नीचें नांव 'गृहलक्ष्मी' होतें. विशालभूति विनयदत्ताचा मित्र होता पण गृहलक्ष्मीवर तो आसक्त झाला होता. त्यानें क्रीडेच्या निमित्तानें विनयदत्ताला वनांत नेलें व एका झाडाच्या उंच शाखेवर त्यानें त्याला अगदीं आवळून बांधिलें व तो आपल्या घरीं गेला. इकडे थोड्यावेळानें 'क्षुद्र' नांवाचा एक मनुष्य मार्ग चुकून त्या वनांतील त्या झाडाखालीं थकून बसला. त्याला विव्हळण्याचे शब्द ऐकू आले. त्यानें वर पाहिलें तों एका मनुष्याला उंच फांदीवर बांधलें आहे असें दिसलें. वर जाऊन त्यानें त्याला बंधनमुक्त केलें. क्षुद्रकाला विनयदत्तानें घरीं नेलें. विनयदत्त घरीं आलेला पाहून विशालभूति तेथून पळून गेला. एके दिवशीं फार मोठा वारा सुटला व क्षुद्राच्याजवळ असलेला कागदी मोर उडून राजवाड्यांत पडला. राजपुत्रानें तो आपल्याजवळ ठेवला. 'क्षुद्रक' विनयदत्ताला म्हणाला— विनयदत्ता, मी तुला बंधनमुक्त करून तुझ्यावर उपकार केला त्याचें फल म्हणून तूं माझा मोर राजपुत्राजवळून आणून मला दे. विनयदत्त म्हणाला— मित्रा, तो राजपुत्र तुझा मयूर देत नाहीं यास्तव त्याच्या ऐवजीं मी तुला दुसरा मोर किंवा इतर कांहीं पदार्थ देतों. पण क्षुद्रक म्हणाला— माझाच मोर मला पाहिजे. दुसरें कांहींही मी घेणार नाहीं. याप्रमाणें जाम्बूनदानें दृष्टांत सांगून रामचंद्रांना त्यानें म्हटलें— प्रभो, आपला हा दुराग्रह क्षुद्रकाच्या दुराग्रहाप्रमाणें आहे. यास्तव हा दुराग्रह सोडा व आम्हा विद्याधरांच्या अत्यंत सुंदर कन्यांबरोबर विवाह करून आनंदानें राहा.

हें जाम्बूनदाचें भाषण ऐकून लक्ष्मण म्हणाला— आपलें भाषण मला अगदीं अनुचित वाटतें. तें कसें अनुचित आहे हें पुढील दृष्टांतावरून तुमच्या ध्यानांत येईल.

कुसुमपुरांत श्रीप्रभव नामक एक धनवान् कुलीन व्यापारी होता. त्याच्या पत्नीचें नांव 'यमुना' होतें. या उभयांना धनपाल, बंधुपाल, गृहपाल, क्षेत्रपाल व पशुपाल असे पांच पुत्र होते. हे पांचजण आपल्या नांवाप्रमाणें कार्य करीत असत. यानंतर आत्मश्रेय नांवाचा साहवा मुलगा त्यांना झाला. हा नाजुक पण पुण्यवान् होता. देवकुमाराप्रमाणें भोग भोगित राहिला. एकेवेळीं तूं कांहीं उद्योग करीत नाहींस म्हणून आई-बाप रागावले. याला अभिमानीपणामुळें त्यांचें बोलणें सहन झालें नाहीं. घर त्यागून तो बाहेर पडला. प्रवासाचें दुःख सहन होईना म्हणून तो आत्महत्येस प्रवृत्त झाला असतां त्याला शुभोदयानें एका वाटसरूची गांठ पडली. त्यानें श्रेयो-

धर्माला याप्रमाणें आपली हकीकत सांगितली :— मी पृथुस्थान नगराच्या राजाचा 'सुभानु' नामक पुत्र आहे. मला भाऊबंदांनीं त्रास दिला म्हणून गांव सोडून प्रवास करीत कूर्मपुर नामक गांवाला आलों. तेथें मला एक दयाळु आचार्य भेटले. त्यांनीं मला दुःखी पाहून एक लोखंडाचें कडें दिलें व याच्यापासून तुझें सर्व दुःख नाहींसें होईल असें त्यांनीं सांगितलें. त्या कड्यापासून दुःख नाहींसें होऊन माझें राज्य मला मिळालें आहे. मी आतां माझ्या राजधानीला जातो. व हें कडें तूं घे. या कड्यापासून सर्व रोग नाहींसे होतात. ग्रह, नाग, पिशाच हे वश होतात. व सर्व दुःखें नष्ट होतात. असें सांगून तें कडें त्यानें आत्मश्रेयाला दिलें. तो तें कडें घेऊन कुसुमपुराला आला. त्यादिवशीं कुसुमपुराच्या राजाची राणी सर्पदंशानें मूर्च्छित व निश्चेष्ट झाली होती. तिला स्मशानांत आणिलें होतें. श्रेयोधर्मानें तें कडें तिच्या अंगावरून फिरविलें व तिला जिवंत केलें. राजानें हर्षित होऊन त्याला पुष्कळ धन दिलें. तो राजाप्रमाणें पुनः भोग भोगू लागला.

एकेवेळीं हा आत्मश्रेय सरोवराकडे स्नान करण्यास गेला. त्याच्या कांठावर आपलीं वस्त्रें काढून त्यावर त्यानें तें दिव्य लोखंडाचें कडें ठेविलें. स्नान करून तटावर येऊन पाहिलें. त्याला तेथें कडें दिसलें नाहीं. एका घोरपडीनें तें कडें तोंडांत धरून एका मोठ्या झाडाच्या तळभागाजवळील छिद्रांत नेऊन ठेवलें होतें आत्मश्रेय त्या झाडाजवळ आला. त्याला बिळांत असलेल्या घोरपडीचा आवाज ऐकून घोरपडीनेंच कडें नेलें असा निश्चय करून त्यानें तें झाड उपडलें व बिळ फोडून घोरपडीस मारून टाकिलें. व लोखंडाच्या कड्याबरोबर आंतील धन हस्तगत करून सुखानें राहूं लागला.

याप्रमाणें दृष्टांत सांगून दृष्टांताची जुळणी लक्ष्मणानें याप्रमाणें केली :— माझे बंधु रामचंद्र आत्मश्रेयासारखे आहेत. लोखंडाचें कडे सीतादेवीप्रमाणें आहे. रावण घोरपडीप्रमाणें व लंका निधिप्रमाणें आहे. आम्हा दोघा बंधूंना रावणाची तिळमात्रहि भीति वाटत नाहीं. हें लक्ष्मणानें सांगितलेलें आख्यानक ऐकून सर्व विद्याधर आश्चर्यचकित झाले.

पुनः जाम्बूनद म्हणाला— एकदां रावण अनन्तवीर्याच्या सभेंत जाऊन त्यानें माझ्या मरणाला कोण कारण होईल असा प्रश्न केला. तेव्हां अनंतवीर्य केवली म्हणाले— देवपूजित सिद्धशिलेला जो मानव उचलील तो तुला मारील. पण या वाक्याचा अर्थ रावणानें भलताच ग्रहण केला. अर्थात् मनुष्य सिद्धशिला उचलू शकणार नाहीं व त्याच्यापासून मला मरण येणार नाहीं.

लक्ष्मण म्हणाला— विद्याधरांनो, मला ती सिद्धशिला दाखवा. मी ती अवश्य उचलीन. त्यानंतर विद्याधरांनीं राम व लक्ष्मणांना विमानांत बसवून सिद्धशिलेजवळ नेलें. सर्व विद्याधरांनीं व राम-लक्ष्मणांनीं सिद्धपरमेष्ठीची स्तुति केली. लक्ष्मणानें परिकर बांधून ती दोन हातांनीं उचलली. सर्वांना त्यावेळीं मोठा आनंद झाला. नंतर अनेक तीर्थांची वंदना करून पुनः सगळेजण राम-लक्ष्मणासह किष्किन्धा नगराकडे आले. पुनः रामचंद्र म्हणाले— आतां आपण रावणाला जिंकण्यासाठीं लंकेला जाऊ असें म्हटल्यावर मंत्र्यांनीं म्हटलें कीं— प्रभो, रावणाशीं विरोध करूनही आपण त्याला जिंकू शकणार नाहीं. यास्तव सामोपचारार्थ आपण एक दूत पाठवू. तो आपल्या भाषणानें रावणाचें मन वळवील व तो दूत म्हणजे पवनंजयपुत्रा शिवाय दुसरा कोणी समर्थ नाहीं. म्हणून त्याला आम्ही येथें बोलावून घेऊ असें म्हणून मारुतिकडे श्रीभूति नांवाचा दूत पाठविला. या मारुतिविषयीचें विवेचन पुढील पर्वामध्यें वाचकांनीं वाचावें.

# अट्ठेचाळीसावें पर्व.

[ चन्द्राभादि कन्यांचें सौंदर्य, गान, नर्तनादिक रामचन्द्राच्या मनाला प्रसन्न करूं शकली नाहींत.]

स्वर्लोकाहुनि आल्या रामा जणु रमविण्यास सुररामा[1] ।
वीणावादन करिती कन्या नुपजविति मोह परि रामा ॥ १ ॥
गायन सुन्दर सुन्दर लीला त्यांच्या अनेक पाहून ।
राघव-मन नच रमलें सीताविरहांत जाहलें मग्न ॥ २ ॥
अनुकूल सर्व असतां भोग्यपदार्थांत राम नैव रमे ।
सीतेशिवाय त्याचें मनास अप्रियपणाचि पूर्ण गमे ॥ ३ ॥
न रुचे अन्नादिकही सीतामय चित्त जाहलें त्याचें ।
मुनि मुक्ति चिन्ति जैसें सीतेसचि राम चिन्तितो साचें ॥ ४ ॥
सीतेस चित्त चिन्ती वाणी सीताकथेस सतत कथी ।
कन्यारूपा बघति न रामाचे नेत्र हीच रामरति ॥ ५ ॥
काका अनेकदेशीं फिरशी सीतेस पाहिलें काय ? ।
सांग मला वा सुजना तिजविण हा क्षीण होतसे काय[2] ॥ ६ ॥
आला असेल वारा स्पर्शुनि सीतावपूस मज वाटे ।
चिन्तुनि ऐसें त्याच्या सर्वाङ्गीं येति हर्षमय कांटे ॥ ७ ॥
जेथें असेल वसली सीता ती भूमि धन्यता पावे ।
चन्द्रास रूप जिंकी म्हणून तो त्यास पाहतो भावें[3] ॥ ८ ॥
ही जानकी असे कां ? नाहीं ही मन्दवातधूतलता[4] ।
वस्त्र तिचें मृदु हें का ? नाहीं मृदुपल्लवस्थ कोमलता ॥ ९ ॥
नयन तिचे मज गमती, नाहीं पुष्पांत भृंग हे वसले ।
चञ्चल तिचा असे कर, नाहीं पल्लव मनांत हें गमलें ॥ १० ॥
मी पाहतों मयूरीं सीतेच्या मृदुल केशभारास ।
अर्ध्या चन्द्रीं बघतों निशि सुन्दरशा तिच्या ललाटास ॥ ११ ॥

---

१ देवस्त्रिया; अप्सरा. २ शरीर. ३ प्रेमानें. ४ मंद वाऱ्यानें हालविलेली.

तन्नेत्रकान्ति शोभे सितारुणश्यामकमलवृन्दांत[1] ।
स्मितकान्ति रक्तपल्लव-मध्यस्थित-शुभ्रपुष्पनिकरांत ॥ १२ ॥
सीतेची स्तनशोभा वेलींच्या पुष्पगुच्छकांत दिसे ।
कंवर तिची जिनाच्या सुन्दरशा स्नपनवेदिकेस[2] हसे ॥ १३ ॥
सीतेच्या मांड्यांची कदलीस्तम्भांत आढळे शोभा ।
धरितो तिच्या पदाची कमलाचा मृदुल आंतला गाभा ॥ १४ ॥
सकलावयवीं शोभा सीतेच्या दिसत जी मला होती ।
तैसी शोभा धारण करि नच चन्द्रादि सुखदवस्तुतति ॥ १५ ॥
यापरि विचार असतां करीत रामा वियोग सीतेचा ।
दुःसह झाला आला विचार सुग्रीवखगनरेशाचा ॥ १६ ॥

[ लक्ष्मण रागावून सुग्रीवाकडे जातो व त्याला प्रतिज्ञेची आठवण करून देतो. ]

सीता शोध कराया गेला सुग्रीव कां उशीर करी ।
त्यानें तिला बघितलें नसेल ऐसा विचार येइ उरीं ॥ १७ ॥
किंवा माझ्या विरहें होउनि ती तप्त पावली मरण ।
जाणुनि तें सांगाया नसेल तो येत सांगतें स्वमन ॥ १८ ॥
किंवा कृतार्थ[3] झाला मिळतां त्या राज्य आपुलें वाटे ।
विसरून दुःख माझें झाला तो स्वस्थ म्हणुनि नच भेटे ॥ १९ ॥
यापरि विचार येतां रामाचें नयनिं अश्रुकण आले ।
पाहून लक्ष्मणाचें सुग्रीवीं चित्त कुपित बहु झालें ॥ २० ॥
लाल तयाचे झाले कोपानें नेत्र तीक्ष्ण तरवार ।
घेऊन करीं धांवत येई सुग्रीवसदनिं तो शूर ॥ २१ ॥
मालक तुझा स्वपत्नीविरहजदुःखांत मग्न असतांही ।
भार्या-सुखांत रमशी तुजसम निर्लज्ज अन्य जन नाहीं ॥ २२ ॥
खोट्या सुग्रीवाचा केला मद्बन्धुनें जसा नाश ।
पाप्या तसा तुझा मी करीन लागे न यांत अवकाश[4] ॥ २३ ॥
यापरि कठोर भाषण असतां लक्ष्मण करीत मनिं भ्याला ।
सुग्रीव हात जोडुनि वदला देवा! प्रमाद[5] हा घडला ॥ २४ ॥

---

१ पांढरीं, तांबडीं व काळीं कमळें. २ जिनस्नान घालण्याचा कट्टा.
३ कृतकृत्य. ४ वेळ. ५ अपराध.

अपराध एक घडला क्षमा करावी म्हणून मी विनवी ।
भार्यावृन्दहि त्याचा लक्ष्मणकोपास नमुनि उपशमवी ॥ २५ ॥
सज्जन-मेघापासुनि भाषणजलवृष्टि जेधवा होते ।
लोकारणि[1]मथनाची सगळी ती आग जाय विलयातें ॥ २६ ॥
मन सज्जनवृन्दाचें प्रणाममात्रें प्रशान्त झणि होतें ।
परि पुष्कळ दानें ही दुर्जनहृदयांत शान्ति नच येते ॥ २७ ॥

[ जसें मुनींनीं यक्षदत्ताला ही तुझी माता आहे म्हणून आठवण करून दिली तशी लक्ष्मणानें सुग्रीवाला प्रतिज्ञास्मृति करून दिली. यक्षदत्तकथा याप्रमाणें :—]

माता असे तुझी ही योगिवरें कथुनि यक्षदत्तास ।
केला उपकार जसा तैसें लक्ष्मीधरें प्रतिज्ञेस ॥ २८ ॥
गौतमगणधर वदले ऐक कथा श्रेणिका तुला कथितों ।
ऐकून शीलरक्षण करून मानव अघास संहरितो ॥ २९ ॥
कौञ्चपुराचा होता मनुजेश्वरें[2] ' यक्ष ' या सुनामाचा ।
त्या राजिला सुपत्नी ध्यास जिला श्रीजिनेन्द्रनामाचा ॥ ३० ॥
पुत्र तयांना होता पराक्रमी यक्षदत्त नांवाचा ।
विहरत गेला बाहिर ज्याच्या होती मुखांत मधुवाचा ॥ ३१ ॥
जेथें दरिद्र राहत होती जनता अशा विभागांत ।
सुन्दर नारी दिसली तियेंत तच्चित्त होय अनुरक्त ॥ ३२ ॥
मदनें पीडित होउनि नृपसुत जाया निघे निशासमयीं ।
अवधिज्ञानी मुनिवर वदले नच योग्य हें तुला होई ॥ ३३ ॥
विद्युद्द्योतें[3] दिसले ' आयत ' नामक यतीश वृक्षतलीं ।
गेला सखड्ग[4] नृपसुत वन्दन केलें तयास पदकमलीं ॥ ३४ ॥
विनयें विचारिलें त्या भगवन् ! मज कां निषेधिलें बोला ।
जासी जिच्याकडे तूं माता तव सत्य मान मम बोला ॥ ३५ ॥
माता कशी असे ती माझी सांगा मुनीश करुणेनें ।
वदती तयास तोही ऐके तद्वृत्त कुतुकयुक्तमनें ॥ ३६ ॥

---

१ लोकरूपी अरणीची लाकडें. त्याचें घर्षणानें उत्पन्न झालेला अग्नि. लोकांचा वैराग्नि सज्जनमेघाच्या भाषणरूपी पाण्यानें शान्त होतो. २ राजा. ३ विजेच्या प्रकाशानें. ४ तरवारीसह.

[ यक्षदत्ताची जन्मकथा मुनीश्वर सांगतात. ]

नगरी सुन्दर आहे नांव जिचें ' मृत्तिकावती ' प्रथित ।
' कनक ' असे व्यापारी भार्या ' धू ' त्यास सद्गुणी शान्त ॥ ३७ ॥
उभयास पुत्र झाला नांवानें ' बन्धुदत्त ' गुणवन्त ।
मित्रवतीशीं झाला विवाह होती जिनेन्द्रपदभक्त ॥ ३८ ॥
कालें मित्रवती ती गर्भवती जाहली नि पति गेला ।
व्यापार करायास्तव अज्ञात असा प्रकार हा घडला ॥ ३९ ॥
सासू नि सासऱ्याला गर्भाचें चिह्न जेधवा दिसलें ।
व्यभिचारिणी असे ही जाणुनि हाकून तैं तयें दिधलें ॥ ४० ॥
उत्पलिकादासीसह पितृसदना दुःखिनी सती गेली ।
दासी तिची पथामधिं अहिदंशें गरलपीडिता[1] मेली ॥ ४१ ॥
शीलचि फक्त सहायक मित्रवती कौञ्चपत्तना आली ।
अतिशयशोकसमाकुल बुद्धि तिची भ्रान्त तेधवा झाली ॥ ४२ ॥
' स्फीतक ' देवपुजारी कोणी त्यानें दयार्द्र होऊन ।
ठेवियलें निजसदनीं झाला मुलगा तिला तिथें छान ॥ ४३ ॥
मलवस्त्रा क्षालाया गेली श्वानें मुलास पळवून ।
' मणिकम्बलवृत[2] ' नेलें बालाचें भूप करितसे जतन ॥ ४४ ॥
होती भूपालाची अनपत्या[3] ' राजिला ' सती राणी ।
रक्षण तिनें तयाचें केलें सुत मानिलें तया त्यांनीं ॥ ४५ ॥
येऊन सती पाही गृहांत सुत नच तिला तदा दिसला ।
शोक तिनें बहु केला देवार्चक मनिं अतीव कळवळला ॥ ४६ ॥
मी बहिण मानिलें तुज राही माझ्या घरीं सुखें बाळे ! ।
सांगून असे तिजला ठेवी तेथेंचि मन तिचें खेळे ॥ ४७ ॥
नच साहायक कोणी लाज मनीं भय अकीर्तिचें थोर ।
म्हणुनि न पितृगृहिं गेली जिनधर्माचा करी सदाचार ॥ ४८ ॥
शीलवती ही दिसली तुजला पूजकगृहांत सुन्दरशी ।
ही जन्मदायिनी तुज नान्दे ठायीं हिच्या सुगुणराशि ॥ ४९ ॥

---

१ सर्प चावून विषानें पीडित होऊन. २ रत्नकंबलानें झांकलेला. ३ पुत्र रहित.

व्यापारास्तव गेला जेव्हां पति-वन्धुदत्त त्या समयीं ।
मणिकम्बल तिज दिधलें यक्षनृपाचें घरांत तें पाही ॥ ५० ॥
ऐकुनि जन्मकथा ही भावें वन्दुनि मुनीन्द्रचरणास ।
तो यक्षदत्त गेला परतुनि मोदें नृपालसदनास ॥ ५१ ॥
वदला मस्तक तोडिन तुमचें मी सत्य जरि न बोलाल ।
मम जन्महेतु आहे कोण कुणाचा असेन मी बाल ॥ ५२ ॥
यक्षनृपानें कथिलें श्वानें मणिकम्बलावृता तुजला ।
आणुनि अमुच्या सदनीं ठेवियलें पोपिलें तुला बाला ॥ ५३ ॥
पाही हें मणिकम्बल जरायुलेपें[2] विलिप्त झालेलें ।
केलें याचें रक्षण निर्णय घेवोत करुनि तव डोळे ॥ ५४ ॥
नन्तर पहिल्या माता-पितरासह संग जाहला त्याचा ।
मोठा उत्सव केला हृदया आनन्द जाहला साचा ॥ ५५ ॥
यापरि कथिली सुकथा निजविषयीं लक्ष घालि वा आतां ।
ऐसें लक्ष्मण वदतां सुग्रीव निघे धरून मनिं चिन्ता ॥ ५६ ॥
लक्ष्मीधरें तयाला श्रीरामपदासमीप आणियलें ।
वन्दन करून उभयहि नम्रपणें आसनावरि वसले ॥ ५७ ॥
सुग्रीवानें कथिलें सेवक-खेचरगणास चतुरपणें ।
श्रीरामसती-सीता शोधावी यत्न करुनि अचलमनें ॥ ५८ ॥
या संपूर्ण महीतलिं पातालीं नभिं जलीं स्थलीं शोधा ।
जम्बूद्वीपीं सागरिं घाला सर्वत्र पालथी वसुधा[3] ॥ ५९ ॥
कुलपर्वत[4]कुञ्जामधि नानावनिं मेरुपर्वतीं नगरीं ।
विद्याधरराजांच्या रम्यस्थानांत तेवि भूविवरीं ॥ ६० ॥
सर्वस्थानीं पाहा दहा दिशामधि करा महायत्न ।
आज्ञा ही शिरिं घेउनि शोधा सीता जसें महारत्न ॥ ६१ ॥
सर्वस्थानीं यापरि सुग्रीवें कथुनि दूत पाठविले ।
गेले दहादिशामधि नभःपथें कार्यनिरत ते झाले ॥ ६२ ॥

---

१ कुत्र्यानें. २ गर्भातील बालकावर रक्तानें माखलेलें जें पातळ आवरण असतें तें जरायु. ३ पृथ्वी. ४ भरतादिकक्षेत्रांचा विभाग करणारे पर्वत हिमवान्, महाहिमवान् आदिक.

भामण्डलाकडेही पाठविला दूत तरुण खग एक ।
लेखार्थां अवधारुनि झाला त्याला तदा महाशोक ॥ ६३ ॥
आला दुःखें पीडित राही रामासमीप रात्रिदिनीं ।
सुग्रीवासम त्याचा बनून तो भक्त मानि त्यास धनी ॥ ६४ ॥
सुग्रीवही निघाला सीतान्वेषण करावयास झणी ।
दुष्टखगांच्या नगरीं अनेक हुडकून जाय तो गगनीं ॥ ६५ ॥

[ रावणानें सीता हरण करून नेली असें रत्नजटीनें सुग्रीवास सांगितलें. ]

सन्तत फडफडणारा वातें ध्वज गिरिशिरीं तया दिसला ।
उतरून विमानांतुनि झणिं ध्वजाच्या समीप तो आला ॥ ६६ ॥
गरुडास सर्प पाहुनि भय पावें तेवि त्यास रत्नजटी ।
चिन्ता मनांत पावें माते रक्षील कोण शैलतटीं ॥ ६७ ॥
त्या दुष्टरावणानें सुग्रीवा मद्विनाश करण्यास ।
पाठविलें मम विद्या नाशुनि त्या वाटला न सन्तोष ॥ ६८ ॥
यापरि करीत असतां चिन्ता सुग्रीव पातला तेथें ।
रत्नजटीला वाटे मम मरणचि आज पातलें येथें ॥ ६९ ॥
तेव्हां त्याच्या देहीं सुग्रीवा बघुनि कांपरें भरलें ।
सुग्रीवचित्त झालें परि त्या पाहुनि दयारसें ओलें ॥ ७० ॥
भद्रा[1] नकोस भिउ तूं सुग्रीवें त्या पुनः पुनः म्हटलें ।
तेणें रत्नजटीनें धैर्यानें वृत्त आपुलें कथिलें ॥ ७१ ॥
सीतेस हरुनि रावण असतांना नेत आडवा आलों ।
त्यानें विद्या माझी हरिली दुःस्थित[2] म्हणून मी झालों ॥ ७२ ॥
मनिं धरुनि जीवनेच्छा येथें मी ध्वज उभारिला आहे ।
येथें तवागमन मम शुभदैवानें घडून ये पाहे ॥ ७३ ॥
वार्ता ऐशी ऐकुनि सुग्रीवमनांत मोद बहु झाला ।
रत्नजटीला घेउनि निजनगरा तो अतित्वरें गेला ॥ ७४ ॥

[ रावणानें सीतेला हरिलें ही वार्ता रत्नजटीनें रामचन्द्रांना सांगितली तेव्हां त्यांनीं स्वदेहावरील अलंकार देऊन 'देवोपगीत' नगरावरचें त्याला पूर्ण स्वामित्वही दिलें. ]

---

१ सज्जना. २ दुःखित.

लक्ष्मीधर-विद्याधर-समक्ष यांच्या स्वहस्त जोडून ।
रत्नजटी श्रीरामा वदला नाथा ! करा तुम्ही श्रवण ॥ ७५ ॥
देवा ! देवी दुष्टें दशाननें जानकी सती हरिली ।
कोपें मम विद्याही लङ्केशानें दया न त्या आली ॥ ७६ ॥
शोक तिनें बहु केला जो जनहृदयीं दयेस उपजवितो ।
परि त्या नरपापाणीं मृदुतेला हेतु नैव झाला तो ॥ ७७ ॥
विद्याधरवृन्दांचा अधिपति इन्द्रास समरिं जिंकून ।
कारागृहांत टाकुनि ज्यानें त्या बनविलें महादीन ॥ ७८ ॥
भरतक्षेत्रीं ज्यानें त्रिखण्डभूपा पराक्रमें स्ववश ।
केलें कैलासाचल उचलुनि शशिशुभ्र बनविलें स्वयश ॥ ७९ ॥
ही सागरान्त पृथ्वी आज्ञा दासीसमान शिरिं वाहे ।
ज्याला जिंकु न शकती सर्व सुरासुर मिळूनही पाहे ॥ ८० ॥
धर्म-अधर्मा जाणी जो विद्वच्छ्रेष्ठ भुवनिं विख्यात ।
सीता ज्यानें हरिली रावण जाईल कां न नरकांत ॥ ८१ ॥
हें सर्व वृत्त ऐकुनि नानारस रामहृदयिं उद्भवले ।
तेणें रत्नजटीला देहालङ्कारवस्त्र सकल[1] दिलें ॥ ८२ ॥
'देवोपगीत' नगरीवरील अधिकार त्यास पूर्ण दिला ।
जो पूर्ववंशजांचा शत्रूंनीं दीर्घकालसा हरिला ॥ ८३ ॥
आलिङ्गुनि रामानें विचारिलें वृत्त त्या पुनः सकल ।
सानन्दचित्त होउनि त्यानें कथिलें पुनः तया निखिल ॥ ८४ ॥

[ लङ्कानगरी येथून किती दूर आहे ? असा रामचंद्रांचा विद्याधरांना प्रश्न.]

नन्तर उत्सुक होउनि वदले श्रीरामचन्द्र खचरांना[2] ।
लङ्कानगरी येथुनि दूर असे किति मला निवेदा ना ॥ ८५ ॥
रामप्रश्ना ऐकुनि विद्याधर घाबरे भयें झाले ।
खालीं तोण्डें घालुनि खिन्नमनें मौन तेधवा वरिलें ॥ ८६ ॥
जाणुनि तदभिप्राया श्रीरामें पाहिलें तिरस्कारें ।
मस्तकिं करयुग जोडुनि वदले ते मन्दवचन खचर दरें[3] ॥ ८७ ॥
नामहि दशाननाचें घेतां कोणी मनांत भय उपजे ।
अतिशय निर्बल आम्ही दशकण्ठ महाबलें सदा साजे ॥ ८८ ॥

---

१ सगळें. २ आकाशांत विहार करणाऱ्या विद्याधरांना. ३ भीतीनें.

अथवा समक्ष अपुल्या निर्भय होऊन माहिती कथितों ।
ती मनिं अवधारावी कठिणपणा अन्यथा कसा कळतो ॥ ८९ ॥

[ राक्षसद्वीपांतील लङ्कानगरीचें वर्णन. ]

या लवणसागरामधिं आहे प्रख्यात राक्षसद्वीप ।
जो सातशे सुयोजन विस्तृत ज्याचें असे गमे माप ॥ ९० ॥
शैल त्रिकूटनामें नवयोजन उंच जो नभीं गेला ।
पन्नास योजनाचा ज्याचा विस्तार भूवरी दिसला ॥ ९१ ॥
हा द्वीप मेघवाहन खगेश्वरा राक्षसेश्वरें[1] दिधला ।
सोनें रत्नें यांच्या वैपुल्यानें[2] सदैव जो भरला ॥ ९२ ॥
शोभे शैलावरती लङ्कानगरी जशी सुरेशपुरी ।
रम्यप्रासादांनीं सुरवृन्दांचेंहि चित्त सतत हरी ॥ ९३ ॥
जी तीस योजनांची विस्तृत परिखा[3] तटावृता शोभे ।
शाखानगरें आलीं सौन्दर्य बघावया जिचें लोभें ॥ ९४ ॥
सन्ध्याकार, ह्लादन, सुवेल, काञ्चन, नि हंस योधन हे ।
द्वीप असे वहु असती शोभा स्वर्गासमान त्या पाहे ॥ ९५ ॥

[ रावण व त्याच्या परिवाराचें वर्णन. ]

भाऊ पुत्र कलत्र नि मित्र नि वान्धव जनास घेऊन ।
क्रीडा करितो रावण सन्तत ज्या सेवितात भृत्यगण ॥ ९६ ॥
भ्राता ज्यास ' विभीषण ' वलवान् प्रिय जो समस्तजनतेस ।
समरीं अजय्य ज्याचीं शुभकार्ये-फलेंचि कीर्ति-लतिकेस ॥ ९७ ॥
ज्याच्या मतिचातुर्या पाहुनि सुरगुरु मनांत वहु लाजे ।
रावणराज्य जयाच्या मतिविभवानेंच[4] सतत वहु साजें ॥ ९८ ॥
ज्या ' भानुकर्ण ' भाऊ गुणभूषण ज्या त्रिशूल साध्य असे ।
समरीं भुवयां चढवुनि बघावया सुरहि ज्या समर्थ नसे ॥ ९९ ॥
दशकण्ठपुत्र ज्याचें अन्वर्थक ' इन्द्रजित् ' असे नांव ।
ज्याच्या करमुष्टिमधें लोकत्रय राहण्या मिळे वाव ॥ १०० ॥
परिवार रावणाचा नाना विद्याप्रभावनीं[5] निपुण ।
विक्रम अपूर्व ज्याचा एकहि इतरांत सांपडे न कण ॥ १०१ ॥

---

१ व्यन्तरदेवांचा इन्द्र ' राक्षसेश्वर ' त्यानें. २ पुष्कळपणानें. ३ खन्दक व तटानें घेरलेली. ४ अपार बुद्धीनें. ५ अनेक विद्यांचा प्रभाव दाखविण्यांत चतुर.

शुभ्रच्छत्र ज्याचें जणु जिंकी पूर्ण पूर्णिमेन्दूस ।
छायेखालीं ज्याच्या लाभे अतिशान्ति पूर्ण मेन्दूस ॥ १०२ ॥
ज्याच्या छत्रा पाहुनि समरीं निर्गर्व भूपगण होती ।
ज्याच्या मुखकान्तीनें निष्प्रभ चन्द्रासमान अरि दिसती ॥ १०३ ॥
त्या रावणास समरीं जिंकायाला समर्थ कोण असे ।
म्हणुन कथा ही सोडा जातां यावरि जगांत होय हसें ॥ १०४ ॥
याचा पुतळा किंवा सुन्दरसें तैलचित्र शत्रु जरी ।
पाही किंवा नामही ऐके वाटेल भय तयास उरीं ॥ १०५ ॥
आहे जगांत उद्धत समर्थ वा कोण त्यास जिंकील ।
बाजूस विषय ठेवा अन्योपायावरी वदा बोल ॥ १०६ ॥

[ घाबरलेल्या विद्याधरांचें रावणाविषयींचें भाषण ऐकून खवळलेल्या लक्ष्मणानें रावण भित्रा, अधार्मिक, दांभिक व पापी आहे असें भाषण केलें व श्रीरामचंद्रांनींही लक्ष्मणाच्या भाषणाला पुष्टि दिली. तीं भाषणें याप्रमाणें :— ]

ऐशी बघुनि खगस्थिति अनादरें हरि मृगेन्द्रसम बोले[1] ।
भय त्याचें तुमच्या मनिं विद्याधर हो रुतून बहु बसलें ॥ १०७ ॥
आपण म्हणता तैसा असतां रावण समर्थ शूर जरी ।
रामस्त्रीला नेता कां चोरुनि शौर्य त्याचिया न उरीं ॥ १०८ ॥
रावण दाम्भिक आहे भ्याड असे तेवि पापकर्मा ही ।
मोही असे महाधम ठायीं त्याच्या न शूरता लवही ॥ १०९ ॥
श्रीरामचन्द्र वदले वार्ता कळली सुदैव हें माझें ।
आतां वदा न कांहीं करणें त्या क्षुब्ध कर्म हें साजें ॥ ११० ॥
मरण तयाचें आलें जवळचि ये अशुभकर्म उदयास ।
भोगील फल तयाचें न पडे मारावयास आयास ॥ १११ ॥

[ रामचंद्राचें भाषणानंतर एका वृद्धाचें भाषण. ]

श्रीरामवचन ऐकुनि मौन क्षणभर धरून वृद्ध वदे ।
शोकास सोड रामा अधिपति होऊन मोद आम्हां दे ॥ ११२ ॥
रम्भादि अप्सरासम ज्या विद्याधरकुमारिका त्यांचा ।
पति तूं होउनि नाथा ! वियोगदुःखें विमुक्त हो साचा ॥ ११३ ॥

१ सिंहासारखी गर्जना करून.

[ रामचंद्राचें वरील भाषणास उत्तर. ]

श्रीरामचन्द्र वदले मम प्रयोजन न अन्यललनाशीं ।
नाना-निजलीलांनीं क्षम जिंकायास होति जरि शचिशी ॥ ११४ ॥
विद्याधर-भूपांनो तुमचें माझ्यावरी जरी प्रेम ।
आहे वा अनुकम्पा[1] सीता मज दाखवा सुखाधाम[2] ॥ ११५ ॥

[ श्रीरामचंद्राचें भाषणानंतर दृष्टांतपूर्वक जाम्बूनदाचें भाषण. ]

जाम्बूनद तें वदला हा मूढाग्रह असे प्रभो ! अपुला ।
हा सोडावा आपण याचा परिणाम होय केवि भला ? ॥ ११६ ॥
दृष्टान्त एक कथितों आपण तो निजमनांत ठेवून ।
वागा म्हणजे दुःख न होइल होईल परमकल्याण ॥ ११७ ॥
वेणातट-नगरामधिं गृहस्थ ज्या नाम सर्वरुचि होतें ।
त्या विनयदत्त नामक सुपुत्र सोडि न कदापि विनयातें ॥ ११८ ॥
मित्र तयाचा होता नाम जयाचें विशालभूति असे ।
विनयाच्या 'गृहलक्ष्मी' पत्नीमधिं मन तदीय[3] लुब्ध वसे ॥ ११९॥
मानुनि वचन तियेचें मित्रा क्रीडामिषें वनीं नेलें ।
झाडाच्या शाखेवरि भूतीनें[4] त्यास बद्ध दृढ केलें ॥ १२० ॥
तो खल विशाल[5] गेला होउनि सानन्द आपल्या सदनीं ।
दिङ्मूढ नि मार्गच्युत नर आला 'क्षुद्र' नाम त्याच वनीं ॥ १२१ ॥
पाहून दाट छाया वसला तरुतलिं तदा तयें श्रवणें[6] ।
कण्हणें क्षुद्रें ऐकुनि पाहियलें ऊर्ध्व करुनि निजनयनें ॥ १२२ ॥
अत्युच्च-वृक्षशाखीं बांधियलें दृढ जयास त्या विनया ।
करण्यास मुक्त गेला आली हृदयांत ज्याचिया सुदया ॥ १२३ ॥
मुक्त तयाला केलें तेव्हां तो विनयदत्त घेऊन ।
त्या क्षुद्राला गेला स्वगृहा चित्तांत मोद पावून ॥ १२४ ॥
स्वजनें उत्सव केला विशाल[7] त्या बघुनि पळुनि झणि गेला ।
दुर्जन-मैत्री अहिता करी गमे मधुर जरि तिची लीला ॥ १२५ ॥
होता मयूर कृत्रिम या क्षुद्राजवळिं एक त्या प्रेमें ।
ठेवी उडून गेला वातें नृपसदनिं ये न तो नियमें ॥ १२६ ॥

---

१ दया. २ सुखाचें आधाम- सर्व बाजूंनीं स्थान. ३ त्याचें- विशालभूतीचें. ४ विशालभूतीनें. ५ विशालभूति. ६ कानांनीं. ७ विशालभूति.

राजकुमारें त्याला अपुल्या सदनांत गुप्त ठेवियलें ।
क्षुद्रास शोक झाला तेणें विनयास तो असें बोले ॥ १२७ ॥
वृक्षाच्या शाखेवरि खलमित्रें बान्धिलें तुला होतें ।
मी मुक्त तुला केलें उपकृतिचें दान आज मज दे तें ॥ १२८ ॥
जीवन्त मी रहावें ऐसी इच्छा तुझ्या मनीं राहे ।
जरि तो मयूर माझा आणुनि दे अन्यथाचि[1] मृति पाहे ॥ १२९ ॥
श्रीविनयदत्त वदला दुसरा आणून मोर देईन ।
मणिरत्नें वा घेई मोर तुझा तो कदापि लाभे न ॥ १३० ॥
क्षुद्र वदे मज देई माझाच मयूर अन्य घेइन न ।
हट्ट जसा क्षुद्राचा आग्रह अपुला प्रभो! तसा जाण ॥ १३१ ॥
द्यावा सोडुनि आग्रह नाथा! सीता न परत ती लाभे ।
सुन्दरखगकन्यांच्या लाभें अपुलें स्वरूप बहु शोभे ॥ १३२ ॥
द्या सोडुनि हा आग्रह न तरी होइल जगांत सतत हसें ।
सुज्ञांच्या हृदयामधिं शोकाला स्थान केधवाहि नसे ॥ १३३ ॥
[ जांबूनदाच्या दृष्टांताचें खंडन करणारें प्रतिदृष्टांतयुक्त लक्ष्मणाचें भाषण. ]
हें जाम्बूनद भाषण ऐकुनि लक्ष्मण वदे तया चतुर ।
वचन तुझें हें अनुचित कथितों मी योग्य तेंचि अवधार ॥ १३४ ॥
गृहपति कुसुमपुरामधिं होता श्रीप्रभव नाम धनवन्त ।
धनपालादिक त्याला होते सुत पांच सकल गुणवन्त ॥ १३५ ॥
आत्मश्रेय सुनामा झाला त्या साहवा सुपुत्र गुणी ।
देवसुतासम भोगी वैभवभोगा नि वदनिं मधुवाणी ॥ १३६ ॥
कोणे एकेवेळीं माता-पितरें तयास कटुवचनें ।
ताडण केलें मानी गेला बाहेर शीघ्र कुपितमनें ॥ १३७ ॥
सुकुमार देह त्याचा दुःखद झाला प्रवास बहु त्यास ।
कार्य कराया क्षम नच तो आत्मश्रेय इच्छि मरणास ॥ १३८ ॥
पूर्वभवार्जितकर्मे वाटसरू भेटला तया एक ।
म्हटलें त्यानें मनुजा वदतों जें शान्तमानसें ऐक ॥ १३९ ॥
अधिप पृथुस्थानाचा जो त्याचा मी सुभानुसुत आहे ।
बन्धुजनांनीं पीडित आलों मी फिरत या स्थलीं पाहे ॥ १४० ॥

---

१ मोर आणून न दिलास तर.

नैमित्तिक-वचनाला गेलों मी अनुसरून कूर्मपुरा ।
आचार्य भेटले मज दयाजलाचा जणु प्रसन्न झरा ॥ १४१ ॥
मज मार्गदुःखपीडित पाहुनि शुभ लोहकटक[1] देऊन ।
वदले कटक असे हें रोगांच्या नाशनीं महानिपुण ॥ १४२ ॥
वाढवितें मतिविभव[2], ग्रहनागपिशाच विवश वश करितें ।
देतों तुजला करिं घे समस्त-दुःखास हें तुझ्या हरितें ॥ १४३ ॥
नैमित्तिकें मला जी कथिली ती प्राप्त होय शुभवेला ।
निजराज्यपालनास्तव जातों आतां स्वकीय नगराला ॥ १४४ ॥
होतात भूपतीच्या प्रमाद[3] हस्तें अनेकदा सुहृदा[4] ! ।
ते कारण नाशाचे त्याच्या होतात जाण हें वहुधा ॥ १४५ ॥
निर्दुःख[5] जीविता तूं इच्छित असशील घे कडें विबुधा ।
प्रिय तुजला होइल हें स्वर्गी अमरास होय जेवि सुधा ॥ १४६ ॥
लब्ध द्रव्य सुपात्रा देणें कारण महाफला होतें ।
वाढे कीर्ति तयानें तशीच जनपूज्यता तयें येतें ॥ १४७ ॥
यापरि बोलुनि आत्मश्रेया देई सुभानु लोहकडें ।
आत्मश्रेय स्वगृहा जाइ सुभानु स्वराजधानिकडे ॥ १४८ ॥
कुसुमपुराधिप-पत्नी मूर्च्छित निश्चेष्ट सर्पदंशानें ।
पितृवनिं[6] दग्ध कराया आणियली जेधवा नरेशानें ॥ १४९ ॥
लोखण्डाच्या कटकें आत्मश्रेयें जिवन्त ती केली ।
सानन्दचित्तभूपापासुनि त्या प्राप्त पूज्यता झाली ॥ १५० ॥
पुण्योदयें तयाला नृपदुर्लभ भोग लाभले सगळे ।
निजबन्धुसहित भोगी महासुखें जीं विशाल पुण्यफलें ॥ १५१ ॥
हा प्रभव-पुत्र आत्मश्रेय कराया सरोवरीं स्नान ।
गेला वस्त्रावरती सरस्तटीं लोहकटक ठेवून ॥ १५२ ॥
इकडे घोरपडीनें लोहाचें कटक वदनिं घेऊन ।
केला प्रवेश तरुतलिं विळिं होतें जेथ हेमरत्नधन[7] ॥ १५३ ॥
आत्मश्रेयें उपडुनि विशालवृक्षा विळास फोडून ।
मारुनि घोरपडीला कटकासह मिळविलें निधानधन[8] ॥ १५४ ॥

---

१ लोखंडाचें कडें. २ बुद्धिसामर्थ्य. ३ चुका. ४ मित्रा. ५ दुःखरहित सुखपूर्ण जगणें. ६ स्मशानांत. ७ सोनें व रत्नाचें धन. ८ जमिनींतील संपत्ति.

आत्मश्रेयासम मम वन्धु असे लोहकटकसम सीता ।
घोरपडीसम रावण लङ्का निधितुल्य जी असे कान्ता ॥ १५५ ॥
मारून रावणाला सीता मिळवावया समर्थ असे ।
श्रीराम नि हा लक्ष्मण अमुच्या मनिं भीतिलेशही न वसे ॥ १५६ ॥
आख्यानक हें ऐकुनि आश्चर्यें चकित सकल जन झाले ।
रावणमरणा कारण होइल जगिं कोण जाम्बुनद बोले ॥ १५७ ॥
[ जो सिद्धशिला उचलील तो तुला मारील असें अनन्तवीर्यकेवलींनीं रावणाला सांगितलें. ]
वन्दुनि अनन्तवीर्या योगीन्द्रांना दशाननें केला ।
होईल मरण माझें कैसें हा प्रश्न बोलले बोला ॥ १५८ ॥
देवें पूजित अनुपम निर्वाणशिलेस[2] मनुज उचलील ।
जो तव दशानना वा मरणाला खचित हेतु होईल ॥ १५९ ॥
केवलिभाषित ऐकुनि दशाननें वेगळा अभिप्राय ।
हृदयीं धारण केला मम मरणा कोण हेतु नच होय ॥ १६० ॥
मानव कैसा उचलिल निर्वाणशिला न शक्य हें काम ।
हेतु न मम मरणामधिं असा अभिप्राय जाणिला वाम[3] ॥ १६१ ॥
सिद्धशिला ती पाहू भव्यांना मोददायिनी आहे ।
वदला लक्ष्मण मम मनिं उत्सुकता दुथडि भरुनि जणु वाहे ॥ १६२ ॥
या लक्ष्मणवचनाचा एकान्तीं सकल खगवरें केला ।
सुविचार निष्प्रमादें झाले उद्युक्त तेवि गमनाला ॥ १६३ ॥
विद्वान जाम्बूनद खग सुग्रीव, विराध जाति नल नील ।
वसवून विमानामधिं रामा, लक्ष्मीधरास बहुलील ॥ १६४ ॥
सर्व सुरासुर करिती जिला नमस्कार त्या शिलेजवळी ।
ते सर्व उतरले खग जयजयकारास घोळवून गळीं ॥ १६५ ॥
दाही दिशांत रक्षक ठेवुनि भालीं करास जोडून ।
सर्व सुगन्धितपुष्पें पूजिति चित्तास शुद्ध ठेवून ॥ १६६ ॥
चन्दन-केशर यांच्या लेपें भूषित करून सिद्धशिला ।
वन्दन करून सिद्धां प्रदक्षिणा देति खचर ते तिजला ॥ १६७ ॥
[ राम-लक्ष्मण व सर्व विद्याधर सिद्धपरमेष्ठींची स्तुति करितात. ]

---

१ सुंदर. २ सिद्धशिला. हिला कोटिशिलाही म्हणतात. ३ उलटा, खोटा.

परिकर बान्धुनि लक्ष्मण विनयें स्तुतिवन्दना करायास ।
उद्युक्त होय जेव्हां स्तविलें खचरेंहि सकल सिद्धांस ॥ १६८ ॥
जयजय शब्दा बोलुनि खचर कपिध्वज मनांत मोदून ।
मंगल उत्तम शरणा विशुद्ध सिद्धांस जाति ते शरण ॥ १६९ ॥
त्रैलोक्याच्या शिखरीं महाप्रकाशें स्वयं असे युक्त ।
लब्धस्वरूप जन्में रहिता सिद्धांस वन्दितों सतत ॥ १७० ॥
संसार तरुनि गेले झाले आधार मुक्ति-सौख्यास ।
शक्ति ज्ञान नि दर्शन अनन्त वन्दन असो सुसिद्धांस ॥ १७१ ॥
जे स्थिर निजस्वभावीं अनन्तवीर्याद्यनन्तगुणधारी ।
कर्मे समस्त नाशुनि बनले जे सिद्ध पूर्ण अविकारी ॥ १७२ ॥
अवगाहन-गुणधारक, अमूर्त, गुरुलघुपणा[2] नसे ज्यांना ।
धरिती सिद्धात्मागण निजप्रदेशा असङ्ख्य शुद्ध गणा ॥ १७३ ॥
धरिती अनन्त सुगुणा अनन्त गुण-पर्यायास जाणति जे ।
जाळुनि कर्मवनाला झाले जे मुक्तिपत्तनीं राजे ॥ १७४ ॥
तेजोमण्डल ज्याचें ऐशा इन्द्रें धरून भक्ति मनीं ।
संसारभीत होउनि सिद्धांचे वर्णिले गुण स्तवनीं ॥ १७५ ॥
ज्या तीर्थकर देखिल दीक्षासमयीं स्मरून हृदयांत ।
वन्दिति तो सिद्धांचा समूह अमुचा हरो अघव्रांत[3] ॥ १७६ ॥
संसारधर्मविरहित सिद्धांचे धर्म जाहले प्राप्त ।
वन्दन करितों आम्ही त्या सिद्धां सर्वकार्यसिद्ध्यर्थ ॥ १७७ ॥
जे या शुद्धशिलेवरि सुशील मुनि सिद्धसुगुण चिन्तून ।
कर्मविनाशें झाले सिद्ध तया आमुचे असो नमन ॥ १७८ ॥
कृतकृत्य जाहले जे जिनेश्वरासम अशा सुसिद्धगणा ।
मङ्गलशरणा स्मरतों आम्ही गातों तदीय सकलगुणां ॥ १७९ ॥
लक्ष्मीधरास खगनृप उद्देशुनि बोलले मनें विमल ।
हे सिद्ध शरण मङ्गल होउत तव कार्यसिद्धिचें मूल ॥ १८० ॥
या निर्वाणशिलेवरि झाले जे सिद्ध अन्य वा तेही ।
तव विघ्न दूर सारुनि मङ्गल होवोत कार्यसिद्धिमही ॥ १८१ ॥

---

१ पुष्कळ दीपप्रकाश जसे एके ठिकाणीं मावतात तसे अनन्तसिद्ध बाधारहित एके ठिकाणीं राहणें. २ हलका व भारी नसणें. ३ पापसमूह.

अर्हन्त तुझें मङ्गल, मङ्गल होवोत सिद्धसूरिगण।
मङ्गल पाठक मङ्गल जिनशासन तव सदैव सुखसदन ॥ १८२ ॥
भूचर खेचर यांचा मङ्गलरव गिरिगुहेमधें पसरे।
कोटिशिलेला उचली स्वबलें लक्ष्मण अतीव हर्षभरें ॥ १८३ ॥
केयूरभूषणांनीं भूषित बाहुद्वयें हरी उचली।
ती बहुभूषणयुक्ता सिद्धशिला कुलवधूसमा दिसली ॥ १८४ ॥
झाला नभिं देवांचा दिव्यध्वनि तो श्रवून खग झाले।
विस्मित सुग्रीवादिक पुण्यें होतेंचि सर्वदैव भले ॥ १८५ ॥
भयवर्जित सिद्धांना नमून मुनिसुव्रतास सम्मेदीं।
श्रीवृषभादि-जिनांची मुक्तिस्थानें प्रवन्दिती मोदीं ॥ १८६ ॥
यापरि सगळया भरतीं खगसंहतिनें प्रदक्षिणा केली।
लक्ष्मणसङ्गत रामा घेउनि किष्किन्धपत्तना आली ॥ १८७ ॥

[ विद्याधर लक्ष्मणानें सिद्धशिला उचलल्यावर आपसांत
राम-लक्ष्मणांच्या राज्यप्राप्तिविषयीं अनेक विचार बोलू लागले. ]

खग अन्योन्या वदती अल्पदिनांनीं समस्त भूवरती।
होईल राज्य यांचें यांच्या शक्तीस भूतलीं न मिति ॥ १८८ ॥
ज्यानें निर्वाणशिला स्थानापासून उचलली स्वबलें।
तो रावणास मारिल निःसंशय खग असें कुणी वदले ॥ १८९ ॥
यावर कोणी वदले ज्यानें कैलास शैल उद्धरिला।
त्या रावणा शिला ही उचलायाला असाध्य कां बोला ॥ १९० ॥
दुसरे उत्तर वदले कैलासोद्धार रावणें केला।
स्वबल न त्याचें जाणा ही विद्यांचीच निश्चयें लीला ॥ १९१ ॥
कोणी वदले द्यावा सोडून विवाद सन्धि उभयांत।
होईल तो करावा जेणें होईल खचित विश्वहित ॥ १९२ ॥
करुनि प्रसन्न रावण सीता त्याच्याकडून आणून।
अर्पण करीन रामा युद्धाचें मग उरे प्रयोजन न ॥ १९३ ॥
युद्धीं तारक मेरुक तैसें श्रीकार्तवीर्य आदि नृप।
सेना मोठी असुनिहि मेले यम त्यावरी करी कोप ॥ १९४ ॥

१ धर्मपत्नी. २ आनन्दित झालेले.

होते त्रिखण्डपति हे वैभवशाली पराक्रमी भूप ।
परि नष्ट समरिं झाले देतें हें युद्ध तीव्र-सन्ताप ॥ १९५ ॥
यापरि करुनि विचारा सुग्रीवादिक समीप रामाचे ।
येउनि विनयें बसले वदले श्रीराम त्यास तैं साचें ॥ १९६ ॥
आतां विलम्ब कां हो सीता माझ्याविना महादुःखी ।
जाऊं लौकर तेथें नातरि होईल ती महा असुखी ॥ १९७ ॥

[ हे रामचन्द्र प्रभो, रावणाबरोबर विरोध करण्यानें तुम्हाला जय मिळेल असें आम्हाला वाटत नाहीं. दूत पाठवून सीतेच्या प्राप्तीचा प्रयत्न करावा असें मन्त्री बोलले. ]

मन्त्री रामा वदले नाथा ! सीतेस इच्छिता काय ? ।
अथवा विरोध राक्षसनाथाशीं दृढ विचार वद होय ॥ १९८ ॥
यांत तुम्हाला नाथा विजयाशा नच असें मना वाटे ।
कारण रावण दारुण[1] अरि चारिल तो तुम्हा खडे काटे ॥ १९९ ॥
या भारतीं त्रिखण्डीं रावण निःशत्रु[2] एकटा आहे ।
सम्पूर्ण सागरस्थद्वीपीं तो साध्य केवि हो पाहे ॥ २०० ॥
रणबुद्धि नाथ ! सोडा जेणें होईल शान्ति तेंचि करा ।
तो क्रुद्ध जरी होइल जीवांचाही विनाश होय पुरा ॥ २०१ ॥
आहे भ्राता त्याचा नाम बिभीषण असे महाचतुर ।
तो क्रूरकर्मविरहित अणुव्रतीं दृढ विवेक ज्या थोर ॥ २०२ ॥
रावण बिभीषणाच्या वचना उल्लंघितो न केव्हांही ।
उभयीं प्रीति तयांची अखंड अन्तर तयांत नच पाही ॥ २०३ ॥
तो रावणास बोधिल अथवा पालन करील कीर्तीचें ।
लज्जा वा त्या होइल सीतेला पाठवील तो साचें ॥ २०४ ॥
वाक्चातुर्य जयाला ज्याचा दशकण्ठ सतत अनुरागी ।
दूत असा पाठवितां प्रसन्न होईल तो महोद्योगी ॥ २०५ ॥
नाम महोदधि ज्याचें खगेश त्यानें अशी कथा कथिली ।
लङ्कानगरी यन्त्रें वसवुनि अत्यन्त दुर्गमा[3] केली ॥ २०६ ॥
या विद्याधरवृन्दीं जाउनि लङ्केस परत येईल ।
ऐसा कोणी न दिसे म्हणून चिन्ता असेचि ही फोल ॥ २०७ ॥

---

१ भयंकर. २ शत्रुरहित. ३ प्रवेश करण्यास अशक्य.

पवनञ्जय-राजाचा श्रीशैल प्रथित पुत्र जो आहे ।
विद्या-सत्त्व-पराक्रम ऐसे गुण त्यांत राहती पाहे ॥ २०८ ॥
आहे दशाननासह सख्य तयाचें नि पाठवा त्यास ।
सामोपचार करण्या विघ्नानें करिल रहित तो खास ॥ २०९ ॥
केली महोदधीची सर्वांनीं सूचना तदा मान्य ।
म्हटलें पुरुषोत्तम तो या कार्या योग्य होय नच अन्य ॥ २१० ॥
तत्काल मारुतीच्या जवळीं श्रीभूति दूत पाठविला ।
वृत्तान्त सर्व त्याचा येईल पुढें असेल जो घडला ॥ २११ ॥
आहे समर्थ मानव कार्याचा वोधही तया आहे ।
भवितव्य योग्यकालीं घडतें ' जिनदास ' हें मनीं पाहे ॥ २१२ ॥

इति श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे कोटिशिलाक्षेपणाभिधानं नाम अष्टचत्वारिंशत्तमं पर्व ॥ ४८ ॥